# गतगोष्टी

अर्थात्

## माझी जीवन-यात्रा

न. चिं. केळकर

सन १९३९

किम्मत पांच रुपये

# समर्पण

हें आत्मचरित्र माझ्या मुलांनातवंडांना आणि माझ्याशी सहानुभूति बाळगणाऱ्या इष्टमित्रांना अर्पण केलें आहे.

—न. चिं. केळकर

# अनुक्रमणिका

भंगट रामभाऊ—चेटकीण भलुआत्या—अद्भुत रसाच्या बाळगोष्टी—सात राक्षसाची व मोदकांची गोष्ट—सध्याकाळचा उदासपणा व मुलाचे रडणे—गावठी शाळेतील हरिपतोजी—त्याच्या शिक्षांचे वर्णन—मिरजेची सरकारी शाळा—१८७६ सालचा दुष्काळ—शाळेला गव्हर्नराची भेट—व सोन्याचा चाद पाहण्याची निराशा—भव्य शाळा इन्स्पेक्टर—रडबे चिंतोपत मास्तर—बक्षिस समारभातील माझे पार्ट व सभाषणे—सरकार वाड्यातील जेवणाचे दुःख—मिरजेतील टौनहॉल व अजबखाना—मी स्वकष्टार्जित मिळविलेले पहिले चार आणे—दर्ग्यातील पिरान्या भेटी—मिरजेतील नाटकगृह नाटक व तमाशे—कोकणात पाहिलेले पहिले नाटक—आजोळची पहिली सफर—विष्णुपत छत्र्याची सर्कस—आजीबाई पटवर्धनाचा वाडा व माझी पुराणिकी—खेळाचे अड्डे—मिरज हायस्कुलांतील शिक्षकाची वर्णने—जुने स्टोरी-टेलर—अरेबियन नाईट्सचे वाचन—स्वदेशीचे पुणेरी प्रचारक रा. खरे—गोपाळ नरसिह देशपांडे इदापूरकर—अतिशयोक्तीची आठवण—मिरजेतील तालिमी—देवाची पहिली आठवण व धावा—बाल नाटक मडळी—त्यांचा चिलीमदेव—लहानपणचे एक रूपक—माझे पुराणश्रवण—चांदोरकराचा भागवतसप्ताह—झोपेत चालण्याचा पराक्रम—एक गमतीचे पतकास्थान—भाग पिण्याचा एक अनुभव—तेव्हाच्या प्रवासाची सकटे—माझे कानडीचे पाठांतर—माझी घोडस्वारी—मला " पाहावयाला " येतात—माझा बालविवाह—सासऱ्याची प्रेमळ कुचेष्टा—उभय कुटुबाचा अखड आजन्म ऋणानुबध—देवाला चिठ्ठी टाकून झालेले एक लग्न.



मॅट्रिकची परीक्षा—पुण्याचे प्रथमदर्शन—के० कुटे यांची ओंकारेश्वरावर भेट—फर्ग्युसन कॉलेजांतील पी. ई. ची पहिली टर्म—माझ्या सपादकीचे एक भविष्य—केसरी छापखान्याचे प्रथमदर्शन—गद्रेवाड्यातील फर्ग्युसन कॉलेज व त्यांतील प्रोफेसराची वर्णने—राजाराम कॉलेज—जेवणाचा क्लब—कॉलेज प्रोफेसरांची वर्णने—डेक्कन कॉलेज—कॉलेजातील मुलाचे कौतुक व फुकटी श्रीमती—डेक्कन कॉलेजांतील माझा कार्यक्रम—अभ्यासाची हेळसांड—खेळाडूपणाची हौस—क्लबांतील जीवन—गाऊन-अंगयाच्या झुलीची नवी टूम—प्रो. सेल्बी—प्रो. भांडारकर—प्रो. बॅरेट—झळकीकर व वरूडकरशास्त्री—विक्षिप्त प्रो. करकरे—कॉलेजांतील मित्रमंडळी—नौकाविहाराचे 'रोमान्स'—मृच्छकटिक नाटकाचा प्रयोग

**अधिकारयोगाचा उत्तरार्ध ३९८ ते ४७५**



**असहकारिता पर्व ४७६ ते ५६९**



**कायदे कौन्सिलांतील कामकाज ५६९ ते ६१२**

# आभारप्रदर्शन

या पुस्तकाच्या कामी अनेकाचे अनेक प्रकारे सहाय्य झाले त्याचा उल्लेख करणे अवश्य आहे. अगदी पहिला उल्लेख चि. काशिनाथ बापू केळकर याचा. त्याने अगत्यपूर्वक फार वर्षांपासून जुळवून ठेवलेल्या कात्रणा-कागदपत्रांचा उपयोग योग्य वेळी किती झाला हे सागतां पुरवत नाही. केसरी ट्रस्टींनी आपल्या छापखान्यांत हे पुस्तक थोड्या वेळांत छापून देण्याची सोय केली, रा. आ. रा. भट यानी त्याच्या छपाईची व विक्री करण्याची सर्व जबाबदारी स्वीकारून केसरी मराठा व सह्याद्रीच्या वर्गणीदारांना ते सवलतीने मिळण्याची व्यवस्था केली, तसेच प्रो. माटे यानी मुद्रितांवरून नजर टाकून उप-युक्त सूचना केल्या, या सर्व प्रकारच्या सहाय्याबद्दल वरील सर्वांचा मी ऋणी आहे.

**न. चिं. केळकर**

# गतगोष्टी

अर्थात्

# माझी जीवन-यात्रा

## हकीकत

### ( १ ) म्हातारपणीं विश्रांतीची अपेक्षा

सूर्य अस्ताला जाऊन प्रकाश मंद होऊं लागला म्हणजे पशु-पक्षी आपली आहार-विहाराची जागा सोडून विश्रांतीच्या अशा वेगळ्या स्थळाकडे परतू लागतात. जे पशु हिंस्र नसतात ते पाळीव असतात, यामुळे त्यांच्या विश्रांति-स्थळाची तजवीज त्यांच्या मालकांनी केलेली असते. परंतु पक्षी प्रायः स्वतंत्र म्हणून आपापली विश्रांति-स्थळे स्वतःच्या आवडीनें पसंत करितात, आणि तींहि बहुधा ठरीव असतात.

दररोज घराच्या गच्चीवर संध्याकाळी मी उभा राहतों तेव्हां पोपटाचे थवेच्या थवे पश्चिमेकडून पूर्वेकडे धावताना दिसतात. यावरून असे वाटतें कीं, त्यांच्या आहार-विहाराच्या स्थळाहून त्यांचे विश्रांति-स्थळ म्हणून कांहीं तरी वेगळे असावें. वास्तविक त्यांचा आहार-विहार कोठें तरी झाडांवरच होत असतां त्यांना विश्रांतीचें म्हणून वेगळें झाड कां लागावें ? मग असे असेल कां, कीं आहार-विहाराच्याच जागीं राहिल्यानें त्यांना खरी विश्रांति अशी वाटत नाहीं ? सुरक्षिततेच्या दृष्टीनें कोणतेंहि एखादें उंच झाड दुसऱ्या एकाद्या उंच झाडासारखेंच खात्रीचें नव्हे का ! पण सुरक्षितता मिळविणें एवढाच या स्थलांतरांत त्यांचा हेतु असावा असें मला वाटत नाहीं. विश्रांति-स्थळ पसंत करितांना पक्षी झाडाचे जे कोणतेंहि गुण पसंत करीत असतील ते गुण आहारविहार-स्थळांतल्या कोण-

त्याहि झाडांत त्यांना आढळत नसतील असे नाही. म्हणून मी त्यांच्या स्थलातराचा अर्थ हाच करितो की, अशा वेगळ्या स्थलातराशिवाय त्याना खरी विश्रांति अशी वाटतच नसावी

मनुष्याचेहि बहुधा असेच असते. तो जेव्हां कार्यनिवृत्त होऊन विश्रांतीची अपेक्षा करितो तेव्हा तो प्रथम स्थलातर करितो. कारण जुन्या स्थळाला काही कांही ताज्या आठवणी चिकटून राहतात. मनाने त्या विसरू म्हटले तरी विसरता येत नाहीत. चिरपरिचयाने मनावर झालेले ठसे पुसून जात नाहीत, आणि पूर्व कार्याची आठवण झाली की, केवळ त्यामुळेच विश्रांतीला कमीपणा आला असे होते. म्हणूनच, मला वाटते, वानप्रस्थाश्रमात मनुष्याने घर सोडून स्थलांतर करावे असे शास्त्रवचन असावे हे नवीन स्थळ वन किंवा अरण्य असले तर शास्त्रोपदेशाप्रमाणे उत्तमच. पण ते प्रत्यक्ष अरण्यच नसले तरी निदान असे असावे की, तेथे त्याला पूर्वीच्या प्रवृत्तिकर्माची उपाधि तर नव्हेच पण आठवणहि न व्हावी.

यांतच दुसरीहि एक गोष्ट गर्भित असते. ती ही की, निवृत्ति-सुख भोगण्याचे हे नवे स्थळ प्रवृत्तिकार्याच्या स्थळाइतके सुखसोईनी समृद्ध नसले तरी चालेल. कार्याचा व्याप किवा विस्तार जितका कमी तितकी सुखसोईची गरजहि साहजिकच कमी होते, किबहुना निवृत्तिमार्गी मनुष्याला त्या उपाधीसारख्याहि वाटू लागतात ! त्याच्या मनांत शक्य तितक्या साध्या राहणीची आवड उत्पन्न होते. या साध्या राहणीत, सामानसुमान व सुखसोई याच्याप्रमाणे, इतर मनुष्यांची आपणाभोवती गर्दी नसावी, असेहि त्याला वाटू लागते. मनुष्य-सगतीत सुख नाही असे कोण म्हणेल ? पण आयुष्यांत पुढे पुढे अशी वेळ येत असते की, तेव्हां त्याला एकांतवासच अधिक सुखाचा वाटतो. विचार स्वतःपुरते व स्वतःचे असावे, आणि विकार उत्पन्न होण्याची संधि जितकी कमी तितके अधिक बरे !

पण विश्रांतिकरितां सध्याकाळी स्थलातर करणारा वर सांगितलेला पक्षी, आणि वार्धक्यात वानप्रस्थाच्या शाततेचा अभिलाष धरणारा आतां सांगितलेला हा मनुष्य, यांच्यामध्ये एक मोठा फरक आहे. जसजसे वार्धक्य येऊ लागते तसतसा मनुष्याला आपला मृत्यु अधिकाधिक समीप आला अशी जाणीव होऊ

लागते. पशुपक्ष्याना ही जाणीव नसावी असे मला वाटते. ते सायकाळी विश्रांति-स्थळी जातात तेव्हा उद्या आपण काय करणार याचा विचार त्यांच्या डोक्यात असतोच असे म्हणवत नाही. कारण आल्या दिवसापुरता स्वैर आहार-विहार, ( यदृच्छा-सूचित आहार-विहार ) हेच त्याचे नित्यकर्म असते. पण आजच्या कार्याची आठवण त्यांना दुसरे दिवशी अगदी नसतेच असेहि म्हणवत नाही. उदाहरणार्थ, आदल्या दिवशी अर्धा खाऊन सोडलेला रेडा दुसऱ्या दिवशी सगळा खाऊन पुरा करण्याकरितां वाघ त्याच स्थळी हटकून येतो असा शिकारी लोकांचा अनुभव आहे. तसेच घरटे बांधण्याचे काम पक्ष्याकडून एका दिवसांत सपत नाही. यामुळे आज अपुऱ्या राहिलेल्या घरट्याचे काम पुरे करण्याकरितां पक्षी फिरून दुसऱ्या दिवशी त्याच जागी येतो, आणि आणखी लागणाऱ्या गवत, काड्या, काटक्या, पाने व कापूस जमवू लागतो. यात त्याचे आणि प्रवृत्तिमार्गी मनुष्या-चे साम्य आहे. पण भेद आहे तो हा की, मनुष्याला मृत्यूच्या अपरिहार्यतेची जी कल्पना असते ती पशुपक्ष्याला नसते. बरे, उलट त्याला आपण अमर आहो असे वाटते हे देखील म्हणवत नाही खरे आहे ते इतकेच की, त्याला मृत्यु म्हणजे काय याची कल्पना नसावी.

मृत्यूच्या कल्पनेमुळे, मनुष्याला वानप्रस्थांतल्यासारख्या विश्रांतीला आहार-विहाराचा क्रम बदलण्याशिवाय आणखी एक कारण असते. मृत्यूची कल्पना असल्याकारणाने त्याला आपण जे सोडून जाणार त्याची आठवण अधिक होऊ लागते. केवळ काही वेळ निवास केलेली धर्मशाळाहि सोडून जातांना मनुष्य मागे वळून एकवार दृष्टि टाकतोच. मग कायमचे घर सोडून जातांना त्याला त्या घरातील पूर्वानुभवांचे स्मरण वारंवार होत असेल यांत काय आश्चर्य ! आणि घरापेक्षा एकदर ससारजीवनाचा व्याप व सबंध जितका अधिक त्या मानाने त्या जीवनाचे स्मरणपूर्वक समालोचन करण्याची इच्छा अधिक असणार हे उघड आहे. मला वाटते की, पशुपक्ष्याना जर मृत्यूची कल्पना असती तर नित्य विश्रांतीपेक्षा कायमची विश्रांति म्हणून काही घ्यावी असे त्यांनाहि वाटले असते. आणि कल्पना यापुढेहि थोडी नेऊन मी असे म्हणेन की, पशुपक्ष्यांना लिहितां-वाचतां येत असते तर या चिर-विश्रांतींत त्यानी आत्मचरित्रेहि लिहिली असती.

जीवनांतले अनुभव, मनुष्य काय आणि पशुपक्षी काय, दोघांचेहि आपापल्या-परी सारखेच असणार. दोघांच्या मूलभूत वासना पुष्कळशा त्याच असतात.

वासना-सफलतेचे मार्ग तेच असतात. सफलतेच्या मार्गातली विघ्ने एकाच जातीची व त्यांचा परिहार-मार्गहि एकाच प्रकारचा असतो. अर्थात् पूर्वानुभवाच्या स्मरणाचा आनद किंवा दुःख ही दोघांची सारखीच. फरक पडेल तो मनुष्या-इतकी पशुपक्ष्यांना दीर्घकालची सुसगत स्मरणशक्ति नसते, त्याना बुद्धि फार मर्यादित असते, आणि समष्टिरूप समाजाविषयी त्यांना मनुष्यासारखी भावना नसते येवढाच. एरवी पशुपक्ष्यानाहि आत्मचरित्रात विविध-रसात्मक आठवणी लिहावयाला सांपडतीलच. त्यांना लिहिता येत नाही म्हणून त्याच्याकरिता एकाद्या प्राणिशास्त्रवेत्त्याने त्या लिहून पहाव्या !

म्हातारपण हे हिवाळ्यातल्या पहाटेच्या चादण्यासारखे वाटते थडीमुळे बाहेर जाऊन उघड्या जागेत चादण्यात बसवत नाही. पण ऊबदार खोलीतील खिडकीशी बसून या चादण्यातून दूरवर पहाण्यात फार मौज असते देखावा दिसण्याइतका प्रकाश आहे, पण उन्हासारखा रखरखीत नाही वस्तु स्थूलरूपाने दिसतात, पण या स्थूल दर्शनामुळेच त्याचे कानेकोपरे, खाचखळगे लपून जाऊन एकदर जे मिळून स्वरूप दिसते ते सौम्य, सोज्वळ असते. अधिक सूक्ष्म स्वरूप दिसावे म्हणून डोळे प्रयत्न करितात. पण तो फुकट जातो. हिवाळ्या-पहाटेचे हे चांदणे पाडणारा चद्र वाढत्या सवित्रप्रकाशामुळे निस्तेज होत जाऊन मावळतो खरा. पण त्याला आशा असते की, फिरून शुक्ल पक्ष येणारच; तेव्हा मी वाढत्या कलानी तारुण्य संपादन करून पौर्णिमेच्या दिवशी रातभर आकाशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत राज्य व विहार करीन. तसेच हिवाळा सपून फिरून वसत व ग्रीष्म ऋतु येणार अशी संवत्सररूपी पुरुषाला खात्रीच असते. पण म्हातारपणाचा हिंवाळा एकदाच येतो व तो अखेरचाच असतो. 'शिशिर-वसंतौ पुनरायातः' हा क्रम मानवी आयुष्याला लागू पडत नाही. म्हणून आयुष्याअखेरच्या स्मृतिरूपी चांदण्यांत गतजीवनाचा जो काय स्थूल देखावा मनश्चक्षूना दिसेल तो पाहून समाधान पावावे लागते. म्हातारपणामुळे पहाटेची झोप लागत नाही, तेव्हां चांदण्यांतून दिसणारा देखावा मी अनेक वेळां पाहत बसतो, त्याचप्रमाणे गत आयुष्याकडे पाहून गत गोष्टीचे स्मरण करण्यांत जो आनंद लाभतो त्याचे सेवन करण्याकरितां ही पुढील टांचणे लिहीत आहे.

## ( २ ) म्हातारपणाविषयीं एका ग्रीक तत्वज्ञाचे विचार

वृद्धपणांतील समाधानासंबधानें एक फार चांगला संवाद मला अकस्मात आढळला तो, दोघे रोमन गृहस्थ, सिपियो आणि केटो यांच्यातला मूळचा इंग्रजीतच वाचण्यासारखा आहे. पण मराठी वाचकानाहि समजावा म्हणून त्याचा मराठी सारांश या खाली देतो.

" वृद्धपणांत अनेक दोष आहेत. असे असता तुम्ही म्हातारपणी सुखी समाधानी कसे दिसता ?" असे सिपियोनें विचारल्यावरून केटोने या प्रश्नाचे सोपपत्तिक उत्तर दिलें ते दोन हजार वर्षापूर्वीचे असले तरी केव्हाहि खरेंच राहील केटो म्हणतो :—" मी वृद्धपणींहि सुखी समाधानी आहे याचें तुम्हांला आश्चर्य कां वाटावें कळत नाही ज्याना आत्मसमाधान नाही त्यांना म्हातारपणीच काय पण आयुष्याच्या कोणत्याहि स्थितीत दुःखीच राहावें लागेल मनुष्याला सुख हवें असेल तर तें त्याला बाहेरून मिळणार नाही. ते स्वतःच्या अतरंगांतूनच मिळेल मनुष्याला वाटतें की, म्हातारपणाचा घाला आपणावर अकचित आला. पण वृद्धपण हे कोणावरहि एखाद्या दरवडेखोराप्रमाणे किंवा मारेकऱ्याप्रमाणे अवचित घाला घालीत नाही. ते क्रमानें येत असतें, पण त्या क्रमाकडे तो लक्ष देत नाही हा त्याचाच दोष होय. आपल्या वासनाचें जो योग्य नियंत्रण करील, निष्कारणपणे उदास किंवा त्रासिक असा आपला स्वभाव ठेवणार नाही, त्याला वृद्धपण हेंहि सुसह होऊ शकेल. मनोवृत्ति उद्दाम, उच्छृंखळ किंवा हावरेपणाची असली तर ती वृद्धपणा-तच काय, तरुणपणांतहि माणसाला दुःखी केल्यावाचून राहणार नाही. वृक्ष जुनाट झाला तरीहि त्याला चार फळें येतच असतात, त्यांचें कौतुक करण्याची बुद्धि माळ्यानें ठेवली पाहिजे. सामान्यपणे वार्धक्यावर चार-दोन प्रकारचे आक्षेप येतात. त्याचीं मी क्रमानें उत्तरें देतो.

" पहिला आक्षेप हा की, म्हातारपणी मनाच्या हौसेइतकें काम व श्रम करतां येत नाहीत. होय, तरुणपणी करितां आलें तितकें करतां येत नाहीत खरें. पण, म्हातारपणीच नीट करता येतील अशीहि कांही कामें असतात हें विसरू नये. जहाज चालू आहे, त्यावरचे खलाशी घाम फुटेइतकें काम करीत आहेत, आणि 'पायलट' म्हणजे जहाजाची दिशा संभाळणारा अधिकारी सुकाणूशी उगीच हात जोडून उभा आहे असें दिसतें. पण सुकाणूच्या साहाय्यानें त्यानें जहाजाची चाल योग्य

दिशेकडे रोखून न ठेवली तर घाम फोडणाऱ्या खलाशांच्या श्रमाने जहाज भलती-कडे जाईल किंवा खडकावर फुटेल ना! जहाजावरचे सुकाणू तरुणाच्या हातीं दिलेले कधी कुणी पाहिले आहे काय? राज्याच्या घटनेमध्ये देखील दोन दोन कायदेमंडळे नेमतात ती याच करितां की, नव्या दमाच्या तरुणानी भरलेल्या कनिष्ठमंडळाने जर कांही अविचार किंवा चूक केली तर ती वरिष्ठ मंडळातील वडिलांच्या विवेकाने सुधारली जावी. अनेक समाजांच्या इतिहासांत असे आढळते की, केवळ तरुणांचा हट्ट चालूं दिला, वृद्धांच्या सदुपदेशाचा अव्हेर झाला, या मुळेच ते समाज धुळीला मिळाले.

"दुसरा आक्षेप हा की, म्हातारपणी स्मृतिभ्रंश होतो; थोडेसे खरे आहे. पण, सिपिओ! लक्षांत ठेव की, म्हातारी माणसे देखील आपल्या प्रिय व मौल्यवान वस्तूचा ठेवा कोठे दडवून ठेवला आहे हे विसरत नाहीत. मौल्यवान वस्तूत नुसत्या धनाचा समावेश होतो असे नाही. स्मरण-शक्तीचा उपयोग न करतां ती गंज दिली तर तिचा नाश होईल. पण म्हाताऱ्या माणसांच्या अगदी लहानपणच्या आठवणी कधींहि बुजत नाहीत. कारण त्या त्यांना प्रिय असतात. तसेच मी म्हातारा झालो आहे ना? पण मी नुकताच ग्रीक भाषेचा अभ्यास सुरूं केला आहे. सॉक्रेटिस तंतुवाद्य वाजवायला शिकला ते प्रौढ वय उलटून गेल्यावर! स्मरणशक्ति अबाधित राहिली म्हणून!

"म्हातारपणामुळे शारीरिक बळ ऱ्हास पावते हे खरे. माझेंहि तसेंच झाले आहे. पण तुला माहीत आहे काय की, तरुणपणी देखील 'माझ्या अंगी हत्तीचें बळ कां नाही?' असे वाटून मी दुःखी झालो असतो तर त्याचा परिहार कसा होता? तात्पर्य, बळ टिकणे हे आपल्या हातचे नाही; पण म्हातारपणीहि असेल त्या बळाचा योग्य प्रसंगी योग्य उपयोग आपण करीत गेलो तर आपण निर्बळ झाल्याचे दुःख वाटणार नाही.

"माझा एक मित्र क्रोटन गांवचा, मिलो नांवाचा आहे. तो तरुणपणी मोठा मल्ल होता. पुढे म्हातारपणी एकदां आम्ही दोघे एका क्रीडांगणाशी मल्ल-विद्येचे खेळ पाहत बसलो असतां तो एकदम रडूं लागला. मी म्हणालो, "अरे, हे रे काय? रडायला काय झाले?" तो म्हणाला, "मीहि पूर्वी अशाच कुस्त्या जिंकून बक्षिसे मिळविली होती. आणि आतां माझे स्नायू शिथिल झाले, मला कुस्ती

करिता येत नाही या जाणीवेने मला रडू आले" तेव्हां मी त्याला म्हणालो, 'मिलो, तू किती मूर्ख आहेस ! तरुणपणचे बळ म्हातारपणी कसे राहील ? शिवाय हेंहि ध्यानांत आण की, तरुणपणी तू जी कीर्ति मिळविलीस ती तरी शरीर बळावरच ना ? पण पाशवी बळापेक्षां अधिक स्पृहणीय असे जे मनोबळ त्याचा तू कधी तरी उपयोग केला होतास काय ? आता तरी तो तू कर ना ! म्हातारपणी वक्तृत्वशक्ति नष्ट होते. कबूल. पण वयाने कमी होत नाही असा एक मधुर नाद म्हातारपणी मनुष्याच्या कंठांत उत्पन्न होतो. म्हातारपणाच्या भाषणात मनःशांतता आणि विचारगांभीर्य यांच्या योगाने अशी एक शक्ति उत्पन्न होते की, केवळ तीमुळे श्रोतृवृंद वक्त्याच्या भाषणाने मोहून जातो आणि ते आदरपूर्वक ऐकत बसतो.

"वृद्धपणी कोण खरे दुर्बळ होतात ? तर ज्यांनी तरुणपणी अविचाराने, साहसाने, दुराचाराने आपली शक्ति उधळली ते. जे तसे वागत नाहींत त्यांनाहि जीर्णता येते, पण ती क्रमाने, हळूहळू व सौम्यपणाने येते. मी म्हातारा झालो आहे, पण लोकसभेतील विधिमंडळांतील माझे काम करण्याला, किंवा स्नेह्यांच्या उपयोगी पडण्याला जितके बळ लागेल तितके मजजवळ खास आहे. दुसऱ्याचे बळ पाहूनच दुःखी व्हायचे तर मी विचारतो की, आज तूं तरणा ताठा बलवान आहेस, पण पलीकडे तो पहा पॉंटियस पैलवान कसा रेड्यासारखा मस्त आहे. मग त्याच्या तुलनेने तुझे बळ कमीच की नाही ? तात्पर्य, बाबारे, असे केवळ तुलनेवर सुखदुःख अवलंबून ठेवूं नये. मनुष्य जीवनांतहि ऋतुमान असतेच. आणि त्याप्रमाणे सामर्थ्यांत फरक पडत जाणारच.

"वृद्धावस्थेत एक प्रकारचे सहज गांभीर्य मनुष्याला येते ते तर मला आवडतेच. पण त्यामुळे खेळाडूपणाची वृत्ति व विनोद ही नष्ट होतातच असे नाहीं. अरे, मेणबत्ती पेटविली म्हणून ती कांही वरपासून खालपर्यंत एकदमच पेट घेऊन जळून जात नाही, तर मेणाच्या शेवटच्या कणापर्यंत ती प्रकाश देत राहते. नाटक-गृहांत अगदी पुढच्या रांगेवर बसणाराला खेळ अधिक चागला दिसेल, पण त्याला समोरच्या दिव्यांच्या झगझगीत प्रकाशाचाहि त्रास सोसावा लागेल चार मागच्या रांगावर बसलेल्यालाहि नाटक दिसतेच. उलट दिव्यांचा त्रास नाही. बाहेरची कामे कमी झाली तर थोडी घरची करावी; लहानशी बाग लावावी, झाडांना पाणी

घालावे, अळी करावी, गवत खुरपावे. हे काम नव्हे वाटते ? लोकांकडून आदर मिळत राहिला, अनादर झाला नाही, पुरे झाले.

आतां राहिले मृत्यूचे भय. पण त्याला तरी भिण्याचे काय कारण ? मृत्यूने जर सर्वनाश होऊन मागे कांहीच उरत नसले तर बरेच झाले. लवकर उपाधीतून सुटका होईल तितकी बरी. आणि उलट मृत्यूने अमरत्व मिळणारे असेल तर ते लवकर मिळेल तितके बरेच. तरुण माणसांनाहि मृत्यूचे—अपमृत्यूचे—भय वाटत असतेच की नाही ? मी सूर्योदय पाहिला खरा, पण सूर्यास्तहि पाहीन अशी किती लोकांना खात्री वाटत असेल ? तरुणपणी दीर्घायुष्य हे केवळ आशा-रूप असते, पण म्हातारपणी दीर्घायुष्य हा प्रत्यक्ष अनुभवच असतो नव्हे कां ? या दृष्टीने तरी म्हाताऱ्यांनी तरुणांपेक्षां अधिक आनंद मानावा की नाही ? मनुष्यमात्राला जीवनाच्या नाट्यप्रयोगांत एखादी ना एखादी भूमिका करावी लागते. मग त्या भूमिकेचे काम पांचव्या अकांपर्यंत न टिकले म्हणून तरी काय बिघडले ? त्याचे काम दुसऱ्या तिसऱ्या अकांतच संपो, पण जे त्याने तेव्हा केले त्यांतच जर त्याने प्रेक्ष-कांच्या टाळ्या मिळविल्या तर तेहि यशच नव्हे काय ? उलट दुसऱ्यातिसऱ्या अकांत आपले काम संपवून नाटकाचा पोषाख उतरून, नेहमीचा स्वतःचा घालून त्याला प्रेक्षकांमध्ये बसून पुढचे नाटक पाहता येते हा लाभच विशेष नव्हे काय ? मृत्यु समीप आल्यानेच मृत्यूचे खरे स्वरूप काय याचा विचार मनुष्याला करतां येतो. तो विचार करून आणि भावी पिढ्यांचे जीवन हेहि आपलेच असे मानून जो चालतो तो सुखी होतो.

"कालवश झालेल्या थोर लोकांत जाऊन मिसळण्याची एक प्रकारची ओढ म्हातारपणी लागते. यामुळे देव पुढे उभा राहून म्हणाला की, "जुने आयुष्य व जीवन तुला पुन्हां प्राप्त करून देतो" तरी ते मी नको म्हणेन. मला घरी जावयाचे आहे. वाटेवरच्या धर्मशाळेत राहावयाचे नाही."

## ( ३ ) लाभलेल्या आयुष्यमानाविषयीं समाधान

घरी किंवा एखाद्या देवळांत देवाच्या मूर्तीपुढे मी सहज हात जोडतो व नमस्कार करतो. परंतु देवानें असुक द्यावे, करावे अशी प्रार्थना मी कधीच करीत नाही. आणि जर कधी केली तरी माझे आयुष्य वाढवून दे अशी कधीच करणार

नाही. मला आयुष्याचा कंटाळा अजूनहि आला नाही. परंतु संसाराचा विस्तार झालेल्या कोणाहि मनुष्याने फार दीर्घ आयुष्याची इच्छा धरणे शहाणपणाचे नाही. संसार हा महाभारताप्रमाणे 'प्रतिपर्वरसोदय' असता तर गोष्ट निराळी. पण तसे बहुधा असत नाही. ज्यांच्याविषयी आपणाला जिव्हाळा वाटतो अशी आपल्या संसारातली सर्व मनुष्ये एकजात वाढत्या भाग्याची असत नाहीत. आणि म्हातारपणी मन फार हळवे होते. हिवाळ्यांत झालेली शरीराची जखम लवकर भरून येत नाही, त्याप्रमाणे म्हातारपणी झालेले सांसारिक दुःख तरुणपणांतील दुःखापेक्षां अधिक जाणवते व टिकते. आपल्या पुढच्या पिढ्यांतील प्रत्येक मनुष्य स्वतः सुखी होऊन आपणालाहि सुखी करील अशी आशा धरणे समजसपणाचे नाही. उलट त्यांच्याआपल्यांतील किंवा त्यांच्यात्यांच्यातील मतभेद अनेक कारणांनी वाढण्याचा संभव असतो. पुढची पिढी आपली योग्य ती काळजी करीत नाही, योग्य तो मान देत नाही, योग्य ती मर्यादा संभाळीत नाही, अशी साधार किंवा निराधारहि शंका त्याला येऊं लागते. पाण्याप्रमाणे प्रेम हे खालच्या पातळीकडे वहाणारे आहे, ते वरच्या पातळीकडे वाहू शकत नाही, ही जगाची रीत आपण ध्यानांत धरीत नाही. यामुळे स्वाभिमानाच्या अस्वाभाविक कल्पना निर्माण होऊन तो दुखावलासे वाटूं लागते. तात्पर्य मिळाले तेवढेच आयुष्य पुरे असा निश्चय करूनच म्हातारपणी वागावे हे बरे.

निखालस स्वतःच्या दृष्टीनेहि हे लक्षात ठेवावे की जसजसे वय वाढते तसतसे शरीर रोगग्रस्त होण्याचाच संभव अधिक. ज्यांची प्रकृति मूळची रोगी त्यांनी तर आयुष्य वाढण्याची इच्छा मुळीच करू नये. पण ज्यांची प्रकृति मूळची निरोगी त्यानीहि हे समजावे की शरीराला झीज ही आहेच. आणि इतकी पुष्कळ वर्षे ते निरोगी राहिले म्हणून ते पुढेहि निरोगीच राहील हे अनुमान सरळ नसून व्यस्त आहे. मनुष्य नव्याण्णव वर्षे जगला या वरून तो शंभराव्या वर्षीहि जगेल असले अनुमान भोळ्या तर्कशास्त्राने कदाचित बरोबर ठरेल. पण त्यांत एक गुप्त हेत्वाभास असतो. 'म्हणून' तो शंभराव्या वर्षीहि जगेल या पेक्षां 'म्हणूनच' तो शंभराव्या वर्षी मरेल हे अनुमान अधिक शास्त्रशुद्ध होईल ! जे कधीहि बंद पडत नाही असे घड्याळ कोणीहि कारखानदार आजवर करू शकला नाही. घड्याळ नीट चालण्याची हमी ( ग्यारटी ) कारखानदार देतो ती फार थोड्या कालमर्यादेची असते. आणि वापरणाराने ते कितीहि काळजीपूर्वक वापरले तरी पुढे पुढे त्याची आपोआप

दुर्दशा होऊं लागते. ते मागे तरी पडते किंवा पुढे तरी जाऊं लागते, भलत्या तासाला भलते ठोके देऊं लागते, गजर व्हावा तो वाजेनासा होऊं लागतो. नवे नवे भाग घालून कदाचित घड्याळ चालू ठेवता येईल. पण कालांतराने लाकडी चौकट तेवढी जुनी आणि बाकी सर्व घड्याळ नवे असे होईल. मनुष्यशरीराचा एखादा अवयव कृत्रिम बसवितां येईल. पण त्याच्या काळजाची ( स्प्रिंग ) कमान जुन्याची नवी करितां येत नाही. दुसरा कांही रोग न जडला अशी फार म्हातारी माणसे शेवटी हृदयक्रिया आपोआप बंद पडून तरी मरतातच !

बरे, देवाने आपली प्रार्थना मान्य करून आयुष्य वाढवून दिले असे समजा. तरी आपण त्या आयुष्याचे काय करू शकणार हाहि प्रश्न उरतोच. नुसते जगण्यांतहि ( ज्याला केवळ जीवानंद असे आपण म्हणूं ) आनंद आहे म्हणूनच मनुष्य जगण्याची इच्छा धरतो, आत्महत्या करीत नाही. पण जगण्यात केवळ जगण्यापेक्षां अधिक आनंद नाही असे असेल तर न जगणेच बरे. कारण सूक्ष्मदृष्टीने पाहिले असतां ज्याला आपण जगण्याचा आनंद म्हणतो तो निव्वळ श्वासोच्छ्वास करण्याचा आनंद नसून आपण इतर रीतीने जे काही ध्येयपोषक असे काम करू शकतो त्याचाच तो खरा आनंद असतो. पण वाढत्या वयांत हे ध्येय शिल्लक राहिले तरी, ते उल्हासपूर्वक कृतीत उतरविण्याची आपली साधने नष्ट होत जातात. म्हणून ही साधने सुदृढ राहतील तीच आपल्या आयुष्याची स्वाभाविक मर्यादा, निदान योग्य मर्यादा, असे आपण समजावे. मी थट्टेने माझे विमाव्यवसायी मित्र श्री. गणपतराव मराठे ( ॲक्च्युअरी ) यांना म्हणत असतो— "काय हो, तुम्ही चतुर तज्ञ लोक विमापॉलिसींचे इतके निरनिराळे प्रकार कल्पनेने बसविता. पण तुम्ही असाहि एखादा बनवाल तर पहा की ! म्हणजे समजा माझे आयुष्य बहात्तर वर्षें ठरलेले आहे. आज मला सासष्ट वर्षे आहेत. ती सुखाची गेली. उरले आयुष्य सुखातच जावे अशी माझी इच्छा आहे. तर या उरल्या सहा वर्षांतली तुम्ही सांगाल तितकी वर्षे सोडून देण्याला मी तयार आहे. मात्र ही वर्षें वजा घालून जे आयुष्य उरेल ते पूर्वीसारखे सुखांत जाईल अशी हमी देणारी पॉलिसी तुम्ही तयार करा. सांगाल ते 'प्रीमियम' देतो !" पण मराठे म्हणतात " यांत यमाजी भास्कराला आधी विचारले पाहिजे ! "

देवाने आपले आयुष्य बिनहिशेबी वाढवून दिले तरी त्याचा आणखी एका दृष्टीने विचार करावयाला हवा. पूर्वीच्या आयुष्यांतले आपले जे स्वभावदोष

प्रभावी झाले ते या वाढत्या आयुष्यांत आपण दुरुस्त करूं शकूं काय ? याचे उत्तर नाही असेच द्यावे लागेल. 'जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही' अशी म्हणच आहे. अनुभवाने विषयज्ञान वाढते, पण प्रकृतिधर्म बदलत नाहीत. इतिहासापासून मनोरंजन होते हे मला मान्य आहे. पण इतिहासाच्या ज्ञानाने मनुष्य फारसा शहाणा होतो असे मला वाटत नाही तसे असते तर जग आजवर निर्दोष व सर्वगुणसपन्न असेच व्हावयाला पाहिजे होते. इतिहासाची पुनरावृत्ति होते असे म्हणतात याचा अर्थ तीच ती घटना पुन्हा स्थूलरूपाने बनलेली दिसून येते असा खरा आहे पण तीच ती घटना पुन्हा बनण्याचे खरे कारण त्याच त्या मनुष्यस्वभावाच्या दोषांची पुनरावृत्ति होते हेच होय. मनुष्यस्वभाव कालांतराने बदलू शकतो असे मानले तरी तो बदलण्याला कल्पनातीत काळ जावा लागेल. इतका काळ पूर्वीच्या हजारो लाखो वर्षांनी गेला नाही, आणि भावी हजारो लाखो वर्षांनीहि जाईल की नाही याची वानवाच आहे. खगोलांची गति चलित होण्याला जितका काळ तितकाच मनुष्यप्राण्याच्या मूलभूत वासना, आणि त्यांवर आधारलेला त्याचा स्वभाव बदलण्याला लागेल कदाचित ! तात्पर्य, जुना तोच आपला प्रकृतिस्वभाव जर आपण प्रगट करीत राहणार तर आयुष्य वाढवून घेऊन तरी काय करावयाचे ? स्वभावदोषाचा हा प्रकार. आणि ध्येयपोषक कृति करण्याला शरीरसामर्थ्य उरत नाही हे वर सांगितलेच आहे.

शिवाय दैवयोग आणि भवितव्यता ही काय खेळ खेळतील याचा नेम काय सांगावा ? लॉर्ड हालडेन हा बडा तत्त्ववेत्ता होता हे प्रसिद्ध आहे. त्याने आपल्या आत्मचरित्रांत खालीलप्रमाणे लिहिले आहे—"आपल्या मनाचे एक राहो. पण बाह्यपरिस्थितीचा विचार करताना मी असे म्हणेन की गेलेले आयुष्य कोणी मला पुन्हा देऊ केले तरी मी ते नको म्हणेन. तेच जीवन पुन्हा लाभले तरी माझ्या हातून तेच होणार ! मग या पुनरुक्तीपासून मला काय लाभ ? मुत्सद्दी आणि व्यवहारचतुर असा माझा एक मित्र आहे. तो मला म्हणाला, "इतक्या अनुभवाने तुम्हाला किती तरी शहाणपण शिकविले असले पाहिजे. मग तुम्हाला जर देवाने पुन्हां लहानपणापासूनचे आयुष्य परत दिले तर तुम्ही ते स्वीकारून आपल्या जीवनयात्रेला फिरून नवा प्रारभ कराल काय ?" तेव्हां त्याला मी "छेः नाही," असेच उत्तर दिले. त्याचे कारणच असे की दैव किंवा भवितव्यता यांनी आपल्या जीवनांत जो स्वैरसचार केला त्याची बरोबर कल्पना आपण करीत नाही, त्याला

योग्य ते महत्त्व देत नाही आणि त्या महत्त्वाचा योग्य तो गणिती आंकडा हिशेबांत धरीत नाही. पुष्कळ वेळां जे यश आपण आपल्या व्यक्तीच्या खाती जमा धरतो ते खरोखर भवितव्यतेच्या खाती जमा धरावे लागते. आणि जी गोष्ट यशाची ती अपयशाचीहि समजावी." तेव्हा माझ्या मित्रानेहि ती गोष्ट कबूल केली. तो म्हणाला, " तुमच्या प्रमाणेच मीहि नवे आयुष्य मागून घेऊन जीवन-यात्रेला फिरून प्रारंभ करण्याला तयार होणार नाही. दैव अनुकूल किंवा प्रतिकूल कसेहि म्हटले तरी त्याची गति अनिश्चितच असणार! कुणाला ठाऊक मला ते हात देईल की गोता देईल?"

लॉर्ड हालडेन पुढे लिहितो " कोणी कितीहि विचारपूर्वक व्यवस्थित व हिशेबी पद्धतीने वागला तरी त्याला दैवाचा, भवितव्यतेचा अनिश्चित फेरा किंवा खेळ टाळतां येत नाही. मग तत्वज्ञानी माणसाने काय करावे? तर ते हेच की त्याच्या योगाने उत्पन्न होणाऱ्या परिस्थितीपासून मनाने तरी दूर रहावे, मग ती अनुकूल असो वा प्रतिकूल असो मनात आशा म्हणून इतकीच धरावी की आपले निष्ठापूर्वक केलेले प्रयत्न, आणि शक्य तितका विवेक व विचार, याच्यायोगाने वागून अखेर जे फळ आपल्या पदरांत पडेल तेच खरे. सूज्ञांत सूज्ञ म्हणविणारा मनुष्य झाला तरी तो याहून अधिक काय करणार?"

तात्पर्य, स्वतःच्या स्वभावगुणांचा व स्वभावदोषांचा प्रकार निश्चित आणि दैवयोग किंवा भवितव्यता अनिश्चित, अशी दोन कारणे उलटसुलट असली तरी परिणाम तोच घडून येणार. आणि ही कारणे जर टाळतां येण्यासारखी नाहीत तर गेलेले आयुष्य फिरून लाभले आणि जीवनयात्रेला नवा प्रारंभ करितां आला तरी काय होणार? जे होणार तेच. म्हणजे जे पूर्वी झाले तेच. आता पुनर्जन्म असलाच तर टाळतां येणार नाही हे खरे. पण त्यांत एक सोय अशी आहे की कोणाहि प्राण्याला पूर्वजन्माची स्मृति असत नाही. जो नवा जन्म येईल तोच पहिला असे त्याला वाटते. भृगुसंहितेत मी एकदा माझे पूर्वीचे जन्म कोणकोणच्या योनीत झाले हे गमतीने काढून पाहिले. तेव्हां माझी मलाच खती आली. तेव्हां मुक्तिसाधकाप्रमाणे मला पुनर्जन्म देऊ नको अशी मी देवाची प्रार्थना केली. आणि या जन्मातलेहि जुने आयुष्य पुन्हा नको असे सांगण्याची कारणे वर दिली आहेतच.

## ( ४ ) म्हातारपणीं जुन्या आठवणींचा आनंद

मग जुने आयुष्य पुन्हा नको तर जुन्या आयुष्यांतील जुन्या गतगोष्टीची आठवण तरी का करावी आणि प्रस्तुतसारखे पुस्तक का लिहावे, असा प्रश्न कोणी करील. तर त्याचे उत्तर असे म्हातारपणी मनुष्य नवीन विचार स्वीकारीत नाही व नवीन उपक्रम आरंभीत नाही. पण यामुळे रिकाम्या पडणाऱ्या मनाला काही व्यवधान लागतेच व ते जुन्या आठवणी आठवणे व आळविणे याने मिळते. आपण आपला व्याप कमी केल्याने आपले घर आपणाला पुरून उरू लागते. मग त्याचा काही भाग भाड्याने द्यावासा वाटू लागतो तेव्हा कोणी कोणी 'जागा भाड्याने देणे आहे' अशी पाटी घरावर लावतात व नवा भाडेकरी मिळाला तर घेतात पण मनाची गोष्ट तशी नाही ते घर भाड्याने देता येण्यासारखे नाही बरे अगदी रिकामे ठेवले तर खायला उठते. अशा वेळी जुन्या ओळखीच्या स्नेह्याना बोलावून घरी गप्पा मारीत बसल्याने घर कायमचे अडून राहत नाही आणि मोकळे पडल्याप्रमाणे 'खायला' उठत नाही. गतगोष्टींच्या आठवणीसारखा जुन्या जिव्हाळ्याचा स्नेही गप्पा मारून वेळ घालविण्याला दुसरा कोणता मिळणार ? पण त्याच त्या आठवणी नित्य आठवीत बसण्याचाहि एकप्रकारे कटाळा येतो. तेव्हां वाटते की त्या अशा नित्य आठवीत बसण्यापेक्षा लिहून टाकून मोकळे व्हावे. कागदावर लिहिल्या तरी मनांतून अगदीच जातात असे नाही. पण घरातील अडगळ काढून नीटनेटकी लावून ठेवल्याने जसे घर स्वच्छ होऊन मनालाहि बरे वाटते, तसेच जुन्या आठवणी लिहून काढल्याने काही नवीन व्यवस्था निर्माण केल्याचे समाधान होते.

पण आणखीहि एक कारण आहे. कोणचेहि काम करून झालेल्या माणसाला त्या कामाचा वृत्तांत साद्यंत संकलित असा कोणाला तरी सादर करावयाचा असतोच. मग तो वरिष्ठाला असो, किंवा बरोबरीच्या सहकाऱ्याला असो. आणि असा कोणी वरिष्ठ किंवा सहकारी नसला तर तो वृत्तात आपल्याच मनाला सादर करावा असे वाटत असते. हा वृत्तांत सादर करणे म्हणजे तो कामाच्या फलश्रुतीचा एक भागच समजला जातो. याच हेतूने प्रवासी लोक—ज्यांना वर्णनशैली असते ते—प्रवासवर्णने लिहितात. कांही कांही यात्रेकरूहि आपली यात्रावर्णने लिहितात. त्याचप्रमाणे आत्मचरित्रे लिहिणारे आपल्या जीवनप्रवासाचा

किंवा यात्रेचा वृत्तांत लिहितात असे म्हणण्याला काय हरकत? आणि तसे पाहिले तर जीवनासारखा महत्त्वाचा किंवा मनोरंजक प्रवास दुसरा कोणचा असणार? किंवा जीवनक्रमाला यात्रेची उपमा दिली तरी ती योग्यच ठरेल. ज्यांना लिहितां येत नाही त्यांची गोष्ट निराळी. पण त्यांनाहि लिहितां आले असते तर ते बहुधा लिहिल्याशिवाय राहते ना. आपला वृत्तांत लिहून काढल्याने आपल्याला आनंद होतो त्याप्रमाणे तो वाचणारालाहि करमणूक होते असे यात्रावर्णनांच्या अनुभवा-वरून वाटते. प्रवासवर्णनांचीहि तीच गोष्ट. जगात सहानुभवी, सहभावनी लोका-च्या जोड्या आपणाला वाटतात त्यापेक्षा पुष्कळच अधिक असतात. भाविक लोक यात्रेहून परत आलेल्या लोकांच्या पाया पडून त्याजकडून पुण्यांश मिळवि-तात, त्याचप्रमाणे प्रवासवर्णने वाचून प्रवाशाच्या अनुभवांत वाचकवर्ग अंशभागी होतात. मी 'गतगोष्टी' लिहिण्यास प्रवृत्त झालो तो याच कारणाने व याच हेतूने.

इतर कोणी न विचारले तरी मनुष्याचे मनच त्याला केव्हा केव्हां असा प्रश्न करीत असते की, "तू जन्मभर आपले संगोपन संवर्धन केलेस, पोटाचे उद्योग-धंदे केलेस, कुटुंबभरण केलेस, प्रेमद्वेषादि भावना गाजविल्यास, हे खरे. पण यापलीकडे जाऊन मी अमूक केले असे कर्तव्यबुद्धीने किंवा कृतार्थबुद्धीने तुला सांगतां येईल असे काही आहे कां सांग पाहू ?" या प्रश्नाला पुष्कळ लोकांना उत्तर देतां येण्यासारखे असते पण त्यांचा प्रवृत्तिक्रम सुरू असेपर्यंत ते उत्तर देण्याची संधि आलेली नसते, किंवा तसे करण्याला त्यांना फावतहि नाही. वरील प्रश्नाचे उत्तर देण्याला त्यांना निवृत्त होईपर्यंत मुदत मागून घ्यावी लागते. आणि ते उत्तर देता आले तर ते देऊन टाकल्यावर त्यांना हायसे वाटते. काम करीत असतांना आपण काय करीत आहो हे सांगण्यापेक्षां काम हातचे बाजूला ठेवल्या-वर आपण काय केले हे त्याला अधिक यथार्थ रीतीने सांगतां येते. काम आणि मन ही अलग होतात, यामुळे स्वतःविषयी मत देण्याला लागणारा थोडासा तटस्थपणाहि प्राप्त होतो. कामातले गुणदोष काम चालू असतांना लक्षांत येतात त्यापेक्षां काम समाप्त होऊन दुरून त्याकडे पाहता येऊ लागल्यावर अधिक चांगले लक्षांत येतात. शिवाय बोलून मन मोकळे करतां आल्याने त्याला विश्रांति मिळते ती वेगळीच. वकील लोकांविषयी असे सांगतात की कोर्टात खटला चाल-विण्याचे काम पुरे करून घरी येऊन त्या कागदाचे पुडके त्यांनी टेबलावर फेकून दिले म्हणजे ते तो खटला अजिबाद विसरून जातात. ग्रंथाची मुद्रिते तपासून

होऊन श्रम परिहाराची जांभई दिली म्हणजे ग्रंथकार आपला ग्रंथ विसरून जातो असा माझाहि अनुभव आहे.

जगांतील प्रत्येक मनुष्याचे दुसरे कोणी सहानुभवी कोठे तरी असतातच. हे आत्मचरित्र लिहिण्याच्यावेळी असाच एक सहानुभवी मला आढळला. तो सुप्रसिद्ध इंग्रजी कादंबरीकार सॉमरसेट मॉहॅगन हा होय. याने आत्मचरित्राच्या प्रस्तावनेंत खालीलप्रमाणे लिहिले आहे, "मधून मधून लंडन टाइम्स पत्रावर मी नजर टाकतो तेव्हां त्यांतील मृत्यूलेखांवरून असे दिसते की साठ आणि सत्तर या वयात पुष्कळशी माणसे मरतात. हे वय मोठे भयप्रद वाटते. त्यावरून मी निश्चय केला की आत्मचरित्र लिहून काढण्याचे काम आतां हातावेगळे केलेच पाहिजे. ते अपुरे राहून मी मेलो तर मला वाईट वाटेल ! ते पुरे झाले तर मनाला अधिक शांतता लाभेल. बरे ते लिहिण्याची माझी आतांच सिद्धता नाही असेहि नाही. मला लिहून ठेवण्यासारख्या महत्त्वाच्या अशा गोष्टी कोणत्या याचा जर आजहि मला निर्णय करतां न आला तर पुढे तरी तो कसा करतां येणार ! मनाच्या आभाळांतील निरनिराळ्या मजल्यावरच्या आठवणीचे ओले कोरडे ढग उगीच अस्ताव्यस्तपणे स्वैरसचार करून गोधळ उडवीत आहेत. ते खेचून एकठिकाणी आणले तर पडावयाचा पाऊस पडून जाईल, आभाळ निरभ्र होईल, आणि इतर कामे सुचूं लागतील आतां आत्मचरित्र काय, मृत्युपत्र काय, ते लिहून होतांच मनुष्य मरतो असे नाही. तथापि दूरदर्शीपणाची ती एक योजना असते इतकाच त्याचा अर्थ. आत्मचरित्र लेखनानंतरहि लेखकाचे कांही चरित्र घडू शकते. तसेच मृत्युपत्राला ( कॉडिसिल ) पुरवणी मृत्युपत्रे लिहिली असेहि घडते. पण करावयाच्या व होण्यासारख्या गोष्टी वेळच्यावेळीच केलेल्या बऱ्या. '

पुढे गतगोष्टीची टांचणे मी लिहिणार आहे. त्यांत माझ्या जीवनाशी ज्यांचा प्रत्यक्ष सबंध आला त्या तर असतीलच परतु माझ्या समकालीन समाजाच्या जीवनाचा सबध आला अशाहि कांही असतील. आणि माझ्या या पुस्तकाचा या दुसऱ्या दृष्टीने जो उपयोग होईल तोच मी अधिक महत्त्वाचा समजतो. केवळ एक व्यक्ति या नात्याने माझ्या जीवनांत सांगण्यासारख्या घडामोडी फारशा झाल्या नाहीत. पुण्यास आणि तेहि एकाच सस्थेत माझी नोकरी सतत चाळीस एके-चाळीस वर्षे झाली या एका साध्या गोष्टीवरूनहि वरील अनुमान काढतां येण्या-

सारखेच आहे मन एकीकडे वावरते आणि हात दुसरीकडे काम करतो, असे माझ्यासबंधाने मुळीच घडले नाही. निर्वाहाचे साधन आणि आवडीने, अभिरुचीने पसत केलेला व्यवसाय याचा मेळ माझ्या बाबतीत इतका बेमालुम पडला की तसा इतर क्वचितच पहावयास सापडतो. मुख्य गोष्टीत स्थित्यतर न घडता काही उपाख्याने अर्थात् घडली. अनेक प्रकारचे अनुभव आले. सुखदुःख, कीर्ति अपकीर्ति, लाभहानी यांची मधून मधून परिवर्तने झाली. तथापि शरीराने व मनाने १८९६ साली ज्या चौकटीत मी शिरलो त्या चौकटीत आज १९३८ सालीहि मी टिकून आहे असे मला वाटते. उत्पात घडणे, घडविणे याला अनुकूल अशी माझी बुद्धि नाही. हे सर्व खरे तथापि या चाळीस बेचाळीस वर्षात मी जो इतिहास घडलेला पाहिला तो माझ्या पूर्वीच्या पिढ्यानी एक शतकातहि घडलेला पाहिला नसेल. म्हणून वाटते की आपण जे जे घडलेले पाहिले ते थोडक्यात नमूद करून ठेवल्यास थोडाबहुत इतिहास लिहिल्यासारखे होईल. पुढील पिढ्या मागील पिढ्याचा इतिहास वाचण्याऐकण्याला नेहमी उत्सुक असतात हे मी लिहिलेल्या टिळक चरित्रावरून मला चागले दिसून आले आहे. मी व्यक्ति, आणि समाज ही समष्टि, यांचा जो सबध आला तीच माझी जीवनयात्रा—दुसरी कोणती ?

## ( ५ ) आत्मचरित्रांवरील आक्षेपांची चिकित्सा

आतां आत्मचरित्रावरील आक्षेपाचा विचार करू. 'आत्मचरित्र' हा शब्द उच्चारतांच ते लिहिणारासंबधाने अशी भावना उत्पन्न होते की "हा मनुष्य अतिशय अहंकार—दर्पयुक्त असणार. एरवी तो आपले चरित्र आपणच लिहिण्याला कसा धजेल !' आत्मचरित्र म्हणजे लिहिणाराच्या चांगुलपणाच्या व मोठेपणाच्या गोष्टीचा सग्रह ! आणि तोहि खुलवून सजवून लिहिलेला ! चित्रविषय आहे त्याहून अधिक सुदर दिसावा म्हणून फोटोग्राफर त्याच्या कांचेवरून सफाईचा हात फिरवितो; म्हणजे सुरकुत्या असल्यास त्या भरून काढतो; एखादा अवयव फार लांबट दिसत असेल तर त्याचा लांबटपणा काढून टाकण्याकरिता त्याचे टोक किंचित जाड वाटोळे करितो; डोळ्याच्या बुबुळांत किंवा दृष्टीत दोष अयब असेल तर तो काढून टाकतो; अशा रीतीने मूळांत असलेले दोष घालवून व गुणांना अधिक उठावदारपणा देऊन, चित्र यथार्थदर्शन झाले आहे की नाही यापेक्षां ते मूळच्या व्यक्तीहून अधिक सुंदर

झाले आहे की नाही हे तो पाहत असतो. त्याचप्रमाणे आत्मचरित्राचा लेखक हा देखील, आपणाला लोकांनी मुळातल्यापेक्षा अधिक चांगले म्हणावे म्हणून कृत्रिम रेषा व रग यांचा हवा तसा उपयोग करितो. "आपला हात आणि जगन्नाथ!" चित्रशलाका ज्याची त्याच्याच हाती असल्यावर मग कांही पहावयाला नको; प्रत्येकजण मदनाचा पुतळा बनण्याला काय उशीर? येऊन जाऊन चार साधे दोष वर्णितांना आत्मनिंदेचा थोडा अधिक आव घातला की काम झाले! मग वाचक म्हणणार "पहा हो! हा मनुष्य किती खुल्या दिलाचा व निष्कपटी आहे! आत्मनिंदेपेक्षां न्यायबुद्धीची अधिक कसोटी ती कोणती? स्वतःच्या विरुद्ध टीका करणारा मनुष्य सत्यवक्ताच असला पाहिजे." पण, अहो, खरी मख्खी त्यांतच आहे. कारण या मायावी सत्यवक्तेपणाचा आधार मिळवून स्वतःच्या अगचे मोठे घबाड दोष असतील त्यावर हा पांघरुण घालणार. उलट सत्यवक्तेपणाचे असले सर्टिफिकीट आपल्याच हाताने लिहून घेऊन, याने दुसऱ्यावर टीका केली म्हणजे ती अर्थात् खरी साधार असली पाहिजे असा लोकांचा ग्रह सुरवातीला तरी होणार, मग पुढे इतरांकडून खोडून निघेल तेव्हां निघेल! तात्पर्य, आत्मचरित्र हा जरी इतिहासशास्त्रदृष्ट्या सर्वात उत्तम प्रकारचा लेखी पुरावा असा वाटतो तरी तो बहुतांशी टाकाऊ समजावा निदान वाचकाने तो वाचताना लिहिणाराच्या विरुद्ध जातील अशा प्रकारची अनुमानेच मनांत घेऊन चालावे. आणि मग अशा परस्पर विरोधी गोष्टीतून बलवत्तर ठरून उरेल तेच सत्य समजावे."

वरील आक्षेपांत कांही थोडे तथ्य आहे. तथापि जे लोक आत्मचरित्रे लिहिण्याच्या उद्योगाला हात घालतात त्यांना या आक्षेपाची जाणीव नसते असे नाही. असे असतांहि ते हा उद्योग आरंभतात याचे कारण, हे आक्षेप टाळून लिहितां येईल तसे लिहावे अशीच त्याची इच्छा असते व प्रयत्न केल्यास ती सिद्धीलाहि जाऊ शकते. शिवाय वस्तुसत्याच्या दृष्टीने पाहिले असतां, दुसऱ्याने लिहिलेल्या आपल्या चरित्रापेक्षां आपणच लिहिलेले आपले चरित्र अधिक सत्यपूर्ण असण्याचा संभव अधिक. दुसऱ्याच्या लिहिण्यात आपणाविषयी जी अतिशयोक्तीची विधाने होतात तीं आपल्या हातून खचित होणार नाहीत. एकाने दुसऱ्याविषयी लिहिताना गुणवर्णनाची अतिशयोक्ति हटकून होते, किंबहुना ही अतिशयोक्ति सहानुभूतिप्रेरित किंवा औदार्यमूलक म्हणून क्षम्य मानली जाते. पण सामान्य मनुष्यालाहि

स्वतःविषयी अशी अतिशयोक्ति करण्याची लाज वाटल्याशिवाय राहणार नाही. दुसऱ्या पक्षी इतर कोणी कितीहि परिश्रमपूर्वक माहिती गोळा केली तरी, आपणाला स्वतःविषयी जी माहिती असते ती दुसऱ्याला कशी व किती मिळणार ! तसेच आपण आपल्या आयुष्यांत कोणत्या गोष्टी कोणत्या हेतूने केल्या याचा खुलासा जसा स्वतः करू शकू तसा तो दुसऱ्याच्या हातून केव्हाहि होऊ शकणार नाही !

अलीकडे अनेक लोक अनेक कारणाकरिता मला माझ्या चरित्राविषयी माहिती विचारीत. ती न सांगणे हा उन्मत्तपणा वाटे आणि सांगावी तर ती आत्मश्लाघेसारखी वाटे. आपण जी माहिती आज तोंडाने सांगत आहो तिचा उपयोग उद्या हा गृहस्थ तिखट मीठ लावून करणार हे जवळ जवळ माहीत असते. म्हणून आपण या भावी अतिशयोक्तींचे साथीदार ठरणार अशी भीति, माहिती सांगत असता मनाला वाटत असल्यास काय नवल ? क्वचित् प्रसंगी ही माहिती आपणाला विचारली व आपण सांगितली, हे इतर कोणाला समजूनहि येत. आणि तो जर कुत्सित असला तर "दुसऱ्याकडून आत्मचरित्र वदविल्या"चा दोषारोप केल्याशिवाय राहत नाही. तेव्हा असा विचार मनात येतो की, आस्थेने माहिती विचारणाराला सांगत नाही म्हटले तर उन्मत्तपणा किंवा आढयता याचा आरोप यावयाचा, व सांगितली तर वाममार्गाने आत्मस्तुति करविण्याचा आरोप यावयाचा, त्या अर्थी हे दोनहि आरोप टाळण्याचा एकच उत्तम उपाय म्हटला म्हणजे आपणाला जी माहिती आहे, ती आपली आपणच लिहून काढावी म्हणजे कोणी नावे ठेविली तरी सर्व व्यवहार अगदी सरळ प्रांजलपणाचा तरी होईल आणि चुकीची अर्धवट माहिती प्रसिद्ध होण्यापेक्षां ती शक्य तितकी पूर्ण व बिनचूक तरी प्रसिद्ध व्हावी हे बरे. अतिशयोक्ति व आत्मस्तुति ही टाळणे आपल्याच हाती असते. बरे आपण भलते काही लिहिले तर मार्मिक तज्ञ व सदभिरुचीचे वाचक ते सहसा टिकू देणार नाहीत म्हणून येईल तो थोडा दोष पदरी घेऊनहि आत्मवृत्तासारखे कांही लिहावे असे मी मनाने ठरविले आणि प्रस्तुत पुस्तक हे त्या निर्णयाचे फळ होय.

पण मनाचा असा निर्धार करून उद्योगाला लागल्यावर मात्र या आत्मवृत्तलेखनाचे इतर फायदे माझे मला अनुभवाला येऊ लागले. पहिला फायदा हा की मी आपल्या कुटुंबांतील भावी पिढ्यांवर एक प्रकारचा उपकार करून ठेवीत आहे

असे वाटू लागले हा उपकार म्हणजे त्यांच्या जुन्या पिढीची माहिती त्यांना उपलब्ध करून ठेवणे. गोष्ट सहसा लक्षांत येत नाही पण अगदी खरी आहे की, स्वदेशाचे परदेशाचे इतिहास आपण आवडीने वाचतो व ते आपल्या स्मरणातहि राहतात; पण स्वतःच्या आपल्या पूर्वजाच्या दोन पिढ्याची देखील आपल्याला चागली माहिती असत नाही याचे कारण कोणी अशी माहिती लिहून ठेवीत नाही, आणि घरी सभाषणांतून असली माहिती मिळाली तरी ती तुटक असबद्ध अशी मिळते. सुदैवाने माझ्या घरी बायकामुले मोकळ्या मनाने वागतात. वडील-धाकटे हे नाते सभाळून जितकी खुल्या दिलाने कोणत्याहि प्रश्नाची चर्चा होऊ शकेल तितकी ती आमच्या घरी होते. परतु मुलानी "घराण्याचा जुना इतिहास काही सागा" अशी पृच्छा मला कधी केलेली आठवत नाही कदाचित त्याविषयी त्याना उत्सुकता नसेल, कदाचित त्यांना अशी माहिती विचारणे अवघड वाटले असेल. आणि मीहि एखाद्या 'गोष्टी-वेल्हाळाप्रमाणे' किंवा पुराणिकाप्रमाणे त्याना समोर बसवून घेऊन, मला असलेली घराण्याची माहिती सागितली नाही. तसे करणे मलाहि अवघडच वाटले असते.

बरे, मला देखील माझ्या वडिलाकडून जी थोडी बहुत माहिती त्याच्या-वरच्या पिढ्याची मिळाली तीहि मुद्दाम विचारून किंवा सांगून नव्हे. तर वडील-मातोश्री समवयस्क असल्याने ती जेव्हां शिळोप्याच्या गोष्टी बोलत किंवा कोकणची कोणी माणसे येऊन त्यांच्याबरोबर वडिलांच्या गप्पागोष्टी चालत, तेव्हां प्रसगवशात् त्याच्या तोडून जी काय माहिती बाहेर पडून आमच्या कानांवर येई तेवढीच. पण घराण्याविषयीच्या अज्ञानाचे वाईट वाटण्याचे अनेक प्रसंग येत त्यांतला मुख्य म्हटला म्हणजे पक्ष ( महालय ) करण्यास बसण्याच्या वेळचा. कारण त्या वेळी जुन्या पिढीच्या गोतवळ्याला पिंड व तिळांजली देताना व्यक्तीचा तपशीलवार उच्चार करावा लागे. आणि मग भटजींनी नात्याचे नांव उच्चारावे पण आपणाला त्याचे व्यक्तिनाम, गोत्र वगैरे पक्के माहीत नसावे, असे झाले म्हणजे सहजच खजील झाल्यासारखे वाटे. म्हणून मग शेवटी ही सर्व नांवें मी कागदावर टिपून घेऊन छापण्यास सांगितलें. साधारण गृहस्थाश्रमी मनुष्याजवळ त्याच्या गोतवळ्यांतील माणसांच्या जन्मातिथि मृत्युतिथी असाव्या त्याहि आमच्या जवळ नाहीत याचे सहजच वाईट वाटे. तेव्हां तीहि माहिती शक्य तितकी गोळा करण्यास मी मुलांना सांगितले. तसेच माझा धाकटा मुलगा इतिहासप्रिय अस-

ल्यामुळे त्याला, जमल्यास केळकर घराण्याचा इतिहास लिही, असे सांगितले असून तो कांही कांही माहिती मिळवीत आहे.

अशा रीतीने चिकित्सा वाढतां वाढतां एकदां मुलांकडूनच मला असे सुच-विण्यांत आले की मी रिकामा वेळ सापडेल तेव्हा आठवणीची टांचणे कां करून ठेवू नये ? ही कल्पना मला बरी वाटली. पण टिपणे करणे व मजकूर लिहिणे ही दोनाहि एकच असे आढळले तेव्हा मी या पुस्तकाचा मजकूरच लिहिण्यास सुरवात केली.

प्रथम कोंकणची, व माझे वडील व आजे यांची माहिती लिहून काढली ती मुलांना बरीच मनोरंजक वाटली यामुळे मग माझ्या स्वतःच्या लहानपणची माहिती लिहिली तीहि त्यांना अपूर्वच वाटली तेव्हा शेवटी तोच क्रम चालवावा व पुढच्या आयुष्यातील आठवणीहि लिहून काढाव्या असे ठरविले असे करीत असतां एक गोष्ट प्रत्ययाला आली की माझ्या स्वतः संबंधानेच पण निमसार्व-जनिक अशा स्वरूपाच्या अनेक गोष्टी लोकांना अर्थातच अज्ञात आहेत. त्या कोणत्याहि वर्तमानपत्रांतून आलेल्या नाहीत. पूर्वी आल्या नाहीत व पुढेहि येणे शक्य नाही. उद्यां माझ्या पश्चात् आधुनिक चरित्रकोशात ग्रंथकार, वर्तमानपत्रकार, राजकीय पुढारी या नात्याने माझ्या चरित्राचा थोडाफार उल्लेख होण्याचा संभव आहे, ही गोष्ट विनय सोडल्याशिवायहि मला नमूद करण्यास हरकत वाटत नाही. तेव्हां अशा प्रसंगी माझी साधार माहिती जितकी अधिक प्रसिद्ध तितके बरे. कारण मग कल्पना चालवून कोणी कांही लिहावे तसे घडणार नाही. म्हणून निमसार्वजनिक अशा स्वरूपाच्या माझ्या चरित्र-विषयक गोष्टी मीच लिहून ठेवलेल्या बऱ्या असे मला वाटू लागले. उदाहरणार्थ, मी केसरीसंस्थेस येऊन कसा मिळालो, 'केसरी'चा संपादक निरनिराळ्यावेळी कसा झालो, 'मराठा' पत्राशी माझा संबंध कसा होता, अनेक संकटांतून वर्तमानपत्रे वांचली त्यांत मी कसा किती उपयोगी पडलो, टिळकांचे व माझे खासगी स्नेहसंबंध कसे होते, सार्वजनिक कामांत माझा चढउतार कसा झाला, माझ्या बरोबरीच्या पिढीचे इतर लोक यांचे माझे संबंध कसे होते, केसरीसंस्थेकडे मी इतकी वर्षे कसा टिकूं शकलो, केसरीसंस्था व मी यांचा परस्परांना काय कसा उपयोग झाला, मी ग्रंथ-लेखन कोणचे कसे केले, माझी सांपत्तिक स्थिति कशी होती, कोणकोणत्या सार्वजनिक संस्थांशी, फंडांशी, द्रव्यनिधीशी माझा संबंध कशा प्रकारचा होता—या व अशा

स्वरूपाच्या गोष्टी, या एकप्रकारे निम-सार्वजनिक मिळकत समजल्या जाण्याइतके सार्वजनिक महत्व महाराष्ट्रातील एक पुढारी या नात्याने मला अखेर अखेर आले होते असे मी मानले तर मी गर्विष्ठ किंवा अहंकारी बनलो असे कोणी मला म्हणेल असे वाटत नाही. मग असल्या गोष्टीसंबंधाने कोणीतरी कांहीतरी सांगितलेली अर्धवट बातमी, हकीकत माझ्या पश्चात् प्रसिद्ध होणे यांत इतर कोणाचा फायदा नसून माझा मात्र तोटा आहे. तो वाचावा याकरितांहि या आत्मवृत्तासारखे काहीतरी लिहून ठेवणे बरे अशी कल्पना दृढ झाली आणि हे काम पुढे चालू केले म्हणजे माझ्या घराण्याची व माझी ही एक प्रकारची कैफियत अशीच मी समजत असून ती वरील सर्व कारणाकरिता लिहून ठेवीत आहे.

आत्मवृत्ताचा उपयोग पुढे समाजाच्या इतिहासाला काय होईल तो होवो किंवा न होवो. पण स्वतः ते लिहिणाराला तरी व लिहिण्याच्या वेळेपुरतां तरी त्याचा उपयोग फार होतो यात शंका नाही. हा उपयोग कोणता ? तर जुन्या आठवणी आठवण्याच्या आनंदाचा. जुन्या आठवणी आठवणे हे आनंददायक कां वाटावे ? याचे उत्तर देणे कठिण आहे. काही आठवणी तर अशा असतात की त्या आठवताना दुःख होते. हातानें आपण गाधलिमाशा वारतो तशा त्या वारतां येतील, किंवा कायमच्या स्मरणातून नाहीशा करण्याकरितां त्याच्या गळ्यात दगड बांधून विस्मृतीच्या डोहात त्या बुडविता येतील तर मनाला समाधान होईल. उदाहरणार्थ, आपल्या हातून झालेल्या घोडचुका, कळत न कळत झालेली पापे किंवा दुष्कृत्यें, आपल्यावर आलेले दुःखाचे किंवा संकटाचे प्रसंग, टळलेल्या व भोगाव्या लागलेल्या संकटाचे प्रसंग, आपल्या मानहानीचे किंवा स्वाभिमान प्रगट न करितां आल्याचे प्रसंग आणि आळसाने, दुर्बुद्धीने घालविलेल्या सुसंधीचे प्रसंग—यांच्या आठवणी आनंददायक न होता दुःखद होतात. दुसऱ्याचे दुःख हा सविकल्प किंवा स्वायत्त समाधीसुखाचा विषय होऊ शकेल. पण स्वतःचे दुःख हा तसला विषय होऊ शकत नाही. तथापि अशा अनिष्ट किंवा दुःखद आठवणी न टाळतां आल्या तरी, मनुष्याला तत्त्वज्ञानाच्या शिक्षणाचे वळण यत्किंचितहि असेल तर, त्यापासून गंभीरपणाचा बोध मनाला होतो. रोमन क्याथोलिक धर्मपंथांत स्वतःची पापे स्वतःच्या तोंडून उच्चारण्याचा एक विधि आहे. त्याची फलश्रुति अशी की तो उच्चार अधिकृत साक्षीदारासमोर ( हा प्रायः धर्मोपदेशक असे ) झाला म्हणजे खऱ्या पश्चात्तापाचे सर्टिफिकीट त्याजकडून मिळे व त्या शिफारशीच्या बळावर

ईश्वराकडून त्या पापांची क्षमा मिळविण्याला आपण सत्पात्र झालो अशी पापी प्राण्याची भावना होई.

असो अनिष्ट व दुःखद आठवणी सोडून दिल्या तरी आल्हाददायक अशा आठवणी कोणाहि मनुष्याच्या आयुष्यांत पुष्कळच असतात. आणि त्याची आठवण करणे यांत तरी आनद वाटण्यास जागा असते म्हणून मनुष्य हौसेने त्या लिहून काढू शकेल. हे करीत असता मात्र एकच आत्मा दोन ठायी असा आभास झाल्याने, पूर्वी जे सविकल्प किवा स्वायत्तसमाधीचे सुख म्हणून सागितले ते मनुष्याला भोगता येत. गोड पदार्थ चघळून खाण्यांत आनद वाटतो, कारण प्रत्येक चावण्याच्या क्रियेबरोबर जिव्हेला त्या गोड पदार्थाचे नवे नवे कण येऊन लागतात, व तो प्रथमच खाल्याचा आनद या चर्वितचर्वणातहि लाभतो. त्याचप्रमाणे आनंददायक आठवण पुनः पुन्हा आठवल्याने आनद होतो. आठवण करणे व आरशात रूप पाहणे या दोन गोष्टी सारख्याच होत. आठवण करणारा मी व ज्याची आठवण होते तोहि मीच. यामुळे आत्मवृत्त लिहितांना बिब-प्रतिबिब भाव डोळ्यापुढे नेहमी खेळता राहतो.

पण आठवणी आठवणे किवा आत्मवृत्त लिहिणे याचा अर्थ पूर्वी एकवेळ भोगलेला जीवनक्रम जसाच्या तसा भोगण्याची इच्छा करणे असा नव्हे. कारण ही इच्छा करणे म्हणजे अलभ्याचा लाभ किवा अशक्याचा सभव यांची इच्छा करण्यासारखे आहे. आणि मग मनाला सहजच असे वाटते की, मनचे माडेच जर खावयाचे तर ते चुरगळलेले, काठ मोडलेले का खावे ? पुन्हा जन्माला यावयाचे तर मग सर्वस्वी निर्दोष अशा परिस्थितीत का न यावे ? आणि सर्वस्वी इष्ट अशा परिस्थितीतच सर्व जन्म कां न जावा ? चित्राला काळा व पांढरा दोनाहि रग अवश्य असतील; पण इच्छा—लब्ध चरित्र—जीवन हे एकजिनसी सुखमयच कां नसावे ? सुखच व ते एकांतिक, खरें अमिश्र असल्याने तत्ववेत्त्यांचे भाडवल गमावेल, पण त्यांच्याशी आपणाला काय करावयाचे ? सुख भोगणार आपले आपणच ना ? म्हणून नेपोलियन बोनापार्ट हा वॉटर्ल् व सेंट हेलेना वगळून बाकीचा जन्म पुन्हा मागेल; शिवाजी महाराज म्हणतील की जयसिंगाकडून मात झाल्याने आग्र्यास जाण्याचा आलेला प्रसग टळावा व बाकी तोच जन्म लाभावा; बाजीराव म्हणेल पुढच्या अशाच जन्मी फक्त मस्तानी व तिच्याबरोबर आलेली व्यसने याची तेवढी गाठ न पडावी; टिळक म्हणतील की पुन-

जन्मांत बाबामहाराज म्हणून कोणी स्नेही न लाभावे; व गोखले म्हणतील की पुढच्या जन्मी विलायतेत गेलो तर वेल्बी कमिशन पुढे साक्ष पूर्वी झाली तशीच व्हावी पण आधी घोड्यावर घालून मग दगा देणाऱ्या लोकांच्या सांगणीवरून पुण्यांत सोजरांनी केलेल्या अत्याचारांचे वर्णन करण्याचा व त्यामुळे मागाव्या लागलेल्या माफीचा तेवढा प्रसंग न यावा ! तात्पर्य दुर्दैवाचे पूर्वीचे सर्व अनुभव टळावे आणि सुदैवाचे सर्व अनुभव पुन्हा लाभावे इतकेच नव्हे तर पूर्वी अनुभवास न आलेले असे आणखी इतरहि लाभावे ! पण असे मनाजोगते पुनर्जीवित मिळणार कसे ? व तसे न मिळेल तर तोच सुखदुःखमिश्रित शबल स्वरुपाचा जुना जन्म कोणी काय म्हणून मागावा ? शिणलेला प्रवासी डोंगराच्या माथ्यावर उभा राहून मागे चालून आलेल्या वाटेवर नजर टाकतो, तेव्हा त्या वाटेवरची आल्हादकारक स्थाने त्याला दिसतच असतात पण त्याची दृष्टी त्याकडे खरोखर नसतां आपण कोणकोणत्या खाचखळग्यांतून कसकसे निभावून आलो याकडे अधिक असते; व त्याहिपेक्षां खरा आनंद होतो तो "चढण्याचे श्रम संपले, आतां पुढे उतार भेटणार" या विचारांत असतो. वाटेवरची ती स्थळे रम्य खरी पण पुन्हा परत जाऊन तो डोंगर चढण्याचे श्रम पुन्हा करण्याचा मोह त्याला तीहि स्थळे पाडू शकत नाहीत.

## ( ६ ) कांहीं आत्मचरित्रांचे दाखले

आत्मचरित्ररूप गतगोष्टी लिहून काढाव्या अशी पक्की कल्पना मनांत आली तेव्हां मी ग्रंथसंग्रहालयात बसलेला असल्यामुळे सहजच इतर ज्या कोणी आत्मचरित्रे लिहिलेली प्रसिद्ध आहेत ती चाळून पहावी असा विचार सुचला. हेतु हा की आत्मचरित्र लिहिण्याविरुद्ध कित्येकांनी जे ठराविक आक्षेप घेतलेले आहेत ते यांना कितपत लागू पडतात ? ती लिहिणारांचा हेतु केवळ आत्मप्रौढी मिरविण्याचाच असतो किंवा इतर निरपवाद असाहि कांही हेतु असतो ? तसेंच हेंहि पहावेंसे वाटले की आत्मचरित्रे लिहिण्याच्या पद्धति किंवा प्रकार कसकसे असतात ? म्हणून ते ग्रंथ वाचतांना या दोनहि मुद्यांसंबंधाने काय काय आढळले ते थोडक्यांत खाली देतो. त्यावरून ( १ ) आत्मप्रौढीचा आरोप खरा नसतो व ( २ ) लेखकांच्या जितक्या मनःप्रकृति तितके आत्मचरित्रलेखनाचे विविध प्रकार असतात हे दिसून येईल.

प्रथम परदेशीय आत्मचरित्रात काय आढळले ते सागतो. नेपोलियन बोनापार्ट याच्या आत्मचरित्रात आत्मप्रौढी पुष्कळ ठिकाणी आढळते; तथापि लोक नावे ठेवतील अशाहि कित्येक स्वतःसबधाच्या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख त्याने केला आहे. हे आत्मचरित्र त्याने लोकांनी आपणांला मोठे म्हणावे याकरिता लिहिलेले नाही तर आपल्या आवडत्या एकनिष्ठ व प्रेमळ उपसेनापतीना वियोग-दुःख सुसह व्हावे, आणि आपणासमवेत त्यांनी केलेल्या पराक्रमाची वर्णने वाचून त्यांना नित्य समाधानाचे एक साधन मिळावे या उद्देशाने लिहिले. नेपोलियनचे आपल्या शिपाया-सौंगड्यावर अत्यत प्रेम असे ही गोष्ट प्रसिद्धच आहे. त्याचे आत्म-चरित्र वाचून खाली ठेवल्यावर जर कोणत्या एका गोष्टीचा ठसा मनावर कायम रहात असेल तर तो त्याच्या दुर्दम आशावादित्वाचा आणि धाडसी महत्वाकांक्षेचा. ज्यानी आपले अद्वितीय पराक्रम प्रत्यक्ष पाहिले, अनुभविले, त्याना प्रत्यक्ष चरित्रदर्शनाने जो आदर उत्पन्न झाला त्याहून आत्मचरित्र-वाचनाने अधिक उत्पन्न होईल असली वेडगळ कल्पना त्याच्या मनात येणे शक्यच नव्हते. त्याचे मातृ-वात्सल्य ज्या लोकाना प्रत्यक्ष पहावयास सापडले नसेल त्यांना या आत्मचरित्राने त्याच्याविषयी अशी माहिती मिळेल की तिजवरून, तो पराक्रमांत जसा राक्षस तसा प्रेमळपणात अनुकरणीय मानव होता, असे त्यांना म्हणावेसे वाटेल. नेपोलियन लिहितो "लहानपणी मी जितका उच्छृखळ तितकाच आईची आज्ञा पाळणारा होतो माझ्या हातून जर कांही चांगले घडले असेल किंवा मला जे कांही यश आले असेल त्या सर्वाचे श्रेय माझ्या आईला आणि तिच्या तत्वनिष्ठ आचरणालाच आहे, मला नाही."

ॲडॉल्फ हिटलर याने आपल्या चरित्रग्रंथाला 'माझा झगडा' असेच नांव दिले आहे. आणि सर्व चरित्रांत त्याने पदोपदी झगडूनच जे यश मिळविले त्याचा पुरावा दर पानागणिक मिळतो असे म्हणतां येईल. चरित्रग्रथ समाप्त करिताना तो लिहितो "जगाने मला अन्याय करून माझ्या कृत्यांना दूषण दिले तरी या मानवी सत्याहून व मानवी कायद्यांकडून अधिक श्रेष्ठ अशी एक न्याय-देवता आहे, ती तरी माझ्या निंदेचे लेख व उल्लेख हाताने टराटर फाडून फेकून देऊन या जगाला खदखदा हसेल. आणि ती मला व माझ्या सहकारी लोकाना निर्दोषी ठरवून पश्चात्तापाचे कोणतेहि प्रायश्चित घेण्याचे आम्हाला कांहीच कारण नाही अशीच जगजाहीर घोषणा करील." हिटलरचे मत असे होते की

ज्याचें पर्यवसान कृतींत नाहीं अशा देशाभिमानाला काडीचीहि किंमत नाहीं. त्याचें चरित्र पाहणाराप्रमाणें त्याचें आत्मचरित्र वाचणाराला तो देशाभिमानाचा, स्वार्थत्यागाचा आणि निर्भयतेचा मूर्तिमंत पुतळाच आहे, असें स्वतः त्याचें त्यानें न म्हटलें तरी, वाटल्यांवाचून राहत नाहीं त्याचें आत्मचरित्र मुख्यतः आत्मसमर्थनपर आहे, हें वर दिलेले त्याचे चरित्रसमाप्तीचे उद्गार वाचून कोणालाहि पटेल. सर्व जर्मनी आपल्या करांगुलीवर नाचविण्याची सत्ता व श्रेय लाभलेल्या महानुभावानें आत्मसमर्थन करण्याचें काय कारण असा प्रश्न सहज सुचतो. पण पराक्रमी मनुष्यालाहि शत्रु काहीं थोडे नसतात त्याचा पराभव त्यांना हातानें करतां न आला तरी निंदेचें चाटण माखलेल्या आपल्या जिभेनें आणि द्वेषाच्या शाईत बुडविलेल्या आपल्या लेखणीनें ते तो करूं पाहतात. अशांना उत्तर म्हणून द्यावेंच लागतें. आणि या द्वेषाची, निंदेची जाणीव हिटलरला दुःसह वाटली म्हणून तिच्या उपशमनार्थ त्यानें आत्मचरित्र लिहिलें आहे

जगविख्यात जर्मन सेनापति हिंडेनबुर्ग यानेंहि आत्मचरित्र लिहिलें आहे. त्यांत स्वतःच्या लौकिक किंवा सांसारिक चरित्रासंबंधानें कांहींच विशेष लिहिलें नाहीं. त्यांत त्यानें आजन्म केलेल्या क्षात्रकर्माचें वर्णन दिलें आहे. विशेषतः महायुद्धात त्यानें केलेल्या कामगिरीच्या वर्णनानेंच हा ग्रंथ भरला आहे असें म्हटलें तरी चालेल. ग्रंथ बहुतेक इतिहासपर आहे. त्यांत प्रेमद्वेषादि विकार कोठेंच दिसून येत नाहींत. असेल तर मनांत ओतप्रोत भरलेल्या स्वामिनिष्ठेचाच रसभरित उद्गार सर्वत्र दिसून येतो.

नेपोलियनप्रमाणें मुसोलिनी यानेंहि आत्मचरित्र लिहिलें तें स्नेह्यांच्या आग्रहावरून. हा स्नेही म्हणजे अमेरिकेचा सरकारी वकील मुसोलिनीला इतक्यातच आत्मचरित्र लिहावें असें वाटलें नाहीं. कारण त्यावेळीं त्याचें वय अवघें पंचेचाळीस वर्षांचें होतें, आणि तो सर्वाधिकारी मुख्यप्रधान झाल्याला सहाच वर्षें झालीं होतीं. आपल्या कार्याचा आतां कोठें प्रारंभ झाला आहे असेंच त्याला वाटतें जर्मनीला जगांत पुन्हां एकवार बहुमानाचें स्थान प्राप्त व्हावें इतकीच केवळ हिटलरला महत्वाकांक्षा दिसते उलट मुसोलिनीला जग जिंकावयाचें आहे! हिटलरच्या आत्मचरित्रांत आत्मविश्वास दिसून येतो तर मुसोलिनीच्या चरित्रांत आक्रमणबुद्धि दिसून येते. नेपोलियन किंवा हिटलरपेक्षां मुसोलिनीच्या निवेदनांत अहंकार

अधिक दिसून येतो. नेपोलियन हा लोकप्रियतेच्या लाटेवर उसळत गेला. पण हिटलरप्रमाणे मुसोलिनीला झगडा करीत मारामारी करीत मार्ग काढावा लागला. नेपोलियनप्रमाणे मुसोलिनीमध्येहि मातृभक्ति इत्यादि स्पृहणीय मानवगुण दिसून येतात. पण त्याच्या ग्रथांत घरगुती स्वरूपाच्या गोष्टी फार थोड्या आहेत.

आतां राजकारणांत पराक्रम न केलेल्या अशा कित्येक परकीय आत्मचरित्र ग्रथकाराकडे वळू. मोटारीचा बडा उत्पादक अमेरिकन कारखानदार हेन्री फोर्ड याच्या आत्मचरित्रात घरगुती स्वरूपाचा एकहि शब्द नाही. आपला कारखाना मालकीच्या दृष्टीने खाजगी असला तरी समाजसेवेचे ते एक फार मोठे साधन आहे असा आत्मविश्वास त्याला असल्यामुळे अशा संस्थेच्या द्वारे उद्योगधद्याची वाढ कशी करावी, त्यात यश प्राप्त होण्याला कोणते गुण लागतात, या विषयीचे उदबोधक विवेचन त्याच्या आत्मचरित्रांत आढळते. त्यांत आपल्या कार्यपद्धतीचे वर्णन करतांना आगामी लोकशाहीचे हित उद्योगधंद्यांच्या वाढीशी कसे निगडित आहे, आणि सार्वजनिक उपयुक्ततेचा हक्क सागणाऱ्या कारखानदारानी कोणत्या तत्वांचा अगिकार केला पाहिजे हे त्याने विशद करून सागितले आहे आपल्या ग्रथाच्या शेवटी तो म्हणतो "माझी म्हणून कामगिरी झाली असेल तर ती इतकीच की, कारखानदारीतहि स्वतःच्या लाभापेक्षां सार्वजनिक उपयोगाची दृष्टि अधिक कशी ठेवतां येते, आणि जगाची सुखसोय ज्याच्या योगाने वाढेल असा कोणताहि धदा करणे हे बहुमानास्पद कसे होऊ शकते इतकेच मी स्वतःच्या उदाहरणाने सिद्ध केले आहे. यश हा अंतिम स्वरूपाचा शब्द त्याज्य होय. मला यश आले असे मी म्हणणे म्हणजे आपल्या थडग्यावरचा दगड आपल्याच हाताने तयार करणे असे होईल." वरील उद्गारावरून हे दिसून येईल की, फोर्डच्या लिहिण्यांत आत्मप्रौढी असली तरी ती उदात्त स्वरूपाची आहे.

तत्त्ववेत्ता जॉन स्टुअर्ट यालाहि आत्मचरित्र लिहावेसे वाटले. पण त्याने ते लिहिले त्याचे कारण शिक्षणाने मनुष्याचे मन कसे विकसित होते हे जगाला शिकविण्याची एक प्रकारची तळमळ त्याला लागून राहिली होती. स्वतः आपल्याला शिक्षण लाभले ते "अपूर्व आणि विशेषगुण" होते अशी त्याची समजूत होती. "कथानकाच्या दृष्टीने सामान्य वाचकाला मनोरंजक असे या

ग्रंथांत कांहीच आढळणार नाही. म्हणून त्या दृष्टीने हा ग्रंथ वाचणाराला शेवटीं आपली निराशा झाली असे वाटल्यास त्याचा दोष त्याने स्वतःला लावावा, मला लावू नये " असे त्याने प्रारंभीच बजावून ठेवले आहे. आत्मविकासाचा इतिहास डोळ्यापुढे ठेवून त्याने मनोविश्लेषण व आत्मनिरीक्षण केले आहे. तथापि, आपल्या-ला जी कांहीं संस्कृति लाभली तिचे श्रेय तो स्वतःकडे न घेतां ते इतरांना देतो हे कृतज्ञतेचे लक्षण अशा या मोठ्या मनुष्यासंबंधाने लक्षांत ठेवण्यासारखे आहे. आणि ही कृतज्ञता व्यक्त करण्याकरिताच त्याने हे आत्मचरित्र लिहिले आहे.

मिलच्या ग्रथांत त्याने आपल्या बापाचा व बायकोचा विशेष प्रकारे उल्लेख केला आहे. बापाच्या कित्येक विचित्र मतांवरहि त्याने तत्त्वनिष्ठेचे शोभिवंत आच्छादन घातले आहे त्याच्या बायकोचा व त्याचा लग्नापूर्वी वीस वर्षें विश्वासाचा स्नेहसंबंध होता हे त्याने कबूल केले आहे आणि लिहिणाराप्रमाणे चर्चा करणारालाहि विचारप्रवर्तनाचे श्रेय द्यावे लागते असे म्हणून या संवाद-सहकारिणीला आपल्या ग्रंथाचे पुष्कळसे श्रेय दिले आहे. तात्त्विक विषयांबाहेर आपणाला स्वतंत्र असे ज्ञान फारसे नव्हते, आणि आपण जे नवे विचार व सिद्धांत निर्माण केले ते अशा विषयांतच होते असे म्हणून एकंदर भूमिका विनयाची ठेवली आहे इतर कोणावर फारसे तोंडसुख घेतलेले नाही. मात्र स्वतःच्या ग्रंथकर्तृत्वाविषयी त्याने बरीच उपयुक्त माहिती दिली आहे.

मिलचा शिष्य व अनुयायी जॉन मोर्ले याने, महायुद्धाबाबत ब्रिटिश मंत्रिमंडळाशी मतभेद होऊन राजकारण सोडावे लागल्यावर आत्मचरित्र लिहिले. तो आपल्या प्रस्तावनेत लिहितो, " प्रत्येक मनुष्याला आपल्या आयुष्यांत जग पुढे गेले आणि आपण मागे पडलो असे वाटण्याची वेळ येतच असते. परंतु याचा अर्थ असा नव्हे की आपल्या पूर्व आयुष्यांतील आनंददायक अशा आठवणी असतील त्याहि त्याने आठवू नयेत आजचा भविष्यवादी व स्वतःला जनते-चे मुख म्हणविणारा पुढारी मनुष्य उद्यां स्थानभ्रष्ट होतो. समाजाच्या विचारांत व आचारांत सृष्टीमध्ये घडून येणारीच परिवर्तने होत असतात. वाऱ्यांची दिशा बदलते, समुद्राला भरती ओहोटी येते, समुद्रावरचे जहाज हेलकावे खाते, पण मुद्याची गोष्ट हीच की जहाजाचा नांगर मात्र तुटून जाऊ नये ! काळ बदलला म्हणून आपली तत्त्वेहि बदलावी, हे बरे नव्हे. पण तसेच हेहि खरे की

घमेंडखोरपणाने अहंकार मिरवू नये, आणि आपले खरे दोष आत्मनिरीक्षणात आढळले तरी त्याचा कैवार घेऊन आपलेच खरे व बरोबर होतें अशा अप्रामाणिक समाधानाने आपली पाठ थोपटून घेऊ नये. हे दोष टाळून जे खरे आत्मनिष्ठ समाधान लाभेल तेच स्पृहणीय होय आणि हे ज्याला लाभेल तोच खरा भाग्यवान म्हणावा." या विचारसरणीवरून मोर्ले याने आत्मचरित्र कोणत्या सुरात लिहिले असेल हे तेव्हाच लक्षात येतें मोर्लेचा बहुतेक जन्म वर्तमानपत्रामध्ये लिहिण्यांत आणि ग्रथनिर्मिती करण्यांत गेला. केवळ अखेरच्या आयुष्यांतच त्याने राजकारणांत पुढारीपणाने भाग घेतला व तोहि अयशस्वी ठरला. त्याच्या ग्रंथांत तत्कालीन इतिहास व विद्वान लोक यांच्याविषयी बरीच बोधप्रद माहिती मिळते.

आतां आपण प्रोफेसर मॅक्स मुल्लर याच आत्मचरित्र घेऊ त्याने अगदी म्हातारपणी आपल्या मित्रासबधीच्या आठवणीचे दोन भाग प्रसिद्ध केले त्यानतर आत्मचरित्र लिहावयास घेतले, पण ते पुष्कळसे अपूर्ण राहिले मृत्यूच्या आदल्या आठवड्यापर्यंत ते लिहिण्याचे त्याचे काम हळहळू सुरू होतें. हे लिहिण्यात त्याचे दोन हेतु होते (१) आपल्या आयुष्याचे ध्येय काय होतें हे सर्व उद्योगाचे सुसगत विवेचन करून सांगणे, (२) तरुण विद्यार्थ्यांना धीर व उत्तेजन देणे. आणि खरोखरच मॅक्स मुल्लरच्या स्वतःच्या अडचणी लक्षात घेतल्या असता त्याने शेवटी इतके यश सपादन केलेले पाहून कोणाहि तरुण विद्यार्थ्याच्या मनात आशा व उत्साह ही उदित झाल्याशिवाय राहणार नाहीत. घरची गरीबी, यामुळे खुद्द जर्मनीत म्हणजे स्वदेशातच त्याच्या विद्याभ्यासाला अडचणी आल्या. पुढे तो इंग्लंडांत गेला तो तर बोलून चालून परदेश जर्मनांविषयी इग्रजाच्या मनांत नेहमीच तेढ. त्यातून ऑक्सफर्ड हे पुराणमतवादी कृपण मनाच्या खानदानी लोकांचे माहेरघर. आणि मॅक्स मुल्लरच्या अभ्यासाचा, सशोधनाचा विषय पडला रुक्ष म्हणजे भाषांचा मूलगामी इतिहास, भाषा व धर्म आणि पुराण-वाङ्मय यांचा सबध इत्यादि. असे असता तो ऑक्सफर्ड विद्यापीठात कायमचा प्रोफेसर झाला आणि तेथेच श्रेष्ठ मान्यता पावला. त्याच्या सबध आत्मचरित्रात त्याने फक्त आपल्या कार्याचे सरळ वर्णन केले आहे आणि त्यांतील अडचणी दाखविल्या आहेत. पण या अडचणीच्या वर्णनावरून, म्हणजे अशा अडचणीतून आपणाला यश मिळाले हे दर्शविण्यावरून जी काय आत्मप्रौढी किंवा आत्मस्तुति

अप्रत्यक्ष रीतीने ध्वनित होईल त्याहून अधिक त्याने केली नाही. म्हणजे त्याने आपल्या ग्रंथांवर, लेखांवर, शोधावर, बुद्धिमत्तेवर, पसतीचे शेरे कोठे मारले नाहीत. प्रो. जॉवेट हा म्हणतो की आत्मचरित्र लिहिण्याच्या मार्गात खरी अड-चण असेल तर ती आत्मस्तुति करण्याची नव्हे, तर उलट ती फाजील विनयाची. मॅक्स मुल्लरच्या चरित्रातहि हेच दिसून येते कारण त्याने आपल्या यशाचे सर्व श्रेय आपली परिस्थिति, विशेषतः आपले उदार गुणग्राही मित्र यांनाच दिले आहे. आत्मचरित्र लिहिण्याविषयी आपल्या मित्राच्या आग्रहाला बळी पडल्याचे एक कारण प्रो. मॅक्स मुल्लर याने दिले आहे ते मात्र नमूद करण्यासारखे वाटते. तो म्हणतो "माझ्या चरित्रांत मी लिहून ठेवावे असे कांही विशेष आहे असे वाटत नाही. तसेच पुढील पिढ्या मला अवमानितील, नसते दोष माझ्या कामांत काढ-तील म्हणून माझे आत्मसमर्थन मी आगाऊ करून ठेवावे याहिकरिता मी हे लिहीत नाही पण माझे गुण घेणारे उदार मित्र इतके आहेत की मरणानतरहि त्यांच्या तावडीतून मी सुटणार नाही—अर्थात् त्यापैकी कोणाला तरी माझे चरित्र लिहावेसे वाटेल आणि तसे ते त्या कोणी लिहिले तर माझ्या अगच्या गुणाची अतिशयोक्ति होण्याची भीति मला वाटते म्हणून माझे मीच ते लिहावे म्हणजे त्यांत अवास्तव असे कांही येणार नाही."

सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक रोमे रोलॉ याने 'एका साठ वर्षाच्या वयाला पोचले-ल्याची रोजनिशी' लिहिली. त्यांत त्याने दोन प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. (१) या लेखात 'मी' या शब्दाने ज्याचा उल्लेख येतो तो 'मी' म्हणजे व्यक्तिशः मी नव्हे तर ज्या समाजांत मी राहतो तो (२) 'मी कां लिहितो' या प्रश्नाचे त्याचे उत्तर असे की "मला लिहिल्याशिवाय राहवतच नाही म्हणून. कागदावर न लिहितां मनावर लिहिले ते तरी एक प्रकारे लिहिलेच की नाही? कागदावर लिहिल्याने विचार स्पष्ट व स्वच्छ होतात मी स्वतः पुढे चाल करून जाणार आहे. आणि माझ्यासारखे चाल करून पुढे जाणारे असतील त्यांच्याकरितां लिहितो."

हेनरी नेव्हिन्सन याचे आत्मचरित्र फार मनोरजक आहे. ते सांसारिक हकिगतीच्या वर्णनामुळे नव्हे, तर डेली क्रॉनिकल, मॅन्चेस्टर गार्डियन अशा सारख्या वजनदार वर्तमानपत्रांचा आणि कित्येक ज्ञानवर्धक सस्थांचा प्रवासी बातमीदार या नात्याने त्याने लिहिलेल्या बातमीपत्रांमुळे. त्याने जन्मभर हाच

व्यवसाय केला. त्याच्या पायाला जसे कांही चक्र बांधले होते. जगांतला कोणताहि भाग त्याने प्रवास केल्याशिवाय ठेवला नाही प्रवास केला तोहि बिकट धाडसाच्या युद्धासारख्या प्रसगी बातमीदार किंवा प्रतिनिधी या नात्याने मोठमोठ्या लोकांच्या मुलाखती घेतल्या. शिवाय स्वतःच्या स्वतंत्र मताचा प्रसार करण्याकरितां त्याने वर्तमानपत्रांतून लेख लिहिले. १९०७ साली सुरतेच्या राष्ट्रीय सभेत हा हजर असून हिंदुस्थानातील राष्ट्रीय चळवळीवर त्याने एक पुस्तकच लिहिले आहे. याच्या आत्मचरित्राला 'जीवनाचा प्रखराग्नि' हे नाव आहे आणि ते सार्थहि आहे. कारण त्याचा सर्व जन्म चळवळी करण्यात, करविण्यांत, त्याची प्रसिद्धी करण्यात आणि साहसाच्या प्रसगी स्वतः हजर राहून त्याची वर्णने देण्यांत गेला. आत्मचरित्र लिहिण्यांत त्याची वृत्ति अत्यत सतुष्ट दिसते. कारण "मी सत्तर वर्षे जगलो ते आयुष्य सत्कारणी लागले. या अवधीत सधी पुष्कळ मिळाल्या, त्याचा उपयोगहि मी भरपूर केला. अगच्या गुणाचा जास्तीत जास्त उपयोग उत्तम रीतीने करावयास मिळणे हेच जगांत मनुष्याचे खरे 'सुख' आणि ते मला भरपूर लाभले" असे त्याने लिहिले आहे. विनयाने तो भारलेला नाही. उलट अयोग्य वाटणाऱ्या गोष्टी आणि माणसे यावर त्याने भीडमुर्वत न ठेवता टीका केली आहे.

यानतर कांही स्वदेशी लोकांनी लिहिलेल्या आत्मचरित्रांचा उल्लेख करावयाचा. मी खालील स्त्री-पुरुषाची आत्मचरित्रे वाचली आहेत. इग्रजीतील म. गांधी, पडित नेहरू, सर सुरेंद्रनाथ बानर्जी, आचार्य पी सी. रे, लाला लजपतराय, भाई परमानद यांची; मराठीतील प्रो. कर्वे, श्री. रमाबाई रानडे, रा सी. ग. देवधर इत्यादीची. या चरित्रांवरूनहि लिहिणारानी आत्मस्तुति करण्याकरिता किंवा आत्मप्रौढी गाजविण्याकरितां ती लिहिली आहेत असे कोणाला यथार्थ म्हणतां येईल असे मला वाटत नाही. त्यात आत्मस्तुति आलेली असेल तर ती सकारण, नैमित्तिक, औपचारिक असेल. आत्मस्तुतीपेक्षा आत्मसमाधानाचे उद्गार अधिक पहावयास सांपडतील. पण सात्विक आत्मसमाधान म्हणजे आत्मस्तुति नव्हे. आत्मसमाधान प्राप्त करून घेणे हे जसे मनुष्याला भूषणास्पद मानिता येते तसेच ते प्रकट करण्यापासून होणाऱ्या आनदाचा हक्कहि अशा मनुष्याला प्राप्त होतो. पण वरील ग्रंथांत आत्मस्तुति किंवा आत्मसमाधान यापेक्षांहि आपणाला आलेले अनुभव, आपणाला असलेली विशिष्ट माहिती जगाला सांगणे हाच हेतु अधिक प्रमाणांत आढळेल. हा तर समाजावर उपकारच ठरेल. कांही आत्मचरित्रात मतप्रसारा-

चा उद्योग केलेला असतो तसे करिताना लेखकाला आत्मसमर्थनच नव्हे तर प्रतिपक्षीयांवर टीकाहि करावी लागते. आणि ते आत्मसमर्थन किंवा ती टीका न्याय्य असली तर ती करण्याबद्दल त्याला दोष कसा लाविता येईल ? सामान्यतः आत्मचरित्रकाराने आयुष्यात ज्या गोष्टी केलेल्या असतात त्याचीच ती पुरवणी असते. आणि या पुरवणीला महत्त्व हेच की फुटकळ व त्रुटित अशा स्वरूपांत लेखकाकडून पूर्वी जे बोलले गेले, लिहिले गेले, आचरिले गेले, ते एकत्रित सकलित स्वरूपांत सग्रहित केलेले असते. त्याकरिता पूर्वी जी स्तुति किंवा निंदा त्याला लाभली त्याहून अधिकाची अपेक्षा तो लेखक या आत्मचरित्र लिहिण्याने स्वतः करीत नाही. आणि लोकांनीहि त्या करिता ती त्याला अधिक देण्याचे कारण नाही. कायमच्या वाङ्मयांत ती एक नवी भर पडली इतकाच लाभ स्वतःला समाजाने मानावा. ही भर आपल्या गुणानी टिकेल किंवा अवगुणांनी नामशेष होईल !

## ( ७ ) माझ्या 'आत्मचरित्रा'चीं साधनें

असो. आतां आरंभिलेल्या या कार्याच्या साधनाविषयी दोन शब्द लिहितो. मी सर्व जन्मभर दोन गोष्टीचा कटाळा केला. एक रोजनिशी लिहिणे आणि दुसरे घरचे हिशेब लिहिणे. पैकी दुसरी गोष्ट न केल्यामुळे माझे फारसे अडले नाही किंवा फारशी हानी झाली नाही. माझ्या उत्पन्नाची मुख्य बाब म्हणजे दर महिना एक रकमेने येणारा ठराविक पगार. तो बहुधा मी घरी कुटुंबाच्या, आणि मुले मोठी झाली तेव्हा त्यांच्या, स्वाधीन करीत असे. म्हणजे माझ्याकडून त्यांनी खर्चाला मागून घेण्याऐवजी मला लागेल ते मीच त्याच्याकडून मागून घेत असे. आणि मी स्वतः गृहप्रपचाचा हिशेब आपल्या हाताने कधी ठेविला नाही इतकेच नव्हे, तर त्यांच्याकडूनहि घेऊन कधी तो तपासला नाही. गृहप्रपचाला खर्च किती लागतो याची स्थूल कल्पना होत असल्यामुळे तो पगारांत भागतो की नाही येवढेच माझे पाहाणे असे. सर्व व्यवहार विश्वासावर चाले आणि तो विश्वास अनाठायी होता असे केव्हांच माझे प्रत्ययाला आले नाही.

माझा सर्व जन्म इतर लोकांकडून कर्ज काढल्याशिवाय गेला. आणि घरचा खर्च मिळकतीच्या आत ठेवण्यावर माझा कटाक्ष असल्यामुळे घरच्या कोणा माणसानाहि बाहेरून कधीच उचापत करावी लागली नाही. कोणा दुकानदाराचे

बिल कधी थकून राहिले किंवा त्याचा तगादा आला असे मला मुळीच आठवत नाही. आणि माझा व्यवहार जरी सर्व अगदी रोखीचाच होत होता असे नाही तरी बिले देऊन चुकती करून घेण्याचा तगादा उलट माझाच त्यांच्यामागे असे. घराबाहेर माझा आर्थिक व्यवहाराचा संबध केसरी ऑफिस आणि एखाददुसरी बॅंक याशीच यावयाचा. पैकी ब्यॅकेशी व्यवहार चेक काढूनच होई आणि केसरी कचेरी-तहि पगाराहून कांही वेगळे दिले घेतले तर तेथे रोजमेळाचे लिहीणे असल्यामुळे त्या संबधानेहि मला स्वतःचे टिपण ठेवणे अवश्य वाटत नसे. मला येऊन जाऊन घरे बांधणे, दुरुस्त करणे, यांचाच काय तो नाद असे पण या बाबतीतहि विश्वास ठेऊन वागण्याची माझी सवय असल्यामुळे बिल येईल तेच खरे धरून देऊन टाका-वयाचे अशी माझी पद्धत होती. यामुळे माझा थोडासा तोटा होणे स्वाभाविक होते. कारण बिल बारीक नजरेने तपासले आणि पडताळा पाहिला तर त्यांत निघणारी एखादी चूक कत्राटदारापेक्षां आपल्याच फायद्याची निघावयाची हे उघड आहे. परतु तसे करण्याला लागणारा वेळ, दमदारपणा, किंवा व्यवहारज्ञानाहि माझ्या अगी नव्हते वाजवीहून जास्ती खर्च करण्याची प्रत्येकाची एखादी बाब असतेच. तिला व्यसनाचे स्वरूप नसले तरी बिनहिशोबी खर्चाचे किंवा उधळेपणाचे स्वरूप असते. माझी ही बाब घरे बांधण्याच्या हौसेपुरती होती. आणि एखादे वेळी गृहप्रपचा-च्या बाबतीत वाजवीहून अधिक खर्च झाला असे जर मी केव्हा घरी म्हणालो, तर आपल्या बचावाकरिता म्हणून मजकडून गंवडीकाम सुतारकाम यांवर होणाऱ्या उधळेपणाची आठवण मला थट्टेने देण्यात येई. म्हणजे मग फिटासफीट झाली असे मानून मी स्वस्थ बसे. असो. वर दर्शविल्याशिवाय देण्याघेण्याचा इतर व्यवहार फारसा नसल्याने आपल्या हाताने हिशेबी जमाखर्च न लिहितां माझा जन्म गेला आणि त्या दोषाचे मला फारसे वाईटहि वाटत नाही !

परतु मी रोजनिशी लिहिण्याची संवय ठेविली नाही याविषयी मात्र मला अतिशय वाईट वाटते व पश्चात्ताप होतो. कारण मी तशी ती ठेवली असती तर स्थानिकच काय पण समकालीन परप्रांतीय अशा इतिहासाची कांही साधने माझ्या सग्रही राहिली असती. आणि आज या गतगोष्टी लिहितांना पुष्कळ गोष्टी आठवत नाहीत, कित्येकांचा कालविपर्यास होतो की काय, अशी जी भीति मनाला वाटते ती वाटण्याचे कारण उरले नसते. वर्तमानपत्रे हा सार्वजनिक जीवनाचा एक रोजखर्डा असतो हे खरे; तथापि

त्यांत ज्यांना सार्वजनिक रूप मोठया प्रमाणावर प्राप्त झाले अशा गोष्टींचाच उल्लेख असावयाचा. मग त्यांत माझा स्वतःचा सबंध कितीसा येणार ? आणि ज्यांत माझा उल्लेख आला अशाहि नोंदीची, मजकुराची कात्रणे मी फारशी काढून ठेवली नाहीत. पण वर्तमानपत्रांत ज्याचा उल्लेख आलेला नाहीं अशा स्मरणांत ठेवण्या-सारख्या, व या ग्रंथात मी नोंदू शकलो असतो अशा, कितीतरी मनोरंजक व बोधप्रद हकीकती घडलेल्या आहेत. रोजनिशी ठेवण्याच्या आळसामुळे मी त्यांना मुकलो हे खास. इतर कित्येक लोकांप्रमाणे माझी स्मरणशक्तीहि फारशी चांगली नाही. माझे मित्र कै. दादासाहेब करंदीकर वकील यांच्या पन्नास वर्षांच्या स्मरण-वह्या अजून शिल्लक आहेत. त्यातली एखादी जुनी वही हाती घेऊन चाळली असतां फार करमणूक होते. म्हणून "एखादा हुषार असिस्टंट हाताशी घेऊन त्याच्या-कडून या स्मरणवह्यातल्या मुख्य गोष्टी उतरून काढा म्हणजे जस्टिन मॅकार्थी-सारखा 'अस्मत्समकालीन इतिहास', History of our own times लिहि-णारा कोणी भेटल्यास त्याला त्याचा फार उपयोग होईल," अशी विनवणी मी त्याना नेहमी करी. पण ते घडून आले नाही. मी दादासाहेबांसारख्या स्मरणवह्या ठेवल्या नाहीत. पण मी स्मरणाने लिहून ठेवणाऱ्या या आत्मवृत्ताचा उपयोग, दादासाहेबाच्या अप्रकाशित स्मरणवह्यांपेक्षां समाजाला अधिक होईल असे मात्र वाटते खरे !

तात्पर्य रोजनिशी न लिहिण्याचा दोष कोणतीहि सबब न सांगतां पदरांत घेणें मला प्राप्त आहे. वर्तमानपत्रांतील मजकूर लिहिण्याचे पुष्कळसें काम जरी मी तोडाने सांगून लेखकाकडून लिहवून भागवीत असे तरी माझें बहुतेक शेलके वाङ्मय मी आपल्या हातानेच लिहिलेले आहे. शिवाय मी आपल्या हाताने करी असा पत्र-व्यवहारहि बराच असे. हे लक्षात घेतां रोजनिशीचीं एकदोन पाने लिहून ठेवणे हे मजकडून सहज व्हावे. परंतु नेमका तेवढ्याच कामाचा मला कंटाळा वाटे. ही चूक हातून घडली खरी. त्याचे आतां वाईट वाटून काय उपयोग ? युरोप, अमेरिकेकडे पाहिले तर असे दिसून येते की तिकडील लोकांना रोजनिशी लिहिणे हें जणूकाय सार्वजनिक कर्तव्याप्रमाणेच एक कर्तव्य वाटते. अशा रोजनिशांच्या आधारावर ते आत्मचरित्रे लिहितात. पण ती न लिहितांच ते निवर्तले तरी त्यांच्या पश्चात् त्यांच्या रोजनिशा छापल्या गेल्या, आणि त्यांना स्वतःसंपादित अशा ग्रंथांचे स्वरूप आले हे आपण पाहतो. ही गोष्ट त्यांच्या हातून पार पडण्याचे खरे कारण

असे आहे की आम्हा लोकांपेक्षां इतिहासज्ञानाची गोडी त्यांना अधिक वाटते. यामुळें रणांगणावर लढणारा सेनापति, राजकारणाच्या कारस्थानांत किंवा चळवळीत पडणारा पुढारी, हा देखील जर आपली रोजनिशी लिहितो, तर फावल्या वेळी एकाग्र होऊन काम करणारे, म्हणजे रोज फुरसतीचा बराच वेळ मिळणारे कलावतहि रोजनिशी लिहीत असतील तर त्यात काय नवल ! पत्रव्यवहाराचाहि तिकडील लोकांचा असाच परिपाठ आहे म्हणजे ती लिहिण्याचा व लोकांकडून आलेली सभाळून ठेवण्याचा. स्मरणीय अशा अनेक व्यक्तीच्या रोजनिशा किंवा पत्रव्यवहार याना ग्रथांचेंहि स्वरूप येते आणि ते ग्रथ विश्वसनीय इतिहासाच्या खाती दाखल होतात मी स्वतः कांही कांही पत्रव्यवहार मात्र सभाळून ठेवूं शकलो

आमच्या इकडे प्रो. विजापूरकर, डॉक्टर मुजे, अशा कित्येक गृहस्थ।च्या रोजनिशा जप्तीत किंवा चोरीला गेल्या आणि त्यामुळे त्य।चा दुरुपयोग झाला; हें एक कारण, सार्वजनिक लोकांनी रोजनिशा लिहिण्याविरुद्ध सांगण्यांत येते. परतु त्यात फारसा अर्थ नाही. त्यांचा थोडाबहुत दुरुपयोग झाला असेल. निदान खापर्डे याच्या रोजनिशाचा तरी तसा झाला नाही हे निश्चित आहे. परंतु एकदरीने या आक्षेपात फारसे तथ्य नाही. जो मनुष्य रोजनिशी लिहावयाला बसतो त्याच्या डोळ्यांपुढे, ती एखादे वेळी अनिष्ट माणसाच्या हाती जाण्याचा सभव असतोच नसतो असे कसे म्हणावे ! ही सामान्य व्यवहार-ज्ञानाचीच गोष्ट आहे आणि ज्याला हा संभव कळतो त्याला रोजनिशीत काय लिहावें, न लिहावे, व लिहिलें ते कसे लिहावे, कसे न लिहावे, याचेंहि ज्ञान, तारतम्य असतेच असे घेऊन चालण्याला हरकत नाही.

पण या आक्षेपाच्या या निराकरणातूनच दुसरा एक आक्षेप निघण्यासारखा आहे. तो असा की, रोजनिशीत कोणी जे असे सभाळून लिहिले ते कितपत विश्वसनीय आणि इतिहासाच्या कार्याला उपयोगी मानावे ? पण याला माझे उत्तर हे की, हा आक्षेप रोजनिशांना एकपट लागेल तर आत्मचरित्रांना दुप्पट लागेल ! आणि आत्मचरित्रे ही सर्वस्वी अविश्वसनीय ठरतील तेव्हां मग या आक्षेपाचा विचार करावा लागेल; तोपर्यंत नाही.

रोजनिशीला मी रोजमेळाच्या कीर्दीइतकी किमत सहज देईन. अशा कीर्दीत चुका किंवा खोटे लिहिणे कोठे होतच नसेल असे म्हणता येणार

नाही हे खरे. परतु ती गोष्ट क्वचित घडते. निदान व्यक्तीच्या विशेष गुण-दोषांच्या हकीकती वगळल्या तरी निरपेक्ष, निस्वार्थी, अशा हकीकती पुष्कळच असणार. तारीखवार लिहिलेल्या नोंदी व टिपणे यांचे इतिहासदृष्ट्या महत्व मुळीच नाकबूल करता येणार नाही जो मनुष्य रोजनिशी दुसऱ्याला फसविण्याच्या दृष्टीने लिहील तो आत्मचरित्र–ग्रथात तसे काय कमी लिहील ? आणि ज्या सकलित इतिहासाला आपण डोळे मिटून विश्वसनीयतेचे प्रदान करतो तो तर, तिसऱ्याने चवथ्याकडून हकीकती मिळवून जुळवून लिहिलेला; म्हणून आत्मचरित्रांपेक्षां कमी महत्त्वाचा ठरतो तात्पर्य, सकलित इतिहासापेक्षा आत्मचरित्रांचे ग्रथ आणि त्याहिपेक्षा नियमित वेळी लिहिलेल्या रोजनिशा याना सर्वोत्तम पहिल्याप्रतीचे इतिहाससाधन हे पद सहजच प्राप्त होते असे मला वाटते.

लो टिळक यांचे चरित्र तीन खडात मिळून मी लिहिले त्यावेळी पत्र-व्यवहार आणि रोजनिशा यांच्या अभावामुळे होणाऱ्या हानीची जाणीव मला चागलीच कळून आली स्वतः टिळकानी रोजनिशी का ठेवली नसेल याच्या विवेचनात मी जात नाही. परतु त्यांचा व माझा निकट सहवास सुमारे २३ वर्षें आला त्या अवधीत मी स्वतः जरी ती ठेवली असती तरी ते चरित्र लिहिण्याला तिचा उपयोग मला कितीतरी झाला असतां असे पदोपदी वाटते. टिळकांचे बहुतेक जीवन सार्वजनिक स्वरुपाचे होते तरी 'केसरी-मराठा' पत्रात त्या जीवनापैकी एक शतांश गोष्टीचाहि उल्लेख झालेला नाही !

याचे कारण उघड आहे त्या दोन पत्रांत उल्लेख झाला तो मुख्यतः राजकीय स्वरूपाच्या विषयावरील त्यांच्या मतांचा आणि फार तर त्यांनी केलेल्या उघड चळवळीतील सभा समेलने यांचा. पण या सर्वांच्या मागे वर्तमानपत्रांत अलिखित परतु एखाद्या चरित्र-ग्रथांत लिहिण्याला योग्य असे किती तरी प्रसंग घडले असतील याची कल्पना कोणालाहि करतां येईल. या गोष्टी म्हणजे खाजगी उद्योग, व्यक्ती-व्यक्तीच्या गांठी-भेटी, सभाषणे, सुख-दुःखाचे प्रसंग, हास्य-विनोदाचे प्रसंग—म्हणजे एकदरीनें उघड सार्वजनिक जीवनाच्या पोषाख पेहरावाला आंतून अस्तरासारख्या चिकटलेल्या पण बाहेर दिसून न येणाऱ्या गोष्टी. आणि व्यक्तिजीवनाचे स्वारस्य अशाच गोष्टीत असते हे कोणत्याहि चरित्र-ग्रंथावरून किंवा आत्मचरित्रग्रंथावरून दिसून येते.

तात्पर्य अशा प्रकारचे महत्व ह्या रोजनिशीवजा टिपणांचे मला वाटतें. त्यांच्या सहाय्याशिवाय गतगोष्टीचा हा ग्रथ मला लिहावा लागत आहे म्हणून तो जितका भरदार व मनोरजक व्हावा तितका तो कदाचित होणार नाही. तथापि आहेत त्या साधनांत साधेल ते कार्य करावे हा माझा स्वभाव. त्याप्रमाणे हे गत-गोष्टीरूप आत्मचरित्राचे काम करावयाचे योजिले आहे

असो. शेवटी इतकेच सागावयाचे उरले की आज मी अत्यत समाधाना-च्या मनःस्थितीत आहे. मन शात आहे—हात जोडले आहेत—'हाके'ची वाट पाहत आहे !

# कोकण्याची 'विलायत'

## ( १ ) माझें कोंकणप्रेम

आम्ही केळकर मंडळी आश्वलायन शाखीय शांडिल्य गोत्री कोकणस्थ चित्पावन ब्राम्हण. त्यांची माहिती दोनशे वर्षांपलीकडची मिळत नाही. बरवे, आपटे, गोखले इत्यादि घराण्यांप्रमाणे या घराण्याचा इतिहास लिहिण्याचे कामच कोणी अंगावर घेईल तर कदाचित् याहून अधिक माहिती मिळण्याचा संभव आहे. पण देशावरील अनेक देशस्थ घराण्यांची माहिती कागदपत्रावरून साधार मिळू शकते, तशी कोकणस्थ घराण्याची मिळणे सोपे नाही. कारण कोकणांत वतनदारी खानदानी कधीच नव्हती. त्या लोकांचा संबंधच राजकारण किंवा राज्यकारभार यांत सतराव्या शतकांपर्यंत आला नाही. देशावरच्या लोकांनी राज्ये केली, निदान पाहिली तरी. पण पेशव्यापर्यंत कोकणच्या लोकांनी 'राज्ये' प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलीहि नाहीत. जुनी हिंदु राज्ये व मुसलमान बादशहाती यांना कोकण हे एखाद्या परड्याप्रमाणे किंवा वाडग्याप्रमाणेच वाटे. परड्यात भाजीपाला पिकावयाचा; पण तेथे घाणच पडावयाची. कांटेकुपणाच्या बंदिस्तीमुळे लोकांचा संचार परड्यांत फार कमी पडतोच; पण स्वतः मालकाचाहि तसाच. तेथला कारभार प्रायः गड्या-माणसांकडे स्वतंत्रपणे असावयाचा. त्याप्रमाणे सह्याद्रीपलीकडच्या समुद्र-काठच्या या चिंचोळ्या पट्टीत देशावरच्या कोणत्याहि 'खाशांनी' कधी राज्ये केली नाहीत, राजधान्या बसविल्या नाहीत, किंवा ऐषआरामाकरितां बगीच्यांत घरे बंगले बांधतात त्याप्रमाणे केव्हा तरी का होईना पण हौसेने राहण्याकरितां वाडे महालहि बांधले नाहीत. तर फक्त कमावीसदाराकडून वसूल व अमल केला!

पूर्वेकडचे तोंड वाटेत प्रचंड पर्वत उभा म्हणून बंद. पश्चिमेकडचे तोंड खुले, अगदी अफाट खुले, परंतु दर्यावर मुशाफरी व वाहतुक कठिण म्हणून तेहि बंदच! तात्पर्य—अशा रीतीने दोन्ही तोंडे बंद असणाऱ्या तीस चाळीस मैल रुंदीच्या पट्टीत डांबून राहिलेल्या, व केवळ शेतकीचा व्यवसाय करणाऱ्या कोकणांतील लोकांत कोणते गुणदोष कसे उत्पन्न झाले असतील याची कल्पना कोणासहि करतां येते. पण मानसिक किंवा स्वभावगत गुणदोष कोणतेहि असले

नसले तरी इतकी गोष्ट खरी की, पूर्वी देशावरील लोकांना कोकणचे लोक राजकीय दृष्ट्या क्षुद्र व हलक्या दर्जाचे वाटत. प्रारभी प्रारभी तर ते या लोकाना पंक्तीलाहि घेत नसत. हा कडक सामाजिक बहिष्कार आता उरलेला नाही. तथापि, कोकणस्थाना स्वतःची वतनें उत्पन्न नाहीत, म्हणन त्यांना खानदानी नाही असे कट्टे देशस्थ लोक अजूनहि मानतात देशस्थ कोकणस्थामधील मिश्र विवाहाना देशस्थांची एक हरकत मनांतून असते ती अशी की, "या विवाहामुळे हे उपरे लोक आमच्या वतनांचे उगीच अशभागी होतात." असो. पुढे पुढे कोकण-प्रांताचे महत्व देशावरच्या राज्यकर्त्यांना वाटू लागले, सह्याद्रींच्या घाटमाथ्यावर किल्ले बांधले जाऊन त्यावर कायमची वस्ती झाली ठाणी बसली, कोकणच्या व देशच्या लोकांमधले दळणवळण वाढले, कोकणचे लोक घाट चढून वर जाऊ लागले, किल्लेदारी करू लागले, मामलती करू लागले, व अशा रीतीने त्यांचा राज्यकारभारात प्रवेश होऊ लागला याहि पुढे कोकणपट्टीतील आरमाराचा कारभार वाढला, यामुळे प्रथम शिवाजीमहाराजाच्या वेळी व पुढे इग्रजांच्या कारणाने कोकणाला महत्व प्राप्त झाले—त्याबरोबर कोकणच्या लोकानाहि व त्या महत्वाची परमावधी पेशवाईमुळे झाली इग्रजानी कोकणस्थांना आपले शत्रु मानल्याकारणाने, त्या महत्वाची शीग भरून गेली, व त्यांच्या राजकीय महत्वाला एक प्रकारचे कायमचे सर्टीफिकीट मिळून राहिले !

पण मला कोकणाबद्दल मनांतून प्रेम वाटते—ते मी कोकणस्थ म्हणून नव्हे तर कोकणांतील हवा, पाणी, देखावे, सृष्टिरचना, फलसमृद्धि व शांतता यांच्यामुळे. देशस्थकुळांत जन्मलो असतो तरी मी मुद्दाम कोकणांत जाऊन घर केले असते असे वाटते उलट, मी कोकणस्थ जन्मलो, व माझे गाव, घर, शेत, जमीन कोकणांत आहे, तरीहि माझ्या नित्य व्यवसायामुळे मला कोकणात जाऊन मनाजोगे भरपूर राहतां आले नाही. या जन्मात अपूर्ण राहिलेल्या मनोरथाची यादी केली तर, "कोकणांत जाऊन मनाजोगे घरठाण व आगर मिळवून त्यांत सुखाने वस्ती करणे" याला मी एक महत्त्वाचे स्थान त्या यादीत देईन, असे मला १९३५ पर्यंत म्हणतां आले असते.

पण दुधाची तहान मी ताकाने कशीतरी पुण्यांतल्या पुण्यांत प्रथम पासून भागवून घेतली. पुण्यास स्वतःच्या मालकीचे घर घेऊन त्यांत राहण्याला गेल्या-

बरोबर पहिली गोष्ट मी ही केली की अगणांत नारळी पोफळींची झाडे लावली, व एखादा ओला नारळ किंवा पोफळाचा घोस काढून सोलून खाल्ला म्हणजे कोकणांतच आहे अशी कल्पना करून मी धन्यता मानी.

देशावर राहत असतां कोकणांत असल्याचा भ्रम उत्पन्न करण्याचा हा खेळ एक वेळ इतका साधला होता की, त्याची कबुली एका परक्या गृहस्थाच्या तोंडून मिळाली. त्याचा प्रकार असा. पुतणीच्या लग्नाकरितां अंगणांत मांडव घातला होता. आंत बाहेर।अंगणे स्वच्छ स्वच्छ सारवली होती. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे पिंपळाच्या झाडाला हिरवी गार पालवी फुटली होती. आसपास केळींच्या मुळांतून पाणी वाहत होते. पोफळीच्या झाडाना नव्या पोई फुटून त्यांतील मोहोराचा नाजूक वास सकाळच्या थंड वाऱ्याबरोबर येत होता. आम्ही घरची मंडळी उघड्या अगाने स्वच्छ अगणांत जमिनीवर बसलो होतो. अशा वेळी एक स्नेही ( मेरुलिंगशास्त्री ज्योतिषी ) भेटावयास आले. गप्पा गोष्टी सुरू झाल्या व कांही निमित्ताने कोकणचे नाव निघाले. तेव्हां ते म्हणाले "येथे तरी कोकण होण्याला काय कमी आहे ! बाकी सर्व देखावा आहेच. फक्त आतां केळीच्या पानावरून फणसांचे गरे वाढून आले की झालेच कोकण !" हे ते बोलले ते केवळ देखाव्याचे वर्णन पुरे करण्याच्या हेतूने. पण त्या वेळी असा प्रत्यक्ष चमत्कार घडला की, त्या गृहस्थाच्या तोंडचे हे शब्द बोलून पुरे होतात न होतात तो घरांतून बायकांनी खरोखर केळीच्याच पानावर गरे काढून आणून आमच्या पुढे खाण्याकरितां ठेवले ! याचे कारण असे होते की, आमचे बंधु आप्पासाहेब यांना खानदेशांत फणस कधीच खावयास मिळत नसे, यामुळे उन्हाळ्यांत कधी ते पुण्यास आले म्हणजे आम्ही त्यांच्याकरितां मुद्दाम मंडईतून मिळतील तसे फणस आणतो. तसाच त्या दिवशी सकाळी आणला होता, व तो चांगला पिकलेला असल्यामुळे खाण्याकरितां नुकतांच फोडण्यांत येऊन, आम्ही गप्पा मारीत रिकामे बसलेले पाहून घरांतून आईने हे गरे पानावरून पाठविले होते. तिला काय माहीत की बाहेर कोणी गृहस्थ आला तो हेच बोलतो आहे ! मी आयुष्यांत अनेक 'पताकास्थाने' घडलेली पाहिली, त्यांतले हे एक सस्मरणीय असें वाटतें. एकाच्या तोंडांतून सहज आलेला शब्द व त्याप्रमाणे त्याच क्षणी परक्याच्या हातून घडणारी स्वतंत्र कृति, याला नाट्यशास्त्रांत पताकास्थान म्हणतात. ते एक मला कोंकणासंबंधी आठवलें म्हणून नमूद

केले आहे. तात्पर्य कोकणाविषयी मला मनांतून मोठे प्रेम असे. पण ते केव्हांहि आकांक्षेच्या पलीकडे फारसे गेले नाही, म्हणजे प्रत्यक्ष अनुभूतीत उतरले नाही !

## ( २ ) केळकर घराण्याची कुळकथा

असो. केळकर घराण्याचींचं काय पण कोणत्याहि कोकणस्थ घराण्याची कुळकथा दोनशे वर्षांच्या पूर्वीची मिळणें कठीण हे वर सांगितलेच आहे. पण कित्येक वेळां मी थोडा विनोद करीत असतो व 'झोकाने' तो साधून गेल्यास सफल होतो ! कुळकथेच्या गोष्टी निघाल्या असतां मी ओठ दाबून हंसे येऊं न देतां म्हणतो—"शिवाजीमहाराजांच्या वेळी आमच्या कुळांतला एक पूर्वज कोकणांत होता." हें ऐकणारास शिवाजीच्या नांवामुळे प्रथम दर्शनी असा भास होतो की, केळकर घराणे ऐतिहासिक आहे. पण अशा रीतीने ऐतिहासिक नाही असे घराणे तरी कोणते असणार ! आणि शिवाजी महाराजांच्या वेळीचसे काय, पण श्रीराम व श्रीकृष्ण हे पुरुष ऐतिहासिक असले तर त्यांच्याहि वेळी माझे कोणी पूर्वज कोठे तरी असणारच. त्यांना त्या वेळी केळकर हे नांव नसेल, ते दक्षिणेत नसून उत्तरेकडे किंवा कदाचित ( मंडलिकांच्या उपपत्तीप्रमाणें ) इजिप्त किंवा दक्षिण आफ्रिकेंतहि असतील, पण राम व कृष्ण यांशी ते समकालीन असणारच ! अर्थात हा विनोद झाला. पण कोकणस्थांपेक्षां देशस्थ लोकांत कुळकथेचा वृत्तांत अधिक प्राचीन काळापर्यंत मिळतो ही गोष्ट खरी. आमच्या केळकर घराण्यासंबंधानें तीन पिढ्यांपूर्वीची माहिती मिळणे कठीण असे मला वाटत होते. परंतु पांच सहा वर्षांपूर्वी आमच्या चुलत भावाने कोकणच्या घरच्या माळ्यांत सांपडलेले कागद मला आणून दिले ते वाचून पाहतां या वृत्तांताची मजल पांच सांत पिढ्यांपर्यंत स्थूलपणे जाऊ शकते.

केळकर घराण्याचें मूळ गांव ढोकमळे असा पत्ता लागतो. तेथून इतर शाखा कोठे कोठें गेल्या माहीत नाही. पण आमची शाखा मात्र वानिवडे येथे आली हे निश्चित. वानिवडे हे गांव देवगडच्या बंदरापासून पूर्वेस सुमारे तीन साडेतीन कोस आहे. जमिनीवरचा पायरस्ता जामसंडे, कालवी, टेबवली या गांवावरून जातो. पण मुख्य वाहतुकीचा रस्ता खाडीचा. देवगडचे बंदर जिच्यामुळें बनलें आहे तीच ही खाडी. अनेक वळणें घेऊन वानिवडे गांवापर्यंत गेल्यावर

तिचे दोन फाटे होतात. उत्तरेकडचा फाटा लहान असून तो आमच्या गांवापलीकडे अवघ्या दोन मैलाचे आंत डोंगराशी भिडतो व थांबतो. दक्षिण अंगचा फाटा मात्र सुमारे आठ मैलपर्यंत आंत जातो. या मोठ्या फाट्याने लहान होड्या केव्हांहि वरपर्यंत जातात. धाकट्या फाट्याने भरतीच्याच वेळी व त्याहि फक्त होड्याच जाऊ शकतात. या दोन फाट्यांच्या बरोबर दुबेळक्यांत डोंगराच्या उतारावर वानिवडे हे गांव वसलेले आहे. गांवाला सपाट जमीन अशी मुळीच नाही. यामुळे नारळी-पोफळीची 'आगरे' नाहीत. फक्त आंब्या-फणसाची झाडें आहेत. गांवांत गोड्या पाण्याच्या विहिरी काढलेल्या नाहीत यामुळे ठराविक पाळीने, मिळेल त्या पाटाच्या पाण्यावर गुजारा करावा लागतो. गावांत पूर्वी पांच पन्नास घरे होती पण आता गांव अगदी मोडकळीस आला आहे.

गांवची रचना सामान्यतः अशी आहे. खाली खाडीला लागून बांध बांधून तयार केलेली भातशेतीची खारी जमीन. यानतर बिनखारी अशी भातशेतीची पट्टी. त्यावर गांवठाणांतील घरे व लहान लहान परडी. त्यावर आंबे फणसाची खासगी मालकीची झाडे, जळणाजुळणाच्या लागी असणारा झाडझाडोरा व वरकस जमिनीची दळी. त्यावर ज्याचा माथा पाण्याने वाहून गेलेला आहे असा डोंगर-कांठ; व तो चढून गेल्यावर कातळाचे पठार. गावची सीमा या पठारावर बरीच लांब गेलेली आहे व ग्रामदेवतांची मुख्य देवळे याच पठारावर आहेत. हा गांव या पठारापलीकडून आलेल्या लोकांनी बसविला. मूळ तो खाडीकडून न वसवितां डोंगराकडून खाली खाली वसवीत आणला. सर्वांत जुन्या वस्तींचे अवशेष वरच्या बाजूकडेच सांपडतात

गांवची रचना अशी असल्यामुळे खाली खाडीपासून थेट वर डोंगरमाथ्यापर्यंत चिंचोळ्या व लांबट जमिनीच्या पट्ट्या एकाच मालकाच्या आढळतात. याचे कारण असे की, मध्यतरी कोठे एकाच ठिकाणी मालकीची सर्व जमीन असल्यास कुटुंबाचा स्वावलंबी संसार चालणे शक्य नव्हते. नुसती खारटण खाजणी जमीनच असली तर तीत घर बांधतां येत नाही. नुसत्या भातशेतीत घर बांधता आले तरी ती जमीन घर बांधून अडविणे फायद्याचे नसते. शिवाय भातजमिनीच्या मशागतीला कवळ पाला पाचोळा लागतो तो डोंगरी जमिनीतच मेळावयाचा. नुसत्या गांवठाणची जमीन असली तर तीत घर बांधण्याची सोय

खरी, पण जोडीला शेतजमीन नाही तर खावे काय? त्याच्याहि वरची जमीन नुसती घेतली तर तीत घर बांधता येत नाही पाणी नाही व शेती तर नाहींच नाही अशा रीतीने या चारपांचहि प्रकारांची थोडथोडकी तरी जमीन प्रत्येक कुटुंबाला आवश्यक असते पहिल्या वसाहतीत जमीन वाटून घेतली तेव्हां ती मोठ्या प्रमाणावर असणार, पण पुढे दर पिढीला वाटण्या झाल्यास जमिनीची लांबी खाडीपासून वर डोंगरमाथ्यापर्यंत तीच, परंतु आडवी रुंदी मात्र प्रथम निमी नंतर चौथाई अशा क्रमाने होत जाऊन अखेर प्रत्येक तक्षिमेच्या वाट्याला जमीन किती थोडी उरली असेल हे सहज लक्षात येण्यासारखे आहे.

मला कुळकथेचा जो कागद मिळाला आहे तो एका भाऊबदकीच्या भांडणांतील निवाडा, पंचामार्फत केलेला, असा आहे तक्षिमाचा वाद होता तो अधिकाऱ्यांकडे जाऊन त्यानी पंच नेमले पंचानी करीणे लिहून घेतले, साक्षीपुरावे कागदपत्र पाहिले, व वादींची तक्रार खरी नाही असा निकाल दिला या वादांत बहुधा सगळ्या गांवच्या जबान्या झाल्या असे दिसते. त्यात केळकर घराण्यांतील विद्यमान ( शके १७०९ सन समान समानीन मया व अलफ ) सर्व पुरुषाच्या जबान्या घेतल्याच, पण इतर अनेक गावकरी वतनदार यांच्याहि जबान्या झाल्या आहेत

या साक्षीदाराची वयं कागदांतून दिली आहेत, ती सर्व खरी म्हणजे नक्की आहेत किंवा अंदाजी व उगीच फुगविलेली आहेत हे सांगणे कठीण. कारण मुद्दा वहिवाटीचा होता, व जो कोणी वहिवाटीचा पुरावा जितका जुना सांगेल तितका अधिक ग्राह्य अशा समजुतीने कांही अतिशयोक्ति होण्याचा संभव. पण सर्वांनीच खोटें सांगितले असेल असे तरी कसे म्हणावे? निदान कांही सूट घालून, बाद करून बाकी वय खरे धरले तरी कोणी ७० च्या पुढे, कोणी ८० च्या पुढे व एक दोन ९० च्या पुढे अशा वयाचे लोक पंचायतीपुढे आलेले दिसतात. एकाच लहानशा गांवांत इतक्या मोठ्या वयाची माणसे जर खरींच असली, तर कोकणच्या भागांत त्या वेळी आरोग्य कशा प्रकारचे नांदत होते याची कल्पना करितां येईल. साक्षीदारांनी सांगितलेल्या हकीकतीत पुढच्या पुढच्या वहिवाटीसंबंधाने व भोगवट्यासंबंधाने फरक पडलेले दिसतात. परंतु दंतकथेने चालत आलेली मूळ पुरुषाची म्हणजे वानिवड्यास झालेल्या पहिल्या वसाहतीची त्यांनी सांगितलेली हकीकत बहुधा एकच आहे.

या हकीकतीवरून असे दिसते की, आमच्या केळकर शाखेचा मूळ पुरुष बाळंभट हा ढोकमळ्याहून वानिवड्यास आला येथे मूळचे रहिवासी घाडीधुरी मिरासी या उपनावाचे पूर्वी राहात होते बाळभट आला तो प्रथम सड्यावर ( डोंगराच्या माथ्यावरील माळावर ) देवीच्या देवळाजवळ राहिला बाळंभटाच्या अंगी कोणत्या तरी प्रकारची आकर्षक शक्ति होती कारण घाडी हे म्हणू लागले, "बाळभट, आता वानिवड्यासच कायमचे रहाना" ? पण रहावे कोठे व कोणाच्या आधारावर ? व वृत्ति कोणती स्वीकारावी ? याची पचाईत पडली तेव्हा घाडी यांनी त्याला गावामध्ये महाजनकीचे वतन देतो म्हणन सांगितले व घर बाधण्यास जागा-हि दिली पण या गावी पाण्याची पचाईत होती. म्हणून बाळभट याने सुमारे एक मैलावर ओढ्याला पाट फोडून वानिवड्यास आणला. (घाडी मिरासी यांनीहि असाच एक पाट बांधून आणला आहे ) पण थोड्या खर्चात व थोड्या मेहनतीने पाट बांधून आणता येण्याजोगा असल्यामुळे तो बांधून आणून स्वतत्र व्हावे असे बाळभटास वाटले व त्याप्रमाणे त्याने केलेहि हा पाट अजून वाहतो घाडी मिरासी यांनी कांही शेतजमिनीहि बाळभटाला उपलब्ध करून दिल्या,आणि बाळभट व त्याचे मुलगे यांनी कांही नवीन शेतेहि पाडली उपरिनिर्दिष्ट करीण्याच्या कागदपत्रातून 'मुळवस' 'चरी' 'हुकूम' 'हेद भाटले' 'भरड' इत्यादि आमच्या नव्या जुन्या शेतांची नांवे आढळतात तीच अजून चालत आली आहेत यांतील कांही आमच्या खाजणी शेतांची नावे आहेत.

'खाजण' म्हणजे दगडी किंवा चिखलमातीचा बाध घालून खाडीच्या कडेला भात पिकविण्यासारखी केलेली जमीन अशा जमिनीत तेवरी या नांवाचे खुरटे झाड वाढते व त्याचे रान बनते म्हणून खाजण जमीन तयार करावयाची तर प्रथम ही झाडे तोडावी लागतात बाळभट व त्याचे मुलगे यांनी किंवा त्यांच्या पुढील पिढीने खाडीच्या कडेने असलेले हे तेवरीचे रान तोडून जमीन मोकळी केली, व नतर बाध बांधून शेती केली ही खाजणी शेती वगळली तर गोड्या पाण्याची अशी शेती केळकरांची फारच थोडी असती खाजणे तयार करणे हे काम मोठ्या कष्टाचे व खर्चाचे, परतु ते या लोकांनी केले म्हणूनच पुढील पिढ्यांचा तेथे निर्वाह झाला. खाजण जमिनीतील तेवरी नावाच्या झाडावरून कुळकथेसबधी एक गोष्ट सुचली, ती अशी की, वानिवड्यांत केळकर यांना या नांवाशिवाय महाजन व तिवरेकर अशी आणखी दोन नांवे चालतात. पैकी

महाजनकी हा गांवच्या कारभारापैकी एक कारभार किंवा मानाची जागा यावरून महाजन हे नांव सहज समजते. महाजनकीचा मान व महाजन हें आडनाव पुष्कळ गांवी आढळते, पण तिवरेकर या नांवाची उपपत्ति सहसा लागत नाही. केळे या नांवाचे गावहि आहे पण तेवरीची राने तोडून खाजण जमिनीची मोठी शेती ज्यानी केली त्या केळकरांना या कृषिविषयक पराक्रमावरून तेवरीकर, तिवरेकर असे नांव क्रमाने मिळाले असावे असाहि तर्क कोणी कोणी करतात. पण तिवरे नावाचे रत्नागिरीकडे गावच असल्यामुळे वरील कृषिविषयक उपपत्तिहि खरी वाटत नाही.

असो. बाळंभटाला चार मुलगे होते. त्यांची नांवे गणेशभट, विसभट, फटभट, पाणभट. यापैकी मधल्या दोन मुलांचा वश पुढे चालला नाही. गणेशभट व पाणभट याचा वंश चालला. पाणभट याचा मुलगा कानभट, त्याचा बाळभट, व त्याचा बापूभट. अशा चार पिढ्या वानिवडे येथील मूळवसाहतीनतर झाल्या. बापूभट हा वारला तेव्हा त्याची बायको सती गेली; व हा प्रकार 'कान्होजी आंग्रे याच्या कारकीर्दीत घडला,' असे करीण्यांत लिहिले आहे. कान्होजी आंग्रे याची कारकीर्द सभाजी महाराजांच्या अखेरीस सुरू झाली अर्थात् त्यापूर्वी चार पिढ्या म्हणजे सुमारे शे-पाऊणशे वर्षे मूळ बाळभट हा वानिवड्यास येऊन राहिला असे अनुमान निघते. म्हणजे तो सुमार सोळाव्या शतकाची अखेर किवा सतराव्या शतकाची सुरुवात हा काळ असावा. या करीण्यात असाहि उल्लेख आढळतो की केळकर घराण्यापैकी कृष्णाजी शामराज नावाचा गृहस्थ कान्होजी आग्रे याच्या नोकरीत होता व तो 'हिमायती' म्हणजे कान्होजीचा ऋणानुबंधी किंवा त्याजवर वजन असलेला असा होता; व त्याचे प्रत्यंतर हेच की त्यानें वानिवड्यास येऊन तक्षिमेचा वाद घालून एका भाऊबंदास घरांतून बाहेर काढून लावले व आपण ती जागा बळकाविली ! कान्होजी याच्या उल्लेखाचे हे आणखी प्रत्यतर आहे. शिवाय या करीण्यांत 'बच्याजी विश्वनाथ सुभेदार' असे एका अधिकाऱ्याचे नांव आलेले आहे. तसेच 'महादाजी रघुनाथ सुभेदार' असे आणखी एक नाव आलेले आहे. वरीलपैकी कृष्णाजी शामराज याचा उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रांत सांपडण्याचा सभव दिसतो. आणि वर दिलेल्या दोन सुभेदारांच्या कारकीर्दीची पक्की वेळ कळल्यास कालगणनेचे तणावे अधिक पक्के होतील. भारत इतिहास सशोधक मडळाच्या

शके १८३५ च्या इतिवृत्तामध्ये असे आडळते की, ( १ ) अताजी रघुनाथ केळकर हा अजनवेल येथे शके १५९१ पासून १५९८ (सन १६७६) पर्यंत अधिकारी होता. ( २ ) हरि बल्लाळ केळकर याने सन १८०२-३ चे सुमारास लहानसे बड केले होते. ( ३ ) रामचद्र महादेव नगरकरातर्फे पाडुरग लक्ष्मण केळकर हा अजनवेल येथे कारभारी होता

१९३१ साली मी कोकणात जाऊन स्वतःच्या घरी आठ-दहा दिवस मुक्काम केला. त्यामुळे कोकणासबधी आणखी कांही माहिती मला मिळवितां आली. त्यांतील एक दंतकथा अशी आहे. आम्हा केळकरापूर्वी वानिवड्यास घैसास नांवाचे एक गृहस्थ राहात होते. ढोकमळ्याहून आमच्या घराण्याचा पूर्वज निघाला तो फिरत फिरत या घैसासांच्या घरी पाहुणा म्हणून येऊन उतरला. चार दिवस राहिल्यावर त्याचे रूप व चालचलणूक पाहून घैसास याला अशी इच्छा झाली की, आपली मुलगी देऊन या पाहुण्याला घरजांवई करून घ्यावे. परंतु पाहुण्याने घरजावई होण्याची कल्पना अपमानास्पद म्हणून नाकारली व आणखी कोठे तरी जावे म्हणून निघाला. पण कर्मधर्मसयोगाने गांवच्या शिवेवर त्याला फुरसे चावले. तेव्हा तो परत येऊन देवीच्या देवळात पडला. सुदैवाने त्याच्या अगांतील विष उतरले. तेव्हां गांवाच्या शिवेवर फुरसे चावणे हा गांव सोडून जाण्याला ईश्वरी प्रतिबध व विष उतरणे ही गावात राहण्याची ईश्वरी सूचना, अशी त्याची भावना झाली; व पूर्वी नाकारलेली गोष्ट त्याने आतां आपण होऊन घैसास याना सागून कबूल केली. त्याप्रमाणे घैसासांनी आपली मुलगी त्याला देऊन घरजांवई केला. आणि आपली सर्व वतनवाडी त्याच्या स्वाधीन केली. अशा रीतीने हा मूळपुरुष वानिवड्याचा रहिवासी आणि वतनदार झाला. मात्र घैसास घराण्याचे पुढे काय झाले हे ही दतकथा सांगत नाही. कल्पना अशी करतां येते की घैसास नांवाचा हा एकच गृहस्थ व त्यालाहि एकच मुलगी असेल तर वतनदारीचा एक वृक्ष वठला व दुसरा त्याच्या जागी रुजला असे घडले असेल. केळकर घराण्यांतील तक्षिमांच्या वादाच्या जुन्या कागदपत्रांचा उल्लेख मी वर केला आहे त्यांत या दंतकथेतील हकीकत नाही. कसेहि असो. तूर्त घराण्याच्या मूळ पुरुषासंबंधी याहून अधिक माहिती मिळत नाही एवढे खरे.

## ( ३ ) एक टळलेलें संकट

मी कोकणात आपल्या घरी आठ-दहा दिवस राहिलो यामुळे गांवची सर्व स्थिति मला पहावयास सापडली. प्रथम मला कोकणांत करमणार नाही असे वाटले होते. परतु तसे कांही झाले नाही. इकडे तिकडे हिंडण्या-फिरण्यात सहज काळ गेला सकाळी उठून हिंडन फिरून यावे. एखादा फणस पिकलेला मिळवून तो फोडून खावा. शेतांतून इकडे तिकडे फिरावे. थड पाण्याची आघोळ करून जेऊन झोप काढावी. तिसरे प्रहरी उन्हाच्या वेळी कोठे तरी झाडाच्या छायेखाली बसावे, व भरतीचे पाणी असल्यास होडी काढून खाडी-तून हिंडावे असा क्रम सुरू होता. गांवाजवळ खाडीचे दोन भाग होतात. एकीला बापरड्याची खाडी असे म्हणतात. हे पात्र लहान असून सुमारे एक मैलावर तिला बधारा घालून त्याचे पाट शेतकऱ्यांनी नेले आहेत तेथपर्यंत भरतीला होडी जाते; व ती जागा उन्हाळी भातशेते, आंब्याफणसाची झाडी, व बाधावरून सरळ रेषेत लावलेल्या माडाच्या रागा यामुळे मोठी रमणीय झालेली आहे. खाडीच्या दुसऱ्या भागाला ताम्हन्याची खाडी असे नाव आहे. खाडीच्या या दोन शाखांच्या सगमाजवळ नदी थोडीशी खोल आहे. तेथून पुढें पात्र थेट पश्चिमा-भिमुख व सरळ असल्याने भरतीच्या वेळी पाणी बरेच फुगून लाटा येतात, आणि उलट सुकतीच्या वेळी पाण्याची गति पश्चिमेला व जोरदार वाऱ्याची गति पूर्वेला, या द्वंद्वामुळे तर लाटा फारच उच उडतात व नव्या माणसाला पाण्याची भीति वाटते. यंदा माझ्या या मुक्कामात स्वतः मला नव्हे पण घरच्या इतर कांही मंडळीना एक प्रसंग खाडीच्या या भागात मोठ्या सकटाचा गेला त्याचा प्रकार असा.

घरी पुतण्याच्या मुजीनिमित्त बरीच मंडळी जुळली होती. त्यांत मोटारी-मध्ये न बसलेल्या अशा कांही कोकणी बायका होत्या. आम्ही पुण्याहून मोटार घेऊन कोकणांत गेलो होतो ती दीड मैलावर या खाडीच्या दक्षिण तीराला सोडून ठेवली होती. तेव्हां सहज अशी कल्पना निघाली की तिसरे प्रहरी रिकामपणी होडी काढून कोणीतरी या मंडळींना घेऊन मोटारीपर्यंत जावे, व तेथून मोटारींत बसून मंडळींनी देवगडापर्यंत जाऊन फेरी मारून यावे. याच दिवशी तिसरें प्रहरीं ओहोटी जोरगतीची आणि देवगडच्या बंदराकडून वारा खूप जोराचा उठला होता.

पण ही गोष्ट न जुमानता माझे दोघे चुलत बंधु व माझे कुटुंब, घरच्या इतर चार बायका घेऊन होडीतून निघाले ओहोटी असल्यामुळे खाड्याच्या संगमापर्यंत होडी मजेत गेली. पण संगमापलीकडे मोठ्या पात्रांत ती शिरली तेव्हा वारा पुढे जाऊ देईना व ओहोटीचे पाणी तिला मागे येऊ देईना. यामुळे ताजेची काठी किंवा वल्ही यांचा काही उपयोग होईनासा झाला. इतक्यात होडीला एका बाजूला बांधलेल्या उलंडीच्या दोऱ्या एका टोकाला सुटून तिची लाकडे मोकळी झाली. 'उलंडी', 'उडी' म्हणजे होडीच्या एका बाजूला काटकोन साधून समांतर दोन बाकदार लाकडे बांधतात, व त्याच्या टोकांना एक जाड लाकूड बांधून होडी-सुद्धां सर्वांचा एकजीव केलेला असतो. या चौकटीमुळे होडीचा तोल पाण्यांत संभाळला जातो व ती सहसा उपडी होत नाही. पण वर सांगितलेल्या वाऱ्या-पाण्याच्या युद्धात ही उलंडी सुटली म्हणजे कामच झाले! असो. उलंडी सुटतांच होडी गोते खाऊ लागली व आंतील सर्व माणसे भिऊन गेली. पण दैवाची पूर्व-सूचना म्हणूनच की काय बंदरातून होडी काही अंतर गेल्यावर घरच्या शेतांत दुरून गडी दिसला त्याला सहज हांक मारून होडीत घेण्याची बुद्धि माझ्या चुलत भावाला झाली होती उलंडी सुटलेली पाहतांच त्याने खाली उडी घेतली, व पोहत पोहत पुनः दोरीने उलंडीची विसकटलेली लाकडे बांधण्याचा तो प्रयत्न करूं लागला परंतु तो कसचा साधतो? अशा रीतीने उलंडीची लाकडे धरून तो दहावीस हात पोहत गेल्यावर मध्येच वाळूच्या एका टेकाडाला त्याचे पाय लागले त्याबरोबर त्याने जोराने पाय रोवून होडी आपणांकडे ओढून घेतली. एवढ्यानेहि फार वेळ काम भागले नसते पण इतक्यांत सुदैवाने दुरून दुसरी एक मोठी शीड लावलेली होडी चालली होती तिला ओरडून त्याने हांक मारली व तिनेहि आपली गति बदलून बचावाला धांव घेतली. मग धाकट्या होडीतील माणसे या मोठ्या होडीत बसून पैलतीरास गेली. अर्थात् उघडा हिशेब असा होता की, हा घरचा गडी सहज बरोबर घेतला गेला नसता, किंवा ती दूरची होडी आयत्या वेळी दिसली नसती, तर या होडीतील माणसांना त्या-दिवशी जलसमाधिच मिळावयाची! देवगडास मी स्वतः दुसरे दिवशी जावयाचे ठरवले होते आणि ही फक्त बायकामंडळीच मिळून मौजेने जाणार होती म्हणूनच मी होडीत नव्हतो. पण अनुभवापेक्षां संकटाची कल्पनाच अधिक भयप्रद असते, त्याप्रमाणे बायका माणसे परत येण्यापूर्वी तो आमचा गडी परत येऊन हकीकत

सांगू लागला तेव्हां इतक्या माणसांचा आज पुनर्जन्म झाला असे वाटले व ही सर्व माणसें फिरून दृष्टीस पडेपर्यंत अंगाचा थरकाप गेला नाही. खाडीच्या या भागांत असले अपघात एकादे वेळी होतातहि. पण बापरड्याकडील खाडी वाऱ्यापासून सुरक्षित व तिचे पात्रहि लहान. यामुळे बरोबर गडी किंवा गाभीत न घेतांहि एकट्याने होडी काढून जावे व डेक्कन कॉलेजांत असतांना होडी वल्हवीत बेटाकडे जाण्याचा जो आनंद तो येथे भोगावा अशी ही छोट्या खाडीची जागा आहे.

## ( ४ ) वानिवड्याची कांहीं माहिती

गांवी आठ दिवस मुक्काम पडल्यामुळे त्यासबंधी थोडीशी तपशीलवार माहिती मिळवितां आली ती अशी गांवची एकदर जमीन २३२५ एकर आहे. पैकी १२०० एकर बिनदस्ती व ११०० एकर दस्ती, अशी तिची वांटणी आहे. या ११००एकरांपैकी दोनशे एकर जमीन इतकी सुमार आहे की तिला एकरी दोन आण्याइतकाच सारा आहे. दुसरी ४०० एकर जमीन अधिक बरी. ती सुमारे ४ आणे शेतसाऱ्याच्या पात्रतेची आहे. सुमारे १०० एकर जमीन भातशेतीला लायक अशी आहे. १०० एकर जमीन वरकडवजा असून त्यात मधून मधून कडधान्य पिकते. घरभाट पोटखराबा अशा प्रकारची जमीन सुमारे १०० एकर आहे भातशेतीच्या १०० एकरांत खाजणांच्याहि जमिनीचा समावेश होतो. गांवच्या एकदर उत्पन्नाचा हिशेब करतां सुमारे ८०-९० खडी भात पिकते. १० खडी नाचणी, १० खडी कडदण, १० खंडी मिरची अशी इतर पिके पिकतात. गांवची लोकसंख्या अदमासे १००० (गांव व वाड्या मिळून) पैकी अंदाजे २५० माणसे प्रायः मुबईस रोजगारावर गेलेली असतात. आणि बाकी सुमारे ७५० माणसे गांवी असतात. पण एवढ्यांचाहि चरितार्थ गांवच्या धान्यावर होत नाही. यामुळे जवळ जवळ ५० खडी धान्य बाहेरून आणावे लागते, व हे धान्य म्हणजे रगूनच्या हलक्याच्या गिरणीत भरडलेले तांदूळ ! कोंकणी दुकान म्हटले म्हणजे त्यांत मुख्य माल रगूनच्या हलव्याचे गोण. वरील हकीकत वाचली म्हणजे कोकण ही काय चीज आहे हे ध्यानांत येते.

आमच्या घरच्या तीन तक्षिमा मिळून सुमारे ३५ रुपये शेतसाऱ्याची जमीन आहे. हल्ली त्यापैकी घरी मुळीच कोणती जमीन केली जात नाही. तसे करण्याला मनुष्यबळ नाही व इतर साधनेहि नाहीत. हल्ली आमच्या जमिनीचा सगळा खंड भरपूर वसूल झाला तर सुमारे ६० रुपये नक्त व १०० रुपये किंमतीचे धान्य,

इतकेंच उत्पन्न येईल व यातून शेतसारा व किरकोळ खर्च वजा केला तर तीन तक्षिमांचें मिळून सुमारे १०० रुपये उत्पन्न येईल. म्हणजे प्रत्येक तक्षिमेच्या वांट्याला सुमारे ३०–३५ रुपये आले. पैकी एका तक्षिमेचा मालक आमचा चुलतभाऊ दत्तात्रय केशव केळकर हा एकटाच असल्यामुळे, सर्वांत अधिक श्रीमंत तो ! दुसऱ्या तक्षिमेत सदाशिव व दामोदर हे दोघे भाऊ, यामुळे प्रत्येकाला १७-१८ रुपयांचे उत्पन्न येईल तिसऱ्या म्हणजे माझ्या तक्षिमेत फिरून तीन शाखा. म्हणजे प्रत्येक शाखेच्या वांटणाला सुमारे १२ रुपये येतील. पैकी वडील शाखेचे प्रतिनिधि विठ्ठल व शिवरामभाऊ. अर्थात् प्रत्येकाच्या वांट्याला सुमारे सहा रुपयांचे उत्पन्न ! मधल्या शाखेच्या पुढच्या पिढीचे प्रतिनिधि ती. आप्पासाहेब यांचे चार मुलगे म्हणजे प्रत्येकाच्या वांट्याला तीन रुपयाचे उत्पन्न ! आणि सर्वांत लहान शाखा माझी. तीत दोन मुलगे. यामुळे त्यापैकी प्रत्येकाला सहा सहा रुपये उत्पन्न ! ही उत्पन्नाची वांटणी पाहिली म्हणजे कोकणच्या वैभवाची खरी कल्पना येते ! आमच्या तीन तक्षिमांची मिळून घराची जागा सुमारे ५००० स्क्वेअर फूट भरेल. तेव्हां त्या बाजूनेहि वैभव दिसून येणारेंच आहे. आणि मिजासीची मिळकत म्हणजे पांच चार फणसांची व पाच चार आंब्यांची झाडे !

आणि जी आमची स्थिति तीच इतरांची. जे लोक तुरमुडी देऊन, निर्वाणपदावर उभे राहिल्याप्रमाणे दिवसभर खपून, घरची शेती घरीच करतात त्यांचाच काय तो गुजारा असा होतो. पण तो गुजारा म्हणजे काय हे मी डोळ्यांनी पाहिले म्हणून त्याचे वर्णन न करणेंच बरे. अशा या विपन्नावस्थेची कहाणी आमच्या पुढच्या पिढीच्या मुलाच्या कानावर नित्य जात असल्यामुळे त्यांना कोकणाकडे ढुकून पाहण्याची इच्छा होत नाही हे स्वाभाविकच आहे. आणि मी जाण्याची इच्छा करतो याचे झाले तरी खरे मर्म असे आहे की तिकडे गेल्यास चार दिवस थारेपालट होतो, हवापाणी, देखावा याची मौज वाटते, व सर्वांत मोठें हे की सढळ हाताने खर्च करून त्यांतल्या त्यात जे सुख तिकडे मिळेल ते मिळविण्याची ऐपत मला आहे म्हणून ! त्या साली मी कोकणांत अनेक गावे फिरण्याच्या उद्देशाने बराच खर्च करून भाड्याची मोटार काढून, कोकणांतील देवींचे दर्शन कुटुंबाला घडवावे व पूर्वजांचे ठिकाण जन्मांत एकदां तरी दाखवावें म्हणून तिला घेऊन गेलो. पण तोहि कदाचित् थोडा जुलूमच झाला. सत्तेची मोटार होती तरी एकाहि मुलाने कोकणांत जाण्याची हौस दाखविली नाही. आजपर्यंत आमच्या घरी एक

चुलतभाऊ सहकुटुंब, व एक विधवा चुलती ही राहत यामुळे घरांत जाग तरी होती. पण पुढे चुलती वृद्ध झाल्यामुळे तिला तिचे मुलगे देशावर राहण्याकरितां कायमचे घेऊन गेले, व चुलत भावाच्या मुलाची शिक्षणाची गैरसोय म्हणून, ( त्याच्या वाट्याची शेतजमीन आमच्या तीन तक्षिमांच्या दुप्पट तिप्पट असता ) त्यानेंहि तेथून बिऱ्हाड हलविले, व वसुलापुरत्या वानिवड्यास मधून मधून खेपा घालूनच तो यापुढे काम भागविणार. तेव्हा घरच्या देवांचे काय करावयाचे हा प्रश्न सहजच निघाला तूर्त गांवच्याच एका माणसाला काही 'देऊचे' करून देवांच्या डोक्या-वर पाणी घालण्यास कबूल करविले आहे. पहावे, प्रत्यक्ष काय घडते ते. घरचे देव उचलून आणावयाचे तर येथील देव्हाऱ्यात त्यांच्यापुरती जागा आहे. आणि आम्ही सर्वात वडील शाखेचे म्हणून ते उचलून आणणार झालो तर आम्हास कोणी नको म्हणणारा नाही. कोकणचे देवहि आतां मवाळ झालेले असून देशा-तर घडविल्याबद्दल आम्हास शिक्षा करणार नाहीत ! पण वाटते की देवाच्या निमित्ताने तरी घर दिवसांतून एक दोन वेळ उघडले जाईल. नाहीतर उदीर घुशी साप यांचीच ती जागा होऊन बसेल.

कोकणांत बसल्या बसल्या या कोकणी गावची स्थिति कशी सुधारेल याचा मी सहज विचार करीत होतो. पण विशेष उपाय सुचला नाही. गावची स्थिति सुधारणे याचा अर्थ जागच्या जागी उत्पन्न वाढणे असा केला तर मग सुखाच्या इतर गोष्टींचा विचार. पण हे उत्पन्न वाढण्याचा फारसा संभव दिसत नाही. रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर देवगड तालुक्याची स्थिति भातशेतीच्या दृष्टीने कुलाबा जिल्ह्यासारखी नाही. भातशेतीची जमीनच ऐनजिनसी थोडी. कारण एका बाजूला डोंगराळ प्रदेश म्हणून वरकस जमीनच पुष्कळ आणि दुसऱ्या बाजूस खाड्या फार म्हणून खारटण खाजण पुष्कळ. या दोन गडांतरातून उरेल ती गोडी भातशेतीची जमीन. वरकस जमीन दहा एकर असली तर दर वर्षी त्यांतील फार तर एक दोन एकरच लागवडीस येऊं शकते. ती बरीच वर्षे पड टाकावी लागते. दरसालची लागवड तिला खपत नाही. पण या जमिनीचा एक गुण इतका तरी खचित की ती ठराविक पीक देते. मग ते थोडे कां असेना व कडधान्याचे कां असेना ! पण खारटण जमिनीची गोष्ट वेगळी. ती भात-शेतीला तयार करण्याकरितां आधी खाडीकाठी बांध बांधून तिची बंदिस्ती केली पाहिजे. अर्थात् ती बऱ्याच खर्चाची गोष्ट असते. पण याहून दुसरीं दोन

गंडांतरे आहेत एक असे की आवसे—पौर्णिमेच्या जोराच्या भरतीने बांध कोठे-तरी फुटण्याचा संभव असतो; व लहानसे का होईना भगदाड भरतीच्या वेळी पडले की पाण्याच्या उंचीखाली जितकी जमीन असेल तितकी सगळी अर्ध्या दिवसात खाऱ्या पाण्याने भरून जाते. आणि मग एक वर्षभर थांबून, पुनः बांध घट्ट करून, गोडे पाणी पावसाळाभर खेळवून काढून द्यावे, तेव्हां ती जमीन लागणीला तयार व्हावयाची वास्तविक बांधावर नेहमी नजर असेल तर आवसेपौर्णिमेच्या जोरगतीनेहि बांध फुटू शकणार नाही. बांध फुटण्याचे कारण असे असते की, चिखलात राहणारे खेकडे वगैरे प्राणी नेहमी बांध पोखरीत असतात व त्यात भोके पाडीत असतात ती नजरेस येतांच तेथे गुळी म्हणजे खाडीतील चिखल व दगड घालून बंद केली तर मग त्यांत पाणी शिरत नाही. पण कोणाचे लक्ष न जाऊन आतून बांध पोखरला गेला म्हणजे पाण्याच्या जोराने तो ढासळू शकतो. पाण्याच्या काबूतील सगळे सखल क्षेत्र कोणा एकाच्याच मालकीचे असले तर तो बांधावर नेहमी नजर ठेवतो पण त्यांत वांटण्या होऊन किंवा इतर कारणांनी निरनिराळे मालक झाले म्हणजे "त्याचे ते माझे नव्हे" असे होऊन हयगय होते. सहकारितेने प्रयत्न होत नाही यामुळे दोनशे हात बांध शाबूत असून तो चारच हात फुटला तरी सगळी दोनशे हात बांधाखालची जमीन खाऱ्या पाण्याने भरून जाते.

त्या वर्षी ही स्थिति मी प्रत्यक्ष पाहिली. घराखाली खाडीलगत खाजणाचा मोठा पट्टा आहे तो दर भरतीला तुडुंब भरून दुसरी खाडीच असा भासू लागे. मी या पट्ट्यातील निरनिराळ्या मालकांना सांगून पाहिले, व असेहि म्हणालो की "तुम्ही एकदां सगळे मिळून बांध बांधा आणि त्यावर टेहेळणी ठेवण्याचा एक वर्षाचा खर्च मी तिऱ्हाईत म्हणून देईन आणि मग काय होते ते तर पाहू." पण शेतीचे क्षेत्र व त्यालगत असणाऱ्या बांधाची लांबी ही लक्षांत घेऊन सर्वांना सारखाच खर्च येईल किंवा सारखीच मेहनत पडेल असे समीकरण त्यांना सांपडेना. याचा अर्थ त्यांना इच्छाच होईना असा मला तर दिसला. आमच्या गांवाजवळ ही स्थिति, पण लगेच एक मैलावर बापरड्यास पाहिले तर बांध इतके भक्कम की त्यांना लागून आंतल्या बाजूला एकरोगणती भातशेती. देशावर भर चैत्रमासी शेतांत गवताची काडीहि कोठे दिसावयाची नाही, पण पाटाच्या पाण्याने केलेली किंवा धूळवाफेत बी पेरून उगवलेली हिरवीगार शेते चैत्रमासी कोकणांत पाहिली म्हणजे देशावरचा मनुष्य चकित होऊन जातो! अशा रीतीनें भातजमि-

नीचा संकोच, पिकावरील गडातरे, खतमातीच्या अभाव, लहानसहान चिरफळ्या झाल्यामुळे शेतांतील मेहनतीचा अभाव व अडचण, राहकारितेचा अभाव, आणि सर्वात मोठी गोष्ट म्हणजे भारी शेतसारा. इतक्या गोष्टीमुळे कोकणची शेती सुधारणे कठिण आहे जागच्या जागी उत्पन्न थोडे म्हणून दर घरचा एखादा मनुष्य रोजगाराला देशावर पाठवावा लागतो. आणि तिकडे त्याचे बस्तान थोडे बहुत बसले म्हणजे तो. दोन ठिकाणी संसार नको म्हणून, कोकणच्या इतर माणसाना देशावर नेतो यातून कोकणात जो मागे उरेल तो आपला असा तसाच समजावा! कारण देशावर नेण्याला जो निरुपयोगी तो कोकणात राहून तरी काय करणार हे दिसतच आहे त्याला नवी शेती मिळविता येतच नाही, आहे ती पिकविता येत नाही, किंबहुना तिजवर इतराकडून होणारे अतिक्रमणाहि वारता येत नाही.

पूर्वी देशावरचे नोकर लोक पेन्शन घेऊन कोकणात जाऊन राहण्याची चाल थोडी बहुत होती. ती हल्ली कमी झाली आहे. यामुळे आमच्या गावची ब्राह्मणवस्ती हटली. कुणब्याचे मात्र तसे नाही. कोकणी कुणबी पेन्शनर झाला तर तो प्रायः कोकणांतच जाऊन राहतो. काही भागातील गावच्या गाव लष्करी पेन्शनरानी भरलेले आढळतात. पेन्शनरच काय पण गिरणीतील मजूरहि दरवर्षातून एकादा दुसरा महिना कोकणात घालविल्यावाचून राहावयाचा नाही यामुळे या लोकाची वस्ती हटली तरी थोडीशी टिकून आहे. पण जे स्थाईक आहेत ते स्वतःला वतनदार समजतात. इतके की, खडकरी असले तरी बोटभर खडचिठ्ठीहि लिहून द्यावयाचे नाहीत व खड घालण्याला होईल तितकी टगळमगळ करतील. मी यदा कोकणांत गेलो तेव्हां मलाहि थोडासा जमीनदारीचा आविर्भाव झाला! वाटले कीं एकदां आपली खंडकरी कुळे कोण आहेत तीं बोलावून घेऊन पहावी. अपेक्षा अशी होती की कधी नव्हे तो मी गावी गेलो तेव्हा या कुळांनी आपण होऊन कौतुकाने येऊन नुसते भेटावे तरी! पण या टीचभर गांवांतील कुळे भेटीला बोलावण्याचे काम दोन दिवस करावे लागले. थकलेला खंड वसूल करण्याची गोष्टहि मी त्याना बोललो नाही. फक्त खडचिठ्या लिहून द्याव्या इतकेच माझे म्हणणे होते. पण एखादी नसती नवी घातक चाल पडावी अशी भीति त्यांना वाटून कांहीनी खडचिठ्या देण्याचे नाकारले. "आम्ही काय खंड बुडवितो? पिकले तर खड घालतोच. मग भाडेचिठ्ठीची उठाठेव कां?" बरे, हे सर्व लोक निरक्षर. तेव्हां आमच्याच कोणा माणसाकडून भाडेचिठ्ठी लिहवून घेऊन त्यांचा फक्त आंगठा

उठवून घ्यावयाचा त्या भाडेचिठ्ठीचा तरी काय उपयोग ? आधी मामलेदाराकडे मदतीची फिर्याद करतो कोण ? आणि ती केली व कुळाने खडचिठ्ठी नाकबूल केली तर 'फिंगरप्रिंट ब्युरो'चा अधिकारी साक्षीदार कोठून आणावयाचा ? तात्पर्य ते कांही नव्हे त्याच्या इमानावर विश्वास ठेवून ते घालतील तो खड घेऊन निभावले पाहिजे ही स्थानिक मालकाचीहि गोष्ट ! मग आमच्यासारखा उपरी मनुष्य गेला म्हणजे मग तर कांही बोलावयासच नको !

हे सर्व खरे तरी पण कोकणच्या वडिलार्जित ठिकाणाचा माझा मोह कांही सुटत नाही. मोह म्हणजे त्यांतून मोठी द्रव्यप्राप्ति आहे असे नव्हे, तर पुण्यास घरी बसलो असता हे मालकीचे घर या भावनेने जो एक प्रकारचा आनद वाटतो त्याच प्रकारचा आनद त्या ठिकाणावर जाऊन बसलो म्हणजे होतो. लहानच घर व लहानच शेत का होईना, पण तेथे जाऊन बसलो असतां मला खरोखर समाधान वाटते. कोकणचे ठिकाण पाच पन्नास वर्षे डोळ्याआड असल्यामुळे, एखादा मुलगा दत्तक द्यावा, व तो जाणता असेल तर त्याला नव्या घरी नेऊन एकदम "हे तुझ्या मालकीचे घर" असे सागावे, असे झाले असता त्याला जसा नवा ठेवा अकल्पित लाभतो तसे काहीसे मला कोकणच्या पहिल्या मुक्कामात वाटले. आणि साऱ्या कोकणची स्थिति न सुधारो, पण आमच्या तक्षिमांची जमीन व घरठाण आहे तेवढे निर्वेध अबाधित रहावे म्हणून मी मनाने एक योजना केली व ती दोन वर्षापूर्वी अमलातहि आणली.

## ( ५ ) माझ्या कोंकणांतील वास्तव्याची सोय

प्रतिवर्षी कांही दिवस कोकणात जाऊन राहाण्याची माझी इच्छा खरी; परतु ती भागणार कशी याचा विचार करू लागलो. प्रथम गेलो तो स्वतःच्या गावच्या लोभाने, म्हणजे वडिलार्जित घरी जाऊन राहावे या हेतूने. परतु लवकरच यातील अडचणी मला कळून आल्या. मोटारगाडी गावापासून दोन मैल दूर कोठे तरी परक्याच्या ठिकाणी ठेवावी लागणार मुख्य सडक सोडल्यावर एक घाटी उतरावयाची आणि फिरून एक खाडी ओलांडून जावयाचे. तसेच भरतीच्या वेळी खाडीत शिरले तरच घराखाली होडी जाते. नाहीतर अर्ध्या पाऊण मैलावर अडचणीच्या ठिकाणी ती लावावी लागते. आणि याहिपेक्षां निरुत्साहाचे कारण म्हटले म्हणजे वडिलार्जित घर कोसळून डोक्यावर पडण्याइतके जीर्ण झालेले कुग्रामाची

वस्ती. वेळी जिन्नस काही मिळावयाचा नाही. म्हणून देवगड गावात किंवा गांवालगत एकादे आयते बांधलेले घर किंवा ठिकाण शोधू लागलो. शेवटी एक एकर मोकळी जागा विकत घेतली विहीर खोदण्यास सुरवात केली. आणि मुंबईहून इमारतीची दारे व खिडक्या नेऊन एका घरात ठेवल्या

तथापि पुरे घर बांधून होईपर्यंत कोंकणांत जाऊन राहाण्याइतकी सवड मला नाही आणि मजकरिता घर बांधवून घेण्याचे काम करील इतक्या ऋणानुबंधाचा मनुष्य कोणी तेथे नाही तेव्हां काय करावे ? या अडचणीत मी असता देवगड गांवापासून चढून सड्यावर गेल्यावर, एक मैल दूर पण अगदी हमरस्त्यावर आयते बांधलेले एक घर व ठिकाण ही मला अवचित मिळाली तेव्हा पूर्वीची जागा विहीर व लाकूडसामान हे सर्व मी विकून टाकले आणि त्याच किमतीत हे नवे ठिकाण खरेदी केले. मात्र ते मुदतखरेदी आहे म्हणजे बारा वर्षांच्या भोगवट्यानतर मूळ मालकाने ते परत मागितल्यास मी ते परत द्यावे आणि खरेदीची किमत रुपये पंचवीसशे व त्यावर कराराप्रमाणे केलेला खर्च परत घ्यावा. ठिकाण मुदतखरेदी घेतल्याबद्दल काही लोकानी मला दोष दिला परतु त्या शर्तीशिवाय ठिकाण मिळेना. शिवाय मीहि पाहिले की बारा वर्षे भोगवटा मला मिळाला तर तोच माझ्या जन्माला पुरून उरेल. बरे ठिकाण कायमचे खरेदी झाले तरी पुढची पिढी माझ्याइतक्या हौसेनें तेथे थोडीच राहावयास जाणार ? तिला माझ्या इतके द्रव्य-साधन वार्षिक फेरी करण्यास मिळणार नाहीं.

तात्पर्य माझ्या जीवनापर्यंत मला सत्तेचे ठिकाण झाले पुढचे पुढे पाहतां येईल. सुदैवाने हे ठिकाण या किमतीला महाग पडले नाही. आणि खरे बोलावयाचे तर असे सोईचे ठिकाण आसपास दहापांच कोसातहि मिळण्यासारखे नाही असे मला दोष देणारेहि लोक मग सांगू लागले. या ठिकाणाचे क्षेत्र सुमारे अडीच तीन एकर असून त्यांत गोड पाण्याच्या दोन विहिरी आहेत. फिरून अशा की आसपासच्या विहिरीचे पाणी कमी झाले तरी त्यांचे पाणी उन्हाळ्यांत टिकते या अडीच एकरात एक भाग भातशेती करण्यासारखा आहे दुसऱ्या भागांत घरठाण व झाडे आहेत. तिसरा भाग खडकाळ असल्यामुळे निरुपयोगी म्हणून त्यात गावच्या चार गाडीवानांना बैल व गाड्या सोडण्यास जागा देतां येते व सोबत मिळते.

घर चांगले प्रशस्त दहाबारा माणसे नांदतील इतके मोठे आधीच असून मी आणखी त्यांत सोई केल्या आहेत. कोकणात मांडव व झोपाळा ही सुख-साधने गरीबाच्याहि घरी असतात. त्याची सिद्धता मी केली आहे. शिवाय महत्वाची गोष्ट म्हणजे या ठिकाणात दहा वीस कलमी आंब्यांची झाडे असून जागेवर नित्य सत्तेचे आंबेफळ खावयास मिळते, व उरले सुरले पुण्यास आणतां येते. घरांतील कोणच्याहि भागांतून दिसण्याइतका जवळ समुद्र आहे. सपाट मैदान असल्यामुळे वारा दिवसभर चालतो. आणि स्वतःची कल्पना चालवून एका विहिरीजवळ झाडाखाली मी कांही चिरेबंदी ओटे बांधले आहेत त्यांवर समुद्राकडे पहात छायेत उघड्या अगावर वारा घेत तासन् तास बसतो तेव्हा ती सुखाची परमावधी अशी मला वाटते !

सुधारणेच्या सोईहि काही तेथे कमी नाहीत. कारण एक मैलाच्या आत पोस्ट व तार ऑफिस आणि तालुक्याच्या ठिकाणी असणाऱ्या सर्व प्रकारच्या सरकारी कचेऱ्या आहेत. पुण्याहून देवगडपर्यंतचा प्रवास दोनशे तीस मैलाचा असला तरी सर्व रस्ता बिनखोट आहे. असा की मी पुण्यास अगणांत मोटारीत बसतो तो देवगडच्या या ठिकाणात मडपात उतरू शकतो. भर पावसाळ्यातहि जाता येण्यासारखा हा रस्ता आहे. शेवटी एकच गोष्ट सांगावयाची उरली ती ही की, मी प्रथम गेलो तेव्हां देवगडच्या इग्रजी शाळेची पुनर्घटना सुरू होती. तेथील लोकानी 'देवगड एज्युकेशन बोर्ड' नांवाची सस्था रजिस्टर केली होती. या चळवळीत मी त्याना सहजच लाभलो. मला त्यांनी बोर्डाचा अध्यक्ष नेमले व मीहि त्याच्या कामाला हातभार लावला. आणि शाळेच्या फडाला स्वतः चारशे रुपयांची देणगी दिली. एक वेळ असाहि प्रसग होता की देवगडास ठिकाण घेण्याची कल्पना सोडून देऊन सुमारे तीन–चार हजा-राची देणगी बोर्डाला देऊन आपल्या तालुक्यांत आपल्या घराण्याचे शिक्षण-विष-यक असे काही स्मारक करावे. परतु तेथपर्यंत मजल आली नाही. तथापि नव्या मोठ्या इमारतीच्या पायाचा दगड बसविण्याचा समारभ बोर्डाने माझ्या हातून केला. पूर्वी बोर्ड या शाळेपायी खर्चात आले होते. परतु मुबईचे शेठ मफतलाल-भाई, रत्नागर आगबोट कपनीचे मालक, याना प्रेरणा होऊन त्यांनी सस्थेला एकदर सुमारे वीस हजार रुपये दिले; त्यामुळे आतां इमारत एकाद्या कॉलेजच्या इमारतीसारखी झाली आहे. आज शाळेत पाचच वर्ग आहेत. ते लवकरच साता-

पर्यंत पोंचतील आणि एकादे विद्यार्थी वसतिगृहहि होईल. जवळ जवळ नव्वद वर्षांपूर्वी माझे वडील अक्षर ओळख करून घेण्याकरितां बाराव्या वर्षी पाऊणशें कोस जमीन पायाने चालत घाटावर गेले. या गोष्टीचें स्मरण असल्याने आणि शिक्षणाचें महत्त्व कळत असल्यामुळे, मी या शाळेला दिली ही चारशे रुपयांची देणगी सत्कारणी लागली असेच मला वाटते.

'केळकरांना कोकणचे वेड आहे' असे माझे मित्र थट्टेने म्हणतात. ते खरे आहे. कोकण ही माझी पितृभूमि असली तरी माझी जन्मभूमि देशावर आहे. तथापि कोकणाविषयी प्रेम वाटते हे कांही खोटे नाही, आणि त्या प्रेमामुळे देवगडास एक ठिकाण घेतलेच आहे. पण खुद्द वानिवड्यासहि तीनशे रुपये देऊन घराजवळ एक जागा विकत घेतली आहे, ही दोनहि ठिकाणे मी स्वतः माझ्या नांवावर न ठेवतां आमच्या वडील शाखेतील वडील मुलगा केशव नारायण केळकर याच्या नांवे बक्षीसपत्र करून दिली. हेतु हा की सर्वांची व्यवस्था एका मालकी हक्काने एकहाती व्हावी कोकणचे आमचे उत्पन्न, सरकारी सारा जाऊन येईल त्यातून वडिलार्जित देवघरांत पूजाअर्चा नित्य चालावी अशी माझी योजना आहे. उत्तर ध्रुवाजवळ माझे पूर्वज कोणत्या ठिकाणी राहत असतील माहीत नाही. पण अडीचशे मैलावर जी वडिलोपार्जित वास्तू आहे ती तरी सभाळावी असे वाटते. बोलून चालून हा एकप्रकारे क्षुद्र अभिमान होय. पण तो आहे खरा.

कोकणच्या खेपेत पूर्वी आप्त मंडळीना भेटण्याकरितां इतर कांही गांवी गेलो होतो. तेथील स्थिति पाहिली तरी अशीच आहे. सारेच दैन्य ! परतु स्वच्छता, टापटीप ही चांगली असून शिवाय अगण, परसू, झाड, पेडपाणी, छाया या गोष्टीची ददात नसल्याने, ज्या काही प्रकारचे सुख देशावरच्या श्रीमतालाहि कधी मिळणार नाही त्याप्रकारचे सुख कोकणातील गरीब लोकांना मिळते. कांही लोकांची अशी समजून आहे की कोकणांत आगगाडी झाली तर कोकणची स्थिति सुधारेल. पग आगगाडी होण्याला अडचणी फार. शिवाय जेथे साधारणहि सडका आहेत तेथे आतां मोटारीचा प्रवेश होऊं लागल्यामुळे हा प्रतिस्पर्धी आगगाडीला खाऊन टाकील म्हणूनहि आगगाडी होणे कठिण. आणि व्यापाराच्या दृष्टीने पहावे तर जलमार्गाच्या वाहतुकीची सोय अजूनहि पुष्कळ आहे, व जलमार्गाने माल थोड्या पैशांत जातो. तात्पर्य, कोणत्याहि दृष्टीने तिकडे आगगाडी

होणें दुरापास्त आहे व एका अर्थानें ती नाही तीच बरी. कारण दैन्य असतांहि जे इतर सुख तेथ आज मिळू शकते तेंहि उद्यां आगगाडी झाली तर मिळणें कठीण होईल.

## ( ६ ) देवगड तालुक्याची करुण कहाणी।

गतवर्षी रत्नागिरी जिल्हा कॉंग्रेस कमिटीने शेतकरी चौकशी कमिटी नेमली. तिच्या रिपोर्टांत देवगड तालुक्याच्या करुण कहाणीला स्वतंत्र स्थान दिले आहे. याचे कारण तो तालुका सर्व रत्नागिरी जिल्ह्यात अत्यंत खडकाळ आणि नापिकी आहे. आणि ' गडस्योपरि पीटिका ' या न्यायाने याच तालुक्यावर इतर सर्व तालुक्यांपेक्षा शेतसारा बसविण्याच्या कामी सरकाराकडून अधिक अन्याय झाला आहे. कमिटीच्या रिपोर्टांत म्हटले आहे ते असेः—

" पूर्वीच्या या तालुक्यावरील मामुली दस्त १८९१ पर्यंत ८६४०६ रुपये होता तो मोजणी केल्यावर सरकारने ६४ हजार रुपयाची वाढ करून १५११०८ रुपयावर आणला. मागाहून काही चूक दिसून आल्यावरून ४६०० रुपये कमी करून १४६५०८ रुपयाचा बोजा चालूच ठेवला. हा एकेरी अन्याय कदाचित् अवघड वाटला म्हणून की काय सरकारने आणखी दुसरा अन्याय लादून शेतकऱ्याच्या पाठीवरील ओझे दोन्ही बाजूला सारखे केले ! एकदर तालुक्यांतील जमिनीची प्रतवारी ( Classification ) म्हणून केली आणि त्यांत जमिनीचा मगदूर वेगवेगळा ठरवून दस्तांत चढउतार करून गोंधळ उडवून दिला. पश्चिम भागातील खाजणी जमिनी होत्या त्या पहिल्या प्रतीच्या ठरवून त्याप्रमाणे सारा आकारला. आणि पूर्वेकडील सुपीक जमिनी शेवटच्या प्रतीच्या ठरवून त्याच्यावर सारा कमी आकारला !

" या खाजणी जमिनी म्हणजे खाडीकांठचे खारे पाणी अडवून मोठ्या मेहनतीने आणि खर्चाने लोकांनी पिकाऊ बनविलेल्या जमिनी. यांत भात पिकवितात. एकादे वर्षी पीक चागले येते. परतु एकदां कां खारे पाणी घुसलें की ३।४ वर्षे पिकाला त्या निरुपयोगी ठरतात. असल्या बुडीत जमिनी पहिल्या प्रतीच्या म्हणून लागल्या. या सारावाढीचा आणि प्रतवाढीचा परिणाम असा झाला की कुळांकडून मिळणाऱ्या रकमेपेक्षां खोतांनी सरकारांत भरावयाची रक्कम

जास्त होऊ लागली. खोतानी ओरड केली आणि भराभर गांव सोडून दिले. सरकारला आपली चूक कळून येण्याला १० वर्षे लागली. आणि चौकशी करून १९०२ साली ३० हजार रुपये कमी करण्यांत आले तथापि खाजणी जमिनीची तक्रार कायमच राहिली. ही दाद लागेपर्यंत आणखी १०।१२ वर्षें जाऊन खाजणी जमिनीची उडती मोजणी झाली आणि २६०० रुपये कमी करण्यात आले. या मोजणीच्या वेळी सर्व खाजणी जमिनीची चौकशी केली नाहीच. काही गावे त्यावेळी निसटून गेली. त्यांचेवरील अन्याय अजूनहि चालू आहे प्रतवारीची चूक सरकारी अधिकाऱ्यांनी कबूल केली. तेव्हां इतकी वर्षे अन्यायाने केलेला वसूल वास्तविक परत केला पाहिजे होता तो तर केला नाहीच परंतु १९०२ साली आणि १९१४ साली फेरमोजणी झाल्यामुळे ३० वर्षांच्या रिव्हिजन मुदतीच्या कलमाचा ( कलम १०६ ) भग करून १९२६ साली ३३ टक्के दस्त पुनः वाढविण्यांत आला. रिव्हिजनसाठी प्रथम एक अधिकारी नेमण्यांत आला होता. त्याने चौकशी करून वरिष्ठाकडे रिपोर्ट पाठविला. परतु सरकारला पाहिजे होत्या तशा शिफारशी या रिपोर्टात नसल्यामुळे सरकारने तो रिपोर्ट दडपून दुसरा अधिकारी नेमला. त्याने मात्र सरकारच्या मर्जीप्रमाणे कामगिरी बजावली. आणि साडेबावीस टक्के वाढ सुचवली परतु तीसुद्धा सरकारला समाधानकारक न वाटल्यामुळे सदरहू अधिकाऱ्याकडून तेहतीस टक्के फेरशिफारस करून घेतली आणि १९२६ साली त्याप्रमाणे वाढ लादली. वाढीसाठी कारणे मासलेवाईक दिली आहेत.''

देवगडच्या पहिल्याच सर्वे-सेटलमेंटमध्ये त्या तालुक्यावर विशेष अन्याय होण्याचे कारण असे सांगतात की, १८२२ साली रत्नागिरी जिल्ह्याची मोजणी सुरू झाली. तीत देवगडची पाळी सर्वांत शेवटी म्हणजे १८९१ साली आली. या ७० वर्षांच्या परिश्रमामुळे सर्वे-खाते कटाळले होते असे नव्हे, पण एकदर रत्नागिरी जिल्ह्यावर आकारणी किती करावयाची त्याची इष्टाक रक्कम सरकाराने ठरविली होती. बाकीच्या तालुक्यातून या खात्याची न्यायबुद्धि, दयाबुद्धि, लोभबुद्धि ही सर्व प्रथम खर्ची पडून आकारणी बेताची झाली. आणि शेवटी सरकारी इष्टाकांत जी तूट आली ती सर्वच्या सर्व देवगड तालुक्याच्या डोक्यावर मारण्यात आली! एकाच विजयदुर्ग खाडीच्या दोन तीरावर असलेल्या राजापूर व देवगड या तालुक्यांच्या वट आकारणीत पडलेला फरक लक्षात घेतल्यास उलगडा आपोआप होतो.

| तालुका | क्षेत्रफळ | मामूल जमा रु. | नवे सेटलमेंट |
| --- | --- | --- | --- |
| संगमेश्वर | ४१५ | ९५२४० | ७६००२ |
| राजापूर | ४०६ | १०२९०२ | ८०६९५ |
| देवगड | ५२१ | ८६४०६ | १५११०८ |

सुमारे दहा वर्षापूर्वी मी हिंडत फिरत होतो तेव्हा, देवगड तालुक्यांतील काही गृहस्थशेतकऱ्यानी या शेतसाऱ्याच्या जुलमाविरुद्ध चळवळ करण्याकरितां मला निमंत्रण केले त्याप्रमाणे मी गेलो सर्व तालुकाभर दौरा काढला व्याख्याने दिली. त्या वेळी बंडोपंत जोशी, गोविंदराव जोशी, सदाशिवराव बर्वे, गोपाळराव जोशी, इत्यादि मंडळी होती त्यांनी फार मेहनत केली. बंडोपंताचे अनेक लेख मी केसरीत प्रसिद्ध केले. या चळवळीचा थोडाबहुत उपयोग झाला व कांही ठिकाणी सारा कमी करून पूर्वीच्या एक दोन वर्षांचा वाढावा परतहि करण्यात आला. तथापि अजून हा अन्याय पुष्कळसा दूर व्हावयाचा शिल्लक उरला आहे. आशा आहे की, शेतकऱ्यांच्या जिवावर ज्या कांग्रेस पक्षाने गेली कायदे-कौंसिलची निवडणूक जिंकली तो अधिकारारूढ असल्याने आपली वचने पाळील. तसे झाल्यास देवगड तालुकाच आधी हाती घ्यावा लागेल. खोती नष्ट व्हावयाची तर होवो, पण कूळ तरी सुखी होवो म्हणजे झाले.

## ( ७ ) पितृभूमीचा अभिमान !

कोकणचे हे जे वर्णन इतके केले ते ती भूमि स्वतःची अशी वाटते म्हणून ही गोष्ट काही खोटी नाही. तरी ते सर्वस्वी याच गोष्टीला मात्र अनुलक्षून नाही. प्रत्येक भूमीत मनुष्यगुण काही निरनिराळे असतात ही भौतिक उपपत्ति सर्वस्वी खोटी नसावी. बकल याने सुधारणेचा इतिहास लिहिला त्यांत भौतिक कारणांना किंवा उपाधींना त्याने बरेच महत्व दिले आहे, व हा सिद्धांत कोकणच्या भूमीत जन्मलेल्या माणसावरून कांही प्रमाणात सिद्ध करतां येईल. पण मला स्वतःला कोकणाचा अभिमान आहे असे म्हणण्यापेक्षां त्याच्या भौतिक गुणामुळे ते मला सामान्यतः देशापेक्षा अधिक आवडते इतकेच मी म्हणेन. कोणी कोणत्याहि भूमीविषयी अभिमानाच्या भावनेचे स्तोम माजविले म्हणजे ते सहजच हास्यास्पद करून

दाखवितां येत. भावनेच्या भरांत एखाद्या भूमीला मातृभूमि, पितृभूमि म्हणावे हे शोभून जाते. परतु त्याहून खोल पाण्यांत शिरण्यांत अर्थ नाही. मातृभूमि म्हटली म्हणजे तेथ मातृस्वायत्त कुटुंबपद्धति असते असे नाही. किंवा पितृभूमि म्हणणारे लोक मातेला मान देत नाहीत असेहि नाही. इंग्लंडचे लोक देशभक्तीच्या भावनेने 'मदरलॅंड' हा शब्द वापरतात, व जर्मन लोक 'फादरलॅंड' हा शब्द वापरतात. पण वत्सलतादर्शक दोन निरनिराळे शब्द इतकाच त्यांचा अर्थ करावयाचा. जुन्याला जाऊन चिकटण्यात मनुष्याला एक प्रकारची मौज वाटते किंवा खबिरीहि वाटते. म्हणून स्वकष्टार्जितापेक्षांहि वडिलार्जिताला तो अधिक मान देतो. पण 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्त च पौरुषम्' या वेणीसहार नाटकांतील कर्णवचनाप्रमाणे खरोखर स्वार्जितालाच मनुष्याने विशेष मान दिला पाहिजे स्वतः माझ्यासंबधाने अशी मौज आहे की ज्या भूमीत जन्म ती माझी मातृभूमि देशावर सोलापूर जिल्ह्यांत, पंढरपुराजवळ मिरज सस्थानच्या तालुक्याचा गांव मोडनिब हा होय. म्हणन ती झाली मातृभमि; पण वडिलांची मातृभमि कोकण म्हणन ती झाली माझी पितृभूमि. पण जुन्याचा अभिमान धरीत मागे मागे गेलो तर वानिवड्यापेक्षां ढोकमळ्याचा अभिमान अधिक धरावयास पाहिजे. पण त्यापूर्वी आम्ही दुसरे कोठे तरी होतोच. आणि गांवाप्रमाणे देशाच्या बाजून मागे हटत गेलो तर न जाणो, मंडलिकांच्या कल्पनेप्रमाणे इजिप्तचा, पण त्याहि पूर्वीचे स्थान टिळकांनी सुचविल्याप्रमाणे उत्तर ध्रुव प्रदेश म्हणन त्याचा अभिमान, मला धरावा लागेल पण तेथेहि खरी परिसमाप्ति नाही म्हणून शेवटी वर्डस्वर्थ कवीने म्हटल्याप्रमाणे Trailing clouds of glory do we come, from God who is our home. ईश्वरापर्यंत ही अभिमानाची सांखळी मागें खेचीत नेली तर ती तेथे मात्र खरी परिसमाप्त होते. ज्या उगमस्थानाचा अभिमान धरला असतां मनुष्य हास्यास्पद होऊच शकत नाही असे तेच एक स्थान होय. "ईश्वराच्या घरचच प्राणी" ही साधी मराठी म्हण किती तरी सार्थ आहे! असो. ही विचारपरंपरा सहज गमतीने सुचणारी आहे. परतु स्मरणार्थ केलेल्या या टिपणांत मला तत्वज्ञानांत शिरून नसता गंभीरपणा आणण्याची इच्छा नाही. म्हणून हा मुद्दा येथेच सोडून देतो.

# कांहीं कौटुंबिक माहिती

आमच्या पूर्वजांसंबंधीं माहिती मिळाली ती कांहीं मागील भागांत दिलीच आहे. यापुढें सुसंगत माहिती कागदोपत्रीं मिळत नाहीं. मात्र त्र्यंबकेश्वर वगैरे ठिकाणच्या उपाध्यायांच्या चोपड्यांतून घराण्यांतील नांवें मिळतात त्या व इतर माहितीवरून लहानसा वंशवृक्ष तयार केला तो याखालीं दिला आहे.




( यापुढें वंशवेल पुष्कळच पालवलेला आहे ! )

---

† केशव हा चुलता आबा यांस दत्तक दिला.

§ दामोदर हा पुढें आपला मेव्हणा गणपतराव बझे यांस दत्तक दिला.

माझ्या वरच्या तिसऱ्या पिढीला आमच्या आजासुद्धां चौघे बंधू. सर्वात वडील नाना. ते सर्वांच्या आधी वारले. त्यांना एक मुलगी होती. ती नवरा मेल्यावर बहुधा आपल्या भावाच्या घरीच पण वेगळे बिऱ्हाड करून राही. तिला "बिऱ्हाड-करू आते" असे थट्टेने म्हणत त्याचा तिला राग येई. ती म्हणे "बापाच्या घरांत मला काही मालकी हक्क नाहीच की काय?" बिचारीला 'हिंदू लॉ' माहीत नव्हता! उरल्या तिघा भावात आमचे सख्खे आजे लक्ष्मण हरि हेच सर्वात वडील त्याच्या खाली त्रिंबकपंत बापू व त्याच्या खाली आबाजी असा अनुक्रम लक्ष्मण हरि याना आण्णा म्हणत. ते स्वभावाने गरीब शेतकरी वळणाचे होते बापू याना कारकुनी पेशा आवडे. आबा हे घरातील मुत्सद्दी. त्यानी आपल्या बुद्धीने, उद्योगाने खुद्द वानिवड्यांत व आसपासहि मोठे वजन संपादिले होते खाऱ्या जमिनीत नवीन शेतं पाडणे, दुसऱ्याची शेते खडाने घेणे, तंटे उपस्थित करणे व तोडणे, गावपचाइती करणे, आणि देवदेवस्की माजवणे या सर्व उद्यो-गात ते गढून गेलेले असत. त्याच्या उद्योगामुळे वाढलेली शेती अण्णानी करावी व स्वत. आबानी बाहेरचे सर्व काम करावे अशी कामाची वाटणी होती.

दिवसेदिवस कुटुंब वाढू लागले. सकाळ–सध्याकाळ घरचे जेवणार मनुष्य दहावीस. शिवाय आला गेला पाहुणा. कोकणच्या चालीप्रमाणे गड्यामाणसांनी घरीच जेवण्याचा परिपाठ. यामुळे पाने वाढण्याला नऊखणी घर पुरत नसे. आणि घरी बायकांना स्वयपाक करून वाढण्याचे काम दिवसभर पुरे. कुणबी शेतकऱ्या-प्रमाणेच घरची शेती घरीच करण्याची चाल आम्हा ब्राह्मणातहि तेव्हा होती. म्हणून पुरुष तर स्वतः शेतांत राबतच, पण बायकांनाहि त्यांच्या ऐपतीप्रमाणे शेतकाम करावे लागे. पुरुष शेतात कामावर असले म्हणजे एक वेळच घरी जेवावयाचे. म्हणून त्यांना शेतांत दशमी–भाकरी पोचवावी लागे. ते काम घरच्या सुना व मुली या रिकाम्या म्हणून त्यांजकडे सहजच येई. त्यानी शेतांत भाकरी घेऊन जावी व येतांना घरच्या गुरांकरिता त्याच पाटीतून थोडा चाराहि आणावा. आमच्या मातोश्रीने हे काम स्वतः केले होते असे ती सांगे.

पुरुषांचा पोषाक म्हणजे एक पंचा नेसूंचा व एक डोकीचा. वरिष्ट दर्जाच्या घरच्या गडीमाणसाबरोबर बसून ते तंबाकू ओढीत. अक्षरओळखीपलीकडे लिहिणे वाचणें गेले नव्हते. तिघा आजांपैकी आबा हे जसे उद्योगी तसेच ते

कर्मठ असत. त्यांनाच तेवढे देवापुढे बसून स्नानसंध्या पूजाअभिषेक करिताना आम्ही लहानपणी पाहिल्याचे स्मरते ते ज्यांतून अभिषेक करीत ते गव्याच्या शिंगाचे पात्र, व ते ज्यावर आडवे मोठे पांढरे गंध फाशीत ती शिवाची पिंडी, अजून कोकणच्या आमच्या देव्हाऱ्यात आहे आबांनीच घरी नृसिंह–जयंति करण्याचा प्रघात पाडला. नृसिंह हे त्यांचे उपास्य होते त्यावरूनच माझे नाव नरसिंह असे पुढे ठेवण्यात आले. १९२३ साली मी अगदी अवचित कोकणात घरी गेलो त्याच दिवशी घरच्या नृसिंह–जयंतीचा उत्सव होता हा योगायोग पाहून मला फारच मौज वाटली व गावच्या लोकांनाहि त्यामुळे मोठा आनंद झाला ! या उत्सवास मी घरी असण्याचा योग पुन्हा १९३१ व १९३६ साली आला.

कुटुंब वाढू लागले त्या मानाने शेतीचे उत्पन्न वाढेना. तेव्हां काही जणांनी देशावर जाऊन कुटुंबपोषणाला मदत करावी असा विचार सहजच आला. देशावर येणे ते वशिल्याशिवाय काय उपयोग ? पण सुदैवाने तो मिळाला. वानिवड्यापासून तीन कोसावर, देवगडालगत, जामसंडे म्हणून एक गांव आहे तेथे भिडे नांवाचे एक घराणे होते. त्यातील एक मुलगी मिरज येथील संस्थानिकांच्या घराण्यात दैवयोगाने पडली होती. गरीब घराण्यांतील मुलगी श्रीमंताच्या घरी पडली म्हणजे माहेरच्या माणसांना साहजिक मोठी मदत होते. भिडे घराण्यांतील एक पुरुष या शरीरसंबंधामुळे मिरजेस कायमचा आला. त्याचे नांव परशरामपंत. त्याला मिरजेच्या यजमानांचा शालक म्हणून एक पगारी असामी देण्यांत आली. भिडे याचा व आमच्या आजांचा चांगला परिचय. त्या ओळखीने प्रथम आण्णा व नंतर बापू असे देशावर मिरजेस आले, व सरकारवाड्यात त्यांनी नोकरी मिळविली.

ही नोकरी म्हणजे थोडी कारकुनी व पुष्कळशी शाग्रिती अशा स्वरूपाची असे ! पंक्तिला जेऊन महिना दोनतीन, किंवा दरसाल देणग्यांसकट पन्नास पाउणशे रुपये मिळत. त्यातलेच थोडे ते घरी कोकणांत पाठवीत ! मग घरच्या शेतीचे काम आबा पहात. पुढे बापूंनी पेन्शन घेतल्यावर त्यांचा मुलगा विश्वनाथपंत हा कोल्हापुरास नोकरीवर होता त्याजकडे ते राहावयास गेले. त्यांनी परत कोकणांत फारसे लक्ष घातले नाही. आण्णा हे प्रथम कोकणांत येऊन जाऊन असत. पुढे माझे वडील मिरजेस नोकरीवर लागले तेव्हां मात्र आण्णा हे कोकणांत कायमचे जाऊन राहिले. आबांना पोटदुखीची व्यथा होती. ते आण्णांच्या आधी वारले.

आमच्या चौघा आजांत मिळून पाच मुलगे. शिवाय बारा मुली होत्या. आबांना सर्व मुलीच त्या सात होत्या! बापूंना दोन मुली व विश्वनाथ व गणपति असे दोन मुलगे. आणि आण्णा यांना तीन मुलगे—चिंतामणि, केशव व हरि. पैकी मधला केशव आबांचे नाव चालविण्याकरिता त्यांना दत्तक दिला. सगळ्या मुलींची लग्ने बहुधा पंचक्रोशीतच जमली. ब्रह्मदेव नवरा-नवरीच्या नावाच्या काड्या घेऊन जुड्या बांधतो! हल्ली त्याला आगगाडीमुळे काड्या दूरदूरच्या शोधावयाला मिळतात. त्याशिवाय त्याच्या जुड्या लवकर बनत नाहीत. पण जुन्या काळी कोकणांतील ब्रह्मदेवाला बसायला आगगाडी नव्हती म्हणा, किंवा कोकणी ब्राह्मणाप्रमाणे तोहि नुसता शाण्णव सुर्तो पंचाच नेशीत असल्यामुळे दूर बाहेर जाण्याची त्याला लाज वाटत असे म्हणा, कसेहि म्हणा, आमच्या आजांना सातहि मुलींकरितां घरे पाहण्याची फारशी पंचाईत पडली नाही! सर्वांना स्थळे पंचक्रोशीतच मिळाली! याहून माझ्या अनेक आत्यांची हकीकत देण्यासारखी काही नाही.

**माझे वडील**—वडील चिंतोपंतदादा हे १८४० साली जन्मले. ते बारा वर्षांचे असतांना कोकणांतून देशावर आले. त्यांचे वडील आण्णा त्यांचेबरोबर आले होते. उभयतांचा सर्व प्रवास पायाने झाला. त्या वेळी फोंडाघाट बांधलेला नव्हता. बावडा घाटच वाहता असे. तो चढण्याला थोडा कठिण आहे. दररोज सुमारे पांच कोसांची मजल दोघे चालत. "मधून मधून पाय दुखू लागले म्हणजे मी पाय दुमडून अगाखाली घेऊन बसत असे, व अशा रीतीने मिरजेपर्यंतचा प्रवास पायाने केला—" असे वडील सांगत. ते मिरजेस आले तेव्हां बाळासाहेब पटवर्धन (म्हणजे हल्लीच्या बाळासाहेबांचे आजे) यांची कारकीर्द चालू होती. ते प्रथम सरकारवाड्यांतच नोकरीस राहिले. पंक्तीस जेवावे व पागेतील कारकुनाजवळ अक्षर लिहावे असा त्यांचा क्रम होता. शिवाय वडिलांनी सकाळी उठून दूर बागेत जाऊन चांगली चांगली फुलें परडीभर तोडून आणावी व श्रीमंत देवपुजेला बसले म्हणजे त्यांजपुढे नेऊन ती सादर करावी, असा उद्योग त्यांनी कांही दिवस ठेविला. त्याचे फळ म्हणून कारकुनी फडांत त्यांना प्रथम तीन रुपयांची नोकरी मिळाली. नंतर तीनाचे पांच झाले. पांचाचे आठ, आठाचे बारा असा पगार मिरजेसच वाढला. पगार वाढल्यामुळे पंक्तीचे जेवण पुढे बंद झाले, तेव्हां त्यांना कांही दिवस हातानेच स्वयंपाक करावा लागे. बारा रुपयांवर असतां त्यांची बदली तालुके मोडनिंब येथे झाली. तेथे ते पुढे बारा वर्षे होते. मग फिरून मिर-

जेस बदलले. त्या वेळी यशवंत मोरेश्वर केळकर हे कारभारी होते. त्यांच्या कचेरीत असतां, तालुक्यांतून फिरतीवर जात तेव्हां, वडिलांचे काम कारभाऱ्यांच्या नजरेत आले. म्हणून त्यांनी त्यांना चार रुपये बढती देऊन मोडलिंब्यास अव्वल कारकून म्हणून पाठविले.

वडील बारा रुपयांच्या नोकरीवर मिरजेस असतांना माझ्या दोघां वडील बंधूंचा जन्म झाला. पुढे सोळा रुपयांवर मोडलिंब्यास नोकरीस असतांना माझा जन्म तेथे एका अवघ्या दोनखणी बिऱ्हाडांत झाला. दोघे वडील बंधु शाळेत शिकत. पण लोकल फंड भरणारास फीची रक्कम फार थोडी असते याकरितां, सालिना आठ आणे सारा बसलेला एक शेतजमिनीचा तुकडा वडिलांनी विकत घेतला होता. अशा थाटाने आम्ही तेव्हां " गावात घर व रानांत शेत बाळगून" मोडलिंब्याचे रहिवासी बनलो होतो !

पुन्हा एकवार मिरजेस बदली होऊन वडील नोकरीवर गेले ते फौजदारीच्या कामावर. त्या वेळी त्यांना २० रुपये पगार व १० रुपये भत्ता झाला. त्यानन्तर १८८६ साली त्यांची बदली मोडलिंब येथे मामलेदारीच्या जागेवर झाली. पण तेथे त्यांना फार दिवस राहावे लागले नाही. दोन वर्षांनी त्यांची बदली मिरजेस खासगी कारभाऱ्याच्या जागेवर झाली व तेथे त्यांना अखेर पंचावन्न रुपयांपर्यंत पगार झाला. तथापि खासगी कारभाऱ्याची नोकरी त्यांना मनांतून आवडत नसे. कारण या नोकरीत यजमानांचा म्हणजे खुद्द संस्थानाधिपतीचा संबंध प्रत्यक्ष येतो आणि त्यांच्या लहरी सभाळणे कठिण पडते. कोणीहि श्रीमंत यजमान लहरी असला तरी ते त्याला शोभते, आणि आपल्या लहरीप्रमाणे त्याला अनेक नोकर काढून त्यांच्या जागी दुसरे अनेक नोकर नेमता येतात. मग त्याने आपल्या लहरी का पुरवू नयेत ? बिचाऱ्या नोकराचे मात्र तसे नसते. कारण यजमानाची लहर बिघडल्यामुळे नोकराची दुसऱ्या कामावर बदली झाली तर देव पावला. पण यजमानाची लहर सभाळता न आल्यामुळे ऐनजिनसी नोकरीच गेली तर काय करावे ? या वेळी वडिलांची पन्नाशी उलटून गेलेली. संसार वाढलेला. तीन मुलांचे कॉलेजांतील शिक्षण सुरू असलेले. अशा वेळी यजमानांची लहर बिघडून नोकरी गेली तर काय करावे ? अशी त्यांना फार चिंता वाटे. परंतु एकंदरीने या नोकरीत फारसा वाईट अनुभव आला नाही. उलट १८८८ साली वडील बंधु नाना यांचा बी. ए. परीक्षेचा शिक्षण-क्रम खर्चास पैसा नाही म्हणून थांबविण्याची

वेळ आली असतां, यजमानानी त्यांना बोलावून "मुलाचे शिक्षण पुरे करा. मी मदत देतो" असे म्हणून अडीचशे रुपये एक रकमेने त्यांना देण्याचा हुकूम केला. पण आणखी तीन वर्षें गेल्यावर, म्हणजे १८९१ साली माझी बी. ए. ची परीक्षा झाल्याबरोबर, आपल्या डोक्यावरची मोठी जबाबदारी उतरली, आता नोकरी सोडण्यास हरकत नाही, असे वाटून पचावन्न वर्षें वयाची झाली नव्हती तरी त्यांनी राजीनामा दिला. यजमान आणखी रहा म्हणत होते पण प्रकृतीची सबब सांगून ते मिरज सोडून सातान्यास आले. राजीनाम्याबरोबर पेन्शनीचा अर्ज केला होता. तथापि संस्थानात त्या वेळी पेन्शनचे असे नियम कांहीच नव्हते यामुळे "पेन्शन मिळावयाचे नशिबांत असेल तितके मिळेल, पण दोघे मुलगे नोकरीला लागले तेव्हा आता पेन्शनीची काळजी मी कशाला करू" असा विचार त्यांनी मनाशी केला. अखेर पगाराच्या मानाने पेन्शन एक तृतीयांशहि बसले नाही. पोटगीदाखल म्हणून १५ रुपये पेन्शन देण्यांत आले. त्या पेन्शनचा विनियोग त्यांनी यात्रा आणि घरांतील नैमित्तिक धर्मकृत्ये करण्यांत केला.

तीर्थरूप दादा हे निमगोरे, बांध्याने स्थूल पण किंचित् ठेंगणे असे होते. त्याना पाहिलेले लोक सागतात की, मी हल्ली पासष्टीच्या सुमाराला आलो आहे तो बराचसा त्यांच्यासारखा दिसतो. यावरून ते कसे होते याची कल्पना येईल. त्या मानाने आमची आईच अधिक गौरवर्ण व उंच असे. दादा हे शाळेत असे कधीच गेले नाहीत. पागेतील कारकुनापाशी त्यांनी अक्षरओळख करून घेतली तेवढीच. तशीच हिशेबाचीहि. पण कोणतेहि काम करण्याने ते करतां करता शिकण्याइतकी बुद्धिमत्ता त्याना होती. यामुळे त्यांनी दुसरा वर्ग मॅजिस्ट्रेटचेहि काम केले. तो काळ विशेष पत्रलेखनाचा नसल्यामुळे माझ्या संग्रही त्यांची अवघी दोन-तीनच पत्रें मिळाली. एकांत कोकणांतील मिळकत व कर्ज यांची व्यवस्था लिहिलेली असून दुसऱ्या पत्रांत कोकणचे कर्ज फिटल्याचा आणि ऋणमुक्ततेने कृतकृत्य झाल्याचा उद्गार व उसासा त्यांनी काढलेला आहे.

मजबरोबर ते पुण्यास येईपर्यंत त्यांना वर्तमानपत्रे वाचतांना मी पाहिलेले नाही. पुण्यास आल्यावर ते केसरी मात्र नित्य वाचीत, आणि माझ्या घरी त्यांच्यासमक्ष अनेक सार्वजनिक विषयांची चर्चा होत असल्यामुळे ते हळुहळू 'आधुनिक' बनूं लागले होते. आणि हे कसे, ते कसे, असा एकादा सूचक मार्मिक

प्रश्न मधून मधून विचारीत. त्यांच्या दप्तरांत दोन-तीन धार्मिक पुस्तके व हाताने लिहून घेतलेल्या नित्यपाठाच्या पोथ्या इतकाच संग्रह असे. त्यातील बऱ्याच त्यांच्या तोंडपाठ झालेल्या होत्या, तरी विशेषतः चूक होऊ नये म्हणून 'दासबोध' हा ग्रंथ ते पोथीवरूनच वाचीत. जुन्या पद्धतीच्या अनेक भाविक गृहस्थाप्रमाणे ते नित्याची ब्रह्मकर्मे स्वतः करीत; पण वरचेवर पुष्कळसे उपवास, व्रतवैकल्ये, स्तोम माजण्यासारखे पूजाविधि, यमनियम हे त्यानी फारसे मागे लावून घेतले नव्हते. पुण्यास असतां सुप्रसिद्ध महाडकर ज्योतिषी हे माझे घरी येत. तेव्हा त्यानी दादांना एकदा असे सांगितले की, तुमच्या पत्रिकेवरून तुम्हांला यात्रा वगैरे घडणार नाहीत. पण त्यानंतर काशीच्या दोन यात्रा व रामेश्वराची एक यात्रा घडली. हे पाहिल्यावर "माझा ज्योतिषावर विश्वास उरला नाही" असे ते म्हणू लागले. यात्रेच्या बाबतीतहि गयावर्जनाची त्यांना इतकी खती आली की, त्यांनी एका पत्रात आम्हाला स्पष्ट लिहिले की, "अशी यात्रा केल्या-पेक्षां न केलेली बरी. आमचे पिंड जिवतपणीच आम्हाला तुमच्याकडून मिळाले. ते आमच्या मरणोत्तर गयेस जाऊन देण्याचे कारण नाही."

दादाचे उपास्य दैवत स्वयंनिर्णयाचे म्हणून श्रीराम हे होते. त्यांनी रामाची उपासना माझ्या जन्माच्या वर्षी, एकदा पंढरपुरास गेले असता घेतली. त्याप्रमाणे घरच्या देव्हाऱ्यात मुख्य तसबीर रामाची, मग पंचायतनांत कोणच्याहि देवांचें समेलन चालते ! उपासनेचा वार्षिक क्रम म्हटला म्हणजे रामनवमीचे उपोषण, रामजन्माच्या वेळी विशेष समारंभाची पूजा, संध्याकाळी ब्राह्मणांचे वेदपठण व दशमीला पारणे म्हणजे ब्राह्मणभोजन. हा घरचा वडिलार्जित उपासनाक्रम म्हणून मी अद्यापपर्यंत चालविला आहे. दादा हे प्रायः मजजवळच राहत म्हणून त्यांची रामाची तसबीर, पोथ्या ही सर्व मिळकत मलाच मिळाली ! आणि मी सर्वांत धाकटा मुलगा असलो तरी त्यांची धार्मिक उपासनेची परंपरा चालविण्याचा एक प्रकारे वडिल-कीचा मान तोहि माझ्याकडेच आला ! दादांचा दैनिक कार्यक्रम इतका नियमबद्ध असे की, खरोखर त्यावरून घड्याळहि लाऊन घ्यावे. त्यांनी कोठेहि धार्मिक लोकांखेरीज इतर मित्रमंडळ बनविले नाही. पुण्यांत साखरेबोवांची ज्ञानेश्वरी ऐकण्याला ते अखेरपर्यंत जात व क्वचित् तुळशीबागेत जात. त्यांनी गोंदवलेकर महाराजांकडून गुरुपदेश घेतला होता आणि त्याप्रमाणे ते नित्य थोडाबहुत जपहि करीत. घरातील त्यांची वागणूक अत्यंत निरुपद्रवी असे.

सर्व जन्मांत त्यांना अवघड काम मिळाले ते मिरजेच्या फौजदारीचे. फौजदाराने टोपी घालण्याचा शिरस्ता होता. पण त्यानी टोपीऐवजी जरीचा रुमाल डोकीला घालण्याची परवानगी मागितली व सुदैवाने त्याना ती देण्यात आली. त्यांनी चोळणा विजार बूट हे साऱ्या जन्मात कधीहि घातले नाहीत. ही त्याची या गोष्टीची नावड मजमध्ये उतरलेली दिसते !

त्यांचा स्वभाव व त्यांचे फौजदारीचे काम यांजमध्ये फारच विरोध होता. त्यांच्या तोडांत शिवी अगदी कमी व रागहि थोडा; आणि काम तर फौजदारीचे ! तथापि ते काम त्यांनी बरेच बिनबोभाट पार पाडले. गुन्ह्याच्या तपासाकरितां ते तालुक्यांत गेले म्हणजे आम्हांला घरी त्याच्याबद्दल काळजी वाटे एकादे रात्री पाऊस पडत असतां घोड्यावर बसून त्यांना परगावी जावे लागे बरोबर एकादा-दुसराच शिपाई असावयाचा. आणि तपासाचा गुन्हा खून किंवा दरवडा असा आम्ही ऐकला असला म्हणजे कल्पनेनेच आमचे भय दुणावयाचे उस्मानशहा म्हणून वडिलांचा एक विश्वासू मुसलमान जमादार असे. त्याची मात्र मदत त्यांना फार होई.

त्या वेळचे मिरजेचे कारभारी प्रल्हाद कृष्ण शहाणे हे खालसांतील मामलेदारीवरून 'उसन्या' नोकरीवर मिरजेस आले होते त्यांनी तिकडीलच एक मराठा गृहस्थ चीफ पोलिस ऑफिसर म्हणून आणविला होता. त्याने वडिलांना पुष्कळ त्रास दिला. पण अखेर आपल्या अवगुणांमुळे गावकऱ्यांकडून बदमाषीबद्दल मार खाऊन तो परत गेला. तसेच पुढे खासगी कारभारी असता, सरकारी कुरणातील गज्यांना कल्लाप्पा कुरण्या नांवाचा एक पुंड मनुष्य होता त्याने आग लावून नुकसान केले. त्यामुळे वडिलांना फिर्यादी होऊन खटला भरावा लागला. त्यात त्याला शिक्षा झाली. तेव्हां त्याने वडिलांना जिवे मारीन अशी प्रतिज्ञा केली. यामुळे तो सुटून आल्यावर कांही दिवस मोठी काळजीच वाटत असे. पण अखेर त्याचा राग जाऊन तो होऊन वडिलांच्या पाया पडावयास आला. हे खाजगी कारभाऱ्याचे काम वडिलांना फारसे पसत नसे. मामलेदारीचे काम मात्र त्यांना बरे वाटे. कारण त्यांत वाईट लोकांचा प्रत्यक्ष सबंध नाही आणि तऱ्हेवाईक यजमानांचीहि मर्जी सभाळण्याचे कारण नाही.

सर्व जन्म कष्टांत घालवूनहि दादांना स्वतःची शिल्लक अशी कांही ठेवतां आली नाही. त्यांचा बहुतेक जन्म तीनचतुर्थांश पगार घरच्या ससारावर आणि एक

चतुर्थांश पगार कोकणाकडे खर्च करण्यांत गेला. पेन्शन घेतल्यानंतरहि कांही दिवस त्यांना आपल्याला कर्ज आहे ही जाणीव होती पण हे कर्ज केवळ कोकणची भर करण्याकरितांच झालेले होते पुढे आम्हा तिघा बधूना नोकऱ्या लागल्या तेव्हा दोन वर्षांत ते आम्ही फेडू शकलो इतकी कर्जाची रक्कम लहान होती. तथापि तेहि फेडून मुक्त व्हावे येवढीच महत्त्वाकांक्षा त्यानी बाळगली होती. स्वतःच्या चैनीवर एक पैहि त्यानी कधी खर्च केलेली आम्हाला आठवत नाही. त्यांचा पोषाक अगदी साधा असे, व स्वतः त्यांचा असा सर्व ससार एका मोठ्याशा ट्रकेत आणि वळकटीत मावेल इतकाच होता आम्हा त्रिवर्ग बधूचे शिक्षण करणे यावरच त्यांचा बहुतेक पगार खर्ची पडत असे. आणि ऋणमुक्त झाल्यावर त्यांच्या पेन्शनीतून शेदीडशे रुपये अखेर त्यांचे शिल्लक राहिले तीच आपल्या हक्काची व मानाची खरी धनदौलत असे ते मानीत! त्याच्या हयातीत पुण्यास माझ्या मालकीचे घर झालेले होते, व अशा घरात राहण्याचा आनद त्याना एक दोन वर्षे लाभला अलीकडे मी आणखी स्थावर मिळकत केली आणि घरची मोटार ठेवली ती पाहून त्यांना किती आनद झाला असता हे सांगता पुरवत नाही. परतु तो आनद भोगण्याला त्याना नव्वद पचाण्णव वर्षांपर्यंत जगावे लागले असते, ते कसे होणार ?

**माझी मातुश्री**—माझ्या आईचे माहेरचे नांव काशीबाई व सासरचे नांव यशोदाबाई. तिचे माहेर आमच्या वानिवडे गांवाजवळ मोड या गांवी भिडे यांच्याकडचे. आमच्या या दोन गांवांमध्ये एक अगदी अरुद अशी खाडी आहे. पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे आईच्या वडिलानी शक्य तितके जवळचेच स्थळ पाहिले. ही माहेर—सासरची घरे इतकी जवळ होती की, खाडीकाठी उभे राहून सासरच्यांनी मारलेली हांक माहेरी ऐकूं जाई. आमच्या पुढच्या पिढीस सुना—मुलीचे सासर—माहेर फार दूर होऊ लागले तेव्हां वरील गोष्ट ती गमतीने सागे.

त्या वेळी सुनांना देशावर मुलांकडे फार लवकर पाठवीत नसत. देशावर संसार मांडण्याइतका पगार नाही. आणि घरी कोकणांत सासवांच्या हाताखाली काम करण्याला सुना जितके दिवस लाभतील तितक्या हव्या असे त्यांना सहज वाटे. यामुळे मुलांनाच दर वर्षांतून महिना दीडमहिना रजा काढून कोकणांत राहण्यास सांगत. माझ्या आईचे आठव्या वर्षी लग्न झाले तरी ती कायमची देशावर राहण्याला विसाव्या वर्षी गेली. तिचा स्वभाव अत्यंत कष्टाळू व मनमिळाऊ. यामुळे ती सर्व सास्वांना प्रिय

असे. बहुतेक सर्व दीरनणदा तिच्याहून लहान वयाच्या. यामुळे त्यांना अंगाखांद्या-वर खेळविण्याचे काम तिच्याकडेच येई. कोणाहि दीरानणदांचे आणि तिचे भांडण झाले नाही. अखेरपर्यंत ती सर्वांचा परामर्ष शक्य तितका घेत असे. आई २४ वर्षांची असता पहिला मुलगा नाना हे तिला झाले. २६ व्या वर्षी आप्पा, ३० व्या वर्षी मी, आणि ३८ व्या वर्षी माझी बहीण वाराणसी, अशी मुले झाली. यानंतर तिला मूल झाले नाही.

मोडलिब्यास व मिरजेसहि आमचे मातोश्रीला संसाराचे कष्ट फार पडले. कोणीहि मदतीला केव्हांहि नाही. अशा स्थितीत तिला बरीच वर्षे काढावी लागली. मोडलिब्यास वडिलांना पगार प्रथम बारा रुपये. त्यातूनच कोंकणांत सालींना कधी पंचवीस तर कधी पन्नास रुपये पाठवावे लागावयाचे. दोन–तीन खणाचे घर. तीन मुले. धुणेपाणी सर्व वेशीबाहेर ओढ्यावर व्हावयाचे. सर्वांत लहान मुलाला म्हणजे मला ओढ्यावर बरोबर नेण्यासारखे नाही म्हणून पाळण्यात ठेवून घराला बाहेरून कुलूप घालून जावयाचे. मग ते आत रडले किंवा काय झाले इकडे लक्ष देऊन काय करणार ? डोळे येण्याचे दुखणे तिला मधून मधून होई. शिवाय गळ्याच्या घाटीला व्रण झाला होता. ते दुखणे कायमचे होते. खाणे म्हटले म्हणजे राळ्याचा भात, जोंध-ळ्याच्या कण्या, व ज्वारीची भाकरी. तांदुळाचा भात केव्हां केला केव्हा नाही अशी स्थिति होती.

पुढे मिरजेस वडील फौजदार होऊन आले तरी मातोश्रीच्या कष्टांत फारसे कमी झाले नाही. शिपाई घरी असला तरी तो बाहेरच्या बाहेर—घरचे धुणेपाणी, स्वयपाक सर्व काही हिला एकटीला करावे लागे. मिरजेचे पाण्याचे हाल तर प्रसिद्धच आहेत. गोड्या पाण्याकरिता सार्वजनिक हौदावर जावे लागे; व तेथेहि वर्षांतून सहा महिने घागर भरण्याची मुष्किल ! घरी आडाचे पाणी खोल व खारे; आणि उन्हाळ्यात तेहि आटले म्हणजे खर्चाच्या व धुण्याच्या पाण्याकरिताहि बाहेर जावे लागे. यामुळे आईला अतिशय श्रम पडत. या पाण्याच्या कामांत मात्र आम्हा मुलांकडून तिला थोडीशी मदत होई. आडाची घागर दोघां वडील बंधूंना काढतां येई, व हौदाचे पाणी आणण्यात मलाहि सामील होतां येत असे. शेजारची मुले व आम्ही मिळून हातगाड्यावर घागरी, तांबे व कळश्या घेऊन हौदाचे गोडे पाणी भरून आणीत असू. चांदण्याच्या दिवसांत गाड्यावरून पाणी आणणे हे कामाप्रमाणे करमणुकीचेहि साधन होई. पुढे पुण्यास आमचे स्वतःचे घर झाले ते मिरजेच्या

घरापेक्षां पुष्कळच मोठे. पण विशेषतः या घरी चहूकडे पाण्याच्या नळ्या फिरविण्यांत आल्या. तेव्हां त्या सोईचा मातोश्रीला झालेला आनन्द अवर्णनीय ठरला. ती म्हणे " ताल्या, तुझ्या घरांत जिकडे जावे तिकडे, नुसता ' कान पिळल्या ' बरोबर हातावर पाण्याची धार धरण्याकरितां अष्टौप्रहर नोकर जसे कांही उभे आहेत ! "

आम्हा बंधूंच्या शिक्षणाच्या कामी क्वचित् पैशाची तूट येई. याहून इतर कोणताहि त्रास वडीलमातोश्रींना आमचेकडून झाला नाही. पण मॅट्रिक्युलेशनपर्यंत शिक्षण पोंचल्यावर एकदम फी भरणे, प्रवासाला निघणे, वगैरे गोष्टी उपस्थित झाल्या म्हणजे दहा, वीस, पचवीस असे रुपये हवेतच. तेव्हां ते उसने घ्यावे लागत. मोडलिंब्यास वडील मामलेदार म्हणून उसनवार रुपये मागण्याची अडचण. पण सरकारवाड्याशेजारी गुजराची घरे होती. ते लोक, मातोश्रीचा निरोप जातांच, वेळी-अवेळी उसने रुपये देऊन गरज भागवीत फक्त व्याज घेत नसत. मिरजेस आमचे उपाध्ये हेच आमचे सावकार होते. त्यांच्या खोलीतील रुपये ठेवण्याचा गडवा नेहमी समृद्ध असे, व पाच पन्नास रुपयांपर्यंत रक्कम ते म्हटल्यावेळी उसनी पण व्याजाऊ देत. वडिलांचे हिंडण्याफिरण्याचे काम असल्यामुळे ही उसनवारी करण्याचे कामहि पुष्कळ वेळां मातोश्रीकडे येई. पण तिच्या स्वभावाविषयी सर्व परिचित लोकांची आदरबुद्धि यामुळे तिने शब्द टाकतांच काम होई.

माझ्या आईची प्रकृति फार चांगली म्हणूनच तिला आमच्याकरितां इतके कष्ट करितां आले. तिला ८३ वर्षांइतके आयुष्य लाभले इतक्या वृद्धापकाळी ती भाकरी किंचित् मऊ करून खाई आणि वेळ पडला तर चुलीशी जाऊन चार माणसांचा सगळा स्वयंपाक करी ! तिने वडिलांबरोबर काशी–रामेश्वराची यात्रा केलीच, पण त्यांच्या पश्चातहि द्वारका, गोकर्ण इत्यादि यात्रा केल्या. आम्ही तिची व्रते केली तेव्हां तिला जन्माचे सार्थक झालेसे वाटले. ती स्वतःजवळ कधी पैसा-अडका फार ठेवीत नसे तथापि घरांत अगदी आयत्या वेळी कांही अडले तर हळूच आपली पुरचुंडी सोडून लागेल ते देई. " तुझा खजिना पाहू दे " असे आम्ही तिला थट्टेने म्हणावे, तेव्हा " मी आपला खजिना तुम्हाला कां दाखवीन ? तुमचा तुम्हाला पुष्कळ आहे " असे तिने थट्टेने म्हणावे, असे चाले. पुरचुंड्या लहानच पण आईची एक वेगळी व दादांची एक वेगळी अशी असे; तथापि कोणीहि आपल्या

पुरचुंडीतला पैसा दुसऱ्याला कळविल्याशिवाय खर्च करीत नसत. एकदां सोमवती अमावास्येच्या दिवशी आईच्या मनात एकशेआठ खण वायनादाखल द्यावे असे आले तेव्हां तिने सत्तावीस रुपये खर्चून खण आणून वायने दिली. ते दादांना न आवडून ते तिला म्हणाले, 'एवढा खर्च तू उगीच केलास. मला विचारले असतेस तर मी वेळीच नको म्हटले असते'. सौभाग्यवायनांना नांवे ठेवल्याचा आईला राग आला व तिने रागाने आपल्या हातातील पाटल्या काढून त्यांच्यापुढे ठेवल्या व म्हणाली, 'आतां तरी हरकत नाही ना ?' पण या कारणाने नाराजी कमी न होतां भांडण धुमसलेच. वास्तविक ती वायने देण्याची भर आईला माझ्या कुटुंबानेच दिलेली होती म्हणून तिने हा सर्व प्रकार मला सांगितला. तेव्हां मीहि दादांना थोडे रागावून बोललो आणि म्हणालो, 'आईने आजपर्यंत आमच्या-करतां पुष्कळ खस्ता खाल्ल्या आहेत, तेव्हा तिला वाटेल तो धर्मादाय आता करू दे. हे सत्तावीस रुपये मीच तिला देणार आहे. तिच्या शिलकेतील कमी होणार नाहीत.' पण अशा रीतीने सर्वजण आपल्यावर उलटल्याचे पाहून व आपला कमीपणा निघाला असे पाहून त्यांना राग आला, व दुसरे दिवसापासून कांही काळ त्यांनी घरची हिशेबाची वही पाहणे व मंडई करणे या दोन्ही गोष्टी सोडून दिल्या !

याच पाटल्यांचा आणखीहि एक वेळ असाच उपयोग करून तिने दादांचा बदला घेतला. तो प्रसंग असा. एकदां रिकामपणी कोकणाच्या कर्जातील गोष्टी निघाल्या असतां दादा एकदम सचिंत झालेले दिसले. त्यावरून आईने कल्पना केली की, हे कर्ज आपल्या हातून कसे फिटेल याची काळजी त्यांना फार लागून राहिली आहे. तेव्हां घरात जाऊन तिने आपल्या हातांतील पाटल्या काढून दादांच्या पुढे ठेवल्या आणि म्हणाली, "या विकल्या तर कर्ज फिटेल म्हणून विका, पण पुन्हा या कर्जाबद्दल चिंता बाळगू नका." आईने हक्काने आपल्या पाटल्या देऊ केल्या याचे कारण एक तर ते तिचे स्त्रीधन होते. पण शिवाय हे स्त्रीधन तिला आम्हा कोणाकडून मिळालेले नसून तिचा भाऊ आमचा मामा याने तिला दिलेल्या रकमेतून पाटल्या केलेल्या होत्या. अर्थात् दादांनी त्या घेतल्या नाहीत. पण त्या दिवसापासून त्यांनी आईच्या दृष्टीसमोर कर्जाविषयी चिंता केव्हांहि प्रकट होऊ दिली नाही. नैमित्तिक धर्मकृत्याकरितां स्वतःच्या शिलकेतला पैसा खर्च केला असतां आईला एक प्रकारे आनंद होई. ती १९२६ साली

वारली. यामुळे तिला माझा सर्व प्रकारचा उत्कर्ष पहावयास सांपडला. माझ्या गळ्यांत पडलेल्या पुष्प हाराचा सडा घरी अगणात येऊन पडला म्हणजे 'थांब, तो केर मलाच काढू दे' असे ती सुनांना म्हणे, व डोळ्यात आनदाश्रु आणी !

**माझे चुलते**—आमच्या दोघा चुलत्यांपैकी वडील केशवराव हे लहानपणापासून आमच्या वडिलांजवळच होते. त्यांचे शिक्षण पतोजीच्या शाळेपलीकडे गेले नव्हते. तथापि कारकुनी लिहिणे त्यांना बरे येई. मिरजेस पुष्कळ वर्षे भोकरे नाईक यांच्या कापडाच्या दुकानावर ते नोकर होते. मी सर्वांत लहान पुतण्या म्हणून मजवर त्यांची विशेष ममता असे. ते मजविषयी म्हणत की, "हा चारशे रुपये मिळविणारा मुनसफ होणार आहे !" त्यांचे हे भविष्य मुनसफीसबधाने नसले तरी पगारासंबधाने मात्र केसरीकडील माझे नोकरीअखेर खरे ठरले. रिकामे वेळी मी त्यांचे दुकानी जाऊन बसावे, व येतांना कापडाच्या ताग्यावरील चित्रे बाक्षिस घेऊन यावे. नवीन मालाच्या खरेदीच्या खेपा त्यांच्या दुकानी वर्षांतून पांच-चार वेळा होत; व त्या वेळी माझे एक प्रकारे सणासुगीचे दिवस असत. कारण दुकानचे मालक काका भोकरे हेहि मला कौतुकाने ये बैस म्हणत. आणि नव्या खरेदी मालाची बारदाने सुटली म्हणजे एकादे नवे चित्र, पेपरमिंट, किंवा लेमोनेडची एकादी वडी, गुलाबी सरबताचा एकादा चमचा, अशी बाक्षिसे मला मिळत. पुण्याच्या चित्रशाळेतील तसबिरी त्यावेळी मिरजेस प्रथमच आल्या. त्यांतील रामपचायतन हे फारच लोकप्रिय होते, व या तसबिरी दुकानांत लावलेल्या पहावयास मिळत ही माझी भारीतली भारी करमणूक होती.

चुलते केशवराव यांची प्रकृति प्रथमपासून सुमार. ती माझ्या वडिलांनी पेन्शन घेण्याच्या आधीपासून बरीच बिघडली. बारा वर्षे पोटांत कधी धड अन्न गेले नाही, अशा स्थितीत त्यानी काढली. वडील मोडलिब्यास मामलेदार होऊन गेले तेव्हां मी चुलत्यांजवळ एक-दीड वर्ष राहिलो होतो. तेव्हां संध्याकाळी घरी आल्यावर कांदे घातलेले ताजे फोडणीचे वरण आपल्याच हातांनी करावे व दोनप्रहरची भाकरी त्याबरोबर खावी आणि मग शेजारी अभ्यासास जावे, असा माझा क्रम असे. चुलत्यांच्या शुश्रुषेचे कष्ट आमच्या चुलतीस फारच जन्मभर पडले. चुलते वारल्यावर त्यांचा मुलगा दत्तात्रय हा लहानपणापासून आमचेकडेच येऊन राहिला. आतां तो मुंबईस रामनारायण रूइया कॉलेजांत प्रोफेसर आहे.

आमचे धाकटे चुलते हरिपंत यांनी साक्षरहि न होतां जन्म घालविला. त्यांना आजोबांनी देशावर माझ्या वडिलाकडे विद्येकरिता म्हणून पाठविले. परतु त्यांच्या नशिबी विद्या नव्हती; व कोकणांतहि आजोबांजवळ कोणी राहण्यास पाहिजे, म्हणून हरिकाका यास परत पाठविण्यांत आले. त्यानी जन्मभर शेती केली पण त्यांतहि त्यांची मति विशेष चालत नसे. आजोबा हयात असतां व त्यांच्य पश्चातहि, प्रथम आमच्या वडिलानी व त्याच्या पश्चात् वडील बंधु आप्पासाहेब यानी कोकणात सालिना पन्नास-पाउणशे रुपये पाठविण्याचा क्रम सुरू ठेविला होता. आजोबांच्या अखेरच्या दिवसात व हरिकाकांच्या कारकीर्दीच्या प्रारभी कर्ज होऊन कांही शेते गहाण पडली होती. चुलतचुलत्याशी वांटण्या या पूर्वीच झाल्या होत्या व केशवराव हे दत्तक होते. तथापि वडील व दोन चुलते या तिघाच्या मिळून तक्षिमा एकत्र सारख्या ठेवून, वडिलांनी पुढ कर्ज वारून तिघाच्या तीन वाटण्या केल्या. हरिकाका हे घरी राहून देव सभाळणार व त्यांना निर्वाहाला इतर साधन नाही म्हणून या तिन्ही तक्षिमा त्याच्याकडे भोगवट्यास दिल्या. तथापि कोकणची शेती एकदा खालावली ती खालावलीच. पूर्वी जेथ वीस मनुष्याचे कुटुब पोटभर खाई तेथे आता तीन मनुष्याचाहि उदरनिर्वाह होईनासा झाला. स्वतःच्या योजनेने काही मिळवावे म्हणून केव्हा दुकान घाल, केव्हा भाड्याची गाडी ठेव, असे व्यापार चुलते करीत. पण ते नेहमी आतबट्ट्याचे व्यापार ठरत; व दर पांच वर्षांनी चुलते देशावर भेटावयास आले, किंवा वडील कोकणात गेले, म्हणजे तोवर झालेले नवे कर्ज वारून चुलत्यांच्या संसाराची घसरलेली गाडी फिरून रुळावर उचलून ठेवावी असे प्रायः घडे. वडिलानी शेवटी कटाळून कोकणचा नाद सोडला, व कुलदेवीच्या देवळाचा जीर्णोद्धार करावयास घेतला असतां त्यातहि गावकरी जेव्हां आडवे आले तेव्हां त्यांनी कोकणचे नाव कायमचे सोडून दिले !

हरिकाका जन्मभर कोकणांत राहिले तरी त्याच्या दोघां मुलांच्या शिक्षणाची सोय सागलीस त्यांचे जावई गणपतराव वझे याच्याकडे झाली. वडील मुलगा सदाशिव याने पुण्यास बी. एस्सी पर्यंत अभ्यास केला. परंतु असहकारितेच्या काळांत त्याने तो अभ्यासक्रम सोडून देऊन वझे यांच्याबरोबर केमिस्टचा कारखाना आमच्याच घरी काढला. या धद्याने त्याला चांगला हात दिला. नतर त्याने मुंबईस तोच धंदा सुरू करून, 'सरस्वती केमिकल वर्क्स' नावांरूपाला आणून, मुंबई, बंगलोर, मद्रास येथे दुकाने घातली. आणि आतां मुबईस त्याने सुमारे दीड-

दोन लाख रुपयाची इस्टेट केलेली असून 'भागीरथी भवन' नांवाचे घर बांधून जन्मभर कोकणचे दारिद्रय भोगावे लागलेल्या आपल्या आईचे वृद्धपणी पांग फेडले. धाकटा मुलगा त्याच्या बहिणीने दत्तक घेतला त्याचीहि इस्टेट बरी आहे. अवघ्या १८ वर्षात हे सर्व स्थित्यंतर झाले. याचे श्रेय मुख्यतः सदाशिवाच्या हुषारीला व उद्योगप्रियतेलाच द्यावे लागेल.

**माझें आजोळ**—माझे आजोळ देवगड तालुक्यात वानिवडे गांवाजवळ मोंड येथें असल्याचे वर सांगितलेच आहे माझ्या आजोबाचे ( मातामहाचे ) नांव विनायकपंत ऊर्फ सोनोपंत असे होते. माझी आजी विजयदुर्ग जवळील खोल या गावच्या गोखले घराण्यापैकी. मिरजेचे प्रसिद्ध गवई महादेवबुवा यांची ती बहीण या भिडे घराण्याच्या दोन शाखा अद्यापि मोंडास आहेत. यातल्या एका शाखेचे प्रतिनिधि विनायकपंत. त्याना दोनच मुलं थोरली मुलगी काशीबाई, ही माझी आई, आणि दुसरे मूल विष्णुपंत हा एकच मुलगा माझी आई देशावर कायमची राहावयास आल्यानंतर आमचे आजोबा हे कुटुंब व मुलगा घेऊन, मोंड येथे निर्वाह नीट होईना म्हणून, फोंड्याजवळ गडमठास जाऊन राहिले. गडमठ हा कोकणी गांव बेडकीहाळकर देसाई यास इनाम होता. बेडकीहाळ हा गांव कुरुदवाडा-जवळ चिकोडी तालुक्यात आहे इनामदाराकडून आमच्या आजोबांनी काही जमीन फार थोड्या भाड्याने घेतली व तिजमध्ये दोन विहिरी काढून त्यावर शेतीभाती केली. ही शेतवाडी गडमठ गांवापासून किंचित अंतरावर असे एक दोन कुण-ब्यांच्या बिऱ्हाडाशिवाय त्याना आसपास सोबत नव्हती. त्यांच्या शेताला लागून एक मोठी राई होती तिला ब्रह्मन देवाची राई म्हणत या राईत आंब्याकाजूची झाडं बरीच असत व तेथे वानराची वस्ती असे मी माझे आठवणीत आजोळी दोनदां गेलो. पैकी दुसरे वेळी गेलो तेव्हा मी इंग्रजी तिसऱ्या इयत्तेत होतो म्हणून मला तेथील आठवण चांगली आहे

आमचे आजोळचे आजोबा देशावर कधी फारसे आले नाहीत. आजीबाई मात्र एकदा आलेल्या स्मरतात. आमच्या मामांच्या पहिल्या कुटुंबाचे डोळे गेल्या-मुळे त्यांनी दुसरे लग्न केले होते. पुढे आजोबा व आजीबाई वारल्या. मामांना मुलगा झाला होता तोहि वारला मुलगी वाराणसी तिचे लग्न होऊन ती कोकिसऱ्यास गेली, व कालांतराने कुटुंबसुखांत अनेक प्रकारचे व्यत्यय येऊन, ती सर्व शेतीभाती

सोडून, मामा विरक्त होऊन, मी सातान्यास वकील असतां, अखेरचे देशावर आले. प्रापंचिक दुःखामुळे त्यांना गांजा ओढण्याचे व्यसन लागले होते व किंचित् डोकेहि बिघडण्याच्या स्थितीस आले होते सातान्यास आमच्याजवळ त्यांनी स्वस्थ राहावे असा आमचा त्यांना आग्रह होता व तो प्रथम त्यानी कबूलहि केला. पण एके दिवशी शेजारचे स्नेही वकील काका कुबेर विनोदाने त्यांना कांही बोलले ते त्यांनी मनाला लावून घेतले; व दोन प्रहरी अवचित यात्रेला जाण्याचा निश्चय करून कपड्यांचे लहानसे गाठोडे व काठी घेऊन 'मी येतो' इतकेच म्हणून, आम्ही सर्वजण 'नको नको' म्हणत असता, निश्चयाने निघाले. ते पाहून आम्हा सर्वांच्या डोळ्यांना पाणी आले, पण मामा परत फिरले नाहीत.

ते तेव्हां जे गेले, त्यांचा त्यानतर आम्हाला केव्हांहि पत्ता लागला नाही पुढे आम्ही १९०५ साली घरची सर्व मडळी घेऊन काशी-प्रयागच्या यात्रेला गेलो, तेव्हां मामांची आठवण होऊन, ते चुकून एखाद्या सन्याशाच्या किंवा गोसाव्याच्या वेषांत भेटतील काय अशा आशेने, येणार जाणार यात्रेकरूकडे व धुनी पेटवून बसलेल्या गोसाव्याकडे न्याहाळून पाहण्याची माझ्या नजरेला जणु काही दिवस सवयच लागून राहिलेली होती! पण मामा कोठेहि आढळले नाहीत, व ते जरी आईपेक्षा वयाने लहान तरी आता कोठे हयात असतील हे शक्यच नाही. कारण आईच १९२६ साली ८३ वर्षांची होऊन वारली. १९०९ साली मी कोकणात गेलो, तेव्हा वानिवड्याहून कासारड्यावरून कोकिसऱ्यास मामेबहिणीस भेटावयास गेलो. तेव्हा वाटेजवळच दोन मैलांवर गडमठास जाऊन, आतां तेथे सर्व उध्वस्त झाले आहे तरी ती आजोळची जागा एकदा पहावी असे मनांत फार आले, म्हणून ती डोळेभरून पाहून घेतली.

**कौटुंबिक कर्ज-वाम**—वडिलांनी पेन्शन घेण्याच्यावेळी कोकणांतील आमच्या सर्व कुटुंबाची मिळकत व स्थिति काय होती हे याखालीं थोडक्यात सांगतो, व त्याकरितां प्रथम वडिलांच्या हातचे व्यवस्थापत्र देतो.

श्रीराम

ता. १७।७।९१

यादी चिंतो लक्ष्मण केळकर राहणार मौजे वानिवडे, तालुका देवगड, जिल्हा रत्नागिरी, हल्ली मुक्काम मिरज, यानी वयाचे मान मनांत आणून घरप्रपंचसबंधी व्यवस्था करावयाची ठरविली. त्याजबाबत कलमे:—

१ आम्हापाशी शिल्लक अगर दागदागिने नाहीत. कोकणांतील कर्ज एका गृहस्थाशिवाय बाकीचे आम्ही वारले आहे. आता तेथील कर्ज केशव आबाजी यांनी रु. ५७५ व हरि लक्ष्मण यांनी रु ३०७ असे रु. ८८२ गहाणावरील वगैरे द्यावयाचे असून, आम्ही रक्कम रु. ३५० व सागलीचे रु. ५० आणि एथील रु. ३३ असे रु. ४३३ देणे आहेत. मिळून कर्जाची रक्कम रु. १३१५ जाहली.

२ कोकणांतील कर्जासंबधी सर्वत्रांची खते आहेत. पण विभाग निराळे जाहले असल्याने ज्याचे त्यानी आपापले हिस्से काढून घेऊन ती खते सोडवून घ्यावी.

३ चि॥ हरि व केशव यांचा सर्वच खर्च दुसऱ्यांकडून निभावेल असा प्रकार नाही. तरी मनुष्यधर्म आहे. अनुकूलतेनुरूप त्यांजकडे पाहणे हे आमचे काम आहे कोकणांत जे उत्पन्न आहे ते विशेष नाही तरी जे आहे त्यांत सरकार वारून नफा राहील तो धरून उभयतास मिळून सालिना रु. १२० ची भरती आमचे त्रिवर्ग चिरजीवांनी करून द्यावी, व कोकणांतील व्याज आम्ही परभारे द्यावे. कर्जाची रक्कम जसजशी कमी होईल, तसतसे व्याजहि कमी होईल.

४ श्री देवी पोन्हणाबाईचे रु. ५५ द्यावयाचे आहेत. ते चि॥ महादेव यानें कबूल केल्याप्रमाणे बॅकेत ठेवावे.

५ रक्कम रु. ३५० कोणाची हे चिरजीवांस माहित असून तिचा उपयोग विद्येकडे झालेला असल्याने सवडीप्रमाणे वरचेवर मोकळी करावी. बाकी रु. ८३ हे आम्ही सवडीने देऊ. रक्कम विशेष नसून त्यास मुदतहि आहे.

६ प्रथम कलमांतील रक्कम रु ८८२—हे एकदम फिटण्याजोगे नाहीत, तरी सवड होईल तसे वरचेवर फेडावे, व शेत उभयतां चुलत्यांची मोकळी करून घ्यावी. जसजशी गहाणे सुटली जातील तसतसे खडाचे उत्पन्न जास्ती येईल. त्यामुळे रु. १२० चा बोजा कमी होऊ लागेल, व एरवींचे कर्ज फेडले असतां आम्हांस व्याज पाठविण्याचा बोजा कमी होईल. ज्या वेळेस रक्कम द्यावयाची त्या वेळेस, शेते पुन्हां दुसरीकडे ठेवणेस उभयतां काकांस सवड न राहील अशी तजवीज करावी. ''

हे वडिलांच्या हातचे टिपण आज माझ्याजवळ अस्सल आहे. या टिपणावरून कौटुंबिक संपत्तीच्या स्थितीची कल्पना वाचकांस स्थूलरूपाने येईलच.

तथापि, या टिपणांतील फलितार्थ काय होता व अखेर काय झाले हे थोडक्यांत सांगतो. वडिलांनी पेन्शन घेतल्यावर कोकणांत कधी न जाता देशावरच मुलां-जवळ राहण्याचा निश्चय केला. यावेळी माझे धाकटे चुलते हरिपंत सहकुटुंब कोकणात कायमचे राहून, घर, शेत व जमिनी संभाळीत होते आणि माझे दुसरे चुलते केशवराव हे सहकुटुंब मिरजेस असून कायमचे आजारी झाले होते. वरील यादीत आढावा काढल्याप्रमाणे एकंदर कुटुंबास कर्ज १३१५ रुपये होते. त्याची वांटणी अशी की, ३५० रुपये आम्हा मुलाच्या शिक्षणावर इकडे खर्च झालेले, व बाकीचे सर्व कोकणापायी! केशवराव यांच्या नांवचे खाते कोकणांत नव्हते त्यांचा सर्व जन्म मिरजेस आमच्याजवळ गेला म्हणून त्यानी यापुढे कोकणात कर्ज करण्याचा संभव नव्हता. पण देशावर ते मिरजेस राहणार व आम्ही साताऱ्यास राहणार, तेव्हां तो आमच्याच कुटुंबाचा भाग समजून त्यांच्या आजारात चार माणसाचा खर्च चालविण्याइतके पैसे आम्हापैकी कोणाला तरी त्यांना पाठवावे लागत. त्याचे स्वतःचे उत्पन्न शून्यावर आले होते हा बोजा केशवराव याच्या मृत्युपर्यंत आम्ही सोसला, व त्यानतर त्याची मुले माणसे आम्ही पुण्यास आणली. त्यांचा मुलगा दत्तात्रय याचे शिक्षण बी. ए. पर्यंत मजजवळ पुण्यास झाले. केसूकाकांच्या मृत्युनतर त्याच्या दोन मुलींची लग्ने वडिलांनीच केली. हरिकाका कोकणांत राहून आमची इस्टेट सभाळीत होते, त्यांना उद्देशूनच कर्ज काढण्याची सवड ठेवू नये हे वरील व्यवस्थापत्रांतील शब्द आहेत. तीन तक्षिमाचे सर्व उत्पन्न त्याना घेण्यास सांगून शिवाय दरसाल ७५ रु. त्यांना कोकणात आमच्याकडून जात. त्यांच्या मृत्युनंतर त्यांची मुले व शेवटी त्यांचे कुटुंब, सांगलीस येऊन राहिले. या दोन गोष्टी झाल्यावर आम्हाला कोकणांत सालोसाल पैसे पाठविण्याचे कारण उरले नाही. पण उलट तेथे संभाळणारे कोणी पुरुषमनुष्य नाही म्हणून कोकणचे उत्पन्न घटत चालले. आमचा थोडाबहुत खड पण तोहि न देण्याची सवय तेव्हांपासून कुळांना लागली. ती आतां वाढतच चालली आहे !

कर्जातील ३५० रुपयांची रक्कम आमच्या शिक्षणाकरितां खर्च झालेली म्हणून ती फेडणे हे आम्हा त्रिवर्गबधूंचे कर्तव्य क्रमप्राप्तच होते. आणि कोकणचे कर्ज सर्व आपल्या शिरावर आहे असे मानण्याचे वडिलांना कांही कारण नव्हते. कोकणची मिळकत जशी पुढच्या पिढीला मिळणार तसे त्यावरील कर्जहि तिनेच फेडणे योग्य होते. परंतु वडिलांची वृत्ति स्वाभिमानी. आपले दोघे बंधु असहाय्य.

म्हणून त्रिवर्गांच्या कर्जाचा बोजा त्यांनी आपलेच शिरावर घेतला. त्यांनी आयुष्यात एकच महत्त्वाकांक्षा धरली होती. ती ही की, "मी कोकणचे कर्ज फेडून मिळकत मोकळी केली म्हणजे माझ्या जन्माची इतिकर्तव्यता झाली." परंतु ज्याचे त्याला जाणवावे ही गोष्ट ओघाने प्राप्त. यामुळे नावाला तरी तीन तक्षिमांची आणि त्यांवरील कर्जाची वांटणी करावी असे त्याना वाटले. ती झाल्यावर हरिकाकांनी पुढे तरी कर्ज करू नये याकरिता ता. १५ मार्च १८९३ रोजी वडिलानी हरिकाका याचा हिस्सा, त्यावर ३०० रुपये कर्जाचा बोजा ठेऊन, स्वतःच्या नावे गहाण लिहून घेतला. अर्थात् हा सगळा व्यवहार औपचारिकच होता. १८९८ च्या सुमारास आम्ही त्रिवर्ग बधूनी मिळून कोकणचे सर्व कर्ज फेडून वडिलांना ऋणमुक्त केले व त्याना मिळणारे १५ रुपयांचे पेन्शन त्यानी स्वतत्रपणे स्वतःजवळच ठेवावे असे त्यांस सांगितले. वडीलमातोश्रीजवळ यापुढे जी थोडी बहुत खाजगी शिल्लक राही ती याच पेन्शनीच्या रकमेची !

असो. दोन वर्षापूर्वी या तीनहि तक्षिमा वडील पुतण्या केशव नारायण याच्या एकट्याच्या मालकीच्या मी केल्या व कोकणांतील सर्व व्यवहाराला मिळून एकच गांठ घातली. हल्ली आम्हां कोणाला कोकणांत कांहीच पाठवावे लागत नाही. उलट तेथील उत्पन्नाची एक पैहि देशावर आमच्याकडे कधी येत नाही. तेथील मिळकतीची सर्व व्यवस्था आमचा चुलत भाऊ शकर विश्वनाथ याजकडे दिली आहे. उत्पन्नांतून शेतसारा वजा जातां उरेल ते घरच्या देवांची नित्य पूजा व्हावी याकरिता त्याकडे लावून दिले आहे. आज आमचे कोकणचे घर जमीनदोस्त झाले आहे. ते लहानसे नवे बाधण्याचा विचार आहे. जुन्या चौथऱ्यावर देवांना निवारा व आम्ही कधी कोणी गेल्यास आम्हाला दोन दिवस राहण्याला जागा सत्तेची असावी एवढाच या नवीन योजनेचा हेतु आहे. अशा रीतीने वानिवडे एथील मिळकतीची व्यवस्था आपल्या हाताने करून मी मोकळा झालो आहे. आणि वडिलांचे हेतु पूर्णपणे तडीस नेल्याचे समाधान आम्ही पुढील पिढीचे लोक उपभोगीत आहो.

**सर्वांत वडील बंधु नाना**—माझी धाकटी बहीण वाराणसी हरिपुरास केतकरांकडे दिली होती. ती एक दोन मुले होऊन विसाव्या वर्षाच्या आंत वारली. तिच्या संबंधाने इतकेच सांगावयाचे की आम्हां सर्व भावडांत तिचा स्वभाव अत्यंत गरीब होता. येवढे सांगून आतां भावांच्या हकीकतीकडे वळतो.

माझे सर्वांत वडील बंधु नारायण चिंतामण केळकर हे स. १८६६ साली कोकणांत जन्मले. त्यांचा मराठी पाचव्या इयत्तेपर्यंतचा अभ्यास मोडलिंबे येथील संस्थानी मराठी शाळेत झाला. तेथे मराठी सहाव्या म्हणजे तेव्हांच्या व्हर्नाक्युलर फायनलच्या परीक्षेच्या शिक्षणाची सोय नव्हती, मग इंग्रजी शिक्षणाची सोय कोठून असणार ? ते जात्या बुद्धिमान असल्यामुळे त्यांना इंग्रजी शाळेत घालावे अशी आमच्या वडिलांना सहजच इच्छा होती. पण वरील नडी-मुळें नानांना शाळा सोडून घरी बसावयाचे नाही म्हणून फिरून त्याना मराठी पांचव्या इयत्तेचाच अभ्यास करावा लागला ! एकाच इयत्तेचा अभ्यास फिरून करणे याचा अर्थ काय ? पण शाळा सोडून तरी काय करावयाचें ? घरी रिकामे बसण्यापेक्षां शाळेत गेलेले बरें. अशा चालढकलीत त्यांचे एक वर्ष फुकट गेले. पण पुढे तरी यांतून काही तोड काढलीच पाहिजे अशा विचाराने वडिलांनी नानांना सोलापूर येथे इंग्रजी शाळेत घालण्याचे ठरविले. पण खर्चाची व्यवस्था काय ? कारण वडिलांना अवघा १२ रुपये पगार. पदरी तीन मुले आणि शिवाय कोकणांत आमच्या आजाना गृहप्रपंच चालविण्याला दरवर्षी ४०-५० रुपये तरी पाठवावे लागत. यामुळे सोलापुरास नानांना खाणावळीत जेऊन ठेवण्याला लागणारे १०-५ रुपये मिळणे अशक्य. मधकुरी मागून रहाणे हाच एक मार्ग. आणि तोच स्वीकारणे प्राप्त होते म्हणून, डोळ्यातील पाणी खळत नसतां, तसा निश्चय करून वडिलांनी सोलापुरचे प्रस्थानहि ठेविले.

परंतु इतक्यांत वडिलांची बदली मिरजेस म्हणजे इंग्रजी शिक्षणाची सोय असणाऱ्या गांवी झाली ! यामुळे नानांची मधुकरी टळली ! मिरजेस आल्यावर हायस्कूलमध्ये त्यांचे शिक्षण एकसारखे होत गेले. मधून मधून एखादी लहानशी स्कॉलरशिपहि मिळे. सन १८८४ साली ते मॅट्रिकची परिक्षा पास झाले.

१८८५ साली त्यांनी, आमचे चुलत चुलते विश्वनाथ त्रिंबक केळकर हे कोल्हापुरास सरकारी कचेरीत कारकून होते त्यांच्या घरी राहून, पी. ई. चा अभ्यास केला. त्या साली १० रुपयांची गोखले स्कॉलरशिप त्यांना मिळत होती पण ते त्या वर्षी पी. ई. च्या परीक्षेत नापास झाले. १८८६ साली त्यांना वडिलांनी आपल्या खर्चाने पुण्यास फर्ग्युसन कॉलेजांत ठेवले व ते पी. ई. परीक्षा पास झाले. १८८७ साली डेक्कन कॉलेजमधून पहिल्या बी. ए.ची आणि १८८८



तिघे केळकर बंधु—( वाचकांच्या डावीकडून उजवीकडे )
१ महादेव चिं. केळकर, २ नारायण चिं. केळकर,
३ नरसिंह चिं. केळकर (सन १९०४)

( पृ. ८० )

साली दुसऱ्या बी. ए.ची परीक्षा पास झाल्यावर १८८९ साली मुंबईस राहून कांही शिकवण्या पत्करून एल्‌एल्. बी.ची एक टर्म त्यांनी भरली परंतु मागे गृहप्रपंचाची ओढ म्हणून कायद्याचा अभ्यास सोडून देऊन रामदुर्ग (संस्थान) येथील इंग्रजी शाळेची हेडमास्तरची नोकरी ४० रुपयांवर त्यांनी पत्करली.

१८९१ सालच्या अखेरीस सातारा येथील सरकारी हायस्कुलांत ५० रुपयांवर असिस्टंट मास्तर म्हणून त्यांची प्रथम हंगामी व नंतर कायमची नेमणूक झाली त्यापुढे तेरा वर्षे त्यांनी पुणे, धुळे, सातारा वगैरे ठिकाणी हायस्कुलांत नोकरी केली आणि १९०४ साली ऑगस्ट महिन्यांत धुळे येथ फर्स्ट असिस्टंटच्या जागेवर असता विषमज्वराने त्यांना देवाज्ञा झाली मध्यंतरी पुणे हायस्कुलांत नोकर असतां सुमारे दोन वर्षे भोर संस्थानचे तेव्हाचे युवराज श्री बाबासाहेब पंतसचीव यांचे टयटर म्हणून त्यांना नेमण्यात आले होते आणि उत्तम सल्लागार, स्नेही व शिक्षक या नात्याने त्यांच्यावर युवराजाची फार मर्जी आणि आदरबुद्धि असे. अजूनहि श्रीमंत बाबासाहेब ती नाना यांची आठवण काढतात आणि श्रीमंत बाबासाहेब यांचा व स्वतः माझा परिचय व स्नेह झाला तो नानाच्यामुळेच.

हायस्कुलामध्ये नाना हे विद्यार्थ्यांना अत्यंत प्रिय असत याचे कारण ते शाळेत शिकविण्याचे काम तर फार चांगले करीतच, पण सामान्य शिक्षकांमध्ये जी गोष्ट प्रायः आढळत नाही तीहि ते करीत म्हणजे आपल्या वर्गात व वरच्याहि एकाद्या वर्गात जे विद्यार्थी होतकरू, सुस्वभावी व उद्योगशील असे आढळत त्याना घरी बोलावून शिक्षणाच्या कामी मार्गदर्शन करीत आणि एखाददुसऱ्या गरीब विद्यार्थ्याला फी देणे, घरी वार देणे, किंवा क्वचित् कांही दिवस घरीच जेवावयास ठेऊन घेऊन त्याजकडून विशेष अभ्यास करवून घेणे इत्यादि प्रकारे साहाय्य करीत. मुलांनी वर्गातील अभ्यासाशिवाय इतर कांही वाचन करावे, एखादा इतर विषय शिकावा, किंवा शाळेतलाच पण सार्वजनिक स्वरूपाचा उद्योग पत्करावा म्हणजे त्यांना चांगले वळण लागेल, असे त्यांना वाटे. यामुळे अनेक विद्यार्थ्यांची येरझार त्यांच्या घरी असावयाची पुणे, धुळे, सातारा येथील हायस्कूलच्या हेडमास्तरानी त्यांच्या बदलीच्या वेळी खाजगी रीतीने घरी मुले बोलावून त्यांचा सत्कार करावा व लेखी मानपत्र द्यावे असे होई धुळे हायस्कुलांतून १८९६ सालच्या जुलै महिन्यांत त्यांची बदली झाली तेव्हां के. सिद्धनाथ धोंडदेव गरुड यांच्या अध्यक्षतेखाली विद्यार्थ्यांनी नाना यांना थाटाची पार्टी दिली त्या वेळी गरुड यांनी गुणवर्णनपर

असे एक भाषण करून एक मानपत्रहि दिले त्याविषयी गरुड यानी लिहिलेले पत्र मजजवळ आहे. त्यात नानाच्याविषयी विद्यार्थ्यांच्या मनात असलेल्या प्रेमादराचा उल्लेख आहे हे गरुड म्हणजे १९०९ पासून पुढे काही वर्षे मुबई कायदे-कौन्सिलाचे सभासद व धुळे येथील लोकलबोर्डाचे अध्यक्ष व शेवटी सस्थान देवास येथे दिवाण होते.

नाना हे केवळ विद्यार्थ्यातच नव्हे तर ते ज्या शहरी नोकरीस राहून त्या गांवातील समाजालाहि मोठे प्रिय असत शहरांत पूर्वीचा सामाजिक क्लब नसेल तेथे तो काढण्याची ते खटपट करीत किंवा पूर्वीचा क्लब असल्यास त्याच्या सेक्रेटरीचे कामहि हळुहळू त्याजकडे येई सध्याकाळचा उरलेला सर्व वेळ ते अशाप्रकारच्या सार्वजनिक कार्यात घालवीत सातारा येथील युनियन क्लबच्या स्थापनेचे काही श्रेय त्यांनाच होते, आणि त्याच्या स्मरणार्थ क्लबाने आपल्या जागेत त्याची तसबीर लावून ठेवलेली होती अवातर वेळात निरनिराळ्या विषयावरील पुस्तके व वर्त-मानपत्रे वाचणे ही त्याच्या आवडीची गोष्ट होती ते सतत 'केसरी'चे वर्गणीदार असत. आणि त्याच्यामुळेच बी. ए झाल्यापासून 'केसरी'च्या वाचनाचा नाद मला लागला.

सातारा येथे एक लहानसे वाङ्मयचर्चामडळ होते. त्यापुढे मधनमधन एखादा निबध लिहून वाचून दाखविण्याला मला ते आपण होऊन प्रोत्साहन देत. सातारा येथील गवई नरहरबुवा मटगे याचा व नानाचा अत्यत ऋणानुबध. मटगे हे आपल्या विद्येत निष्णात परतु कुग्रामवस्तीमुळे मागसलेले, असे पाहून नाना यानी त्यांना अशी कल्पना सुचविली की, “मी काही महिने रजा काढून तुम्हाला घेऊन कांही प्रमुख शहरी हिंडतो तेथे तिकिट लावून तुमचे सार्वजनिक जलसे करतो. म्हणजे तुम्हाला द्रव्यलाभ होईल आणि कीर्तिलाभहि होईल. तुमच्या सेक्रेटरीचे काम मी निर्वेतन करीन.” मटगेबुवा यांना ही कल्पना मानवली नाही. तिकिट लावून नाटकगृहात जलसे करण्याच्या कल्पनेने त्यांच्या अंगावर शहारे आले आणि प्रयोग न होतांच ती योजना निकालांत निघाली. परंतु ही गोष्ट येथे सांग-ण्याचे कारण इतकेच की गवई लोकांनी तिकिटे लावून नाटकगृहात किंवा सार्व-जनिक जागेत जलसे करण्याची कल्पना ४५ वर्षांपूर्वी प्रचलित नव्हती. ती चांगली आणि पुढे रूढ होणारी आहे अशी अटकळ नाना यांनी मात्र तेव्हाच बांधली होती.

नानाच्या विद्याव्यासंगांत मुख्य दोन विषय असत. एक सहज सोप्या भाषेत लिहिलेले भौतिक शास्त्रावरील ग्रंथ. त्याची गोडी स्वतः घेऊन ते विद्यार्थ्यांनाहि लावीत. आणि दुसरा विषय जुन्या मराठी कवींचे काव्य. या विषयाचे संशोधन करण्याचा त्यांना नाद असे. आणि या व्यासंगातच वाई येथील जुने सुप्रसिद्ध साहित्यिक रा. नाना गद्रे ( महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग या पुस्तकाचे कर्ते ) आणि कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचा आणि नानांचा स्नेह जमला तो अखेरपर्यंत टिकला. राजवाडे हे नानांना फार चाहत आणि नानांनीच प्रथम सातारचे सुप्रसिद्ध इतिहासभक्त दत्तात्रय बळवंत पारसनीस यांच्या मध्यस्तीने, राजवाडे यांना मुंबईचे दानशूर इतिहासभक्त शेठ पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्याकडून एक देणगी मिळवून दिली. तिचा उपयोग राजवाडे यांना आपल्या ऐतिहासिक पत्रांचा पहिला खंड छापण्याच्या कामी झाला. नाना यांच्या बहुश्रुतपणामुळे आणि विशेषतः जुन्या मराठी कवितांच्या संशोधनाच्या आवडीमुळे सन १९०१ साली, मुंबई येथील निर्णयसागर छापखान्याचे मालक तुकाराम जावजी हे 'काव्य-संग्रह' नावाचे मासिक पुस्तक काढीत, त्याचे संपादकत्व नाना यांना देण्यांत आले. या मासिकाचे पूर्वीचे संपादक नागपूर येथील विद्वान् शिक्षक वामन दाजी ओक होते. त्यांच्या नंतर ते काम कांही दिवस कै. प्रो. चिंतामण गंगाधर भानू यांच्याकडे होते. १८९७ च्या पुण्यातील शिवाजी उत्सवाच्या प्रसंगी भानू यांनी जे एक व्याख्यान दिले त्याकरितां त्यांच्यावर मुंबई सरकारचा राग झाला होता. आणि या रागाचे आपल्याकडून किंचित् परिमार्जन करावे म्हणून डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या चालकांनी प्रो. भानू यांना कांही कालपर्यंत रजा घेण्यास भाग पाडले होते. या अज्ञात-वासाच्या काळांत प्रो. भानू यांनी भगवद्गीतेवरील मराठी भाष्य लिहिणे इत्यादि जे उद्योग केले त्यासारखाच काव्यसंग्रहाच्या संपादकत्वाचा एक उद्योग होता. पण पुढे भानू यांनी ते काम सोडले आणि त्यांच्याच शिफारशीने नाना यांना ती जागा देण्यांत आली. हे काम मृत्युपर्यंत त्यांच्याकडेच होते.

या अवधींत नाना यांनी काव्यसंग्रहाचे संपादकत्व चांगल्या रीतीने केलेच, पण याशिवाय जुन्या कवींसंबंधाने संशोधनात्मक अशी कित्येक पत्रे त्यांनी केसरींत वेळोवेळी प्रसिद्ध केली. वामन दाजी ओक यांनीहि आपलें काम चांगले केले होते, परंतु त्यांत एक दोष असा असे की, ते मोरोपंतादि कवींच्या कवितासंबंधी ज्या टीपा म्हणून देत त्यांचे वाजवीहून फार मोठे भारूड होई. 'मिया

मूठभर आणि दाढी हातभर' अशी टीका वाचक त्यांच्या टीपांवर करीत आणि छापखानेवाल्यानाहि ती गोष्ट मासिकाची पृष्ठे बेसुमार वाढत गेल्याने आवडेनाशी झाली होती. हे लक्षात येऊन नानानी टीपाप्राचुर्याचा हा दोष पुष्कळसा काढून टाकला काव्यसंग्रहाची प्रुफे वगैरे वाचण्यात मी नानास मदत करीत असे.

या मासिकाच्या कामामुळे वऱ्हाड-नागपूर प्रांताकडे नाना यांना समव्यवसायी असे बरेच स्नेही लाभले. त्या प्रांती मराठी जुन्या कवींच्या काव्याची बाडे उप लब्ध होतात म्हणून नानानी तिकडे बराच पत्रव्यवहार केला होता तोंडओळख नसताहि ज्याचे सहाय्य नाना याना लाभले त्यातील दोन नावे मला चागली स्मरतात. १ डी. कृष्णराव आणि दुसरे वर्णी येथील माधव नारायण डाऊ पैकी रा. डाऊ याचे ता १५ एप्रिल १९०४ रोजचे एक पत्र जसेच्या तसे खाली देतो, त्यावरून लक्षात येईल ते असेः—

"के ओकाच्या पश्चात् कोणत्याच प्रकारे न्यून पडू न देता नेटाने आपण 'काव्य सग्रह' काढीत आहा याबद्दल प्रथम आपले अभिनदन करून मजजवळ असलेल्या कांही मराठी कवितेसबधी माहिती आपल्यास देतो खाली जी अप्रसिद्ध म्हणून काव्याची यादी दिली आहे त्यातील काही छापली असल्यास कळवावे. यथाशक्ति काव्य सग्रहकारास मदत करण्याचा माझा सकल्प आहे. मजजवळ असलेल्या काव्याची विल्हेवारी खाली लिहिल्याप्रमाणे—

**कवि**—काव्यांचे नाव—सख्या—काळस्थळ

**१ जगन्नाथ**—या कवीचे महाभारतावर व रामायणावर चौक आहेत. सभापर्व, वस्त्र-हरण, उद्योग, द्रोण, कर्ण, भीष्म, शल्य, रामाश्वमेध चौक, गज-गौरी, लावण्या, पदे. या कवीचे ग्रथ बरेच आहेत समग्र महाभारत मिळण्याचा सभव आहे

**२ ज्ञानेश्वर**—शुकाष्टकावरील टीका 'ज्ञानराज' नांवाची ही टीका आपल्या सग्रहांतील १२५-२६ अकांत छापली आहे पण ती अपूर्ण आहे तेथे एकंदर ४९ ओव्या. मजजवळ ७६ ओव्या मूळ प्रस्तावाच्या आहेत. मगला-चरणाचा एक सस्कृत श्लोक जास्त आहे. पहिली ओवी, 'जयजय सकल वद्याही वद्या। गुरुत्वे होसी अविकारवेद्या। तो तु निजात्म भोगिसी निःशब्दा। निजात्मरूपा ॥ १ ॥

शेवटची ओवी—ग्रथ शके बारासे सोळोत्तरी ॥ पराजय नाम संवत्सरी । कार्तिक शुक्ल द्वितीया इद्रायणी तिरी । ग्रथ निर्धारी संपला ॥ ७६ ॥ ही माझी प्रत बरीच शुद्ध आहे ज्ञानेश्वराच्या वहिवाटीप्रमाणे त्यानी ग्रथलेखन—काल दिला आहे.

उत्तर गीतेवरील टीका अध्याय ३ स २८८ + १६८ + १४२ = ५९८.

**३ दीनानंद**—गुरुगीतेवर ओवी टीका. १२००

**४ गोविंद**—वेदस्तुतीवर अभंगात्मक टीका ग्र सं २००. हा गोविद त्रिबकाचा ( चरणरज ) शिष्य आहे काव्यसग्रहांत जी त्रिबकाची पदे छापली आहेत त्यासबधी जरा घोटाळा आहे त्रिबक (जनार्दन शिष्य) याची पदे व चद्रपूर येथील त्रिबकस्वामी याची पदे सहज ओळखता येतात. जनार्दन शिष्य प्रत्येक पदाचे शेवटी आपले व गुरूचे नाव लिहितो हे त्याची पदे वाचली असतां समजते उ. त्रिबक विनवी कर जोडुनिया एका जनार्दनि गा ॥ इ या आमच्या इकडच्या त्रिंबकाची बरीच कविता अप्रसिद्ध आहे. त्याची काही पदे व भार्या-निधन-विलाप मजजवळ आहे. यांच्या सबधाचे एक पद गोविदाने केले आहे. ते—वरद विनायक भक्त शिरोमणी स्वामी त्रिबक महीवरी । रभापुर उपनाम जयाला समाधिस्त जो चद्रपुरी या कवीचे उपनांव रभापुरे अर्थात् केळापुरे होते. हे त्रिबकस्वामी फार गणपतिभक्त होते. हे देवनाथाचे समकालीन होते. विशेष माहिती पुढे देऊ.

**५ रामदास**—'पूर्वारभ'—हा ग्रथ अप्रसिद्ध आहे. कारण रा. रा. राजवाडे यांनी ग्रथ—मालेत दिलेल्या स्वामीच्या अप्रसिद्ध ग्रथात याचे नाव नाही व मराठी ग्रंथसंग्रहालयाचे चिटणिसांनी केसरीत प्रसिद्ध केलेल्या यादीतहि नाही. या ग्रथाचे दोनच समास मजजवळ आहेत. ओव्या २००. आणखी कांही समास असतील. कांही अप्रसिद्ध पदे

**६ गोसावीनंदन**—'ज्ञानमोदक' ग्रथ संख्या १४०० ओव्या, अभंग २००, पदे, आरत्या वगैरे.

**७ दयाळनाथ**—पदे ५०, श्रावणाख्यान. हे देवनाथाचे म्हणून आपण छापले आहे पण ते त्यांतील भाषासरणीवरून देवनाथाचे नसून दयाळनाथाचे आहे असे दिसते. शेवटली दिंडी देवनाथ प्रभु दयाळ दीनबधु ॥ पूर्णव्यापक आनंद सांद्रसिधू ॥ या ओवीवरून हे प्रकरण दयाळनाथाचेच असावे हें स्पष्ट दिसते.

८ **रामसुतात्मज**—विश्वनाथ, गोपीचंद आख्यान हिंदी व मराठी मिश्रित सर्ग स ७.

९ **त्र्यंका**—चौक रामायणावर, अंगदशिष्टाई, इंद्रजितसमर, लक्ष्मण सजीवन, उद्योगपर्व

१० **हरि विठ्ठल**—'रासोत्सव' पदात्मक. कांही पदे. हा कवि चंद्रपुरा-नजीक अलीकडे कोळशाकरिता प्रसिद्ध असलेल्या बल्लाळपूरचा राहणारा होता. भवभूती येथचाच नसेल कशावरून ?

११ **मुरहर**—पदे ५०.

१२ **आनंदतनय**—बाळक्रीडा, राधाविलास वगैरे काही स्फुट प्रकरणे. याशिवाय आणखी एक योगवासिष्ठावर माधवदासकृत ओवीबद्ध टीका आहे. ही छापली गेली आहे व एक ज्ञानेश्वर महाराजाच्या अमृतानुभवावर संस्कृत समश्लोकी टीका रसमंजरी, रसकल्लोल, अनंगरंग या तीन ग्रंथावर मंगरूळकरशास्त्री यांनी केलेली समश्लोकी टीका. या कवीने चित्रमीमांसा नावाचा एक सं. ग्रंथ लिहिला असून काव्यप्रकाशाचे मराठी पद्यात रूपांतर केले आहे. कळावे. वरील प्रकरणांपैकी कोणती प्रकरणे प्रसिद्ध आहेत ते कळवावे म्हणजे मग आपणाकडेस त्यांपैकी कागद पाठविण्यास बरे पडेल.

वणी,
ता. १५-४-०४

आपला, अपरिचित,
**माधव नारायण डाऊ**

( हे संशोधनात्मक पत्र थोडे लांबट आहे. तथापि ते सर्व देण्याचे कारण असे की, अद्यापिहि जुन्या मराठी काव्यांच्या संशोधकांना कदाचित् त्यातील माहितीचा उपयोग होईल. )

दुसरे गृहस्थ रा. डी. कृष्णराव हे मूळचे तेलगू गृहस्थ होते. तथापि नागपुराकडेच अनेक पिढ्यांची वस्ती झाल्यामुळे ते संस्कृतीने महाराष्ट्रीय बनले होते. त्यांनी नाना यांच्याशी काव्यसंग्रहाच्या बाबतीत पुष्कळ सहकारिता केली.

ता. २७ मार्च १९०२ रोजी कोणी रा. रा. पुरुषोत्तम सखाराम भांडारी यांना पुण्याहून नानांनी एक पत्र लिहिले ते मला मिळाले आहे ते काव्यसंग्रहासंबंधाने आहे. भांडारी यांना काव्यसंग्रहाचा नवा संपादक कोण याची माहिती नसल्याने, काव्यसंग्रहांत दुरुस्त्या व सुधारणा करण्यासंबंधाने त्यांनी एक सूचना-

रूप पत्र केसरीकडे पाठवले व केसरीकारांनी तेच नाना यांजकडे पाठवले त्या पत्रास नानांनी लिहिलेले उत्तररूप पत्र हे मला मिळालेले आहे. त्यात ते लिहितात की, "काव्यसग्रहाचे सपादक होऊन गेलेले कै ज बा मोडक, वामन दाजी ओक व हरिपत पडित याची योग्यता फार मोठी होती. ओक यांना अनेक सहाध्यायी व शिष्य मडळीचे सहाय्य सपादनाच्या कामी मिळे. मराठी कवितेचा त्या मडळीचा व्यासगहि फार मोठा होता यामुळे अनेक इतरांच्या ओळखी होऊन त्याना सहाय्य मिळे. मराठी कवितावाचनाचा माझा नाद अलीकडचा काही अप्रसिद्ध काव्ये मिळाली ती टीपा देऊन पूर्वीचे सपादक कै गुर्जीकर याजकडे मी पाठविली ती ध्यानी आणून शेट तुकाराम जावजी यानी सग्रहाचे काम हाती घेता का म्हणून विचारले प्रो. रा रा भागवत यांना शेटजींनी विचारले होते परंतु त्यानी ते काम नाकारल्यामुळे माझ्यासारख्या नवशिक्या माणसाकडे विनति आली. म्हणून धाडस करून काम पत्करले. तरी या कामी तुमच्यासारख्यांची मदत मिळाल्यास मी ते भाग्य समजेन."

काव्यसग्रहाच्या एकशेपांचव्या अकापासून नानाच्या सपादकत्वाचे काम सुरू झाले. प्रथम हे काम स्वीकारण्याला ते हे सरकारी नोकर म्हणून त्यांना परवानगी मिळेल की नाही याविषयी शंका वाटत होती. परंतु ती परवानगी पुढे मिळाली हळुहळू स्नेही मडळीचे सहाय्यहि मिळू लागले. आणि नतर सपादकत्वाचे काम अधिकाधिक चांगले होत जाऊन वर दर्शविल्याप्रमाणे अपरिचित वाचकांकडून काव्यसंग्रहाचे सपादकत्व चागले केल्याबद्दल अभिनंदनपत्रेहि त्यांना येऊं लागली. त्याच्या मृत्यूनंतर मगळवार ता. ६ सप्टेंबर १९०४ च्या 'केसरी'च्या अकांत त्याच्या मृत्यूविषयी केसरीकारांनी खालील उद्गार काढले होते:—

"धुळे हायस्कुलातील शिक्षक व "काव्यसग्रहा"चे सपादक रा. रा. नारायण चिंतामण केळकर, बी ए यांस धुळे येथे गेल्याचे मागील सोमवारी रात्री विषमज्वराने देवाज्ञा झाली हे कळविण्यास फार दुःख वाटते. नारायणरावजींचा स्वभाव विनयशील, निगर्वी व मनमिळाऊ असून त्यांच्याशी ज्याचा ज्यांचा थोडाबहुत परिचय झाला असेल त्या सर्वांस त्यांच्या मृत्यूची बातमी ऐकून हळहळ वाटल्यावांचून राहणार नाही. हायस्कूलांतील विद्यार्थ्यांस मेहनतीने व शिस्तीने शिकविण्याचे काम सभाळून त्याशिवाय त्यांनी आपला राहिलेला फुरसतीचा वेळ वाचनांत

व मराठी काव्यांच्या व्यासगात आणि प्रकाशनात घालवून मराठी भाषेची जी सेवा केली आहे ती, ग्रॅज्युएट होताच सरस्वतीच्या एकनिष्ठ आराधनेस अखेरचा राम-राम ठोकणाऱ्या मडळींनी निदान अशतः तरी अनुकरण करण्यासारखी आहे. काव्य-सग्रहासारखे मराठी काव्यप्रकाशनाचे काम अनेक कारणांनी जबाबदारीचे व जोख-मीचे झाले आहे. तथापि ते आजपर्यंत निर्णयसागराच्या मालकांनी कै. मोडक, ओक, गुर्जर यांच्या सहाय्याने नेटाने चालविले. त्यांच्यामागून नारायणरावहि हे काम बिनबोभाट व चोख पार पाडीत होते परतु महाराष्ट्र भाषेचे दुर्दैव ओढवून त्यांसहि मृत्यूने अकाली ओढून नेले."

प्रो. विजापूरकर हे नानाचे एक परम स्नेह्यापैकी होते. त्यांनी 'ग्रथमाला' मासिक पुस्तकाच्या ६व्या अकांत 'सारसग्रह' या सदरात नानाविषयी खालील जिव्हाळ्याचे उद्गार काढले होते:—

"नानांचे शुद्ध आचरण व सरळ वर्तन, कोमल अतःकरण, अगाध मित्र-प्रेम, दुसऱ्याच्या सोईसाठी घस सोसण्याची तयारी, व एकदरीने सर्व व्यवहारात दिसून येणारा त्याचा मनमिळाऊपणा, इतक्या गोष्टींमुळे ज्याच्या ज्याच्याशी त्याचा सहवास घडून आला त्यांस त्याच्या अकालिक व आकस्मिक मृत्यूने दुःख झाल्या-वांचून राहणे अशक्य आहे. परतु त्यांच्या मरणाने एक मोठा उद्योगी महाराष्ट्र-भाषासेवक नाहीसा झाला हे फार मोठे सार्वजनिक नुकसान झाले आहे. अलीकडील तीन-चार वर्षांच्या सतत उद्योगाने त्यास आपल्या उद्योगांत अधिकाराने बोलण्याची योग्यता येत चालली होती. चार-आठ वर्षांत महाराष्ट्रकाव्यविषयक चर्चेचे केद्र रा. नाना केळकर होणार असे आम्ही म्हणत होतो, तो सर्वच उजाडले ! प्रथम जवळ जवळ एक वर्षभर आपले नाव प्रसिद्ध न करतां त्यांनी काव्यसग्रहाचे काम केले. आमच्या 'ग्रथमाले'त ऐतिहासिक मजकूर यावा तितका कां येत नाही म्हणून त्यांनी वरचेवर विचारावे. प्रत करण्यास लेखक पाहिजे असे आम्ही प्रसिद्ध केले होते. त्यानतर "वर्गणी करून दरमहा पधरा रुपये जमवावे असा विचार आहे, पण ते जुळेल असे दिसत नाही. घरचे १५ रु. दरमहा पाठविण्याचा आम्ही बंधूंनी निश्चय केला आहे" असे आम्हास लिहून, त्याप्रमाणे रा. राजवाडे यांजकडे रक्कम धाडूं लागले. परतु अनुभवांती लेखकांकडून लिहिण्यांत अधिक त्रास पडतो असे सांगून रा. केळकरांच्या औदार्यास रा. राजवाडे यांनी निराळी दिशा लावून दिली."

नानाविषयी माझ्यासबधात सागावयाची मुख्य गोष्ट ही की, घरांत सर्वांत वडील मुलगा होण्याचा तोटा त्याच्या पदरी पडला व सर्वांत धाकटा मुलगा होण्याचा नफा माझ्या पदरी पडला ! नाना यांना एलएल. बी. होऊन वकिली करण्याची हौस होती. परतु त्याच्या शिक्षणाला लागणारा पैसा वडिलांजवळ नव्हता म्हणून त्याना एलएल. बी चा नाद सोडून शिक्षणखात्यांत शिरावे लागले. उलट एलएल. बी होऊन वकिली करण्याची हौस मला मनांतून नव्हती. असे असतां आपल्या घरी एक भाऊ तरी एलएल. बी. व्हावा अशी हौस नाना यांनी धरली, आणि मग ती माझ्या शिक्षणाचे पैसे आपल्या पगारांतून देऊन त्यांना भागवावी लागली. मी बी. ए. होण्याच्या सालीच वडिलानी पेन्शन घेतले. ते १५ रुपये बसले. अर्थात् यापुढे होणाऱ्या घरच्या मुलांच्या शिक्षणाचा खर्च नाना यांजवरच पडणार होता. तो वाचविण्याची त्याची बुद्धि असती तर मी एखादी नोकरी पत्करावी या वडिलाच्या म्हणण्यालाच त्यानीहि दुजोरा दिला असता. परतु त्यांनी तो दिला नाही. उलट दोन वर्षे मुबईस ठेवून माझा एलएल. बी. चा अभ्यास त्यांनी पुरा करविला. इतकेच नव्हे तर, पुढे मी वकिली सोडून पुण्यास येऊन सपादकाच्या धद्यात शिरलो, तेव्हाहि त्याला मना न करिता नानानी उलट माझे चीजच केले. कारण वाङ्मयविषयाची आणि वर्तमानपत्राची गोडी त्याना मनांतून जातिवत होती.

१८९७ साली टिळक तुरुगांत गेल्यावर मी 'केसरी—मराठ्या'चा सपादक झालो ही गोष्ट टिळकांचा आसिस्टंट म्हणून मी केली ती बरोबर होती. हे सार्वजनिक राजकाणाचे विशेष महत्व वाटत नसतांहि, माझ्या वडिलांनी कबूल केले होते. पण पुढे टिळक तुरुगातून सुटून आले, आणि त्यानी पुनश्च हरिः ॐ असे केसरीतून म्हटले, तेव्हा मी त्यापुढे केसरी सस्थेतच रहावे किंवा सपादकीय काम सर्वस्वी सोडून देऊन केवळ वकिलीच्या मागे लागावे याविषयी आमच्या घरी दुमत झाले. माझे वडील, तसेच मधले बंधु आप्पासाहेब यांचे म्हणणे मी वकिली करावी व पुढे मिळाल्यास मुनसफी घ्यावी. पण नाना याचे मत तसे नव्हते. ते म्हणू लागले की, "आम्ही दोघे वडील बधु सरकारी नोकरीत शिरलो त्याला इलाजच नव्हता. पण घरांतील एकाने तरी स्वतंत्र राहून एखादा खाजगी उद्योग कां न करावा ? त्यांतूनहि वकील पुष्कळ होतात. संपादक थोडे." नाना यांना ही विचारसरणी विशेष पटण्याला एक कारण बहुधा असे होते की, साताऱ्यास मी स्नेहीमंडळीपुढे निबंध लिहून वाची, जवळ जवळ पाठ करून व्याख्याने देई,

कविता करी, आणि शिवाजी उत्सव किंवा राष्ट्रीय सभेहून परत आलेल्या प्रतिनिधींच्या स्वागताच्या सभा यांची व्यवस्था करी. माझ्या तरुणपणच्या हौसेच्या गोष्टी मी एलएल्. बी होण्याच्या पूर्वीपासून त्याना घरी व बाहेर दिसत यामुळे मी वकिलीपेक्षांहि अशा आडधंद्याला अधिक उपयोगी असे त्याना सहजच वाटत असावे. आप्पासाहेब याना अशा विषयाची गोडी कमी वर्तमानपत्राचा धंदा अस्थिर आणि त्यांत संकटे फार असे त्याना वाटे, ते योग्यच होते. पण सरकारी नोकरी संबधाने माझ्या दोघां वडील भावांत जो मतभेद होता तोच त्यांच्या या वादांत मी पुढे काय करावे याविषयी दिसून येई. मी 'केसरी-मराठ्या'चा संपादक होऊन निभावून निघालो याविषयी नानानी मला लिहिलेले अभिमानपुरस्सर अभिनंदनाचे पत्र मजजवळ आहे. घरातील इतराना या दीड वर्षांच्या दिव्यातून मी निभावलो इतकाच मुख्य आनंद. पण नानाना विशेष आनंद हा की, मी नुसता निभावलो इतकेच नव्हे तर एकदम नांवारूपालाहि आलो. पुण्याच्या समाजात पुण्याच्या वातावरणात हिंडणाफिरणारे, राजकारणाच्या अड्ड्यातहि त्याचे कांही मित्र असत. यामुळे मी पुणे सोडावे असे त्याचे मुळीच मत नव्हते इतकेच काय, पण स्वतः त्यानाहि एखादी खासगी मनाजोगी व टिकाऊ नोकरी मिळती तर त्यांनी ती पत्करली असती व सरकारी नोकरी सोडून दिली असती असे मला वाटते. ते मितव्ययी नव्हते. पगार किती मिळतो यावर त्याचे फारसे लक्ष नसे. परोपकारबुद्धि दांडगी. यामुळे त्याची खर्चापायी ओढ होई तथापि कोणाच्या कर्जांत न राहता त्यानी संसार केला. एका विमापॉलिसीपेक्षा त्याना आपल्या मुलांकरिता अधिक कांहीं ठेवता आले नाही.

**वडील बंधु आप्पासाहेब**—माझ्याहून वडील बंधु म्हणजे ती. महादेव चिंतामण उर्फ आप्पासाहेब केळकर, याचा जन्म कोकणांत १८६८ साली झाला. त्यांची व नाना याची मुंज कोकणांतच फार लहानपणी झाली. माधवराव नानापेक्षां वयाने दोन वर्षांनी लहान होते तरी दोघांचेहि शिक्षण एकाच इयत्तेत चालले होते. १८८४ साली माधवराव मॅट्रिकमध्ये नापास झाल्याने दोघांची जोडी फुटली. त्यांनीं कोल्हापूर येथे राजाराम कॉलेजात पी. ई.ची व फर्स्ट बी. ए.ची परीक्षा देऊन पहिली स्कॉलरशिप मिळवून मुबईस १८८९ साली विल्सन कॉलेजमध्ये बी. ए.च्या अभ्यासाकरितां ते दाखल झाले. बी. ए. च्या परीक्षेत ते दुसऱ्या क्लासांत येऊन भौतिकशास्त्र या विषयांत मुबई युनिव्हर्सिटीत ते पहिले आल्यामुळे वासुदेव जगन्नाथ नांवाची

२५० रुपयाची शिष्यवृत्ति त्यांना मिळाली 'दक्षिणा फेलोशिप'हि हक्काने मिळावयाची, पण डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल सेल्बी यांनी तत्त्वज्ञान विषय घेऊन पास झालेला मनुष्यच मला फेलो हवा असा आग्रह धरिला म्हणून ती मिळाली नाही. पण पुढील वर्षी अहमदाबाद येथील गुजराथ कॉलेजमध्ये संस्कृत असिस्टंटची जागा रिकामी झाली, ती घेता का असे आप्पा यांना विचारण्यात आले व त्यांनी ती घेतली. वास्तविक त्याचा ऐच्छिक विषय सायन्स आणि शिकविण्यास मिळालेला विषय संस्कृत ! तथापि परिश्रम करून त्यांनी संस्कृत विषय शिकविला. शिवाय तेथील मुख्य प्रोफेसर आबासाहेब काथवटे हे संभाळून घेणारे असे होते. यामुळें पहिली सहा महिन्याची 'लेक्चररशिप' चांगली निभावून आणखी एक वर्षाकरिता ती वाढविण्यात आली. जातां जाता हे सांगतो की, अमदाबादच्या या जागेवर आप्पा जाण्यापूर्वी प्रोफसर विजापूरकर हे होते. परंतु ते कोल्हापूरचे रहिवासी व कोल्हापुरच्या राजाराम कॉलेजातच प्रोफेसरीची जागा मिळाली तर त्याना अधिक इष्ट होती, व या सुमारास प्रयत्न करून त्यांनी ती मिळवलीहि. आणि विजापूरकर मंडळी आणि आम्ही मंडळी यांचा पूर्वीपासून स्नेह असल्यामुळे अहमदाबादच्या जागेची सूचना विजापूरकरांनीच आप्पा यांना केली.

असो. अहमदाबाद येथील नोकरीची मुदत वाढली तरी ती दोन वर्षांहून अधिक टिकणे शक्य नाही म्हणून रेव्हिन्यू खात्यातच शिरावे व तेहि लवकर शिरावे म्हणजे पुढे बस्तान चांगले बसेल असा विचार करून त्यांनी रेव्हिन्यु खात्याकडे ठिकठिकाणी अर्ज केले. एल्एल्. बी. व्हावयाचे नाही हे त्यांचें पक्के ठरलेलेच होते. पण या सुमारास दक्षिण भागाचे एज्युकेशनल इन्स्पेक्टर रा. ब. सितारामपंत पटवर्धन यांनी आप्पाना रत्नागिरी हायस्कूलमध्ये सायन्स टीचरची ७५ रु. ची जागा देऊ केली. तीहि त्यानी घेतली नाही आणि रेव्हिन्यू खात्यांत मिळालेली ३० रुपयाचीच जागा पत्करली.

प्रथम त्याची नोकरी दापोली, मालवण वगैरे भागांत झाली. यावेळी हिंडण्याफिरण्याचे काम असल्यामुळे त्याना मुक्काम पडेल तेथे आपल्या हाताने स्वयंपाक करून जेवावे लागे. पण हायर-लोअर परीक्षा देऊन मध्यभागांत त्यांनी बदली करून घेतल्यावर लवकरच त्यांना अव्वल कारकुनीची व नंतर डेप्युटी चिटणीशीची जागा मिळून अवघ्या पांच-सहा वर्षांत ते ॲक्टिंग मामलेदार झाले. दुष्काळ, प्लेग,

सर्व्हेसेटलमेंट वगैरे सर्व प्रकारची रेव्हिन्य खात्यांतील कामे त्यांनी केली. क्रमाने ते फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट व फर्स्टग्रेड मामलेदार होत गेले आणि १९०९-१० चे सुमारास त्याना डेप्युटी कलेक्टरची जागाहि हक्काने मिळावयाची पण येथ एकप्रकारे मी त्याना आडवा आलो. तो असा की,त्या सुमारास मी 'केसरी-मराठ्या'चा सपादक या नात्याने सरकारच्या पूर्ण अवकृपेस पात्र होऊन माझे नाव ब्लॅक लिस्टांत पडून राहिले. शिवाय हायकोर्टाच्या बदनामीकरिता मजवर खटला होऊन मला शिक्षा झाली अशा मनुष्याचा भाऊहि सरकाराला अप्रिय होणारच. म्हणून आप्पा याना डेप्युटी कलेक्टरची जागा देऊ नये असे सरकाराने अतस्थ ठरवले. वास्तविक ते आपल्या कामात अगदी चोख व निरपवाद असत आणि जो मनुष्य फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट व मामलेदार म्हणून नोकरीत राहू शकतो तो डेप्युटी कलेक्टर झाला म्हणून सरकारचे काय बिघडावे ? पण नाही वडयाचे तेल वांग्यावर काढावे आणि मनांतला द्वेष एका कारणाचा तो दुसऱ्या रीतीने उगवून घ्यावा ही सरकारची रीत प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणे या गोष्टी त्यानी केल्या.

१९०९ साली या गोष्टीची उघड वाच्यता झाली माझा नित्यक्रम असा असे की, मी दरवर्षी त्यांच्या गावी त्यांना भेटण्याला कांही दिवस जात असे व रहात असे. परतु मी असाहि नियम केला होता की, अशा भेटीच्या प्रसगी किंवा एरवीहि ते मामलतीवर असतील त्या तालुक्यात माझी राजकीय स्वरूपाची चळवळ कोणत्याहि प्रकारे करावयाची नाही कारण तिची बाधा त्याना सहजच होणार. तथापि इतक्यानेहि सरकारचे समाधान होत नव्हते. १९०९ साली नदुरबार येथे त्याजकडे चार दिवस राहण्यास मी गेलो तो दिवाळीच्या निमित्ताने. याचा रिपोर्ट वर जातांच रेव्हिन्यू कमिशनर यांनी आप्पांना लिहून कळविले की, "तुमचे बधु हे जहाल राजकारण करणारे संपादक व एक पुढारी आहेत. उलट तुम्ही आपल्या तालुक्यापुरते सरकारचे सर्वाधिकारी व प्रतिनिधि आहा. तेव्हां सरकारास अप्रिय असलेल्या अशा जहाल पुढाऱ्याने तुमच्या घरी रहावे यामुळे तालुक्यांतील लोकांचा सहजच गैरसमज होतो. तरी अशी गोष्ट तुम्ही कां करूं देतां हे कळवा." त्याला आप्पा यांनी असे उत्तर दिले की, "माझे बधु हे हितसंबधांच्या सर्व दृष्टीने अगदी वेगळे आहेत. ते फक्त माझे बंधु म्हणून खाजगी रीतीने मला भेटावयास येतात, पण त्यांच्या मुक्कामांत किंवा माझ्या तालुक्यातहि त्यानी आपली कोणतीहि चळवळ करू नये असे आमचे ठरले आहे. व तो नियम ते आजवर पाळीत आले आहेत. उलट

माझे सरकारी काम मी कसे करतो हेहि आपणास माहीत आहे. त्याने स्वतंत्र रीतीने चालविलेल्या उद्योगाचे बरेवाईट फळ तो भोगील. पण ती गोष्ट माझ्या बढतीच्या मार्गात का यावी ? मी जर आपले सरकारी काम योग्य प्रकारे करीत आहे तर माझी हक्काची बढती सरकारने मला देणे हेच न्यायाचे होईल. आम्ही एका आईबापाचे मुलगे सख्खे भाऊभाऊ. हे नाते आम्ही तोड म्हटले तरी तुटणार नाही व मी ते तोडू इच्छीतहि नाही.'' या सरळ स्पष्ट खुलाशाला कमिशनर यांना उलट कांही लिहिता येईना.

परंतु युक्तिवादाला सरकार अडले म्हणून त्यांची दृष्टि साफ झाली असे मात्र घडले नाही. आणि बंधूच्या नावावर पडलेला काट निघाला नाही या गोष्टीमुळे खालचे पांच-चार मामलेदार बढती मिळून डेप्युटी कलेक्टर झाले नंतर पूर्वखानदेशचे कलेक्टर यानाच ही गोष्ट न पटून त्यांनी सरकारात तक्रार केली व हा अन्याय दूर व्हावा असा आग्रह धरिला. यामुळे आप्पा यांना अखेर डेप्युटी कलेक्टरची जागा मिळाली मात्र खालचे नंबर वर गेल्यामुळे त्यांना ६०० सहाशे रुपये पगारावरच पेन्शन घ्यावे लागले व पेन्शनीच्या रकमेत ५०-७५ रुपयांचे कायमचे नुकसान झाले सर्वांत वडील बंधु नाना हे निवर्तल्यामुळे वडीलकीचा मान आणि एकदर कुटुंबाचा आधार होण्याची जबाबदारी आप्पा यांजवर पडली. पण ती त्यांनी चांगली संभाळली. माझ्यामुळे त्यांचे नुकसान झाले ही गोष्ट माझ्या मनाला खात असे, पण त्याला माझा इलाज नव्हता ही गोष्ट स्वतः आप्पा जाणत असल्याने ती गोष्ट त्यांनी मला भासूं दिली नाही उलट आमच्या कुटुंबापैकी एक तरी मनुष्य केसरी सारख्या पत्राचा संपादक होतो व सार्वजनिक कार्यात पुढारीपण घेतो या गोष्टीचे त्यांनी भूषणच मानले पेन्शन घेतल्यावर त्यांच्या अंगी सार्वजनिक कामाचीहि गोडी असल्याचे दिसून आले आहे. शिवाय उत्कृष्ट सल्लागार व स्नेही या त्यांच्या गुणामुळे धुळे-अमळनेरचे श्रीमंत प्रतापशेठ यांनी त्यांना अनेक वर्षे धुळे येथील गिरणी कंपनीच्या ऑफिस सुपरिन्टेन्डेन्टचे जागी नेमून घेतले आहे ते कौन्सिल निवडणुकीलाहि एकदा उभे होते. परंतु तीत यश आले नाही.

आप्पा यांचे तिसरे कुटुंब सौ. गिरजाबाई या आजच्या पिढीतील एक विदुषी म्हणून मानल्या जातात. त्यांचे मूळ शिक्षण काठेवाडांत गुजराथी भाषेतून झाले. तथापि त्यांची नैसर्गिक बुद्धिमत्ता, भाषासरणी आणि वाङ्मयविषयाची आवड

यामुळे मराठीत त्यांनी काही ग्रंथ लिहिले आहेत. आणि स्त्रीवर्गासंबंधी जाहीर सभा, संमेलने इत्यादि प्रसंगी अध्यक्ष होऊन आपले विचार स्त्रीवर्गापुढे मांडण्याचे काम त्यांनी बरेच केले आहे. लेखनाप्रमाणे वक्तृत्वाची कलाहि त्यांना चांगली साध्य झालेली आहे. त्यांची राहणी या सुधारलेल्या काळातील स्त्रीसारखी दिसत असली तरी त्यांचे विचार जुन्यानव्याचा मेळ घालण्याचेच असतात.

**माझी पत्नी**—आतां शेवटी माझे कुटुंब सौ. दुर्गाबाई इच्या संबंधाने दोन शब्द लिहितो. माझे सासरे मोरोपंत पेंडसे हे दापोली तालुक्यातील मुर्डी गांवचे रहिवासी. त्यांनी पुण्यांतील ट्रेनिंग कॉलेजात शिक्षण घेतल्यावर मोडलिब्यास शाळामास्तरची नोकरी धरली. तेथे ते व आमचे वडील यांचा स्नेह जमून एकाच घरात राहू लागले. पुढे वडिलांची बदली मिरजेस झाली. त्यांच्या पाठोपाठ त्यांचीहि बदली मिरजेच्या मराठी शाळेवर होण्याचा योग आला. तेथे आमच्या प्रमाणे त्यांनाहि पटवर्धनांच्या वाड्यांत बिऱ्हाडास जागा मिळाली. आणि आम्ही इतके निकटवर्ती राहिलो की, तिऱ्हाइताला आमचे हे समाईक कुटुंब आहे असा भास व्हावा. या ऋणानुबंधांतून सहजच सोयरिकीची कल्पना निघाली, आणि ती योग्य वेळी फळास आली. १९३७ साली आमच्या लग्नाला पन्नास वर्षे झाली. त्याची ज्युबिली आम्ही मनःसमारंभाने केली. औपचारिक असे कांही केले नाही.

माझी बायको लहानपणी शाळेत गेलेली नव्हती. तिने प्रौढपणी आपली साक्षरता आमच्या बहिणीबरोबर घरच्या घरीच संपादन केली. पुढे धार्मिक ग्रंथ वाचनाच्या गोडीने ती वाढली; आणि आतां तर वर्तमानपत्रे वाचणे किंवा वाचून घेणे केल्याशिवाय तिचा एकहि दिवस जात नाही. इतकेच नव्हे तर स्थूल ढोबळ राजकारणाशी तिचा बराच परिचय झाला आहे. ती टिळकांची अत्यंत अभिमानी असून त्यांच्या स्मृतिदिवशी ती तळेगांवच्या बांगड्या आणून सुवासिनींना वाटीत असते. स्वदेशीविषयी तिचा बराच कटाक्ष आहे. तसेच पुण्यांतील गोवर्धन संस्थेशी तिचा इतका जिव्हाळा आहे की, मजकडून १९३२ साली तिने एक हजार रुपयांची देणगी गोरक्षण मंडळास देवविली आणि मंडळाच्या कार्यकारी मंडळाची ती एक प्रमुख सभासद आहे. गांवांत, विशेषतः टिळक-स्मारक मंडळांत, भरणाऱ्या पुष्कळशा सभांना व्याख्यानांना ती हजर राहते. नवरा पुरुषांच्या सभांचे अध्यक्ष-स्थान घेण्याला लाभतो त्याप्रमाणे बायकाहि तिला स्त्रियांच्या सभांचें अध्यक्ष-

स्थान घेण्याला निमन्त्रण करितात. त्याचे मात्र तिला बरेच अवघड वाटते. कारण सभातून भाषण करण्याचा तिला अभ्यास नाही. ती मला म्हणते "तुमच्यामुळे या अध्यक्षपदाची आपत्ति मजवर येते !" मीहि म्हणतो "मी विद्वान होण्याला श्रम केले ते तरी तुझे वाचले ! आयते मोठेपण मिळते ते तुझ्या देवाची कृपा म्हणून. आत्तां कसे तरी घे झाले !" ती अत्यत सनातनी वृत्तीची आहे आणि एका शब्दात मी प्रांजलपणे असे सागं इच्छितो की, आमच्या घरात नित्य नैमित्तिक कृत्ये चालून त्याला सनातनी वळणाचे जे स्वरूप दिसते ते सर्व तिच्यामुळे आहे. तिला मी घरचा 'बिशप' किवा धर्माध्यक्ष म्हणत असतो पण नुसते म्हणतो असे मात्र नव्हे. तर तिने योजलेल्या कोणत्याहि धर्मकृत्याला मी मोडता घालीत नाही व खर्चाला नाही म्हणत नाही एखाद्या धार्मिक कृत्यांत औपचारिक रीत्या जातीने मला भाग घ्यावा लागला ( उदाहरणार्थ, सोवळे नेसून पुण्याहवाचन करावे लागले ) तरी तो मी घेतो. ती देवपूजकाप्रमाणे पितृपूजकहि आहे. श्राद्ध–पक्षाच्या तिथीची आठवण ती माझ्यापेक्षां अधिक ठेवते व मजकडून सर्व कर्म यथासाग करवून घेते. अशा कामी मला मनातून केव्हा कटाळा आला तरी मी तो तिला जाणवं देत नाही व तिला जाणवला तरी ती त्याची ओळख मला देत नाही

घरांतील धर्माचारासबधाने तिच्यामाझ्यामधले तह हे राष्ट्राराष्ट्रांतील तहापेक्षां अधिक विश्वासाने पाळले जातात ! उलट कालमान लक्षांत घेण्याचे तारतम्य तिनेहि सभाळले आहे. म्हणजे स्वतः ती कितीहि कडकडीत रीतीने आपले सोवळेओवळे सभाळीत असली तरी, माझ्या सार्वजनिक संबधाने घरी जरी एखादा, तिला वाटणारा, अनाचार घडत असला तरी ती त्यांत लक्ष घालीत नाही. यामुळे माजघरांत माझ्या पंक्तीला कोण जेवायला बसला याची पृच्छा न करिता माझ्याबरोबर त्याला वाढणे आणि त्याचे उष्टे खरकटे काढणे हे देखील ती बिनतक्रार करिते. माझ्या घरी अस्पृश्य व मुसलमानहि अशा रीतीने जेऊन गेले आहेत व त्याना तिने स्वतः वाढले आहे. घरी जेवायला कोण येणार याचा सुगावा मात्र मी तिला आगाऊ देतो. आणि तो दिला म्हणजे ती इतकेच करिते की, माजघरांत पाने माडण्याऐवजी बाहेर ओटीवर मांडते. आणि अपमानास्पद भेद तर दिसून न पडावा, आणि शास्त्राने सवलत दिल्याप्रमाणे निरनिराळे कोन साधले असतां पंगत एकच पण पात्रे तर विभक्त राहावी अशी माडणी ती करते. आम्हा

नवराबायकोंच्या धर्मकल्पनांच्या विरोधांत अशा समजतदारपणाचा मेळ घालण्याचा प्रयत्न आम्ही आजवर केला व तो चांगला यशस्वीहि झाला. तिच्या आग्रहामुळे मी स्नानानंतर देवापुढे बसून गंधफूल वाहतो, आणि देवाला नमस्कार करण्यात तत्त्वभ्रष्टता पदरी येते असे मानण्याइतका प्रतिनिविष्ट सुधारक किंवा नास्तिक मीहि मनाने नाही ! तिच्याच प्रेरणेने मी एकादशीचा उपवास करितो, मात्र थट्टेने तिला म्हणतो की, " एकादशी केल्याने आयते अन्नवैचित्र्य लाभते त्यात माझे काय जाते ? तू उपवास सांगशील तितके करीन " माझी सुधारणावादी मते तिला माहीत आहेत, तथापि मी अभक्ष्य-भक्षण, अपेय-पान करीत नाही हे तिला पूर्ण माहीत आहे. आणि मी विलायतेला दोनदा गेलो असतां हे आचारव्रत मी निश्चयाने पाळले अशी तिची यथार्थ खात्री पटलेली आहे. यामुळे गौण धर्माचारांत मी कुचराई करीत असलो तरी मुख्य हिंदुधर्मतत्वात मी तिच्या मताचा आहे या जाणीवेने तिला समाधान होते घरी पाहुणे येतात त्याच्यांत डॉ. मुजापासून बापूजी अण्यापर्यंत वैचित्र्य आढळते पैकी मुजे याची दाढी आणि अभक्ष्यभक्षणाची अपकीर्ति माहीत असल्यामुळे, आणि अणे यांची स्नानसंध्या पोथीवाचन जप ही प्रत्यक्ष दिसत असल्यामुळे, ती पाहुण्यापाहुण्यात मनाने छेद देण्याला शिकली आहे ! परदेशगमनावरील बहिष्कार तिने आता पूर्ण उठविला आहे आणि मी विलायतेहून व आमची मुलगी युरोपाहून जाऊन आली तेव्हा तिने प्रायश्चित्ताचा आग्रह धरला नाही. पुनर्विवाहित स्त्री-पुरुषावरच्या बहिष्काराची तीच गोष्ट ती पुनर्विवाहाच्या प्रचारार्थ भरलेल्या सभेला जाण्याचे टाळील, पण पुनर्विवाहित प्रो. कर्वे घरी आले तर त्याना नमस्कार करील.

असो. मनुष्य श्रद्धाळू नसला तरी त्याचे म्हणून काही काही विश्वास असतात. स्वतः माझा असाच एक विश्वास आहे, आणि तो मी मुलांना सांगत असतो की, माझा जो उत्कर्ष झाला आणि कौटुंबिक सुस्थिति लाभली तिला कारण माझी बायको आहे. अशा कामी पायगुण म्हणतात तो खरा असेल तर तो तिचा आहे. हे श्रेय मी तिलाच कां द्यावे हे मला समजून सांगता येणार नाही. पण अशी माझी भावना आहे खरी. माझ्या बायकोला चांगले अक्षर काढतां येत नाही, शुद्ध लेखनाच्याहि चुका होतात, म्हणून ती स्वतः फारशी पत्रे लिहीत नाही. मुलामुलीकडून लिहविते. यामुळे तिने मला स्वतः लिहिलेली पत्रे फारच थोडी. पण १९१९ साली मी विलायतेत असतांना तिने स्वतः हाताने लिहिलेले एक पत्र मजजवळ

आहे ते खाली देतो, म्हणजे तिच्या मनाची ठेवण कळून येईल. ते पत्र असेः—

" कृ. सा. नमस्कार विज्ञापना विशेष

आमच्या सर्वांच्या प्रकृति चागल्या आहेत. हल्ली माझ्या डोळ्यापुढे सारखे इग्लड दिसत असते. कारण माझा देह इथे आहे पण आत्मा तिकडे आहे अशी काही वेळा माझी निश्चेष्ट स्थिति होते आपण मुबईस जातेवेळेस कोणी डोळयास पाणी येऊ द्यावयाचे नाही असा सर्वानी निश्चय केला होता, व तो परमेश्वर कृपेने त्या वेळेस शेवटासहि गेला " मुबईला सर्व मुले गेली पण तुम्ही का गेला नाही ?" म्हणून मला पुष्कळांनी विचारले त्यास मी असे सागितले की, मी काही जगाच्या दृष्टीने पुढे आलेली नाही. स्वाभाविक प्रेम मनातच राहील असे नाही ते डोळयावाटे बाहेर पडून समुद्राला मिळावयाचे ! हा फार्स न व्हावा ! दुसऱ्याची मनःस्वस्थता मोडू नये हीच माझी इच्छा आहे. इग्लडला पोचल्याची तार येईपर्यत अगदी चैन पडले नाही आक्का व श्रीधर सातारला गेल्यावर त्यांची रा बाप व सौ ताई ही मडळी तेथे जमली होती. तेव्हा मी काही दिवस तिकडे जावे कारण माझ्या आवडत्या विषयाची—वेदांताची—तेथे विशेष चर्चा चालते, म्हणून सर्वानीच आग्रह केला. म्हणून मी सातारला गेले होते. त्याच्या घरातले प्रेम व एकदिल पाहून फार आनद झाला. पधरा दिवस फार लवकर गेले. चि. श्रीधर अजून तेथेच आहे पुण्याची हवा चागली झाली म्हणजे येईन म्हणतो. आपणा सर्वांच्या प्रकृति चागल्या आहेत व काम जोरांत चालले आहे हे ऐकून मनाला फार आनद झाला आपल्याला 'युरोपियन नोकर' वगैरे ठेवण्याचे हक्क हिदुस्थानात मिळाले पाहिजेत ! त्याबद्दल प्रयत्नहि चालू आहे. ईश्वर करो व ती. टिळकाच्या हयातीत आपले हक्क आपल्याला मिळोत एवढीच ईश्वराशी माझी प्रार्थना आहे. आमचे जेवण, चहा, कथा, पुराण वगैरे व्यवसाय बरोबर चालले आहेत. आमचे स्वराज्य आम्हाला इथेच मिळाले आहे ! पण आमच्या वेदान्तचर्चेत आज असा विषय निघाला होता की, मनुष्य चवदा विद्या व चौसष्ट कला शिकला तरी भगवतानी अर्जुनाला, राजगुह्य-आत्मविद्या प्राप्त करून घेतल्याशिवाय मनुष्यजन्माचे मुख्य कर्तव्य राहते असे सांगितले ! काथवटेताई हल्ली येथेच आहेत आमच्या वेडेपणामुळे आमची चर्चा बरीच चालते व वेळ गमतीने जातो. नरसिगडला तिकडे कांही दिवस चला असे त्या म्हणतात. मी त्याना असे सांगितले की, आम्ही

येऊ तेव्हां आम्हीं उभयतां येऊ. मी एकटी येणार नाहीं. ईश्वरइच्छेप्रमाणे घडेल. सर्वच गोष्टी अनिच्छेने प्राप्त होतात. त्यात कोणताहि ठेवा मिळून जाईल यांत शका नाही. हेच पत्राचे चऱ्हाट वाचावयाचा कटाळा येईल व सार्वजनिक कामाला उशीर होईल म्हणून पत्र पुरे केले आहे. प्रकृतीला फार जपावे. इकडील काळजी करू नये."

**मिरजेचा ऋणानुबंध**—ही कौटुबिक हकीकत सांगितल्यानतर मिरजे-सबंधी दोन शब्द लिहावेसे वाटतात ते लिहितो. १८९१ साली मी बी. ए. झाल्यापासून मिरजेचा व आमचा प्रत्यक्ष सबध सुटला. आमचे तेथे घरदार असे कांहीच नव्हते कोठून असणार ? या नतर आमचे चुलते केशवराव हे, त्याच्या आजाराला साताऱ्याच्या थड हवेपेक्षा मिरजेची हवा चागली म्हणून तेथेच राहिले. मरेपर्यंत ते मिरजेसच व आजारीच होते. त्याच्याशिवाय आमचे आप्त काही तेथे रहात होते यामुळे आमचे जाणे-येणे मिरजेस होई. पण पुढे पुढे हळुहळू ही आप्तांची कुटुबे नामशेष झाली किंवा त्यांनी स्थलांतर केले यामुळे केवळ सार्वजनिक कामानिमित्त काय तो मी मिरजेस जातो येतो. तथापि मिरज सस्थानचे अधिपति श्री. बाळासाहेब आणि त्यांचे युवराज श्री. तात्यासाहेब यानी आमचा ऋणानुबध कायम ठेवला. श्री. बाळा-साहेब यांना लो. टिळकांचा मोठा अभिमान, आणि मी टिळकांसनिध म्हणून माझाहि त्या जुन्या ऋणानुबधांत या नव्याची भर पडली. दडपशाहीच्या काळांतहि सरकाराशी प्रसग पडल्यास टिळकाविषयीचे आपले प्रेम व्यक्त करण्यास श्री बाळा-साहेबांनी कधी माघार घेतली नाही. तसेच एकदां खालसांतील राजकीय चळवळ करणाऱ्या लोकाची यादी पोलिटिकल खात्याने तयार करून सर्व सस्थाना-प्रमाणे मिरजकराकडे पाठविली, आणि या यादीतल्या लोकाना मिरजेत येण्याला निदान व्याख्याने वगैरे देण्याला, प्रनिबध करा असे हुकुमवजा सरक्यूलर पाठ-विले. परंतु श्री. बाळासाहेब यांनी पो. ए. यांस कळविले की बाकीच्या नावाबद्दल माझा काही आग्रह नाही, परंतु केळकराच्या बाबतीत नियत्रण घालावयाला मी तयार नाही ते त्यांच्या वडिलांपासूनचे माझ्या पदरचे व ऋणानुबधी आहेत, तसेच मिरजेस ते कोणतीहि आक्षेपार्ह चळवळ करणार नाहीत असा माझा विश्वास आहे. आणि हा त्यांचा आग्रह पो. ए. ने मान्य केला. १८९९ साली मी मिरजेस मुनसफी पत्करीन किंवा नाही अशी खासगी विचारणा मला करण्यात

आली होती, परतु मला केसरीकडील नोकरी सोडून जावयाचे नाही म्हणून मी नाही म्हटले. या गोष्टीची बातमी (म्हणजे सस्थानी नोकरी पत्करण्याविषयी मजकडे विचारपूस केल्याची बातमी) बाहेर अर्धीकच्ची कळल्यामुळे प्रो. विजापूरकर, अच्युतराव साठे इत्यादि स्नेही-मडळींना वाटले की, मी केसरी—मराठ्याची नोकरी सोडून 'ब्रिटिश सरकारची' मुनसफी पत्करणार! म्हणून त्यांनी असे करूं नका म्हणन पत्रेहि लिहिली. पण खरा प्रकार वर लिहिला इतकाच होता. असो.

श्रीमत बाळासाहेब अद्यापि पुण्यास आले म्हणजे मी त्याना भेटतोच, पण तेहि उठून माझ्या घरी येतात! आणि मी घरी नसलो तरी मुलांबाळाशी बोलून एखादा पदार्थहि खाऊन जातात. त्याचप्रमाणे श्रीमताच्या कन्या श्री. सौ. अक्का-साहेब मुजुमदार याहि. मी त्याना म्हणतो की पुण्यात मीच येऊन आपणाला भेटावे असा आपला सबध आहे पण ते म्हणतात तुमचे घरी येऊनहि तुम्हाला भेटण्याचा हक्क आम्हाला आहे तो आम्ही का गमावू?

आम्ही पुढे मिरजेचे रहिवासी नाही असे झाले ते श्रीमंतांना बरे वाटेना. १९३३ साली मिरज हायस्कुलची ज्युबिली झाली तेव्हा माझे बधु ती. आप्पा-साहेब हे मुद्दाम त्या समारभाला गेले आणि एक हजार रुपयांची देणगी त्यानी शाळेला दिली त्याचा श्री बाळासाहेब यास सहजच फार मोठा आनद वाटला आणि त्यानी मला ८ जानेवारी रोजी पत्र पाठविले. ते असेः—"परवां हायस्कूलच्या ज्युबिलीला आपले बधु रावसाहेब माधवराव आले व एक हजार रुपयाची देणगी दिली. आपणहि आला असता तर बरे वाटले असते. वाहून घेतलेल्या केसरीच्या कामामुळे आपणास येना आले नाही, हेहि खरे आहे एकच गोष्ट त्यांत नापसत आहे तिचा उल्लेख करितो; व त्याबद्दल काय करावे हे मी विचारतो. ती गोष्ट म्हणजे रा. सा. माधवराव व आपण जगप्रसिद्ध व लोकप्रसिद्ध झाला. आपल्या देणगीने आपली आठवण आपण कायम ठेवलीत. मात्र त्यांत वाईटपणा इतकाच की, रा. सा. मामलेदारानी धुळ्यास, (जळगांवास) घर केले, आपण पुण्यांत केले. पण आपली एक झोपडीहि मिरज येथे असू नये याचा अर्थ काय? व याला युक्ति काय? माझ्या मते ज्या घरात आपण लहानाचे मोठे झाला, तेच जर आपल्यास मिळेल तर विशेष चागले. ते नच मिळेल तर अन्य एखादे घर येथे असावे. कारण आपण येथील येवढे उजागरीस आला त्याचे स्मरण म्हणून

एखादे घर येथे असू नये हे काय ? असे घर असले म्हणजे आपण येथे कायम राहिले पाहिजे असे नाही. पण स्मरण म्हणून वाजवी होईल."

पूर्वी मिरजेस मी राहात होतो ते घर आतां सर्वस्वी जमीनदोस्तच आले आहे. पण ती जागा विकत घेता येण्यासारखी आहे. किंवा श्रीमंताजवळ मी एखादी घराच्या सोईची जागा मागितल्यास ते ती अवश्य देतील तथापि तूर्त मिरजेस घर बांधावयाचे मनात येत नाही खरे. मी कोकणात घर केले तसे मिरजेत घर करण्याचे माझ्या पुढील पिढीच्या मनात येणे कल्पनातीत नाही.

१९३२ साली माझ्या ज्युबिलीच्या प्रसंगी सांगली येथील एका वर्तमान-पत्राने श्री. बाळासाहेबांची मुलाखत घेतली तेव्हां त्यांनी मजविषयी उद्गार काढले ते असेः—

" श्री. न. चिं ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांच्यासारख्या प्रख्यात माणसाचा व आमचा काही संबंध आहे, याबद्दल आम्हाला अभिमान वाटतो देवदयेने त्या तिघा बंधूंच्या विद्याभ्यासाकरिता आमचा अल्पस्वल्प हातभार लागला आहे, याबद्दल आम्हास अभिमान व आनंद वाटतो. वडाचे बी अतिसूक्ष्म असते, पण त्याच्या-पासून केवढा तरी मोठा वृक्ष उद्भवतो. उत्तर हिंदुस्थानात 'कबीरवड' व आमच्या-कडे 'मसवड' आहे. या दोन्ही वृक्षाच्या खाली हजारो लोक गाड्या घेऊन मुक्काम करतात. एवढा मोठा विस्तार त्या लहानशा बियामधून जाहलेला आहे. त्याप्रमाणे केळकर शाळेत असताना वटबीजाप्रमाणे होते.

" आता ते लोकप्रिय व लोकमान्यप्रिय झाले आहेत. आम्ही प्रसंगविशेषी त्यांचा सल्ला घेतला, तर ते आम्हास योग्य सल्ला देत असतात. त्यांचे आमच्याबद्दल अत्यंत प्रेम आहे. आमच्याशी ते वर्तमानपत्राचे पॉलिटिक्स बाजूला ठेवून आम्हास सल्ला देत असतात, व ते आम्हास आपल्यापैकी समजतात. ईश्वर त्यांचे कल्याण करो व आम्हांला त्यांची अशीच मदत मिळो."

श्रीमंत बाळासाहेबांप्रमाणे युवराज तात्यासाहेब यांचाहि मजवर लोभ आहे. ते माझ्या वाङ्मयाला आज फार वर्षे चाहतात ही गोष्ट मला अलीकडे उघडकीस आली ! ते बहुश्रुत व सर्व प्रकारच्या वाङ्मयाचे वाचक व प्रेमी आहेत. मजवर त्यांचा विशेष उपकार म्हणजे गतवर्षी माझे 'समग्र वाङ्मय' बारा खंडांत प्रसिद्ध करण्याची कल्पना त्यांनीच काढली. आणि मी त्याविरुद्ध अनेक अडचणी दाखविल्या

तरी त्यानी आपला आग्रह तडीस नेला. या कामी लागणारे सर्व भांडवल त्यानी उदारपणे घातले, यामुळेच हे बारा-साडेबारा हजार पृष्ठांचे माझे वाङ्मय असे छापून निघाले त्याचे हे मित्रऋण मजकडून कसे फिटणार ? ते होवो न होवो. परतु चाळीस वर्षे वाङ्मय लिहिलेल्या माझ्या श्रमाचे पुरे चीज झाल्याचे समाधान मला त्यानी मिळवून दिले ! आमचे सर्व कुटुंब मिरज दरबाराचे एक प्रकारे आश्रितच होय. पण आश्रिताचे असे कौतुक करणारे यजमान किती भेटतात ?

एक गोष्ट येथे सांगणे अपरिहार्य आहे ती अशी की, मी संस्थानी राजकीय चळवळीत प्रजापक्षपाती आहे. आणि मिरज दरबारच्या कारभाराविरुद्ध मला केसरीत अनेक वेळां स्वतः लिहावे लागले व प्रजेच्या तर्फेचे इतराचे लेख घालावे लागले. मी एकदा मिरजप्रजापरिषदेचा अध्यक्षहि मालगावास झालो होतो. तथापि यापैकी एकाहि गोष्टीचा उल्लेख श्री. बाळासाहेब किंवा युवराज यानी आमच्या खासगी भाषणात कधीहि केल्याचे आठवत नाही मग अशी टीका करण्यास आळा घालण्याविषयी सुचविण्याचे तर दूरच ! पण ही चमत्कारिक व काहीसा संकोच उत्पन्न करणारी परिस्थिति लक्षात घेऊन तेच एकदा म्हणाले, "तात्यासाहेब, आमचा दरबार आणि तुमचा केसरी या सार्वजनिक सस्था आहेत. त्या आपले संबंध कर्तव्यबुद्धीने वाटेल तसे ठेवतील. ते आम्ही मुळीच लक्षांत घेत नाही. तुमच्या आमच्या खाजगी स्नेहसंबंधात त्या विरोधामुळे व्यत्यय येण्याचे किंवा मानण्याचे काहीच कारण नाही". इतका प्रांजलपणा क्वचितच पहावयास सापडेल !

# ग्रहनक्षत्रांची क्षमा मागून !

माझा जन्म शके १७९४ श्रावण वद्य षष्ठी उजाडता रविवार या दिवशी पहाटे सुमारे चार घटका रात्र उरली असता झाला. इंग्रजी तारीख २४ ऑगष्ट सन १८७२ ही होती. माझ्या जन्मस्थानचे नाव मोडनिंब किंवा मोडलिंब. हे मिरज संस्थानच्या एका तालुक्याचे मुख्य गाव पण अगदी लहानसे खेडे आहे. ते सोलापूर जिल्ह्यात कुर्डवाडी स्टेशनापासून पुढे बारा–तेरा मैल व पंढरपूरपासून मागे सुमारे पधरा–सोळा मैल आहे. गावाला जुन्या पद्धतीची तटबंदी वेशी वगैरे बंदोबस्त असून दक्षिण अंगाच्या वेशीला लागून बारा महिने टिकणारा असा एक ओढा वाहतो. गावात एकच पण बरेच जुनाट असे 'महालिंगअप्पाचे देऊळ' या नांवाचे देवस्थान आहे. गावची वस्ती सुमारे दोन हजार असावी. हा गाव सरंजामी मुलुखाच्या वाटणीत मिरज संस्थानच्या थोरल्या पातीच्या हिश्शाला आला. या गावापासून जवळच येवती येथे इंग्रज सरकारने अलीकडे बांधलेला तलाव असून, दुसऱ्या बाजीरावशाहीत पेशव्याची इंग्रजांशी लढाई झाली व बापू गोखले रणभूमीवर पडले ते अष्टी हे ठिकाण मोडलिंब्याहून सुमारे दहा मैल आहे. या प्रदेशाच्या आसपास बागायती चांगली असून लोक साधारण सुखी आहेत.

या लहानशा गांवात एक लहानसा ज्योतिषी होता. त्याच्याकडून माझ्या वडिलांनी माझे जन्मटिपण करविले ते खाली दिले आहे.




माझे जन्मलग्न कर्क. राशी मेष. जन्मनक्षत्र कृत्तिकेचा प्रथमचरण. म्हणून माझे जन्मनाम आकारयुक्त 'आमदेव' असे ठेवण्यांत आले. "महा नक्षत्रं मुखे पतित. तस्य फलं विद्वान् भवति. शरीरस्य आरोग्यं भवति" असा

शेरा ज्योतिषीबुवानी या जन्मटिपणावर लिहिलेला आहे. मी ज्योतिषावर विश्वास ठेवणारा असतो तर, त्या शास्त्राच्या पूर्ण सत्यतेविषयी श्रद्धा दृढ होण्याला हा शेरा पुरेसा होता कारण माझ्या जन्मकाळच्या केवळ ग्रहस्थितीवरून त्याने माझ्यासबधी ज्या दोन मुख्य गोष्टी फलज्योतिषाच्या स्वरूपाच्या सागितल्या त्या बरोबर होत्या असे माझ्या सर्व आयुष्यांतील चरित्रावरून यथार्थपणे म्हणता येण्यासारखे आहे. कारण आरोग्य ही गोष्ट सापेक्ष व तुलनात्मकच खरी, तथापि आज सुमारे सासष्ट वर्षांच्या अनुभवांवरून मी निरोगी प्रकृतीचा होतो असे म्हणण्यास हरकत नाही. कारण मला नित्य कायमचा असा कोणताहि रोग नसून साऱ्या जन्मांत आज तारखेपर्यंत साध्या तापाहून मला दुसरी कोणतीच विकृति झाली नाही हे खरे आहे. १९१८ साली मला मलेरिया व इन्फ्ल्युएञ्झा आला होता. १९२६ मध्ये मला 'हार्पिस' (घटसर्पाचा एक भाऊ) नावाचा आजार झाला होता तेवढाच काय तो नामनिर्देश करण्यासारखा अवांतर आजार. तसेच १९३६ साली मला मूळव्याधीचा विकार झाला होता. पण शरीरप्रकृतीचा धर्महि असा की, प्रकृति बिघडली असता ती अधिक बिघडण्याकडे प्रवृत्ति नसून सुधारण्याकडेच असावयाची. विद्वत्तेसबधाने बोलणे कठिण आहे. कारण ती माझ्या अनुभवाची गोष्ट नसून लोकमताची गोष्ट आहे. तथापि पुष्कळ ठिकाणी माझा उल्लेख 'विद्वान्' या विशेषणाने झालेला मी पाहिलेला आहे. यामुळे बिचाऱ्या माझ्या या खेडवळ ज्योतिषाचे हे भविष्य खरे ठरले असे म्हणावेसे वाटते. म्हणून विद्या व आरोग्य या दोन महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख फलज्योतिषाच्या नियमानुसार पत्रिकेत करण्यात आला व तो खरा ठरला ही गोष्ट "कां आतां काय म्हणतां बोला"? असा सवाल मला टाकण्यासारखी झाली आहे खरी !

जन्मलग्नासबधानेहि थोडीशी अशीच गोष्ट आहे. फलज्योतिषी कर्क लग्न हे फार महत्वाचे मानतात. श्रीरामाचे लग्नहि हेच होते असे ज्योतिष्यांनी लिहिले आहे ! तेव्हा मला केवढा मोठेपणा वाटावा ! शिवाय जन्मस्थानी गुरु म्हणजे तर दुधांत साखर ! हा गुरु कर्कलग्नी जन्मस्थानी असून त्याने अनेक घरांवर दृष्टि ठेवली आहे ! तो माझ्या भाग्याचे कारण व संकटमुक्त करणारा तारक ग्रह आहे ! त्याच्या जोडीला मंगळ हा पापग्रह असल्याने गुरुच्या फळाला किंचित् कमीपणा आला आहे. आणि गुरु आहे तेथे नसता तर मंगळाने मला आहे याहून भलताच वाईट मनुष्य बनविले असते ! फलज्योतिषाच्या भाषेप्रमाणे गुरुच्या कृपेने मी "विवेकी, शांत, समदृष्टी, न्यायीवृत्तीचा, विद्वान्, सत्कर्मे व धर्मकृत्येहि करणारा

कीर्तिवान् व भाग्यवान् " आहे ! पण मंगळाच्या जोरामुळे मी " चंचल, लहरी स्वभावाचा, पापी व असत्प्रवृत्तीचा ठरतो " असेहि ज्योतिषाचे मत आहे !

स्वतः माझी ज्योतिषासबंधाची आस्था इतकी की, माझी दहा ओळींची पत्रिका फाटली ती लिहून नीट ठेवण्याला मला कागद मिळाला नाही ! व छापखान्यांचाहि पुण्यांत इतका दुष्काळ की, माझी पत्रिका मला छापवून ठेवता आली नाही ! अलीकडे मूळपत्रिका सांडली तेव्हां माझे ग्रह माझ्या लक्षांत कितपत राहिले आहेत याची परीक्षा मधून मधून होते व तीत मी नापास ठरतो. कारण कोणी कोणी फलज्योतिषी मजकडे येऊन पत्रिका मागतात. तेव्हा वाटते की, येऊन जाऊन काय ते नऊ ग्रह ! माझी पत्रिका करणाराला हर्शेल–नेपच्यून हे ग्रह माहीत नव्हते. आणि प्लूटो हा तर अलीकडचाच ! आणि राशिस्थाने तरी बाराच. तेव्हा कोणत्या घरात कोणते ग्रह आहेत येवढे जरी मी पाठ करून ठेवले असते तरी खाली पाहण्याची वेळ आली नसती. लक्षात ठेवण्याच्या ग्रहाची संख्या नऊहि उरत नाही, कारण गुरू मंगळ जन्मलग्नी ४ च्या आकड्यावर आहेत, व रवि शुक्र व बुध हे गुरुमहाराजाच्या जवळच डाव्या एक दोन घरांत आहेत, इतके माहीत आहे. आणि राहू असेल त्याच्या बरोबर समोरच्या घरात केतू असावयाचा हे ठरलेलेच आहे ! पण नाही ! सुदैवाने पुण्याचे ज्योतिषी रघुनाथशास्त्री पटवर्धन यानी माझी पत्रिका त्याच्या एका ग्रथात छापली आहे म्हणूनच ती वाचली ! आणि वर जी मी माझी पत्रिका उतरून दिली आहे ती स्मरणाने नव्हे तर त्यांच्याच टिपणाचा उतारा घेऊन ! असो.

माझ्या पत्रिकाज्ञानाचा उपयोग मला जो थोडा होतो तो श्रद्धाळू मित्रांशी बोलतांना ! मला कोणी मवाळ म्हटले म्हणजे मी म्हणतो " काय करावे ? माझी राशीच ' मेष ' पडली हो ! उगीच आईबापांनी माझे नांव नरसिंह ठेविले ! " माझ्या हातून कांही वाईट कृत्य झाले म्हणजे मी त्याची जबाबदारी खुशाल मंगळावर टाकतो ! आणि सत्कृत्याबद्दल माझी स्तुति झाली म्हणजे म्हणतो की, " अहो ! असे होणारच. मग गुरुग्रह काय उगीच कर्कराशीवर जन्मलग्नी जाऊन बसला आहे ? " पण आपले भविष्य जुळत नाही असे कळून आल्यास एकादा ज्योतिषी माझ्या पत्रिकेकडे निरखून " हे असे कसे झालें असेल बुवा ? " अशा विचाराने शून्यदृष्टि होऊन बसतो तेव्हां त्याचा खेद

घालविण्याकरितां मी म्हणतो “ ती तुमची चूक नाही. हर्शल ग्रह माझ्या जन्मस्थानी असतां तो या पत्रिकेंत मांडला गेला नाही तो मोडलिबच्या ज्योतिषाला माहीत नव्हता व तो तुम्हालाहि माहीत नाही असे दिसते. पण या अज्ञात हर्शलनेच तुमचे भविष्य चुकविले दुसरे काय ! यात तुमच्या ज्ञानाकडे किंवा ज्योतिषविद्येकडे दोष नाही.” असो कसेंहि असले तरी माझ्या ग्रहाचे व माझे आजवर एकदरीने बरेच जुळले खरे ! त्यानी मला जन्मात एकदोहोशिवाय अधिक तडाखे दिले नाहीत, व आयुष्य साधारणपणे सुखाचे जाऊ दिले !

येथे ओघानेच आले म्हणून फलज्योतिषाविषयी माझे मत सांगतो. या विषयावर आज शेकडो वर्षे वाद चालू आहेत व पुढे शेकडो वर्षें ते चालू राहतील, कधीहि संपणार नाहीत. कारण कोणताहि वाद संपावयाचा तर त्याचा निर्णय देण्याचा, आणि तो निर्णय अमलांत आणण्याचा, अधिकार ज्याला आहे असा कोणी अधिकारी लागतो असे अधिकारी असताहि पक्षकार खालच्या कोर्टाविरुद्ध वरच्याकडे आणि या वरच्याहून त्याच्या वरच्याकडे दाद मागत जातात. याचा अर्थ न्यायकोर्ट झाले तरी त्याचा निर्णय अमान्य म्हणण्याचा आपलाहि अधिकार आहे असे मानतात. आणि शेवटच्या अगदी वरिष्ठ अशा कोर्टाने विरुद्ध निर्णय दिला तर नाइलाजाने त्याला मान वाकवितात; पण तोंडाने मनाने त्याला शिव्याच देतात. ही जेथे सरकारी न्यायकोर्टाची स्थिति तेथे फलज्योतिषाच्या वादाचा निकाल कसा लागणार व तो कोण मान्य करणार ? फलज्योतिष खरे मानणे न मानणे हा ज्याच्या त्याच्या श्रद्धेचा विषय आहे. फलज्योतिषाचे सत्यत्व असत्यत्व ठरवावयाचे तर बिनचूक जन्मवेळा साधलेल्या हजारो कुंडल्या जमवावयास पाहिजेत. त्याना लागू करण्याच्या नियमासंबंधी एकवाक्यता पाहिजे. आणि अनुभवाविषयी निर्विवादता पाहिजे. या गोष्टी लाभणे अशक्य कोटीतले आहे. भौतिक शास्त्रांतल्या सत्यसंशोधनासारखे हे नाही. त्या दुसऱ्या शास्त्रांत प्रयोग करून पाहण्याच्या वस्तूना गुणधर्म असतात पण मन नसतें. यामुळे त्यांच्या प्रयोगांत हुकमी परिस्थिति तयार करतां येते, प्रक्रिया तीच लावतां येते, परिणाम तेच घडवितां येतात, त्याच त्या गोष्टी दहावीस शंभरवेळां हुकमी करून दाखवितां व पाहतां येतात, आणि शेकडो निरनिराळ्या लोकांना त्यांची सत्यता बिनतक्रार पटवून देतां येते. मनुष्याच्या जीवनाची गोष्ट तशी नाही. त्यांत बाह्य परिस्थितीप्रमाणे नुसत्या मनानेंहि

अनिश्चितता चलबिचल निर्माण होऊ शकते. परिणाम म्हणजे सुखदुःख, लाभ-हानी मोजण्याची मापे व घडल्या गोष्टीचा अन्वयार्थ लावण्याचे नियम दर मनुष्यागणिक वेगवेगळे होऊं शकतात. तसेच बरोबर आलेल्या भविष्याचा डांगोरा पिटला जातो पण चुकलेली भविष्ये दृष्टिआड होतात. कार्यकारण-भावाचे नियम वाटेल तसे ताणण्यात येतात. केवळ कालक्रमाने एकामागून एक, किंवा यदृच्छेने एकाच वेळी घडणाऱ्या गोष्टींचा नसता संबंध जोडण्यात येतो. ही सर्व विघ्ने टाळतां येऊन, मन निर्मळ ठेऊन, सशास्त्र प्रयोग होऊ शकतील तरच फलज्योतिषाचे सत्यासत्य कांही ठरविता येईल. तोपर्यंत या वादांत शहाण्या माणसाने पडू नये. श्रद्धेने फलज्योतिष मानणे किंवा न मानणे यापैकी कोणतीहि गोष्ट जो करील ती त्याची त्याला लखलाभ होवो, असे म्हणून गप्प बसावे हा उत्तम मार्ग होय. ज्याचे त्याने आपल्यापुरते पाहावे.

स्वतः मी तर्कबुद्धीने इतके मान्य करितो कीं, चंद्रोदयाने जर समुद्राला भरती येते, आणि सूर्यावरील डागांच्या दर्शनाने पृथ्वीवर वादळे होतात, तर ग्रहांच्या योगाने मनुष्याच्या शरीरावर व मनावर परिणाम होऊ शकेल हे अनुमान ठीक आहे. पण मग नुसत्या ग्रहांचाच काय म्हणून ? स्थिर व स्वयप्रकाश ताऱ्यांनीहि तीच गोष्ट कां घडूं नये ? होय. पण या परिणामाचा अनुभव घ्यावयाचा कसा ? गणित करावयाचे कसे ? नियम बांधावयाचे कसे ? या सर्व गोष्टी मला अशक्य-प्राय वाटतात. शिवाय मनुष्याचे मन, आत्मा, हाहि एक ग्रह किंवा ताराच आहे. तो कांही सर्वस्वी पराधीन नाही. तो आपली शक्ति चालविणारच. दूरच्या ग्रह-तारकांपेक्षां त्याच्या मनाचे आकर्षण शरीरावर अधिक प्रभावी कां होऊ नये ? ग्रहतारका आकाराने फार मोठ्या, पण उलट त्या तितक्या दूरहि आहेत. तात्पर्य, आत्मविश्वास, आत्मप्रत्यय, शुद्धबुद्धीचा तर्क आणि निःस्वार्थी आचार यांच्यावर ज्याला आधारतां येईल त्याने फलज्योतिषाकडे लक्ष घालू नये असे मला वाटते आणि वरील सर्व गुण मजमध्ये पूर्ण नाहीत तरीहि केवळ मनाचा मुहूर्त हा उत्तम मुहूर्त हे वचन वाच्यार्थाने नसले तरी लक्षणार्थाने लावून सर्व व्यवहार मी आजवर करीत आलो आहे. तो असा. मी आपली पत्रिका जतन करून ठेवली नाही. ती सग्रही होती तेव्हां आपण होऊन कोणा ज्योतिषाला दाखविली नाही. कोणतेहि कार्य करण्याच्या वेळी मुहूर्त पाहिला नाही. घरच्या लग्न-मुंजी करतांना पंचांगांतल्या मुहूर्तांप्रमाणेच ती

धर्मकृत्ये केली हे खरे, पण घरचा उपाध्या म्हणून एक संस्था मी घरांतील स्त्रियांच्या मनःसमाधानाकरिता संभाळली आहे, आणि तो सांगेल त्याप्रमाणे त्या कार्यापुरते वागावयाचे अशी शरणचिठ्ठीहि लिहून दिली आहे. आतां माझ्या एखाद्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत प्रसिद्धिची तिथि सणावाराची लिहिली असेल. पण ते सर्व लौकिक औपचारिकच होय दिवाळी म्हणून आनंद वाटत नाही व ग्रहण म्हणून मी खिन्न होत नाही माझ्या मनाची खरी प्रसन्नता अप्रसन्नता इतर गोष्टीवरच अवलंबून असते एखादा मनुष्य फल–ज्योतिषावर खरोखर विश्वास ठेवतो की नाही, याची खरी परीक्षा तो पंचांगातल्या मुहूर्तावर नित्य–नैमित्तिक धर्मकृत्ये करतो की नाही यावरून होत नाही तर लग्नकार्यांत वधुवरांच्या पत्रिका पाहण्यास मागतो की नाही यावरून खरी होते. हुंडा पटत नाही हे सांगायची लाज म्हणून पत्रिका पटत नाही ही खोटी सबब सांगणारांचे मी बोलत नाही ! पण मनासारखा हुंडा मिळत असता, किंवा मनासारखे मुलामुलींचे रूप व कुलशील असता, जो केवळ पत्रिका जुळत नाही म्हणून लग्नसंबंध जोडण्यास कबूल होत नाही त्याचीच श्रद्धा खरी ग्रहांचा खरा गुलाम व कैदी तोच. मी माझ्या कोणत्याहि मुलामुलींच्या लग्नात पत्रिका पाहिलेली नाही.

# लहानपणच्या आठवणी

माझ्या लहानपणच्या कांही आठवणी या पुढे सांगतो. लहानपणच्या आठवणी पोरकटच असावयाच्या. पण बाळपणाकडे कोणीहि केवळ कौतुकाच्या दृष्टीनेच पाहतात. लहानपणच्या आठवणी तुटक तुरळक असावयाच्या म्हणून सुचतात तशाच त्या देतो. या लहानपणच्या आठवणी लग्नापर्यंतच्या आहेत. पण माझे लग्नच मुळीं लहानपणीं झाले त्याला काय करणार !

माझी सर्वांत जुनी आठवण अशी. माझे वडील देवपूजा करावयाला पाटावर बसले आहेत. मी त्यांच्या मांडीवर आडवा लोळत पडलो आहे. वडील तोंडाने रुद्र म्हणत उजव्या हाताने ताब्याचे अभिषेकपात्र धरून ताम्हानात ठेवलेल्या मूर्तीवर ते धार पाडीत आहेत. आणि मी आडवा पडल्या पडल्या माझा हात पुढे करून, मधून मधून तो त्या धारेत धरीत आहे. वडील डोळे मिटून बसत तोपर्यंत माझ्याहि खेळकर हाताला अभिषेकाचे पुण्य घडे. पण त्यानी डोळे उघडून पाहिले म्हणजे अभिषेकाला विघ्न करण्याचे पाप मी करितो असे सहजच ठरे. प्रथम दोन-तीन वेळा त्यानी चढत्या आवाजाने माझा निषेध केला पण चवथ्या वेळी त्यांनी डाव्या हाताने माझ्या पाठीला जाणवेल अशी चापटी मारली. तेव्हा मला ‘ स्थान-त्याग’ करावासा वाटला. आणि माझ्या हातचा अभिषेक देवावर होण्याचा थांबून माझ्या डोळ्यातील तीर्थाचा अभिषेक मातृदेवतेच्या अगावर सुरू झाला !

मिरजेस म्हैसकर याच्या वाड्यांत रात्री देवधर्मानिमित्त गोंधळ चालू होता आई मला घेऊन गोंधळ पाहवयास गेली होती व खाली ठेवल्यावर मला झोप लागली म्हणून निजवून घरांत कांही कामाला गेली. मध्ये मी जागा झालो व रडूं लागलो. तेव्हां जवळच असलेल्या दुसऱ्या सुवासिनी स्त्रीने मला उचलून माझी फसवणूक किंवा थट्टा करण्याकरिता आपल्या पदराखाली घेऊन आईच अशा भावनेने मला उराशी धरले पण माझी दूध पिण्यासबधाची फसवणूक प्रयत्नांती लवकरच मला कळून आली, तेव्हा त्या बाईसकट इतर बायाहि हसू लागल्या. कारण हे की त्या बाईचा नवरा परागंदा झालेला असून तिला जन्मांत मूल झालेले नव्हते. मग तिच्या स्तनांत दूध कोठून येणार ! नंतर मला आईच्या-जवळ देण्यांत आले. पण या बाईने मला पिण्यास जवळ घेतले म्हणून अर्थातच

ती माझी आई झाली. आणि पुढे मी किंचित मोठा होऊन शाळेला जाऊ लागलो असताहि ती कृष्णास्नान करून परत येत असता किंवा एरवी मला भेटली म्हणजे मला मुलासारखे वागवी व हातावर खाऊ देई. तेव्हा 'ही पहा, याची आई' म्हणून सोबतीहि विनोद करीत.

माझ्या लहानपणी ध्यानात राहण्यासारखा मार घरी आईबापांच्या हातून मला कधीच मिळाला नाही. मी जो काही मार खाल्ला असेल तो शाळेत इतर मुलांच्या बरोबर. तोहि काही अभ्यास चुकल्या चुकविल्या करिता. निवळ खोड्या-करितां असा मार मी बहुधा केव्हाहि खाल्ल्याचे स्मरत नाही तथापि लहानपणी निर्दयपणाने मार दिल्याची आईबापाची उदाहरणे माझ्या शेजाऱ्याच्या घरी मी पुष्कळ पाहिली. उजव्या हातच्या पटवर्धनाचे व डाव्या हातच्या कानिटकरांचे उदाहरण चांगलेच लक्षात आहे.

पटवर्धन हे प्रेमळपणाच्या भरात मुलांचे लाड ज्या प्रमाणात करीत त्याच प्रमाणात रागावले म्हणजे मुलाना मारीत. मग हातात जे सांपडेल ते साधन मुलावर चालविण्यास ते कमी करीत नसत. लाड मात्र इतके की, शिमग्यांत खेळ खेळायला मुलाना आपण होऊन हुसकून घालवीत. शिवाय फाल्गुनी पौर्णिमा आणि धुळवड या दोन दिवसांत ते स्वतः पचा लावून घेऊन मुलांबरोबर बाहेर पडत. आणि सर्व प्रकारचे अभद्र मत्र म्हणत, ओरडत; घाण व धूळ लोकाच्या अंगावर फेकीत या दोन दिवसात मुलाना घराबाहेर सर्व प्रकारच्या खोड्या कर-ण्यास मुक्तद्वार असे. उलट पटवर्धन इतके अविवेकी व तामसी असत की, एकदां त्याच्या वडील मुलग्याने त्यांचा अपमान केला तो सहन न होऊन, आणि मार देण्यास मुलगा प्रतिकारहि करितो असे पाहून, त्यानी रागाच्या भरांत जानवे तोडून टाकले आणि नेसूचा पचा सोडून सन्यास घेण्याकरितां की काय दारापर्यंत धावले. तेव्हां इतर सर्व मडळी जमून त्यांनी त्याना घरांत आणून बसविले. आणि त्यांचा राग शात होण्याकरिता अपराधी मुलाने स्वतःला शिक्षा म्हणून आपल्याच हाताने फडाफड तोंडांत मारून घेऊन गाल सुजविला.

कानिटकरांचा पुतण्या फार खोडकर. बहुधा चार–आठ दिवसांत त्याच्या तगीट चुलत्याने त्याला खांबाला बांधून घालून दोरीने बडविले असा एखादा प्रसंग आम्हा भावंडांच्या दृष्टीस पडावयाचाच. ते मार देणारे भले आणि तो मार खाणाराहि भक्कम होता !

स्वतः धाक लावण्याला मन निष्ठुर करवत नाही म्हणून माझी आई ते काम एकादे वेळी तिऱ्हाइताकडून करवी. मात्र त्या रागाची मर्यादा प्रत्यक्ष मार देण्या-पर्यंत जाऊं देत नसे. आमच्या घरी रामभाऊ आणि भलुआत्या नावाची भावा-बहिणीची जोडी राहत असे. या दोघाकडे हे धाक दाखविण्याचे काम केव्हा केव्हा येई. दोनहि भावंडे दिसण्यांत उग्र व भेसूर असत. रामभाऊचे डोळे नेहमी लाल असावयाचे, मग ते गाजा ओढीत की काय न कळे. त्यांनी दुपारी रिकामपणी मला अक्षर-ओळख करून द्यावी. एकदा त्याच्यापुढे बसण्याला मी टगळमगळ केली तेव्हां त्यानी मला उचलून रस्त्यापलीकडे पिंपळाचा पार होता त्यावर नेऊन बसविले. मी रडू लागलो तेव्हा शिक्षा पुरे असे वाटून मला उचलून परत घरी आणावे असे आईला वाटू लागले पण स्वतःच तसे केल्यास रामभाऊ रागावतील म्हणून तिने आपली माया गिळली. ती दुसऱ्या दिवशी असे म्हणताना मी ऐकले की, "मी याला आत उचलून आणला असता तर रामभाऊंनी आपला अपमान झाला असे समजून याला पुन्हा शिकविण्याकरिता घेतला नसता तर काय करावे !" रामभाऊ खुषीत असले म्हणजे मात्र ते मला आपल्या चचीत हात घालू देत, आणि वेळी स्वतःकरितां कुटलेल्या विड्यांतला थोडासा प्रसाद माझ्याहि हातावर ठेवीत. पण तो प्रसाद नको आणि तो त्याचा धाकहि नको असेच मला वाटे. रामभाऊना शिक्षकाची विद्या फारशी अवगत नव्हती हे मात्र मला तेव्हाच दिसून आले होते.

भलुआत्या ही बालविधवा. उपजीविकेकरिता तिला पुष्कळ मेहनत करावी लागे. रस्त्यात पडलेले गाईबैलाचे शेण उचलून आणून त्याच्या शेणी लावून विकणे, शेतांत जाऊन जोधळ्याचे सड उपटून आणून त्याचे जळण पुरविणे, अडीअडचणीच्या वेळी कोणाच्याहि घरी जाऊन स्वयपाकपाणी करणे इत्यादि कष्ट तिला करावे लागत. ती निराश्रित असल्याने असल्या काबाडकष्टानीच तिला जगतां येई. पण या शिवाय तिचे निर्वाहाचे एक स्वतत्र साधन असे. ते अगात अवसर आणून चेटूक व देवदेवस्की करणे. भोळ्या बायाबापड्यांना सकट पडले किंवा दुखणेबाणे आले की, केव्हां केव्हां त्यांना अति-मनुष्य अशा दैवीशक्तीच्या आधा-राचा उपाय करावासा वाटे. तसे झाले म्हणजे भलुआत्याला बोलावणे यावयाचे, मग तिने जाऊन, मात्र घरांत पुरुष मनुष्य नाही असे पाहून, घुमूं लागावे. तांदूळ, किंवा मोठी शिकार असली तर नारळ किंवा खोबऱ्याच्या वाट्या मागून घ्याव्या,

उडीद मंतरून चारी दिशांना फेकावे, आणि प्रत्यक्ष ईश्वराशी तारायंत्र सुरू केल्या-च्या बहाण्याने सुचेल तो किंवा पचेल तो सुटकेचा उपाय सांगावा. उपाय मात्र फारसा कठिण नसे. कोंबडे बकरे बळी देण्यापर्यंत तिची मजल जात नसे. तर गुलाल पसरलेला भात व लिंबे चव्हाठ्यावर लात्र नेऊन ठेवणे, लहानसान दाने देणे, एवढ्यावर ती भागवून घेई. "ईश्वरकृपा मेड ईझी" अशातला तो प्रकार होता. चेटकिणीची वर्णने मोठेपणी इंग्रजी पुस्तकात मी पुढे वाचली त्याचा लहान-पणीच हा छोटासा अनुभव आलेला होता.

देवदेवताशी नाते जोडणाऱ्या मनुष्याचा धाक कोणाहि भोळ्या मनुष्याला सहजच वाटतो. हा तिचा धाक आम्हा लहान मुलाना तर वाटेच, पण मोठ्या मनुष्यानाहि. म्हणून भलुआन्याला नाखुष करून राग न आणण्याची सावधगिरी सर्वच जण आपापल्या परीने घेत. यामुळे अडीअडल्या वेळीं तिला कालवण—पाणी सहज बिनबोभाट मिळे. लहान मुलाना तिच्या देवदेवस्कीशीं काहीच कर्तव्य नसे. पण तिने डोळे वटारून पाहिले की, तेवढ्यानेच ती भीत आणि तिच्यापासून पळून जात किवा घेतलेला हट्ट सोडीत. पण मोठ्या माणसापेक्षां लहानांवर तिचें प्रेम अधिक असे. शिवाय लहानाना जवळ आकर्षून घेण्यासारखे तिच्याजवळ एक मोठे साधन असे. ते तिने उपयोगात आणले म्हणजे आम्ही मुले तिचा सर्व उग्रपणा विसरून तिच्या भोवती जमत असू. हे साधन म्हणजे गोष्टीवेल्हाळ-पणाचे. तिचे नाक नकटे, चेहरा पुरुषी, कुरूप व ओठांवर मिशासारख्या राठ लवीचे खुटहि दिसत ! पण तिने गोष्टी सागण्याला प्रारंभ केला म्हणजे तिचा तो चेहेरा आम्हाला दिसेनासा होई आणि सर्व लक्ष गोष्टींत गढून जाई. तिच्या जवळ गोष्टींचा संग्रह आश्चर्यकारक होता. कारण तिजकडून एकदां ऐकलेली गोष्ट पुन्हां केव्हाहि आम्हाला ऐकावी लागत नसे. उष्टी गोष्ट सागण्याचा तिला स्वतःलाच कटाळा येत असावा. एकदा आवडलेली गोष्ट विशेष आवडणारी म्हणून आम्हीच ती पुन्हा सांगण्याचा आग्रह केला तर नाइलाजाने सांगे. पण ती सांगताना तिचे स्वतःचे मन तीत रमत नसे.

तिच्या गोष्टींपैकी काही अजून आठवतात. उदाहरणार्थ, सात राक्षसांची गोष्ट. पुढे मराठी पांचव्या पुस्तकात जलौघ, बाष्प व मारुत या तीन राक्षसांची शास्त्र-विषयक गोष्ट मी वाचली. पण त्या गोष्टीचे बोधप्रद शास्त्रीय तात्पर्य जेव्हां शिक्ष-कांनी समजून सांगितले, आणि हे तीन राक्षस म्हणजे पाणी, वाफ आणि वार

याहून दुसरे तिसरे कोणी नव्हेत असे समजले, तेव्हां त्यांच्या पराक्रमाचे वर्णन अद्भुत असले तरी फिके पडले. भलुआत्याचे सात राक्षस अधिक आवडणारे, कारण त्याच्याकडून उपयुक्त असे काहीच काम करून घेतल्याचा कथाभाग तिच्या गोष्टीत नव्हता! जे उपयुक्त ते अद्भुत न वाटण्याची प्रवृत्ति, मला वाटते, लहानातच काय पण प्रौढ माणसातहि असावी. त्या सात राक्षसाची नावे आता मला आठवत नाहीत. पण म्हातान्या भलुआत्याबाईंची स्मरणशक्ति फार चांगली होती. ती नावागावाशी कधीच अडखळताना आढळली नाही. दुसरी एक गोष्ट "खडका कोथिंबरी जळामध्ये मासा बागेमध्ये मोर पिंजऱ्यामध्ये कीर भाई माझा" अशा पालुपदाची होती. हीच किंवा यासारखी एक गोष्ट 'अरेबियन नाइटस'मध्ये आहेसे वाटते. दुष्ट जादुगार राक्षसाच्या तावडीतून आपल्या भावाची सुटका एका बहिणीने कशी केली हा विषय तीत आहे. गोष्टी या मनुष्यप्राण्यापेक्षा अधिक 'प्रवासप्रिय', जगभर हिंडणाऱ्या आणि जातील तेथे वस्ती करणाऱ्या आहेत. 'ॲरेबियन नाईटस्'चे मराठी भाषांतर होण्यापूर्वीहि त्यातील गोष्टी हिंदुस्थानात प्रसृत होत्या असे वाटते. भलुआत्या निरक्षर होती हे आणखी वेगळेच प्रमाण या विषयी होते.

भलुआत्याची एक गोष्ट सर्वच मुलांना आवडे आणि तिच्या पुनरुक्तीचा कंटाळा येत नसे. ती 'मोदकांची गोष्ट' अशी. एका दरिद्री आईबापांना एक गोड मुलगा होता. एकदा शेजारच्या घरी मोदक केले होते, त्यातला एक त्या घरच्या मुलाने चोरून खिशात घालून आणला आणि आपल्या सोबत्याला प्रेमाने खावयास दिला. तो फार गोड लागला. मुलाने घरी जाऊन आपल्या आईजवळ मोदक करण्याचा हट्ट धरला. पण मोदक करण्याला लागणारे उंची पदार्थ त्या बिचारीजवळ कोठून येणार? तिने आपल्या घरच्या दारिद्र्याची कल्पना मुलाला आणून देण्याचा प्रयत्न परोपरीने केला. पण तो सिद्धीस जाईना. तेव्हा शेवटी 'देवाने आपणाला दरिद्री ठेवले' असे काहीसे तिने सांगितले. अर्थशास्त्र न कळणाऱ्या अल्पबुद्धीच्या मुलाला "देवाला मागावे म्हणजे देव देतो" हे मात्र शिकविले तर चांगले समजते. मुलाने अरण्यांत आसन मांडून डोळे मिटून देवाचा धांवा केला. शंकर-पार्वती तिकडून सहज जात असतां पार्वतीने मुलाचे रडणे ऐकून त्याचे दुःख निवारण करण्याचा हट्ट धरला. शंकर प्रसन्न होऊन त्यानें वर दिला. घरी जाऊन मुलगा पाहतो तो अंगणाच्या कोपऱ्याला एक

हातभर झाड उगवले असून त्याच्या फांद्यागणिक मोदक लागले आहेत. आणि जवळच मुलांच्या विटीदाडूच्या खेळातल्या बदी एवढा बांधीव खळगा असून त्यांत काठोकांठ साजूक तूप भरलेले आहे. मुलाने एक मोदक तोडून घेतला तों त्या जागीं फिरून दुसरा लगेच आला. मोदक बुचकळून खाल्ल्यानें तूप कमी होतांच फिरून खळगा काठोकाठ भरला ! पण जाऊ दे. उपमांच्या विषयाप्रमाणे गोष्टीतहि केळकरांना खाण्याचे पदार्थच आवडनात अशी टीका व्हावयाची !

मी जातीचा फारसा रडवा नव्हतो. तथापि कारणाशिवायहि मी केव्हां केव्हा रडे. सध्याकाळची करकरीत वेळ झाली आहे, घरांत अजून दिवा लागलेला नाही, बाहेर आभाळ ढगांनी कुंद झाले आहे अशा वेळी मला हटकून रडे येई. एकदां आईने 'अरे कां रडतोस' असे मला विचारले तेव्हां मी खरोखरच म्हणालो 'रडावस वाटत म्हणून' ! दुःख नसले तरी उदासपणामुळे मनुष्य रडकुडीला येतो हा अनुभव लहानाप्रमाणे थोरांनाहि येत असेल. पण प्रौढ वयात मनुष्य प्रत्यक्ष रडत नाही इतकेच. शिवाय हवेचा हा परिणाम आपल्या उदासपणाचे कारण आहे हे त्याचे त्याला कळते, व तसे स्पष्ट करून सागतां येते. मनाचा उदासपणा घालविण्याला प्रौढ माणसाला इतर साधने असतात, पण लहान मुलांना अशा असहाय्य स्थितीत रडण्याशिवाय दुसरा मार्ग कोणता ? अशाच एका सध्याकाळी मी रडत असतां एकदम आई आणि दादा हेहि स्फुदून रडू लागले असे मला स्मरते. मला वाटले की, माझ्या प्रमाणेच त्यांनाहि 'रडावेसे वाटले' असेल ! पण आमचे चुलत आजोबा वारल्याचे पत्र सध्याकाळी कचेरीत मिळाले ते घेऊन दादा घरी आले आणि आईला ती बातमी त्यांनी सांगितली तेव्हां दोघांनाहि रडू आले. एरवी मला गप्प करण्याला आई मोकळी असे, आणि मला कोणत्या ना कोणत्या युक्तीने हसे आणून ती गप्प करी. पण आज स्वतः तिलाच रडू येत होते यामुळे तिने निर्वाणीचा उपाय म्हणून चार खडीसाखरेचे खडे माझ्या हातावर ठेवले व अशा रीतीने माझे रडे थांबविलें. तिचे समाधान एकटे दादाच करू शकते पण त्यांच्याहि तोंडून शब्द निघत नव्हता.

माझी मराठी 'मूळाक्षरां'ची ओळख शब्दशः 'धुळाक्षरां'तूनच झाली. धुळाक्षर म्हणजे लाकडी फळीवर विटकरांची धूळ पसरून तींवर मोळ्याने ( लाकडी खिळ्यानें किंवा कुणीनें ) रेखाटलेले अक्षर. तेव्हां स्लेटपाटी महाग. शिवाय ती फुट-

ण्याची भीति. यामुळे त्या वेळी लहान मुलांकरिता लाकडी फळीचाच असा उप योग करीत. शाळेतील एक कोपरा जसा पतोजीने तबाकू खाऊन मारलेल्या पिचकाऱ्यांनी लाल झालेला, तसाच दुसरा एक कोपरा मुलानी या अभंग पाटीवर पसरण्याकरितां कुटलेल्या विटकरीच्या धुळीने लाल झालेला असावयाचा. माझे धुळपाटीचे शिक्षण हरिपंतोजी नावाच्या एका गावठी शिक्षकाच्या हाताखाली झाले. त्याची थट्टा करण्याकरितां आम्हा मुलानी एक यमक जुळविले होते. 'हरि पतोजी चकमक डेरा—कानात बोट साडे तेरा.' बोटाची ही सख्या केवळ यमका करिताच योजलेली होती. पण यमकच काय 'चकमक डेरा' हे शब्दहि निरर्थकच होते. या बालिश कवनाचा अर्थ आमचा आम्हालाहि कळत नव्हता पण पंतोजीला न ऐकू जाईल अशा स्थितीत किंवा अशा रीतीने आम्ही एकमेकाला ते म्हणून दाखवीत असू हरिपतोजी मोठा रागीट असे तो मुलाच्या अगावर खसकन् मोठ्याने ओरडला म्हणजे सर्व मुले भयभीत होत आणि खाली मान घालून धुळाक्षरे गिरवूं लागत. या गावठी शाळेला सरकारी मदत काहीच नव्हती मुले ठरीव फी अशी कांही देत नसत पण दर पौर्णिमा—अमावास्येला एकेक पैसा आणि सुपारी देऊन आम्ही त्याची गुरुपूजा करीत असू. शिवाय प्रत्येक सण आला म्हणजे घराहून काही तरी घेऊन येण्याची सूचना स्वतः पतोजीकडून होई आणि ते जे काय मिळेल त्यावर पतोजी सतुष्ट होत. सुपाऱ्यांच्या दक्षिणेने त्याच्या व्यसनाचे एक कलम आपोआप पुरे होई

हा पंतोजी नुसता रागीटच नव्हे तर मारकटाहि होता. त्याला टेबल नव्हते. पण बसकुरावर बसल्या बसल्या तो आपली छडी जमिनीवर इतक्या जोराने आपटी की, तीमुळे धूळ उडे. मात्र त्या धुळीचा उपयोग पाटीवर होण्यासारखा नव्हता. या छडीचा उपयोग मुलाच्या पाठीवर केव्हां केव्हां होई. त्यामुळे कपड्या-वरची धूळ तर उडून जाईच पण कपड्याच्या आंत पाठीवर वळहि उमटत घोडीवर टांगणे ही त्याची शिक्षा क्वचित् प्रसंगी अत्यत खोडकर मुलांच्या वांट्याला येई. घोडीवर चढविणे म्हणजे कांही उचीवर टांगलेल्या आडव्या काठीवर हाताच्या बोटांनी मुलाला लोंबकळायला लावावयाचे, आणि तो तसा लोंबू लागला म्हणजे खाली त्याच्या पायांवर छड्या मारावयाच्या. खुर्चीची म्हणूनहि एक शिक्षा असे. ती खरी खुर्ची नसून मुलाने खुर्चीवर बसल्यासारखे वाकून कबर दुखे-पर्यंत उभे राहणे. आंगठे धरणे याचा अर्थ स्पष्टच आहे. उभे करणे हे तर इतके

सौम्य समजले जाई की, त्याचा शिक्षेत अतर्भावच होत नसे. उठबशाहि काढाव्या लागत, आणि त्या ज्याच्या त्याने मोजावयाच्या असत कारण शिक्षेत् अपमानाची भर एरवी कशी पडणार ? तुरुगात फटके मोजण्याचे काम मॅजिस्ट्रेट किंवा जेलर करितो स्वतः कैदी करीत नाही ! असो. अल्पवयात अशा निर्दयपणाच्या शिक्षा भोगाव्या लागणारा मुलगा मनाने निर्ढावल्यास काय नवल ? पण हरिपंतोजी मोठे विवेकी म्हणजे श्रीमताच्या मुलाना वागविण्यात ते मोठे सदय असत. शिक्षांचा सर्व भर गरीबाच्या मुलावरच पडे ! तो इतका की, मुलाला फार मारल्यामुळे घरचे आईबाप हरिपतोजीकडे येऊन त्याना मुला देखतां हमरीतुमरी करण्याचे प्रसग येत.

सातव्या वर्षापासून मी मिरजेस सरकारी शाळेत जाऊं लागलो. तेव्हां माझी धूळपाटी आणि हरिपंतोजीच्या हातचा मार खाण्याची भीति ही दोनीहि टळली ही शाळा सरकारी म्हणून जोत्यावर बाधलेली दगडी अशी होती. घरच्या इमारतीच्या मानाने ही शाळेची इमारत श्रीमत वाटे. बाकांची सोय अजून नव्हती. पुराणाला जाणाऱ्या बाया जशी आपली बसावयाची आसने आपणच घेऊन जातात त्याप्रमाणे आम्हा मुलाना आपली 'बसकुर' घरचीच न्यावी लागत. हे बसकूर म्हणजे पातळ गोणपाटाचा तुकडा असे हल्लीप्रमाणे शिकण्याचे सामान नेण्याकरितां ट्रंका नसत तर घरच्या घरी शिवलेल्या कापडी पिशव्या असत. त्यात कागद, पाटी, पेन्सिली, पुस्तक, ही भरून न्यावयाची या पिशव्यांना 'बंग्या' म्हणत. त्यांना नवारीचा तुकडा शिवावयाचा व त्या गळ्यात अडकावून जावयाचे. हल्लीप्रमाणे लहान विद्यार्थ्यांनाच काय मोठ्यानाहि तेव्हा पायात जोडे घालावयास फारसे मिळत नसत. वहाणा व बूट हे तेव्हा नव्हतेच. मधल्या सुट्टीत खाण्याकरितां फराळाचे डबे नसत. पाण्याचा थडा फराळ करून भूक भागवावी लागे. किंवा भूक विसरण्याकरितां बाहेरच्या आवारात मुले काही तरी खेळ खेळत. क्रीडांगण असे नव्हतेच. यामुळे हे खेळ रस्त्यावरहि खेळत. गायनाचे शिक्षण नव्हते. कविता म्हणावयाच्या त्याहि गळ्यावर न म्हणता वृत्ताच्या ठरीव चालीवरच म्हणून भागे. 'परवाचा' मात्र चालीवर म्हटल्याने गायनाचा काही सूर निघे. पण ते सामुदायिक गायन असल्यामुळे कोणत्या मुलाचा गळा कसा हे कळण्यास साधन नसे.

मी चार वर्षांचा होतो तेव्हां १८७६ चा मोठा दुष्काळ पडला. तेव्हां धारण इतकी महाग झाली होती की, एक रुपयाचे जोंधळे मोठ्या सुपांत मावत.

सूपभर धान्य घरी आले म्हणजे ते किती पुष्कळ असे मला वाटे. पण त्याला एक सबध रुपया पडे हे मला माहित नव्हते. आणि एका रुपयाची किमत किती हे मला तेव्हां कळत नव्हते. या दुष्काळातच काय, एरवींहि आम्हांला दुवेळां भात खावयास मिळत नसे. लहान मुलाकरिताच एकवेळ भात तांबलेभर शिजवीत वडील-मातोश्री जोंधळ्याच्या कण्या व भाकरी आणि आमटी याजवर प्रायः निर्वाह करीत. पक्तीत सगळ्या पानावर भात वाढला म्हणजे त्या दिवशी काहीतरी सण आहे असे आम्ही ओळखीत असू. यावरून तूप-दूध घरी कितपत येत असेल याची कल्पना सहजच होईल. पण हे कदान्न सहसा बाधत नसे. दुष्काळांत आई-बापांच्या तोंडावर आलेली चिंता दिसे, पण त्याचे खरे कारण कळत नसे. तो दुष्काळ कोरडा यामुळे धान्याच्या महागाईत पाण्याच्या दुर्भिक्षाची भर पडली होती. आधीच मिरजेत पाण्याची नेहमीची टचाई. त्यातून आवर्षण. यामुळे आईला धुणे-पाणी करण्यास फारच श्रम पडत. त्यातच तिच्या गळ्याला वर्णाचा रोग झालेला. यामुळे ते दिवस तिने किती कष्टाने काढले हे आठवले म्हणजे अजून डोळ्याला पाणी येते. व्रणाचे भोक गळ्याला आरपार पडले होते. यामुळे ती पाणी प्याली की त्याचा ओलावा बाहेर उमटे. एक हकीम कापडात गुंडाळलेली पेटी घेऊन येई व त्यांतले मलम तिच्या गळ्याला लावी, तेव्हा मी त्याच्याजवळ आवर्जून बसे. तेव्हां तो माझ्या पाठीवरून हात फिरवून म्हणे "बाळ तुझ्या आईला उद्या बरी करतो हां." पण त्याचे ते उद्या काही केल्या सपेचना!

मी मराठी पहिल्या व दुसऱ्या इयत्तेत असतां सर रिचर्ड टेंपल, मुंबईचे गव्हर्नर, यांची स्वारी मिरजेस आली. ती शाळेकडेहि आली होती. गव्हर्नरसाहेबां-च्या टोपीवर खऱ्या सोन्याचा मोठा चांद लावलेला असतो अशी आमची समजूत होती! म्हणून सांपडेल तेथे फटीतून तोंड बाहेर काढून आम्ही तो चांद दिसतो कां पहात होतो. पण तो न दिसल्याने आमची निराशा झाली. आणि दोघा साहेबां-पैकी गव्हर्नर कोणचा हें अखेरपर्यंत न कळल्याने त्याच्या आगमनाप्रीत्यर्थ खाऊ वाटला तोहि गोड लागला नाही असे आठवते. तेव्हांचा मिरजेचा म्हणजे कोल्हापूरचा पोलिटिकल एजंट वॉलर या नांवाचा होता तो विशेष उंच, व असिस्टंट पोलिटिकल एजंट बंबगार्टनर हा विशेष खुजा होता. पण माणसाच्या उंचीत व नांवांत खरा संबंध नसतो हे कळण्याचे ज्ञान नसल्याने, पुढे कांही दिवस-पर्यंत साहेबांची नांवे कळल्याशिवाय आम्हाला भागत होते. कारण उंच साहेब

दिसला की तो वॉलर व खुजा दिसला की तो बबगार्टनर असलाच पाहिजे असे आम्ही खुशाल घेऊन चालत होतो.

आमच्या वेळचा डेप्युटी इन्स्पेक्टर बाळशास्त्री पडित यां नांवाचा कोल्हापूरचा एक गृहस्थ असे. तो पुरा साडेसहा फ़ट उंच. गोरागोमटा व भव्य असे. तो परीक्षेला आलेला दुरून पाहिला म्हणजे जी दहशत वाटे तिचे वर्णन करतां येत नाही. काळा डगला घातलेला, हातात कागदाचा रुमाल व रेशमी गोंडे लावलेले पितळेचे कलमदान घेतलेला, त्याचा पट्टेवाला पुढे व बाळशास्त्री मागे, असे आले म्हणजे आम्हाला राजाची स्वारी याहून कांही वेगळी असावी असे वाटत नसे

आमचे परीक्षक जितके उच तितके आमचे दुसऱ्या इयत्तेचे मास्तर चितोपत ओगले हे ठेगणे असत. ते परीक्षकाच्या मागे उभे राहून मुलांना उत्तरे सुचविण्याची खटपट खरोखरच करीत; पण पुढे राक्षस व मागे ठेंग यामुळे त्यांचे बहुतेक प्रयत्न फुकट जात एकदा हेडमास्तर वर्गावर येऊन त्यांनी मुलादेखत चितोपतांची खरड काढली. तेव्हा चितोपत खरोखरीच रडू लागले. तेव्हा मास्तरहि रडतात की ! असे आम्ही आपापसात आश्चर्याने बोलल्याचे मला चागले स्मरते. एके दिवशी हेडमास्तर वर्गावर येण्याच्या सुमारास मी व विठ्ठल जोशी नावाचा मुलगा चुरशीची कुस्ती खेळत होतो; व इतर मुले गम्मत पहात होती. मास्तर आले ते प्रथमतः रागे भरले. पण ते थोडे विनोदी म्हणून त्यानी शिक्षेदाखल त्यांच्या देखता फिरून पहिल्यापासून कुस्ती खेळण्याला आज्ञा केली पण मास्तरांचा विनोद व राग यांजमधील भेद कळण्याची पात्रता आम्हाला नव्हती त्यामुळे आमच्याने कुस्ती खेळवली नाही

मी मराठी शाळेत, व पुढे इग्रजी चार-पांच इयत्तेपर्यंतहि, बक्षीस-समारभाच्या प्रसंगी सभाषणे करी. वर्गात नबर बहुतेक पहिला किवा दुसरा. मी दिसण्यांत तरतरीत आणि माझी भाषा शुद्ध यामुळे मजकडे बहुधा वरिष्ठ प्रतीच्या पात्रांची कामे येत. यातले कांही पार्ट मला आठवतात. एक, कॅन्यूट राजा व त्याचे खुषमस्करे या प्रवेशांतला. कॅन्यूट राजा समुद्रकांठी बसला असतां त्याचे खुषमस्करे त्याची स्तुति करण्याच्या भरांत म्हणाले, "सरकारांनी आज्ञा केली तर समुद्रहि मागे हटेल." ती भरतीची वेळ होती. असे पाहून कॅन्यूट वाळवटांत खुर्ची टाकून

बसला व "लाटानो मागे हटा. माझा तुम्हाला तसा हुकुम आहे" असे दरडावून सांगू लागला पण भरतीच्या लाटानी त्याचे व खुषमस्कऱ्याचे पाय घोट्यापर्यंत भिजले तेव्हा राजाने त्या तोंडपुजांची निर्भर्त्सना केली. हा क्यॅन्यूटचा पार्ट मजकडे होता. दुसरा पार्ट अलेक्झाडर राजाचा एकदा एका दरोडेखोराला पकडून अलेक्झाडरपुढे आणले असतां त्याने राजाला उद्देशून म्हटले, "राजा, मी एक दरवडेखोर तर तू सात दरवडेखोर आहेस मग मलाच नावे का ठेवतोस ? मी व्यक्तींना लुबाडतो तर तू राष्ट्रांना लुबाडतोस. तूं मी सारखेच अपराधी किंवा सारखेच पराक्रमी !" कपाळाला गंध, डोक्यावर जरीची टोपी, व हातात रुप्याच्या मुठीची काठी येवढ्या सामुग्रीवर मी राजा होई !

मराठी दुसऱ्या-तिसऱ्या पुस्तकातील चतुःश्रृंगीच्या यात्रेच्या गोष्टीतील पुण्याचे वर्णन माझे तेव्हाच पाठ होते पण पुणे कसे असेल याचा बोध नव्हता. कांही वर्षामागे आमच्या केसरी कचेरीतील मंडळी चतुःश्रृंगीच्या टेकडीखाली वनभोजनाला गेली होती तेव्हा बैठकीवर बसलो असता पंचेचाळीस सत्तेचाळीस वर्षांपूर्वी भाषणाकरिता पाठ केलेले चतुःश्रृंगीचे वर्णन मला एकदम आठवले व मी ते म्हणू लागलो.

मिरजेस आमचे बक्षीस-समारंभ काही सरकारी सुपारी बागेत व पुढे काही टाऊन हॉलात झाले समारंभ बहुधा हल्लीचे यजमान बाळासाहेब यांच्या हस्ते होत. तेहि त्या वेळी अंगाने अगदी किरकोळ व अल्पवयी होते. त्यांच्या हातून बक्षिसे मिळत तेव्हा ते संस्थानचे यजमान ही भावना मनात न येतां, पागोटे घालून बसलेल्या एका लहान मुलाकडून टोपी घातलेल्या लहान मुलाना बक्षिसे दिली जातात हीच भावना येई; व बक्षिसे घेतल्यावर त्याना नमस्कार करा म्हणून सांगत ते मनाला कसेसेच वाटे.

आम्ही मराठी शाळेत असतांनाच हल्लीचा टाऊन हॉल बांधण्यास सुरुवात झाली. त्याच्या मागील आवारात अजबखाना केला होता त्यांत अनेक प्रकारची हरणे, वानरे, पक्षी वगैरे आणून ठेविले होते. ते जाऊन पाहणे हा कित्येक दिवसपर्यंत माझा नित्याचा व्यवसाय झाला होता. टाऊन हॉलच्या बागेत फुले हवी तितकी. ती तोडून नेण्याची परवानगी मला मिळाली होती. कारण स्वतः वडीलच फौजदार होते. महिनाभर फुलांचा पुडा घरीं पूजेला नेऊन मी वडिलांकडून चार

आणे मिळविले, व त्या पैशांतून रंगी-बेरंगी टांकाचे हात व कागद अशी, जन्मांतील स्वकष्टार्जित पैशाने स्वतःच्या मालकीची पहिली खरेदी केली !

या फौजदार कचेरीत एक दगडी म्हसोबा होता. त्यावरून तिला म्हसोबाची चौकी म्हणत तेथं ठेवलेली हत्यारे वगैरे पाहून मिरजेच्या लष्करी सामर्थ्याची जी कल्पना तेव्हा मनांत येई तिचे आता हसू येत वडील फौजदार असल्यामुळे घरी लहानपणापासून घोडा व शिपाई हे असत परंतु तेव्हा घोड्यावर बसण्याचे वय नसल्यामुळे घोड्याचे वैभव फारसे उपयोगाला आले नाही वडिलांकरितां सरकार-वाड्यात मेजवानीच्या पक्तीला जाण्याचे मात्र प्रसंग येत प्रत्येक मोठ्या सरकारी नोकराने या भोजनसमारंभाना स्वतः तरी यावे किंवा प्रतिनिधि पाठवावा असा शिरस्ता होता त्याप्रमाणे वडील परगावी गेले म्हणजे मला मेजवानीस जावे लागे. पण या मानाचा लवकरच वीट आला कारण पुष्कळ वेळा असे झाले की, मंडळीना सोवळे होऊन पाटावर बसण्यास कारभाऱ्यानी सांगावे, आणि आम्ही पाटावर बसल्यावरहि यजमान झोपी गेलेले त्यांना उठविण्याची सोय नाही ! कोणी उठवू गेल्यास तोडात मारीत ! अशा कारणानी अवजड पीतांबर नेसून भुकेल्या पोटाने हात आखडून तीन तीन तास बसावे लागे येऊन जाऊन या ‘राजयोगा’चा फायदा खरा इतकाच होई की, वडिलाच्या कचेरीत गेलो म्हणजे येतांना एखाद्या कारकुनाने लेखणी उत्तम तासून द्यावी; किंवा एखादा रंगीबेरंगी ‘ मारबल पेपर ’ वहीला घालण्याकरिता मिळावा ! याहिपेक्षा अधिक महत्वाचा फायदा म्हणजे म्हसोबाच्या चौकीपुढे अलाव्याच्या समारभात किंवा उरूसांत सोंगे आली म्हणजे पाहावयाला बसावयाची पुढची जागा फौजदारांचा मुलगा म्हणून मिळे. तसेच नाटक पहावयास जाण्यासहि केव्हा केव्हां सत्तेने सापडे.

मिरजेस बारा इमामचा दर्गा व मिरासाहेबाचा दर्गा यांत पिरांच्या भेटी परत भेटी होत. ते समारंभ मात्र फार पहाण्यासारखे असत; व तेथेहि केव्हां बाकावर प्रमुख जागी किंवा शिपायाच्या खाद्यावर बसूनहि गंमत पहावयास मिळे या समारभांत तेव्हां सर्वांत कौतुक उत्पन्न करणारी गोष्ट म्हणजे सांगलीकर तात्यासाहेब यांची स्वारी भेटी पाहण्यास येई व जाई ती. मोठे दोन-चार हत्ती, मागून कांही घोडे, त्यामागून खाशा स्त्रियांची वाहने, अशा समारंभाने तात्यासाहेब पटवर्धन सांगलीहून निघून अगदी भेटीच्या वेळी गर्दीत येऊन दाखल व्हावयाचे व येतां जातां चंद्रज्योति लावावयाचे !

मिरजेस नाटके होत ती हरबाण्णाचा वाडा म्हणून एक चौसोपी जुना पटवर्धनी वाडा आहे त्यांत होत या वाड्यांतील चौक फार तर ४० फूट लांब व ४० फूट रुंद असेल. तेवढ्यात खुर्च्या बाके माडून शिवाय रगभूमीहि थाटण्यांत येई! एका सोप्यांत पडदा लावून ग्रीनरूम बनवीत व बाकीच्या सोप्यातून पीट-च्या दराचे प्रेक्षक बसत. सर्व समाज फार तर शेदीडशे लोकांचा असे. एका सरक पडद्यावर सर्व नाटक होई. आणि स्थलसकोचामुळे पात्रे व प्रेक्षक एक-मेकांत इतके मिसळून जात की, जेव्हा मोरावरील सरस्वती दोन्ही हातांत रुमाल फेकीत चौफेर नाचे तेव्हां मोराला लांब नखे नसून मनुष्याचे पाय आहेत असे लाथा खाणाऱ्या प्रेक्षकाला कळून येई! पण देवी सरस्वतीपुढे जरूर ती अदबी न दाखविणारे प्रेक्षक राक्षसांचा प्रवेश व्हावयाचा असतां आपोआप गर्दी हटवून मागे सरत. कारण कित्येक वेळा खरोखरीच्या तलवारी फिरविल्या जात! चौकात येण्याला जोत्यांतून मुख्य दरवाजापुढे सुमारे चार फूट रुंदीचा रस्ता होता. त्यातूनच प्रेक्षक येत व त्यातूनच ग्रीनरूमधील पात्रेहि रगून बाहेर येत. यामुळे कित्येक वेळां त्या चिंचोळ्या जागेत स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिन्ही लोकचे रहिवाशी यांची गल्लत होई! राक्षसाचा प्रवेश होण्याचे वेळी मात्र प्रेक्षकांचा राबता त्या वाटेत बद करीत. कारण राक्षसाचा प्रवेश म्हणजे ती पहिलटकरीण सिंहिणी-ची प्रसूति! राक्षस-प्रवेशाच्या वेळी सरक पडदा बाजूला सारून दोहो अंगास पेटले-ल्या काकड्यावर राळ उडवीत. त्या आगीच्या लोळांत राक्षस चार वेळ मागे जाऊन चार वेळ पुढे येई. आणि पिजऱ्यातील वाघ-सिहाप्रमाणे ओरडत ओरडत व तलवार चमकवीत चमकवीत एकदाचा मोठ्या कष्टाने बाहेर पडे. कित्येक वेळा राक्षसाचा ताफा यावयाचा असे. तेव्हां त्यांच्या नुसत्या प्रवेशाला म्हणजे या बोळकडीतून बाहेर पडण्यालाच पधरा पधरा मिनिटे लागत! देव बिचारे गरीब. ते आपल्याच हाताने सरकपडदा सरकावून बाहेर येत व खुर्ची देण्याला विदूषक जवळ नसल्यास आपल्याच हाताने ती घेऊन बसत! तेव्हांच्याहि नाटकांत पदे असत. पण ती म्हणण्याचा मक्ता एकट्या सूत्रधाराकडे असे. सगीत नाटकाच्या पुस्तकांत ज्याप्रमाणे बारीक टाइपाने छापलेल्या भाषणांत मध्येच एकदम बटबटीत टाईपाचे पद येते, तसेच या नाटकांतून मजुळआवाजाचे स्त्रीपात्र बोलत असतां, विशेषतः बारीक करुणालाप काढीत असता, पदाची वेळ झाली म्हणजे मध्येच त्याने "सांगते ऐका" किवा "ऐका" असे म्हणून विराम पावावे, व सूत्र-

धाराने आपल्या भसाड्या आवाजाने झांज वाजवीत पद म्हणावे व फिरून पात्रांनी बोलण्यास सुरुवात करावी !

विदूषक हा हल्लीच्या सर्कशीतील विदूषकासारखा वेड्यावाकड्या चिंध्यांचा पोषाक करी, व प्रथम प्रवेश करितांना प्राय: तोंड झाकण्याइतका दाट व मोठा लिंबाच्या डहाळ्यांचा भारा डोक्यावर घेऊन येई. ही भाऱ्याची कल्पना " अरण्य पंडित " या कोटीवरून प्रथम सुचली असावी ! कारण सूत्रधार व विदूषक यांचे नमस्कार चमत्कार होऊन ओळख पटण्याचे प्रश्न निघतांच " तुम्ही कोण " तर " आम्ही पंडित "; " कसले पंडित " तर " अरण्य पंडित "; असे ठराविक उत्तर विदूषक देई; व मग डोक्यावरील भारा उतरून रंगाचे पट्टे ओढलेल्या तोंडाने बोलू लागे हास्यविनोद करण्याशिवाय इतर कामेहि विदूषकाकडे असत. उ० प्रवेश केलेल्या पात्राना दर्जाप्रमाणे आसने देणे, अडेल त्याचा चाकर होणे, विचारील त्याला किंवा मध्येच तोंड घालून न विचारणारालाहि सल्ला सांगणे, आणि कथानक जुळविण्यासाठी सूत्रधाराशी संभाषण करून प्रवेशक विष्कंभक वगैरेची उणीव दूर करणे वगैरे. तिन्ही लोकात संचरणाऱ्या नारदापेक्षांहि विदूषकाची ताण वर. कारण देवदानव, यक्षकिन्नर, कोणाचाहि प्रवेश असला तरी त्या लोकांतील रहिवासी म्हणून विदूषक हा हजर असावयाचाच व उणेपुरे सर्व त्याने पाहून घ्यावयाचे असा संकेतच.

अशा प्रकारची ही नाटके रात्री अकराच्या सुमारास सुरू होत व अगदी पहाटपर्यंत चालत. कित्येकदा बाहेर फटफटीत उजाडून लोकांची येरझार रस्त्यांतून चालू झाल्यावर आम्ही नाटक पाहून बाहेर पडलेलो आहो. नाटकांतील भाषणाच्या नकलाचा भरणा मात्र भरपूर असे. त्यांतील पुष्कळशी भाषणे कायम ठशांनी छापल्यासारखी असावयाची; व त्या जातीच्या पात्रांचा प्रवेश असला की, त्या जातीची संभाषणे हटकून व्हावयाची. नेहमी नाटके पाहणाऱ्या प्रेक्षकांना त्यांतील बरीचशी पाठहि असत. पण रंगलेल्या पात्रांच्या तोंडून ती ऐकावयाची इतकाच आंबट शोक ! भूलोकचा नरेन्द्र, किंवा स्वर्गातील देवेन्द्र, किंवा पाताळांतील राक्षसेन्द्र यांचा प्रवेश असला की, त्या त्या राज्यांतील कारभाराच्या सर्व गोष्टींचा ठराविक पाढा वाचला जावयाचा ! आणि जुना धंदेवाईक 'स्टोरी टेलर' ठराविक वर्णने करी तसेच तिन्ही लोकांतील प्रजाजनांचें सुखदुःख ठराविक पद्धतीचे ऐकू येई. पोषाखांत दोन प्रकार. कोणा श्रीमंताची मेहेरनजर झाली तर खरे

शालू, पैठण्या, दुपेटे, सोन्यामोत्याचे दागिने, व खऱ्या ढाली तरवारी रंगभूमीवर प्रकट होऊन वैभवाने डोळे दिपवीत. आणि तसे नसेल तर नुसता ध्रुवट मांजरपाट, आलवाण व मुती लुगडी यावर प्रेक्षकांनी व पात्रांनीहि रंगलीलेची सर्व हौस भागवून घ्यावी असे घडे.

मी लहानपणी पाहिलेल्या नाटकांत धोंडोपंत सांगलीकर व इचलकरंजीकर यांची नाटके फार चांगली होती. हल्ली सीन-सिनरी, पोषाख, गाणे वगैरे गोष्टीत पाऊल पुष्कळच पुढे पडले आहे. पण नुसत्या अभिनयाच्या बाबतीत जुने नाटक नव्या नटांना हार गेले नसते. सांगलीकरांचे 'मृच्छकटिक' व इचलकरंजीकरांचा 'भ्रांतिकृत चमत्कार' ही फारच चांगली होत. तथापि नाटक ही कधी तरी लोकांना पहावयास मिळणारी चीज. तमाशाचे प्रस्थ तेव्हा फार होते, व नाटक आणि तमाशा यांच्यामध्ये चुरस लागल्यास प्रेक्षकसमुदाय आपल्या उदार आश्रयाने तमाशाच्या तर्फेच निकाल देई. दुसरेहि एक कारण असे की, तमाशांना तिकिट नसे. तो उघड्यावर होई, व कोणी धनिक आश्रयदाता तमासगिरांचा खर्च पत्करून गावच्या लोकांच्या करमणुकीचे मुक्तद्वार भोजन घाली. हसूरचा तमाशा म्हणून त्या वेळी प्रसिद्ध होता; व तोहि त्यांतील नकलापेक्षा पहाडी ठेकेदार गाण्यासबधाने. उघड्या जागेत पहाडी आवाजाने एकसारखे तीन-चार तास गाणे ही गळ्याची परीक्षा हल्लीचा कोणीहि नट देऊ शकणार नाही !

कोकणांत आजोळापासून दोन कोसावर कासारडे येथे एक इनामदार आहेत. त्यांनी कोकणातली एक नाटक मंडळी बोलावली होती. त्यांतील दोनतीन नट आमचा मामा विष्णुपंत याच्या ओळखीचे होते. त्यांनी मामाला नाटक पाहण्याला बोलाविले व तो मला बरोबर घेऊन गेला. सध्याकाळी वाटेने जातांना 'जोळ्या' म्हणजे 'सोललेल्या ताग-काड्याची लांब जुडगी' पेटवून त्याचा मशालीसारखा उपयोग करून चालत होतो. आमच्या बरोबर चालणाऱ्या नटांतील एकजण विदूषकाचे काम करणारा होता, व दुसरा राक्षसपार्टी होता. वाट चालतांना ते आपापल्या नकलांची थोडथोडी उजळणी करीत होते. ते त्यांचे बोलणे तेव्हां मला काहीच कळेना. पुढे कासारड्यास गेल्यावर नाटक सुरू झाले. तेव्हा ते बोलणे विदूषक व राक्षस यांच्या तोंडून पूर्वी ऐकलेले ऐकूं येऊं लागले. तेव्हां मग नाटकाची नक्कल पाठ करावयाची असते ही गोष्ट मला कळली ! तोपर्यंत माझी समजूत

अशी होती की, नाटकांतील पात्रांना सर्व बोलणे ऐत्यावेळी सुचते व ती सुचेल तशी बोलतात ! कोकणी अंगणाच्या मांडवात हे नाटक झाले. तेथे पडदे कनाती तरी कोठून येणार ? मंडपाच्या एका टोकाला आगटी पेटली होती. तेथे नाटकांतले काम झाले म्हणजे देव राक्षस विदूषक सगळे प्रेक्षकांदेखत शेकावयास जाऊन बसत. आणि आपली पाळी आली की, फिरून त्याच्यादेखत परत येऊन प्रयोगात सामील होऊन आपापली कामे करीत ते पाहून माझ्या तर मनाचा तेव्हा विरसच झाला. प्रयोग पहाण्याची माझी निम्मी गोडी गेली ! मला वाटे हे मंडपापलीकडे जाऊन दिसेनासे होऊन मग परत येऊन प्रगट का होत नाहीत ?

मी दुसऱ्या खेपेस आजोळी गेलो तेव्हा आधीच जाणता पण खेळण्याच्या स्थितीत असल्यामुळे सर्व दिवसभर हिंडण्या-फिरण्याची चैन चाले. सकाळी 'वेसवार' घातलेला तूपभात खाऊन राईत गेलो म्हणजे काजू आंबे पाडून खावे, वानराच्या मागे लागावे, ही नित्य करमणूक मधल्या वेळी परसात वाग्याच्या झाडाना पाणी पाटाने लावावे किंवा शिंपावे. केव्हा केव्हा आजोबा स्वतः हाताने नांगर कुळव हाकीत तेव्हां त्याजवर जाऊन बसावे. स्वच्छ सारवलेल्या व वर मंडपाची छाया असलेल्या अंगणाचे व विहिरीवरील रहाटगाडग्याच्या गाण्याचें प्रेम, तेव्हा जे मला प्रथम अनुभवाला आले ते अद्यापि कायम आहे विहीर इतकी उथळ होती की, मनुष्य त्यात पडले तरी बुडण्याची भीति नाही. पाणी इतके स्वच्छ की, तळचा खडा न खडा मोजून घ्यावा. या बाजूच्या कोकणात नारळी पोफळीची झाडे फारच थोडी होती तरी पण केळीची झाडेबिडे बरीच होती. अंगणापलीकडे भातेण।गवताच्या गंज्या रचलेल्या असावयाच्या. त्यावर वाटेल तितके चढले पडले तरी गवत रेशमासारखे मऊ म्हणून भीति वाटावयाची नाही. या गंजीवर चढून बसून तिसरें रॉयल रीडर हातांत घेऊन वाचलेल्या गोष्टी मला अजून आठवतात. The Sailor and the Monkey ही एक गोष्ट त्यातलीच.

सर्कशीचा जन्म तेव्हा नुकताच झाला होता. मी पहिली सर्कस पाहिली ती प्रो. विष्णुपत छत्रे यांची. पण ती सर्कस म्हणण्यापेक्षा चार-दोन घोड्यांची कवाईत इतकाच तो खेळ होता. छत्रे हे स्वतः ग्वालेरीस गायनाबरोबर अश्वविद्या शिकले. पुढे कुरुंदवाडास येऊन त्यांनी कांही घोडी दरबारांतून मिळविली व त्याना शिकवून तयार केले. त्यांचे खेळ प्रथम बिन तिकिटाने मिरजेस सरकार-

वाड्यापुढील पटांगणांत झाले. त्यांत फेर धरणे, उड्या मारणे, तक्क्यावर समोरा-समोर येऊन तोलून धरणे, व मेल्यासारखे निपचित पडणे, एवढेच खेळ होत. इतर जनावरे किंवा कसरती लोक किंवा विदूषक ही कांही भानगड नव्हती. खेळ अर्ध्या-पाऊण तासात संपावयाचा. घोड्याच्या पाठीवर जीन व डोक्यावर झोक-दार रंगित तुरे इतकाच सरजाम. पण कुर्रेबाज पावले टाकणे, नाचणे, वगैरे कामे घोडे फार चागली करीत. घोड्याच्या बुद्धिमत्तेपेक्षा त्याच्या नखरेबाजपणाचा तो खेळ अधिक होता असे म्हणतां येईल.

मिरजेस आम्ही "आजीबाई पटवर्धन' याच्या वाड्यांत राहत होतो. म्हातारी पिकले पान झालेली होती. ती बहुधा बसलेली असून तोडाने सर्व कारभार करी. पण तिचा दरारा सर्वांना असे त्या बाई मजकडून रोज रात्री अर्धा एक तास पोथी वाचून घेत; व पोथी ऐकण्याला वाड्यातील ठराविक श्रोतृगण बसत असत. मी स्वच्छ व घडघड वाची, यामुळे मजवर त्याची भक्ति असे. वाड्यातच, पुढे माझे श्वशुर झालेले, मोरोपत पेडसे राहत. ते मोठे हौशी खर्चिक व खिलाडू असल्याने, त्याच्या घरी अनेक प्रकारच्या लोकाचा अड्डा पडे. आमचे वडील मात्र कधी काहीहि खेळताना मी पाहिले नाहीत. त्याना पोथी-पुस्तकाचा नाद प्रथमपासून असे. सुट्टीचाच दिवस असल्यास क्वचित् ते मडळीत बसत. बुद्धिबळे व फांसे याचे डाव चालावयाचे. आदितवार म्हटला की, सर्व दिवसभर धुडगूस. तसाच रात्रीसुद्धा. खेळणार मडळीत रामभाऊ चादोरकर, वासुदेवशास्त्री खरे, स्वतः मोरोपंत पेडसे व गोपाळराव सहस्रबुद्धे हे प्रमुख असत जोड सुटी आली असतां खेळण्याचा अड्डा दोन दोन दिवस सारखा पडे आम्ही सर्व मुले पाहून पाहूनच बुद्धिबळे खेळावयास शिकलो होतो. एका चद्रग्रहण प्रसगी दोन प्रहरी जेऊन मंडळी खेळावयास बसली ती सर्व रात्रभर जागून दुसरे दिवशी १२ वाजता घरोघर स्नानास गेली. तेव्हां विड्याचा प्रसार नव्हता. चिलीम ओढीत व किलचाखाली वीतवीतभर दाट धुराचा थर बसलेला असे. खरेशास्त्री यांच्या कोट्या व मोरोपंत पेडसे याच्या तोडच्या मोरोपती आर्या या दगलीत मधून मधून ऐकावयास सांपडत त्यांचे अजून स्मरण येते.

मराठी पांचव्या इयत्तेत असतां शिक्षक कविता म्हणून घेत होते. वृक्षा-न्योक्तीचा श्लोक मोरू आपटे नांवाचा विद्यार्थी म्हणत होता. त्याचा शेवटचा

चरण असा आहे " कांटे झाडे अम्हां ही अडवुनि धरिती कां तरी वार याते. " ही ओळ म्हणतांना 'अडवुनि धरिती' येथे तुकडा पडावयास हवा. पण 'अडवुनि धरिती कां' येथे प्रश्न पुरा होतो म्हणून तेथे तुकडा पाडावा अशी मोरूची समजूत होती शिक्षकांनी तसे नव्हे असे मोरूला एकदा-दोनदां-तीनदां समजून सांगून नीट म्हणवून घेण्याचा प्रयत्न करून पाहिले. परंतु मोरू पुन्हा म्हणतांना 'अडवुनि धरिती का' असे म्हणू लागला. तेव्हा शिक्षक रागावून म्हणाले, 'का काय ? थांब, का ते सांगतो' असे म्हणून त्यांनी दोन छड्या ओढल्या. पण त्यानेहि मोरूची खात्री पटेना. तेव्हांपासून आम्ही त्याला पाहून 'अडवुनि धरिती का ?' असे म्हणून थट्टा करू लागलो. मोरू पुढे एका संगीत नाटक मंडळीचा मॅनेजर झाला, आणि तो तालांत पक्का आहे असे सांगत !

मी इंग्रजी पहिली इयत्ता घरी शिकून एकदमच दुसरीत बसलो. चौथ्या इयत्तेपासून मला पहिला दुसरा नंबर मिळू लागला, तो सातव्या इयत्तेच्या टर्मिनलपर्यंत. गणित भूमिति व इंग्रजी व्याकरण या गोष्टींची मी नेहमी हेळसांड केली; व अंकगणित तर मला मुळीच येत नसे. बीज गणितांतच जरूरीचे ते माझे सर्व मार्क भरून निघत. पण भाषाविषय इतिहास संस्कृत इंग्रजी व मराठी या चार विषयांत अधिक मार्क मिळून जात यामुळे नंबर वर टिके. जावडेकर व श्रीखंडे मास्तर हे आम्हाला खाजगी रीतीने संस्कृत शिकवीत. खरेशास्त्री यांचा तास मुलांना फार प्रिय असे. ते रागावले म्हणजे मुलांना सडकून मारीत; पण कांही तरी चांगली कोटी, नवी माहिती, सरस कविता किंवा सुरस गोष्ट यांचा लाभ झाल्याशिवाय तास जात नसे. ते मुलांना घरी बोलावून श्लोकांच्या भड्या लावीत. मी इंग्रजी पांचव्या इयत्तेत असतां खरे यांनी 'गुणोत्कर्ष' नाटक लिहिले आणि मजवर त्यांची भक्ति म्हणून नाटकास लावलेल्या बक्षीसाच्या शर्तीप्रमाणे ते नेमक्या वेळेत वाचून होते किंवा नाहीं हे पाहण्याचा मान त्यांनीं मला दिला होता ! पण पुढे पंचवीस वर्षांनी त्यांचे 'तारामंडळ' नाटक बसण्यापूर्वी पुण्यास त्यांनी ते मला माझ्याघरी वाचून दाखविले. तेव्हां या जुन्या गोष्टीची त्यांना मी आठवण दिली त्याचा त्यांना फार आनंद झाला. इंग्रजी सातव्या इयत्तेत त्यांनी एकदां मुलांकडून संस्कृत श्लोक करवून घेतले. त्यांत पहिला नंबर त्यांनी मला दिला व " सामान्य ( अर्थात् सर्व-साधारण प्रतीचा ) बी.ए. मनुष्य असे श्लोक करू शकणार नाही" असे त्यांनीं

वर्गात बोलून दाखविलें. पण व्याकरणाच्या बाबतीत मजविषयी ते निराश होत. कारण घोकावयाचें नाहीं हा जवळ जवळ माझा नियम होऊन बसला होता. तो मला इंग्रजीतहि बाधला. मॅट्रिकच्या प्रिलिमिनरीत इंग्रजी व्याकरणाच्या पेपरवर शून्य मार्क पाहूनहि निबंधाच्या व भाषांतराच्या जोरावर मला परीक्षेस पाठविण्यांत आलें. व्याकरण व गणित याजवरील बहिष्कार मी अद्यापि इमानानें पाळला आहे !

आमच्या मास्तर वर्गापैकी पानमरे हे थट्टेबाज, फणसळकर हे ऐटबाज, शास्त्रीबोवा हे रसिक, गोगटे हे ताठर, कानिटकर हे कुचक्या स्वभावाचे, जावडेकर हे तिडतिडे, आणि अत्रे हे रुबाबदार असत. शाळेत लॉन टेनिस क्लब सुरू केला. त्यात कांहीं मास्तर लोकांबरोबर आम्हा वरच्या कांहीं विद्यार्थ्यांनाहि घेतलें होते; व मास्तर लोक आमच्याशीं खेळीमेळीनें वागत. शाळाखात्याचा इन्स्पेक्टर रसेलसाहेब म्हणून असे. पण बिचाऱ्यानें कोणाच्याहि वर्गांत येऊन प्रत्यक्ष तपासणी केली नाहीं. तो बाहेरच कंपाउंडच्या फाटकाशीं सारवट ( मेणे ) गाडींत बसलेला असा राहून शाळा तपासल्याचा शेरा लिहीं ! पुढें काणे या नावाचे इन्स्पेक्टर आले. ते मात्र वर्गावर येऊन खरी परीक्षा घेत. इंग्रजी पांचव्या इयत्तेच्या परीक्षेत ( सन १८८६ ) काणे तपासणीस आले असतां एका वाक्याचा अर्थ मी सांगितला. तो त्यांनी चूक म्हटला. तेव्हां मी लगेच म्हणालों कीं, "मास्तरांनी शाळेत सांगितला तसाच मी बरोबर सांगितला आहे." तें ऐकून मास्तर कावरे बावरे झाले ! पण काणे हे सुज्ञ होते. ते मला हळूच म्हणाले, "अरे बाळ, मास्तरांनी सांगितलें असें म्हणू नये. आपण चुकलों म्हणावें; व मास्तराची अब्रू राखावी." आणि मागाहून मास्तरांजवळ म्हणाले, "हा मुलगा धीट दिसतो. हा कोणाचा ?" पुढे १९०१ साली याच काण्याच्या मृत्युपत्रानें चाललेल्या इस्टेटीचा तंटा तोडण्याचें काम पंच म्हणून मजकडे आलें !

इकडील पुण्याच्या मुलांच्या मानानें आम्ही मिरजेची मुलें सर्व प्रकारें मागासलेली होतों. सर्वसाधारण जगाचें ज्ञान हें आह्माला थोडेंच असे. वर्तमानपत्रें वाचण्याचा नाद मुलांना नव्हता व वर्तमानपत्रेंहि तेव्हां फारशीं नव्हतीं. गांवच्या मुख्य लायब्ररींत बुकांचीं फक्त पांच-चार कपाटें होतीं. त्यांत बरींचशी पुस्तकें पूर्वीचे यजमान कै. तात्यासाहेब पटवर्धन याच्या लायब्ररींतील होतीं. त्यांत अरेबियन नाइटस्चे पांचपांचशें पानांचे तीन व्हॉल्यूम्स् उत्कृष्ट मोरोक्को बाइंडिंग केलेले व

सोनेरी छापाचे होते. मोरोपत पेडसे हचे लायब्ररियन असल्यामुळे मला हे व्हॉल्यूम्स् घरी वाचावयास मिळत; व पुस्तकातील उत्कृष्ट चित्रे आणि मनोरजक गोष्टी ही हातात पडली असतां त्या वयात चित्त तल्लीन किती होऊन जात असेल याची कल्पना कोणासहि होईल.

जुन्या पद्धतीचे स्टोरी टेलर एक दोनदां शाळेत आले व त्यांच्या गोष्टीचा समारभ झाला. पण त्यांच्या गोष्टीच्या असबद्धतेचे मला त्या वयातहि हंसू येई. नाटकी नकलांप्रमाणे त्यांची वर्णनें ठराविक पाठ केलेली असत. दागिन्यांचे नांव निघाले म्हणजे नायिकेच्या अगावर इतके दागिने पडावयाचे की, त्याच्या भाराने ती मेली कशी नाही याचेच आश्चर्य वाटे, मग तिला शोभा येण्याचे बाजूसच राहिले. पक्वान्नांचे नाव निघाले म्हणजे एका जेवणांत इतकी पक्वान्ने येत की, ऐकूनच अजीर्ण होई. आणि बागेच्या वर्णनाचा प्रसग आला की, हिमालयापासून कन्याकुमारी-पर्यंत सर्व जातीची झाडे एकाच जागी एकाच ऋतूत गर्दी करीत. हे स्टोरी टेलर आतां मुळीच पहावयास सापडत नाहीत. गोष्टी सागणारा मराठी, पण हल्ली ग्रामो-फोनच्या तबकडीच्या शेवटी 'माय नेम इज गोहर' हे जसे ऐकू येते तसे हा जुना स्टोरी टेलर 'माय नेम इज अमुक स्टोरी टेलर' असे म्हणून सुरवात करी.

आमच्या हायस्कूलच्या सहा वर्षांत फक्त दोघेच व्याख्याते बाहेरून मिरजेस आलेले स्मरतात. एक सार्वजनिक सभेचे प्रचारक रा. खरे व दुसरे गोपाळ नरसिह देशपांडे इदापूरकर. खरे यांचे व्याख्यान कृष्णेश्वराच्या देवळात झाले. तेव्हा फार गर्दी झाली म्हणजे सुमारे २० माणसे हजर होती ! स्वदेशी हा त्यांचा विषय होता. त्याचे बोलणे कोकणी पद्धतीचे व युक्तिवादात्मक असे. गोपाळराव देशपांडे यांचे वक्तृत्व जोरदार, मात्र सारासार विचार अगदी कमी. विजापूर वेशीच्या धर्मशाळेत त्यांचे व्याख्यान झाले. त्यांत त्यांनी जुन्या काळांतील आपल्या लोकांच्या पराक्रमाचे वर्णन केले. त्यांत एक गोष्ट अशी सांगितली की, " एक मराठा घोडेस्वार रानां-तून जात असतां शत्रूकडील स्वार त्याच्यामागे लागले, तेव्हा सुटका नाही असे पाहून जवळच मोठा वडाचा वृक्ष होता त्याची लोबती पारंबी दोन्ही हातांत धरून मांड्यांत घोडा दाबून त्यासकट स्वार सरसर वर चढला !" हे वर्णन ऐकून माझ्या मनावर मराठ्यांच्या पराक्रमाचे ज्ञान न ठसतां, तितक्या लहानपणीहि, व्याख्या-त्याची असंबद्धता पाहून खरोखर हसू आले, असे मला पक्के स्मरते. श्रद्धाळूपणा नसल्याचा दोष माझा तेव्हांपासूनचाच आहे.

या वेळी मिरजेस तालमीचा प्रघात थोडाबहुत असे. आमच्या आळीतील तालमीचे वस्ताद विठ्ठलराव भानू हे पहिलवान व स्वदेशीचे पुरस्कर्ते होते. पुण्यांतील सार्वजनिक काकांच्या चळवळीची लहानशी लाट मिरजेपर्यंत पोहोचली होती. याहून पुणे-मुबईस काय चालते याची ऐकून माहिती किंवा कल्पनाहि आम्हास नसे. फक्त चिपळूणकर, कुंटे व रानडे ही तीन नावे कानी येत. शास्त्रीबोवांच्या मृत्यूसबधाने 'शिष्यजनविलाप' नांवाचे काव्य मात्र विद्यार्थ्यांच्या वाचण्यांत येत असे. मुबईच्या विविधज्ञानविस्ताराचा अंक लायब्ररीत येई. त्यांतील 'ठगाची जबानी' व 'हिम्मतबहादूर' नाटक यानी चित्त इतके रमून जाई की, शाळेतून घरी परत येतांना रोज लायब्ररीत जाऊन पुढचा अंक केव्हा येणार याची आम्ही चौकशी करीत असू. 'हिम्मतबहादूर' ( हॅम्लेट ) नाटकांतील भुताचा प्रवेश वाचून खरोखरीच आमच्या मनाचा थरकांप झाला

आणखी एक आठवण गमतीची आहे शाळेत न जाण्याच्या वयांत, मोडलिंब्यास असतां, मी केव्हां केव्हा ओढ्यावर जाऊन उगीचच बसत असे. वाहत्या पाण्याचा मला फार आनद वाटतो. कोठेहि वाहते पाणी आढळले की, त्याकांठी बसून आंत पाय सोडणे, चुळा भरून टाकणे, मला आवडते मोडलिंब्यास मी खिशांत चार आवळे घेऊन ओढ्यावर जावयाचा आणि ते चावून पाणी तोंडांत घेऊन चुळा टाकीत बसावयाचा. कारण आवळा खाऊन पाणी तोंडांत घातले तर ते फार गोड लागते. घराहून ओढ्यावर जाताना वाटेत शाळेजवळ तटबंदीतील वेशीचा जुना दरवाजा आहे तो ओलांडावा लागतो. दोनतीनदां लागोपाठ असे घडले की, मी आवळे घेऊन ओढ्यावर जायला यावे तो, उन्हाची वेळ म्हणून, जवळपासचा एक गलेलठ्ठ उंच शिंगाचा दाढीवाला बोकड वेशीत येऊन झोप घेत पडावयाचा. पहिले दोन दिवस त्याला भिऊन मी परत गेलो. तिसरें दिवशीं पहावे तो तोच प्रकार. माझी ओढ्यावर जाण्याची निराशा होऊन मला रडूं आले. मी मनांत म्हणालो 'देवा या बोकडाला येथून कां घालवून देत नाहींस!' आणि मौजेचा प्रकार असा की, लगेच तो बोकड आपोआप उठून अंग झाडून बाहेर निघून गेला. मी ध्रुवप्रल्हादांचा अवतार ठरलो ! ही आठवण इतक्याचकरितां सांगतो कीं, माझ्या जन्मांत अगदी प्रथम देवाच्या नांवाचा स्पष्ट उच्चार या वेळीं झाला असें स्मरतें. माझी प्रार्थना ऐकून देवानें बोकडाला उठवून लावले यांत तेव्हां मला विशेष चमत्कार वाटला नाही. कारण लहान मुलांची प्रार्थना मान्य करणें हें

मला देवाचे एक मामुली कामच आहे असे वाटे. यामुळे मला देवाविषयी कृतज्ञता तेव्हां वाटली नाही. उलट ती गोष्ट काकतालीय न्यायाने घडली असे मला आज वाटतेहि म्हणून कृतज्ञताबुद्धि वाटत नाही. माझ्याजागी श्रद्धावंत पांगारकर असते तर त्यानी प्रार्थनेचा विजय म्हणून हा अनुभव आत्मचरित्रांत दिला असता.

मी मराठी शाळेत असतां माझ्याहून वयाने थोर असणाऱ्या इंग्रजी शाळेतील कांही मुलानी एक खाजगी नाट्यसमाज काढला होता. त्यांनी 'वेणीसंहार' नाटक बसविले होते. त्या मडळीतील भीमाचा पार्ट करणारे रामभाऊ लागू म्हणून होते. ते आज वृद्ध पण हयात आहेत. बाकीची सर्व मुले कालवश झाली आहेत. या नाटकाचा जाहीर प्रयोग झालेला आठवत नाही पण मी त्याची एक तालीम पहावयास गेल्याचे चागले आठवते ही तालीम गुप्तपणे एका कोंदट जागेत होई. तिला त्यांनी 'टाऊन हॉल' असे नाव दिले होते! मंडळीत तबाकू ओढणारे बरेच असत. पण तेव्हा 'विडी' जन्मास आली नव्हती. या 'टाऊन हॉल'च्या एका खांबावर 'छापी' नेसविलेली चिलीम नेहमी तबाकूने भरून सज्ज असावयाची. आणि मधून मधून ती पेटविली जाई, हातोहात फिरविली जाई. या चिलमीवर त्यानी एक कवनहि केले होते 'टाऊन हॉलच्या तिसऱ्या खांबी चिलिम देव तो उभा। सभोती स्मोकीयाची सभा' असे त्या कवनाचे पालुपद होते जागा आधीच कोंदट आणि तींत चिलमीचा धूर भरला म्हणजे गुदमरून गेल्यासारखे वाटे! नवी विडी ओढण्यापेक्षां जुनी चिलीम ओढणे हा निःसशय पराक्रम ठरतो असे मी म्हणेन. विडीबाज लोक विडी अर्धी ओढून होते न होते तोच ती फेकून देतात. कारण तींत तबाकूहि तितक्याच बेताची असते! उलट चिलमीत अर्धी ओंजळ तरी तबाकू दाबून बसविलेली असावयाची. आणि चिलीम ओढणारे पांच-चारच असले तरी शेवटी ओढणाराच्या तोडांत काळी राख येई-पर्यंत तिचा अत पाहिला जावयाचा. प्रथमच सुरू होणाऱ्या इजिनासारखे चिलमी-वर कांही वेळ सावकाश झुरके मारून झाले, म्हणजे शेवटचा दम पुरा करितांना चिलमीतून वर जाळ काढणार नाही तो कच्चा आणि काढील तो पक्का असे समजले जाई. आजची नवी पिढीहि तबाकू ओढते, पण ती मवाळच!

मी मिरजेस एकदां आमच्या गवई मामाकडे नेहमीसारखा जेवावयास गेलो होतो. (चार-पांच वर्षांचा असेन.) पंक्तीला चार पानें अधिक म्हणून आईच्या

मामीने नेहमीहून थोडे अधिक मोठे तुपाचे भाडे वाढावयास घेतले होते. तिने मला तूप वाढलें तेव्हां मी ' आणखी वाढ', असे म्हणालो आईने रागाने मजकडे पाहून म्हटले, 'असे मागू नये, मामीच्या घरी आज कांही म्हैस व्यायलेली नाही.' मी लगेच उत्तर केले " म्हैस नसेना का व्यायली ? पण तिच्या हातातले तुपाचे भाडे व्यायले आहे की ! " सर्वजण खो खो हसू लागले. तेव्हां मामा म्हणाले, "अरे हा इतक्यातच रूपके करूं लागला की !" मी बोललो ते कांही जाणूनबुजून रूपक करण्याकरितां बोलणे तेव्हा शक्य नव्हते पण आता या आठवणीवरून असे म्हणतो की, भाषा वाढीस लागण्याच्या वेळी ती अशीच रूपकाच्या योगाने वाढते असे मॅक्स मुल्लरने आपल्या भाषाशास्त्रावरील ग्रथांत म्हटले आहे त्याचेच हे एक उदाहरण नव्हे कां ? रानटी लोकाच्या अगी अशीच रूपके करण्याची पात्रता असते असे त्या ग्रथकाराने म्हटलेले आठवते लहान मूल व रानटी मनुष्य एकच.

मी शाळेत असताना मिरजेस दत्ताच्या देवळात पुराण ऐकण्यास अनेक वेळा जात असे. तो भाविक श्रोता म्हणून नव्हे तर इतिहासभक्त म्हणून. या देवळांतील पुराण नेहमी भारत-ग्रथावर चाले. आणि पुराणिकबुवाहि सस्कृत श्लोकांचा अर्थ मनोरजक रीतीने सागणारे असल्याने त्यांचे पुराण ऐकावेसे वाटे. त्या वेळी भारत, भागवत, रामायण याची गद्यात्मक मराठी भाषातरे उपलब्ध नव्हती. मोरोपतांचे आर्याभारत वाचावे तर ते फार कठिण आणि सस्कृत तर मुळांतच कळत नव्हते येऊन-जाऊन पाडव-प्रतापासारख्या पोथ्या वाचावयास मिळावयाच्या. आणि मराठी शाळेत असता आमच्या वाडयाच्या मालकीणबाई, ज्यांना आजी म्हणत, त्यांना मी ती पोथी रोज रात्रीं वाडयांतल्या ठराविक श्रोतृगणापुढे वाचून दाखवीत असेहि. परतु पाडव-प्रतापाने समाधान होत नसे. आणि पुराणिकबोवा भारतांतील वाद सभाषणे इत्यादि मार्मिक रीतीने खुलवून सांगत ते ऐकणे अधिक मनोरजक वाटे. मात्र एकादे वेळी भारतीय युद्धांत पांडव-वीराने किती कोणच्या प्रकारचे बाण मारले आणि उलट कौरववीराने किती कोणच्या प्रकारचे बाण मारले, याचा धडाका त्यांनी सुरू केला म्हणजे कटाळा येई.

भागवतांतील गोष्टी कानावर येण्याची दुसरी एक सोय होती. मिरजेत रामभाऊ चांदोरकर नांवाचे एक कारकून त्या वेळी होते. पुढे ते सिटी मॅजिस्ट्रेट व कारभारीहि झाले.त्यांच्या घरच्या सांप्रदायांत भाद्रपदमासी भारताचा सप्ताह करण्याचे कुलव्रत होते

व त्यांच्या पिढीत ते रामभाऊकडे आले होते. त्यांचे संस्कृत शिक्षण बेताचेच असणार, तथापि रोज एखादा अध्याय वाचल्याशिवाय ते निजत नसत. आणि क्रमाक्रमाने त्यांना अध्यायाचे तात्पर्य सांगतां येऊ लागले होते. त्यांच्या संहिता-पारायणास फार थोडे श्रोते असत. पण दोन प्रहरी ते अर्थ-तात्पर्य सांगत तेव्हा गर्दी असे. मजवर त्यांचा घरच्या मुलासारखा लोभ असल्यामुळे मी त्यांच्या या सप्ताह समारंभात मुलाच्या रीतीने नेहमी वावरत असावयाचा.आणि अशा रीतीने भागवताचे भाषांतर वाचण्यापूर्वी त्यांतील काही काही कथाभाग माझ्या कानावरून जात असे. सप्ताहसमाप्तीला गोपाळ—काला होई तो दिवस तर आम्हा मुलांचा मोठा दंगलीत जाई. कारण शेवटीं फराळ असे हे सांगावयास नकोच. हा वार्षिक कार्यक्रम झाला. पण माझा आठवड्याचा कार्यक्रम म्हटला म्हणजे दत्ताच्या देवळात दर शनिवारी रात्री पालखी निघे तो. तो होत असता गावातील गवई दत्तभक्तांची पदं म्हणत ती ऐकण्याची फार गोडी वाटे. मिरजेच्या ब्राम्हणआळीत हेच देवस्थान मुख्य होते. आणि माझे चुलते दत्तभक्त यामुळे त्यांच्या हौसेखातर मी स्नान-संध्येनंतर गुरुचरित्राचा एखादा अध्याय वाची. चैत्रात रामनवमी आली म्हणजे देवाच्या कमानीवर मखर उभे करावयाचे. त्याला रंगीबेरंगी व सोनेरी कागद आणून चिकटविण्याचे माझे काम चार दिवस चालावयाचे. आणि त्या मखराच्या दोन बाजूला तेलवात घालून ग्लास लावले म्हणजे मी केवढी रोषनाई केली असे वाटे. पण कॉलेजांत प्रवेश झाल्यावर माझे हे सर्व देवदेवतार्चन संपले.

लहानपणी मला खरूज येई. अखेर इलाज म्हणून आईने मला गंधकांतील औषध दिले. हे औषध खमंग आवेल तेलातून गंधक शिजवून देण्याचे होते. औषध देण्याकरिता दिवाळीतील रात्र तिने पसंत केली. कारण या औषधाला अनुपान कोणी असे सांगितले होते की, औषध घेणाराने सर्व रात्र जागरण करावे व सकाळी आंघोळ करून दहिभात खाऊन दिवसभर झोप काढावी. मी औषध घेतले ते फारच खमंग व रुचकर लागले. सर्व रात्रभर सोंगट्या खेळत कसे तरी जागरण पार पाडले व सकाळी दहिभात खाऊन निजलो. जागरणाचा परिणाम किंचित् भ्रमांत झाला. तो असा की, दहा वाजतां उठून अंथरूण गुंडाळून डोक्यावर घेऊन मी झोपेत घरांतून बाहेर पडून रस्त्यावर चालूं लागलो. हे पाहून आईने मला घरांत आणिले व एका अंधाऱ्या खोलींत दडपून निजविले. झोपेंत

चालण्याची कांही लोकांना संवय असते असें म्हणतात. मला तशी सवय नव्हती व नाही. परन्तु त्या चमत्काराचा एकदां अनुभव आला एवढी मात्र गोष्ट खरी.

योगायोगाचे आश्चर्यकारक अनुभव जगांत अनेक वेळी येतात तसा लहानपणी एक आला त्याची मौज सांगतो. आमच्या वडिलाचे एक मामा, उपनांव काळे, हे बरीच वर्षे बनारसेंत राहिले होते मात्र ते इकडे दर दीडदोन वर्षांनी येत. कोकणांत जाताना ते वाटेत मिरजेस येत बनारसच्या रीतीप्रमाणे ते भ्रुकमलाखाली नाकावर लालभडक शेंदराचा टिळा लावीत तो पाहून लहान मुलें भीत पण त्यांचा स्वभाव प्रेमळ असल्यामुळे मुलांनी जवळ यावें याकरिता ते एक युक्ति करीत. काशीतल्या लोकांप्रमाणे यांना भांगेची, घोटा घेण्याची सवय असे. म्हणून मधून मधून ते घोटा गोड व स्वादिष्ट करीत त्यातच भांग थोडी घालीत, आणि तो मुलाना बोलावून प्यावयाला देत हे समोहन त्यांच्या उपयोगी पडे, आणि पाटा पुढे घेऊन ते भांग वाटावयाला बसले म्हणजे मुलें हांक न मारतांहि त्यांच्याभोवती जमत. पण धाक दाखविण्याची वेळ आली आणि भिवया वर चढवून ते जोरानें ओरडले म्हणजे मुलांची दाणादाण होऊन कोणी हू का चू करीत नसे यामुळे ते घरी आले म्हणजे वडील मातोश्री व शेजारी रडव्या मुलाच्या कामी त्यांचा उपयोग बुजगावण्यासारखा करीत. एकदा रात्री नवाचे सुमाराला माझी पाठची बहीण रडू लागली. कांही केल्या थांबेना. काशीचे मामा त्या वेळी कोठून मिळणार? त्यांची त्या वेळी मिरजेस येण्याची वार्ताहि नव्हती तरी त्यांच्या नावाचा उपयोग करिता येण्यासारखा होता. म्हणून आई मला बळेंच म्हणाली, "तात्या, वारणी रडावयाची थांबत नाही. तर काशीच्या मामाना हांक मार पाहूं." तेव्हा मी सोंग आणून मोठ्या आवाजानें हांक मारून म्हणालो, "काशीचे मामा या हो या." आणि खरोखर मौज ही की, माझी हांक ऐकून तेहि ओरडून म्हणाले "आलो रे आलो." मामा घरात येऊन उभे राहतांच सर्व मडळी नुसती आश्चर्यचकितच झाली नाही, तर क्षणभर भ्यालीहि. भुताला हांक मारली म्हणजे भूत नेमके पुढे उभे राहते म्हणतात त्याची आम्हाला आठवण झाली. वारणी रडण्याची थांबली. आणि मामांनीहि मग हळूहळू आपण मिरजेस याच वेळी अकल्पित रीतीनें कसे आलो याची हकीकत समजावून सांगितली. हा विलक्षण योगायोग पाहून सर्व मंडळी कितीतरी वेळ खो खो हंसत होती.

लहानपणी काशीच्या मामांच्या घोट्यांतून उदरांत गेलेली भांग कधी बाधली असे आठवत नाही. पण मोठेपणी मात्र एक गमतीचा अनुभव आला तो असा. १८९३ साली इन्दूरचे द्रविड वकील व मी मुंबईस एल्‌एल् बी चा अभ्यास करीत होतो. मी गांवात क्लबात राही. ते एल्फिन्स्टन कॉलेजच्या वसतिगृहात राहत एक दिवस तिसरे प्रहरी मी त्याजकडे गेलो तेव्हां द्रविडांची स्वारी घोटा बनवीत होती त्याना त्याची नेहमी संवय असे घोटा बनल्यावर तो घेण्याचा आग्रह ते मला करू लागले आणि " तो मुळीच चढणार नाही इतका हलका केला आहे तरी घ्या " असे त्यानी म्हटल्यावरून मी तो पेलाभर घेतला. सध्याकाळी ठरीव व्याख्यान ऐकून लॉ टर्मची हजेरी भरण्यास एल्फिन्स्टन कॉलेजात गेलो यापूर्वीच भागेचा अमल झाला होता. आणि प्रोफेसर येण्यापूर्वी स्नेही-मडळीबरोबर गप्पा मारीत व्हराड्यात बोलत उभा होतो, तेव्हां मी गैरलागू विचक असे बोलू लागलो. जिभेवर ताबा राहीना तेव्हा मडळीनी आश्चर्य प्रकट केले. याचे खरे कारण त्याना काय माहीत ? पण मला माझे वर्म माहीत असल्यामुळे मी व्याख्यान टाकून देऊन द्रविडाकडून त्यांच्या खोलीची किल्ली घेऊन तेथे जाऊन दार बद करून घेऊन निजलो. काही वेळाने कानशिलाच्या शिरा थडाथड उड लागल्या, आणि हात उचलून वरून घाव घालावे त्याप्रमाणे काळजाचे दचके बसू लागले. कल्पनांची चक्रे डोक्यात फिरू लागली. काय करावे हे सुचेना. दार उघडन बाहेर जाऊन एका ओळखीच्या विद्यार्थ्याला ही हकीकत सांगितली. तेव्हा त्याने एक मोठा ग्लास भरून लिंबाचे सरबत करून दिले ते पिऊन फिरून अथरुणावर जाऊन पडलो. रात्री आठ वाजता भागेची निशा बरीच उतरली, व क्लबात जेवण्याची वाट पहातील म्हणून तसाच गावात गेलो. वाटेत एका दिव्याचे दोन दिवे दिसू लागले. आणि एकाद्या हलत्या गाडीत बसून जावे त्याप्रमाणे वाटभर भेलकांडे जाऊन चालत होतो. क्लबात गेल्यावर रात्री सर्व तोच विषय. मग मडळीनी द्रविडाना क्लबात बोलावून सत्कार करण्याचे ठरविले. दुसरे दिवशी द्रविड आले तेव्हां सर्व दारांत उभे राहून 'जयगुरु भभोलानाथ' अशा शब्दांनी त्यांचे स्वागत केले. आणि प्रत्येकाने उपरण्याचा तोबा करून त्याना सटकाविण्याला प्रारंभ केला. एक दिवसाची गमत झाली, पण परकायाप्रवेश केल्याप्रमाणे दारूने झिंगलेल्या मनुष्याची काय स्थिति होते याचा अनुभव आला.

मोडलिब्यास असताना आईचे डोळे वरचेवर येत. तिने पुष्कळ औषधे करून पाहिली पण तो विकार बरा होईना. तेव्हां एक दिवस तिला शेजारणीने अगदी अखेरचा उपाय म्हणून सांगितला तो असा की, ओल्या मिरच्यांचा रस काढून तो डोळ्यांत पिळावा ! हा उपाय आसुरी होता व घरच्या कोणी माणसानी त्याला संमति देणे शक्य नव्हते. परतु मनाचा निश्चय करून इतर कोणास कळूं न देता आईने तो आसुरी उपाय खरोखरच अमलात आणला. आणि आश्चर्य की, डोळ्याचा विकार मला पुन्हा कधी झाला नाही असे ती सागे. मनुष्य दुखण्याला कटाळले म्हणजे काय करण्यास तयार होईल याचे हे एक मासलेवाईक उदाहरण म्हणून सांगतां येईल

५५ वर्षापूर्वी ( १८८४ ) माझे दोघे वडील बधु मॅट्रिक परीक्षेकरितां बैलगाडीतून इतर दहाबारा विद्यार्थ्यांबरोबर बेळगावास गेले. मुले लहान, प्रवास लांबीचा, वाटेत मुतकट्टीच्या डोंगरांतील बेरडांची बारी, या सर्व गोष्टीमुळे बेळगांवी सुखरूप पोहोचल्याचे पत्र येईपर्यंत वडील व मातोश्रीना झोप नसे. तोच प्रसंग १८८६ साली वडील बंधु आप्पा पुण्याहून कोल्हापूरला गेले तेव्हां आला. तेव्हां पुण्याहून कोल्हापूरचे टपाल पदमजी पेस्तनजी यांच्या कत्राटी तांग्यांतून, सर्व रात्र प्रवास करून, टप्प्या टप्प्यावर घोडे बदलून जाई. तांगा मोडका. त्यांत टपालाची पोती भरलेली. आणि प्रवाशाने त्यावर कठड्याला हात धरून सभाळून बसावयाचे. या तांग्याना ‘ खोडमोडी ’ म्हणत. पुणे कोल्हापूर रस्त्यावर ;जेजुरी, शिरवळ जवळील अधारवड, अशा दग्यादरोड्यांच्या जागा. प्रवास करणारा मुलगा सोळा वर्षांचा. झोपेची डुकली आली तर तांग्यांतून केव्हा पडला हे कळावयाचे नाही. आणि दरोडा पडला तर प्राणाशी गांठ. या भीतीमुळे ती रात्र वडील-मातोश्रीनी देवापुढ बसून जागून काढली असे मला आठवते.

लहानपणी माझी पाठांतरशक्ति चांगली होती. १२व्या वर्षी माझे मामा व आजी यांच्याबरोबर कुरुंदवाडाजवळ बेडकीहाळ या गावच्या इनामदाराकडे पाहुणे म्हणून गेलो होतो. हा गांव कानडी मुलखांत मोडतो. तेथील माझ्य वयाची मुले कानडी लिहीत व बोलत. मलाहि वाटले, आपण एखादा कानडं श्लोक पाठ करावा. त्या घरच्या समवयस्क मुलाने एक शिकविला तो मी एक दिव सांत पाठ केला. आणि मौज ही की, तो मला अजून पाठ येतो. तो श्लोक असाः

"अण्णदेव नोळिडिद् वात्सल्यमेब बळगण्णि योळ कौट्टु वडदलले नलरियदे निर्विण्णभाव दोळंदु लक्ष्मण तुरगसाराथि केतन गळिद ॥ इण्णिद वरूथम तरिसि पोरागिरिसि नलव्व्यण्णु मगळिरुतिर्द्र राजमंदिर कैदि कण्णोळिक्षिसिदे तळेवागी सितंदेतनु ॥ सगळाच निरर्थक शब्दसमूह "!! नॉनसेन्सचा नमुना.

पण या श्लोकाने एकदा मी थोडी गम्मत केली. दोन-तीन वर्षापूर्वी टिळकांच्या वाड्यांत यशवत कवि यांच्या बिऱ्हाडी कानडी कवि बेंद्रे यांचे काव्यगायन होते. प्रो. गोकाक व इतर कांही कानडी मडळी आली होती. काव्यगायनानंतर गप्पा सुरू झाल्या तेव्हां आणखी इतर कोणाला कानडी येते असा प्रश्न निघाला. तेव्हां मी म्हणालो मला येते. मडळीना ही थट्टा वाटली. तेव्हां मी वरील श्लोक पाठ म्हणून दाखविला. त्यांत हास्यास्पद अशी अनेक अशुद्धे होती हे उघड दिसले. पण अशुद्ध कानडी झाले तरी ते कानडीच की नाहीं ! मी म्हणालो, 'मीं फड जिंकला. आता तरी तुमच्या माझ्यात कानडी-मराठीचा वाद राहू नये.' सर्वजण हसू लागले. मिरजेच्या दक्षिण भागात कानडी भाषा चालते. यामुळे पांच-पन्नास कानडी शब्द कळतात इतकेच माझे कानडीचे ज्ञान आहे.

लहानपणी घरचें घोडे होते यामुळे केव्हां केव्हां त्यावर बसण्याचा प्रसंग येई. सांगली हरीपूरपर्यंत मी घोड्यावरून एक-दोन खेपा केल्या होत्या. तेव्हां घोडें दामटून मोतद्दाराला मागे टाकून गेल्याचे आठवते. पण पुढे दहिवडीस वडील बंधु अव्वल कारकून होते, व कऱ्हाडास 'प्लेग' मामलेदार होते तेव्हां घोड्यावर बसण्याची हौस बरीच फेडून घेतली. कऱ्हाडास कृष्णाकांठी वाळवंट मोठे. आणि वाळवंटांत घोड्याचे पाय रुततात यामुळे त्याला अडचण होते. याचा फायदा घेऊन मी रोज वाळवटांत घोडे नेऊन मोकळ्या पाठीवर बसून खूप पळवीत होतो. हा अनुभव मला एकदां अकल्पितपणे उपयोगी पडला. दिल्लीच्या असेंब्लीत असतांना आम्ही सात आठ सभासद पेशावरकडील सरहद्दीच्या दौऱ्यावर गेलो. वाटेत एका मुक्कामांत पोलिटिकल अधिकाऱ्याचा बंगला उंच चढणीवर होता. तेथे फराळास जावयाचे होते. आणि ते चढण्याचे श्रम वांचवावेत म्हणून कांही लष्करी स्वारांचे घोडे आमच्याकरता आणून उभे केले होते. ज्या कांहीना मुळीच सवय नव्हती ते घोड्यावर बसेनात. पण पं. मोतीलाल नेहरु व इतर एक-दोन गृहस्थ यांच्याबरोबर मी घोड्यावर बसून निघालो. कांहीना आश्चर्य वाटले की, मला

घोड्यावर कसे बसतां येते ? तेव्हां दुसरे कोणी म्हणाले, "अरे, हा मराठा ! हा घोड्यावर बसणारच ! उगीच कां मराठ्यांनी मुलूखगिऱ्या केल्या ! "

माझी मुंज आठव्या वर्षी झाली आणि लग्न १५व्या वर्षी झाले. तेराव्या वर्षीच माझ्या लग्नाच्या गोष्टी माझ्या कानावर येऊ लागल्या. पण सुदैवाने लग्नाचा मुलगा म्हणून परीक्षेला बसण्याचा प्रसंग फार वेळां आला नाही. एकच आठवतो. त्या-वेळी टोपी घालून मांडी मोडून पुस्ती काढून दाखवायला भावी श्वशुरापुढे बसावें लागले. परीक्षेचा हा एकच 'पेपर' मला होता, व मी त्यांत पास झालो असे या श्वशुराकडून मला जागच्या जागी सांगण्यात आले. सर्वच परीक्षांचे निकाल घरबसल्या असे तडकाफडकी लागले तर किती चांगले होईल ! असो, नवी पुस्ती काढावयास न सांगतां माझ्या जुन्या पुस्त्याच हे कां पाहात नाहीत असा प्रश्न मनांत आला. लोकांच्या पुस्त्या माझ्याच म्हणून दाखविण्यांत आल्या तर काय घ्या ? अशी शंका त्या गृहस्थाला आली असावी. अशी शंका घेणे हा माझा व माझ्या वडिलांचाहि अपमान नव्हे काय असे वाटून मनात थोडा रागहि आला. पण 'इंटरव्ह्यू'ला उमेदवार बोलवतात त्यात जो हेतु असतो तोच बहुधा पुस्ती समक्ष काढून घेण्यात असावा. कारण चालचलणूक, ढब, तयारी, चलाख-पणा, निर्भयता इत्यादि गुण आहेत की नाहीत हे समक्ष पहावयास मिळते. पुस्ती काढतांना त्याबरोबर जीभ बाहेर काढणारा आणि नाक सूं सू करणारा किंवा शाईने बोटे रंगविणारा असा मुलगा मी नव्हतो. नाहीतर इतर विषयांत नापास व्हावयाचा ! असो. पत्रिका आधीच पाहून झाली होती. पुढे भावी श्वशुरानी मोठा हुंडा देण्याची तयारी आपण होऊन दर्शविली. तथापि माझे वडील मुलगी पहाव-यास गेले ते मुलीच्या एका डोळ्यात वडस आहे असे सांगत आले. अर्थात् लग्नाचे बोलणे संपले !

वरपसंतीच्या परीक्षेला बसण्याचे माझे प्रसंग या एका शिवाय सर्व टळले याचें कारण, पुढे प्रत्यक्ष झालेल्या श्वशुरानी मला आधीपासूनच मनांत जांवई म्हणून योजून ठेवले होते, आणि ही एक वरपरीक्षा झालेली कळतांच त्यांनी आपली मुलगी करून घेण्याचें वचन माझ्या वडिलांकडून घेऊन टाकले. त्यालाहि कारण असें. हे माझे सासरे मोरोपंत पेंडसे व माझे वडील हे माझ्या जन्माच्या आधीपासूनचे अत्यंत जिव्हाळ्याचे स्नेही होते. मोरोपंत हे दापोली तालुक्यांतील मुर्डी या गांवचे

रहिवासी. ट्रेनिंग कॉलेजचे सर्टिफिकीट मिळविल्यावर त्यांना मोडलिंब्यास मराठी शाळेत नोकरी मिळाली त्यावेळी माझे वडील तेथे कारकून होते. आम्ही ज्या घरीं भाड्याने रहात होतो त्याच घरांत त्यांनाहि जागा मिळाली. आणि तेथे जी दोघांची मैत्री जडली ती आमरण टिकली. दैवयोग असा की माझ्या वडिलांची बदली मिरजेस झाली त्याबरोबर त्यांचीहि बदली मिरजेच्या शाळेवर झाली. फिरून एकाच वाड्यांत दोघेहि बिऱ्हाडाने राहिले. आणि ही दोन कुटुंबे इतकी निकट आणि घरगुती नात्याने रहात की तिऱ्हाइताला हे एकच कुटुंब एकाच जागेत नांदते असे वाटे. मोरोपंताच्याच शाळेत मी शिकत असल्यामुळे माझा अभ्यास कसा हें निराळे पाहण्याचे किंवा परीक्षा घेण्याचे कारण नव्हते. दोघाची गृहस्थिति सारख्याच गरिबीची. आणि बायकांसुद्धां दोन्ही कुटुंबांचे मन मिळालेले. तेव्हां मला लोक नवरा मुलगा म्हणून पाहण्याला येऊं लागण्याचा पहिला प्रसंग दृष्टीस पडतांच, मोरोपतांनी लगट केली आणि एकदां प्रत्यक्ष माझ्या वडिलांकडून वचनच घेऊन टाकून ते निश्चिंत झाले

त्यानंतर ही माहिती नसल्याने जर इतर कोणी चुकून माझ्या लग्नासंबंधी विचारपूस करण्यास आला, तर मोरोपंतच 'लग्न ठरले आहे' असे सांगून आल्यापायी त्याला बाहेरच्या बाहेर माघारा परतविण्याची जबाबदारी हक्काने निःशंकपणे घेत. त्यांचे बिऱ्हाड वाड्याच्या तोंडी आणि आमचे थोडेसे आंतल्या अंगाला. यामुळे मोरोपंताना द्वारपाळाची नाक्याची जागा मिळाली होती तिचा ते असा उपयोग करीत. माझ्या वडिलांकडून मोरोपंतानी लग्नाचे वचन घेतलेलें प्रथम मला माहीत नव्हते. पण हळुहळू त्याचा सुगावा लागू लागला. तो असा की पूर्वीपेक्षां मोरोपंत माझ्याशी अधिक आपलेपणाने वागू लागले. घरांत आंबा, पेरू आणला, एखादा खाण्याचा जिन्नस तयार झाला, म्हणजे ते व त्यांची बायको म्हणजे माझी भावी सासू मला नक्की हांक मारून आपल्या मुलांबरोबर माझ्याहि हातावर एकादी फोड किंवा घास टाकू लागली. मोरोपंत मला अधिक जवळ बसवून घेऊन कुरवाळू लागले. त्यांनी एका बाजूला मला घ्यावें आणि दुसऱ्या बाजूला आपल्या मुलीला म्हणजे माझ्या भावी बायकोला घ्यावे आणि तोंडाने गप्पागोष्टी हास्यविनोद करावा असा प्रकार अधिक सुरू झाला. मला या प्रेमळ कारस्थानाचा पुढें पुढें तरी किंचित् सुगावा लागला. पण माझी बायको मात्र

शुद्ध व गोड अशा अज्ञानांतच लग्न घडून येईपर्यंत राहिली. तो निर्व्याज जीव माझ्याशी लग्नाच्या आधीच्या एका आठवड्यापर्यंत पूर्वीसारखा खेळे, भांडे, तडे !

एक दिवस घरी प्रौढ स्नेही-मंडळी गप्पा मारीत बसली असता एकजण मला उद्देशून म्हणाला, "पहा, हा मुलगा किती हुषार आहे तो" तेव्हां माझ्या भावी सासऱ्याने थट्टेने दुसरी बाजू घेतली. आणि 'असे काय पाहयाच तर' असे म्हणून मला दहा ओळी शुद्धलेखन घातले त्यांत तीन चुका त्यानी काढल्या. पण त्या 'प्रीति' हा संस्कृत शब्द व त्याला प्रत्यय लावून होणारे शब्द यातील 'ती' हे अक्षर ऱ्हस्व दीर्घ पडून झाल्या होत्या. संस्कृत इकारान्त शब्द मराठीत ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहावा याविषयी अजूनहि मतभेद आहेच मी सर्वत्र दीर्घ समजून तो लिहिला. पण चूक बरोबर ठरविणार शाळेचे हेडमास्तर! तेव्हा बाकीची मंडळी थट्टेने हसू लागली; व मला म्हणाली, "साभाळ रे बाबा, मोरोपंत मास्तर आता तुला आपली मुलगी कशी देणार ?" तेव्हां या थट्टेने मला रडू आले. मात्र ते मास्तराची मुलगी बायको मिळणार नाही म्हणून नव्हे; पण मी स्वतःला हुषार समजत असतां तीन चुका निघून माझ्या हुषारीची कीर्ति फुकट गेली म्हणून ! पण मास्तरानी चुका काढल्या तरी त्यांना माझी हुशारी कबूल होती व म्हणूनच त्यानी मला, दुसऱ्या कोणाला थाग लागू न देता, स्वतःचा जावई करून घेतलेच.

माझ्या आईबापांची आणि सासूसासऱ्यांची जशी गट्टी होती तशीच माझ्या धाकट्या बहिणीची व माझ्या बायकोची गट्टी होती. दोघी एकाच वयाच्या म्हणजे माझ्याहून आठ वर्षांनी लहान. माझे लग्न ठरल्याचे कळल्यापासून मी मुलीशी खेळण्यांत थोडी कुचराई करू लागलो. त्याचा त्यांनी गवगवा केला आणि माझी अज्ञानी बायको आश्चर्याने मला म्हणेहि की, "तूं कां रे आमच्याशी पहिल्यासारखा खेळत नाहीस ! मोठा आला आहे तिसमारखान." पण मीच लाज वाटून निरुत्तर होई. लग्नाची कल्पना नाही म्हणून ती सहजच लाजत नसे. पण माझे ज्ञान तिच्यापेक्षां आठ वर्षांनी अधिक म्हणून पुरुष मुलगा असून मीच लाजे. हे पाहून लोक थट्टा करीत. प्रत्यक्ष लग्न झाल्यावर मात्र माझ्या बायकोने लज्जेचा आपला वाटा उचलला आणि मला निम्म्या लाजेतून सोडविले. लिहिण्याला खरोखरच आनंद होतो व हांस वाटते की, या लग्नाच्या उपाधीची जाणीवहि नसल्यापासून, म्हणजे तिच्या चौथ्या आणि माझ्या बाराव्या वर्षापासून आज

सतत पचावन्न वर्षें आम्ही दोघे खेळगडी या नात्याने सुखाने नांदत आहो. आमच्यात मतभेद होऊन विकोपाला गेलेला प्रसंग तर मुळी आठवतच नाही. म्हणण्यासारखा मतभेदाचा प्रसगहि एखादाच असेल. आणि असेल तोहि कांही तासापलीकडे टिकला नसेल. याचे श्रेय मात्र मी तिच्याच थोर उदार प्रेमळ स्वभावाला देईन.

दैवयोगहि असा की, माझे श्वशुर माझ्या लग्नानतर लवकरच वारले आणि माझी सासू निराश्रित म्हणून माझ्याचकडे येऊन राहिली. यामुळे, माहेरपणाच्या स्वतत्र जागेमुळे आम्हां पतिपत्नीचा मधून मधून वियोग व्हावयाचा तोहि कधी झाला नाही. असा अखड पन्नास-पचावन्न वर्षांचा सहवास क्वचितच पहावयास मिळत असेल. सासरे वारले तेव्हा त्याच्या घरी उत्तरक्रियेलाहि पैसा नाही अशी स्थिति त्याच्या खर्चिकपणाने झाली होती. त्याना मुलगा नसून दोन लहान मुली होत्या. हे सर्व कुटुब लगेच आमच्या कुटुबात समाविष्ट झाले. वडिलानीं मिरज सस्थानच्या अधिपतींकडे खटपट केल्यामुळे माझ्या सासूला पांच रुपये पोटगी देण्यात आली या दोन लहान मुलींची लग्ने पुढे आमच्याच वडिलांनीं स्वतः पुण्याहवाचन ठेवून केली, व योग्य तो अर्थात् गरिबीचा खर्चहि केला. आणि त्या दोनहि मुली निवर्तेपर्यंत त्याचे नैमित्तिक माहेरपण आमच्याच घरी होत असे. यापैकी एका मुलीची मुलगी विधवा झाल्यावर आमच्याचकडे राहत असे. अशा रीतीने दोन कुटुबांचा बेमालुम मिलाफ जन्मभर राहिला होता. सुदैवाने माझी आई सुनावर प्रेम करणारी असल्यामुळे माझ्या बायकोला आपणाला माहेर नाही असे कधीच वाटले नाही. "माझा सर्व जन्म म्हटले तर सासरी आणि म्हटले तर माहेरीच झाला" असे ती अभिमानाने लोकांना सांगते आणि ते सर्वस्वी शब्दशः खरेहि आहे.

पूर्वी लग्ने ठरत त्यांत वधुवर पसंतीपेक्षां जमल्यास स्नेही कुटुबांमधील ऋणानुबध वाढविण्याकडे अधिक दृष्टि होती. याचे आणखी एक उदाहरण आमच्याच घरचे सागण्यासारखे आहे. माझ्या लग्नाआधी चार वर्षें माझे वडील बधु आप्पा यांचे लग्न झाले. मोरोपंत पेडशांच्या थोरल्या मुलीचे लग्न शेजारी पटवर्धन यांच्या मुलाशी ठरले. पटवर्धन यांचे बंधु कोल्हापुरास राहात. त्यांच्याहि मुलीचे लग्न या लग्नांत उरकून घ्यावे असे त्यांना सुचले. लगेच ते दादांकडे येऊन आपली "पुतणी आप्पाला करून घ्या" असे म्हणू लागले. दादा

म्हणाले "पण मुलगी पाहिल्याशिवाय होय कसे म्हणूं" ? पटवर्धन म्हणाले, "मुलगी पाहिल्यावर कोणी परकाहि होय म्हणेल ! मी सांगतो म्हणून लग्न ठरवा. तसे न झाले तर तुमचा आमचा स्नेह काय अथरायचा की पांघरायचा" ? असे म्हणून ते उपाशी राहून धरणे धरूनच बसले. दादांना सकट पडले. शेवटी ते म्हणाले, "श्रीरामचंद्राला चिठ्ठया टाकतो त्यात चिठ्ठी निघेल तसे करीन". त्याप्रमाणे त्यांनी चिठ्ठया टाकल्या त्यांत लग्न ठरवा असे निघाले. दादानी रुकार दिला. लग्न तिसरे दिवशी व्हावयाचे आणि आजच पुण्याहवाचन ठेवले पाहिजे अशी कांही नड निघाली. म्हणून पुण्याहवाचनाची तयारी झाली. पटवर्धनांनी कोल्हापुरास तार केली. कोल्हापूर बत्तीस मैल लांब. लगेच ते व्याही निघाले. इकडे देवाला अक्षतहि झाली. लग्नाच्या दिवशी सकाळी मुलगी मिरजेस दाखल झाली. मग उभयतां व्याह्याविहिणीनी वधूवर समक्ष पाहिले आणि तिसरे प्रहरी लग्न लागले. मी तेव्हां लहान. तथापि इतक्या घाईने लग्न ठरते काय व होते काय याचे मलाहि आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही.

# कॉलेज व विद्यापीठ

विद्यार्थ्यांचा विद्यापीठाशी संबंध मॅट्रिक्युलेशन परीक्षेपासून येतो म्हणून या प्रकरणाचा प्रारंभ तेथपासूनच करितो. मला मॅट्रिकचा फॉर्म मिळाला तेव्हा बेळगांवाऐवजी पुण्याच्या केंद्रात जाऊन परीक्षा देण्याचे मी ठरविले. प्रथमपासूनच मनानें माझा ओढा पुण्याकडे होता. कारण या नाही त्या कारणाने पुण्याची कीर्ति माझ्या कानावर विद्यार्थीदशेतहि येत होती आगगाडीने पुण्यापेक्षा बेळगांव जवळ. पण पुण्यास परीक्षा देणें ही गोष्ट मला अधिक 'ऐटी'ची वाटे. त्याप्रमाणे परीक्षेच्या आधीच दीड-पावणेदोन महिने मी अभ्यासाकरितां म्हणून पुण्यास येऊन राहिलो. काही दिवस जोगेश्वरीच्या बोळात गुर्जर याच्या वाड्यात व पुढे तुळशीबागेच्या दक्षिणअंगाच्या माडीतील एका खोलीत राहात असे. रोज सध्याकाळी दोन कार्यक्रम ठरलेले असावयाचे. त्या वेळी रेमार्केटची इमारत पुरी बांधून झाली नव्हती. तथापि फळाच्या गाळ्यात दुकाने बसू लागली होती. म्हणून तेथे जाऊन एकादे डाळिंब विकत घेऊन, एकाद्या अर्ध्या बांधलेल्या दगडी चौथऱ्यावर बसून, ते सावकाश खावयाचे, आणि नंतर तुळशीबागेत जाऊन ऐन संध्याकाळी आतील दरवाज्याजवळच्या दगडी ओट्यावर बसून माडीवर झडणारा चौघडा व मुस्वर सनईचे गाणे ऐकत बसावयाचे. त्या जुन्या काळीं पुण्याच्या वाजंत्र्या-घडशाची वादनकलेविषयी प्रख्याति होती व मला तेव्हांहि गाणे ऐकण्याचा नाद होता. पूर्वी मिरजेस सरदार रास्ते यांचे लग्न मळेकर संस्थानिकांच्या मुलीशी झाले, तेव्हा वरपक्षाच्या वऱ्हाडाबरोबर पुण्याचे वाजंत्री आले होते. त्यांचे वादन ऐकण्याकरितां मिरज मळ्याइतके दूरवर मिरजेतील कांहीं मुले एक आठवडाभर जात, त्यात मीहि एक होतो. मग अगदी घराजवळ तुळशीबागेतले वाजत्री ऐकावयास मिळत ते मी कसे गमावीन !

**मॅट्रिकची परीक्षा**—ही परीक्षा विश्रामबागवाड्यात होत असे. तीवर देखरेख करण्याचे, आणि पुढे तोंडी परीक्षा (इंग्रजी) घेण्याचे काम, डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर ए. बॅरेट यांजकडे असे. कांही मुले त्यांच्या लांब पांढऱ्या दाढीला पाहून भीत. मला भीति न वाटतां उलट मौज वाटे. लेखी व तोंडी परीक्षा संपवून मी परत मिरजेस गेलो. तेथे परीक्षा पास झाल्याची तार हायस्कुलांत आली. निकाल

ऐकण्याकरितां आम्ही मुले चार तास आधी हायस्कुलांत जाऊन बसलो होतो. ते चार तास चार युगाप्रमाणे गेल्याचे स्मरते.

पुण्याच्या मोठ्या माणसांचा व माझा सबध पुढे यावयाचा होता त्याचा आरंभ झाला तो मात्र खेदकारक होता. कारण पुण्यास परीक्षेच्या तयारीकरितां म्हणून मी ज्या दिवशी आलो, त्याच दिवशी तिसरे प्रहरी पुणे हायस्कूलचे हेड-मास्तर सुप्रसिद्ध महादेव मोरेश्वर कुंटे हे वारले. सध्याकाळी स्मशानयात्रेला अनेक लोक गेले त्यांत मीहि होतो आणि त्या 'महा' पुरुषाचे जे दर्शन मला पहिले व शेवटचे झाले ते त्याला तिरडीवरून उतरून चितेवर ठेवताना! चिता पेटल्यावर माधवराव रानडे पुढे होऊन भाषण करू लागले. त्यांच्या अगांत एक लांबलचक सद्रा, डोक्याला उपर्ण्याची टापशी, व हातात सोटेवजा मोठी काठी, इतकाच पोषाख होता. बोलणाराच्या भोवती गर्दी रेटारेट करण्याची पुणेकराची चाल प्रसिद्धच आहे. मी गर्दीतून वाट काढून थेट रानड्यांच्या पुढ्यांत जाऊन उभा राहिलो. एक जवळचा गृहस्थ माझा दड धरून मला मागे खेचू लागला. तेव्हां रानडेच त्याचे निवारण करून म्हणाले 'जाऊ द्या हो. लहान मुलाला कितीशी जागा लागणार!' रानडे याचा शब्द मी अगदी प्रथम जो ऐकला तो अशा प्रसंगाने!

**फर्ग्युसन कॉलेज**—मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर मी या कॉलेजमध्ये पी.ई.च्या वर्गात १८८९ च्या जानेवारीपासून एप्रिलपर्यंत होतो. त्या वेळी माझ्या विशेष परिचयाचे स्नेही म्हणजे कै. के. बी. मावळणकर (हे शेवटी विलायतेत व्यापारी होते.) जगन्नाथपंत गर्दे (हे पुढे कोकणात डेप्युटी कलेक्टर होते) रामभाऊ परांजपे (हे अमळनेरास वकील झाले.) जोगेश्वरीचे बोळात गुर्जर याच्या वाड्यांत मी राहात असे. तेथे मिरजेचे बाळ, पुण्याचे दाणी, घारपुरे, चक्रदेव वगैरे मंडळी असत. बाळ यांचा एक प्रिपेरेटरी क्लास असे. त्यांत मी केव्हां केव्हां शिकवावयास जाई. बाळ हे मिरजेचेच असल्यामुळे आमच्या बंधूचे स्नेही होते. त्यांना मजबद्दल मोठी हौस. ते माझी (त्यांना वाटणारी) 'तरतरी' पाहून म्हणत, "केळकर, तुम्ही पुढे वर्तमानपत्राचे संपादक होणार!" पण तो मान मला तेव्हा कल्पनेबाहेर वाटे! आमच्या वाड्यातच 'आर्यभूषण' छापखान्यांतील एक करेक्टर असे. तो केसरी वर्तमानपत्राची 'नाईट' (रात्रीचे जाग्रण) करून उजाडता घरीं येई. तेव्हां त्याचा वर्तमानपत्राशी सबंध जाणून, जणुं काय त्याच्या अंगावर केसरी वर्तमानपत्राचा छाप उमटला आहे अशा बुद्धीने मी त्याजकडे पाहवें, व वर्तमानपत्रांतील आगाऊ बातमी

विचारावी ! शुक्रवार पेठेत मार्केटच्या नैर्ऋत्येस मोठ्या पिंपळाखाली खासगी खाणावळीत ( साठे यांचा वाडा ) जमखिंडीचे कोणी रामभाऊ लेले म्हणून कंपॉझिटर जेवावयास येत त्यांचा वशिला लावून एकदां केसरी-मराठा छापणारा छापखाना मोरोबादादांच्या वाड्यात पहावयास जाऊन आलो. तेव्हां तो कारखाना कितीतरी मोठा वाटला ! त्यांतून मी मोठ्या अदबशीर रीतीने हिंडत होतो; व आदरबुद्धीने तेथे चाललेले काम पहात होतो ! तेव्हां माझ्या स्वप्नांतहि अशी कल्पना आली नाही की, या छापखान्यांत छापल्या जाणाऱ्या केसरी व मराठा या दोनाहि सुप्रसिद्ध वर्तमानपत्रांचा मी पुढे अवघ्या नऊ वर्षांच्या आतच जबाबदार सपादक होईन ! १८८९ साली आर्यभूषण छापखाना परवानगीने पाहवयास गेल्याची आठवण, १८९७ साली केसरी-मराठ्याचे सपादकीय डिक्लेरेशन करावयास मॅजिस्ट्रेटकडे गेलो त्या वेळी मला झाली. आणि योगायोगाचे नवल वाटले !

फर्ग्युसन कॉलेज त्या वेळी फक्त पी. ई.च्या वर्गापुरते होते. म्हणून त्याला तेव्हा एकच दालन पुरे होई. पी. ई. चा वर्ग बसे तो शनवारांतील गद्रे यांच्या वाड्यात. दिवाणखाना मेहेरपीचा होता तरी पण त्यात भरपूर उजेड नसे. हल्ली ज्या प्रकारच्या इमारती कॉलेजाना लागतात त्या मानाने पाहतां फर्ग्युसन कॉलेजला तेव्हा लाभलेली जागा फारशी स्फूर्तिदायक नव्हती. पण कॉलेजच्या विद्यार्थ्यांना शिकविणारे शिक्षक मात्र स्फूर्तिदायक होते यात शका नाही वा. शि. आपट्यांचे शिकविणे मोठे टापटीपीचे असे. ते वर्गात बसले असता कोणी हू का चू करीत नसे. त्याचे बोलणे किंचित् तोडातल्या तोडात व बोबडे असे. तरी त्याची पद्धत ऐटदार आढ्यताखोर असल्यामुळे तीत भारदस्तपणा येत असे. कोणीहि विद्यार्थी त्यांच्याशी लगट करू शकत नसे. अवांतर विषय बोलून ते एक क्षणहि फुकट घालवीत नसत; व विद्यार्थ्यांना नेमकी उपयोगी पडतील अशीच टिपणे ते देत असत. गोखले याना नुसती मिसरूड फुटू लागली असून त्याचा गौरवर्ण, कोवळा चेहरा, व विनयशीलता याचा परिणाम त्यांच्या शिक्षणाबरोबर मुलांच्या मनावर अनुकूल होई. वर्गातील मुलांत मूल म्हणून शोभून जाण्यासारखे असतां ते प्रोफेसर होऊन मुलास शिकवितात याचे विद्यार्थ्यांना मोठे कौतुक वाटे. टिळक हेहि वर्गात अत्यंत मितभाषणी असून विषय सोडून अवांतर शब्दहि बोलत नसत. वस्तऱ्याच्या धारेप्रमाणे त्याच्या बुद्धीची तीव्रता, हजरजबाबीपणांत व कोणत्याहि शकेचे बरोबर निराकरण करण्यांत विद्यार्थ्यांना दिसून येई. प्रो. वा. बा.

केळकर यांची पद्धति आपल्याप्रमाणेच असे. पण त्यांच्या व्याख्यानाची गाडी बरीच जोराने धावे. त्याना शंका विचारण्यास मुले फारशी धजत नसत; कारण शंका विचारणाऱ्या मुलावर तुटून पडून त्याचाच प्रथम पाणउतारा करण्याची त्याना किंचित् लकब असे. त्यांचे डोळे टपोरे व गरगरीत असून त्यात किंचित् तांबुस-पणाची झाक येत असल्यामुळे, ते ज्याकडे रोखून पहात तो विद्यार्थी खबीर नसला तर भेदरूनच जावयाचा. प्रो. गोळे हे बरेच बोबडे व अडखळत बोलत. त्यांना विषयाचे ज्ञान फार चांगले असे. परंतु केळकरांच्या मेलट्रेनच्यापुढे गोळ्यांचे व्याख्यान हे दर स्टेशनवर थांबत जाऊन कशीतरी मजल गाठणाऱ्या गुड्स्-ट्रेनप्रमाणे वाटे. प्रो. आगरकरांच्या वर्गात मात्र विद्यार्थ्यांना घरी बसल्या-सारखे वाटे. त्यांचा चेहरा प्रशांत असून त्यांच्या तोंडावर हसरेपणाची स्वाभाविक झांक असे. आणि मुद्दाम गांभीर्य आणण्याकरितां ते डोळे मिटीत किंवा वर चढवीत तेव्हांहि पण विद्यार्थी मनात समजे की हा गंभीरपणाचा बहाणा आहे. त्यांना दम्याचा विकार असल्याकारणाने शिकवितांना वरचेवर खोकला येई; व विद्यार्थ्यांच्या अज्ञानाविषयीं जेव्हा ते अनुकंपा दाखवीत तेव्हां शिक्षकामध्येहि प्रकृतीच्या दृष्टीने अनुकंपा दाखविण्यासारखें कांही आहे असे विद्यार्थ्यांना वाटून दोघेहि क्षणभर समानधर्म होत. आगरकरांचे शिकविणे विद्यार्थ्यांना पटण्या-सारखें पण पाल्हाळिक असे. त्याना आठवण झाली म्हणजे कोणत्या विषयात काय बोलतील व फटकळपणाने काय दाखला देतील याचा काही नियम नसे. पुढे भांडणे माजल्यावर आगरकर जेव्हा "तुम्ही वेळेवर वर्गावर जात नाही" असा दोषारोप टिळकांवर करीत, तेव्हां टिळकहि त्यांना उत्तर देत की, "तुम्ही वर्गावर नेमके वेळेवर जात असाल, पण भाकडकथा सांगण्यांत वेळ दवडतां तसा मी दवडीत नाही. तुम्ही तासभर शिकविले व मी पाऊण तास शिकविले, दोघांचीहि बेरीज बरोबरच." तात्पर्य, कॉलेजांतील प्रत्येक शिक्षकाची पद्धत वेगळी असली तरी विषयज्ञानाच्या दृष्टीने प्रत्येकजण विद्वान व प्रोफेसरीच्या कामाला योग्य असाच होता.

**राजाराम कॉलेज**—१८८९ च्या मे महिन्यांत मला 'कृष्णाजी भिकाजी गोखले स्कॉलरशिप' दिल्याचे कळले. तेव्हां ती राजाराम कॉलेजांतच मिळावयाची म्हणून मी पुणे सोडून कोल्हापुरास गेलो. तेथे राजाराम कॉलेजांत माझे पुढील दीड वर्ष गेले. तेथील कॉलेजची भव्य इमारत, शेजारचा राजवाडा, त्या-

# मी पुणेकर कसा झालों ?

मी बी. ए. पास झाल्याची तार आली त्या सार्‍या रात्री मला मुळीच झोप आली नाही. परीक्षा पास झाल्याच्या आनदापेक्षा पुढे काय करावे या विचाराच्या काहूरामुळे डोळ्याला डोळा लागला नाही. पण एल्‌एल्. बी.ची परीक्षा पास झाल्याची तार आली त्या रात्री मी ताणून झोपी गेलो. कारण पुढे प्रथम तरी वकिली करावयाची हे अगदी निश्चित होते. मग विचार कसला ! परीक्षा बहुधा पास होणार असेच वाटत होते.

परीक्षेहून सातार्‍यास आल्यानतर परीक्षेचा निकाल लागण्याच्या दरम्यान दोन आनदाच्या गोष्टी घडल्या मी सातार्‍यास आलो त्याच रात्री अवशी मला पहिले अपत्य झाले. कुटुब प्रसूत होऊन मुलगी झाली. दुसरी गोष्ट या अवधीत माझे पहिले पुस्तक जन्मास आले ते म्हणजे शेरिडनच्या ' रायव्हल्स् ' या विनोदी फार्सवजा नाटकाचे मी केलेले भाषातर. मुलीचे नांव ' कृष्णी ' असे ठेवले भाषातरित नाटकाचे नांव ' तोहि मी व हाहि मीच ' किंवा ' नवरदेवाची जोडगोळी ' असे ठेवले. आणि योगायोग असा की, सातार्‍याहून पुण्यास आल्यावर ज्या सुमारास मी हे पुस्तक छापून प्रसिद्ध केले त्याच सुमारास मुलगी कृष्णी ही वारली एका अपत्याची गर्भावस्था व दुसर्‍याचे या लोकचे जीवित यांची अवधि एकच ठरली. कृष्णीचे मृत्यूने आम्हाला दोन दिवस रडविले. पुस्तकाने दोन दिवस पुण्याच्या विनोदप्रिय लोकांना हंसविले. कारण हे नाटक शाहूनगरवासी नाटक कपनीने पुण्याच्या आर्यभूषण नाटकगृहांत दोनदां केले, व कंपनी पुण्याहून निघून बाहेर गेली. नाटक फार्सवजा व करणार मडळी बरी यामुळे प्रेक्षक खूप हसले. दादासाहेब खापर्डे त्या वेळी येथे होते. त्यांच्या तोंडांतले, या नाटकासबंधाचे, ' धाड्कड्कडाट् फूस् ' हे वीरविडबनाचे उपहासात्मक शब्द अजून क्वचित् ऐकावयास मिळतात, व मी ते माझ्या फार्सातले असे ओळखतो. असो. " आधी नकला चांगल्या तयार करा त्याशिवाय प्रयोग करू नका " या माझ्या म्हणण्याचा राग येऊन कपनीने या नाटकाचे प्रयोग पुन्हा केले नाहीत. अशा रीतीने दोनाहि अपत्ये एकदमच झाली व एकदमच गमावली !

एल्‌एल्‌ बी झाल्यावर वकिली करावयाची (म्हणजे निदान मुनसफीची जागा मिळण्याला अवश्य लागणारी तीन वर्षेपर्यंतची वकिली करावयाची) हे माझे ठरले असल्याचे पूर्वी सांगितलेच आहे. पण वकिली कोठे करावी हे एकदम ठरेना. म्हणून वार्षिक पदवीदानसमारभाच्या पूर्वी एक आठवडाभर सोलापूर, नगर, जळगाव, भडगाव, भुसावळ इत्यादि ठिकाणे हिंडून आलो.

त्या साली पदवीदान समारंभ दोन झाले एक नेहमीचा, तेव्हांचे व्हाइस चॅन्सेलर भांडारकर यांच्या अध्यक्षतेखाली होण्याचा तो. पण चॅन्सेलर लॉर्ड हॅरिस यांच्या सोयीकरितां आदल्या आठवड्यांत मुद्दाम एक केला होता हॅरिससाहेब अप्रिय म्हणून त्यांच्या हस्ते होणाऱ्या पदवीदानाला फार थोडे विद्यार्थी गेले. दुसऱ्या समारंभाच्या वेळी डॉ. भांडारकरांना विद्यार्थ्यांनी निषेधप्रदर्शक 'हिसिंग' केले. या दुसऱ्या समारंभाला मी गेलो, व यामुळे एक वर्षभर पदवी रद्द होणार होती. पण तेथपर्यंत मजल गेली नाही. माझी सनद १८९५ च्या एप्रिल अखेर हातांत आली धंद्याला प्रारंभ (तोहि नांवाचाच) जूनपासून झाला

पहिल्या व दुसऱ्या पदवीदान समारंभाच्या मध्यंतरी जो एक आठवडा मिळाला त्यांत वरील ठिकाणी हिंडून त्यांत आढळलेल्या गोष्टी मी ती. नाना यांना पत्राने कळविल्या. ते पत्र येणेप्रमाणे :—

"नगर, जळगांव, भुसावळ, भडगाव व नाशिक इतकी ठिकाणे हिंडून मी काल परत आलो. धुळ्यास येऊ शकलो नाही. माझ्या परिभ्रमणाचा इत्यर्थ असाः—

"एकाद्या जिल्ह्याच्या गांवी राहून वकिली करावयाची तर सातारा किंवा अहमदनगर ही बरी वाटतात आणि तालुका पत्करावयाचा तर भडगाव ठीक वाटते. पण एकदां खानदेश जिल्ह्याचीच सनद काढली म्हणजे मग भडगांवाऐवजी यावल किंवा शिरपूर पसंत करावे हे नंतर ठरवितां येईल! भडगांव हे गाव मला आवडले. तेथील घरे व पाणी चांगले आहे. गांवाला लागून नदी आहे येथील सर्वांत जुने मराठी वकील रा. सहस्रबुद्धे लवकरच कार्यनिवृत्त होणार. मला पाहून त्यांना फार आनंद झाला, व भडगांवासच या असा त्यांनी मला आग्रह केला. ते म्हणाले की, दुतर्फी कामांतील वकीलपत्रे देऊन तुम्हाला कमीत कमी ७५-८० रुपयांची प्राप्ती मीच दरमहा करून देईन. याहून तुम्हाला स्वतंत्र काम मिळेल ते वेगळेच.

किंवा वाटेल तर भागीदार म्हणनहि मला घेण्याला ते तयार आहेत. पण या दुसऱ्या गोष्टीबद्दल मी अजून त्यांना कांहीच शब्द दिला नाही. येथे अवघे सहा वकील आहेत. त्यांतले दोघे लवकरच काम सोडतील. इंग्रजी जाणणारा फक्त एकच वकील आहे. म्हणून सुरवातीलाच मला शे-दीडशे रुपये मिळू लागतील. येथील मुनसफ एलएल. बी. आहेत. त्यानींहि भडगावास येण्याचाच मला आग्रह केला. आपण बार्शी तालुक्याचे नाव सुचविले, पण सोलापूर जिल्ह्याची सनद काढल्यास तो एकच तालुका बरा दिसतो. खानदेश जिल्ह्यात तसे चार तालुके चांगले आहेत. म्हणून एके ठिकाणी न जुळल्यास, मला दुसरीकडे सनद बदलल्याशिवाय जातां येईल बार्शी कदाचित् अखेरीला अधिक पैसे देईल. पण सुरवातीच्या दृष्टीने भडगाव बरे दिसते."

पण अखेर एकंदर खानदेशची हवा ऊष्ण, म्हणून शेवटी साताराच कायम केला.

या सालच्या पुण्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेला साताऱ्चा प्रतिनिधि म्हणून मी गेलो होतो. आणि सामाजिक परिषदेलाहि हजर राहणार होतो. पण सामाजिक परिषदेबद्दल तेव्हा पुण्यास फार वाद होऊन ती वेगळ्या मंडपांत भरवावी लागल्यामुळे, माणस बरावाईट पाहूनच त्याला आंत सोडीत ! द्वारपालाचे काम माझे वर्गबंधु व सहाध्यायी कै. केशवराव मावळणकर याच्याकडे होते. परिषदेच्या वादांत माझी सहानुभूति टिळकाच्या पक्षाकडे मनातून नव्हती. पण जिल्हावार वर्गीकरणात मावळणकरानी सातारकराना रा. सा. रानड्याच्या प्रतिपक्षांत लोटले, म्हणून मला परिषदेत जाण्यास त्यांनी मज्जाव केला ! त्याना व्यक्तिशः माझी मते माहीत होती. पण मावळणकर हे शिस्तीचे अभिमानी, कडक स्वभावाचे, यामुळे एकदां ठरले ते ठरले. पण रानडेच त्याच्या हस्तकापेक्षां अधिक दिलदार. त्यांनी परिषदेच्या प्रास्ताविक भाषणांत Mental Prepossessions या विषयावर तत्त्वज्ञानपूर्ण असे सुंदर भाषण केले व प्रतिपक्षाला दोष न देतां भांडखोरीला गुणवर्णनपर स्वरूप आणिले !

गणेशखिंड रस्त्यालगत हल्ली पोलीस खात्याच्या ताब्यांत असलेल्या प्रशस्त मैदानी जागेत पुण्याच्या राष्ट्रीय सभेचा मंडप घालण्यांत आला होता. या मंडपाशेजारी बांधलेल्या झोपड्या आणि आसपासचे एकदोन बंगले यांत प्रतिनिधींची उतरण्याची सोय करण्यांत आली होती. आज मोठ्या पदाला चढलेले कांही

उतारवयाचे लोक त्या वेळी स्वयंसेवकाचे काम करीत होते. कॉंग्रेस छावणीत जेवणाखाण्याची व्यवस्था अगदी जातवार होती. कॉंग्रेसच्या मेळ्यांतली हल्लीची सह-भोजनें तेव्हा शक्यच नव्हती ब्राह्मणी छावणीत कडेकोट सोवळे होते. कै. विनायकराव आपटे, त्या वेळच्या नेमस्त पक्षांतील व्यवहारचतुर पेढीवाले, हे पितांबर नेसून उघड्या अगानें जेवणाखाण्याची व्यवस्था करीत हिंडत असलेले आठवतात गोपाळराव गोखले हे या कॉंग्रेसचे सरचिटणीस त्यांची तेव्हाची तारांबळ वर्णन करिता येत नाही ! एकदर व्यवस्था नेमस्त पक्षाच्या हाती होती. टिळक पक्षाचे लोक स्वागत-मडळाचे सभासद होते. तरी मडळांतील बहुमत त्यांच्या विरुद्ध पक्षाचे असल्यामुळे अर्थातच कोणत्याहि व्यवस्थेत ते भाग घेत नव्हते त्यांचे काम विध्वंसक स्वरूपाचे म्हणजे प्रतिपक्षाला अडवणूक करण्याचे होते. पण सामाजिक परिषद राष्ट्रीय मडपात भरू द्यावयाची नाही इतक्यावरच ते अडवणुकीचे कारस्थान येऊन ठेपले होते. या कारस्थानाचे पुढारी श्रीधर विठ्ठल दाते हे होते त्यांचे व त्यांच्या कारस्थानाचे वर्णन टिळक-चरित्रांत मी सविस्तर केले आहे. पण आम्ही साताऱ्याहून आलेले प्रतिनिधि तटस्थपणाचे धोरण ठरवूनच आलेले होतो. आमचे पुढारी करंदीकर व सहस्रबुद्धे वकील यांचा ओढा जितका गोखल्याकडे तितकाच टिळकांकडेहि होता. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे काम यशस्वी व्हावे, त्यात महाराष्ट्राचा दुर्लौकिक होऊ नये, म्हणून रानडेपुरस्कृत गोखले यांना त्यांचे सहाय्य पण त्याच साली कायदे-कौन्सिलच्या निवडणुकीत सातारकरांनी टिळकांना मदत केली होती यावरून टिळकांकडेहि त्यांचा ओढा किती असेल हे उघडच आहे आम्हा सातार-कर प्रतिनिधींच्या तटस्थ धोरणाचा एवढा खुलासा पुरे होईल मी तर काय बोलून चालून २३ वर्षांचा मुलगा सातारकर पुढाऱ्यांचा अनुयायी. पुणे स्टेशनावरून गांवांत आलो तेव्हा बरोबरचे चौघे वकील शिग्रामात बसले आणि मला जागा नाही म्हणून मी कोचबॉक्सवर गाडीवाल्याशेजारी बसून हिवाळ्याच्या थडीनें कुडकुडत गांवात आलो ! पुण्यांत असतो तर कॉंग्रेसचा स्वयंसेवक झालो असतो इतके माझे वय. माझे काम इतकेच होते की, सर्व दिवसभर कॉंग्रेसच्या छावण्यातून हिंडावयाचे, नवीन ओळखी करावयाच्या, आणि होईल ती गमत पाहावयाची. सामाजिक परिषद राष्ट्रीय सभेच्या मडपात भरविण्याचा बेत रानड्यांनी आधीच प्रसिद्धपणे रहित केला म्हणून सभेचा मडप दाते यांनी जाळण्याची फारशी भीति उरली नव्हती. तथापि हा उपद्व्यापि सैतान काय करील, न करील,

अशी शंका वाटत असल्याने, सकाळी मंडपाकडे येऊन तो सुरक्षित आहे असे दिसले म्हणजे मनाला हायसे वाटे. असो. पुण्यास राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष सुरेंद्रनाथ बानर्जी हे होते. त्यांच्या वक्तृत्वशक्तीचा पराक्रम पाहून मन दडपून गेले. तो पराक्रम असा की, नुसते वाचावयाला दोन तास लागतील एवढे मोठे अध्यक्षीय भाषण त्यांनी तीन तास घेऊन लिहून काढल्यासारखे बोलून दाखविले ! भाषणाची छापील प्रत हातांत घेऊन ताडून पाहणाराला आश्चर्य वाटे ते हे की, एक वाक्यहि इकडले तिकडे झाले नाही ! अशा सभेच्या मंडपात उभे राहून भाषण करण्याचा अधिकार मला येईल असे स्वप्नहि तेव्हा पडण्यासारखे नव्हते म्हणून माझा उद्योग तेव्हा इतकाच की, भाषणे करणाऱ्या पुढाऱ्यांची भाषणे ऐकावी, आणि भाषणे न करिता बसलेल्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांचे चेहरे न्याहाळून मनात त्यांच्याविषयीची आदरबुद्धि वाढवावी

असो. साताऱ्याची हवा सुंदर, आसपासचे सृष्टिसौंदर्य अप्रतिम, वडील मातोश्रीसुद्धां कुटुंबातील सर्व मनुष्ये एकत्र राहत असल्यामुळे लाभणारे गृहसौख्य, तरुणपणचा मित्रसहवास व लोकप्रियता, इत्यादि गोष्टी एकत्र झाल्यामुळे साताऱ्यास घालविलेली माझी काही वर्षे मोठी स्पृहणीय वाटतात साताऱची स्वस्ताई, आमची साधी राहाणी, यामुळे महिना ७५ रुपयांची माझ्या वधूची प्राप्ति पुष्कळ झाली असे वाटे ! आणि तेव्हा कोणी मजकडून करार लिहून दिला घेतला असता व जन्मभर दरमहा पाऊणशे रुपये पगार देऊन कोणी मला माझ्या आवडीचे काम सांगितले असते, तर मला वाटते मी अशा करारानें तेव्हा स्वतःला बांधून घेतले असते. याचा अर्थ हाच की, मी महत्त्वाकांक्षी असा केव्हाच नव्हतो. पण नशीबवान् खरा ! म्हणूनच पुढील आयुष्यातील सापेक्ष उत्कर्ष आपण होऊन वेळोवेळी माझ्या पदरात पडत गेला दैवाने असा हात न देता मला त्याने इतर पुष्कळ लोकांप्रमाणे गोते दिले असते, तर माझी होडी कोणत्या किनाऱ्याला लागली असती हे सांगणे कठिण आहे.

वकिलीची सनद हाती पडताच मी पागोट्याची तयारी केली. या वेळी साताऱचे बहुतेक वकील गुलाबी रंगाची चंदेरी जरीकाठी बत्तीवजा पागोटी डोक्याला घालीत. एल्‌एल्. बी. झाल्यावर असले पागोटे आपणहि डोक्यावर घालू अशी महत्त्वाकांक्षा मी मनांत बाळगीत असे. पण सनद काढल्यावर, घरचे एक जुने ठेवणीतले कुबटलेले पागोटे होते तेच वडिलांनी माझ्या पुढे केले व ते बांधवून

घेण्यास सांगितले पण ते बांधवून आणल्यावर माझ्या डोक्याच्या मापाने तिप्पट मोठे ठरले आणि वजन इतके की, त्याने मान तेव्हाच भारावून जावयाची. हास्यास्पद होण्याची माझी इच्छा नव्हती हे पागोटे घालावयाचे तर ते निम्मे फाडून त्यातले एक बांधून घ्यावे लागणार दादांना पागोटे फाडणे कसेसेच वाटले. पण शेवटी मी हट्ट करून पागोटे फाडविले, आणि त्याला गुलाबी डब देऊन नव्याने बांधवून घेतले पण बेट तेहि अवजडच झाले. कारण चंदेरी बत्तीसारखे त्याचे सूत तलम नव्हते तथापि प्रथम तेच कसेतरी घालीत होतो झाले ! कारण डोक्याला पागोटे नाही तो वकील कसला असे मानणारे पक्षकारहि तेव्हा असत. मग टोपी तर राहोच, पण जरीचा रुमालहि बांधून भागले नसते.

पागोट्याबरोबर आणखी एका गोष्टीची तयारी करावी लागली ती कोर्ट फी स्टॅंप व रजिस्ट्रेशन या विषयाचे कायदे वाचण्याची. एलएल. बी. परीक्षेकरिता नमलेल्या विषयांत हे कायदे नव्हते म्हणून मी ते पूर्वी वाचले नव्हते पण दारावर वकिलीची पाटी लावलेली पाहून एक दिवस एक पक्षकार आला आणि त्याने दाव्याचे कागद मजपुढे टाकले. दावा लावण्याचा निश्चयच करून तो आला होता. यामुळे हा दावा लागेल की नाही, लावू की नको, असे न विचारतां म्हणाला, "तुम्हाला वकील-पत्र द्यायचे आहे. तर या दाव्याला खर्च काय लागेल तो सांगा " वकील-फीचा आंकडा तोंडाला येईल तो काय वाटेल तो सांग शकलो असतो. पण स्टॅंप, कोर्ट फी इत्यादि खर्च रुळीप्रमाणेच लागणार ! आणि मला तर रुळी माहीत नव्हत्या. वकिलीची पाटी रंगविण्याच्या आधी या रुळी पाहून ठेवावयास नको होत्या काय ? पण तरुण अननुभवी वकीलाचे असेच होते. मी पक्षकाराचा तो प्रश्न ऐकून मनांत चमकलो. पण 'दुपारी या' आतां काम आहे असे सांगून मी पक्षकाराला लावून दिला, आणि तोंडात मारून घेऊन कोर्ट फी व स्टॅंप ॲक्ट आधी वाचण्यास सुरवात केली.

या वेळी सातारच्या समाजात एकोपा पाहण्यासारखा होता. याचे कारण करंदीकर व सहस्त्रबुद्धे यांचे मित्रत्व व ऐक्य. करंदीकर हे सहस्त्रबुद्धे यांच्या हाताखाली शिकलेले विद्यार्थी. पण 'शिष्यात् इच्छेत् पराजय' अशी सात्विक वृत्ति सहस्त्रबुद्धे यांनी करंदीकर हे वकील झाल्यावर त्यांच्याशी ठेवली होती. दोघांच्या संयुक्त गोडवेपणाला सातारच्या मंडळींनी अंजीर-खडीसाखरेची उपमा दिली होती ! एक गोडसा अंजीर घ्यावा. तो फोडून त्यांत खडीसाखरेचे तुकडे बसवून

द्यावे. तो रात्रभर तसाच ठेवावा. आणि सकाळी उठून खावा. मग त्याची गोडी काय वर्णावी ? या दुक्कलीच्या जोडीमुळे कोणतेहि सार्वजनिक कार्य बिनबोभाट पार पडे व यशस्वी होई. दोघांचेहि प्रेम मजवर असे. पण सहस्रबुद्धे मला वकिलीच्या कामी मदत करीत तशी दादासाहेब करंदीकरांकडून कधीच झाली नाही एका कामात मला मदतीला घेऊन शेवटी मूठ भरून वीस रुपये सहस्रबुद्धे यांनी मला दिले तो आनंद चांगला स्मरतो !

माझी वकिली बेताचीच चालू होती. ती करण्याची हौसच नसल्याने मी मुनसफीच्या नोकरीचा अर्ज मुंबई सरकारकडे केला होता, व दुसऱ्या एकाद्या भाषेची परीक्षा आधी द्यावी लागे याकरितां गुजराथी क्रमिक पुस्तके आणून त्याचा अभ्यास सुरू केला. इकडे 'बोध सुधाकर' पत्रात इंग्रजी मराठी लिहिण्याचे काम थोडथोडे सुरू होते. शिवाय सातारचे तेव्हाचे डिस्ट्रिक्ट जज्ज सत्येंद्रनाथ टागोर यांच्या पत्नींनी मला पुस्तकावरून बंगाली भाषा शिकविण्यास सुरुवात केली, व त्याकरिता ज्योतिरिंद्र टागोर यांचे नाटक 'सरोजिनी' याचे भाषांतर मी करूं लागलो. प्रत्युपकार म्हणून कांही मराठी पदे करून मी ती टागोर साहेबांच्या मुलीला गावयास शिकवीत असे. माझे गाणे शिकविणे म्हणजे भाषा व चाल माझी. बाकी गाणे तिचेच ! ती उत्तम ब्राह्मो मुलींचा व सुशिक्षित सभ्य कुमारींचा नमुना असे टागोर साहेबांचा मुलगा सुरेन्द्र ( यांनी पुढे हिंदुस्थान को-ऑपरेटिव्ह विमा कंपनी काढली ) हा लॉन टेनिस चांगले खेळे, व मीहि सातारा युनियन क्लबाचा त्या वेळचा 'टेनिस चँपियन !' यामुळे या सर्व कुटुंबाची व माझी मोठी मैत्री जमली. याच वेळी टागोर साहेबांची भाची सुप्रसिद्ध सरलादेवी घोसाळ ( पुढे या चौधुराणी झाल्या ) याहि साताऱ्यास आल्या होत्या. त्यांची माझी ओळख तेव्हा झाली ती पुढे अबाधित राहिली. सरलादेवींचे बंधु मि. घोसाळ, आय्. सी. एस् ( हे शेवटी पुण्यास रेव्हिन्यू कमिशनर होते ) तेहि याच वेळी साताऱ्यास येत जात. त्यांचे लग्न टागोर साहेबांच्या मुलीशी व्हावे असे घाटत होते. पण ते न होता कुचबिहारची राजकन्या ( बाबू केशवचंद्रसेन यांची नात ) त्यांना देण्यांत आली. असो. टागोरसाहेबांनी माझे लक्ष वकिलीकडे नाही असे पाहून, माझी शिफारस कोल्हापूर दरबाराकडे एक मुनसफीची जागा रिकामी झाली त्या-करितां केली. पण त्यांतून कांही निष्पन्न झाले नाही.

मी वकिली करीत असतांना सुप्रसिद्ध किंकेडसाहेब हे सिंधहून बदलून साताऱ्यास असिस्टंट जज्ज म्हणून आले. त्याचा स्वभाव तेव्हा फारच वाईट होता. त्यांना कायद्याचे ज्ञान अगदी नव्हते, व सिंधच्या जुडिशिअल कमिशनरकडून त्याच्या कामावर टीकात्मक शेरे लिहिलेली प्रकरणे त्याच्यामागून साताऱ्यास येत ती शिरस्तेदार लोक वकिलांना दाखवीत. पण साहेबाचा डौल मोठा. ते कोर्टात येतांच वकिलानी नुसते उभे राहवे इतकेच नव्हे, तर दोन रांगा करून त्यांना मधून जाताना अदबशीर रीतीने सलामी द्यावी अशी त्याची अपेक्षा. पण वकील लोकानी ती ऐट चालूं दिली नाही.

एकदा मी त्याच्यापुढे काम चालवीत असता त्याचा माझा खटका उडाला. मी केलेले भाषांतर चूक असे ते म्हणाले. मी तेच बरोबर आहे असे म्हणालो. तेव्हां "भाषांतराचा प्रश्न निकालात निघेपर्यंत तुम्ही खोलीच्या बाहेर जा. साक्षीदाराला सूचना मिळते," असे ते म्हणाले. मी या गोष्टीला हरकत घेतली व तसा हुकूम द्या म्हणालो. हुकमाला काय कमी ? त्यानी तो लगेच दिला पण तो अमान्य करण्याच्या विचारात मी आहे असे पाहून, उलटपक्षातर्फे काम चालवीत असलेले वकील दादासाहेब करंदीकर यानी मला हुकूम मान्य करण्याचा सल्ला दिला. साहेबांचा मराठीतला गुरु शिरस्तेदार बिचारा विठ्ठलराव साठे तरी पण त्यानेहि जेव्हा माझेच भाषांतर बरोबर म्हणून सांगितले तेव्हा लगेच मला आंत बोलावण्यात आले मग मी किंकेडसाहेबाविरुद्ध हायकोर्टाकडे एक अर्ज लिहिला, व तो डि. जज्जामार्फत जावयाचा म्हणून प्रथम टागोरसाहेबाकडे गुदरला. पण त्यानी तो वर न पाठविता आम्हा दोघाना निरनिराळ्या वेळी चेंबर-मध्ये बोलावून समजूत घातली. मी व किंकेडसाहेब वयाने सारखे, आणि कांहींच्या मते त्यांच्या व माझ्या चेहऱ्यांत एक प्रकारचे साम्य होते. यामुळे यापुढे वकिलाच्या खोलीत माझे नांव 'किंकेडसाहेब' असे पडले. पुढे साहेब मजकूर पुण्यास डि. जज्ज होऊन आले तेव्हा मात्र ते इतके सभ्य झाले की, जशी कांही कालपीची खडीसाखर !

पुढे याचा बदला मी किंकेडसाहेबांकडून एक दोन तऱ्हानी मिळविला. १९११-१२ च्या सुमाराला मी बराच पुढे आलो होतो. किंकेडसाहेबांनी माझे आयर्लंडच्या इतिहासाचे मराठी पुस्तक वाचले होते ते स्वतः केल्ट (आयरिश) वंशीय असल्यामुळे त्यांना तो ग्रंथ आवडून त्यांनी माझे खासगी

अभिनदन केले होते. आम्हा उभयताचे स्नेही पारसनीस याच्याकडूनहि साहेब मजकुरानी माझ्याविषयी बरेच ऐकिले होते. १९१८ च्या सुमारास त्यानी व पारसनिसानी मिळून मराठ्याच्या इतिहासाच्या ग्रथाचा पहिला भाग प्रसिद्ध केला होता. पण त्यात मार्मिकपणा फार थोडा असून, 'तुळशीच्या कहाण्या' इंग्रजीत लिहून Folk lore चे संशोधक म्हणून इग्रज लोकांत कीर्ति मिळविलेल्या किंकेडसाहेबानी, याहि पुस्तकात दतकथा व बखरीतील वर्णने यांचा ऐतिहासिक गोष्टी ( Facts ) च्या बरोबरीने इतका सरमिसळ उपयोग केला होता की, त्या ग्रथाला इतिहास असे कोणी फारसे मानीत नसे. माझे हे मत पारसनिसाकडून साहेब मजकुराना कळले होते. आणि 'टाइम्स' पत्रांत आपल्या पुस्तकावर चांगले अभिप्राय आले तरी 'मराठ्या'च्या 'मराठा' पत्रांत अजून त्याचा परामर्ष घेतला जात नाही या विचाराने त्याना जराशी खिन्नता वाटत होती. १९१८ च्या अखेर किंकेडसाहेब वरिष्ठ कायदेमडळाचे सभासद होते. स्वराज्य-सघाच्या शिष्टमंडळाला विलायतेस जाण्याकरिता पासपोर्ट मिळत नव्हते ते मिळविण्याच्या खटपटीकरितां मी दिल्लीस गेलो, तेव्हा प्रेक्षकाचे तिकिट काढून कायदेमंडळाचे काम पहाण्याकरितां मी ग्यालरीत बसलो. किंकेडसाहेब यावेळी असेब्लीचे सभागृहात होते त्यांनी मला पाहिले मधल्या सुट्टीत मी खाली उतरतांच ते मजकडे आले व 'माझ्या इतिहासग्रथाचे परीक्षण तुम्ही मराठापत्रात अजून कां करीत नाही ?' असे त्यांनी मला विचारिले तेव्हा त्यातील मला वाटणारा दोष मी त्याना सांगितला. तथापि परत पुण्यास आल्यावर, या दोषाचा उल्लेख करून, मी दोन हप्त्यांत ते परीक्षण केले. तेव्हां पारसनिसांनी पत्र लिहून माझे आभार मानले !

पण मी दुसरा बदला घेतला तो ज्या भाषांतराच्या करितां त्यांनी सातान्यास मला कोर्टातून बाहेर जाऊन उभे राहाण्यास हुकूम दिला होता तसल्याच, म्हणजे नक्की मराठीचे इंग्रजी रूपांतर करण्याच्याच बाबतीत घेतला. १९२४ साली केसरीचा संपादक या नात्याने हायकोर्टाची बदनामी केल्याची तोहमत मजवर आली. हायकोर्ट बेंच सर ॲबरस्टन मार्टेन व न्या. किंकेड यांचे होते. माझा खटला मीच चालवीत होतो. केसरीतील आक्षेपार्ह स्फुट सूचनांचे सरकारी भाषांतर बरोबर नाही असे मी म्हटल्यावरून चीफ जस्टिस मला म्हणाले, 'ठीक, तुम्हीच ते भाषांतर एक एक वाक्य घेऊन करीत जा. आम्ही ते सरकारी भाषांतरावरून पाहतो म्हणजे कळेल. नंतर एका वाक्यांत मूळ स्फुटांत 'खुनी आरोपी' असा

शब्द होता. त्याचे भाषांतर Accused charged with murder असे मी केले. ते मार्टेनसाहेबानी मान्य केले. बिचाऱ्याला मराठी कळतच नव्हते. पण किंकेडसाहेब पडले मराठीचे निष्णात! त्यांनी भाषांतराला हरकत घेतली. मी म्हणालो, "तर मग आपण भाषातर कसे करावे म्हणता?" ते म्हणाले, "The murderous accused." हे ऐकून मला कोर्टापुढे हसूच आले! मी फक्त इतकेच म्हणालो, "कोर्टाने सरकारी भाषातरकार बोलावून विचारावे मी त्याचा निकाल खुशाल मान्य करीन" असे म्हणून मी खाली बसलो पण भाषांतरकाराला बोलवावयापर्यंत मजलच आली नाही. "Well Mr Kelkar, I won't pit my knowledge of Marathi against yours I accept your translation" असे म्हणून किंकेडसाहेबानी आवरते घेतले! अशा रीतीने भाषातरांत माझा विजय झाला खरा पण निकालाची वेळ आली तेव्हा मला पांच हजार रुपये दंड करून, व माझ्याविरुद्ध बरेच लिहून, किंकेडसाहेबांनी वचपा काढून घेतला!

असो, हाती सनद आली तरी उपजीविकेचे याहून अधिक यशस्वी साधन शोधण्याची माझी विवचना सुरू झाली. वडील बधु बदलून गेल्यावर दरमहा काही रुपये पाठवीत. परतु ते मागविणे माझे मलाच वाईट वाटे. मी अवघ्या चार रुपये भाड्याच्या घरात राहात होतो. खिशात पाच-चार रुपयांहून केव्हाहि अधिक भाडवल नसे. घरची मडळीहि तेव्हा बेताचीच. परतु कांही नाही म्हटले तरी महिना निदान तीस रुपये तरी लागणारच. तेव्हा मी एक लॉ क्लास उघडावयाचे ठरविले. दिवाणाच्या वाड्यांत माडीवर चौकांत जागा घेतली. क्लासाची फी महिना चार रुपये ठेवली होती. हेतु हा की, आठ विद्यार्थी मिळाले तरी खर्च भरून निघेल. सनदधारी वकील हा वकिली परीक्षेच्या विद्यार्थ्यांना शिकविण्याला सहजच पात्र ठरतो. मुलाला मूल झाले म्हणजे तो जसा एकदम 'बाप' होतो, तसा पदवी व सनद घेतलेला वकील विद्यार्थ्यांचा गुरू कां होऊ नये? असो वर्गात चार विद्यार्थी आले. रोज दोन तास शिकवी. पण याची शाश्वती न वाटून मी इतर साधनांची टेहळणी करीत होतो. अक्कलकोटास शभर रुपयांवर मुनसफी मिळत होती. नेमणुकीची तारहि आली. परंतु 'एकदां सस्थानांत शिराल तर सर्व आयुष्यक्रम अनिश्चित राहील' असा सल्ला मित्रमडळीनी दिल्यामुळे तिकडे नकार लिहून पाठविला.

या वेळी साताऱ्यास खरशेटजी नांवाचा एक डेप्युटी कलेक्टर असे. तो वाईट पारशाचा एक नमुना होता. अति लाच खाऊहि होता. सर्व लोकांना मोठा त्रास देणारा. रात्री नऊ नऊ वाजेपर्यंत त्याच्या फिरत्या कोर्टात काम चालन, व वकील पक्षकार याना फार गैरसोय होई " याच्या फिरत्या कोर्टाबरोबर हिंडलात तर फौजदारी काम बरेच मिळेल " असे काही वकील मित्रानी मला सागितल्या- वरून स्वतः खरशेटजी साहेबानाच एक दिवस विचारले पण आपल्या स्वारीत त्याना वकील राहणे इष्ट वाटेना. म्हणन त्यांनी निर्लोभता व परोपकार यावर मला मोठे व्याख्यान झोडले वास्तविक त्याचा प्रसगाहि नव्हता असो माझे स्वारीत जाणे रहित होऊन पुढे मी पुण्यास येऊन मराठ्याचा पक्का सपादक झालो व माझे थोडे नावहि झाले त्यानतर एक दिवस काम करीत असता एक पार्शी गृहस्थ माझ्या टेबलाशी उभा राहिला पहातो तो खरशेटजी ! "साहेब, बसा. इकडे कोणीकडे ? " " हा माझा अर्ज वाचून पहा. द्वाड दुष्ट सरकारने माझे पेन्शन खाल्ले की हो ! " "का हो ?" "म्हणे मी लाच खाल्ले " मी म्हटले "भलतेच काहीतरी ! आपण मला साताऱ्यास निर्लोभितेवर व्याख्यान दिले ते पक्के स्मरते !!" "जाऊ द्या हो ते पण मराठ्यात माझ्याबद्दल लिहा बरे का ? " असो. खरशेटजीबरोबर हिंडण्याचा बेत रहित झाला. आणि हळहळ वकिलीचे काम मिळण्यास साताऱ्यासच सुरवात झाली.

१८९६ च्या फेब्रुवारीत टिळक हे साताऱ्यास आले होते. त्याना तात्या- साहेब मुतालिक व आबासाहेब कान्हेरे यानी गावाबाहेरच्या एका बागेत विश्रान्ति- भोजन दिले. त्या वेळी त्याच्याबरोबर गप्पा मारण्याला म्हणून माझ्या या दोघा स्नेह्यांनी माझी योजना केली होती. कारण मी तरुण, तरतरीत, आणि कोर्टात काम नसलेला एलएल्. बी. ! मेजवानीला गाण्याची जोड पाहिजे ! म्हणन त्या वेळी साताऱ्यास खेळ करीत असलेल्या स्वदेश हितचिंतक नाटक मंडळीतले ललितबुवा गवई बरोबर घेतले होते. भोजनोत्तर पेटी तबला सोडून टिळकाना विश्रांति द्यावयाची नाही असा यजमानांचा बेत उघड दिसला. पण टिळकानी "मला बुवा गाण्याचा कटाळा आहे" असे सागितल्यामुळे मग गप्पाच दोन-तीन तास झाल्या. त्यांत ग्रामण्य व सामाजिक परिषदेचा मंडपवाद या दोन विषयांवर मी टिळकांना बरेचसे उलटसुलट प्रश्न विचारले. ग्रामण्याच्या बाबतीत मी त्यांच्या बाजूचा, पण सामाजिक परिषदेच्या बाबतीत त्यांच्या विरुद्ध होतो. आणि माझ्या

स्वभावाप्रमाणे मी आंतबाहेर कांही न ठेवता त्यांच्याशी वाद केला. अर्थात् मी सभ्यता सोडली नाही. पण माझा कल सुधारणेच्या बाजूला झुकतो आहे हेहि कांही त्यांच्यापासून मी लपवून ठेवले नाही. आणि या वादाने मी टिळकांना अप्रिय वाटलो नाही याचे प्रत्यतर पुढच्याच महिन्यात आले

तो प्रकार असा मार्च महिन्याच्या पहिल्याच आठवड्यात टिळक आगगाडीने मिरजेकडे प्रवास करीत असतां, सातारा रोड स्टेशनावर साताऱ्याचे एक वकील गोविंदराव रानडे हे गाडीत चढून टिळकांच्याच डब्यांत बसले. रानडे विटे गांवी आपल्या घरी काही कारणाने जात होते. टिळक व रानडे यांची बरीच ओळख पूर्वीची होती. आणि झोपमोड झाल्याने दोघेहि काही वेळ गप्पागोष्टी करीत बसले. त्यात टिळक असे म्हणाले की, “ तुमच्या वकीलीच्या धद्यांत पुष्कळ तरुण लोक पडतात. पण वर्तमानपत्राच्या धद्याकडे कोणी ढुंकनहि पाहात नाही. खुद्द पुण्यास मी असा एखादा एल्एल् बी मनुष्य शोधतो आहे की, जो माझा लॉ-क्लास शिकवील व त्याबरोबर मराठा पत्रातहि इग्रजी लिहील. असे झाल्यास या जोड कामावर एक मनुष्य सहज पोसला जाईल. यांत चांगल्या वकिला-इतके पैसे मिळणार नाहीत हे खरे पण सर्वानीच असे म्हटल्यावर मग सार्वजनिक काम तरी कसे व्हावे ? ” यावर गोविंदराव रानड्याना काय वाटले कुणाला ठाऊक ! ते म्हणाले, “ ठीक आहे. मीहि शोधतो एखादा मनुष्य असा मिळतो कां ! ”

चार दिवसानी रानडे साताऱ्यास परत आले. त्याची माझी नित्याप्रमाणे वकिलांच्या खोलीत गांठ पडली. मला पाहताच ते म्हणाले, “ केळकर, बोला. तुमच्याकरितां काम आणले आहे. करितां कां ? ” मग त्यांनी टिळकांशी झालेले संभाषण सर्व सांगितले. मी म्हणालो, “ मराठा पत्र चालवीन असे वाटते. पण वकिलीच्या वर्गात माझ्यापेक्षांहि वयाने मोठे विद्यार्थी असावयाचे. त्यातून पुणेरी विद्यार्थी ते ! तेव्हां हे दुसरे काम कसे निभावेल याची थोडी शका वाटते. पण तेहि करीन जा ! लिहा टिळकांना मी काम पत्करतो म्हणून.” रानडे यांना माझी वाङ्मय-विषयक अभिरुचि माहीत होती, व यामुळे मजवर त्यांची मर्जी असे. सातारच्या या पूर्वीच्या तीन वर्षांच्या मुक्कामांत लेखक, व्याख्याता, कवि, व खेळाडू या नात्याचे सगळे चाळे मी थोडथोडे केले असल्यामुळे ‘नवीन होतकरू एल्एल्. बी.’

असा मजविषयी वडील पिढीचा अनुकूल ग्रह झाला होता. आणि पुण्याच्या निमत्रणाची गोष्ट ज्यांना ज्यांना कळली त्यानी त्यांनी मला उत्तेजनच दिले. कोणीहि मोडता घातला नाही, किंवा नाकहि मुरडले नाही.

माझी कबुली मिळताच गोविंदराव रानडे यानी टिळकांना लिहून कळविले, "केळकर यायला तयार आहेत" लगेच टिळकांनी लिहिले, "केळकराना भेटायला बोलायला पाठवून द्या" त्याप्रमाणे मी पुण्यास येऊन टिळकांच्या घरीच उतरलो. दोन प्रहरी तासभर बोलणे चालणे झाले त्यात मी म्हणालो, "मराठा पत्र चालवीन अशी उमेद वाटते. पण केसरीत मला लिहितां येईलसे वाटत नाही." टिळक म्हणाले, "तो प्रश्नच आज नाही तुम्ही लॉ क्लास व मराठा पत्र दोन्ही पत्करलीत तर माझे काम झाले. हल्ली वाकनीस हे लॉ क्लास शिकवितात. त्याना मराठ्याबद्दल एकदा अखेरचे विचारतो व मग तुम्हाला काय ते लिहीन." इतके होऊन मी पुण्याहून साताऱ्यास परत गेलो. बोलावणे आलेच तर दोनतीन महिन्यानी येईल असा माझा अदमास होता पण अवघे आठहि दिवस गेले नाहीत. इतक्यात रानडे वकिलाना टिळकांची जरुरीची तार आली की, "केळकराना ताबडतोब पाठवा" याचे कारण असे की, टिळक दुसरा मनुष्य पाहात आहेत असे वाकनीस वकिलाना कळताच त्यानी घरूनच राजीनामा टिळकाकडे आपण होऊन पाठविला होता !

वास्तविक टिळकाचा विचार गैर नव्हता लॉ क्लास व मराठा पत्र हीं दोन्हीं एकाच माणसाकडे असली तरच त्याला पुरेसा पगार देता येण्यासारखा होता. आणि वाकनीस मराठ्यात लिहिता म्हणते तर टिळकानी आपण होऊन त्याना जा म्हटले नसते. पण वाकनिसाचे न जुळण्याला अनेक कारणे होती. त्याला काय करणार ? वाकनीस हे स्वभावाने गोड. त्याचे इंग्रजीचे ज्ञान चांगले पण ते पुण्यातील मवाळ—नेमस्त पक्षाचे कट्टे अभिमानी आणि १८९५ साली पुण्यास भरलेली राष्ट्रीय सभा, सामाजिक परिषदेचा वाद, इत्यादि गोष्टीनी टिळक हे मवाळ पक्षाला दुस्मानासारखे वाटत. उलट या पक्षाला टिळक मराठा पत्रातून शिव्या देत. शिवाय वाकनीस हे वर्तमानपत्राच्या उद्योगाला सर्वस्वी अपात्र अर्थात् ते मराठ्यांत लिहिण्याचे काम पत्करतील असे वाटण्याचे टिळकाना फारसे कारण नव्हते. उलट टिळक दुहेरी कामाला मनुष्य हुडकीत आहेत असे वाकनिसांच्या कानावर जातांच, आपण

पक्षभेदामुळे लॉ लेक्चरर म्हणूनहि टिळकाना नकोसे झालो आहो असे वाकनिसां-ना वाटणे स्वाभाविक होते. म्हणून 'जा' म्हणण्याआधीच 'जातो' असे म्हणून राजीनामा पाठवावा हे बरे असे वाटून त्यांनी राजीनाम्याची अशी घाई केली असावी.

कसेहि असले तरी, या राजीनाम्याने टिळकांचे कामच एकदम अडले. म्हणून वर सांगितल्याप्रमाणे त्यानी तावडतोब तार केली आणि मीहि कोणाला घरी विचारण्यासवरण्याची वाट न पाहता सरळ उठून पुण्यास आलो !

पुण्यास येण्याची संधि मिळण्यापूर्वी आठच महिने १८९५च्या जून महिन्यात मी कोणत्या मनःस्थितीत व उद्योगात होतो हे दर्शविण्याकरिता मी वडील बंधूना खालीलप्रमाणे पत्र लिहिले होतेः—

" राघोपत कोल्हटकर वारल्याची दुःखदायक वार्ता तुम्हास पूर्वीच कळली असेल. मोरोपत पेडसे यांच्यासारखा राघोपताचे घर हा एकखांबी तबू होता. तो आता कोसळला. रा सा निळकठराव गोखले हे चि तात्या याची मुंज करणार आहेत त्याकरतां ती. आप्पा येणार आहेत रा. हरिभाऊ काणे यांना पुण्यास स्मालकॉज कोर्टाच्या रजिस्ट्रारची २०० रुपयाची हगामी जागा मिळाली. मुनसफीकरिता नेमून घेतलेली दुसरी भाषा म्हणून गुजराथी शिकण्याचे मी ठरविले आहे. मार्चपासून येथे एक वकिली परीक्षेच्या विद्यार्थ्यांचा वर्ग काढावा म्हणतो येथे कितीसे विद्यार्थी मिळणार ? पण कदाचित् महिना ३०-३५ रुपये मिळतील, व कायद्याच्या विषयाचीहि उजळणी होईल. बंगालीवरून भाषांतर केलेली एक कादंबरी येथील 'बोधसुधाकर' वर्तमानपत्रांत छापण्यास सुरुवात केली आहे. छापील मजकुराच्या कांही प्रति होतील तसतशा दर आठवड्यास काढून घेईन; व अशा रीतीने वर्तमानपत्रांतील शेवटल्या हप्त्याबरोबर कांही पुस्तके तयार होतील. येथे एक नाटककंपनी आली आहे. शेरिडनच्या 'रायव्हल्स' या प्रहसनाचे भाषांतर—'नवरदेवाची जोडगोळी'—या नांवाचे मी केले आहे ते ही नाटक-मडळी बसव म्हणते. पाहावे काय होते ते. "

पण दैव म्हणाले " थांब, तुझी विवचना मी कायमचीच संपविणार आहे." हे कसे घडले याची त्रोटक हकीकत वर दिलीच आहे. पण त्यासबंधी एक-दोन पत्रेहि खाली देतो :—

**पुणें**, ता. १५ मार्च १८९६

टिळकांचे गोविंदराव रानडे यांना पत्र—

" वर्तमानपत्राचे संपादक व लॉ लेक्चरर या नात्याने केळकर यांचेकडून मी कोणत्या गोष्टीची अपेक्षा करतो हे मी त्याना येथे सविस्तर सांगितलेच आहे लॉ-क्लास शिकविण्यासंबंधाने त्याच्या माझ्यांत कोणताहि गैरसमज उत्पन्न होण्याचे कारण नाही. तथापि वर्तमानपत्र चालविण्यासबंधाने मात्र त्यांच्या माझ्यांत एखादा गैरवाजवी मतभेद उत्पन्न होऊ नये अशी माझी इच्छा आहे. त्यांचे मत-स्वातंत्र्य मी हिरावून घेऊं इच्छित नाही. पण केसरी-मराठ्याचे काहीएक विशिष्ट धोरण आहे, व ते सदैव तसेच राहिले पाहिजे ही गोष्ट त्यानी सदैव लक्षांत ठेविली पाहिजे केळकर यानी ज्या अटी मला सुचविल्या त्याचा आशय असा की, लॉ-क्लास, व केसरी-मराठा या गोष्टी स्वतंत्र व पृथक् समजण्यात याव्यात. प्रथम कांही महिने मराठ्याकरितां काही पगार द्यावा किंवा नाही ही गोष्ट त्यानी सर्वस्वी माझ्यावर सोपविली. लॉ-क्लास शिकविण्याच्या त्यांच्या पात्रतेबद्दल बोलण्याचे कारणच नाही वर्तमानपत्रात प्रथम कांही दिवस पगार न घेता काम करण्यास ते तयार आहेत म्हणून सध्याच्या परिस्थितीत मी त्याना काहीहि दिले तरी त्याबद्दल त्याची कोणतीच तक्रार नाही असो; वाकनीस याना विचारून त्याना कळवितो असे मी सांगितले होते म्हणून आज त्यांना निश्चितपणे खालीलप्रमाणे सुचवीत आहे.

" लॉ-क्लास व केसरी-मराठा या दोहोंच्या बाबतीत केवळ नोकरीच्या नात्याने नव्हे तर माझ्या अखेरच्या दिवसात मित्रत्वाच्या नात्याने, काम करून मदत करणारा स्नेही मला हवा आहे ही गोष्ट केळकर याना तुम्ही स्पष्टपणाने समजावून द्या. सध्या सोयीकरता म्हणून केवळ एक लॉ-क्लासच त्याच्यावर मी सोपविला तरी पुढे-मागे लॉ क्लास व वर्तमानपत्रे या दोन्ही गोष्टी त्याना सांभाळाव्या लागतील."

" त्याना लॉ-क्लास चालविण्याबद्दल मी दरमहा रु. ७५ देऊ शकेन. आणि ज्या वेळी मराठ्याचे सर्व काम ते पाहू लागतील त्या वेळी त्याना आणखी रुपये ६० इतका पगार देण्यांत येतील. अर्थात् हे काम समाधानकारक रीतीने करण्याला त्यांनी आपला सर्व वेळ माझ्याकरिता दिला पाहिजे. कारण लॉ क्लास खाजगी असल्याने तो यशस्वी करण्याचे काम सर्वस्वी एकट्या शिक्षकाच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे.

" या अटीबद्दल नीट मननपूर्वक केळकर यांनी विचार करावा असे त्याना सांगा मी जरा जास्त स्पष्टपणाने लिहिले आहे हे खरे. पण माझ्या मागील अनुभवावरून तसे करणे अत्यंत अवश्य आहे असे मला वाटते. पुढील आयुष्यांतील यश व भरभराट (prospects) ही सर्व त्यांची काम करण्याची शक्ति व कर्तबगारी यांवर अवलंबून राहतील आणि कदाचित् इकडे आल्यावर त्यांना पुण्यातच कायमचे राहावे लागेल. माझ्या दृष्टीने पाहिले तर मला असे वाटते की, माझे आयुष्य आता संपत आले आहे, म्हणून सार्वजनिक आयुष्यात जो मला कधीहि सोडून जाणार नाही असा सहकारी मित्र व कार्यकर्ता मला मिळाल्यास हवा आहे. या सर्व गोष्टींचा केळकर यानी विचार करावा, व त्याची तशी इच्छा असल्यास एप्रिलच्या १ ल्या तारखेस त्यानी इकडे निघून यावे "

ता. १६ मार्च १८९६ पर्यंत, म्हणजे मी सातारा सोडून पुण्यास राहण्याला जाण्यास निघण्याच्या आदल्या दिवसापर्यंत, टिळकाकडे मला काम मिळण्यासंबधाने मी माझ्या बंधूना काही कळविले नव्हते परंतु त्या दिवशी टिळकाची तातडीची तार येऊन मी निघण्याचे ठरविले ता. १६ रोजी सकाळी दहाचे सुमारास गोविंदराव रानडे याना टिळकांची खालीलप्रमाणे तार आली :—

" If terms accepted ask Kelkar start immediately. Wire " लगेच मी पुण्यास निघण्याची तयारी केली आणि वडील बंधु नाना याना खालीलप्रमाणे पत्र लिहिलेः—

" वडिलांचे सेवेशी विज्ञापना विशेष.

माझ्या आयुष्यक्रमांत एक मोठे आशाप्रद असे परिवर्तन अगदी आकस्मित रीतीने घडून येऊ पाहत आहे. त्याचा प्रकार असा. राजश्री नामदार बाळ गंगाधर टिळक याना त्याचा वकिली परीक्षेचा वर्ग आणि 'मराठा' वर्तमानपत्र चालविण्याच्या कामांत एक मदतनीस हवा अशी आवश्यकता त्यांना अलीकडे भासू लागली. रा. गोविंदराव रानडे वकील यांच्याशी याविषयी टिळकांचे सहज बोलणे झाले. त्यांत रानडे यांनी टिळकांना माझे नांव सुचविले. टिळकहि " ठीक आहे केळकरांना मी घेतो " असे म्हणाले. त्याप्रमाणे मला विचारण्यांत आले. मीहि लगेच होय म्हणालो. त्यामुळे पहा कशी संधि

पुढील पटांगण, आमचे विद्यार्थीगृह वगैरे सर्व प्रकार भव्य व बडेजावीचा असा पुण्याच्या मानाने दिसला. बोर्डिंगात वीस-बावीस खोल्यातून सुमारे चाळीस विद्यार्थी राहात. म्हणून अभ्यासापेक्षा खेळ व दगल हीच पुष्कळ चालत. जवळच थोड्या अंतरावर आम्हा काही लोकांचा खासगी क्लब असे. त्यांत करमरकर व काळे हे राजाराम हायस्कुलातील मास्तर, कृष्णराव मराठे, पूर्वीच्या महाराजांचे हुजूर चिटणीस, शिरोळचे पटवर्धनबंधु, इचलकरंजीचे चितळे, मुधोळचे चिपलकट्टी, चिकोडीचे शहाडे बंधु वगैरे मंडळी असत. क्लबांतील जेवण भाकरी-आमटीचे पण इतके उत्कृष्ट असे की, अजून त्याची आठवण येते. हास्यविनोद तर कांही विचारावयासच नको. क्लबाचा आचारी हा स्वतः हायस्कुलातील एक विद्यार्थी असे. लहान व धाकट्या भावाच्या मदतीने तो काम उरकी. आम्हास जेवावयास वाढून लगेच जेऊन शाळेत जाई. फावल्या वेळात अभ्यास करी. त्याच्या या स्वावलंबीपणाचे सर्वांसच कौतुक वाटे, व त्याचा शाळेतील अभ्यास होण्याला एरवी पुरेसा वेळ नाही म्हणून तो भाकऱ्या भाजीत असता आमच्यातील एकाद-दुसरा मनुष्य त्याच्या शेजारी बसून शाळेतील त्या दिवसाचा पाठ त्याला वाचून दाखवी अगर त्याजबरोबर घोकी. या स्वावलंबी गृहस्थाचे नाव देसाई. ते पुढे बी. ए. होऊन वऱ्हाड शाळाखात्यात डेप्युटी इन्स्पेक्टरचे जागेवर होते. सर्कस-मॅनेजर म्हणून प्रसिद्ध असलेले रामभाऊ पटवर्धन हे क्लबातील सर्वांत लहान सभासद असून सर्व क्लबाच्या गमतीचा व विनोदाचा ते विषय असत. प्रत्येक सभासदामागे जास्तीत जास्त सहा-सात रुपये खर्च येई.

आमच्या प्रोफेसरवर्गात मि. कँडी, शिवराम बापूजी परांजपे, काशिनाथ-पंत केळकर, रघुनाथराव आपटे, विष्णुआण्णा विजापूरकर, हरिभाऊ गोडबोले व बाळाजी प्रभाकर मोडक अशी मंडळी होती. कँडीसाहेब हे ठेंगू वामनमूर्ति पण फार मिशाळ. त्यांना विद्वत्तेचे सहाय्य बेताचेच होते. इंग्लंडांत मराठा मनुष्य मराठीचा प्रोफेसर व्हावयाचा याच नात्याने, आमच्या कित्येक कॉलेजांतून इंग्रज म्हणूनच कित्येक साहेब इंग्रजीचे प्रोफेसर असलेले पाहिले, त्यांतलेच कँडी साहेब. त्यांनी आपला हा कमीपणा क्रिकेटच्या सामन्यांमुळे भरून काढला होता. शिवराम बापूजी परांजपे हे जुन्या काळचे बी. ए. त्यांचे संस्कृताचे अध्ययन बऱ्यापैकी. पण तर्कट व विक्षिप्तपणा फार. वर्गात कोणत्या शब्दावरून कोणत्या विषयावर मजल जाईल याचा काही नियमच नाही. पण 'फायलॉलजी'मध्ये

त्यांची बुद्धि बरी चाले; व इंग्रजी श्लोकांचे भाषांतर ते फार चांगले करीत. त्याचे कारण ते मूळची वाक्यरचना होतां होईतो संभाळून भाषातर करीत जात. यामुळे त्या भाषांतराला मोकळेपणाची व कवितेच्या अंगच्या स्वैर वाक्यरचनेची लज्जत येई. "इंग्रजी शब्दाचे स्पेलिंग जुने आहे तसेच ठेवावे, बदलू नये, कारण त्यामुळे जर्मन आंग्ल हिंदी इत्यादि आर्यन राष्ट्राच्या सस्कृतीचा उगम समान आहे हे कळण्यास शब्दसिद्धीच्या द्वारे सहाय्य होते" हा त्यांचा आवडीचा सिद्धांत ते इंग्रजीतील Night ( रात्र ) या शब्दाच्या स्पेलिगवरुन सिद्ध करीत. ते म्हणत 'Night याला समानार्थक संस्कृत शब्द 'नक्त' हा होय; व Night च्या स्पेलिंगांतून g हे फालतुक दिसणारे अक्षर गाळले तर नाइट = नक्त या शब्दांचा संबंध कळण्याचे साधन राहिले नसते. पराजपे यांच्या भाषणात अजाणता विनोद बराच असे. बाणाच्या कादबरीतील लाबलचक समास सोडविण्याचा प्रसग आला म्हणजे ते विद्यार्थ्यांना पेन्सिलीने मधून मधून शब्द तोडून खुणा करण्यास सांगत व म्हणत, "बेट्यानो, बोगदा आला रे बोगदा आला! आता आत कदील लावले पाहिजेत!" उपमा फारच समर्पक ते केव्हा केव्हा भ्रमिष्टासारखे वागत. एकदां अंगरख्याच्या एका बाहीत हात घातलेला व एक बाही मोकळी लोबत आहे असेच ते वर्गात आले. विद्यार्थ्यासबधाने त्यानी एकदां कांही कल्पना करून ठेवलेली असावयाची, व परीक्षेत उत्तरे न वाचताहि त्या धोरणाने मार्क द्यावयाचे. ही त्यांची खोड एकदा एकाच नांवाचे दोन विद्यार्थी आमच्या वर्गात असल्याने उघडकीस आली. काळ्या रंगाचा काळे हुषार व गोऱ्या रगाचा काळे जडबुद्धिचा असा त्याचा ग्रह झाला होता. पण परीक्षेत गोऱ्या काळ्याने उत्तरे उत्तम दिली व काळ्या काळ्याने अगदी सुमार दिली, असे असतां त्यांच्याकडून पूर्वग्रहानुरूप पहिल्याला मार्क अगदी थोडे व दुसऱ्याला फार देण्यांत आले. मुलांनी थट्टेने हा विषय वर्गात काढला व "सर असे कसे झाले हो!" म्हणून विचारले. तेव्हां त्यानी आपला दोष सरळपणाने कबूल केला. असो. परांजपे हे पुढे पुण्यानजिक वडगांवी शेती करून राहिले व ८० वर्षांचे होईपर्यत पुण्यास सहा मैल बाजाराला पायी येत असत. या गृहस्थाइतका मोकळ्या हवेचा भोक्ता फार थोडा पाहिला.

प्रो. रघुनाथराव आपटे हे विद्वान् पण घमेंडखोर असत. त्याचा वर्ण गोरा, अंगयष्टि उंच, व शब्दांचे उच्चार मिटल्या ओठांतून अस्पष्ट व लडिवाळपणाचे असे येत. त्यांनीं ज्योतिषविषयाचा चांगला अभ्यास केला होता. 'कालि-

दासाच्या कालाचा निर्णय ' असल्या संशोधकी विषयावरहि त्यांनी निबंध लिहून बक्षीस मिळविली होती. हा गृहस्थ पुण्यास असता तर फारच पुढे यावयाचा. पण कोल्हापुरास म्हणून तो मागे पडला. प्रो. विजापूरकर हे प्रेमळ, विनयशील, पण किंचित् भोळसर असे वाटत. मुलाची निष्ठा त्याच्या ठिकाणी फार असे. काही हवे नको, चुकले-सवरले तर सरळ जाऊन सांगण्याची ती मुलांना एक सत्तेची जागा वाटे. ' स्वदेश-स्वधर्म-स्वभाषादिकांचा । जगी मान व्हावा असा हेतु साचा ' हे त्याचे शब्द त्याच्या वृत्तीत तेव्हाहि आम्हाला अनुभवाला येत. त्याची बुद्धि विशेष तीव्र नव्हती. कोणताहि विचार व्यक्त करण्यात आबडधोबड-पणा बराच असावयाचा. शब्दाच्या सुश्लिष्टपणाची गोडी त्यांना फारशी नसे. एम्. ए. पर्यंतचा अभ्यासक्रम पुरा करण्याला त्यांना बरीच वर्षे लागली. या सर्व गोष्टीमुळे मुलांमध्ये त्याची कीर्ति तरतरीतपणासंबधाने नव्हती. पण उद्योगप्रियता व निष्कपटपणा याचा आदर्श असे ते त्यांना वाटत विजापूरकर पुढे तळेगावास आले व इकडे राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यामुळे पुष्कळच प्रसिद्ध व लोकप्रिय झाले यामुळे त्याच्याविषयी येथे आणखी लिहित नाही

हरिभाऊ गोडबोले हे आम्हाला लॉजिक (तर्कशास्त्र) व इतिहास हे विषय शिकवीत. याची विद्वत्तेच्या मानाने ऐट व आत्मस्तुति फार दिसून पडे. कोणतीहि निशा न करिता एक प्रकारचा तारवटलेपणा त्याच्या चेहऱ्यावर असे. आणि ग्रीक इतिहासातील तोंडभर मावणारे फुगीर शब्द अधिकच तोंड फुगवून ऐटीने वरचेवर म्हणणे, आणि आपण इंग्रजी फार चांगले बोलतो अशा जाणीवेने तेच ते वाक्य घोळघोळून व प्रत्येक वेळी निराळ्या शब्दावर जोर देऊन म्हणणे, हा त्यांचा खेळ वर्गात चाले. तो पाहून मुले चेष्टा करीत हे त्यांच्या लक्षांत येत नसे. हरिभाऊ गोडबोले हे तालीमबाज असत व जोर बैठकी काढून त्यांनी आपले शरीर पैलवानी थाटाचे बनविले होते. एका दृष्टीनें मनुष्य साधा असे. पुण्यास ते हेडमास्तर व पेन्शनर असतां घराहून उघड्या अंगाने हातांत आंघोळीची बादली व धोतरे घेऊन ते सदाशिव पेठेच्या हौदावर येत असत. हे पाहून मला त्यांचे मोठे कौतुक वाटे. राहता राहिले प्रो. मोडक. यांची तेव्हांहि विद्वत्तेपेक्षां उद्योगप्रियतेविषयी अधिक ख्याति होती. त्याचे ऐतिहासिक ग्रंथ व शास्त्रीय विषयावरील भाषांतरग्रंथ यांची किंमत आम्हाला तेव्हा कळत नव्हती. ते बोल-तांना इंग्रजी भाषेच्या इतक्या चुका करीत की, मुले त्यांना हंसत. पण ते आपला

विषय म्हणजे भौतिकशास्त्र हा चांगला शिकवीत त्याना प्रयोगाची फार आवड असे. आणि ते शास्त्रप्रयोगाची, इतर शास्त्रीय वस्तूंची, व यंत्रांची जी वार्षिक प्रदर्शने भरवीत, त्यामुळे ते मुलाना प्रिय वाटत. या प्रदर्शनात स्वयंसेवक म्हणून मी भाग घेत असे.

भौतिकशास्त्राचा माझा अभ्यास पी ई परीक्षेपलीकडे गेला नाही. आणि पी.ई. च्या वर्गात शिकलेल्या 'उष्णता' या विषयावरील पुस्तकापैकी Heat is a mode of motion यापेक्षा दुसरे एकहि वाक्य मला आज आठवत नाही. शास्त्रीय विषयात गणिताचा भाग येतो म्हणूनच मला त्याचा प्रथमपासून कंटाळा. एरवी तो विषय मला अद्भुतरम्य असाच वाटतो. विशेष खोल पाण्यात न जाता सोप्या भाषेने लिहिलेली शास्त्रीय विषयावरची पुस्तके मी अनेक वाचली आहेत. असो. या मोडकांच्या प्रदर्शनासंबधाने मला इतकेच म्हणावयाचे की, त्यांच्या योगाने कॉलेजच्या मुलामध्ये भौतिक शास्त्राची जितकी गोडी उत्पन्न झाली तितकी त्यांच्या सबंध वर्षांतील शिकवणीने झाली नसेल. मोडकाना प्रयोग करून दाखविण्याची फार हौस. हे प्रयोग करण्याने त्यांच्या हाताखालचा गडी ( मला वाटते त्याचे नाव बाबाजी असे होते ) शास्त्रविषयात इतका तरबेज झाला होता की, आम्ही मुले त्याला अर्धा प्रोफेसर किंवा प्रो. बाबाजी म्हणत असू , व तोहि त्याच जाणिवेच्या ऐटीने प्रयोग सुरू असता, मोडक हजर नसल्यास, प्रोफेसरांच्या थाटाने व्याख्यान दिल्यासारखे बोले ! प्रो गोळे यांच्या हाताखालचा फर्ग्युसन कॉलेजांतला 'कोंडी ' हाहि असाच ' अर्धा प्रोफेसर ' बनला होता. याच्या उलट उदाहरण डेक्कन कॉलेजचे तेथे दस्तुर म्हणून प्रोफेसर होते. ते सबंध वर्षात एकहि प्रयोग करून दाखवीत नसत; व स्वतः मुलानी आपल्या हिमतीवर पुस्तक वाचून त्याप्रमाणे करू म्हटले तर काचेचे सामान फुटेल तुटेल म्हणून त्यांनाहि करू देत नसत. त्यांच्या गड्याला अर्ध-प्रोफेसरीचा मान त्यांच्या वेळी कधी मिळाला नाही तो बिचारा निव्वळ बाटल्या धुणारा गडीच राहिला !

असो. प्रो मोडक हे आपली प्रदर्शनं सुट्टीच्या दिवसात करीत त्यामुळे कॉलेजच्या इमारतीचे दोनहि मजले त्याना उपयोगाला घेता येत असत. प्रदर्शनात फिजिक्ससंबंधी दृश्ये बरीच अधिक असत. उलट रसायनशास्त्राला फार तर एकादी खोली पुरे; व रसायनशास्त्रातला मुख्य प्रयोग म्हणजे ऑक्सिजन हैड्रोजन अशा प्रकारच्या वायूंचा संयोग करून मेणबत्तीच्या ज्योतीने त्याच

बार उडविणे. पदार्थविज्ञानशास्त्रासंबंधी उष्णता, प्रकाशमापन, विद्युत्, लोह-चुंबक, ध्वनिमापन, इत्यादिकांची यंत्रे, सूक्ष्मदर्शक यंत्रे, कॅलिडीऑस्कोप बायॉस्कोप, दुर्बिणी, अशा प्रकारची साधनेंहि असत. विजेच्या प्रयोगाच्या भरण्याला एक प्रकारचें मुख्य स्थान येई. कारण एकंदर प्रदर्शनाकरिता विजेचे दिवे लागत. त्याकरिता एक मोठें इंजिन उभारून डायनामो जोडून सर्व आवारांत तारांचें जाळें पसरून ठेविलें जाई आणि रात्री विजेनें हंड्या झुंबरें, गोलदिवे, रंगीबेरंगी दिवे पेटले म्हणजे 'आज कॉलेजच्या लग्न-समारंभ आहे. आज आपली विद्यार्थ्यांची खरी दिवाळी आहे.' असें आम्ही म्हणत असूं! विजेच्या प्रयोगांत प्रखर आर्क लाइटची जाळण्याची शक्ति पाहून मन भयभीत होई. व्हॅक्युअम-ट्यूबसमध्यें ऐच्छिक इंद्रधनुष्यें प्रकट झालेलीं पाहून आनंद होई. आणि फेर धरून उभें राहिलेल्या स्त्रिया व मुली यांना न कळत विजेचे नाजूक धक्के बसले म्हणजे त्यांच्या गोड किंकाळ्या व अंगविक्षेप पाहून हास्याच्या धडाबाजी उडत. शास्त्रीय प्रदर्शन हीच खरी fairy land किंवा नंदनवन होय! आंग्ल कवि टेनिसन याच्या Princess या काव्याच्या प्रारंभीं अशाच एका शास्त्रीय प्रदर्शनाचें वर्णन आलें आहे तें वाचकांनीं अवश्य वाचावें.

**डेक्कन कॉलेज**—येथील शिक्षण हा तारुण्यांतला प्रतिष्ठितपणाचा एक सोहळा असें मुलांना वाटत असतें या सोहळ्यांत ज्यांनीं त्यांनीं त्यांचें कौतुकच केलें पाहिजे! लग्नकार्यांत ज्याप्रमाणें उत्सवमूर्ति होऊन बसलेल्या मुलाच्या अंगावर घरचे नसले तरी बाहेरचे आणून दागिने घातले पाहिजेत, घरीं नसल्यास कर्जाऊ रकमा काढून खर्चाची गरज पण तीव थाटानें भागविली पाहिजे, त्याप्रमाणें आपण डे. कॉलेजांत असलों म्हणजे आईबापांनीं आपणाला नवरदेवाप्रमाणें वागविलें पाहिजे असें सामान्य मुलाला वाटतें. मुलें हुषार व घरची श्रीमंत असली म्हणजे हा आपला एक सोहळा समजण्याचा त्यांचा हक्क कोणीहि नाकबूल करणार नाहीं. तीं अभ्यास चांगला करतात व सढळ हातानें पैसा खर्च करून जिवाची चैनहि कर-तात. पण त्यांचें तें करणें शोभून जातें. कांहीं मुलें हुषार असल्यास स्कॉलरशिपा मिळवून आपला खर्च परस्पर सांभाळतात व गरीब आईबापांवर बोजा पडूं देत नाहींत. अशा गरीब आईबापांना श्रीमंत आईबापांइतकेंच मुलांचें कौतुक वाटून शिवाय कृतज्ञताहि वाटते. पण मुलांचा एक वर्ग असाहि असतो कीं, अभ्यासाच्या नांवानें शून्य असतां आपला शिक्षण-सोहळा तीं अविचारानें व हट्टानें आईबापां-

कडून पुरा करून घेतात, आणि शेवटी त्या सोहळ्याचे पर्यवसान दुःखात होते. या तीनहि प्रकारची मुले मला डे. कॉलेजच्या शिक्षणाच्या मुदतीत पाहवयास मिळाली, व कोणत्याहि प्रकारच्या मुलाना आईबाप तळहातावरील फोडा-प्रमाणे कसे वागवितात हेहि पहावयास मिळाले. कॉलेजच्या शिक्षण-क्रमाच्या वेळी आमच्या घरची गरिबी होती, व मला स्कॉलरशिपाहि कधी मिळाल्या नाहीत. परतु मी डेक्कन कॉलेजमध्ये विशेष चैन किंवा उधळपट्टीहि केली नाही. केवळ दरिद्री नव्हे पण गरीब अशाच पद्धतीने मी राहत असे शिवाय प्रत्येक वर्षी परीक्षा पास होत गेल्याने पुढच्या अभ्यासाकरिता लागणारी रक्कम खर्च करण्याला घरच्या मडळीना उमेद वाटे येऊन जाऊन पहिल्या एल्एल् बी. च्या परीक्षेतच मी एकवेळ नापास झालो. पण त्या साली एकचतुर्थांश किवा एक पचमाश इतकीच मुले या परीक्षेत पास झाली आणि त्याचेहि कारण त्या सालचे परीक्षक चिमणलाल सेटलवाड व नार्मन मॅक्लाउड यानी भलतेच प्रमाण मनाशी धरले. पण दुसऱ्या साली मला थोडासा मोबदला मिळाला व मजबरोबर नापास झालेल्या इतरानाहि तो मिळाला. कारण पुढच्या साली याच परीक्षेत आम्ही सुमारे पधरावीस मुले पहिल्या क्लासात पास झालो. शिवाय डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झालेल्या विद्यार्थ्यांत माझा नबर पहिला आला म्हणून मला पन्नास रुपयाचे बक्षीसहि मिळाले. अशा प्रकारचे बक्षीस ठेवले असल्याचेहि मला माहीत नव्हते. पण एक दिवस अवचित कॉलेजातील एका स्नेह्याने लिहून कळविले. त्याच्या आनंदापेक्षा आश्चर्यच अधिक वाटले. दुसऱ्या एल्एल्. बी.चा अभ्यास मी अवघा नऊ-दहा महिनेच केला असता पास झालो, व दोन-तीन विषयांत मला मार्क चागले पडले होते.

शिक्षणक्रमांतील परीक्षासंबधाने मला एकदरीने असे वाटे की, दैव अनुकूल होते किंवा निदान प्रतिकूल नव्हते म्हणूनच माझ्या सर्व परीक्षा एकामागून एक पास होत गेल्या. आणि दैवाचे नाव आठवून ते घेण्याचे कारण इतकेच की, बहुधा कॉलेजच्या प्रत्येक परीक्षेत एकाद्या विषयात मला इतके थोडे मार्क मिळत की, एक-दोन कमी पडते तर माझे वर्षच फुकट जाते. पण या कामी दैवाला माझ्या-पेक्षां माझ्या वडिलांचीच काळजी अधिक म्हटली पाहिजे. कारण मला एकाददुसरा वेळ परीक्षेला धक्का बसला असता तर शिक्षणक्रम पुरा करण्याला त्यांना पैसा देतां आला नसता, व मग कंटाळून जाऊन मीहि कदाचित् शिक्षणक्रम सोडला असता.

कारण ज्यांना अभ्यासू म्हणतात तशा प्रकारची वृत्ति माझी कॉलेजात नसे. म्हणजे मी अभ्यासाचे विषय मुळीच वाचीत नसे असे नाही, पण पास होण्या-करितां त्याच्या आवृत्त्यावर आवृत्त्या व्हाव्या तशा मजकडून होत नसत. कांही काही पुस्तके तर मी कडेपर्यंत वाचलीहि नाहीत. एक उदाहरण असे की, बेकन हा विषय दुसऱ्या बी. ए त माझा कच्चा राहिल्याने मला परीक्षेपर्यंत एकसारखी त्याची दहशत बसली होती. आणि मौज ही की, अजूनहि शेचाळीस वर्षांनतर, ज्याला 'नाइट-मेअर' म्हणजे 'दुःस्वप्न' असे म्हणतात त्याच्यापैकी माझे एक दुःस्वप्न असे ठरून गेलें आहे की, बेकन हा विषय कच्चा राहिला, आतां मी बी. ए त पास होतो की न होतो ! असे स्वप्न मला अजूनहि एकादे वेळी पडते. कॉलेजात असता मला कोणी निर्बुद्ध म्हटले नाही हे खरे पण तरनरीत अशा विद्यार्थ्यात माझी कधी कोणीच गणना केली नाही हेहि खरे आहे. आणि म्हणूनच पुढील आयुष्य-क्रमांत पूर्वीच्या माझ्या बरोबरीच्या बहुतेक सोबत्यापेक्षां मी अधिक नांवारूपाला आलो ही गोष्ट सर्वांनाच मोठी आश्चर्याची वाटली. कांही स्नेही अजून म्हणतात की, "केळकर तुम्ही इतके पुढे सरसावाल असे आम्हाला तेव्हां स्वप्नांतहि वाटले नाही." पण त्यानाचसे काय, मला तरी तेव्हां तसे कोठे वाटले ! बरोबरीचे विद्यार्थी कोणी सेकंड क्लासात येतात, कोणी फर्स्ट क्लासांत येतात, कोणी बक्षीसे स्कॉलरशिपा मिळवितात, असे पाहून मी मनांत चूर होऊन जात असे. पण महत्त्वाकांक्षा बाळगली असता ती पार पाडण्याइतका आत्मविश्वास मजजवळ नव्हता. कोणीकडून तरी आपण पास होऊन गेलो म्हणजे आपले काम झाले, व ते काम मात्र बिनचूक होई येवढ्यावरच समाधान वाटे.

अवांतर पुस्तके मी तेव्हां फार वाचली असेहि म्हणतां येत नाही. वर्गा-तील अभ्यासाबरोबर इतर पुस्तके वाचण्याची हौस खरी. पण या अवांतर वाचनापेक्षांहि माझा वेळ खेळण्यांत व गप्पागोष्टी मारण्यात अधिक जाई. डेक्कन कॉलेजात मी एकच वर्ष होतो पण तेथील हवापाणी, खेळण्याची साधने, यांचा फायदा भरपूर घेण्याची मला एकप्रकारची हांवच उत्पन्न झाली होती. त्या-प्रमाणे टेनिस, क्रिकेट व बोटिंग या तिहींचाहि मी भरपूर फायदा घेतला. निदान टेनिस व बोटिंग केल्याशिवाय माझा बहुधा एकहि दिवस गेला नाही. शनिवारी तर सकाळी आठ वाजेपर्यंत क्रिकेट, नंतर नऊ साडेनऊपर्यंत टेनिस, त्यानंतर नदीवर पोहण्यास जाणे, आणि संध्याकाळी फिरून टेनिस व बोटिंग. अशा रीतीने

तो दिवस सर्व फुकट जाई व श्रम इतके होत की, रात्रीची झोप पुरी न पडून दिवसाहि ती घ्यावी लागे क्रिकेटच्या सामन्याच्या दिवसांत कॉलेजमधून युरोपियन जिमखान्यावर चालत येणे व सर्व दिवसभर सामना पाहून मध्याकाळी फिरून कॉलेजात जाणे ही गोष्ट नित्यक्रमाची होती तसेच नाटकांच्या दिवसात गावातील आर्यभूषण थिएटरांत चालत येऊन नाटक पाहून पुन. पहाटे कॉलेजांत परत चालत जाणे असाहि क्रम मधून मधून चालू असेच मात्र डेक्कन कॉलेजमध्ये असतांना मी तालीम अशी केव्हांच केली नाही. आणि इतके खेळून माझे शरीर खूप भरले किंवा सकस झाले असे नाही. कारण मेहनत होई ती जोर-बैठकांची न होता धावण्यापळण्याची अधिक होई. क्रिकेटच्या खेळातहि मला फील्डिंगचे काम म्हणजे चपळाईचे काम अधिक चांगले करता येत असे, याचे कारण शरीर पातळ असे. पण मीचसा काय, जोर-बैठका-कुस्ती अशा प्रकारची तालीम करणारे विद्यार्थी तेव्हा डेक्कन कॉलेजात दहापांचहि नव्हते.

खाण्यापिण्याच्या संबंधाने क्लबातील व्यवस्था तेव्हाच्या मानाने मितव्ययाची म्हणतां येईल. महिन्याचे बिल सुमारे दरमाणशी तेरा-चौदा रुपये येई पण तेच अधिक वाटे; व याच्याहि पुढे मजल एखाद्या सेक्रेटरीच्या कारकीर्दीत गेली की, त्याने दुर्लक्ष केले असा गवगवा होई क्लबातील मेजवान्याचे प्रमाण हल्लीपेक्षा पुष्कळच कमी होते, पण नेहमीचे जेवण चांगले सुग्रास असे. मधल्या वेळी खाण्याची पद्धति नव्हतीच म्हटले तरी चालेल. आणि चहाचा प्रचार मुळीच नव्हता. स्टोव्ह ही चीज तेव्हां आम्हाला माहीत नव्हती, म्हणजे खरोखर पाहिलेलीच नव्हती. यामुळे रोजचा चहा तर नाहीच. पण एखाद्या रविवारी आचारी गांवांतून जाऊन सामान खरेदी करून आणण्याला वेळ होई त्यामुळे दोन प्रहरच्या जेवणाला एक-दीडहि वाजे; म्हणून कधी कधी रविवारी सकाळी क्लबांत जाऊन मंडळी मौजेने आपल्याच हाताने चहा करून पीत. नित्याचा अवांतर खुराक म्हणजे ताजे दूध. सकाळी कॉलेजच्या बाहेरच्या अंगणात दहा-पांच मोठमोठ्या म्हशी आणून उभ्या केलेल्या असावयाच्या. गवळ्यांचे धार काढण्याचे काम सुरू असावयाचे. आणि खेळून घाम काढून झाला म्हणजे आपल्या गवळ्याकडे येऊन ताजे निरसें दूध प्यावयाचे हाच क्रम पुष्कळ विद्यार्थ्यांचा असे. त्या धारोष्ण व सकस दुधाच्या गोडीची आठवण जिभेला अजून होते.

अलीकडे कॉलेजच्या वसतिगृहांतून बहुधा प्रत्येक खोलीत सकाळ सध्याकाळ स्टोव्हवर चहा होतो. हल्ली विद्यार्थ्यांत विड्या ओढणारे कांही कांही असतात असे म्हणतात. पण त्या वेळी तसा एकहि विद्यार्थी सहसा आढळत नसे. राजवाडे यांच्यासारखा कदाचित् एकादा अपवाद असेल. मद्याच्या व्यसनाचा बोभाटा मात्र तुरळक व नैमित्तिक प्रसगाने ऐकू येई. हल्ली त्याविषयी काय स्थिति आहे माहीत नाही. पोषाखाच्या बाबतीत तेव्हा पुष्कळच साधेपणा होता. कोणी ऐट केलीच तर पायात बूट व डोक्याला मोठासा जरीचा रुमाल दिसे. पण कॉलर व नेकटॉय प्रायः दुर्मीळ असत. आम्ही डेक्कन कॉलेजात जाण्यापूर्वी वर्गात कोणता पोषाक घालून बसावे याची शिस्त नव्हती. यामुळे साधेपणाची अतिशयोक्ति करणारे व डोळ्याला वाईट दिसणारे असे पोषाक करून विद्यार्थी वर्गात जाऊन बसत असे म्हणत. आमच्या वेळी 'गाऊन'ची म्हणजे झग्याची पद्धत नवीनच अमलात आली होती. टोप्या किंवा रुमाल हे मात्र हवे तसे चालत. मी डेक्कन कॉलेजात जाण्यापूर्वी एक वर्ष आधी प्रो. सेल्बी प्रिन्सिपॉल झाले होते; व शिस्तीच्या कामी त्याचे लक्ष फार कडक असे. त्यानीच ही झग्याची पद्धति प्रथम प्रचारांत आणली.

झग्याच्या पद्धतीला मुलानी फारशी हरकत घेतली नाही. कारण कोणालाहि आपला गणवेष आवडत नाही असे होत नाही. गव्हर्नराला त्याचा डगला आवडतो. तसाच पट्टेवाल्याला त्याचा डगला आवडतो. फार काय क्षणभर अशी कल्पना केली की, पट्टेवाल्याचा डगला-पट्टा-बिल्ला, फक्त त्यावर 'गव्हर्नर' अशी अक्षरे लिहून, गव्हर्नराचा युनिफॉर्म, असे बादशाही हुकमाने ठरले तर गव्हर्नरालाहि तो पोषाख आवडूं लागेल काय तो आमचा झगा! नुसती झूल! बाजूचे लोबते हातोपे गळ्यांत नाहीत म्हणून अजागळ म्हणावयाचे नाहीत इतकेच. रामदासी झोळ्याप्रमाणे ते लोबते हात म्हणजे भिक्षेच्या पिशव्या वाटत. पण प्रथम झगा घालून विद्यार्थी वर्गात जाऊ लागतो तेव्हां विलायतेला न जातांना व बी. ए. परीक्षा पास न होताच त्याला 'मी ऑक्सफोर्ड केंब्रिजचा पदवीधरच जणू काही' असे वाटूं लागते. अगांत झगा नसतांना उघड्या व्हरांड्यातून एरवी आमच्या खेपा झाल्या असत्या त्यापेक्षां चार जास्तच खेपा झगा घातल्यानें होऊं लागल्या. प्रोफेसर व विद्यार्थी या नात्याने आमच्यामध्ये जे अंतर होतें किंवा असावे ते, "त्याच्या अगांत झगा आणि आमच्याहि अंगांत झगाच" या भावनेनें

झग्याच्या लांबीइतके तरी खचित कमी वाटूं लागले. कॉलेजमधील शिक्षणपद्धतीत 'गुरूने बोलावे व शिष्याने ऐकावे' असाच प्रायः नियम असल्यामुळे विद्यार्थ्यांचे अज्ञान फारसे बाहेर पडत नाही. यामुळे फजिती होत नाही इतकेच काय ते! हे झगे घालणारांपैकी काहींना 'काळ्या झुलीचे नदीबैल' हे नाव खरोखरच शोभले असते.

प्रि. सेल्बी याची शिक्षणपद्धति या गौप्यगोपनाला चांगली सोईची होती. कारण ते वर्गात येताच उभ्याने बोलण्यास जे एकदा सुरुवात करीत ते उभ्यानेच बरोबर तासभर बोलून परत जात. विद्यार्थ्यांना प्रश्न वगैरे विचारीत नसत. विद्वत्तेला विनय शोभा देतो. मग उभे राहून बोलण्याने त्या विनयात भर का पडू नये? कारण गुरूपुढे शिष्याने उभे रहावे त्याऐवजी येथे शिष्यापुढे गुरूच उभा राहून तासभर आपली जीभ शिणवी! कॉलेजातील अध्यापकाच्या जागेला 'चेअर' असे म्हणण्याचा परिपाठ आहे. पण प्रि. सेल्बी यांचे नर्तन पाहिले म्हणजे तिला 'प्लॅटफॉर्म' हेच नाव अधिक शोभेल. कारण खुर्चीला त्याचे बूड कधीच लागले नाही. सेल्बी साहेबाचे 'ध्यान' म्हटले म्हणजे एका हातांत पुस्तक व दुसरा हात विजारीच्या खिशांत! बिचारा विद्वान खरा पण पक्का रुक्ष. सबध वर्षांत त्यांच्या वर्गात एकदांहि कधी कोणाच्या तोंडावर हास्य उमटलेले कोणी पाहिले नाही. बर्क, बेकन, लॉजिक, फिलॉसफी, असले तात्विक विषय ते शिकवीत. अर्थात् त्यांत गंभीरपणा हवाच होता. पण गंभीरपणालाहि कांही सीमा आहेच की नाही? त्यांच्या शिकवण्यात मोजकेपणा इतका असे की यंदा बेकन शिकवितांना २० फेब्रुवारीला जो अध्याय त्यांनी वाचला तोच प्रायः पुढच्या वर्षीच्या २० फेब्रुवारी रोजी वर्गात ते वाचीत असलेले आढळावयाचे असे सांगतात! यंदां जी कोटी आयत्यावेळी केलेली म्हणून वाटावयाची तीच पुढच्या वर्षी फिरून आयत्यावेळची अशा झोकाने ते करावयाचे. परतु विद्यार्थ्यांची टिपणबुके मोठी चहाडखोर असतात त्याला काय करणार? सेल्बीसाहेबाच्या इतरहि एक दोन खोडी होत्या. त्यांचे अक्षर वाचावयास शिकण्याला नव्या विद्यार्थ्याला सहा महिने लागत. आणि त्याचे बोलणे उमजण्याला त्याला तीन महिने कसे तरी पुरत! मी डेक्कन कॉलेजांत गेलो तेव्हां ऐच्छिक विषय म्हणून लॉजिक व फिलॉसाफी (न्याय व तत्त्वज्ञान) हा विषय घेतला. या कॉलेजांत हा विषय न घेणे एक प्रकारचा कमीपणाच वाटे. ती एक प्रचलित फॅशन

होती ! पण आठ दिवस सेल्बी साहेबाची व्याख्याने ऐकून जेव्हां त्यांतले निम्मे आपणाला ऐकूंहि आले नाहीं असे मी पाहिले, तेव्हा गुरुजीच्या अस्पष्टोच्चार पद्धतीला दोष देण्याच्या भानगडींत न पडता स्वतःच्या कर्णेंद्रियाला दोष देत मी तो विषय सोडला, व 'इंग्रजी व संस्कृत' हा भाषाविषय घेतला. पण मी हा असा एकटाच नव्हतो. संस्कृत विषयाचा वर्ग डॉ. भांडारकर शिकवीत. तो प्रथम रोडका होता पण वरील कारणाने तो एक आठवड्यानंतर फुगलासे पाहून एक दिवस डॉक्टर साहेबांनी आपला चष्मा बाजूला ठेवून या चमत्काराची चिकित्सा आरंभिली. आयत्यावेळी सुचेल ते कारण ज्याने त्याने सांगितले. माझे खरे कारण सांगावयाचे म्हणजे सेल्बी साहेबाच्या उच्चाराना नांवे ठेवावयाची ! बरे, भाषाविषय आवडीचा म्हणावे तर 'तो प्रथमच का घेतला नाही ?' असा प्रश्न मागाहून यावयाचा. तेव्हा त्या भानगडींत न पडता आपणाकडे कमीपणा घेण्याच्या बुद्धीने म्हणालो, 'हा भाषाविषय लॉजिकपेक्षा अधिक सोपा वाटला म्हणून.' पण माझ्याकडे कमीपणा घेताना मी भांडारकरानाहि न कळून कमीपणा दिला ! कारण कमी अवघड विषय शिकवितो तो कमी विद्वान अशी एक प्रकारची तुलनाच मी केली नव्हे काय ? आणि खरोखरच भांडारकराना माझ्या उत्तराचा राग आला. पण तो ते बोलून कसा दाखविणार ? म्हणून ते 'हूं' असा नेहमीचा खोल उद्गारच काढून गप्प बसले. भांडारकरांच्या हुंकाराचे प्रकार अनेक असत. ते सर्व एकाच खोल भुयारांतून निघाल्याप्रमाणे गंभीर व भरीव असे यावयाचे. पण एकाच बांबूच्या नळकांड्यांतून सप्तसूर निघतात त्याप्रमाणे त्याच्या हुंकारातूनच राग, असमाधान, संमति, असंमति, निषेध इत्यादि प्रगट होत. भांडारकरांची जिव्हा जड होती. चपळ नव्हती. यामुळे ते हुंकाराचा उपयोगच पुष्कळसा करीत.

डॉ. सेल्बी हे पढीक व आपल्या परीने विद्वान होते. त्यांनी बेकन व बर्क यांच्या कांहीं पुस्तकांवर अर्थबोधक टिपणे चांगली दिली आहेत. परंतु त्या मनुष्यांत विनोद किंवा काव्यप्रतिभा काडीचीहि नव्हती. त्यांच्या आधीचे प्रिन्सिपॉल ऑक्झेनहॅम हे यांच्या अगदी उलट असत. ते गप्पीदास व चुकारतट्टू होते, पण ते इंग्रजी शिकवीत असतांना मुले तल्लीन होऊन जात. आमच्या वेळी इंग्रजी विषय शिकविण्याला बॅरेट या नांवाचे एक वृद्ध प्रोफेसर होते. ते 'लॅपीटर' नांवाच्या विलायतच्या कोन्याकोपऱ्यातल्या एका युनिव्हर्सिटीचे पदवीवर होते. म्हणून तिचे नांव घेऊन विद्यार्थ्यांनी खोदखोदून प्रश्न विचारला,

म्हणजे त्याना राग येत असे. विलायतेस पदवीच्या परीक्षेस पहिला येणाराला जशी ' निळी फीत ' ( ब्लू रिबन ) देतात त्याप्रमाणे सर्वांत शेवटी नंबर आलेल्या पदवीधराला थट्टेदाखल एक ' लाकडी चमचा ' ( वुडन स्पून ) देण्याची चाल असे. तो बॅरेटसाहेबाना मिळाला होता असा एक प्रवाद होता. पण त्याच्या युनिव्हर्सिटीविषयी अपमानसूचक प्रश्न विचारणाऱ्या मुलांची छाती या लाकडी चमच्याचा उल्लेख करण्याला होत नसे. साहेब मोठे रागीट व पोरकटहि असत. चिडविल्यामुळे एकदा ते गुडध्यात हात धरून चोळू लागले म्हणजे ते चोळणे सपता सपतच नसे आणि शेक्सपियरच्या मॅकबेथ नाटकात राणी आपल्या हातावरील रक्ताचे डाग कांही केल्या जात नाहीत या निराशेने हात चोळीत बसल्याचे आम्ही वाचले होते त्याची आठवण बॅरेटसाहेब करून देत. असे सागतात की याच्यापेक्षाहि अधिक नमुनेदार असे ऑलिव्हर नावाचे एक टाकाऊ प्रोफेसर डेक्कन कॉलेजात काही दिवस आले होते ते विद्यार्थ्यांना गभीरपणाने No has negative force here, take a note असे सागत असे म्हणतात तात्पर्य, इग्रज प्रोफेसराच्या हाताखाली इग्रजी वाङ्मय हा विषय शिकल्याने खरी वाङ्मयाची गोडी उत्पन्न झाली असे क्वचित् घडते. माझी तरी गोष्ट तशी झाली नाही. विद्यार्थी या नात्याने परिश्रमपूर्वक इग्रजीचा अभ्यास करावा तसा मी केला नाही. कोश धुडाळणे, प्रतिशब्द काढणे, नोटा घोकणे, ग्रथातील वाक्प्रचार व म्हणी टिपून ठेवणे अशा रीतींचा सूक्ष्म अभ्यास मी कधीच केला नाही. त्यामुळे माझा तोटाहि बराच झाला. परतु इग्रजी वाङ्मय वाचण्याची आवड फार; व त्यात शिरून रगून गोडी घेऊन वाचावयाचे अशी वृत्ति असल्यामुळेच मला जे काय इग्रजी लिहिता येत आहे ते आले. तीस वर्षे इग्रजी लिहिण्याचा धंदा केल्यावरहि आज व्याकरण, शब्दसिद्धि, वाक्यरचना, इत्यादि बाबतीत कदाचित् सामान्य पढीक विद्यार्थीहि माझ्याहून अधिक मार्क मिळवील. पण केवळ इग्रजी वाङ्मयाच्या आवडीमुळे मला सामान्यतः बऱ्या प्रतीचे इग्रजी लिहितां येऊ लागले; व तीच गोष्ट माझ्या आयुष्याला हल्लीचे वळण लागण्यास मूळ उपयोगी पडली.

सस्कृत भाषा हा विषय बराचसा डॉ. भांडारकर व कांही कॉलेजचे दोघे शास्त्री शिकवीत. भांडारकर हे विद्वान असले तरी शिक्षक या रीतीने त्यांची मोठीशी कीर्ति नव्हती. जीभ जड, भाषणांत अस्खलितपणा मुळीच नाही. सावकाश

वाक्य रचन बोलण्यासारखे बोलत, व बोलतांना भलत्या शब्दावर जोराचे धक्के देत. Thus हा शब्द कोठे आला म्हणजे त्याचा उच्चार 'धस्स' असा इतक्या मोठ्या आघाताने करीत की मुले म्हणत हा उच्चार ऐकून आपल्या पोटात 'धस्स' होते! संस्कृताचे इंग्रजी भाषांतर ते शब्दशः बरोबर करीत, पण त्यात गोडी येत नसे. विनोद हा तर माहीतच नाही. क्वचित् एकाद्या विद्यार्थ्यावर शंकेला उत्तर म्हणून डाफरून बोलत, पण खुसखुशीत थट्टा करून मुलांना हसविले किंवा त्यांचे दोष दाखविले असे कधी घडले नाही. मुलांकडून ते कांही कांही भाग वाचून घेत व प्रश्नोत्तरानेहि विषय शिकवीत. हे करितांना लांबचे पाहण्याचा चष्मा व पुस्तक वाचण्याचा चष्मा यांची अदलाबदल ते इतका वेळ करीत की मुलांना त्यांचे हसू येई. तथापि एकंदरीने भांडारकर हे रुबाबदार व त्यांच्या अंगी एक प्रकारचा स्वाभाविक भव्यपणा असे. शिवाय विद्यार्थ्यांच्या मनात त्यांच्याविषयी खरा आदरभावहि असे. मात्र प्रि. सेल्बी यांच्याशी वागतांना त्यांनी जितके स्वतंत्रबाण्याने वागावे अशी विद्यार्थ्यांची अपेक्षा तितके डॉक्टरसाहेब वागत नसत.

शास्त्र्यांपैकी वामनाचार्य झळकीकर हे काव्यप्रकाश शिकवीत. त्यांनी संस्कृत टीका लिहून काव्यप्रकाश हा एवढा मोठा ग्रंथ छापला होता, की तो विद्यार्थ्याला एका हाताने उचलणे जड वाटे! यामुळे त्यांच्या विद्वत्तेबद्दल मुलांना शंका नव्हती. पण त्यांचे तोंडी शिकविणे फारसे उद्बोधक नसे. भाषेत कानडी मराठी हेलाचे मिश्रण बरेच होई, व मराठीत समजून दिल्यानेच विद्यार्थ्यांस समजत नाही अशा बुद्धीने ते 'संस्कृतमाश्रित्य' बोलू लागत. मग काय पहावयासच नको! काव्यप्रकाशातील मुख्य विषय समजून देण्यावर जितका वेळ ते खर्च करीत त्यापेक्षा उदाहरणाच्या श्लोकाचे अर्थ करीत बसण्यातच ते अधिक वेळ गमावीत. अलंकार ग्रंथांत शृंगारविषयक श्लोक पुष्कळ. कांही कवी जिभेला हाड नसल्यासारखे लिहितात, आणि वामनशास्त्र्यांची तर त्यांच्याहिवर कडी! यामुळे कळून किंवा न कळून जोर न द्यावा त्या शब्दावर जोर देऊन व खुलासा करून श्लोकांचा अर्थ ते लावीत. तेव्हां चावट मुलांचे ऐतेच फावे व त्यांना नसत्या शंका सुचत. पण मुले कोणत्या अर्थाने शंका विचारतात याचा विचार गुरूंनी थोडा तरी करावा की नाही? पण ते कांही नाही. उलट अभद्र शब्द बोलतांना एखादे वेळी ते अप्रशस्त हस्तविक्षेपाहि करीत. शास्त्रीबुवांचा चेहरा कळकट. भाषा व शिक्षणपद्धतीहि अशीच. डोळे अर्धवट चिपडलेले, व तासापैकी अर्धा तास नाक कोरण्यात जावयाचा. या

सर्व कारणामुळे वामनशास्त्री हे गुरुजी नसून थट्टेचाच एक विषय बनले होते. दुसरे चिंतामणशास्त्री वरूडकर. हे शांकरभाष्य मराठीतून शिकवीत. या विषयाची मुले थोडी म्हणून ती शास्त्रीबुवांच्या खोलीतच जाऊन शिकत आणि शास्त्रीबुवाहि जाजमावर बसून शिकवितांना चंची सोडून तंबाकू खात बसत. बोलता बोलता एखाद्या विद्यार्थ्याने सहज चंची ओढून घेऊन सुपारीचे खांड तोंडात टाकावे असेहि घडे. पण विद्यार्थ्यांच्या ह्या खेळीमेळीचा राग न येता शास्त्रीबोवाना त्यात आनंदच वाटे. वामनशास्त्र्यांप्रमाणे चिंतामणशास्त्र्यात विद्वत्तेची धमकहि नव्हती. यामुळे 'चुकले' म्हटले तरी 'ठीक आहे' म्हणावे, अडले म्हणजे हसून भागवावे, म्हणजे एकंदरीने कोणीकडून तरी 'मला पदरात घ्या व भांडारकराकडे बोभाटा करू नका' अशा अर्थाचे त्यांचे केविलवाणे वर्तन असे.

प्रो. दस्तुर याच्याविषयी पूर्वी ओझरता उल्लेख केला तितकाच पुरे. कारण त्यांची प्रत्यक्ष माहिती होण्याचा योगच आला नाही. पण बिचारा गरीब निरुपद्रवी होता येवढे खरे. राहता राहिले प्रो. करकरे. बी. ए च्या वर्गात माझा गणिताशी कांहीच संबंध नव्हता. पण त्याच्या वर्गातले विद्यार्थी गोष्टी सांगत त्या ऐकून हंसू लोटे. करकरे हे लहानपणी अगदी गरीब असे एक विद्यार्थी होते कांही कारणाने त्यांच्यावळी पुण्यास डि. जज्जाचे जागेवर असलेल्या टक्कर साहेबाचे ( Tuckar ) त्यांच्याकडे लक्ष गेले, व त्यानी त्याना विलायतेस आपल्या खर्चाने नेऊन बॅरिस्टर करून परत पाठविले पण बॅरिस्टरीबरोबर केंब्रिज येथे गणिताचाहि काही अभ्यास त्यानी केला, यामुळे इकडे त्यांना प्रोफेसरीची जागा मिळाली. त्यांनी येण्यापूर्वी धर्मांतर केले होते. फक्त विलायतेत लग्न मात्र केले नाही! करकरे हे वकिली करण्याला पुरे नालायक होते. पण साधारण शिकविण्यापुरता गणित विषय त्याना येत असे. स्वभावाने गरीब, मनाने निष्कपटी, पण जवळ जवळ व्यवहारशून्य अशी ही व्यक्ति होती. यामुळे वर्गात किंवा वर्गाबाहेर विद्यार्थ्यांशी काय बोलावे, कसे बोलावे, याचा विधिनिषेध त्यांना नव्हता. त्याना स्वतःचा संसार असा कांहीच नसल्याने पगारांतून अनेक गरीब विद्यार्थ्यांना ते थोडथोडी मदत करीत, व कांही जण गरिबीचा बहाणा करून त्यांना लुबाडीतहि. कोणी चिडविले म्हणजे रागावण्याचा आवेश करतात न करतात तो प्रोफेसरसाहेब स्वतःच हंसू लागत, व अशा प्रेमळ रागांत त्यांनी दिलेल्या शिव्या मुलांना फुलांच्या आघाताप्रमाणे वाटत. करकरे हे आपली

योग्यता ओळखून सेल्बी व भांडारकर यांना भिऊन वागत, व प्रोफेसरांच्या खोलीपेक्षा एखाद्या आवडत्या विद्यार्थ्यांच्या खोलीतहि बसून ते अधिक वेळ गप्पा मारीत. 'सर' या शब्दाने बोलण्याला एकदा प्रारभ केला म्हणजे मग कोणी त्यांना काहीहि प्रश्न करावा. 'सर, सर, आपण लग्न का केले नाहीत ?' 'सर, सर, आपला वेळ घरी रिकामा कसा जातो ?' असले प्रश्नहि मुलानी विचारावे. आणि करकरे यांनी उत्तर म्हणून 'पहा, पहा, कसा हा मूर्ख आहे. आपल्या बापाला काय विचारतो !' असे म्हणून मोठमोठ्याने हसून त्यानी जवळच्या इतर विद्यार्थ्यांना थट्टेत ओढावे. मी एकदा तर असे पाहिले आहे की, इतर प्रोफेसर लोक गेल्यावर करकरे व्हराड्यांत एकटेच उभे आहेत असे पाहून कांही विद्यार्थ्यांनी त्यांचेजवळून मेजवानी उपटण्याचा कट केला, व भोवती घोळका करून त्याना रेटीत रेटीत औट हाऊसपर्यंत नेले. मग तेथे एकाने त्याचा आवडता विषय, लावणी व पोवाडे, हा काढला. दुसऱ्याने तिसऱ्यास लावण्या म्हणावयास लावले, व चौथ्याने स्वतः करकरे यांसच 'सर सर या लावणीची चाल कशी ती सागा हो !' असे म्हणून अखेर त्यानाच लावणी म्हणावयास लावले. झाले ! प्रोफेसरसाहेब रगले. मग मेजवानीचा बेत झाला, व दहावीस विद्यार्थ्यांनी व करकरे यांनी मिळून दोन तीन तास गुरुशिष्याचे नाते विसरून स्नेह्याप्रमाणे विनोद व मस्करी करीत घालविले. पण एकदरीने करकरे याच्याबद्दल विद्यार्थ्यांच्या मनांत प्रेम खरे. त्यांची वागणूकहि तशी होती मी पुढे पुण्यास येऊन राहिल्यावर खडकीच्या बाजूस गेलो म्हणजे त्यांच्या बगल्यांत त्यांना भेटे, आणि मग स्वतः आवडत्या गाईला हाका मारून बंगल्याशी आणून धार काढवून ताजे दूध प्यावयास दिल्याशिवाय ते मला जाऊच देत नसत. रस्त्यावर गाठ पडली तर बरोबर फिरावयास घेऊन जात. त्यांचे नेहमी भाषण म्हटले म्हणजे साहेब लोकांची स्तुति, निदान गुणग्रहण, आणि हिंदूसमाजावर प्रत्येक बाबतीत टीका. पण त्यांच्या बोलण्याचा राग असा कधी येत नसे. कारण खुद्द त्यांच्यावर व्यक्तिविषयक टीका करून कोणी बोलले तरीहि त्यांना राग येत नसे. ख्रिस्ती झाल्याबद्दल त्यांना मनांतून वाईट वाटे; व "ती गोष्ट घडली नसती तर पुण्यांतल्या एकाद्या पेठेत घर घेऊन मी राहिलो असतो" असे ते खेदाने केव्हां केव्हा म्हणत. लहानपणची आठवण होऊन देशी पद्धतीच्या अन्नावरहि त्यांची वांछा मधून मधून जाई, व गांवांत कोणी निमंत्रण दिले तर आनदाने जात व थाटाने पाटावर

बसून जेवीत. कोणी बरोबरीचा भेटला तर तो त्यांना गंध लावून गावठीसाहेब म्हणून थट्टा करी, पण या थट्टेने ते खरे रागावत नसत.

कॉलेजांतले दिवस हे जसे शिक्षण मिळविण्याच्या दृष्टीने त्याचप्रमाणे स्नेही जोडण्याच्या दृष्टीनेहि महत्त्वाचे असतात. युवक स्थितीचे वर्णनच लॉंग फेलो कवीने 'Each maid heroine, each man a friend' असे केले आहे. भावना प्रसन्न व ताजी असल्यामुळे असे सहजच होते. त्यांतूनहि कॉलेजच्या वसति-गृहांत समवयस्क तरुण मुले अष्टौप्रहर दोन तीन वर्षे एकत्र नांदत असल्यामुळे स्नेह जोडण्याला व वाढण्याला मदत मिळते. 'ददाति प्रति-गृण्हाति' इत्यादि स्नेह-लक्षण सिद्ध होण्याला येथे चांगलाच वाव असतो. रोज सहभोजन, रोज एकत्र हिंडणे फिरणे, रोज विचारविनिमय, रोज थट्टा मस्करी, आणि हे सर्व आयुष्यां-तल्या कोणत्या स्थितीत? तर नवी मते, नवी अभिरुचि, नवी ध्येये ही मनो-भूमीत मूळ धरीत असता. तात्पर्य सहानुभूति (वर्तमानपत्री भाषेच्या अर्थाने नव्हे तर यौगिक अर्थाने) उभयपक्षी खरी असल्याने बाळपणी स्नेही जोडले जातात ते विशेष प्रिय असतात व त्यांची मैत्री बहुधा जन्मभर टिकते.

आमच्या वेळी डेक्कन कॉलेजात क्रिकेट खेळणारा चांगला असा एकच कोणी नव्हता. एकादशाची टीम अगदी साधारण होती. पण तेव्हा पुण्यात किंवा इतर ठिकाणीहि कॉलेजच्या क्रिकेट टीम्स तयार नव्हत्या व परस्पर सामनेहि होत नव्हते. डेक्कन कॉलेजातील हल्लीचा क्रिकेट पॅव्हिलियनच काय पण साधारण गवत लावलेलें 'पिच' हि तेव्हां नव्हते. खडकाळ जमिनीत मध्येच जेवढी सपाट जागा होती तेवढ्यांतच सगळा खेळ, नेहमीचा किंवा सामन्याचाहि होई. आमच्या कॉलेजांत लॉन टेनिस खेळणारांत मात्र कांही मंडळी बरी होती. त्यांत गुंजीकर, जोग, वर्तक, गोविंदराव गाडगीळ, मेहेंदळे व निंबाळकर सरलष्कर हे होते. बोट क्लबामध्ये कांही मंडळी चांगली निष्णात होती. माझ्या पूर्वी दोन वर्षे शिरगावकर, बळवंतराव देशपांडे, रामभाऊ करंदीकर, भाजेकर वगैरे मंडळींनी युरोपियन बोट क्लबाशी सामना दिला होता.

आमच्याहि वेळी बोटी मोठ्या दोन व धाकट्या दोन इतक्याच होत्या. खेळ कोणताहि म्हटला तरी त्यांत मेहनतीने घाम निघणे हेच उद्दिष्ट असते हे खरे. तथापि खेळाखेळांतहि फरक आहे. आणि नदीवर होडी वल्हवीत जाणे यासारखी



केळकर हे विद्यार्थी म्हणून डेक्कन कॉलेजांत होते तेव्हां घेतलेले छायाचित्र बसलेल्या मुलांच्या रांगेत वाचकांच्या डावीकडून उजवीकडे नंबर ४ हे केळकर होत. ( पृ. १६० )

मौज मला तरी क्रिकेट व टेनिस यामध्ये कधीच वाटली नाही. नदीवरचा देखावा उत्तम. एकट्यानेच होडी नेली असतां स्वैरसचाराचे अनुपम सुख. सृष्टिशोभा नदीकाठी दुतर्फा पहात पहात जातांना केलेले श्रम लक्षांत येत नाहीत, व ते करीत असतां पाण्यावरचा वारा अगाला लागून आपोआप श्रमपरिहार किंचित तरी होतो. पाण्यावरून नाव घसरत जाताना उठणाऱ्या बारीक लाटा, वल्ही आडवी टाकून होडी थाबविली असता नदीच्या प्रवाहाने होडीला मिळणारी मंद गति, जोराने वल्ही मारीत असता अगावर उडणारे तुषार, या प्रत्येकाची मौज काही वेगळीच आहे. केवळ मेहनतीकरिता होड्या वल्हवीत जावयाचे तर नदीच्या मुख्य पात्रांतून मुळामुठेच्या सगमापर्यंत, किंवा पलीकडे एकट्या मुळा नदीतहि, जाण्याला हवा तितका वाव असे पण मेहनतीपेक्षा चैनीकरिता होडी वल्हवीत जावयाचे तर नदीच्या डाव्या अगाला बेटाजवळ व बेटानेच दुभगलेले लहान कालव्यासारखे दोन प्रवाह होतात ती जागा अधिक इष्ट वाटे. त्यांतल्या त्यात दोहोपैकी धाकट्या प्रवाहांत होडी नेऊन वल्ही टाकून बसल्यास होडी अगदीच निश्चळ राही आणि बसल्या बसल्या बेटावरील वृक्ष व वेली याची शोभा किती वेळ पहात बसले तरी पुरे होत नसे. भर उन्हांत देखील प्रवाहावर लोंबणाऱ्या झाडाच्या खाद्या व वेली याची मोठी छत्रीच डोक्यावर असल्यामुळे स्वतः सावलीत राहून नदीवरील उन्हाची शोभा पाहता येई एखादे वेळी होडीतून उतरून बेटावर गेले असता ऋतुमानाप्रमाणे पेरू व इतर फळे विकत घेऊन खावयास मिळत मी कोकण किनाऱ्याने बोटीवरून समुद्रप्रवास केला आहे तसाच विलायतचाहि जलप्रवास माझा दोनदा झाला आहे. आणि समुद्राची शोभा या प्रवासांत अनेक परीने पाहिली आहे परतु अशा प्रवासात एक प्रकारची भीति थोडीशी तरी मनाला वाटत असते शिवाय स्वाधीनता नाही. प्रवाशाला बदिवानासारखे वाटते. याच्या उलट स्वाधीनतेने पाण्यावर आपण सत्ता गाजवितो अशा प्रकारची एक भावना मनात असते, म्हणून या जलक्रीडेचा आनद कांही विशेष होय आमच्यावेळी कॉलेजात ब्रिज ब्रिझिक हे खेळ चालू नव्हते. पण कित्येक खोल्यातून सुट्टीच्या दिवसात इस्पिटाचे अड्डे चालू असत पण या खेळात मला केव्हाहि मौज वाटली नाही व मी त्यात निष्णातहि नव्हतो. करमणुकीच्या इतर प्रकारांत गप्पागोष्टी व हास्यविनोद यांचाच भरणा विशेष, आणि कॉलेजच्या बागेत विशेषतः चांदण्यारात्री गप्पांचे अड्डे बसले म्हणजे रात्र किती झाली हे

कोणी पहात नसे. त्यांतच कोणी गाणारा मिळाला म्हणजे मग अर्थातच विशेष मौज. या दोन्ही दृष्टीनी श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे अनेक केद्रांपैकी एक केद्र होऊन बसले होते. कारण कोटीबाजपणा व गायन विद्या हे दोनहि गुण त्यांच्या-जवळ चागले होते. आणि मी मौज अशी पाहिली की एखादा रुक्ष सोबतीहि मुद्दाम त्यांच्याजवळ येऊन बसे व त्यांना गाण्याचा आग्रह करी. त्यांच्या जोडीचा गाणारा कॉलेजांत दुसरा नव्हता. गर्दे ओक वगैरे दोन तीन किरकोळ मडळी होती.

बहुधा प्रत्येक कॉलेजांत नाटक करण्याची लाट केव्हांना केव्हां तरी येऊन जाते. डेक्कन कॉलेजांत पूर्वी विष्णुशास्त्री चिपळूणकराच्या वेळी 'वेणीसंहार' नाट-काचा प्रयोग झाला. त्यांत धाकट्या शास्त्रीबोवाबी धर्माची भूमिका घेतली होती. समोर वडील कृष्णशास्त्री नाटक पहावयास बसले असता, पांचव्या अकात विष्णु-शास्त्र्यांनी पितरांच्या नांवाने तिळांजली दिल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे! त्यानतर १८८५-८६ चे सुमारास 'मालती माधव' नाटकाचा प्रयोग करण्यात आला नतर पांच सहा वर्षे खड पडला होता. परतु १८९१ साली फर्ग्यूसन कॉलेजांतील विद्यार्थ्या-नी 'वेणीसहार' नाटक केले ते एक प्रकारे ईर्षेला कारण होऊन डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी त्याच साली बी. ए.ला लावलेले 'मृच्छकटिक' नाटक केले. डेक्कन कॉलेज व फर्ग्युसन कॉलेज यांमध्ये तेव्हां एक प्रकारची स्पर्धा होती. आम्ही डेक्कन कॉलेजांत म्हणून त्याचा अभिमान वाटे. सरकारी कॉलेज म्हणून त्याबद्दल तेव्हां कमीपणा वाटत नव्हता.

कॉलेजच्या विद्यार्थ्यांना नाटक करणे ही शिक्षकांना अभिमत असणाऱ्या किंवा असंमत नसणाऱ्या चैनीची किंवा खेळाची परम सीमा अशी वाटे. स्वतः डॉ. भांडारकरासारख्या पोक्त सभावित प्रोफेसरांनी या खेळाला समति दिल्यावर करकऱ्यांसारखे उछ्रू प्रोफेसर संमति देतील यात काय नवल? घरी लहान मुले सोंगे आणून खेळतात त्याप्रमाणे ही कॉलेजांतील मुले सोंगे घेऊन खेळतात इतकाच नाटकाचा अर्थ तेव्हां समजला जात असे, व अजूनहि समजला जातो. त्यांतूनहि तेव्हां संस्कृत नाटके करण्याची चाल असल्यामुळे या खेळाडूपणाला एक प्रकारचा प्रतिष्ठितपणा येत असे. गीर्वाणभाषेचा हजारो वर्षांचा मनावरील संस्कार कसा जाणार? नाटकांतली भाषणे पाठ करणे हे परिश्रमाचे काम. अर्थात् इतक्या परिश्रमाने केलेले काम कांही तरी उच्च हेतूनेंच केलेलें असणार! पालकां-

पैकीहि बहुतेक लोक या कामाला आपली संमति हौसेने देत. काव्य व गायन या कलांच्या बरोबरीने बसण्याचा नाट्यकलेचा मान अशा रीतीने सर्वांकडून मान्य केला गेल्यामुळें प्रतिबंध असा कोणाचाच नव्हता. पण आमच्या नाटकाच्या खेळाची जी व्यवस्थापक मंडळी होती त्यापैकी कांहीबद्दल कॉलेजात लोकमत चांगले नव्हतें म्हणून त्याच्यामुळे पर्यायाने या खेळालाहि विरोध होत असे. जवळ जवळ दोन पक्षच निर्माण झाले होते. आणि विरोधी पक्षात कॉलेजचे कांही फेलो वगैरे असल्याने त्यांचा विरोध जाणवे. कारण प्रि. सेल्बीजवळ या पक्षाचे वजन होते.

नाटकाच्या खेळांत विद्यार्थ्यांचा वेळ मात्र फार जातो यांत शंका नाही. पण खेळांत गमावलेल्या वेळेला मोल कसले ? शिवाय नाटक-प्रयोग पहिल्या सहामाहीत केला होता. आणि पहिली सहामाही ही हक्काने खेळण्याची व दुसरी सहामाही ही अभ्यासाची अशी सर्वांची समजूत असे. सामान्यपणे पास होऊन जाणे एवढीच ज्यांची महत्वाकांक्षा त्यांच्या दृष्टीने हे खरेहि असते. कारण एक वर्षाचा अभ्यास येवढ्या कार्यापुरता सहा महिन्यांत होऊ शकतो. पण जे विद्यार्थी वरच्या वर्गात येण्याची किंवा बक्षीसे मिळविण्याची इच्छा धरीत ते मात्र तसें मानीत नसत. आणि इकडे वरकरणी नाटकात सामील असल्याचे दाखवीत असतां त्याचे खरे लक्ष आपल्या अभ्यासाकडे असे.

‘मृच्छकटिक’ नाटक हे नाट्यकलेच्या दृष्टीने सर्व संस्कृत नाटकांत श्रेष्ठ आहे असे मला वाटते. त्यांत देवदानव असली भानगड कांही नाही. एका विशिष्ट काळी या देशात खरोखरच असेल अशा सामाजिक स्थितीचें त्यांत वर्णन आहे. अस्वाभाविक असे फारसे काही नाही. स्वभाववैचित्र्य पुष्कळ असून प्रत्येक पात्राचा स्वभाव फारच उठावदार रीतीनें रंगविलेला आहे. ग्राम्य व उदात्त हे स्वभावगुण कसे अगदी खांद्याला खांदा भिडवून चाललेले या नाटकांत आढळतात. तथापि त्याची गल्लत कधी होत नाही, व ग्राम्याच्या निकटवर्तित्वामुळे उदात्ताला कोठेहि कमीपणा येत नाही. एकाच रस्त्याने गर्दीत ग्राम्य व सभ्य मनुष्ये जात येत असतात, पण या गर्दीतहि ग्राम्य तो ग्राम्यच व संभावित तो संभावितच राहतो. त्याप्रमाणे या नाटकांतील पात्रांची स्थिति आहे. हास्यरस भरपूर व मार्मिक. आणि एखाद्या लहानशा वाक्याने एखादे मोठे तत्त्व किंवा स्वभावाची लकब दाखवून झोकानें निसटून जाण्याची

हातोटी या ग्रथकाराला फार चांगली साधलेली आहे. खादाड विदूषकाच्या पात्रा-शिवाय जुन्या सस्कृत नाटकांत व यांत साम्य असे काहीच नाही. शिवाय मौज ही की, वसंतसेनेसारखी केवळ गणिका ही नायिका कल्पूनहि नाटकाची रचना अशी केली आहे की, नायक व नायिका याच्या असमत स्नेहसंबधामुळे त्याच्या-विषयी अवमानबुद्धि कोठेहि वाचकांच्या मनांत उत्पन्न होत नाही. तात्पर्य, मनुष्यव्यवहारांत शिरूनहि कथानकाचे अद्भुतत्व नाटककाराने मोठ्या चातुर्याने सांभाळलेले आहे.

सस्कृत नाटकात श्लोक असतात म्हणून नाटक सगीत करावे किंवा गद्य करावे असा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हा बऱ्या प्रतीचा गळा असणारे तीनचार विद्यार्थी या नाटकांत काम करण्यास तयार असल्याने नाटक सगीत करावयाचे ठरले मात्र तालावर गाईल असा त्यापैकी कोणी नसल्याने, श्लोकाना चाली लावन ते गावयाचे पण तबला लावावयाचा नाही असेहि ठरले. सर्व गाणारे पुरुषपार्टी होते पण ज्यांच्याशी आम्ही सामना देणार त्या फर्ग्युसन कॉलेजच्या 'वेणीसहार' नाटक करणाऱ्या मडळीतहि बरोबर हीच उणीव होती मग आम्हाला भिण्याचे काय कारण ?

'मृच्छकटिक' नाटकात पात्रे पुष्कळ असली तरी तितका भरणा कॉलेजच्या विद्यार्थ्यातून होण्यासारखा होता. येऊन जाऊन स्त्रीपार्ट घेणाऱ्या विद्यार्थ्याचाच तुटवडा असावयाचा. पण कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी स्त्रीभूमिका घेतल्यास ती बरोबर साधली की नाही हे प्रेक्षक फार कसोशीने पहात नाहीत भूमिका यशस्वी करण्याच्या कामात शभर खून त्याना माफ असतात ! या नाटकात पाच स्त्रीपात्रे आहेत. पण त्यापैकी फक्त वसंतसेनेचीच तेवढी भूमिका सराइतासारखी झाली. ती भूमिका घेणारा गडी हा जात्या या कामातला हौशी होता त्याचे नाव कट्टी. पण बाकीच्या भूमिका करणारे आम्ही लोक म्हणजे मी, शेवडे, दातार व महाजनी हे ठोब्ये होतो असे म्हटले तरी चालेल. बिनहौशी लोकाना स्त्रियाची भूमिका करा म्हणणे हा एक प्रकारचा जुलमच असतो, व तो केवळ प्रयोगाची गरज म्हणूनच करावा लागतो. तथापि या जुलमाची जाणीव असल्यामुळे, नाटकाच्या चळवळीच्या कांही पुढाऱ्यांनी, त्याच्याकडे कसलीच भूमिका नसताहि, सहानुभूति व्यक्त करण्याकरितां स्वतःच्या मिशा काढून प्रयोगाच्या चळवळीच्या अवधीपर्यंत आपणाकडे कमीपणा घेण्याचे कबूल केले होते. यामुळेच स्त्रीपार्टाची भरती झाली.

आमच्या वेळी हल्लीप्रमाणे तरुण मुलानी मिशा काढणे व नित्य क्षौर करणे या गोष्टी रूढिसंमत झालेल्या नसल्यामुळे, आणि क्षौराची बातमी घरी कळल्यास स्त्रीपार्ट घेतल्यापेक्षां क्षौराकरितां घरच्या मनुष्याचा राग अधिक होण्याचा तेव्हां संभव असल्यामुळे, विनाकारण क्षौर करणे व स्त्रीपार्ट घेण्यास कबल होणे या गोष्टी परस्पर फिटासफिटीच्या व मोबदल्याच्या अशा ठरल्या. आणि या सर्वच गोष्टी आपण केवळ कॉलेजच्या यशाखातर व मौजेखातर करतो अशी सर्वांचीच भावना असल्यामुळे कोणी कोणाचा पार्ट केला याकडे कोणी लक्ष दिले नाही. तर प्रयोगाची गरज भागली की नाही याकडेच सर्वांनी लक्ष दिले. मी स्वतः नटी, मदनिका, व कुभीलक अशा तीन भूमिका केल्या

असो, अशा रीतीने काही खेळत काही अभ्यास करीत मी १८९१ हे वर्ष डेक्कन कॉलेजात सपविले आणि त्याच साली बी ए ची परीक्षा पास झालो. परीक्षेच्या निकालाची तार सध्याकाळी हाती आली तेव्हा पुढचा विचार सुरू झाला व त्या विचारात सगळी रात्र मी जागून काढली पुढे मार्ग तीन. १ एम्.ए. होणे. २ एल्एल्. बी कडे जाणे. ३ नोकरी धरणे. वडिलाचा विचार मी नोकरी धरावी असा होता परतु वडीलबधु नाना यानी मी एलएल्. बी कडे जावे असा आग्रह धरिला एम् ए कडे जा असे ते म्हणते तर मी आनदाने गेलो असतो. परंतु वकिली करावयाची तर बी. ए. होऊन काय एम्. ए. होऊन काय दोन्ही सारखीच. फुकट आणखी दोन वर्षे का घालवा व खर्च कां करा? या विचाराने नानानी एम्. ए. कडे जाणे पसत केले नाही. माझ्या बरोबरचे डेक्कन कॉलेजमधील सहाध्यायी सर्व एल्एल्. बी. कडेच जाणारे निघाले. मोरोपत दामले याना डेक्कन कॉलेजात फेलोशिप मिळाली म्हणून ते मात्र एम्. ए. च्या अभ्यासाकडे झुकले.

**लॉ कॉलेज**—१८९२ साली एल्एल्. बी.च्या अभ्यासाकरितां मी मुंबईस गेलो. डेक्कन कॉलेजातील माझे काही स्नेहीहि त्याच कार्यक्रमाकरितां मुबईस आले होते. निरनिराळ्या ठिकाणी खोल्या घेऊन खाणावळीत जेवण्यापेक्षां एकत्र क्लब करून राहावे ही कल्पना आम्हाला अधिक पसत पडली. त्याप्रमाणे गिरगावात डॉ. भालचद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या बंगल्याला लागून दिवाडकर नांवाच्या गृहस्थांची एक छोटी बंगली होती. ती १०।५ असामींनी मिळून भाड्याने घेऊन आम्ही क्लब केला म्हणजे स्वतःचा आचारी ठेऊन जेवणाखाण्याची व्यवस्था केली.

ही व्यवस्था पुढेहि मधून मधून आम्ही राहावयाची जागा बदलली तरी चालू राहिली. १८९२ व १८९३ या दोन सालांत मिळन आम्ही आणखी दोन ठिकाणी क्लब केले. एक शेणव्यांच्या आळीतील गणपतराव किर्लोस्कर, हायकोर्ट वकील, यांचे घर व दुसरा मगळदास नथूभाई यांची चाळ. निरनिराळ्या वेळी मिळून आमच्या क्लबांत खालील गृहस्थ होते असे स्मरते. १ श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, २ निळकठ वामन कोल्हटकर, ३ भास्कर रामचद्र नानल, ४ सखाराम विनायक बाकरे, ५ केशव गोविंद दामले, ६ बळवत बाबाजी देशपांडे, ७ रामभाऊ करंदीकर, ८ काकासाहेब महाजनी, ९ शिवराम कृष्ण सोहनी, १० विठ्ठलराव तारे.

यांपैकी काही गृहस्थ आज निवर्तले आहेत. पण त्यावेळचे बहुतेक लोक पुढे नावारूपाला येणार अशी त्यावेळी एकमेकाची अपेक्षा होती व ती पुष्कळ अशी खरीहि ठरली फक्त अपवादात्मक आणि तीहि उलट सुलट अशी दोनच उदाहरणे घडली पैकी एक बाकरे याचे व दुसरे स्वतः माझे. बाकरे हे अत्यत हुषार विद्यार्थी पण दैवयोगाने एल्एल् बी हि न होता सावतवाडी सस्थानात जाऊन पडले. ते शेवटी फक्त तेथील हायस्कूलचे हेडमास्तर झाले ! उलट मी एल्एल्. बी. तर झालोच पण वकिली सोडून केसरी-मराठा सारख्या पत्राचा सपादक झालो, ते काम अनेक वर्षे अखड करू शकलो, त्या कामात यश सपादले, ते काम करीत असता अनेक प्रकारचे वाङ्मयविषयक ग्रंथ लिहून साहित्यिक या नात्याने बरेच नाव कमावले, आणि एका विवक्षित पक्षाचे राजकारण बरीच वर्षे करून अखेर महाराष्ट्राचे पुढारीपण मिळविले. एवढेच नव्हे तर हिदुस्थानच्या इतर प्रातातूनहि थोडीबहुत मान्यता मिळविली. व्यक्तिशः आणि सार्वजनिक दृष्ट्या हे जे बहुमानास्पद स्थान मला मिळाले, त्याविषयी माझ्याबरोबरीच्या व माझ्या पिढीतल्या इतर अनेक लोकाना मोठे आश्चर्य वाटते. कारण विद्यार्थीदशेत मी कोणत्याहि प्रकारचा नावलौकिक मिळविला नव्हता.

पहिल्या एल्एल्. बी.ची परीक्षा एक वर्ष नापास झाल्यामुळे दुसऱ्या वर्षी मी पहिल्या क्लासात उत्तीर्ण झालो. पण दुसऱ्या एल्एल्. बी. च्या परीक्षेत मार्कांच्या हिशेबाने मी दुसऱ्या क्लासातच आलो. कारण एल्एल्. बी. च्या परिक्षेत तिसरा क्लासच नाही. पास होणाऱ्या सर्वांना दुसऱ्या क्लासाचेच मार्क

मिळवावे लागतात. पण प्रीव्हिएस, फर्स्ट बी. ए., सेकंड बी. ए. या तिनीहि परीक्षांत मी फक्त तिसऱ्या क्लासांत आलो, आणि मॅट्रिक्युलेशन परीक्षेत तर माझा नंबर चौथ्या पांचव्या शेकड्यांत आला होता! कॉलेजमधील टर्मिनल परीक्षांमध्येदेखील मला एकहि स्कॉलरशिप मिळाली नव्हती. तात्पर्य एक मध्यम बुद्धीचा विद्यार्थी, पण परीक्षांतून हटकून पास होत जाणारा विद्यार्थी, इतकीच माझी योग्यता माझ्या सहाध्यायी लोकांना मजविषयी तेव्हा वाटत होती. म्हणून पुढे मी इतका नावारूपाला आलो याचे त्या लोकांना आश्चर्य का न वाटावे? पण त्यांनांच काय ! माझे मलाहि याविषयी आश्चर्यच वाटते. माझ्या क्लबात, माझ्या कॉलेजांत, व एकदरीने युनिव्हर्सिटीत माझ्यापेक्षा बुद्धीने अभ्यासाने श्रेष्ठ असे कितीतरी विद्यार्थी तेव्हां होते. कोणी पहिल्या दुसऱ्या क्लासात हटकून येत. कोणी बक्षीसे व शिष्यवृत्त्या मिळवीत. कोणी फेलो होत. हा फरक तेव्हाच्या सहाध्यायी विद्यार्थ्यांतच होता असे नव्हे, तर आज मी वावरतो त्या समाजातहि आहेच. म्हणजे माझ्याहून अधिक बुद्धिवान लोक मी पाहतो. पण वर्तमानपत्राचे संपादकत्व आणि राजकारण ही स्थानेच अशी आहेत की, तेथे तदुपयोगी गुण अंगी असलेला मनुष्य सतत एकनिष्ठेने काम करील तर तो इतरापेक्षां मूठभर अधिक उंचच दिसावयाचा ! इतर उद्योगांतहि त्या त्या मानाने त्यातले म्हणून श्रेष्ठत्व असते ते काहींना लाभतेच. पण सुदैवाने मला मिळालेले स्थानच असे होते की, अंगी एकपट गुण असला तर तो पांचपट उठून व खुलून दिसावा. आता माझ्या संबधाने कदाचित असेहि म्हणता येईल की 'काही गुण सोन्याचा तर काही सोनाराचा' या म्हणीप्रमाणे, माझ्या यशाचा काही वाटा मला मिळालेल्या विशेष अनुकूल परिस्थितीला असेल, तर कांही वांटा त्या परिस्थितीचा चागला उपयोग करून घेणाऱ्या मला असेल. तथापि केवळ बुद्धिमत्ता, कर्तृत्व, व्यवहारचातुर्य यांच्या दृष्टीने पाहता मी बरोबरीच्या इतर लोकाहून श्रेष्ठ किंवा अलौकिक ठरणार नाही.

मुबईतील या वेळच्या जीवनासबंधाने माझे स्नेही रा. श्री. कृ. कोल्हटकर यांनी केळकर ग्रंथाकरितां लिहिलेली आठवण या खाली देतो. ती अशीः—

"मी डेक्कन कॉलेजमध्ये प्रीव्हियसच्या वर्गात असताना, श्री. न. चिं. केळकर, हे फर्ग्युसन कॉलेजमधून आमच्या क्लबांत एक-दोन वेळा जेवावयाला आले होते. त्या वेळी मी त्याचा परिचय करून घेतला. तेव्हा ते अतिशय मोहक, सतेज

आणि तरतरीत दिसत असत. त्यानंतर दोन वर्षांनी ते आमच्या कॉलेजात शिकण्यासाठी बी. ए.च्या वर्गात आले. त्या वर्षी कॉलेजमध्ये झालेल्या 'मृच्छकटिक' नाटकाच्या संस्कृत प्रयोगांत आम्ही दोघांनीहि कामे केली होती. बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर आम्ही दोघे वकिलीच्या अभ्यासासाठी मुंबईस गेलो; व तेथे इतर मंडळीसह क्लब करून राहिलो. त्या वेळची एक मोठी गमतीदार गोष्ट मला अजून आठवते; ती अशी की, दुसऱ्या एलएल. बी च्या परीक्षेच्या वेळी एक्झॅमिनेशन हॉलच्या बाहेर केळकर पुस्तके चाळीत होते. ते मला म्हणाले, "कोणते प्रश्न येतील, हे मी तुम्हांला सांगतो त्यांची उत्तरं तुम्ही नीट वाचून ठेवा. माझा आजपर्यंतचा अनुभव असा आहे की, दैव मला नेहमी अनुकूल असते; व मी जी पुस्तके वाचतो, त्यांतूनच नेहमी प्रश्न येतात —" पण मी पुस्तके कधीच चाळलेली नसल्यामुळे त्यांच्या या सूचनेचा मला कांहीच उपयोग झाला नाही. मात्र दैवयोग असा की, त्यांनी अंदाज केल्याप्रमाणेच प्रश्न आले. या परीक्षेच्याच काय, पण इतरहि सर्व बाबतींत त्यांचे, 'मी दैववान् आहे,' हे उद्गार खरे ठरलेले आहेत."

"क्लबमध्ये असतांना केळकरांच्या स्वभावाचा एक विशेष नेहमी दृष्टोत्पत्तीस येत असे. आम्हां विद्यार्थ्यांचे सदोदित कांहीना कांही तरी वादविवाद चालत असत. ते निकरावर येण्याच्या सुमारास श्री केळकर हे तिथे यावयाचे; व वादविवाद कशाबद्दल होता त्याची चौकशी करून, दोन पक्षांत तडजोड सुचविण्याचा प्रयत्न करावयाचे तेव्हां साहजिकच दोन्ही पक्ष त्यांच्यावर तुटून पडत. ही तडजोडीची प्रवृत्ति म्हणजे त्यांच्या एकंदर जीवनाची गुरुकिल्लीच होय. तसेच, त्यांची उद्योगशीलताहि त्या वेळी दिसून येत असे. ती अशी की, आम्ही इतर विद्यार्थी जेवणानंतर सुस्त होऊन झोपी जात असू, तेव्हां ते कांहीना कांही तरी लिहीत बसलेले असावयाचे या वेळची आणखीहि एक आठवण देण्यासारखी आहे. ती ही की, केळकर हे या वेळी सर वॉल्टर स्कॉट यांच्या 'रोकबी' नामक काव्याचे मराठी गद्य रूपांतर करीत होते. त्यांतील कांही पद्यांचे भाषांतर मी करून द्यावे, अशी इच्छा त्यांनी प्रगट केली होती. ती गोष्ट मी आळसामुळे चालढकलीवर टाकल्याकारणाने, पुढे स्वतः त्यांनीच त्यांतील एका पद्यांचे भाषांतर करून मला दाखविले त्यांच्या काव्यरचनेचा हा 'ओ ना मा'च होता, असे म्हटले तरी चालेल. क्लबांत असतांना पारशी व गुजराथी

नाटके पाहण्याचा आम्हाला बराच नाद होता त्याच वेळी मी माझे 'वीरतनय' नाटक लिहीत होतो. त्या कामी केळकरानी मला बरेच उत्तेजन दिले. टीका-लेखनाच्या बाबतीत तर त्याचे मला विशेष उत्तेजन असे."

असो. आमच्या मुंबईच्या क्लबांत अभ्यासापेक्षां वादच अधिक होत. १८९२ च्या प्रारंभी पुण्याच्या 'केसरी' व 'सुधारक' या पत्रांत कडाक्याची वाग्युद्धे सुरू होती. मुबईच्या आमच्या क्लबांत कांहीजण टिळकांचे कट्टे अभिमानी, तर कांही-जण आगरकरांचे कट्टे अभिमानी असत पण कोणाहि एका व्यक्तीचा, त्याला कायमचा कौल दिल्याप्रमाणे, अभिमान धरू नये—म्हणजे आपल्या विवेकबुद्धीला पटेल असे तो वागेल तेव्हा त्याला बरे म्हणावे आणि न पटेल असे तो वागेल तेव्हां त्याला वाईट म्हणावे—ही माझी वृत्ति आजची नसून विद्यार्थीदशेपासूनची आहे. यामुळे टिळक आगरकराना उद्देशून आमच्या क्लबांत वाद होत तेव्हां मी काही गोष्टी टिळकांच्या बऱ्या म्हणणारा तर कांही गोष्टी आगरकरांच्या बऱ्या म्हणणारा असे दिसून पडे. पण या दोघांचीहि एक गोष्ट खरोखरच वाईट असे मला निश्चितपणे वाटे. ती म्हटली म्हणजे 'केसरी' व 'सुधारक' या पत्रांतून एकमेकाना होणारी शिवीगाळ. या विषयावर मी पुण्यातील 'ज्ञानप्रकाशा'ला तेव्हां लिहिलेले एक पत्र माझ्या सग्रही आहे ते याखाली मुद्दाम देतो. आणि त्यावरून मनुष्याचा स्वभाव सहसा बदलत नाही, निदान माझ्या आजच्या स्वभावाला फार पूर्वीची परपरा आहे, हे अनुमान वाचक सहज काढू शकतील. मी 'ज्ञानप्रकाशा'ला पत्र पाठविले ते असेः—

रा. रा. 'ज्ञानप्रकाश'कर्ते यांस—

"आपला व माझा परिचय नाही. भेटीचा हा प्रथमच प्रसग. त्यांतून ज्या विषयावर मी चार ओळी लिहून धाडीत आहे. तो आपल्याच दोघां व्यवसायबंधू-वर टीकारूप असल्याने अप्रशस्त, व कदाचित् आपणांस अप्रिय व न रुचेसा असेल. तथापि खालील टीका करण्यामध्ये माझे हेतु कुत्सित किंवा द्वेषभावाचे नाहीत. आणि माझे म्हणणे जनमताने पुष्कळ अंशाने खरे ठरून, आजपर्यंत चालत आलेला अनिष्ट खेदकारक व असभ्य प्रकार इतउत्तर बंद व्हावा, एवढीच माझी इच्छा आहे.

"आपले पुण्यपत्तन फार जुने शहर आहे, व एका वेळी ते आपल्या ब्राह्मण-शाहीचे राजधानीचे शहर असल्याकारणाने, त्या ठिकाणी हरतऱ्हेच्या सामाजिक व राजकीय घडामोडी झाल्या आहेत. आणि अलीकडे जरी इंग्रजशाही जाहली आहे, तथापि सामाजिक व राजकीय घडामोडींचे आदिपीठ या नात्याने पुणे शहराने आपला बाणा आजमितीस चालविला आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. आपले शहर अवघ्या महाराष्ट्रांत सर्व गोष्टींमध्ये पुढारी व सुधारलेले आहे. अवघ्या महाराष्ट्ररूपी शरीराला, निरनिराळ्या कल्पना व विचार उत्पन्न करणारा पुणे हा मेंदूच आहे असे म्हटले असता शोभण्यासारखे आहे. सर्व महाराष्ट्रात, फार काय मुंबई इलाख्यांत, प्रसिद्ध होणाऱ्या वर्तमानपत्रांपैकी बहुतेक पत्रे पुण्यास निघतात ही गोष्ट निर्विवाद आहे. वादग्रस्त गोष्टींवर उहापोह करण्याची पुणेकरास सवय आहे, व निरनिराळ्या मताचे उभय पक्षीय लोक येथे बहुत असल्याकारणाने आज-पर्यंत पुष्कळ विषयाचा उहापोह व सयुक्तिक निर्णय होऊन खुद्द पुण्याचे पाऊल पुढे पडत चालले आहे. तथापि पुण्याच्या वातावरणातच असा काही एक बलाढ्य दोष आहे की, तो एवढ्या गुणसन्निपातामध्येदेखील नाहीसा होत नाही. हा दोष विषम मताच्या लोकानी परस्पराची नालस्ती व उघड द्वेष करण्याची सवय हा होय.

"आता हा दोष इतर ठिकाणी आढळत नाही असे नाही कारण महत्त्वाच्या विवक्षित मुद्यावर मतभेद झाला असता आपल्या विरुद्ध मतांचे अवलंबन व मंडन करणारा कोणीहि असो, त्याजविषयी आपल्या मनाची समता अढळ न राहून बुद्धि यत्किंचित् तरी सदोष होते, हा सृष्टीचा नियमच आहे तथापि हा दोष सध्या पुण्यामध्ये जितक्या भयंकर परिमाणाने विद्यमान आहे तितके परिमाण इतर कोठेहि पाहण्यास सापडणार नाही, असे विधान केल्यावांचून माझ्याने राहवत नाही. या माझ्या साहसी विधानाबद्दल पुणेकरानी मला माफी करावी.

"आता हा दोष केवळ गावातील क्षुल्लक व हलक्या प्रतीच्या लोकांच्या अंगी असता तर ती क्षम्य गोष्ट होती. पण आपल्या शहरांतील प्रमुख व शिष्ट सन्मान्य अशी वर्तमानपत्रे सुद्धा या दोषापासून मुक्त नाहीत. एवढेच नव्हे, तर या बाबतीत त्यानी ग्राम्य लोकावरहि ताण केलेली आहे. ही कुरकुर आजच व माझ्याच तोंडून बाहेर निघत आहे अशातला प्रकार नाही. कारण आज पुष्कळ वर्षे, व त्यातूनहि सालगुदस्तपासून, अशा तऱ्हेचा ठपका पुष्कळ निःपक्षपाती वाचकांच्या

मुखांतून निघालेला मी ऐकला आहे. सर्व लोक आपापल्या ठिकाणी सध्यां चाल-लेला प्रकार पाहून आश्चर्य व खेद करितात. तो आज बंद होईल, उद्या त्याला खळ पडेल, अशी आशा धरून बसतात. तथापि परपक्षाच्या अगदी बारिक-सारीक छिद्रे देखील आपल्या दुर्बिणीप्रमाणे तीक्ष्ण व केवळ निरीक्षणदृष्टीने रोखून, आपल्या कुत्सित व असभ्य अशा शब्दांनी परस्परावर भडिमार करण्यास टपून बसलेल्या एका पत्रद्वयास क्षुल्लक कारणावरूनहि कुरापती काढून नवीन नवीन संधि सापडूं लागल्या आहेत. व अनायासाने मिळालेल्या अशा संधीचा फायदा घेण्यास ही पत्रे सदा तत्पर असल्याने, हल्लीच्या त्यांच्या अनिष्ट आचरणास खळ पडेल याबद्दल माझी तर पक्की निराशा झाली आहे.

"वर्तमानपत्राचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे देशांतील सुशिक्षित समंजस व अनुभविक पुरुषांची मतें तरुण व अज्ञ लोकांस समजावून देऊन सामाजिक, नैतिक, राजकीय वगैरे विषयांवर निबंध लिहून, व यासंबंधी उपयुक्त माहिती प्रसिद्ध करून, लोकजागृति करणे हा होय ही व्याख्या लावून पाहिली असतां आपल्या इकडील बहुतेक वर्तमानपत्रे या कसोटीस टिकणार नाहीत. कारण काही पत्राखेरीज चटसारी अशिक्षित अज्ञ व कोत्या लोकांच्या हातून चालत आहेत. वर्तमानपत्रे ही एक मोठी सामाजिक शक्ति आहे. परंतु तीच अविद्वान् लोकांच्या हाती असल्यास नाशकारक व अपायकारक मात्र होते. अशा अप्रबुद्ध प्रकाशकाकडून चालविलेल्या पत्रांच्या दोषपरंपरेपैकी प्रस्तुत प्रमुख दोष म्हटला म्हणजे हा की, मत्सरबुद्धीने अल्पस्वल्प कुरापत काढून आपल्या व्यवसायबंधूवर कुत्सित व टोचणाऱ्या शब्दांचा प्रहार करणे हा होय. तीक्ष्ण शस्त्र अर्भकाचे हाती लागले असतां ते जसे हाती सापडेल त्या वस्तूवर चालविण्याची त्याच्या हातास रग सुटते, त्याप्रमाणे लेखणी चालविण्याच्या भरात हे पत्रकर्ते काळवेळ, युक्तायुक्तता, सभ्यासभ्यता यांचा काहीच विचार न करता, केवळ खाजगी वैरभाव व मत्सर यामुळे सूड घेण्याची घातक हौस पुरी करून घेतात. क्षुद्र लोकांप्रमाणेच क्षुद्र पत्रकारांसहि हे दोष माफ आहेत. परन्तु दुर्दैवाने आपल्या 'केसरी' 'सुधारका'तहि हे अक्षम्य अवगुण सध्या बरेच दिसूं लागले आहेत. या पत्रांची मते कशीहि असोत. सध्यांच्या सुधारलेल्या शतकांत मतस्वातंत्र्य असल्याकारणाने लोकांस अप्रिय असलेली मते प्रसिद्ध करण्याची, व हवी तितकी प्रखर विधाने सभ्यपणा न सोडतां युक्तिवादाने मांडण्याची, प्रत्येकास मुभा आहे. तथापि आज दोन

वर्षेपर्यंत सदर पत्रकारानी आपल्या पक्षाचे मडन करण्यामध्ये जो मार्ग स्वीकारला आहे तो असभ्य आहे, असे माझ्याने म्हटल्यावांचन राहवत नाही.

" समतिवयाचा कायदा कायदे कौंसिलमध्ये माडला गेल्यापासून या कुशब्द युद्धास प्रारभ झाला. त्यांतील उडालेल्या चकमकीमध्ये केसरीकारानी डॉ. भाडारकर याजवर केलेला भडिमार फारच जबर होता प्रतिपक्षी डॉ साहेबांसारखा अनुभविक, धीट, वीर योद्धा होता म्हणूनच गोष्ट निभावली इकडन सुधारक वीरांनी आपल्या पत्राचे कॉलम भरून अवघ्या हिन्दु समाजावर, आमच्या निर्दय मूर्ख चालीरीतीवर, गोळ्यांचा पाऊसच पाडला. अखेर या कडाक्याच्या द्वंद्वयुद्धाचा निकाल लागल्यावर तरी यानी आपापली शस्त्रे म्यानात घालून आपणास व समाजास थोडेसे तरी शाततेचे सुख द्यावयाचे होते परतु पूर्वप्रसगी परस्पर केलेल्या जखमांतून वैर भिनून राहिले, व त्यांतच खाजगी द्वेषाचे तेल पडल्याने अतरगांतील द्वेषाग्नि अधिकच प्रदीप्त झाला. सुधारककारांनी व केसरीकारानी त्या मितीपासून एकमेकास किती शिव्याशाप दिले याची साक्ष आजपर्यंतचे अक चाळले असता मिळणार आहे. त्यांनी दिलेल्या शिव्या व दूषणे यांचे उत्कृष्ट उतारे किवा निवडक शेलक्या फेरमाशीचे मासले काढले तरीहि या सर्वांचा एक ग्रथच होईल ! दोनहि पत्राचे चालक सुदैवाने वा दुर्दैवाने विद्वान व बुद्धिमान पडले. मराठी व सस्कृत भाषा उभयतांसहि चांगल्याच माहीत. मग टीकेचेच काम करण्यास प्रवृत्त झाल्यावर या भाषोदधीचे मथन करून या गृहस्थांनी काढलेली कुशब्दरत्ने अत्यत मौल्यवान निघाली असतील यात नवल काय ? रा. टिळक व आगरकर हे उभयता समंजस विद्वान् व एकाच जनहिताच्या कार्यामध्ये स्वहितावर लाथ मारून एकदिलाने झटणारे स्वदेशभूचे कट्टे भक्त, व बन्धुनिर्विशेष एकमेकावर प्रेम करणारे मित्र, असे असून त्याच्या मित्रत्वाची शेवटी अशी इतिश्री होऊन त्यांनी एकमेकास शत्रुप्रमाणे लेखण्यास तयार व्हावे, हे एक मोठेच गूढ होय. हा परिणाम घडून येण्यास केवळ मतवैचित्र्य अथवा स्वभाववैचित्र्य एवढे एकच कारण सबळ किंवा प्रभावी नाही. असो. ते कसेंहि असले तरी तिऱ्हाइत माणसास या गोष्टीत मन घालण्याचे प्रयोजन नाही. तथापि चाललेला प्रकार अगदी अयोग्य आहे, एवढे विधान करण्याचा मात्र त्याचा हक्क कायदेशीर आहे.

" प्रथमतः, एवढ्या जाड्या गृहस्थांनी एकमेकांची वर्मे रोखून उद्वेगकारक अशा खाजगी द्वेषाची शांती करण्यास आपल्या लोकमान्य पत्रांची मौल्यवान्

जागा अडवावी, व प्रत्येक अंकामध्ये आपल्या मातबर प्रतिपक्षाची उघड केलेली निंदा वाचकाकडून वाचवावी, हे त्यांस शोभत नाही. या पत्रकारांचे वैर हा विषय फार जुना असल्याकारणाने त्यांनी शोधून शोधून केलेले अपशब्दप्रबंध जरी कितीहि अलंकारिक किंवा नवे असले, तथापि त्यांनी आतां जनमनरंजन होईल ही आशाच नको. रा. टिळकाची ज्यावर मति चालली असतां आम्हांस विशेष फायदा होईल असे विषय, आगरकर व तद्पक्षीय लोक यांची निंदा यापेक्षां अन्य, पुष्कळ आहेत. आणि आगरकराची प्रौढ व गंभीर भाषा, अन्य उपयुक्त व योग्य विषयाचे विवेचन करण्यात त्यांनी लिहिली असतां, लोकास फारच आनंद होईल. पण ही आशा करण्यात काही तात्पर्य नाही. के. रावजीस निवर्तून अद्यापि पुरा महिना झाला नाही तोंच त्याच्या संबंधीचा काही विषय उपस्थित होऊन त्याजबद्दल एक पक्षास प्रो. गोखले व दुसरे पक्षास केसरी सज्ज होऊन कडाक्याचे पत्रव्यवहार व अपशब्दवृष्टि सुरू झाली आहे. एखाद्या परस्थास देखील दुःखाचा विसर पडला नाही, तोंच मृत मनुष्याचे पवित्र नाव असल्या विवादवादळात सांपडून त्याची स्वतःची अपेष्टा व दुसऱ्यास दुःख देणारी आठवण जागृत व्हावी हे मोठे दुर्भाग्य आहे. व त्यातूनहि पराक्रमी केसरीने असली संधि घेऊन प्रो. गोखल्यासारख्या मनुष्याचे 'डोळे हरवले' अशी हलकी उत्तरे बोलून सापडेल त्यावर तोंड टाकण्यास तत्पर असावे, ही गोष्ट फारच खेदकारक आहे. स्वतः शिष्टाचाराने ज्यांनी दुसऱ्यास सभ्यपणा शिकवावा, त्यांनीच जर असल्या क्षुद्र जनावलंबीत मार्गाचेच वळण उचलले, तर ते त्यास कितीसे भूषणास्पद आहे हे सर्व लोक जाणतातच. याकरिता या पत्रद्वयाने इतउत्तर विकारवश होऊन देह-भान न जाऊ देता, आपल्या लेखावर सर्व देशाची दृष्टि आहे, व परस्पराची निंदा केली असता दोघासहि लोकाच्या मनातून उतरविण्यास आपण कारण होतो, असा सद्विचार करून ही अविवेकी पद्धति सोडून द्यावी. महाराष्ट्र वाचकांस आगरकर, टिळक किंवा तद्पक्षीय मंडळी यांच्या नालस्तीचे पवाडेच केवळ ऐकण्याची इच्छा नसून, पुण्यातील या शिष्ट देशबांधवाचे हातून संहतिचे जोरावर मोठमोठी देशकृत्ये झालेली ऐकून गुणानुवादच गावे अशी इच्छा आहे. तरी या एका परस्थ मित्राच्या म्हणण्याचा ती पत्रे नीट चांगला शांत मनाने विचार करून त्याप्रमाणे वागतील अशी आशा आहे.

मुंबई (

आपला
**न. चिं. केळकर**

हे पत्र १८९२ च्या फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांतील असावे. वरील पत्रांतील एक संदर्भ मला स्वतःलाच आज उकलत नाही ! तो ' कै. रावजीस निवर्तून अद्यापि पुरा महिना झाला नाही तोच ' इत्यादि. दुर्दैवाने त्या सालच्या ज्ञानप्रकाशाचे फाईलहि मिळण्याचा संभव नाही. म्हणून हे 'रावजी' म्हणजे कोण हें कळत नाही !

आमच्या क्लबांतील चर्चेत पुष्कळजण भाग घेत. पण वर्तमानपत्रांत लिहिणारा त्या मंडळीत मी एकटाच होतो. १८९३ साली युनिव्हर्सिटीत असा प्रश्न निघाला होता कीं, पहिली एल्एल्. बी. परीक्षा नापास झालेल्या विद्यार्थ्यांना दुसऱ्या एल्एल्.बी.ची टर्म भरू देऊन मोकळे करावे की नाही ! १८९२ सालच्या पहिल्या एल्एल्. बी. च्या परीक्षेत मी नापास झालो होतो तरीहि, पूर्वीच्या ज्यूरीस्प्रुडन्स परीक्षेप्रमाणे, नापास झालेल्या विद्यार्थ्यांनाहि पुढील लॉ टर्म सहजच भरू देतील असे सर्वांचेच अनुमान असल्यामुळे, मी पुढील टर्म भरण्याकरिता मुंबईस गेलो. पण तेथे गेल्यावर या संशयाला स्वतः युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांतच वाचा फुटली. आम्ही वरच्या लॉ क्लासांत जाऊन व्याख्याने ऐकत होतो, फी भरली होती, आणि आमची हजेरीहि मांडली जात असे. परंतु प्रतिकूल निकाल झाला तर फार नुकसान होणार, मुंबई-हून साताऱ्यास हात हालवीत परत जावे लागणार व मुंबईस झालेला सर्व खर्च फुकट जाणार. म्हणजे अक्कलखाती लिहावा लागणार ! या विचाराने मी व माझ्या बरो-बरचे अनेक विद्यार्थी मोठ्या संशयांत व चिंतेत पडलो होतो. तेव्हां शेवटी मनाचा हिय्या करून या विषयावर मी 'टाईम्स ऑफ इंडिया'ला एक पत्र लिहिले. आणि "निम्मी टर्म भरत आली तरी युनिव्हर्सिटीचे अधिकारी या प्रश्नाचा निकाल करीत नाहीत " याकरितां त्यांना दोष दिला होता. तें पत्र टाईम्सच्या संपादकानें प्रसिद्ध केले, इतकेच नव्हे तर ते ठळक जागी छापले. आणि योग असा की, दुसऱ्या एका विषयावर विल्सन कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉ. मॅकिन यांनी टाईम्सला लिहिलेले पत्र माझ्याच पत्राखाली छापले होते. माझ्या पत्रावर मी सही घातली नव्हती. कांही प्रच्छन्न नांव घेतले होते. ते पत्र अर्थातच आमच्या लॉ स्टूडंट्स्च्या क्लबांत वाचले गेल्याशिवाय कसे राहील ! आणि त्याची वाहवा झाल्यावर मग मलाहि ते गौप्य किती वेळ टिकवेल ! या वेळीं मी वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडेन असे कोणास वाटले नव्हते. तरी पण वर सांगितलेले ज्ञानप्रकाशांतील पत्र आणि टाईम्समधील हे पत्र वाचून माझा मान्यतेचा दर क्लबांत चार-दोन 'पॉईंट'वर सरकला यांत शंका नाही.

मी मुंबईस अभ्यास करीत असतां, १८९३ च्या जानेवारीत, सातारा हाय-स्कूलांत शिक्षकाची एक जागा रिकामी झाली. तेव्हां नाना यांच्या प्रथम असे मनांत आले की, मला त्या जागेबद्दल अर्ज करण्यास सांगावे. त्याप्रमाणे मी तो केलाहि. पण पुढे त्याचे मन बदलले आणि जागा भरण्याचेहि रहित झाले. तेव्हां ते प्रकरण तसेच संपले. यासंबधाने नाना यांनीं मला खालीलप्रमाणे पत्र पाठविलेः—

"येथील हायस्कुलांतील वरची एक जागा रिकामी झाली आहे. पण त्या-संबधाने डायरेक्टर यांनी असे ठरविले आहे की, कोणी पदवीधर मनुष्य न नेमतां खालच्या लोकाना वर चढवून बढती द्यावयाची, आणि शेवटच्या जागेवर १५ रुपयावर एक मनुष्य नेमावयाचा. म्हणून नवीन मनुष्य नेमण्याची कल्पना सपली. पूर्वी तसा सभव होता म्हणून तुम्हाला लिहून विचारले होते. यामुळे तुमचे मन थोडे अस्थिर झाले असेल. परतु आतां तुमच्या अभ्यासाच्या मार्गातील विघ्न टळले असे समजा. आता तुम्हाला काळजी तुमच्या अभ्यासाचीच राहील. युनिव्हर्सिटीने दुसऱ्या एल्‌एल्. बी.च्या टर्म्स भरण्यासंबंधाने आपले नियम अजून कायम केले नाहीत हेहि तुमच्या काळजीला एक कारण राहीलच. परंतु सरकारी विद्याखात्यांत नोकरी पत्करण्याचे आमिष जे तुमच्यापुढे अवचित ठेवण्यांत आलें होते ते तरी आतां दूर झाले. युनिव्हर्सिटीच्या निकालावर इतकेच अवलंबून राहील की, तुम्ही यदा यापुढे मुंबईसच राहावे की साताऱ्यास येऊन अभ्यास करावा ? पण यापैकी तुम्हाला योग्य वाटेल ते तुम्ही करावे, त्यापैकी कोणतेहि केले तरी आम्ही तुम्हाला दोष देणार नाही. दोष देऊ तो कदाचित् इतक्याचपुरता कीं, कायद्याच्या अभ्यासाची बुके बाजूला ठेऊन तुम्ही अवांतर विषयाच्या वाचनाकडे अधिक लक्ष देतां ! त्यामुळे परीक्षेचा अभ्यास व्हावा तसा होत नाही. परंतु तुमच्या प्रकृतीला तेथे बरे वाटत असेल तर तुम्ही मुंबईस राहण्यास आमची हरकत नाही. आप्पांचे-हि म्हणणे असेच आहे. हे सर्व आम्ही तुम्हाला लिहिण्याचें कारण नव्हते, कां की तुमचे हितअनहित कळण्याइतके तुम्ही आतां प्रौढ झाला आहां."

या शेवटच्या वाक्याचा ध्वनि असा उघड होता की, मी एल्‌एल्. बी.चाच अभ्यास चालू ठेवावा. पहिल्या एल्‌एल्. बी.त एकदां चुकून नापास झालो म्हणून तो सोडणे योग्य नव्हे.

असो. शेवटी युनिव्हर्सिटीने पहिली एल्‌एल्‌. बी. नापास झालेल्यांनाहि पुढच्या टर्मस् भरण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणे १८९३ अखेर त्या पुऱ्या करून मी साताऱ्यास आलो. फिरून नोव्हेंबरांत मुंबईस जाऊन पहिल्या एल्‌एल्‌. बी.ची परीक्षा दिली. तीत पहिल्या वर्गांत पास होऊन डेक्कन कॉलेजातले पन्नास रुपयांचे बक्षीसहि मिळाल्याचे मागे सांगितलेच आहे. टर्मस् पुऱ्या झाल्यामुळे १८९४ साली मला साताऱ्यासच राहून अभ्यास करून दुसऱ्या एल्‌एल्‌. बी.ला बसता येण्यासारखें होते. मग मुंबईचा खर्च कां करा? इतकेंच नव्हे तर साताऱ्यासहि नुसतां अभ्यास न करिता मी जानेवारी ते मार्च अखेर तेथील एका खासगी हायस्कुलांत शिक्षकाची नोकरी धरली. तीन तासाच्या कामाला तीस रुपये पगार मिळत होता. पुढे एप्रिलपासून अभ्यास जोराने सुरू केला. त्या वेळी श्रीनिवास द्रवीड हे मजबरोबर अभ्यास करीत होते. पण द्रवीड हे त्या साली परीक्षेला बसू शकले नाहीत. मी परीक्षेला बसून पास झालो आणि अशा रीतीने माझ्या बंधूंच्या डोक्यावरील ओझें, म्हणजे माझ्या शिक्षणाकरितां खर्च करण्याचे ओझें, मी कायमचे उतरले. आमच्या घराण्यांत मी पहिला एल्‌एल्‌. बी.; आणि तोहि इतक्या अल्पवयांत झालेला पाहून वडील मातोश्रींना व बंधूंना किती आनंद झाला असेल याची कल्पना कोणासहि करितां येईल. मिरजेच्या हायस्कुलांतून तोवर पास झालेल्या सर्व विद्यार्थ्यांत मीच पहिला एल्‌एल्‌. बी. असेन असे वाटतें. तात्पर्य, मिरजेच्या लोकांनाहि एक प्रकारें धन्यता वाटली. आणि त्यांनीं वडिलांचें अभिनंदन केले.



१८९२ सालीं सातारा येथें घेतलेलें केळकर कुटुंबीयांचें छायाचित्र. ( पृ. १७६ )

आपोआप चालून आली ! अशी की, टिळकांच्या लॉ-क्लासमधील शिक्षक आणि 'मराठ्या 'चा सहसपादक अशी सजोड जागा मला मिळणार ! लॉ-क्लासांत दररोज दोन तास शिकवण्याचे काम पडेल. त्याकरिता मला दरमहा ७५ रु. पगार मिळेल तूर्त 'मराठा ' पत्रात दर आठवड्यास सुमारे ५ कॉलम इतका मजकूर लिहिण्याकरितां कदाचित् दरमहा २५ रु. पगार मिळेल, आणि पुढे मराठ्यांत लिहिण्याचे सर्व काम एकट्या माझ्याकडेच येईल तेव्हा मात्र पगार ६० रुपये होईल. पण ती गोष्ट घडण्याला थोडा अवकाश आहे वरील अटीसबधाने बोलणे चालणे करण्याकरितां गेल्या शनिवारी मी पुण्यास जाऊन आलो. त्याकरिता टिळकांकडून मला मुद्दाम तेथे बोलावण्यात आले होते. वर सागितल्याप्रमाणे अटी ठरल्या. आज ता १६ रोजी सकाळी प्रथम टिळकानी गोविदराव रानड्याना लिहिलेले आदल्या दिवसाचे पत्र वाचावयास मिळाले, आणि ते माझे वाचून होते न होते तोच टिळकांनी गोविदरावाना पाठवलेली तारहि मिळाली ! तेव्हा मी उद्या सकाळी येथून निघून एकदम पुण्यास जातो. तात्पर्य, तूर्त असे निश्चित घेऊन चालावयाचे की मला दरमहिना १०० रुपये पगार मिळेल. आणि सर्व दिवसभर कायद्याचे वाचन करणे आणि वर्तमानपत्राचे काम शिकणे या गोष्टी करावयाच्या. मला भीति वाटते ती इतकीच की माझ्या हातून टिळकांच्या लॉ-क्लासातील पुणेरी विद्यार्थ्यांचा शिक्षक या नात्याचे काम कसे काय पार पडेल ! येथील वकिलीच्या कामापेक्षां पुण्याचे एकदर काम जरासे अधिक अवघडच खरे. पण अशी सोन्यासारखी सधि आयती चालून आल्यावर मी माघार कसा घेईन ? जगात नेहमी असे घडते की, जोपर्यंत काम मिळाले नाही तोपर्यंत निष्कारण रीतीने आत्मविश्वासाच्या घमेडीत मनुष्य राहतो त्याला वाटत असते की, मी यँव करीन आणि त्यंव करीन. आणि काम आगावर पडले म्हणजे मग ऐनप्रसगी त्याच्या आत्मविश्वासाचा फुगा फुटतो ! माझे याच्या उलट आहे मिळेल ते काम घ्यावे करावें. उगीच आत्मविश्वासाने बसल्या जागी डभारून जाऊ नये. काम करू लागले म्हणजे मग सहजच कळून येते की, आपणाला खरोखर इतकेच करतां येतें. याहून अधिक करता येत नाही. मग यात काय वाईट झाले ? जितके आपणाला करतां आले तितकीच आपली पात्रता होती असे सरळ मनाने कबूल करावे.

त्यांत काय बिघडले ! फुकट आत्मविश्वास धरूं नये, पण हाती आलेले कामहि टाकूं नये. त्यांतून जे निघेल ते निघेल. मी पुण्यास कामावर दाखल झाल्यावर लगेच तुम्हाला पत्र लिहीन. आणि मग जे झाले किंवा मी केले ते तुम्हाला कसे काय वाटते हे तुम्हीहि मोकळ्या मनाने मला लिहा. वास्तविक तुमची संमति घ्याव याची ती योग्यवेळी न घेतां, गोष्ट होऊन गेल्यावर तुम्हाला अभिप्राय विचारण्यात काय अर्थ ? पण स्थिति खरीच अशी आहे की, पुण्यास काम मिळण्याची गोष्ट बोलण्यांत निघाली होती तरी प्रथम निजविषयी खात्री किंवा खरी आशा वाटण्या इतकी ती शिजून राहिली नव्हती. पण आता साधि मिळाली ती मात्र अशी आहे की, आगाऊ तुमची संमति न मिळवितांहि मी उडी घालून ती स्वीकारावी. अटी स्पष्ट करून लेखी कळविण्याचे पत्र टिळकाचे १५ मार्चचे आणि तातडतोब या म्हणून बोलावणारी तार १६ मार्चची ! यावरून तुम्हाला दिसून येईल की तुमची आगाऊ संमति मिळविण्याला खरोखर अवसरच नव्हता.”

मी जो कदाचित् जन्मभर सातारकर राहावयाचा, तो अशा अगदी अकल्पित रीतीने पुणेकर झालो !

# उमेदवारीचें दीड वर्ष

सन १८९६ च्या मार्च १७ तारखेला मी पुण्यास आलो. प्रथम टिळकानी मला आपल्याच घरी राहवून घेतले. त्या वेळी विंचूरकराचा सर्व वाडा त्याच्याच स्वाधीन होता ते स्वत. वाड्याच्या पूर्वअगच्या बगलीवजा घरात राहात. पश्चिमेकडील दुमजली इमारतीत खाली एक 'लॉ क्लास' आणि वर माडीत दुसरा 'क्लास' असे खालच्या क्लासात मी शिकवी. वरच्या क्लासात ते शिकवीत. दक्षिणेकडे अशीच एक दुमजली इमारत होती. दुमजल्याच्या माडीत पूर्वअगची खोली मला राहावयास दिलेली असून, त्यालगत बाहेरच्या मोठ्या दालनात दोन लाबट टेबले आणि चार बाके माडलेली होती या टेबलावर केसरीकडे येणारी वर्तमानपत्रे व एकादे दुसरे मासिक ही येऊन पडत. स्वतः टिळकाना वाचावयास लागतील तेव्हा ते ती तिकडे नेत. त्याचे केसरी-मराठ्याचे लिहिणेहि बगलीच्या माडीत चाले. वर्तमानपत्राचे काम झाले म्हणजे ती परत मजकडे येत. आणि मी ती आपल्या हाताने घड्या वगैरे घालून वर दगड ठेवून साभाळीत असे ! मुख्य पत्रे 'मुबई टाइम्स', 'गॅझेट', साप्ताहिक ' हिंदु ' व ' अमृत बझार पत्रिका '.

जेवणखाण टिळकांच्याच घरी होत असल्यामुळे माझा सर्व दिवस वाड्यांतच जाई. मला त्या वेळी कोणी स्नेहीसोबती नव्हते; व माझे कामच मला पुरत असे. मी विंचूरकरांच्या वाड्यात राहण्यास आल्यानंतर पहिल्या आठपधरा दिवसातच टिळकांचा तिसरा मुलगा श्रीधर उर्फ बापू हा जन्मला. थोरला मुलगा विश्वनाथ हा मुज झालेला व इग्रजी शाळेत जाणारा होता. त्याने एकदां कोठनसे बॅडमिटनच्या खेळाचे ,सामान पैदा केले व खालच्या अंगणांत जाळे लावले. आणि त्याला खेळावयाला मी सहजच जोडीदार सापडलो. परतु टिळकांना मुलाने बॅडमिटन खेळावे हे पसत नव्हते. ते त्याला म्हणत " तू माझ्यासारखा तालमीत जाऊन मेहनत कर. बॅडमिटनचा खेळ बायकानी खेळावा." लगेच चारदोन दिवसांत जाळे सोडून खांब उपटून टाकण्यास त्यानी गड्यास सांगितले. स्वतः टिळक कोणताहि व्यायाम करीत नसत. कामकाजानिमित्त बाहेर लोकांकडे जाणे येणे यातच त्यांचा व्यायाम होई. तेवढा त्यांना पुरे. रिकामपणाची त्यांची करमणुक म्हटली म्हणजे बंगलीच्या गॅलरीत ईझिचेअर टाकून सुपारी फोडून खात बसावें,

आणि समोर ठेवलेल्या एका खुर्चीवर आल्यागेल्या स्नेह्यासोबत्याला बसवून खूप गप्पा माराव्या

ह्या गप्पातून कित्येक वेळां वादहि निर्माण होत आणि तसे झाले म्हणजे टिळक इतक्या चढ्या आवाजाने बोल लागत की, ते बोलणे अंगणाच्या दुसऱ्या टोकाला किंबहुना बाहेर रस्त्याशी ऐकू जाई मोठ्याने बोलण्याच्या सवयीवरून टिळकाच्या एका स्नेह्याने एकदा एक गमतीची कोटी केलेली आठवते चारदोन मित्रमडळी जमली होती आणि राजकारणातील पुढाऱ्यांचे स्वभाववर्णन सुरू होते. स्वभाववर्णनाबरोबर एकाने रूपवर्णनालाहि आरभ केला. दुसऱ्याने प्रतिभा चालवून असे म्हटले की, "या राजकीय पुढाऱ्यातून एक नाटक मडळीहि निर्माण होऊ शकेल" मग कोणाला कोणता पार्ट द्यावा किंवा देता येईल याची योजना सुरू झाली

फिरोझशहा मेथा यांच्याकडे व श्रीधर विठ्ठल दाते यांच्याकडे राक्षस पार्ट देण्यात आला गोपाळराव गोखल्याना देवपार्टी ठरविण्यात आले पण दुसऱ्याने सुचविले की, त्यांच्या बारीक मिशा काढल्यास सौंदर्यामुळे त्याना स्त्रीपार्टहि शोभेल गोपाळराव जोशी हे महा मिस्किल थट्टेबाज वेष बावळा पण अगी नाना कळा असे होते. ते विनोदमूर्ति यामुळे त्याना विदुषकाची भूमिका देण्यात आली. दत्तोपंत बेहेरे हे भटजी. अण्णासाहेब पटवर्धन हे ऋषि ठरले. बिचाऱ्या हर्डीकराना त्यांच्या वेषामुळे चपराशी जागूद याचे काम देण्यात आले. वासुकाका जोशी पडदे ओढण्याशिवाय दुसरे काम पतकरीनात. पण टिळकांचे नाव कोणी घेईना. कदाचित् नाटक हा विषय टिळकाचा नावडता म्हणून असो, किंवा 'प्रेझेंट कंपनी एक्सेप्टेड' या इंग्रजी म्हणीप्रमाणे दाक्षिण्य साभाळावे म्हणून असो, किंवा टिळकांचा उपमर्द न व्हावा म्हणून असो, त्याना कोणताच पार्ट देण्याचे कोणी बोलेना. पण वासुदेवराव जोशी हे टिळकांच्या अगदी खेळीमेळीतले. त्यांना टिळकाजवळ दहा खून माफ असत. तेव्हा त्यानी सरसावून विचारले, "अरे, पण बळवतरावाना पार्ट कोणता देणार ? त्याना वगळून कसे चालेल ! ते तर मोठे राजकीय पुढारी !" तेव्हां हर्डीकराना कोटी सुचून ते म्हणाले, "त्यांना नाटकात घेण्याची सोय नाही. कारण ते इतक्या मोठ्याने बोलतात की, लोक तिकिट विकत न घेता नाटकगृहाबाहेर उभे राहूनच टिळकांचे भाषण ऐकतील. मग काय करावे ?"

टिळक या वेळी मध्यमवयाचे. यामुळे त्यांच्यापुढे समवयस्क मित्रमंडळींना मोकळ्या मनानें बोलण्यास संकोच वाटत नसे. ते पुढे कीर्तिवान झाले व बहुमानाला चढले, तेव्हां त्या गोष्टीचें दडपण मनावर पडून यांच मंडळींनी सलगीची भाषा सोडली व अदबी स्वीकारली. पण या पूर्ववयांत तें बंधन नव्हतें. उलट स्वतः टिळकहि खेळीमेळीच्या बोलण्यांत आपला यथोचित भाग घेत. अशा संवादांत एखादा कोणी ग्राम्य शब्द बोलून गेला तरी पातक घडलें असें म्हणून कपाळाला आठ्या घालण्याइतका सोवळेपणा कोणीहि अंगीं आणीत नसे. याच्या उलट प्रकार मी गोपाळराव गोखले यांचा पाहिला. त्यांच्यापुढें ग्राम्य शब्द उच्चारण्याची कोणाचीहि छाती नव्हती. कारण कांहीं प्रतिकूल स्पर्श झाल्याबरोबर एखाद्या जातीची गोम लगेच वेटोळें घालते त्याप्रमाणें ग्राम्य शब्द ऐकल्याबरोबर गोखल्यांचा चेहरा गंभीर होई, त्यांच्या कपाळाला आठ्या पडत, व ते अधोमुख होत. याचा अर्थ बोलणाराला लाज नसली तरी ऐकणाराला ती असावी! टिळक स्वतः ग्राम्य शब्द कधीं उच्चारीत नसत. पण बेहेऱ्यासारखा त्यांचा एखादा स्नेही त्यांच्या सत्त्वाचा अंत पाही. भिंगारकरबोवाहि यांतच जमा. मला वाटतें नवीन शिकलेली पिढी जुन्या सनातनी पिढीपेक्षा अधिक सद्गुणी नसली तरी तिच्या भाषेत किंवा आचरणांत ग्राम्यपणा कमी असतो. टिळकांच्या परिवारांत सनातनी लोकांचा भरणा कांहींसा असे. आणि दत्तोपंत बेहेऱ्यांनी तर एकदां सनातनी धर्माचाराचा हक्क बजावण्याच्या हट्टानें विंचूरकरांच्या वाड्यांत चार मंडळी बरोबर घेऊन येऊन हलक्या आवाजानें पण शिमगा गाजविला!

असो. टिळक हे तेव्हांहि कधींच रिकामे आढळत नसत. लोकांची येजा घरीं सारखी सुरू असावयाची. आणि ही उपाधि टिळकांनाहि इतकी आवडे कीं, ते एखाद्या कामांत गुंतले असले तरी अनाहूत येऊन बोलून वेळ घेईल त्याला नंबर पहिला आणि स्वतःच्या कामाला नंबर दुसरा! रात्रीं लोकच येण्याचे बंद झाले म्हणजे ते आपलें काम घेऊन बसत. मग कोणाचा अर्ज लिहून द्यावयाचा असो, मुंबई टाईम्सला पत्र धाडावयाचें असो, किंवा केसरी-मराठ्याचें आर्टिकल लिहावयाचें असो. त्यांचा लेखक पेंगू लागला तरी स्वतः टिळकांना जांभई यावयाची नाहीं. तोंडानें सुपारी खात, व विचाराला चालन देण्याकरितां इंजिनिअरच्या उजव्या बावखंडीवर तळहाताचे ठोके देत, मजकूर सांगण्याचा त्यांचा सपाटा सुरू असावयाचा.

रात्री अपरात्री त्यांच्याकडे आर्यभूषण छापखान्यातून पांडोबा ब्राम्हण गडी प्रुफें घेऊन आला म्हणजे तो ती टेबलावर ठेवून देई. आणि कंदील हलका करून एकाद्या कोपऱ्यात बसून भिंतीला टेकून चांगली झोप घेई. त्याला माहीत असे की, एक चागली डुलकी घेण्याइतका वेळ टिळक प्रुफें वाचून परत करण्याला लावणार. टिळकांचा हा चरित्रक्रम येथे प्रथमच ओघानें आला म्हणून सांगितला खरा, पण तो अखेरपर्यंत अव्याहत चालू होता असे म्हणण्यास हरकत नाही. पुढे घरचा छापखाना झाला तेव्हा तर मत्तेप्रमाणें सोयहि झाली. त्यांच्या मगतीत येणारे उपसंपादक, कारकून, कंपॉझिटर यांना हटकून जागरण घडावयाचे. मात्र टिळक एकदा मजकूर सांगू लागले किंवा प्रुफें वाचू लागले म्हणजे झरझर आवरीत

पुण्यास मी बिऱ्हाड करीपर्यंत विंचूरकरांच्या वाड्यातच राहत असे. पण पहिल्या दोन आठवड्यानंतर वासुदेवराव जोशी हे आग्रह करून मला आपल्या घरी जेवावयास घेऊन जाऊ लागले. टिळकांचा सहकारी म्हटला म्हणजे त्यांच्यावर वासुकाका लोभ करावयाचे. माझ्याप्रमाणें इतरहि कांही मंडळी त्यांच्या घरी कांही काही दिवस जेवावयास जात वासुदेवरावांची बहिण ताई ही मोठी कष्टाळू व अगत्यवादी असे आणि जेवताना कोकणस्थांच्या घरचे पदार्थ कसे, देशस्थांच्या घरचे पदार्थ कसे याची चर्चा चाले

पुढे पावसाळ्यात मी प्रथम बिऱ्हाड केले ते सदाशिव पेठ रस्त्यावर, हौदा-जवळ आगाशे यांच्या वाड्यात. दरमहा भाडे सहा आणेच होते पण जागा मिळाली ती माडीवरची, आणि वर नळ घेतलेला नाही म्हणून विहिरीचे पाणी जिन्यावरून न्यावे लागे पण विहिरीला पाणी भरपूर आणि जागा बरी यामुळे मिरजेची आठवण कधी झाली नाही. या वाड्यांत असतानाच वडील बंधु नारायण-राव यांची बदली पुणे हायस्कुलात झाली.

बिऱ्हाड करण्यापूर्वी काही दिवस मी वासुकाका जोशांचा पाहुणचार सोडून देऊन विसुभाऊ साळवेकर यांच्या सरदारगृहात जेवावयास जात होतो. साळवेकर यांनी १८९५ त प्रथम अनाजी माणकेश्वरांच्या वाड्यांत, म्हणजे हल्ली किर्लोस्कर नाटकगृह ज्या जागेत आहे त्या जुन्या वाड्यात सरदारगृह सुरू केले होते.

परतु मी पुण्यास आलो तेव्हा आधीच ते त्यांनी बुधवार चौकांतील ढमढेरे यांच्या वाड्याच्या उत्तराभिमुख माडीत आणले होते यात जेवणाप्रमाणे राहण्या-चीहि जागा केली होती. तीत इतिहासाचार्य राजवाडे, शिवरामपत पराजपे, गांधी वकील व प्रो. भानू इत्यादि काही निवडक मडळी मधून मधून असत. पुण्यातील कोणत्याहि भोजनगृहापेक्षा या सरदारगृहातील जेवणाची व्यवस्था अधिक चांगली होती. पण तिचा फायदा घेणारे लोक असावे तसे व तितके न मिळाल्याने साळ-वेकरानी प्लेगमध्ये हे सरदारगृह मोडले व ते मुबईस तीच कल्पना घेऊन गेले. तेथे मात्र या त्याच्या कल्पनेला फळ आले, आणि गेल्या पस्तीस वर्षात मुबई सरदारगृहाचा उत्कर्ष कसा होत गेला हे प्रसिद्धच आहे. पुण्याच्या सरदारगृहात असताना शिवरामपत पराजपे व राजवाडे यानी मिळून भाषातरास वाहिलेले एक मासिक पुस्तक सुरू केले त्याचा हेतु इग्रजीतील निरनिराळया देशाचे इतिहास राष्ट्रीय दृष्टीने मराठी वाचकापुढे माडावे असा होता.

घर हे ससाराचे पहिले अधिष्ठान म्हणून माझ्या पुण्यातील घरवस्तीची हकीकत एकदम एकत्रच सागून टाकतो सदाशिव पेठेतच बहुतेक माझी आज-पर्यंतची सर्व वस्ती झाली. 'सदाशिव पेठी सस्कृति' असे निदाव्यजक नाव जिला डॉ. केतकर यानी दिले त्या सस्कृतीचा दोष जडलेला एक कायमचा अपराधी मी आहे. पुण्यातील सर्व पेठात मला सदाशिव पेठच अधिक आवडते तिची माडणी करणाराने टाऊन प्लॅनिंग पद्धतीने एकाद्या सोगट्याच्या नव्हे पण बुद्धिबळाच्या पटासारखी केली आहे. आणि स्वतत्र नावच पडावे अशी तिची सस्कृति आहे खरीच !

आगाशे याच्या वाड्यानतर मी जवळच नात याच्या छोट्या घरात व नंतर राहुरकराच्या घरी राहत असे. या बाजूस असताना उन्हाळयामध्ये सदाशिवपेठे-च्या हौदावर उघडया अगाने जाऊन पाच-पचवीस बादल्या घेऊन स्नान करी. केव्हा केव्हा हाताने कपडेहि धुतले आहेत. हौदासारख्या जागेवर गेले असता पाण्यात रमण्या-खेळण्याचे ते एक चागले निमित्त होते

मध्यतरी काही दिवस मी बळवतराव पराजपे याच्या नव्या बांधलेल्या वाड्यांत राहत होतो. प्रथम मी तळमजल्यावर व माडीवर प्रो. जिनसीवाले असे राहत असू. मागच्या बाजूस प्रो. गोविंदराव भाटे व प्रो. हरिभाऊ लिमये हे

राहत. भाटे हे एम्. ए. झाले होते, हरिभाऊ व्हावयाचे होते. म्हणून त्यांच्या-बरोबर इतिहास व अर्थशास्त्र यांची बुकें मी केंव्हा केंव्हां वाचीत असे. भाटे व लिमये हे नेमस्त पक्षाचे आणि मी केसरी पक्षाचा असे होतो. तरी पण त्यांचा आमचा स्नेह व घरोबा चांगला होता; व पुढे तो सर्वकाळ टिकला. माडीवर जिनसीवाले राहत त्यांचे मात्र भय वाटे ते दिसण्यात उग्र, तसेच स्वभावानेहि तापट असत. यामुळे काय बोलले काय केले म्हणजे त्यांचे बिघडेल हे कळणे कठिण. केसरीच्या संबंधामुळे ते माझे कौतुक करीत. विशेषतः मराठीपेक्षाहि इंग्रजीचा व्यासंग त्यांचा अधिक आवडीचा. आणि मी मुख्यतः मराठ्यांतच लिही. मी शक्य तितके चांगले सजवून लिहिण्याचे श्रम करी ते जिनसीवाले दर रविवारी मराठा पत्रांतून वाचीत. यामुळे त्यांचा मजविषयी अनुकूल ग्रह झाला होता.

माडीवर ग्रंथांनी समृद्ध अशी त्यांची कपाटें लावून ठेवलेली होती. त्यांच्या लोभाने मी मधून मधून वर जाई परंतु पाहावे ते प्रत्येक कपाट कुलुपबंद. आणि कांही कपाटांना लाकडी दारें यामुळे आतील ग्रंथाचे दर्शनहि होणे नाही. बरे किल्ल्या मागून घ्याव्या तरी संकोच वाटे. यामुळे जिनसीवाले हे स्वतःकरिता एकादें कपाट उघडून वाचीत बसले असले म्हणजे मग गोड बोलून मी कांही पुस्तकें चाळी जिनसीवाले यांचे ग्रंथ-प्रेम इतके की, ते म्हणत, " मी कधी चोरी केली तर ग्रंथाचीच करीन " दुसऱ्याची चोरी करण्याइतके ज्याचे ग्रंथावर प्रेम तो स्वतःच्या ग्रंथांना किती जपत असेल हे दिसतच आहे. तात्पर्य, त्यांजकडून एकादे पुस्तक मी मागून घेतलेच तर ते मी नीट संभाळून, घाण न करता, त्यावर खूण न करता, त्यांचे त्यांना शक्य तितके लवकर परत करीत असे जिनसीवाले यांना कुटुंब असे कांहीच नव्हते. फक्त एक हातदुखरा दिसण्यात अमंगळ असा त्यांचा आचारी असे त्याच्यावर ते कडाडले म्हणजे खाली आम्हाला ऐकू येई. इतका गृहस्थ तामसी.

जिनसीवाले यांच्यासंबंधी मला दोन प्रसंग आठवतात ते देण्यासारखे आहेत. माझे थोरले बंधु नाना यांना साताऱ्याहून आगगाडीतून येताना एक ब्रिटिश सोजीर भेटला तो सुस्वभावी होता दोघांचे चार तास गप्पा मारण्यात गेले. सोजीराजवळ कुत्र्याची दोन लहान पिलें होती. प्रवास संपताना त्याला काय वाटले कुणाला ठाऊक ! तो म्हणाला, ' मि. केळकर या जोडीतले एक पिल्लू तुम्ही घेऊन

जा म्हणजे माझी आठवण तुम्हाला राहील.' अगदी आग्रहच त्याने केला. मोजीर सज्जन भेटणे दुर्मीळ. यामुळेच त्याचे स्मरण गहण्यामारखे होते. शिवाय आम्हाला घरी कुत्री पाळण्याचा शोक नव्हता. तथापि बझना भीड मोडवेना म्हणून ते कुत्र्याचे पिल्ल त्यानी घरी आणले. त्याची निगा आम्ही ठेवू लागलो. कारण कुत्र्याची जात खेळकर असते यामुळे तो एक सहजच रिकाम्या करमणुकीचा विषय झाला. एक दिवस कुत्र्याने अग मळविले, आणि आता ते बैठकी घाण करणार असे पाहून मी त्याला मागच्या अगणात नेऊन बाधले, आणि घरी गडी नमल्यामुळे जवळच्या विहिरीचे पाणी काढून मी त्याचे अग चोळून धुऊ लागलो. कर्मधर्मसयोगाने जिनसीवालेसाहेबाची स्वारी खाली आली. त्याना माझा हा उद्योग पाहून अगदी वाईट वाटले आणि ते किंचित् रागाच्या स्वराने म्हणाले, "नरसोपत हे तुम्ही काय चालविले आहे ? या कुत्र्याचे कौतुक तुम्ही करतां, पण देवावर कधी पाणी घातले आहेत काय ? हे तुम्ही असले तरुण नव्या पिढीचे लोक ! कुत्रे धुण्यात तुम्ही इतका वेळ खर्च केलात तो देव धुण्यात केला असतात तर थोडे पुण्य तरी पदरात पडले असते" जिनसीवाल्याच्या जागी दुसरा एकादा विनोदप्रिय टीकाकार असता तर "सर्वातर्यामी एकच ब्रह्म व परमेश्वर आहे" असे म्हणून मी टीका खेळकरपणाने परतविली असती. शिवाय जिनसीवाल्याच्या प्रश्नाला एक उत्तर मजजवळ देता येण्यासारखे होते. ते असे की, मी प्रीव्हियस परीक्षा देई-पर्यंत घरी देवपूजा करीत असे व गुरुचरित्रहि वाचीत असे. पण जिनसीवाल्यानी मला खिडीत बरोबर गाठले होते हे एक शिवाय त्याच्याशी विनोद म्हणून करण्याची सोय नव्हती. कारण ते त्याने अधिकच सतापून शिव्याहि देण्याला कमी करावयाचे नाहीत. म्हणून मी नुसते हसून चूक पदरात घेतल्यासारखे करून भागविले. पण त्या झाल्या गोष्टीचा धडा घेतला. भरीत भर म्हणून कुत्र्याने आमची वेब्स्टरची वीस रुपयाची बाधीव डिक्शनरी पुठ्यावरील कातड्याच्या प्रेमाने कुरतडून टाकली. लगेच ती कुत्र्याची ब्याद घेणारा जो पहिला स्नेही भेटला त्याला आम्ही देऊन टाकली. हल्ली स्नान झाल्यावर मी देवघरात बसून देवावर गध फूल वाहतो, तेव्हा मधून मधून जिनसिवाले यांनी घेतलेल्या या माझ्या हजेरीची आठवण होते व हंसूहि येते.

त्याची दुसरी आठवण अधिक गभीर स्वरूपाची आहे. वरील गोष्टीनतर सुमारे पाच वर्षांनी सार्वजनिक सभेतील एका व्याख्यानाला मी अध्यक्ष होतो. मी

खुर्चीवर बसल्यावर मागाहून जिनसीवाले येऊन श्रोत्यांत बसले. मुख्य व्याख्यात्यांच्या भाषणानंतर जिनसीवाले उपवक्ते म्हणून बोलावयास उठले. ते व्याख्यानाचे फार षोकिन्. स्वतः देत पण दुसऱ्यांचीहि ऐकावयास येत. आणि ते हजर असले म्हणजे बहुधा उपवक्ते म्हणून बोलावयास उठावयाचेच. पण त्यांच्यामध्ये एक मोठा दोष होता. तो लांबटपणाचा. स्वतः ते व्याख्याते असले म्हणजे अडीच-तीन तासहि बोलत. पण मग त्या दिवशीचा तोच कार्यक्रम असे समजून कोणी उपवक्ते उठत नसत. आणि अध्यक्षहि नुसते आभार मानून सपवीत. पण खरी अडचण जिनसीवाले उपवक्ते म्हणून उभे राहिले म्हणजे होई. कारण त्याचे बोलणे तासतास दीडदीड तास चाले. यामुळे अध्यक्ष चुळबुळ करीत. जिनसीवाले व्याख्यात्यावर टीका करीत तिला उत्तर देण्याला वेळ मिळाला नाही तर व्याख्याते आपणाला अन्याय झाला म्हणून तक्रार करीत. स्वतः ते वक्ते असले म्हणजे तर असा प्रकार होई की, जेवणाची वेळ झाली म्हणजे कांही श्रोते घरी जाऊन जेऊनहि परत व्याख्यानाला येत !

असो. वर जो प्रसंग सांगितला तो एका व्याख्यानमालेचा होता. तिचा नियमच असा होता की, बरोबर सहा वाजतां व्याख्यानाला सुरुवात करावयाची व बरोबर आठाच्या ठोक्याला सभा संपवावयाची. यामुळे सर्व समंजस वक्ते उपवक्ते व अध्यक्ष तो नियम आनंदाने पाळीत. पण जिनसीवाले हे स्वतःला कोणत्याच नियमांचें बंधन मानणारे नव्हते. त्यांची लहर सांभाळावयाची तर नियमभंग होणार. आणि नियमाची अंमलबजावणी करावी तर जिनसीवाल्यांचा अपमान होणार ! मी तरी त्या दिवशी या कात्रीत चांगलाच सांपडलो. पावणेआठ वाजले तरी जिनसीवाल्यांचे निम्मे मुद्देहि सपले नव्हते ! तेव्हां मनाचा धडा करून मी टेबलावरची घटा एकदा हळूच वाजविली. त्यांनी ती ऐकल्या न ऐकल्या सारखे करून भाषण जोरांत पुढे चालविले. पांच मिनिटांनी मी पुन्हां घंटा जरा मोठ्याने वाजविली. तेव्हां त्यांनी रागाने मजकडे पाहिले, पण भाषण सुरूच ठेवले. शेवटीं आठाच्या ठोक्याला मी तिसऱ्यादा घंटा वाजविली. तेव्हां ते रागाने उसळून म्हणाले "मला बोलू न देण्याचा अध्यक्षांचा निश्चय दिसतो." पण मी उठून उभा राहिलो व म्हणालो "मी अध्यक्ष उभा आहे. आपण खाली बसा. आपली टीका अन्यायाची आहे. आपणापुढे मी मुलासारखा किंवा नातवासारखाहि शोभेन. पण या वेळी मी अध्यक्ष आहे हे आपणहि विसरूं नका. आपल्या बोलण्याने

होणारा अपमान मी सोसून घेणारा नाही. आठ वाजले. नियमाप्रमाणे मी सभा बर-खास्त केली आहे." सर्वजण आश्चर्यचकित झाले. कारण जिनसीवाल्यांना हा धडा शिकविणारा कोणी भेटेल असे वाटले नव्हते. एक-दोघांना मी लहान तोंडी मोठा घास घेतला असे वाटले. पण पुष्कळ लोक म्हणाले " झाले ते बरेच झाले. कोणी तरी हा धडा त्यांना शिकवावयालाच हवा होता. जिनसीवाले विद्वान व वृद्ध झाले म्हणून काय झाले ? सभेला कांही नियम नसावे की काय ? जिनसीवाले मोठे, पण सभा ही संस्था त्याहून मोठी आहे." या प्रसगाची अद्दल जिनसीवाल्यांना चांगलीच घडली. कारण यापुढे मी अध्यक्ष असतां ते भाषण करण्याला कधी उभे राहिले नाहीतच. पण एरवी देखील उभे राहिले तरी नाखुषीनेच का होईना पण बोलणे आवरते घेत.

असो. हे मध्येच आलेले उपाख्यान लांबले. पण तो विषयहि संपला. जिनसीवाल्याच्या विषयी माझ्या मनात फार आदर असे. पण विद्वत्तेपेक्षां सुस्वभावाला मी नेहमी अधिक किंमत देतो. यामुळेच कै. विसूभाऊ राजवाड्यां-वरहि माझा मनातून राग असे. विद्वानाने उद्दाम व अन्यायी व्हावे व इतरांवर जुलूम करावा, इतरांना तुच्छतेने वागवावे, हे त्याच्या विद्वत्तेला मी तरी लांछन समजतो.

असो. पुण्यांतील माझ्या वस्तीच्या घराबद्दल सांगत होतो ते पुरें करतो. परांजपे याच्या घरातून मी राहुरकर याच्या घरी राहावयास गेलो. त्यानंतर माणकेश्वरांच्या विष्णूच्या देवळाजवळ प्रिन्सिपॉल माधवराव गोळे यांच्या घरांत राहावयास गेलो येथे मी व माझे स्नेही रामचंद्र जनार्दन गोखले, (बी.ए., भूगोल-विषयक प्रशसनीय अशा शालोपयोगी पुस्तकांचे कर्ते, फलज्योतिष आणि बुवा-बाजी यांचे कट्टे प्रतिपक्षी, आणि गूढविद्या-चिकित्सक मंडळाचे चिटणीस) यांनीं मिळून एक प्रयोग केला, व तो यशस्वीहि झाला. तो म्हणजे दोन स्नेही कुटुंबांनीं एकाच घरांत राहून एकत्र जेवणखाण करून खर्च वांटून घेणे. या योजनेला आम्हां दोघांचाहि स्वभाव अनुकूल होता म्हणूनच ती गोष्ट घडली. आणि तो प्रयोग यशस्वी झाल्याचा पुरावा हाच की, गोखले व मी यांचा स्नेह व ऋणानुबंध आजतागायत अबाधित आहे. नातेवाईकांपेक्षां समानशील स्नेह्यांचा संबंध अधिक टिकतो व सुखप्रद होतो अशी माझी खात्री आहे.

गोळे यांच्या वाड्यांत कै. प्रो. वासुदेवराव पटवर्धन हेहि दुसऱ्या भागांत बिऱ्हाडाने राहत. शेजाराला निरुपद्रवी रीतीने कसे राहावे याचा एक उत्तम नमुना म्हणजे प्रो. वासुदेवराव पटवर्धन यांचे एकंदर कुटुंब होते. पटवर्धन व मी हे राजकीय दृष्ट्या प्रतिपक्षी. तथापि वाङ्मयलालसा हा समानधर्म त्यांच्या माझ्यामध्ये होता, आणि त्या कारणापुरते तरी आम्ही एकमेकांकडे येत जात असू. पटवर्धनानंतर स्वतः प्रिन्सिपॉल गोळे हे त्या भागात कांही दिवस येऊन राहिले होते. तेहि स्नेहि या नात्याने इतके चांगले वागले की, १९०५ साली आम्ही काशीयात्रेला गेलो असता वाटेत हर्दा येथे गोंदवलेकर महाराजाना भेटण्याकरितां मुक्काम केला, तेव्हां गोळे यांनी कांही मैलावर स्वतःची शेती होती ती दाखविण्यास नेले. गोळे याचे मत सुशिक्षित लोकांनी सेवानिवृत्तीनतर शेती बागायती करावी अस होते. आणि त्याचे उदाहरण स्वतः त्यानी घालून दिले. त्याच्या शेतावर असतांना त्यांनी एक भाकीत केलेले मला आज चागले स्मरते. ते म्हणाले की, सरकाराने कायदा करून कापसाची लागवड मर्यादित केली पाहिजे, व पुढेमागे ही गोष्ट घडून येईल. मला ही गोष्ट जुलुमाची वाटली. कारण त्या वेळी मध्यप्रात वऱ्हाड खानदेश यात कपाशीच्या पिकावर शेतकऱ्याचा भर होता, आणि कापसाचा भावहि चांगला असल्यामुळे त्याना पैसा चागला मिळे. मी मतस्वातंत्र्याचा भोक्ता! पण गोळे म्हणाले, "कापसाच्या व्यापारात आम्हा लोकाना परदेशावर अवलंबून राहवे लागते. आज भाव बरा आहे तो चार वर्षे घट्ट द्या म्हणजे पद्दा शेतकऱ्याचे डोळे पाढरे होतील. कपाशीच्या पिकामुळे इतर पिके काढण्याची कला शेतकरी विसरत चालला आहे. शेतकऱ्याला कापूस अन्न म्हणून काही खाता येत नाही. तोच भाजीपाला फळफळावळ करील तर स्वतः पोटभर पौष्टिक व शुद्ध अन्न खाईल, आणि भावांत चढउतार फार न झाल्याने शेतकऱ्याचे जीवन नियमबद्ध होईल. पण हे त्याला कळत नाही म्हणून सरकारने कायदा करून कपाशी व इतर पिके यांची किमान कमाल प्रमाणे ठरवून दिली पाहिजेत." आणि आजचा अनुभव पाहतां गोळे याचे भविष्य खरे ठरले व त्यांच्या सूचनेत कांही अर्थ होता असे सिद्ध झाले आहे.

असो. १९०४ साली गायआळीत मी एक घर गहाण घेतले व तेच पुढे खरेदी झाल्यामुळे १९०६ सालापासून या नव्या घरांत राहवयास गेलो. येथे माझ्या पिढीचे पहिले मंगलकार्य झाले. ते माझा वडील मुलगा काशिनाथ (बापू)

याची मुंज झाली हे होय. या कार्यात सामाजिक सुधारणा म्हणून मी मुंजीच्या खर्चात कमी करून २५ रुपयांची देणगी अण्णा विजापूरकरांच्या समर्थ विद्यालयाला दिली. आणि देशी साखर खात्रीची नाहीं म्हणून केवळ पुरण-पोळीचे पक्वान्न केले. बापू याचे नांव काशिनाथ ठेवण्याचे कारण त्याच्या जन्माच्या वेळीं वडील-मातोश्री काशीच्या पहिल्या यात्रेला गेली होती. या नांवामुळे एका कौटुंबिक गोष्टीची आठवण निरंतर राहिली. असो. हे घर मी १९३५ साली विकले. आणि पुढे दुसरी एक–दोन घरे बांधली. पण तीहि विकली. मात्र हा व्यापार नव्हता. तर सोईकरिता व कारणपरत्वे म्हणून स्थलांतर करणे मला आवश्यक होत गेले.

पुण्यांत माझ्या राहत्या घरांची हकीकत एकत्र सांगितल्यावर आतां माझ्या कामकाजाबद्दल लिहितो. मी ता. १७ मार्च १८९६ रोजीं पुण्यास आलो. त्याच्या दुसऱ्या आठवड्यालाच मराठा पत्रांत लिहिण्याला मी सुरवात केली. माझ्या आधी कृष्णाजी हरि केळकर, बी. ए. हे टिळकांनी मराठ्याकडे तात्पुरते संपादक नेमले होते. ते एल्‌एल्. बी.चा अभ्यास करीत होते. आणि लॉ क्लास व मराठा दोन्हीहि सांभाळतों असे ते म्हणते तर टिळकांनी त्यांनाच प्रथम तरी ठेवून घेतले असते कारण कृष्णाजीपंत केळकर हे इंग्रजी बरे लिहीत. पण परीक्षा पास होतांच हायकोर्टची सनद काढण्याचे त्यांचे ठरले होते. शिवाय केळकरांची मते टिळकांना पटली असती असेहि वाटत नाही. कृष्णाजीपंत सार्वजनिक काम म्हटले कीं, नाक मुरडणारे ! प्रत्येकाला नसती नांवे ठेवण्याचा त्यांचा घमेंडखोर स्वभाव. तात्पर्य, सर्वच दृष्टीनी ते पुण्यास राहणे शक्य नव्हते. अशा रीतीने एक केळकर गेले व दुसरे केळकर आले !

पण हे घडून येण्यापूर्वी मला माझ्या हक्काकरितां थोडी हुजत घालावी लागली तो प्रकार असा. टिळकांच्या योजनेप्रमाणे मला पहिल्या वर्षी १०० रुपयेच पगार मिळणार होता. दुसऱ्या वर्षापासून तो १३५ झाला असता. पण बढतींची आशा फारशी नव्हती. तथापि वर्तमानपत्राचे व वाङ्मयाचें काम आवडीचे म्हणून तेंच पत्करले आणि एकंदरीने माझी निवड योग्य ठरली. प्रथम मराठा निम्मा एका केळकरांनी, निम्मा दुसऱ्या केळकरांनी लिहावा असा क्रम सप्टेंबर १८९६च्या नोव्हेंबर अखेर चालू होता. परीक्षा जवळ आली तसे कृष्णाजीपंत मुंबईस निघून गेले. तेव्हांपासून बहुतेक सर्व मराठा मीच लिहू लागलों व त्या जागेचा पुरा पगार रुपये साठ हा

मला मिळूं लागला. कृष्णाजीपंतांनी मात्र जाण्यापूर्वी एक अव्यापारेषु व्यापार केला. तो असा. त्यांना टिळकांनी न विचारतां त्यांनी होऊन टिळकाना लिहून कळविले की, "इंग्रजी भाषेच्या दृष्टीने तुम्ही नरसोपंताची निवड केली ती चांगली नाही." हे पत्र मला पहावयास मिळाले आणि टिळकांना मी त्याबद्दल लिहिले. तेव्हां टिळकांनी मला उलट लिहिले की, "तुम्ही ते काही मनात आणू नका. कृष्णाजीपंताना मी पुरे ओळखतो इतके की, त्यांच्या लिहिण्याने मी भलती गोष्ट कधी करीन हे शक्यच नाही." कृष्णाजीपत मुबईस जाऊन वकील झाले. त्यांची वकिलीहि चांगली चालली. पण त्याच्या इग्रजी ज्ञानाचा प्रकाश कोठे फारसा पडला नाही. उलट मी सतत वीस वर्षे मराठ्याच्या संपादकाचे काम केले व थोडेबहुत नांवहि मिळविले. कृष्णाजीपंतांनी एकाहि सार्वजनिक कामांत कधी इकडची काडी तिकडे केली नाही, व टिळकांना पुढे पंचवीस वर्षांत एक दोनदांहि ते भेटले नसतील!

या बाबतीत मी टिळकांना लिहिलेले पत्र, व त्याचे त्यांनी मला सिंहगडावरून पाठविलेले उत्तर, ही दोन्ही या खाली देत आहे. यावरून तो काय प्रकार होता हे कळून येईल.

माझे पत्र—

"सदर पत्राचा तुम्ही शांतपणाने विचार कराल अशी आशा आहे. मराठा पत्राची जबाबदारी एकट्या माझ्याकडे असावी अशी मी आपणाकडे मागणी केली होती त्याचा कायमचा निकाल काल लागावयाचा होता. ही भिजत पडलेली गोष्ट चारपांच वेळां सुनावणीस निघून अखेर पुढे ढकलली गेली. गेल्या वेळी माझ्या हक्काचा प्रश्न निघाला तेव्हां हा प्रश्न विलंब न करतां कायमचा ठरवावा असा तुमच्याप्रमाणेच माझाहि निश्चय होता. पण त्या बाबतीत तुम्हाला पुन्हा तसदी द्यावी लागत आहे याबद्दल माफ करा. मराठ्यामध्ये कोण काय लिहितो या गोष्टीला तुम्ही तितकेसे महत्व देत नसला तरी माझ्या दृष्टीने ती गोष्ट फार महत्वाची होऊन बसली आहे; व या बाबतीत माझी जी अनिश्चित स्थिति झाली आहे ती मला अत्यंत असह्य वाटत आहे.

"माझ्या मताने मराठ्याची सर्व जबाबदारी तुम्ही माझ्या एकट्यावर सोंपवावी अशी वेळ खात्रीनें आली आहे. तुम्ही मला प्रेमानें पुण्यास बोलावलेत त्या वेळी तुमचा

माझा असा ठराव होता की, कांही काळ मराठ्याचे काम तुम्ही मला न दिलेत तरी पुढे मागे मी ते खात्रीने अगावर घ्यावे. किंबहुना तुम्ही ही जबाबदारी हक्काने माझ्या अंगावर टाकावी व मीहि ती हक्काने व आनंदाने मान्य करावी. अशी स्थिति होती. मध्यंतरी या कामाकरितां माझ्याबरोबर सहकारी म्हणून तुम्ही एक दुसराच इसम नेमला. आक्टोबर अखेर के. एच्. केळकर यांना रजा द्यावी व माझ्या एकट्यावर तुम्ही काम सोपवावे असाच तुमचा उद्देश होता व तशी सूचनाहि मला देण्यांत आली होती. त्याप्रमाणे मराठा मला एकट्यास लिहावयास सांपडेल या आशेनें मी मोठ्या आनंदांत होतो. पण तुमच्या धोरणांत बदल होत असल्याचे पाहून मनांत अतिशय आश्चर्य वाटते. मराठ्याचे काम आजपर्यंत मी कांहीहि पगार न घेतां केले आहे, व के. एच्. केळकर यांच्या व माझ्या भागीदारीत मला निष्कारण अपमान व अन्याय सहन करावे लागले आहेत. तुम्ही लक्ष घालावयाचे म्हटले असते तर या गोष्टीला खात्रीने आळा बसला असता. अशा रीतीने तुमच्याहि दृष्टीने पाहिले तर माझी बाजू सर्वस्वी न्याय्य व रीतीची असतांना, तुम्ही आपल्या मनाचा निश्चय न करतां मागेपुढे कां पहावे हे मला समजत नाही. मी सर्व काम करावयास तयार असतांना केवळ ते दुसरे केळकर जात नाहीत व राहतात ही गोष्ट माझ्या मार्गांत कां यावी ! यामुळे विनाकारण माझी अडचणीची स्थिति झाली आहे व याचा तुम्ही काय तो निकाल करावा एवढीच विनंती आहे."

टिळकांचे उत्तर—

" कोणतीहि एक बाजू ऐकून माझ्या मनांत तुमच्याबद्दल गैरसमज उत्पन्न होईल अशी तुम्ही मनांत शका बाळगण्याचे कारण नाही. मी कोणाबद्दलच मत देऊं इच्छित नाही. तथापि इतकेच सांगतो की, के. एच्. केळकर यांना मी पुरें जाणतो. ते तुमच्याबद्दल माझ्या मनांत गैरसमज उत्पन्न करूं शकत नाहीत.

" तुम्ही मराठा लिहिण्याचे काम आहे असेच चालवावे. पुढला केसरी लिहिल्यावर मी सिंहगडावर जाईन व दर शनवारी खाली येऊं शकेन. म्हणून केवळ देखरेखीच्या कामाखेरीज मला जास्त कांही करतां यावयाचें नाहीं. वासुदेवराव जोशी यांना तुमच्याकरितां एक भाड्याचे घर पहावयास सांगितलें आहे. सोयीस्कर जागा न मिळाल्यास तूर्त कांही दिवस तुम्ही विंचूरकरांच्या वाड्यांत रहावयास या.

" सर जेम्स वेस्टलंड यांच्या लेखाबद्दल तुमचे मत बरोबर आहे त्यांचा लेख खोडून काढावयाला अर्थशास्त्रामध्ये एखादा आधार सांपडेल असे वाटत नाही व त्याची जरूरीहि नाही."

मी पुण्यास आलो तेव्हा टिळकाच्या घरची सर्व व्यवस्था प्रथम त्याचे भाचे गंगाधरपत विद्वास हे पाहात. घराबाहेरची देण्याघेण्यासबधाची सर्व व्यवस्था टिळकाचे परम स्नेही वासुदेवराव जोशी चित्रशाळेचे मालक याच्याकडून होई. चित्रशाळा व विंचूरकराचा वाडा ही अगदी नजीक असल्यामुळे, वासुकाका जोशी एक पंचा नेसलेले असे उघड्या अंगाने वाड्यात येत टिळकाना स्वतःच्या पेटीत पैसे ठेवून आपल्या हाताने खर्चास देणे हिशेब मांडणे या गोष्टी मनापासून कटाळ्याच्या. शिवाय केसरी विकत घेण्याकरिता लागलेली काही रक्कम टिळकानी वासुकाका यांजकडून घेतली ती अद्यापि फिटावयाची होती. यामुळे आर्यभूषण छापखान्याकडून किंवा इतर कोठून टिळकाचे पैसे येतील ते चित्रशाळेत भरावयाचे, आणि खर्चाकरिता लागतील ते पैसे चित्रशाळेकडून आणावयाचे असा व्यवहार सुरू होता. पण वासुकाकाचा स्वभाव मितव्ययी आणि टिळकाचा खर्चिक, यामुळे चित्रशाळेत जाऊन पैसे मागून आणणाऱ्या गंगाधरपतांना मोठी पचाईत होई.

घरात मामींना खर्चाला लागले तर हवे तेव्हा मिळावयाचे नाही. मग खुद्द टिळकाकडून खास निरोप जावयाचा तेव्हा रक्कम मिळावयाची. जोशी आपली मितव्ययाची सवय दुसऱ्यावरहि लादू पाहात यामुळे थोडा त्रास होई. एकदा टिळक, नामजोशी, व वासुकाका हे कोठेसे प्रवासास गेले असता सामान हमालाकडून न्यावे की स्वतः ज्याचे त्याने, याबद्दल त्याच्यात बरीच हमरीतुमरी झाल्याची गोष्ट स्वतः टिळकांनीच, एकदां वासुकाकांसमक्ष, थट्टेने सांगितलेली आठवते. पण मला स्वतःला याविषयी एक अनुभव आला त्यावरून गगाधरपंत विद्वांस याना घरखर्चास मिळविणे किती जिकीरीचे होत असेल याची कल्पना येईल. माझा अनुभव असा. माझ्या पगाराचा महिना उलटून गेल्यावर एक दिवस मी व माझे वडील बंधु चित्रशाळेवरून जात असता दहापांच रुपयांचे जिन्नस खरेदी करण्याची आठवण झाली. पगार यावयाचाच होता. म्हणून मी वासुदेवराव यांना म्हणालो " काका पगार देता का ! बाजारांत निघालों आहो." पगार शभर रुपये येण्याचा होता. मी रक्कम आगाऊ मागत नव्हतो. पण वासुदेव-



१८९६ सालीं पुण्यास आल्यावर प्रथमच घेतलेलें
**केळकरांचें** छायाचित्र.

( पृ. २०८ )

राव आपले पुतणे शंकरराव जोशी यांजकडे वळून म्हणाले "अरे शकर, केळकरांना पांच रुपये खर्चाला दे बरे!" आम्ही दोघे थंडगारच झालो. आणि ते रुपये न घेता तसेच गेलो. पण दुसरेच दिवशी मी गगाधरपतांना ही हकीकत सागन म्हणालो "सपादकाला व लॉ लेक्चररला पगार देण्याची ही कुठली रीत! मी काय चित्रशाळेच्या कारखान्यातला मजूर म्हणून 'खर्चाला' अंगावर पांच रुपये फेकावे!" तेव्हा ते म्हणाले "अहो आम्हालाहि असाच त्रास होतो. पण करणार काय? असो. यापुढे तुम्ही चित्रशाळेत अशा कामाकरितां जाऊंच नका मला पगाराची नक्की तारीख ठरविता येणार नाही, पण यापुढे माझे मीच वाटेल ते करून तुमचा पगार एकरकमी पोचता करीत जाईन म्हणजे झाले."

१८९६ साली एप्रिल महिन्यात वडील बधु नाना यांची नेमणूक पुणे हाय-स्कूलात झाली, व लगेच भोरचे युवराज पुणे हायस्कूलांत शिकत होते त्याजकडे खाजगी शिक्षक म्हणून त्याना घेण्यात आले त्या मे महिन्यात युवराजाबरोबर नाना महाबळेश्वरास गेले त्याच्या निमत्रणावरून मीहि दोन दिवस गेलो. नाना तापाने आजारी झाले म्हणून मला महाबळेश्वरास अधिक राहतां आले नाही. तथापि श्री बाबासाहेबाचा माझ्याशी ऋणानुबंध जडला तो आज ४२ वर्षे अबाधित आहे. महाबळेश्वरास असतां युवराजाचे वडील, थोरले पतसचीव, यांचा सुप्रसिद्ध काटेकोर-पणा म्हणा कृपणपणा याचा थोडा अनुभव आला. युवराजाना तेव्हा तनखा असा तोडून दिलेला नव्हता. दरबारचा एक कामगार युवराजाबरोबर असे. तो पैसा-पैवार खर्च टिपून ठेवीच पण स्वारीत खाशाखर्चाकरितां पावी ठरलेल्या आकारा-हून अधिक खर्च होऊ देत नसे. मी अभावित गेलेला म्हणून माझ्या दोन दिव-साच्या भोजनाचा खर्च युवराजाच्या खासगी रकमेतून नावे पडला! हे ऐकल्यावर, जुन्या कारकीर्दीत रावनवमीच्या जेवणावळीतील उष्ट्याखरकट्याचा लिलाव होई अशी गोष्ट मला कोणी सागत, ती अतिशयोक्ति नसावी असे मला वाटू लागले.

१८९६ च्या मे महिन्याच्या अखेरीस टिळकांच्या बोलावण्यावरून मी सिंह-गडास चार दिवस राहण्यास गेलो तेव्हांची एक आठवण सांगण्यासारखी आहे. गडाला जावयाचे तर तांग्याने पायथ्यापर्यंत जाता येई. पण तांग्याला तीन साडेतीन रुपये पडत. शिवाय तरुणपणची धमक मोठी म्हणून मी पायी जाण्याचे ठरविले. मेचा उन्हाळा होता तथापि घरी फराळ करून व थोडा बरोबर घेऊन

भर दोनप्रहरी छत्री घेऊन पायी निघालो. खडकवासल्यावर फराळ करून पाणी पिऊन थोडी विश्रांति घेतली. सुमारे साडेपाच वाजता जवळ जवळ पायथ्याशी पोचलो. तसाच पुढे पायी गड चढून जावयाचाहि पण माझे श्रम दैवाने वाचविले मी गड चढू लागणार तो स्वतः टिळकच गडाखाली उतरून आलेले भेटले सरदार विंचूरकर याना काही सल्ला घ्यावयाचा होता म्हणून त्यानी बोलावणे पाठविले होते ती चौचाकी झाडाखाली उभीच होती मग गडावर न जाता त्याच गाडीतून परत आलो, आणि दोन दिवसानी फिरून टिळकाबरोबर सिंहगडास गेलो. टिळकाना वृषणवृद्धीचा विकार होता तरी ते पायाने सिंहगड चढत मी तर चोवीस वर्षांचा तरणाबांड मीहि पायाने चढून गेलो. यापुढे अनेकदा मी हा गड पायाने चढून गेलो यदा तानाजी उत्सवाला गेलो तेव्हा अव्यवस्थेमुळे मला खुर्ची मिळाली नाही. तरी मी कष्टाने निम्मा गड पायी चढून गेलो. मग खुर्ची मिळाली पूर्वी १९२२ साली ना दत्तोपंत बेळवी यांच्या बरोबर फाल्गुनी पौर्णिमेला अवशी सिंहगडाला निघालो ते बैलगाडीत व मी पायी असे गप्पा मारीत गेलो दोन तासानी त्याना झोप आली तेव्हा मी चांदण्याचे व व थंड वाऱ्याचे सुख भोगीत सिंहगडापर्यंत चालत गेलो आणि पहाटे झोप काढून सकाळी पायाने गड चढत गेलो १९३५ साली घरत मास्तराच्या समारंभाला गेलो त्याहि दिवशी कनकेश्वरच्या डोंगरावर मी पायीच चढलो रायगडावर मी तीनदा गेलो तोहि पायाने चढूनच. तेथे खुर्च्या मिळतच नाहीत म्हणा! तात्पर्य माझी शरीरप्रकृति सुदृढ असल्याचा हा चांगलाच पुरावा होय

टिळकाबरोबर परत सिंहगडास गेलो तेव्हा त्या चार दिवसात गडावरील वादळी वैभवाचे रूप मला पाहावयास सापडले. सायंकाळी पाऊस भरून आला. गारा पडू लागल्या वारा सोसाट्याचा इतका सुटला की सर्व दार खिडक्या लावून घेऊन गुरगटून बसलो इतक्यात वाऱ्याच्या एका सोसाट्याने टिळकांच्या बंगल्यावरचे सर्वच्या सर्व गवती छप्पर उडून गेले तेव्हा छप्पर फाटण्या ऐवजी आभाळ फाटल्यासारखे वाटले! दोन तास साधी कोपऱ्यात कसेबसे घालवून रात्रीच, गडाच्या पूर्व दरवाज्याजवळ मिशनऱ्याचा एक बंगला आहे त्यात मुला-माणसासह निजलो आणि सकाळी पुण्याची वाट धरली.

खासगी वेळातील उद्योग म्हणून १८९६ च्या अखेरीस मी राष्ट्रीय सभेचा इतिहास लिहिण्यास हाती घेतला होता. संस्था दहा वर्षांचीच होती. पण आता

महत्व प्राप्त झालेली. तिचे ठराव विषयवार मांडून विचारप्रगतीचा एक प्रकारचा नकाशा तयार करावा व 'प्लेट' काढावें असा विचार होता. त्याकरिता राष्ट्रीय सभेच्या उत्पत्तीचा इतिहास विचारण्याकरिता न्यायमूर्ति माधवराव रानडे याना मुंबईस जाऊन भेटलो. त्यानी तो सर्व सांगितला व वरती उपदेश केला की, "कोणत्याहि विषयावर प्रथम सरकार आपल्या पत्रकात किंवा रिपोर्टात काय म्हणते हे पाहत जा व मग टीका करा. टीका कडक असो, पण सुप्रतिष्ठित असावी."

माझी आठवण बरोबर असेल तर हल्लीचे महात्मा गांधी दक्षिण आफ्रिकेतील हिंदी लोकांचे गाऱ्हाणे इकडे सांगण्यासाठी आले होते. तेंहि मी रानड्यास भेटायला गेलो तेव्हाच त्याना भेटावयाला आले. गांधी तेव्हा कोट, पाटलोण व डोक्याला मागे पदर सोडलेली काळी रेशमी बंगाली पद्धतीची टोपी घालीत असत.

१८९६–९७ साली डेक्कन सभेची स्थापना होऊन जहाल मवाळ असे दोन तट कायमचे पडले. सार्वजनिक सभा टिळक पक्षाच्या हाती गेली म्हणून डेक्कन सभा निघाली. आणि त्याच्याच अनुषंगाने सार्वजनिक सभेच्या माडीवर भरणारा क्लब सोडून गोखले पक्षाने किबे याच्या वाड्यात वेगळा क्लब काढला. दोन सभा, दोन क्लब, दोन वर्तमानपत्रे, पुढारी व अनुयायी यांचे दोन संघ अशा—म्हणजे भारतीय युद्धातील कौरव-पांडव सैन्याच्या रचनेच्या—थाटाने पुण्यातील राजकीय पक्षाचे युद्ध या साली सुरू झाले. मात्र या ठिकाणी दोन पांडव व दोन कौरव होते! कारण प्रत्येक पक्ष स्वतःलाच खरा एकटा सत्पक्ष मानी. तेव्हा सुरू झालेले हे युद्ध अजूनहि सर्वस्वी थांबले आहे असे म्हणता येणार नाही. पण तेव्हा बाहेर इतर प्रांतात म्हणण्यासारखे राजकारण निर्माण झाले नव्हते. म्हणून पुण्यास काय घडते याचा प्रतिध्वनी बाहेर उमटे. रानडे मुंबईस असले तरी पुण्याच्या गोखले पक्षाचे खरे पुढारी तेच, हे बाहेर लोकाना ठाऊक होते. आणि टिळकाना बंडखोर मानीत तरी त्याच्या कृति व हालचाली याच्याविषयी बाहेरच्या प्रांतातून कौतुक झाल्यावाचून राहात नसे.

माझे स्नेही दोन्ही पक्षात होते. विशेषतः माझ्या बंधूचे स्नेही त्यातल्या त्यांत मवाळ पक्षात अधिक होते. कारण त्या पक्षात सरकारी नोकराचा भरणा अधिक. टिळकाच्या पक्षालाहि सरकारी नोकर नव्हते असे नाही. उदाहरणार्थ, बाबासाहेब पेंडसे. हे कमिशनर साहेबाचे असिस्टंट. कौन्सिल निवडणुकीच्या

कामांत त्यांची मदत टिळकांना पुष्कळ झाली. पण ती सर्व गुप्तपणे. ते क्लबांत वगैरे कधी येत नसत. कारण टिळक हे सरकारला अप्रिय होऊं लागले होते. यामुळे सरकारी नोकरांना टिळकांशी उघडपणे संबंध ठेवता येत नसे. मवाळ पक्षाचे मित्र मात्र सरकारी नोकर असले तरी त्यांच्या राजकीय पुढाऱ्यांशी उघड-पणे स्नेहसंबध ठेवू शकत कारण तो पक्ष सरकाराला अप्रिय नव्हता. राष्ट्रीय-पक्षाचा शत्रु किंवा विरोधी म्हणून सरकारचे त्याला सहाय्य असे पण सरकारी नोकरांच्या नांवाचा उघडपणे उपयोग मात्र करावयाचा नाही म्हणून दोन 'देवता'-च्या नावाने वादांतून व्यवहार चाले. रानड्याचे घर रामेश्वराजवळ, आणि बाबा-साहेब पेंडसे यांचे बिऱ्हाड सोट्या-म्हसोबाजवळ—यामुळे रामेश्वर व म्हसोबा ही नांवे उच्चारली की, मवाळ पक्ष व राष्ट्रीय पक्ष असे लोक आपोआप समजत.

पक्षाभिमानाच्या दृष्टीने मी कट्टर नाही ही गोष्ट टिळकाना प्रथमपासूनच कळून चुकली होती ही एकच गोष्ट माझा केसरी-मराठ्याशी संबंध तोडण्याला पुरेसे किंवा योग्य कारण होऊ शकत नाही असे मी तर मानीतच होतो यांत आश्चर्य नाही. पण आश्चर्य हे की, स्वतः टिळकांचा स्वभाव तीव्र पक्षाभिमानी असतां त्यांनीहि तसे उभ्या जन्मांत मजविषयी मानिले नाही. या विशेष परि-स्थितीमुळे इतर म्हणजे कट्टरपक्षाभिमानी लोक टिळकाना मजपेक्षां अधिक जवळ वाटत. आणि केव्हा केव्हा अगदी गुप्त स्वरूपाची खलबते होत त्यात मुद्दाम होऊन मला बोलावणे पाठवावेंच असे घडत नसे पण मीहि माझा स्वभावदोष जाणून होतो, व त्या अव्हेराची तक्रार कधी केली नाही. टिळकांचाहि स्वभाव खरोखरच असा की, जोडलेला मनुष्य सहसा तोडावयाचा नाही त्यांच्याशी संबंध आलेले लोक स्वतःच संबंध तोडून गेले अशी काही उदाहरणे घडली. पण त्यात बराचसा दोष, किंवा निदान अखेरचे संबंध तोडण्याचे कृत्य करण्याचा दोष, त्या त्या लोकांकडे होता असे म्हणावे लागेल. लघळपणा न करितां, लांगूल चालन न करितां, मतभेद संभाळून, स्वाभिमान राखून, टिळकांच्या परिवारांत राहून काम करणे अशक्य नव्हते.

•

१८९६ अखेर दुष्काळ पडला. तेव्हां टिळकानी सार्वजनिक सभेच्या वतीने मोठी चळवळ केली. पूर्वी १८७६ च्या दुष्काळाच्या वेळी रानड्यानी सभेमार्फत बाहेर लोक पाठवून रिपोर्ट मागवून त्रैमासिकांत ते छापून वाटण्याचे व सरका-

राकडे पाठविण्याचे नमुनेदार काम केले होते. तेच उदाहरण टिळकांनी डोळ्या-पुढे ठेऊन पण अधिक तीव्रतेने चळवळ केली. बाहेरगांवी पाठविण्याला त्याना या वेळी चागले जबाबदार लोक व पदवीधरहि भिळाले. त्यात कै. अच्युत सिताराम साठे हे तरुण तरतरीत गृहस्थ होते. ते कलकत्ता युनिव्हर्सिटीचे एम्. ए. झालेले असून एल्एल्. बी चा अभ्यास करीत होते. पण एव्हाच इग्रजी लिहिण्याबोलण्यांत कुशल व धीट. सार्वजनिक कामाची मोठी आवड. शिवाय खेडेगावी जाऊन कोकणी किवा खेडवळ भाषा बोलून लोकाची मने हस्तगत करण्याची हातोटी त्याना साधे. ठाणे जिल्ह्यात कुलाबा जिल्ह्यांत त्यानी बरेच दौरे काढले खत्तलवाड येथील त्याची सभा पोलिस शिपायाच्या सगिनीच्या गराड्यात झाली असे सांगतात! कुलाबा जिल्ह्यातील एका भाषणाकरिता त्याच्यावर खटलाहि भरण्यात आला होता

या चळवळीत सातारा जिल्ह्याची कामगिरी मजकडे देण्यात आली होती. त्याप्रमाणे त्या जिल्ह्यात मी पाच-चार ठिकाणी जाऊन सार्वजनिक सभेकडे रिपोर्ट केले मला थोडी अडचण अशी वाटली की, वडील बधु तेव्हा सातारच्या कलेक्टराचे डेप्युटी चिटणीस होते. वास्तविक त्याजकडे मुलकी काम नव्हते. फौजदारी व इतर होते. तथापि वड्याचे तेल वाग्यावर काढण्याची सरकारची रीत प्रसिद्धच आहे. म्हणून मनात भीति. तेव्हा माझे बधुच मला म्हणाले की, जिल्हा कलेक्टर मि. विंचेस्टर हे तसे सज्जन आहेत तेव्हा तू होऊन त्याची मुलाखत घेईनास! दुष्काळी सरकारी व्यवस्थेची माहिती अधिकृत अशी त्यानी सांगितल्यास तिचाहि तुला पडताळा पाहता येईल. मग मी बधूची ओळख न देतां स्वतःच जाऊन कार्ड आत पाठवून साहेबाची भेट घेतली आणि त्यानीहि सभेच्या चळवळी-विषयी राग प्रकट न करिता मजकडून माहिती विचारून घेतली व स्वतःची सांगितली. ते म्हणाले "तहकुबी सुटीचे रिपोर्ट आम्ही करीत नाही असे समजूं नका, पण वर सरकार धोरण ठरवील ते ठरवील." मग ते थट्टेने आणखी म्हणाले, "तुमच्या सभेला असे वाटते काय की, सारासुटीची माफीची मागणी करण्यास तिने शेतकऱ्यास नव्याने शिकविण्याची गरज आहे? त्यांना ती माहिती आधीच असते. आता त्यातून राजकारण उत्पन्न करावे असा तुमच्या सभेचा हेतु असेल तर मग निराळे!" शेवटी निरोप देताना म्हणाले, "तुमच्यासारखे तरुण पदवीधर लोक खेड्यांपाड्यांनी पायपिटी करू लागले याचे मला आश्चर्य वाटले. कारण ही गोष्ट पूर्वी घडलेली नाही." मागाहून मी डेप्युटी चिटणीसांचा

भाऊ हे त्यांना कळल्यावर त्यांनी बधूना बोलावून "तुमचा भाऊ अजून अनुभविक नाही पण होतकरू दिसतो" असे उद्गार त्यांच्याजवळ काढल्याचे घरी आल्यावर मला बधूनी सांगितले.

असो. टिळक-चरित्रांत या विषयावर लिहिलेच आहे. येथे या चळवळीच्या दौऱ्यांत एक गमतीचा अनुभव आला त्याची आठवण तेवढी देतो. ती अशी :—

कै. अच्युतराव साठे याच्यावर खटला झाला त्याची सुनावणी पेण येथें होत असतां टिळकाचा मुक्काम तेथ पडला होता. त्याच्याबरोबर प्रो. पराजपे व मी गेलो होतो. या वेळी बाहेरगावच्या लोकांकडून सभेला व्याख्यानाला जाण्याची निमत्रणे टिळकाकडे येत असत. तसले एक निमत्रण पेणच्या मुक्कामांत आले. पण टिळकाना स्वतः जाता येण्यासारखे नव्हते म्हणून त्यानी परांजपे व मी या दोघांना जाण्यास सागितले.

हे निमत्रण कल्याणजवळील टिटवाला या गावचे होते, व त्यात "सभेची मोठी तयारी केली आहे, गावगन्नाचे पुष्कळ लोक येणार आहेत" असे लिहिलें होते. त्याप्रमाणे आम्ही आधी पत्र पाठवून पेणहून कल्याणवरून टिटवाला स्टेशनावर सकाळी दहाचे गाडीला उतरलो.

आमची अपेक्षा अशी होती की, स्टेशनावर स्वागत करण्याला गांवची मडळी आली असतील ! पण एकहि नव्हता ! फार काय त्या गाडीला आम्हां दोघाशिवाय इतर एकहि प्रवासी स्टेशनवर उतरला नाही. प्रथम आम्ही विचार केला की, काही वेळ थाबून दुसऱ्या गाडीने कल्याणास परत जावे. पण पुनः म्हणालो, की काही तरी गैरसमज वा चुकामूक झाल्यामुळे स्टेशनावर कोणी आले नसेल. तरी गांवात जावेच.

मग एक बैलगाडी करून आम्ही टिटवाल्यास गेलो. पण गाडी कोणाच्या दाराशी उभी करावी ? एरवी कांही नाही म्हटले तरी अशा खेडेगांवी पागोटीं घातलेले दोन 'पुणेरी पाहुणे' आले एवढ्यामुळे तरी चार लोक जमतील व आमची विचारपूस करतील असे वाटले होते. पण कदाचित् प्लेग असल्यामुळें अगर दुष्काळ असल्यामळे गांव अगदी उजाड दिसत होता.

शेवटी आम्ही गाडीवाल्यास सांगितले, की गांवांतील शाळामास्तर कोणी असेल त्याच्या घरी गाडी घेऊन चल. शोध करता करतां त्याला ते घर सापडले. मास्तर घरीच होता. आम्हाला पाहून त्याला अचबा वाटला. त्याने अधिकउणे कांही न विचारता त्याच्या दोनखणी घरात नेऊन आम्हांला बसविले. पण पाहुणचाराचा पत्ता नाही! आम्हीच तोड धुण्याला पाणी मागून घेतले तेव्हां चहाची सोय अर्थातच नाही हे लक्षांत येऊन, मास्तर नाहीसे पाहून, आम्ही एकमेकांची बरीच थट्टा केली पुढे बारा वाजले तरी यजमान स्नानाला उठा म्हणेनात. तेव्हां आम्हांलाच तोंड उघडून, आम्ही का कशाकरितां आलो हे सांगावे लागले. आणि तो काही झाले तरी शाळामास्तर असल्यामुळे, व कदाचित् वर्तमानपत्रे वाचणारा असल्यामुळे, आमच्यासारखे पाहुणे अशा कामाकरितां आले हे पाहून एका बाजूने त्याला सद्भाग्य वाटले, पण लगेच सरकारी नोकर म्हणून त्याला आमचा पाहुणचार करण्याची भीति वाटू लागली! तरीहि त्याने आपले सर्व धैर्य एकवटून, " आपण आता येथेच राहा. गावात सभेचा कार्यक्रम वगैरे ऐकिवांतहि नाही. आज माझ्या घरी श्राद्ध आहे. परगावाहून ब्राह्मण येण्याची वाट पाहत आहे. ते आल्यावर चार वाजता जेवण होईल आणि मग सध्याकाळचे गाडीने आपण परत जा " असे सांगितले.

श्राद्धाच्या दिवशी घरांत जेवणापूर्वी कोणी काही खात नसते; मग आम्हांला आमचा यजमान 'कांही खा' कसे म्हणणार? आम्ही आंघोळी करून आलो तरी ब्राह्मण येईनात. तेव्हां त्याची अडचण ओळखून शिवरामपत मास्तरला हळूच म्हणाले, " आम्ही दोघे गृहस्थ असलो तरी तुमचे ब्राह्मण न आल्यास क्षण घेऊन पाटावर बसू. तुमची मुळीच अडचण होऊं देणार नाही. "

पण काही वेळाने ब्राह्मण आले व श्राद्धकर्म सुरू झाले. मग आम्ही उपरणी पांघरून, कपडे उशाला घेऊन, रिकाम्या पोटी चांगली दोनअडीच तास झोप काढली. साडेतीन वाजतां उठलो. तोवर पाने मांडली होती व चूळ भरून आम्ही जेवावयास बसलो. जेवण कशा प्रकारचे होते याचे वर्णन करीत नाही. भोजन होतांच आम्ही गडबड करून, यजमानाचे आभार मानून, एक गाडी काढून, सामान घालून निघालो. गांवाबाहेर सुमारे एक मैलभर गेल्यावर लांबून कोणी एक मनुष्य, " अहो थांबा, अहो थांबा "

असे म्हणून धावत येतांना दिसला. आम्ही गाडी थांबविली. गाडीशी येतांच त्याने रस्त्यावर दडवत घातले व दोन्ही हातांनी आपल्या तोंडांत मारून घेऊं लागला. आम्हांला कांहीच अर्थ कळेना. पण मग हुदके आवरून तो म्हणाला, "मी तुमचा मोठा अपराधी आहे. येथे दुष्काळी चळवळीनिमित्त व्याख्यान देण्याकरिता नामदार टिळकांना बोलावण्याचे पत्र मीच धाडले. पण ते गावांत कळल्यापासून माझ्यावर बहिष्कार पडला आहे. गावात चार कुणबी होते ते मुद्दाम आपल्या शेतांवर निघून गेले. सभा करीन तर या देहा-शिवाय दुसरा श्रोता तुम्हाला मिळाला नसता. गाव भिऊन गेला. तेव्हां तुम्हांला येऊन भेटून तरी काय करू? मला माफ करा."

तेव्हा सर्व मजकूर आमच्या लक्षांत आला मग शिवरामपतांनी आपल्या मोहक वाणीने त्याला परोपरीने आळवून, विनयशीलतेने त्याचीच उलट क्षमा मागून, मनधरणी व सांत्वन कसे केले असेल याची कल्पना शिवरामपतांच्या खासगी भाषणशैलीची ज्याना ओळख असेल त्यांना चांगली येईल.

शिवरामपताना मनात वाटणारा विनोद त्याच्या तोंडावर इतका सूक्ष्म प्रगट होई, की तो त्यांच्या परिचितानाच उमगावयाचा. म्हणून त्या बिचाऱ्या तिऱ्हाइताला तो उमगला नाही. शिवरामपत जे जे बोलत ते ते सर्व खऱ्या मनाने बोलत आहेत असेच तो समजला. पण मला विनोद पोटात ठेवता येत नाही; हसू आल्याशिवाय राहात नाही. त्याप्रमाणे तोंडाला पदर लावून मी खूप हसत होतो. शेवटी या प्रसगांतून निभावून आम्ही कसे तरी स्टेशनावर गेलो.

पुढे पुण्यास आल्यावर विचूरकराच्या वाड्यांत मडळी जमली व टिळकां-पुढे ही सर्व हकीकत शिवरामपंतांनी सजवून सांगितली, तेव्हां किती हशा पिकला असेल याची कल्पना होईलच. सरकारला अप्रिय असणाऱ्या चळवळीचा परामर्ष खेडेगांवांत कसा घेतला जातो याचा तो पहिलाच अनुभव तेव्हां आम्हांला आला. तसेच सध्याकाळी चार वाजेपर्यंत उपोषण पडल्याने, दुष्काळ-ग्रस्त लोकांचे दुःख काय असेल याचीहि जाणीव आम्हां शहरवासी पांढर-पेशांना एक दिवस झाली.

टिटवाल्याच्या ह्या मोहिमेचे वर्णन अनेक वेळा रसभरित रीतीने करून शिवरामपंतांनी आपल्या मित्रांची करमणूक केली आहे. आणि चाळीस वर्षांची गोष्ट,

तरीहि पण त्या प्रसगाची आठवण माझ्या मनावर चांगलीच ठिबली आहे. आमचे एक मित्र कै. हर्डीकर, या दुष्काळी चळवळीत व्याख्याने देण्याला जाऊन मेजवानीचे अजीर्ण होऊन परत आलेल्या लोकाची नावनिशी थट्टेने सागत ! तेव्हां त्याला उतारा म्हणून आम्हीहि आमचा हा अनुभव मजेने सागत असूं.

मराठा पत्र चालविणे व वकिलीचा वर्ग चालविणे या दोन गोष्टीपैकी मला दुसरी त्यांतले त्यांत अवघड वाटत होती हे पूर्वी एका ठिकाणी सागितलेच आहे. आणि ती गोष्ट थोडी प्रत्ययालाहि आली. मी एल्एल्. बी. पास झालो होतो हे खरे, पण केवळ ही परीक्षा पास झाल्यामुळे कोणी मनुष्य तेच विषय दुसऱ्याला शिकविण्याला सत्पात्र होतो असे मला वाटत नाही. स्वतःच्या परीक्षेच्या तयारीपेक्षां विद्यार्थ्यांना तो विषय समजून देण्याला वाचन अधिक लागते. शिवाय अभ्यास करणारी मुले, निदान त्यातील बुद्धिवान व चिकित्सक मुले, त्या विषयाचा सूक्ष्म अभ्यास घरी करून वर्गांत शका विचारण्याची तयारी करून येतात. त्याची उत्तरे जागच्याजागी देण्याला नवशिक्या शिक्षकाला कठिण जाते.

मजकडे टॉर्ट, पिनलकोड, सिव्हिल प्रोसिजर कोड, क्रिमिनल प्रोसिजर कोड हे त्यांतल्यात्यात सोपे असे विषय टिळकानी दिले होते. व हिंदु लॉ, कॉन्ट्रॅक्ट ॲक्ट, इक्विटि, पुराव्याचा कायदा वगैरे अवघड विषय त्यानी आपणाकडे ठेविले होते. पैकी पिनलकोड व टॉर्ट हे विषय मी बरे शिकवीत असे. परंतु सिव्हिल व क्रिमिनल प्रोसिजर हे विषय चांगले शिकविण्याला वकिलीचा अनुभव काही थोडा तरी असावा लागतो तो मला नव्हता. साताऱ्यास नऊ महिने वकिली केली. तीत मी अव्वल दिवाणी दाव्यांतील एकहि फिर्यादअर्जी स्वतः लिहून गुदरली नव्हती. एकदोन साध्या प्रतीचे फौजदारी मुकदमे तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेटपुढे चालविले पण तीत बहुशः तोडपाटिलकी होती. गरीब निराधार आरोपीकरितां खुनाच्या खटल्यांत सरकारतर्फे वकील देतात तसले एक वकीलपत्र मला मिळाले होते. पण अशा कामी ते शिरस्तेदाराची कृपा म्हणून एखाद्या नवशिक्या वकिलाला देण्यांत येते. म्हणजे आरोपी जसा पैशाने गरीब तसा त्याचा वकील कायद्याच्या ज्ञानाने गरीब ! मी दोन दिवाणी अपिले मात्र चालविली होती. पण अपिलांत प्रोसिजरचे ज्ञान फारसे लागत नाही. तात्पर्य दिवाणी काय, फौजदारी काय अव्वल दावे चालविण्याचे ज्ञान मला मुळीच नसल्याने ती कामे चालविण्याची कायद्यांतील किचकट कलमे

मला स्वतःलाच गोंधळांत पाडीत. शिवाय अलीकडे कायद्याच्या विषयावर जी सटीक संक्षिप्त म्हणजे बोधप्रद पुस्तके तयार होतात त्याचीहि मदत मला तेव्हां नव्हती. कलमांतील वाक्याचा अर्थ कळे; पण त्यांचा सोपपत्तिक व सोदाहरण खुलासा करणे अवघड जाई. तात्पर्य, माझ्याकडे आलेल्या विषयांपैकी मी दोन बरे शिकविले व दोन स्वतः माझ्याच मनाला समाधान देतील असे शिकवू शकलो नाही असे मला स्मरते मात्र इंग्रजी भाषा फारसा न अडखळता व फारशा चुका न करिता मी बोलत होतो असे वाटते. या प्रोसिजर शिकविण्याच्या बाबतीत विद्यार्थ्यांनी आपले असमाधान टिळकांकडे एकदां व्यक्त केले होते. पण ते तरी काय करणार ? तेवढा पेपर शिकविण्यापुरता सराइत वकील त्यांना कोठून मिळणार ! माझ्या जागी पूर्वी शिक्षक असलेले वाकनीस हे कोर्टातून कामे चालवीत असल्याने, त्यांच्या माझ्या शिकविण्यातील यापुरते अंतर सहजच विद्यार्थ्यांच्या लक्षांत आले असावे.

असो, दोन्ही वर्गात मिळून ६०-७० विद्यार्थी होते. त्यातील दोघाचौघाची नांवे मला आठवतात.पैकी सर्वांत हुशार विद्यार्थी वासुदेव लक्ष्मण चिपळूणकर हा वाटे.हे हल्ली अकोल्यास एक पुढारी वकील असून, यशस्वी व विचारवंत थिऑसफिस्ट, व्याख्याते व कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांच्या शंकांना उत्तरे देणे सर्वांत कठिण जाई. पण उत्तर समाधानकारक मिळाले न मिळाले तरी ते विनयशील वृत्ति सोडीत नसत. दुसरे एक विद्यार्थी वामनराव तळवलकर. हे पुढे पुण्यास वकिली करीत होते. हेहि चिकित्सक पण वावदूक व हटवादी. यामुळे उत्तर समर्पक असले तरी ते पटलेच नाही व शेवटी आपलेच खरे असे भासविण्याची त्यांची वृत्ति असे. हा त्यांचा मनोधर्म पुढे स्वतः त्यांचा त्यानाच वकिलीच्या धंद्यांत नडला असे म्हणतात; पण मलाहि त्याचा अनुभव, ज्या सार्वजनिक कार्यांत त्यांचा माझा संबंध निकट आला, तेथे पटल्याशिवाय राहिला नाही. असो. त्या व पुढच्या वर्षांत माझ्या हाताखाली शिकलेले अनेक विद्यार्थी आता तीस-तीस वर्षे वकिली करून सेवानिवृत्त झालेले व केस पिकून माझ्या इतके वृद्ध झालेले क्वचित् कोठे भेटतात, व मौजेने माझ्या गुरुत्वाची व आपल्या शिष्यत्वाची ओळख देतात. पण गुरूला आपल्या सर्व शिष्यांची ओळख असण्यापेक्षां कोणत्याहि शिष्याला आपल्या गुरूची आठवण राहणे स्वाभाविकच नव्हे काय ?

आमचा लॉ क्लास टिळकांच्या खटल्यामुळे बंद पडण्यापेक्षां पुण्यांतील प्लेग-मुळे बंद पडला हेच म्हणणे अधिक खरें कारण टिळक परत आल्यावर त्यांना लॉ क्लास चालविणे सांपत्तिक दृष्ट्या सोयीचे होते; व स्वतः त्यानी त्याचे काम सोडले असते तरी माझ्या जोडीला दुसरा एखादा शिक्षक देऊन त्यानी तो चालविला असता. कारण मला मराठ्याकडे फक्त साठ रुपये पगार मिळे. माझ्या उरल्या ७५ रुपयांची तजवीज केसरीच्या उत्पन्नातून तेव्हा होण्यासारखी नव्हती. पण प्लेग सतत चालू राहिल्यामुळे तो क्लास बंद करणे शेवटी प्राप्त झाले. आणि टिळकांच्या खटल्यामुळे पुढे जे स्थित्यंतर झाले व मराठ्याचा कायमचा संपादक मी ठरलो तेव्हा केवळ ६० च पुरत नाहीत परन्तु १३५ हि देतां येत नाहीत, म्हणून माझा कायमचा पगार १०० रुपये मराठ्याच्याच जागेवर ठरला. लॉ क्लासच्या शिकवणीने मला कोणताच विशेष फायदा झाला नाही. कायदे वाचून मिळणाऱ्या ज्ञानाचा उपयोग नव्हता; कारण मी पुढे वकिली करणार नव्हतो. आणि कायदा शिकवितांना बोलण्याच्या सरावाने सार्वजनिक वक्तृत्वहि येण्यासारखे नव्हते. वर्गांत बोलले ते वर्गाच्या हवेंत उडून गेले. लेखन हे मात्र टिकू शकते. कारण मराठ्यांत किंवा केसरीत अगदी प्रथम प्रथम मी लिहिलेल्या लेखा-पैकीहि कांही असे बरे साधले आहेत की, ते माझ्या इंग्रजी लेखसंग्रहात किंवा समग्र केळकर वाङ्मयांत समाविष्ट करणे अयोग्य वाटले नाही.

टिळकांना इतर कार्ये असल्यामुळे वर्तमानपत्रांत लिहिण्याचे काम हे त्यांना फावल्या वेळांत करावे लागे. याच्या उलट लॉ क्लास शिकवून झाल्यावर उरलेला सर्व वेळ मी वाचनांत व लिहिण्यांत घालवी. इंग्रजी लिहिण्याची हौस असली तरी नवशिकेपणामुळे व मराठा पत्राच्या महत्वामुळे विचार करून जपून लिहावे लागे. पण अभ्यास केल्याशिवाय नुसते जपून लिहून काय होणार ? मराठा पत्राचा तेव्हाचा आकारहि मोठा होता. व मोठमोठी दोन आर्टिकलें व पांच-चार कॉलम स्फुटें इतका मजकूर लिहावा लागे. एक आर्टिकल राजकीय विषयावर व एक अवांतर विषयावर असा परिपाठ असे. यामुळे लिहिण्याच्या हौसेला पुष्कळसा वाव सहजच मिळे. टिळकांच्या कारकीर्दीचा तो प्रारंभ असल्यामुळे त्यांना प्रचलित वादाच्या विषयावर इंग्रजीतहि आर्टिकलें लिहावी लागत; व ही लिहितांना हस्त-लेखकाचे त्यांचे काम मलाच करावे लागे. विचारसरणीच्या दृष्टीने माझे इंग्रजी लेख टिळकांना हवे तसे असतच असे नाही. परंतु माझी भाषापद्धति त्यांना बरी

वाटत असावी, कारण भाषेच्या दृष्टीने ते माझ्या लेखांत फारशा सुधारणा करीत नसत. मात्र वादांत बाजू अंगावर येण्यासारखी वाक्ये, प्रांजलपणाच्या भरांत दिलेल्या नसत्या कबुल्या माझ्या लेखातून ते काढून टाकीत, व गोडवेपणाचे शब्द कोठे असल्यास तेहि काढून त्यांचे जागी ठसठसीत किंवा तिखट शब्द घालीत. पण उलट एकादे वेळी असेहि होई की, लिहिताना रागाच्या भरात माझे हातून अयोग्य शब्द पडले तर तेहि काढून टाकण्याची खबरदारी ते घेत. कारण मी लेखक असलो तरी प्रथम जबाबदार संपादक टिळकच होते. तसेच "मत एक-कल्ली दिसले तरी त्यात फारसे वावगे नाही. पक्षाभिमान हा वर्तमानपत्रकाराच्या अंगी दोषापेक्षा गुणच अधिक ठरतो पण बंदुकीतून सुटलेल्या गोळीप्रमाणे संपादकीय मत निश्चित, अचुक मर्मभेद करणारे, व ठणठणीत असावे" ही अनुभवाची सूचना म्हणून ते मला प्रथमपासून देत. तसेच एकादा विषय आडबाजूचा किंवा केवळ एकाद्या तज्ज्ञानेच लिहावा असा आल्यास, माझ्या विनयावर म्हणजे अज्ञानाच्या जाणीवेवर मला फारसे पांघरूण घालता येत नसे, व मत प्रदर्शित करण्यात मी सावधगिरी विशेष ठेवी. पण टिळक म्हणत की, " न्यायाधीश आपल्या खुर्चीवर बसताना जसा युनिफॉर्मचा झगा घालून बसतो, व तो घालतांच तो सर्वाधिकारसंपन्न ठरतो तसाच संपादकानेहि हातांत लेखणी घेता-ना सर्वज्ञत्वाचा झगा अंगावर घालूनच बसले पाहिजे. कारण ती जागाच अशी आहे की, तेथ विनयापेक्षा हुकमतीची भाषा, शंकाखोरीपेक्षा आत्मविश्वासाचे शब्द हेच अधिक काम देतात " तथापि शिकवणीने मनुष्याचा स्वभाव बदलला तरी कितीसा बदलणार ? म्हणून दर आठवड्याला एकाच विषयावरील केसरीतील लेख कसे व मराठ्यातील कसे यातील भेद लोकांच्याच काय पण माझ्याहि नजरेला पडल्याशिवाय राहत नसे. त्या वेळी हिंदुस्थानातील प्रमुख वर्तमानपत्रे खालील होती. पुणे—केसरी, मराठा, ज्ञानप्रकाश. मुंबई—इंदुप्रकाश, नेटिव्ह ओपिनियन, टाइम्स, गॅझेट, कैसर-इ-हिंद, गुजराथी, मुंबई समाचार, ॲडव्होकेट् ऑफ् इंडिया, इंडियन स्पेक्टेटर. मद्रास—हिंदु, मद्रास स्टॅंडर्ड, मद्रास टाइम्स. कलकत्ता—बंगाली, इंडियन मिरर, हिंदु पेट्रियट. लखनौ—ॲडव्होकेट. लाहोर—ट्रिब्यून.

मी पुण्यास येण्यापूर्वी १८९५ साली पुण्यांतील कॉंग्रेसवादाच्या धामधुमीतच टिळकांची मुंबई कायदेकौन्सिलांत निवडणूक झाली होती. यापूर्वी दोन वर्षे निवडणुकीचा मान गुजराथ प्रांताला मिळाला होता व चिमणलाल सेटलवाड

ें निवडून आले होते. तो मान महाराष्ट्राला १८९५ साली मिळाला व ही पहिली नेवडणूक टिळकांनी जिंकली. त्या वेळी निवडणुकीचा अधिकार फक्त लोकल-बोर्डांना होता. म्युनिसिपालिट्यांना नव्हता. टिळकांचे प्रतिपक्षी जठार हे राव-बहादूर व वऱ्हाडच्या शाळाखात्याचे डायरेक्टर होते, व महादेव गोविंद रानडे वगैरे लोकांचे त्यांना पाठबळ होते. पण संमतिवयाच्या बिलाच्या वादापासून (१८९१) टिळकांची लोकप्रियता हळू हळू वाढत चालली होती आणि हिंदु-मुसलमानांचे दंगे, गणपति उत्सव, शिवाजी स्मारकाची चळवळ, व सामाजिक परिषदेचा वाद इत्यादि गोष्टींनी ती लोकप्रियता बरीच वाढीला लागली होती. म्हणून बाहेर जिल्ह्यातून सुधारक नेमस्त पक्ष व सरकारी अधिकारी यांचे एक-वटलेले वजन उलट्या पारड्यांत पडलेले होते तरी निवडणुकीत टिळकांनाच यश आले. मात्र टिळकानाहि काही सरकारी अधिकाऱ्यांची मदत नव्हती असे मात्र म्हणता येणार नाही. सरकारी नोकरातहि दोन प्रकार होते. कांहींना टिळकाविषयी खरोखरच अप्रीति असे यामुळे त्याना स्वतःच्या मनाचे समाधान व वरिष्ठ अधिकाऱ्याच्या मताची अमलबजावणी ही दोन्ही एकाच कृत्याने साधत. पण दुसऱ्या प्रकारच्या देशी नोकराना टिळक मनापासून आवडत, आणि वरून त्यांनी तटस्थपणा दाखविला तरी आतून ते होईल ती मदत टिळकाना करीत.

त्या वेळी कायदेकौन्सिलाची एक मुख्य बैठक पावसाळ्यांत पुण्यास ऑगस्ट सप्टेंबरात भरे. या बैठकीत ज्या बजेटाची चर्चा होई त्याचा अमल एप्रिलपासून आधी चार-पाच महिने झालेलाच असे. शिवाय बजेटातील खर्चांना मते घेऊन मंजुरी मिळविण्याचे कारण नव्हते. फक्त चर्चा करण्याची संधि देण्यांत येई. यामुळे या चर्चेला Whipping a dead horse, 'मेलेल्या घोड्याला चाबकाचा मार' असे लोक म्हणत. १८९६ साली टिळकांनी या चर्चेतील आपल्या भाषणांत प्रांतिक जमाखर्चाच्या प्रश्नाला अग्रस्थान दिले होते. रावबहा-दूर रानडे यांची रेव्हिन्यू मॅन्युअल आणि प्रांतिक जमाखर्चाची मर्यादित मुख-त्यारी या संबंधी दोन छापील पुस्तके होती, ती या विषयावरील विधायक टीकेला आधारभूत मानली जात. पैकी या दुसऱ्या पुस्तकांत अपुरा राहिलेला विषय पुरा करून मांडण्याचा टिळकांनी प्रयत्न केला; व आम्हा असिस्टंट मंडळीना रानड्यांची ही पुस्तके वाचण्याची शिफारस केली असे स्मरते कौन्सिल निवड-

णुकीला तेव्हा इतके महत्व होते की, टिळकाना नामदार ही पदवी जी एकदां चिकटली ती त्यांनी कौन्सिल कायमचे सोडल्यानतरहि पुष्कळ वर्षे त्यांना चिकटून राहिली होती. किंबहुना पुढे लोकमान्य ही पदवी त्याना मिळाल्यावरहि त्यांच्या जुन्या परिचयाच्या लोकाच्या तोडातला नामदार हा शब्द जाता जाईना! इकडे सरकारपक्षाकडून टिळकाना 'डेमेगॉग' ही पदवी, अर्थात् खासगी रीतीने, मिळाली होती. परंतु कायदेकौन्सिलचे सभासद या नात्याने त्यांना सहजच जे वजन प्राप्त झाले होते त्याने या दुसऱ्या विशेषणाचा दोष आपोआप निघून जाई. इतकेच नव्हे तर त्याच्या नामदारीच्या छत्राखाली सस्थानिक लोकांनाहि उजळ माथ्याने टिळकाशी सहवास ठेवता येत असे. मी पुण्यास आलो त्या पहिल्या साली कुरुंदवाडकर, इचलकरजीकर, मिरजकर हे टिळकाच्या बिऱ्हाडी आलेले मी पाहिलेले आहेत.

१८९६ सालापासून दुष्काळयुगाला महाराष्ट्रात सुरुवात झाली. बाजारभाव, व्यापार याच्यासबधाने महायुद्धापूर्वीचे १९१३ साल हे जसे तुलनात्मक चर्चेला आधारभूत मानतात, त्याप्रमाणे शेतकऱ्याच्या स्थितीसबधाने १८९५ हे साल आधारभूत मानता येते. १८९६ सालापासून दुष्काळ व रिव्हिजन सर्व्हे याचे जे चक्र महाराष्ट्रांतील शेतकऱ्याच्या मागे लागले ते अद्यापि सुटलेले नाही. कारण तेव्हांपासून आतापर्यंत अवर्षणाची, नापिकीची, रोगराईची, सरकारसाऱ्याच्या जुलमाची वर्षे मोजली तर ती दुसऱ्या प्रकारच्या वर्षांपेक्षा अधिक भरतील. १८९६ साली १८७६ सालाप्रमाणेच महापूर व दुष्काळ याची जोडी एकदम आली. तसेच टोळधाड पूर्वीसारखीच येऊन, शिवाय पूर्वी कधी नव्हता त्या प्लेगाचा प्रादुर्भावहि या सालाच्या अखेर झाला. हे आपत्तिचक्र एकसारखे १९१२ सालापर्यंत सुरू होते. त्यानंतर अलीकडे प्लेग तेवढा गेला पण शेतकऱ्याची इतर दुःखे कायमच राहिली. या दोनहि आपत्तीसबधाने टिळक-चरित्राच्या पहिल्या खंडात मी सविस्तर विवेचन केलेले आहे. येथे इतकेच सागतो की, तीस वर्षांपूर्वी टिळकानी केवळ सरकारी फॅमिन कोडाचा आधार घेऊन साऱ्याची सूट व तहकुबी यांची मागणी सरकाराकडे करण्याला केसरीतून शेतकऱ्यांना शिकविले, तिला कांगावखोर अधिकाऱ्यांनी व अॅग्लो-इंडियन पत्रकारांनी "करबंदीची चळवळ" असे नांव दिले ! व आयर्लंडांतील लॅड-लीगच्या चळवळीचे अनुकरण टिळकांनी सुरू केले असा आरोप ठेवला. या विषयावर अलिबागचे घरतबंधु व सरकारी

शाळाखात्यांतील नोकर गणेश व्यकटेश जोशी हे पत्रे लिहीत ती टाइम्समध्ये छापली जात, व क्वचित् त्यांचे समर्थन किंचित् करणारे असे लेखहि टाइम्समध्ये मधून मधून येत. परतु तीच गोष्ट टिळकानी केलेली टाइम्सला खपत नसे. आज महात्मा गांधीविरुद्ध टाइम्स लिहितो त्यापेक्षा अधिक दुष्ट बुद्धीने व कडक शब्दानी टाइम्स टिळकाविरुद्ध लिही, आणि या टीकेला उलट टाइम्समध्येच पत्र लिहून उत्तर देण्याचा प्रयत्न टिळकाना करावा लागे. या कामाला मराठा पत्र अपुरे पडे. कारण त्याचा प्रसार फार थोडा. ज्या दिवशी टाइम्समध्ये टीका येई त्याच दिवशी होतां होईतो प्रतिटीकेचे पत्र टिळक टाइम्सला लिहीत. पण हा सर्व उद्योग रात्री व्हावयाचा, व जेमतेम मध्यरात्रीपर्यंत पत्राची स्वच्छ प्रत होऊन ते टपालात पडावयाचे. तेल वात जाळून जे काम झाले तेच काय ते खरे झाले असे जणु काय टिळकांना वाटे !

१८९६ च्या अखेर प्लेगचा प्रादुर्भाव पुण्याला झाला. तेव्हा डिसेंबर अखेर मी साताऱ्यास गेलो व तेथेच राहून तीन महिनेपर्यंत मराठ्याकरितां मजकूर लिहून पाठवीत असे. पण तो अगदी नियमित पाठवीत असल्यामुळें मराठ्यासंबधी टिळकांना कोणतेहि मामुली काम पडले नाही. फक्त त्यांच्यावरील टीकेला अनुलक्षून मुद्दाम एकाददुसरा लेख त्यांना लिहावा लागे तेवढाच. १८९७ च्या मार्च अखेर प्लेग बहुतेक कमी झाला. व त्यानतर रायगडचा शिवाजी उत्सव, पुण्यांतील शिवाजी उत्सव, व गणपति उत्सव ही कार्ये त्या वर्षी पुष्कळच जोराने झाली परतु प्लेगचे दुःख व रॅडशाहीचा जुलूम याना उद्देशून केसरी–मराठ्यांत एकसारखे कडक लेख येत असल्यामुळे टिळकांवर सरकारचा राग फार झाला होता. आणि अखेर रॅडसाहेबाच्या खुनाने त्या रागाला तोंड फुटून त्यांच्यावरील राजद्रोहाचा पहिला खटला करण्यांत आला.

टिळकांवर खटला होणार ही गोष्ट सर्वांना अदाजाने कळून चुकली, व कांहीना तर अतस्थच बातमी कळली. ती बातमी ऐकूनच टिळक मुंबईस गेले व तेथे त्यांना पकडण्यांत आले. या बातमीने पुण्यांतील लोकांत—विशेषतः टिळकांच्या मित्रमडळीत-किती भयप्रद मनःस्थिति झाली हे सांगता पुरवत नाही. आज चाळीस वर्षांनतर, विशेषतः सत्याग्रहाच्या दोन चळवळींनंतर, राजद्रोहाच्या खटल्याचे कोणास कांही वाटेनासे झाले आहे.

परंतु त्या वेळच्या त्या पहिल्या खटल्याच्या बातमीने धरणीकंपाचा धक्का बसावा त्याप्रमाणे पुणे व महाराष्ट्रच काय पण सर्व हिंदुस्थान हादरून गेले. हल्ली वर्तमान-पत्रांत १२४ अ कलमाखालच्या खटल्यांची हकीकत वर्तमानपत्रात कोठे दिसली तर ती ओलांडून इतर मजकूर वाचणारे लोक कितीतरी आढळतील. "अतिपरिचयादवज्ञा" ही म्हण सर्वस्वी या बाबतीत खरी ठरली आहे. पण तेव्हांची गोष्ट वेगळी होती या खटल्याच्या अपर्वाईमुळे सर्व हिंदुस्थानभर भीतीप्रमाणे सहानुभूतीहि उत्पन्न होऊन टिळक-डिफेन्स फंड गोळा करण्याची चळवळ ज्या त्या प्रांतातल्या लोकांनी आपण होऊन केली. मी व खाडिलकर हे दोघेहि नवीनच असल्यामुळे आम्ही सहजच थोडेसे गांगरून गेलो. डिफेन्स-च्या खटपटीचे काम आमच्याकडे नसल्यामुळे, आणि आम्ही दोन्ही वर्तमानपत्रे सांभाळून चालविली म्हणजे आमचे कर्तव्य केले इतकीच सर्वांची समजूत असल्यामुळे, आम्ही ते काम मात्र विशेष दक्षतेने चालविले. दक्षता अशाकरिता की, खटल्याचा निकाल होईपर्यंत टिळकांच्या नावचे डिक्लेरेशन दोन्ही पत्रावर राहणार, आणि तेथपर्यंत आम्ही काही वेडेवाकडे लिहिले तर तो पुरावा म्हणून टिळकांच्या विरुद्ध दिला जाणार. वास्तविक टिळक अटकेत असल्यामुळे ते पत्रांत लिहू शकत नव्हते ही गोष्ट सरकारासहि माहीतच असणार परंतु राजद्रोहा-संबधी टिळकाचा हेतु शाबीत करण्याला आम्ही लिहिलेले पूर्वीचे इतर लेख पुरावा म्हणून टिळकांविरुद्ध खटल्यात दिले गेलेले आम्ही पाहिले, तेव्हा अजाणताहि आमच्या हातून टिळकांना इजा होईल की काय या विषयी आम्ही मनात मोठे चूर होतो. खाडिलकरांनी लिहिलेले कांही लेख अशा रीतीने पुराव्यात दाखल होते, इतकेच नव्हे तर त्यानी लिहिलेल्या कांही लेखावरून खटला भरण्यात येऊन मॅजिस्ट्रेटने चार्ज ठेविला होता. माझे मराठ्यांतील एक-दोन लेख प्रत्यक्ष चार्जात नव्हते परंतु पुराव्यांत घेतले होते. त्यांतील एका लेखांत मी विला-यतेत राणीच्या ज्युबिलीकरितां गेलेल्या संस्थानिकांची चेष्टा केली असून त्यांना सर्कशीतील जनावरांची उपमा दिली होती ! उपमा समर्पक असली तरी टिळ-कांना ती बाधणार असे वाटून मला बरीच खिन्नता आली.

मुंबईस डिफेन्सच्या खटपटीत डॉ. देशमुख, आण्णासाहेब नेने, दाजीसाहेब खरे, भाजेकर वकील, बोडस वकील, ॲडव्होकेट सेटलूर, बॅरिस्टर केशवराव देशपांडे, गजाननराव वैद्य वगैरे मंडळी प्रमुख होती. पुण्याहून वासुदेवराव जोशी

गेलेच होते. मी व खाडिलकर यानाहि मुंबईस बोलावण्यांत आले. पण ते मुख्यतः खटल्यासंबधी केसरीची दैनिक आवृत्ति काढण्याकरिता. आमचे ऑफिस टोपी-वाल्याच्या चाळीत राघवय्या सॉलिसिटर यांच्या शेजारी पडले होते; व रोज पहाटे-पर्यंत जागून दैनिक आवृत्ति तयार करावी लागे. यामुळे वर्तमानपत्री कामाचा तो विशेष अनुभव आम्हाला प्रथमच आला. पुढे डिफेन्स फडाची जाहीर मागणी करण्याचे ठरले तेव्हां आम्हा दोघाच्या नावाने ती विनति वर्तमानपत्रात घालण्यांत आली होती. आम्ही खटला ऐकण्याला रोज कोर्टात जात होतो व काही टिपणेहि करून घेत होतो.

टिळकाना शिक्षा झाल्यावर आम्ही ताबडतोब पुण्यास आलो. कारण, केसरी-मराठ्याच्या डिक्लेरेशनची व्यवस्था आम्हाला करावयाची होती. या वेळी टिळकांचे जबाबदार सल्लागार मी किवा खाडिलकर हे नसल्याने, वासुदेवराव जोशी, बोडस वगैरे मडळी टिळकांचा जो निरोप आणतील त्याप्रमाणे डिक्लेरेशनची व्यवस्था व्हावयाची इतकेच आम्ही घेऊन चाललो होतो त्याप्रमाणे बोडस व जोशी हे निरोप घेऊन आले की, " केळकरानीच दोन्ही पत्रांचे डिक्लेरेशन करावे " माझे नाव द्दोन्ही पत्राकरिता सुचण्याची कारणे बहुधा खालीलप्रमाणे असावीत. मराठा पत्रात इंग्रजी लिहिणे ही गोष्ट निदान दीड वर्षाच्या सरावाने मला साध्य झाली होती. उलट खाडिलकर याना इग्रजी लिहिण्याचा सराव मुळीच नव्हता. अर्थात् मराठ्याचे डिक्लेरेशन माझ्या नावचे व्हावे हे सहजच प्राप्त झाले मग विचार असा की, केसरीला एक व मराठ्याला एक असे दोन लोक कायद्याच्या पाशांत वेगवेगळे गुतविण्यापेक्षा एकाच्याच नावची दोन्ही डिक्लेरेशन्स् केली म्हणजे कायद्याला बळी देण्यात एक प्रकारचा मितव्यय साधला! शिवाय खाडिलकराच्या आधी सात–आठ महिने मी उपसपादकमडळावर आल्याकारणाने वडीलकीचा मान सहजच मजकडे येत होता. आणि त्यांतल्या त्यांत मी एलूएल्. बी.ची परीक्षा पास झालेला व वकिलीचा वर्ग चालविणारा, म्हणून राजद्रोहाच्या कायद्याचे ज्ञान खाडिलकराच्यापेक्षा मला थोडे अधिक असणार अशीहि समजूत असल्यास ती सकारण होती. याहून पलीकडचे एक कारण कोणाला कदाचित् सुचेल ते टिळक व त्यांचे सल्लागार यांनाहि तेव्हां सुचले होते किवा काय हे कोण सांगणार ? पण वर्ष सव्वावर्षाच्या अनुभवाने खाडिलकरांपेक्षां मी लिहि-ण्यांत सावधगिरी अधिक ठेवतो ही गोष्ट, म्हणजे आम्हा दोघांच्या स्वभावातील

हा फरक, टिळकाच्या लक्षांत आला नसेल असे मात्र म्हणवत नाही. कसेहि असो. मराठ्याचा सपादक मी होणार हे मला पूर्वीच दिसत होते, व केसरीचे संपादकत्व खाडिलकरांकडे जाईल असेहि वाटत होते. परतु दोन्ही पत्रांचा सपादक मी व्हावे असा टिळकांचा निरोप म्हणून बोडस व जोशी यानी सांगितला तेव्हां मला फार आश्चर्य वाटले. पण आनदहि झाला. आणि दोन्ही डिक्लेरेशन्स् मी सिटी मॅजिस्ट्रेट मि. प्लकेट याच्या पुढे जाऊन केली.

टिळकांच्या मागून होणाऱ्या सपादकावर त्याच्या हातून वेडेवाकडे लिहून गेले तरी एकदम खटलाच होईल असा सभव थोडा कमी होता. कारण टिळकांवर खटला झाला तो खरा विवक्षित लेखाकरितां नसून, सरकारच्या मनांत त्यांच्याविषयी आज दोन-तीन वर्षे निरनिराळ्या कारणाकरितां साचत आलेल्या रागाचा तो परिणाम होता. ही गोष्ट मला समजत होती. तसेच आपण सपादक झालो तर लिहिण्याचे प्रुफे तपासण्याचे वगैरे काम विशेष काळजीपूर्वक करू मग भय कशाचे ! असाहि मनाला जाणता आधार वाटत होता. तथापि, हे सर्व असूनहि तशा वेळी या दोन्ही पत्राचे सपादकत्व स्वीकारणे यांत मी धैर्य दाखविले असे मजकडे सहानुभूतीने पाहणाऱ्या लोकाना वाटत होते यात शका नाही. आणि पुष्कळांनी स्नेहभावाने मला तसे लिहून कळविलेहि.

पण मी धैर्य दाखविलेच असले तरी निम्मे मनाचे व निम्मे परिस्थितिजन्य होते. परिस्थितिजन्य म्हणण्याचे कारण असे की, केसरीचा सपादक होणे यांत जसा मान होता तसेच वर्ष-सव्वावर्ष टिळकांचा असिस्टट म्हणून काम केल्यावर सपादक होण्याचा क्रम प्राप्त झाला असतां मी भीतीने मागे सरलो असतो तर मी नादानच म्हणावयाचा ! पण या कामी लागणारे धैर्य कांही हौस व महत्वाकांक्षा यामुळे, व कांही प्रवाहपतितत्वामुळे, मला आले होते. आणि मी दोन्ही पत्राचे सपादकत्व घेतले ते जुलमाने नसून हौसेने व आनदाने घेतले एवढी गोष्ट मात्र खरी. पण त्याबरोबर मी म्हणजे सामान्य माणसाहून अधिक धैर्यशील होतो असे मात्र म्हणत नाही. कारण टिळकांच्या वाड्याची झडती घेण्याला पोलिस अधिकारी जेव्हां आले तेव्हां मला खरोखर किती भय वाटले याची जाणीव मला आहे. तो माझा असला पहिलाच प्रसंग हे खरे. पण त्या वेळी भीति वाटली ती तुरुंगांत जाण्याच्या कल्पनेने नव्हे तर एकंदर परिस्थितीचा तो परिणाम होता. टिळकांना मुबईस पकडले त्या दिवशी

सध्याकाळी मी विचूरकराच्या वाड्यांत माडीवर वकिलीचा क्लास शिकवीत होतो. इतक्यांत ब्रुइनसाहेब व इतर एक-दोन युरोपियन आणि कांही हिंदी पोलीस अधिकारी अशी पार्टीच्या पार्टी वाड्याच्या अगणांत येऊन उभी राहिली. तेव्हां क्लासांतील मुलाना रजा देऊन मी खाली आलो. ब्रुइनसाहेबांनी "गुड ईव्हिनिग मिस्टर केळकर" म्हटले. त्याचा उलट जबाबहि मी तत्क्षणी देऊं शकलो नाही. अर्थात् ही स्थिति क्षणिक होती, व पुढे पोलिस-झडती वगैरे सुरू झाली तेव्हा ब्रुइनसाहेबाशी मी अघळ पघळ बरोबरीच्या नात्याने बोलूहि लागलो. पण तो पहिला भयाचा झटका मोठा कठिण होता. हे मुद्दाम सागण्याचे कारण असे की, झडतीला आलेले पोलिस पाहून जी भीति मला त्या वेळी वाटली तिच्या एक दशांश किवा एक शताशहि भीति मला मॅजिस्ट्रेटपुढे हजर होऊन सपादक म्हणून दोन्ही पत्राचे डिक्लेरेशन करताना वाटली नाही. शिकार करणारे लोक सांगतात की, शिकारीला घरून निघताना कल्पनेनें जी भीति वाटते ती प्रत्यक्ष रानांत उभे राहिल्यावर वाटत नाही. आणि वाघ कोणीकडून येईल याची खात्री नसल्यामुळे जी भीति वाटते त्यापेक्षा वाघ समोर पाहिल्यावर वाटणारी भीति कमी असते. लढाई-वर जाण्याचा हुकूम झालेल्या माणसाला जी भीति वाटते ती रणागणावर जाऊन दाखल झालेल्या शिपायाला वाटत नाही. प्लेग वगैरे सांथीच्या रोगांचेहि असेच आहे. परक्या गावी प्लेग जोरात सुरू असल्याची बातमी ऐकून जी भीति वाटते ती स्वत. त्या गावच्या लोकांना वाटत नाही ! मला शिकार व रणमैदान यांचा मुळींच अनुभव नाही. परतु प्लेगचा अनुभव मात्र सतत बारा वर्षे आला. आणि त्यावरून मी मनोधैर्यासबधाने केलेले वरील विधान अगदी यथार्थ आहे असे प्रामाणिकपणे म्हणू शकतो.

# १८९७ ते १८९९

बुधवार ता. १४ सप्टेंबर १८९७ रोजी टिळकांना न्यायमूर्ति स्ट्राची यांनीं दीड वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा दिली. त्याना पकडून खटला भरून कांही आठवडे आधी झाले होते व त्यांचा मुक्काम तेव्हापासून मुंबईस होता. तथापि खटल्याच्या निकालाच्या आदल्या आठवड्यापर्यंत त्यांचेच नाव केसरी व मराठा या पत्रांवर सपादक म्हणून राहिले होते, काढल नव्हते. खटल्याच्या निकालानतर प्रथम मराठ्याचा दिवस आला, व त्या अकाचा बराचसा मजकर आर्यभूषण छापखान्यांत कपोज होऊनहि तयार झाला. इतक्यांत छापखान्याचे मालक रा. हरिपत गोखले यांनी छापखान्याचे व्यवस्थापक रा. केशवराव बाळ यांना असे सांगितले की, "यापुढे केसरी-मराठा पत्रे आपल्या आर्यभूषण छापखान्यात छापावयाची नाहीत." बाळ यांना ते आवडले नाही. त्यांचा ओढा टिळकांकडे होता. शिवाय अशा सकटसमयी आपल्या एका आश्रयदात्याला व देशभक्ताला दगा देणे हे त्यांना मोठ्या कृतघ्नपणाचे वाटले. पण करणार काय? कारण हरिपत गोखले यांना माणुसकी नव्हती. आत्मसंरक्षणापुढे त्याना कशाचीहि आठवण राहिली नाही.

गोखले यांनी आपल्या मुबईच्या मित्रांचा आणि दाजीसाहेब खरे यांचाहि सल्ला घेतला. त्यांत ही वर्तमानपत्रेच अजिबात बंद ठेवावी असा सल्ला त्यांना मिळाल्याचे ते सांगत. पण वर्तमानपत्राची मालकी त्यांची नव्हती. तेव्हां तो त्यांचा सल्ला कोण ऐकणार? येऊन जाऊन आपल्या छापखान्यांत वर्तमानपत्रे छापीत नाही इतके म्हणण्याचा त्यांना हक्क होता तो त्यांनी बजावला. अर्थात् तो चालण्यासारखाच होता. पण त्यांत वाईट इतकेच की, ज्या आठवड्यांत टिळकांना शिक्षा झाली त्याच आठवड्यांत पत्रे छापीत नाही असे एकदम सांगितले व मुदतहि दिली नाही. वास्तविक टिळकांनीच हरिपंत गोखले यांना मुबईहून आणून छापखान्याचे मॅनेजर व भागीदार केले होते. आणि छापखान्याची व वर्तमानपत्रांची फारकत झाली होती तरी १७ वर्षेपर्यंत या छापखान्यांत ही पत्रे सतत छापली जात होती. म्हणून हा दीर्घकाळचा ऋणानुबंध तोडणे हे वाईट. त्यांतून अशा संकटकाळी म्हणून अधिक वाईट. आणि एका आठवड्याचीहि मुदत देईनात हे सर्वांत वाईट! पण हरिपंत गोखले म्हणजे स्वार्थपरायणतेचा नमुना होता.

गोखले यांनी अशा रीतीनें करू नये ते केले. त्यांना टिळकांच्या पत्रांची भीति वाटली होती, व नकाराचा एक शब्द उच्चारून ते स्वतः भीतिमुक्त झाले. पण गुरुवार ते शनिवार या अवधीत मराठा पत्र दुसरीकडे छापून कसें घेणार ? कोण देणार ? व ते टपालांत टाकणें वगैरेची व्यवस्था कशी होणार ? पण टिळकांचे सुदैव असें की, त्यांना जशी सकटे आली तसेंच त्यांना सहानुभूतीचे सहाय्यकारी लोकहि मिळाले.

कर्मधर्मसयोगानें या वेळी 'विठ्ठल प्रेस' नावाचा एक छापखाना रविवार पेठेत फडके याच्या वाड्यात चालू असे. छापखान्याचा मालक एक पेन्शनर होता. तथापि ऋणानुबधी हरिपत गोखल्याना टिळकांच्या वर्तमानपत्राची जी दया आली नाही ती या गृहस्थाला आली, व त्याने दोन्ही पत्रे छापून देण्याचे कबूल केले. पण गर्दीन गर्दी करूनहि शनवारपर्यंत मॅजिस्ट्रेटपुढे सपादक म्हणून माझे डिक्लेरेशन होऊ शकले नाही दुसरे दिवशी रविवारी तर मराठा वर्तमानपत्र निघावयाचे. अर्थात् मजकूर कपोज होऊन तयार असताहि त्या आठवड्याला रविवारचा मराठा सोमवारी काढावा लागला. डिक्लेरेशनमध्ये मराठ्याचा नेहमीचा वार रविवार असल्यामुळे पत्रावर रविवार ता १९ सप्टेंबर असे रीतीप्रमाणे छापावयास पाहिजे होते पण डिक्लेरेशन २० तारखेचे व अक आदल्या दिवशीचा असे आपल्याच हातानें छापले असता छापखान्याचा कायदा मोडल्याबद्दल आणखी एक नसते सकट यावयाचे ! म्हणून सरळ मार्गाचा अवलब करून छापलेल्या निम्म्या अकावर जरी रविवार तारीख १९ अशी घातली होती तरी अग्रलेखाच्या पानावर सोमवार ता २० असेच छापले गेले. म्हणजे लागोपाठ तीन अकाच्या तारखा रविवार १२ सप्टेंबर, सोमवार २० सप्टेंबर व फिरून रविवार ता. २६ सप्टेंबर अशा पडल्या आहेत. तारखेची व वाराची चलबिचल झालेला असा हा मराठ्याचा एकच अक आजपर्यंतच्या अठ्ठावन वर्षांत निघाला !

टिळकांचे भाचे धोंडोपत विद्वांस हे नवे मॅनेजर व मी नवा सपादक. आम्हा दोघांनाहि जबाबदारीच्या पहिल्याच कामांत हा जो जबरदस्त तडाखा बसला, त्याने आम्ही दोघे थोडेसे गोंधळून घाबरून गेलो. गोंधळ अशाकरितां की, अवघ्या तीन दिवसांत नवीन छापखान्याची योजना कशी होणार ? आणि घाबरेपणा अशाकरितां की, आम्ही प्रयत्नाची शिकस्त करणार झालो तरी योजना न होऊन आठवड्याचा अक निघाला नाही तर त्यांत आमचीच काय पण टिळकांचीहि अपकीर्ति होणार ! आम्ही दोघेहि बाहेरच्या जगाला अपरिचित. पण टिळक

तुरुंगांत गेल्याबरोबर त्यांची पत्रे बंद पडली असे झाले तर त्यांना लोकांत आसरा नाही म्हणजे सहानुभूति नाही असे सिद्ध व्हावयाचे. आणि हीच एक प्रकारे अपकीर्ति होय असे आम्हांस वाटले. पण ती वर लिहिल्याप्रमाणे टळली.

रविवारचा मराठा सोमवारी निघाला पण निघाला. असो एक आठवडाचें कां होईना, मराठ्याचा अंक नेहमीप्रमाणे न निघता तर अपकीर्ति झाली असती. पण तो निघाला, बंद पडला नाही, असे जेव्हा लोकाना समजले तेव्हा मात्र ती अपकीर्ति टळून उलट टिळकाना वाहवा मिळाली, व त्यातली थोडी आमच्याहि वांट्यास आली! लोक म्हणाले, " पहा, टिळकाचे काम हे असे आहे! तुरुंगांत गेले तरी त्याच्या वर्तमानपत्राना भंग नाही." आणि त्यातलेच काही लोक असेहि म्हणाले की, " टिळकांच्या हाताखाली असिस्टंट म्हणून दीडवर्ष शिक्षण घेतल्याचे केळकर-खाडिलकरांनी चीज केले." पण या शाबासकीला पात्र होण्याला माझ्या डिक्लेरेशनच्या तयारीचे एक कारण असले तरी ही सर्व शाबासकी धोंडोपंत विद्वांस याचीच होती. कारण दुसरा छापखाना हुडकून काढून, तिकडे टाईप वगैरे सर्व सामान नेऊन, वेळेवर अंक काढण्याची खटपट त्यांनीच केली व मजकडे काम फक्त डिक्लेरेशन करण्याचे उरले.

धोंडोपंत हे यापूर्वी टिळकांजवळ सुमारे चौदा पंधरा वर्षे होते. ते मॅट्रिक्युलेशन व स्कूल फायनल पास झाल्यावर कॉलेजमध्ये गेले नाहीत. लातूर येथील गिरणीची व्यवस्था टिळकातर्फे पाहण्याकरितां त्यांची नेमणूक १८९०-९१ सालापासून झाली होती. तिकडे काम नाही म्हणून दर मे महिन्यांत ते पुण्यास व कोकणाकडे एक खेप करीत. त्याप्रमाणे १८९६ च्या मे महिन्यात सिंहगडावर त्यांची माझी प्रथम ओळख झाली. पण फिरून पावसाळ्यानंतर ते लातूरला गेले. पुनः पुढल्या वर्षी मे-जूनमध्ये ते कोकणात गेले असतां पुण्याकडील गडबड कळल्यामुळे पुण्यास परत आले. तेथून पुढे पत्रांची व्यवस्था त्याचे हाती आल्यामुळे लातूर येथील काम त्यांना सोडावे लागले. त्याची बरीच वर्षे पुण्यास गेलेली असल्यामुळें स्नेहीसोबती पुष्कळ. यामुळेच विठ्ठल प्रेसची बातमी त्यांना कळली. त्यांचा स्वभाव पराकाष्ठेचा मेहनती असल्यामुळे, व आपल्या मामांचे कधीहि कांही उणे पडूं नये हें आपले ब्रीद असे त्यांनी जन्मभर मानलेले असल्यामुळे, त्यांनी रात्रीचा दिवस करून विठ्ठल प्रेसवर मराठा व केसरी छापण्याची व्यवस्था तत्परतेने केली.

अशा रीतीने मराठ्याची अडचण दूर झाल्यावर मागाहून दोन दिवसांनी निघणाऱ्या केसरीला मात्र अडचण उरली नाही, व ते पत्र नित्यक्रमाप्रमाणे मंगळवारी निघाले. सोमवारी मी दोन्ही पत्रांची डिक्लेरेशन्स् एकदम केली व दोन्ही पत्रे निघावयाची तशी निघाली, या गोष्टीचे परकी किंवा प्रतिपक्षी लोकांनाहि महदाश्चर्य वाटले. पुण्याच्या बातमीदाराने मुंबईच्या टाइम्सला तार करून कळविले की, "एन्. सी. केळकर नावाच्या एका तरुण एल्एल्. बी. गृहस्थाने टिळकांच्या जागी त्याच्या दोन्ही पत्राचे डिक्लेरेशन केले व ती पत्रे प्रसिद्ध झाली." धोंडोपंतानी आर्यभूषण छापखान्यातून केसरी-मराठा पत्राची रजिस्टरे वह्या वगैरे आणविल्या, व विंचूरकराच्या वाड्यातील धाकट्या इमारतीच्या कठड्याच्या पडवीत खरोखरच दोन देवदारी खोकी मांडून केसरीचे ऑफिस सुरू केले! ही त्या वेळची केसरीची स्थिति व आजची स्थिति यांतले स्थित्यंतर ही टिळकांप्रमाणे धोंडोपंत यांचीहि कारकीर्द म्हटलीच पाहिजे. दोन देवदारी खोक्यांनी केसरीचे ऑफिस सुरू करणाऱ्या धोंडोपंताना, १९३० च्या ऑगस्टच्या पहिल्या तारखेला तीन लक्ष रुपयांच्या ट्रस्ट-डीडवर सही करतांना गहिंवरून येऊन जन्माचे सार्थक झाले असे वाटल्यास त्यात काय आश्चर्य!

पण धोंडोपंतानी जसे आपले काम बजाविले तसे मीहि संपादक या नात्याने आपले काम प्रसंगाला अनुरूप असेच केले असे किंचित् अभिमानाने म्हणतां येईल. यापूर्वी वर्ष-सव्वावर्ष मी मराठ्यात लिहीत असलो तरी माझा लेख अमुकच असे कोणास फारसे माहीत असण्याचे कारण नव्हते. माझे नांव तर मराठ्याच्या वाचकांपैकी किंवा इतर लोकांपैकी फारच थोड्यांना माहीत असेल! पण टिळकांच्या खटल्याने ही स्थिति बदलून, संपादक या नात्याने मला वाजवीहून थोडी अधिक अशी प्रसिद्धी एकदम लाभली. त्याहिपेक्षां विशेष गोष्ट ही की, टिळकांच्या शिक्षेनंतर अवघ्या दोन दिवसांत मी जी दोन मुख्य आर्टिकले लिहिली, व पहिल्याच म्हणजे २० सप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्ध केली, त्यांची खरोखरच सर्व हिंदुस्थानभर वाहवा झाली. एक आर्टिकल "The Thought of the Hour" या मथळ्याखाली होते. त्यांतील समयोचित गंभीरवृत्तीचा अनेक वर्तमानपत्रांनी मुद्दाम उल्लेख करून शाबासकी दिली. मद्रासच्या हिंदु पत्रांत जी. सुब्रह्मण्य अय्यर यांनी तो सर्व लेख उद्धृत करून माझे अभिनंदन केले. दुसरे आर्टिकल न्यायमूर्ति स्ट्राची यांनी टिळकांचा खटला ज्यूरीला समजावून देतांना जे वाह्यात् भाषण केले त्यासंबंधी असून

त्यांतील टीका निर्भय व जोरदार होती. यामुळे त्याचेहि उतारे इतर वर्तमानपत्रांनी घेतले. जी. सुब्रह्मण्य अय्यर हे टिळकांच्या बरोबरीचे संपादक. त्यांचे लक्ष तर तेव्हांपासून मराठा पत्राकडे इतके राहिले की, त्यातील लेखांचे उतारे मधून मधून ते हिंदु पत्रांत देत. आणि पुढच्या वर्षी १८९८ साली मद्रासेस राष्ट्रीय सभा भरली तिचे सेक्रेटरी या नात्याने त्यांनी जो रिपोर्ट लिहिला त्यात, हकीकतीच्या ओघांत, माझे नाव आले तेथे मुद्दाम एक वाक्य त्यानी लिहिले ते असे— " Mr. Kelkar who conducted the Maratha with conspicuous ability in Mr Tilak's absence.... " इ०

दूरच्या प्रमाणे जवळच्या लोकानाहि मराठ्यातील माझ्या लेखासबधाने असेच वाटले. लवकरच मी काही कामाकरिता मुबईस गेलो. तेव्हा डॉ. नाना-साहेब देशमुख याच्या घरी वकील भाजेकर, ॲड्व्होकेट सेटलर, व इंदुप्रकाशाचे एडिटर दामोदर गणेश पाध्ये हे जमले असतां मला त्यांनी मुद्दाम बोलावणे पाठ-विले. मला पाहून पाध्ये यानी जे आश्चर्य प्रकट केले ते अद्यापि माझ्या स्मर-णांत आहे. ते म्हणाले, "Really are you Mr. N C. Kelkar ? Surely you carry a very big head on very young shoulders " पाध्ये हे टिळकांचे प्रतिपक्षी, व स्वतः चांगले इंग्रजी लेखक अशी त्यांच्या मित्राप्रमाणे त्यांची स्वतःचीहि समजूत. अर्थात् अशा निष्णात व वडील लेखकाकडून अशी शाबासकी मिळाल्याने मला तेव्हां धन्यता वाटली असल्यास आश्चर्य नाही कारण मला नुकती पंचवीस वर्षे सपून सव्वीसावे लागले होते, व वर्तमानपत्रांत इंग्रजी लिहिण्याचा माझा अनुभव अवघा दीड वर्षांचा होता. यापुढे विरोधीपक्षांतील संपादक या नात्याने पाध्ये व मी यांच्यात अनेक वेळा दोन हात झाले. पण त्यांनी मला एरवी कितीहि दूषणे लाविली तरी संपादक या नात्याने माझ्या पात्रतेविरुद्ध कधीहि अवाक्षर काढले नाही. सेटलर, भाजेकर ही मंडळी तर यापुढे माझ्या चहात्यांच्या वर्गातच मोडत. आणि एकदरीने टिळक पक्षांतील मुंबईच्या लोकांमध्ये, मजकडे मराठ्याचे सपादकत्व पुढे सतत राहिले याबद्दल, कोणीहि फार काय माधवराव बोडसांनीहि तक्रार केली नाही ! आणि ज्या कृष्णाजीपंत केळकर वकिलांनी पूर्वी माझ्या इंग्रजी लेखनाविषयी शंका व नापसंती टिळकांना आपण होऊन कळवून मला कायम न करण्याविषयी उपदेश केला होता, त्यांना अशा रीतीने मुंबईस स्वपक्षीयांत मराठ्याचे संपादक म्हणून

माझी वाहवा झालेली पाहून सहजच तोंडांत चपराक बसली. मात्र तेव्हापासून आजवर माझ्याशी वागण्यांत त्यानी कधीहि आढ्यता दर्शविली नाही. कारण तीस-पसतीस वर्षांत टिळकाची वर्तमानपत्रे झिडकारून मुबईस जाऊन वकिली थाटणाऱ्या त्याच्या स्थितीत, व त्या वर्तमानपत्राशी सर्वस्वी एकजीव होऊन गेलेल्या माझ्या स्थितीत, अखेर किती अतर पडले हे त्याचे त्यांनाच उमजले असले पाहिजे.

टिळकावर खटला झाल्यापासून लॉ क्लास जवळ जवळ बंदच पडला होता. तो पुनः चालू करण्याच्या दृष्टीने मी सप्टेंबर अखेर जाहीर नोटीस दिली व वर्ग सुरूहि केला. परंतु फिरून प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यामुळे तो बंद ठेवावा लागला. एकदा प्लेग आला की तो तीन महिने चढ व दोन महिने उतार अशा रीतीने वर्षांतून पाच-पाच महिने टिके. यामुळे गांवचे विद्यार्थी बाहेर जात व बाहेरगांवी प्लेग असला तरी घरचा प्लेग सोडून पुण्याच्या प्लेगात जाऊन कोण पडतो ! यामुळे विद्यार्थी कमी होत. शिवाय दुसरा जोडीदार शिकविणार घ्यावा तर त्याला शाश्वती काय सागावी ? व वर्ग बंद पडल्यावर त्याला पगार कोठून द्यावा ! ऑक्टोबर महिन्यात प्लेगची मृत्युसंख्या अर्धरिकाम्या गावांत ७०-७५ पर्यंत गेली होती. म्हणून वर्ग बद ठेवणेच भाग पडले. आणि टिळक सुटून आल्यानतर जरी पुनः एकदा क्लास सुरू करण्यांत आला तरी त्यानाहि पुढे प्लेगमुळे एक दोन वेळां असाच बंद ठेवावा लागल्यावर त्यांनी तो कायमचाच बद करून टाकला. अशा रीतीने वकिलीच्या वर्गाचा हा जोड उद्योग माझा थांबला. परतु टिळकांनी तुरुंगांतून आल्यानतर पुनः मराठा आपल्याकडे घेतला नाही यामुळे तो मला कायमचा भरपूर उद्योग झाला. या वेळी मी पुढे कोणत्या नात्याने केसरी-मराठ्याकडे राहवे असा प्रश्न उत्पन्न झाला होता. परतु टिळकांनी वर्तमानपत्रे सस्थेसारखी मानण्याचे दिवस अजून आले नव्हते. कारण त्यांचे पूर्वीचे कर्ज फिटले होते तरी या मधल्या दिवसांत खटल्याने व इतर कारणांनी फिरून नवे कर्ज झाले होते. आणि लॉ क्लासचे उत्पन्न थांबल्यामुळे टिळकांच्या संसाराचा खर्चहि केसरीतूनच निघावयाचा होता. सस्थेचा लाइफ-मेबर नसल्यास कांही दिवस भागीदार असे नाते सुचण्यासारखे होते. परंतु तीहि गोष्ट उभयपक्षी गैरसोईचीच वाटली. कारण गरज लागली तर टिळकाना छापखान्याकरिता भांडवल सहज मिळण्यासारखे होते व ती गोष्ट मला शक्य नव्हती. शिवाय शिक्षक व शिकाऊ मनुष्य याचा व्यवहार भागीदारीने होणे अडचणीचे असते. म्हणून शेवटी असे

ठरले की, दोन्ही पत्रांचा सपादक झालो असता मला १०० रुपये पगार ठरला होता तोच यापुढे मी फक्त मराठ्याचा सपादक राहिलो तरी चालू रहावा म्हणजे झाले.

स्वतः टिळकाना लॉ क्लासांत २०० रुपये मिळत तेहि आतां बंद झाले होते. ते आणि मी दोघेहि एकाच केसरीच्या उत्पन्नाच्या आधारावर येऊन पडलो होतो. पत्रांना सस्थेचे स्वरूप नसल्यामुळे, म्हणजे केवळ व्यक्तीच्या मालकीचे स्वरूप असल्यामुळे, पेन्शन, प्रॉव्हिडंट फड, लाइफ इन्शुरन्स वगैरे योजना माझी कांहीच होऊ शकली नाही. म्हणून कदाचित् अधून मधून थोडी वकिली करून माझ्या प्राप्तीत भर टाकता यावी म्हणून टिळकांनी मला सवडीप्रमाणे जमल्यास वकिली करण्याचीहि परवानगी दिली होती; व या हेतूने त्यांचे मित्र आप्पाराव वैद्य वकील यांना मला नेऊन भेटविले होते. परतु वकिलीची हौस नसल्यामुळे मी सातारा सोडून पुण्यास आलो, मग प्रत्यक्ष वर्तमानपत्राचे काम मिळाल्यावर व साधारण ससाराइतका पगार मिळूं लागल्यावर मी वकिलीकडे खरे लक्ष कसचा देणार !

खुद्द मराठा लिहिण्याचे काम चार दिवसात होऊ शके. पण वर्तमानपत्र चांगले चालविणाराला लिहिणे एकपट तर वाचन तिप्पट असे ठेवावे लागते. म्हणून तेव्हां वर्तमानपत्रे कमी होती तरी उरणारा वेळ मी वाङ्मयवाचनात घालवी. त्या वेळी मराठी वाङ्मयात नवे असे इतके थोडेच निर्माण होई की, त्याकामी मी वाचावयाचे कांही ठेविले नाही असे सहजच म्हणता येण्यासारखे होते. परतु इग्रजी वाङ्मय अफाट, त्याची मला जात्या गोडी विशेष, यामुळे त्या रिकाम्या वेळांत मी पुष्कळ वाचून घेतले व ते मला पुढे चांगले उपयोगी पडले. वर्तमानपत्राच्या धंद्यांत मनुष्य स्वतः चांगले लिहिणारा हवाच, पण तो बहु-श्रुतहि असावा लागतो. नाहीतर तो चांगला लेखक असूनहि त्याच्या एकेरी लिहिण्याच्या पद्धतीचा वाचकांना कटाळा येण्याचा संभव असतो. माझ्या लिहिण्यामध्ये केव्हांहि आवेश व तडफ ही कमी. परंतु माहिती भरपूर असल्या-मुळे ती वाण बहुश्रुतपणामुळे थोडीशी भरून निघे.

टिळकांच्या तुरुंगवासासंबंधी व त्यांच्या सुटकेच्या प्रयत्नासबंधी टिळक-चरित्राच्या पहिल्या खंडांत जरूर ती माहिती मी दिली आहे. तेथे न दिलेली अशी माहिती इतकीच की, टिळकांविषयी फक्त युरोपियन अधिकारी वगळून

बाकी सर्वांच्या मनात सहानुभूति असल्यामुळे ते त्याना चागले वागवीत. म्हणजे असे—तुरुगांतीलच अन्न त्यांना द्यावे लागे पण किंचित् आजारीपणा वाटला की त्यांना तुरुगांतील इस्पितळांत नेऊन ठेवीत. व मग तेथे थोडे तूप दूध वगैरे देण्यांत येई. तसेच टिळकाना सुपारी खाण्याची जन्माची सवय. तेव्हा हिंदी जेलर त्यांना भेटण्याचे निमित्त करून हळूच कागदाखाली सुपारी ठेवून देई. पण उलट टिळकांचाहि स्वभाव असा की, तुरुंगांत अगदी शिस्तीने वागावयाचे व तक्रार म्हणून होतां होईतो करावयाची नाही. ह्या त्यांच्या स्वभावाचा परिणाम युरोपियन जेल सुपरिंटेंडेटवर होई. मुबईस त्याचे वजन फार कमी झाले म्हणून त्याना पुढे पुण्यांत येरवड्यास आणून ठेवले. तेथे हिंदी नोकर-चाकरांचा भरणा खालपासून वरपर्यंत बराच असल्यामुळे टिळकाना खासगी सवलती बऱ्याच मिळत. पुढे त्यानी मजुरीदाखल रगाचे काम घेतल्यापासून त्याना आणखी सुखसोई मिळू लागल्या तथापि टिळकाना भाताची आवड व कांदा लसुणीचे वावडे; आणि तुरुंगांत तर भात अगदी वाईट मिळावयाचा व कांदा लसूण घातलेले म्हणून कालवण वर्ज व्हावयाचे! अशा रीतीने अन्न तुटल्याने मिळेल त्या दुधावर निर्वाह करावा लागे. यामुळे तुरुगांतून सुटून आल्यावेळी टिळक काळवंडून गेले होते, ओठ काळे पडले होते, आणि गालफडेहि अगदी बसली होती.

टिळक मुबईस असता मी त्याना तुरुगात भेटण्यास कधी गेलो नाही. मुंबईची स्नेही मडळी जात व पुण्याहून धोंडोपत जात. पुण्यास मात्र मी एकदोन वेळां गेलो होतो. एका प्रसंगाची तर चांगलीच आठवण आहे. यावेळी कर्नेल जॅक्सन हे जेल सुपरिंटेंडेट होते. आधी परवानगी विचारून ना. दाजीसाहेब खरे यांजबरोबर मी गेलो. सुपरिंटेंडेटच्या कचेरीत आम्हास नेऊन बसविण्यांत आले. साहेबाच्या खुर्चीशिवाय तेथे दुसरीहि एक 'खुर्ची होती. तिच्यावर दाजीसाहेब बसले. मी उभाच होतो. जॅक्सनसाहेब ऑफिसांत येतांच त्यांना दाजीसाहेब हे खुर्चीवर बसलेले पाहून जो राग आला तो सांगतां पुरवत नाही. ते अगदी उसळून येऊन म्हणाले "खुर्चीवर बसणार तुम्ही कोण!" दाजीसाहेब म्हणाले, "तुमच्या भेटीला आलो, तुमच्या खुर्चीशिवाय एक खुर्ची रिकामी होती म्हणून बसलो." जॅक्सन म्हणाले, "तुम्ही कोणीहि असा. माझ्या कचेरीत माझ्या परवानगीशिवाय, मी बसा म्हटल्याशिवाय, कोणीहि बसावयाचे नाही." दाजीसाहेब उठले व ते उठले असे पाहून जॅक्सनसाहेब आढ्यतेनें

म्हणाले, "आतां बसा." त्यावर खरे रागावून म्हणाले, " मला तुमच्याशी काम आहे. खुर्चीशी काम नाही. मलाहि स्वाभिमान आहे. मी टिळकाच्या भेटीला आलो आहे. तेव्हां पुढचे काय ते बोला. मला शिष्टाचार नकोत." दाजीसाहेब खरे या वेळी कायदे कौन्सिलचे सभासद होते; व कर्नल जॅक्सन याची व माझी साताऱ्याची थोडीशी ओळख होती. कारण ते व कॅप्टन पियर्स हे युनियन क्लबमध्ये टेनिस खेळावयास येत तेव्हा क्लबतर्फेच्या त्याच्या सामनेवाल्यात मी एक असे. पण जेथे नामदारांची ही वाट तेथ माझ्या जुन्या ओळखीची काय कथा ! असो. पुढे टिळकांची व आमची भेट साहेबासमक्ष झाली, पण वरील प्रकाराने आम्ही नाराज असल्यामुळे अगदी जरुरीच्या कामापुरते बोलून आम्ही तेथून पाय काढला.

१८९६ अखेर व १८९७च्या प्रारंभी मी प्लेगच्या दिवसात पुण्याच्या बाहेर काही दिवस राहूं शकलो. कारण काही कॉलम मजकूर लिहिण्यापलीकडे मजवर फारशी जबाबदारी नव्हती. पण १८९७साली मी सपादक नात्याचे डिक्लेरेशन केल्यापासून, प्लेगची आपत्ति टाळण्याकरिता म्हणून पुढे कधी एक दिवसहि पुण्या-बाहेर राहिलो नाही. पहिल्या पहिल्या प्लेगांत जितक्या लोकांना पुणे सोडून बाहेरगांवी राहणे शक्य होते तितके सर्व जात. शिवाय प्लेग केस झाली म्हणजे घरातून सर्व माणसाना बाहेर काढीत. यामुळे प्लेगच्या दिवसात शहर जवळ जवळ ओस पडे. भर दोन प्रहरी बाहेर पडले असता कित्येक रस्त्यातून एकाददुसरा मनुष्यच आढळावयाचा. बाजारातील कामधंदे जेमतेम चालू राहत. दुकानाचे सबध दार उघडे राहिले आहे व देवघेव चालू आहे असे क्वचितच दिसे. फक्त सरकारी कचेऱ्या चालू राहत. अशाहि दिवसांत प्लेगच्या मृत्यूचे आंकडे कांही वर्षे शेकड्यांनी मोजावे लागले. आश्चर्य वाटे की या ओसाड शहरांत मरावयाला इतकी माणसे तरी कोठली येतात !

मी कांही दिवस सदाशिव पेठेतील चित्रशाळेजवळ परांजपे यांच्या वाड्यांत राहात होतो तेथे माझी माडी अगदी रस्त्यावर होती. लकडीपुलाकडील स्मशानाकडे जाण्याचा मुख्य हमरस्ता तोच असे. तेव्हां दिवसभर, व रात्रीचे कांही तास वगळून रात्रीहि, प्रेतांची सारखी रीघ लागे. त्यांतून पुण्यांत प्रेते नेण्याची चाल थोडीशी विलक्षणच आहे. ब्राह्मण वर्ग वगळला असतां, बाकी सर्व जातीची प्रेते ओरडत आरडत गाजत मिरवत जाण्याचा प्रघात बाहेरगांवी नाही तो पुण्यास

होता. कधी नाही ते रामनाम प्रेतवाहकाना आठवावयाचे; व ब्राह्मणेतर जातीत प्रेतयात्रेला जाण्याची शिस्त विशेष असल्यामुळे बहुधा कोणत्याहि यात्रेला गर्दी असावयाची. टाळमृदगासह दिंडीचे भजन नसले तरी सर्व घोळक्याने मिळून "राम बोलो भाई राम" या शब्दाचा मोठमोठ्याने उच्चार व आरडाओरड करण्याची रीत असे. बऱ्या स्थितीतील मृताच्या प्रेतयात्रेला गर्दी म्हणून सहजच मोठी घोषणा होई. पण गोरगरीबाची प्रेतयात्राहि अशीच दुमदुमत जाई ! मात्र याचे कारण असे की प्रेत उचलून नेण्याकरिता भाडोत्री माणसे लावावयाची, व पुष्कळ वेळां ती मद्यपानाची पर्वणी ठरावयाची ! दारूची बाटली घशात जाईल तेव्हांच प्रेतवाहकांचा पाय घराबाहेर पडावयाचा ! आणि एकदा हे कैफी जवान रस्त्याला लागले म्हणजे तिरडीच्या पुढल्या बाजूचे वाहक अधिक मोठ्याने ओरडतात की मागच्या बाजूचे ? अशा एक प्रकारे राक्षसी चढाओढ सुरू होई. ब्राह्मणेतरात, विशेषतः खालच्या जातीत, दुःख हे अधिक मुखर असते. त्याप्रमाणे या तामसी रामभजनाच्या कल्लोळात बायाबापड्याचे करुण विलाप मधून मधून मिसळून कानी पडावयाचे. रात्र चादणी असली तरी प्रेतयात्रेला दिवे बरोबर असावयाचे. मग अधाऱ्या रात्री तर बोलावयासच नको. तात्पर्य, एकादी प्रेतयात्रा म्हणजे वेताळाची स्वारी अशी वाटे. आणि सदाशिव पेठच्या मोठ्या रस्त्याच्या पूर्वटोकाला एकदा ही आरडाओरड ऐकू येऊ लागली की, ती पश्चिमटोकाला पोचून ऐकू येई-नाशी होईपर्यंत दहा दहा मिनिटेहि जात. तसेच मृत्यु दिवसातून केव्हाहि झाला तरी प्रेतयात्रा मात्र साधारणपणे ठराविक वेळीच निघत. यामुळे मिरवणुकीतील ताबुता-प्रमाणे कित्येक वेळा प्रेतयात्रेमागे प्रेतयात्रा अशी रांग लागे. मी परांजप्याच्या वाड्यांत राहत असता पुण्यातील मृत्युसख्या दोन-अडीचशेपर्यंत कधी कधी गेली होती.

अशा स्थितीत मनाला काय वाटत असेल याची कल्पनाच करणे बरे. पण पुढे पुढे प्लेगच्या मृत्यूचे भयच वाटेनासे हळुहळू झाले होते. संकट दूर आहे तो-पर्यंत भीति. ते पायाशी येऊन ठेपले म्हणजे मग त्याची भीति आपोआप जाते. मनुष्य विचारी असेल तर तत्त्वज्ञानी बनतो. विकारवश असेल तर बेताल होतो. पण तत्त्वज्ञान झाले काय किंवा बेतालपणा झाला काय, मृत्यूच्या सान्निध्यांत जी तदनुरूप दुःखाची वृत्ति रहावी अशी अपेक्षा ती तशी राहत नाही व एकंदर देखाव्याला विकृत स्वरूप येते. स्वतः मला लागोपाठ दोन-तीन रात्रीं प्रेते पोचविण्याकरितां ओंकारेश्वरावर जावे लागले. तेथेहि हे विकृत स्वरूप ठळकपणे

नजरेला आले. ते असे की, स्मशानांत सामान्यतः हास्यविनोद आढळावयाचा नाही, पण ‘ सदा मरे त्याला कोण रडे ’ ही म्हण खरी ठरून ओंकारेश्वराच्या वाळवटांत प्रेतयात्रेला आलेल्या लोकात मोठमोठ्याने बोलणे-चालणे, चर्चा वाद विवाद, व हसणे खिदळणेहि क्वचित् ऐकू येई ! ही गोष्ट मनुष्यस्वभावाला धरूनच असल्यामुळे, अथेन्स व लंडन या शहरी पूर्वी असाच प्लेगचा कहर झाला तेव्हां जनतेने केलेल्या बेताल वर्तनाची वर्णने इतिहास-वाचकांना वाचावयास सापडतात. असो. प्लेगची सर्व वर्षे माझी पुण्यातच गेल्यामुळे मला फक्त पुण्याचाच अनुभव. परंतु बाहेरगांवीहि असाच अनुभव आला असेल यात शंका नाही.

प्लेगमुळे गांव सोडून बाहेर जाऊं शकणारे लोक जात. पण गांवांत ज्यांना राहवे लागे त्यांची वाट काय ? कामधंदा मुख्यतः दिवसा चालावयाचा, व प्लेगची बाधा त्यांतल्या त्यात रात्री होते अशी समजूत. यामुळे दिवसा गावांत राहून दुपारी जेवण्याला, व रात्री जेवण्याला व वस्तीला, गांवाबाहेर कोठे तरी राहवे ही योजना लोकाना सहजच सुचली. प्लेगच्या अधिकाऱ्यानीहि याच सूचनेनुरूप लोकाच्या मागे तगादा लाविला. जाणते किंवा अनुकूल साधने असणारे लोकच प्रथम गावाबाहेर झोपड्या घालून राहूं लागले. श्रीमंत लोक बंगल्यांतून राहावयास गेले, पण मध्यमस्थितीतील लोकाना पत्रे तट्टे गवती छपरे यांच्या झोपड्या बांधून राहवे लागले. अशा झोपडी बांधून राहाणारांपैकी आम्ही व आमचे कांही स्नेही होतो. किंबहुना पुण्यालगत बाहेर मोठी पद्धतशीर झोपडी बांधून राहिलो असे बहुधा आम्हीच पहिले-दुसरे.

लकडीपुलापलीकडे पूर्वी मुळीच वस्ती नव्हती. भांबुर्डा गाव वस्तीचा. पण तो लकडीपुलानजीक नसून दगडीपुलाजवळ येतो. आणि येरंडवण्याचे गांव बाजूस बरेच दूर राहते. या दोन गावांच्या दरम्यानचे मोठे मैदान मी प्रथम १८९५ साली पुण्याच्या कॉंग्रेसच्या वेळी पाहिले तेव्हा अगदी ओसाड होते. सबंध एक मैलाच्या रस्त्याच्या आसपास फर्ग्युसन कॉलेजच्या नव्या इमारतीखेरीज चांगल्या वस्तीची एकहि खूण नव्हती. आणि पुण्यांतून गणेशखिड-रोडला जाणे म्हणजे एकट्या-दुकट्याला मोठी भीति वाटे ! तीच स्थिति जवळ जवळ १८९७ सालच्या अखेर होती. रामनारायण मारवाडी यांच्या बंगल्याने व्यापलेल्या जागेत पाटालगत मोठी झोपडी बांधून क्लब करून आम्ही राहिलो होतो. पलीकडे दुसरी एक झोपडी देवभक्त नांवाच्या गृहस्थांनी घातली व तीत ते येऊन राहिले. त्याच दिवशी रात्री

चोरी होऊन चोरट्यांनी त्यांना घायाळ केले. आम्हालाहि खडा पहारा देणारा जागता भय्या नोकरीला ठेवावा लागला होता. इतकी ती बाजू तेव्हां ओसाड होती. मग आमचे उदाहरण पाहून एकमेकाच्या सोबतीने त्या भागांत हळूहळू झोपड्या होऊं लागल्या.

झोपडीतले राहणे म्हणजे तो एकप्रकारे खरोखरच वनवास. पण त्याला दुसरीहि एक बाजू होती ती अशी की, बाहेर मोकळ्या हवेत राहणे म्हणून कोणाचीहि झाली तरी प्रकृति सुधारे. ज्या आम्हा लोकांना उघड्यावर निजण्याचा कधी प्रसंग पूर्वी नव्हता त्याना नुसत्या एकाद्या पत्र्याच्या अर्ध्या आच्छादनाखाली भर थंडीच्या दिवसात निजणे भाग पडे. पण मोकळ्या हवेची मौज काय असते ही तेव्हाच प्रथम कळून आली. आतां तर या मोकळ्या हवेची सवय लोकांना इतकी लागली आहे की, पुण्याबाहेर जवळ जवळ पुण्याइतकाच दुसरा मोठा गांव वसला आहे. लंडन शहर प्लेग व आग यांनी उध्वस्त केल्यावर नवे बांधले ते सुंदर बाधले गेले. तसेच काही अशी पुण्याचे झाले आहे. आणि प्लेगने इतर कितीहि हानि केली असली तरी लोकाना गांवाबाहेर राहण्याला शिकवून घरे बांधण्याची संवय लावली, या उपकाराने भावी सर्व पिढ्यांचे त्याने कल्याणच केले असे म्हटले पाहिजे. बाहेर मोकळ्या हवेप्रमाणे, एकजुटीने व सोबतीने राहून ख्यालीखुशाली करण्याचीहि त्यातल्या त्यांतच सवय लागली, ती सर्वस्वी नवी होती. आणि शहरांतील कायमच्या शेजाऱ्यात जो बधुभाव आढळत नाही तो बाहेरच्या झोपड्यांतून झालेल्या तात्पुरत्या वस्तीत दिसून येई. शिवाय चोऱ्या वगैरे होत यामुळे सघटित रीतीने लोक बदोबस्त करण्यालाहि शिकले. स्वतः मी काही दिवस रात्री अपरात्री उठून, नेमून घेतलेल्या हद्दीत हिंडून, खडा पहारा दिला असे चांगले स्मरते. पहारेवाल्यांच्या लहरी ललकाऱ्या, पल्लेदार हांका, व गोफणीचे घुमणारे आवाज हे ऐकू आले म्हणजे अर्धवट झोपेतल्या माणसाला मोठा आधार वाटे.

आम्ही झोपडी बांधून क्लब करून राहिलो असे वर सांगितले त्या क्लबांत दोन-तीन महिने जितक्या आनंदांत गेले तितक्या आनंदाचे दिवस कांही अंशी पूर्वी फक्त कॉलेजांतच गेले. एरवी कोठे गेले नाहीत असे म्हणतां येईल. हा आनंद मुख्यतः बरोबरच्या स्नेह्यासोबत्यांबरोबर मनसोक्त गप्पागोष्टी मारण्याचा व हंसण्या खिदळण्याचा. थडीचे दिवस, उघडी हवा, सुखापुरते आच्छादन, कुशल आचाऱ्याचा हातचा स्वयंपाक, रोज पदार्थांची नवलाई, निरनिराळ्या

स्वभावाची रसिक बहुश्रुत माणसे, बायकामुले नसल्यामुळे गप्पागोष्टींना अनिर्बंध मोकळीक, असा सच असल्यावर मग काय कमी ? दिवसा गावांतील काम करून सध्याकाळाबरोबर पाखराच्या चालीने सर्वांनी झोपडीवर जमावे, आणि प्लेगचा कहर असता आजचा दिवस तरी आरोग्याचा असे वाटून, एरवी कधीहि न जाणवणारे असे जगण्याचे सुख रोज नवे नवे अनुभवावे यामुळे सकाळी चहा पिण्याच्या वेळी व रात्री भोजनोत्तर केव्हा शेगा, केव्हा हरभरा, केव्हा मटार, अशाची रास घालून, भोवती उबदार पांघरूण घेऊन, बिनकामाची माणसे बैठक मारून बसली म्हणजे कथाप्रसगाला व विनोदाला किती भर येत असेल याची कल्पना सहजच होईल. पण त्याहून सागण्याची गोष्ट ही की, आम्ही क्लबात जमलेले लोक जवळ जवळ नमुनेदार स्वभावाचेहि होतो हे लोक म्हणजे मी व हाय-स्कुलात तेव्हा मास्तर असलेले माझे सर्वांत वडील बंधु नाना, कृष्णाजीपंत खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, धोंडोपंत विद्वांस, चित्रशाळेचे वासुदेवराव जोशी व शकरराव जोशी, हातवळणे मास्तर, वाकर्नीस वकील, ढमढेरे, बोपर्डीकरशास्त्री इत्यादि. आमच्यामध्ये वयाचा फरक थोडथोडा असला तरी आम्ही जवळ जवळ सर्व एकाच दर्जाचे होतो. वाकर्नीस व हातवळणे हे पुण्याच्या नेमस्त पक्षातील, आणि परांजपे, खाडिलकर व मी हे टिळक पक्षातील होतो. तथापि तेव्हा या पक्षातील मतभेद टिळकांपुरता विकोपाला गेला असला तरी दुय्यम प्रतीच्या माणसांना तो फारसा बाधलेला नव्हता त्यातूनहि हातवळणे हे फारच सज्जन गृहस्थ व वाकर्निसासारखा गोड स्वभावाचा मनुष्य विरळा. वासुदेवराव जोशी हे थट्टा करून घेणारे बहाद्दर, आणि परांजपे व खाडिलकर हे त्यांची थट्टा करणारे बहाद्दर. तात्पर्य, त्यावेळच्या सभाषणांत झालेल्या कोट्या, विनोदाचे विषय, उपमा रूपकादि अलंकार, व्यंगोक्त्या व महदाख्यायिका या जर कोणी लिहून ठेवल्या असत्या तर त्याचा खरोखरच एक ग्रंथ झाला असता असे वाटते. पण हा क्लब एक वर्ष झाला तेवढाच. पुनः तो जुळला नाही. आणि यापुढे मी कोठेतरी रहावे, कोठेतरी जेवावे, कोठेतरी निजावे अशा जवळ जवळ हालाच्या स्थितीत प्लेगची बरीच वर्षे काढली. कायमच्या झोपड्या घालवत नसत परिभ्रमणाहि एकप्रकारे बरेच वाटे. अशा स्थितीत मुले माणसे घेऊन राहण्याची सोयच नव्हती. कारण एकटा जीव सभाळता सभाळता पचाईत पडे तेथे पाच-चार माणसे बरोबर घेऊन नित्य कोठे काळजी वाहत बसावे ? यामुळे तिकडे परगावी मुलामाणसांनी आमची काळजी करावी व इकडे



न. चिं. केळकर यांचें १८९८ मधील छायाचित्र.

( पृ. २४० )

आम्ही त्यांची काळजी करावी अशी स्थिति असे. आणि प्लेग सपून शहर पुनः भरूं लागले म्हणजे एखादे नवे युग अवतरल्यासारखा आनंद होई.

१८९७ च्या डिसेंबरांत उमरावती येथे राष्ट्रीय सभा भरली. त्या सभेला शिवरामपंत परांजपे व मी दोघेहि गेलो होतो. प्लेगमुळे सभा भरू देतात की नाही हा प्रश्नच होता. पण वऱ्हाडच्या तोंडावर मलकापूर येथे पुरे दहा दिवसाचे क्वारंटिन सक्तीने बसवू देण्याच्या अटीवर सभा भरविण्यास परवानगी मिळाली. आमच्याप्रमाणे कै. गोपाळराव गोखले हेहि राष्ट्रीय सभेला निघाले होते. परंतु आम्हा सर्वांनाच या क्वारंटिन कॅंपात दहा दिवस काढावे लागले. मला तर प्रथम भुसावळेसच प्लेगच्या अधिकाऱ्यांनी उतरवून घेतले, व तेथल्या क्वारंटिन कॅंपात नेऊन घातले. तेथे पाहतो तो खोल्या म्हणजे लाकडाचे अनगड ओंडे उभे केलेले, वर आच्छादन नाही, खाली रेती पसरलेली, अशा स्थितीत दिवस जाणे कठिण. म्हणून "मी उमरावतीला जात असून मलकापूरच्या क्वारंटिनमध्ये पडणारच आहे मग उगीच येथे का ठेविता ?" असे सांगून मी कशी तरी सुटका करून घेतली. मलकापूरचा कॅंप हा नावाने क्वारंटिनचा होता तरी तेथील पाहुणचाराने आम्ही इतके सुखावलो की, हे क्वारंटिन असेच लांबेल तर बरे होईल असे वाटूं लागले. मलकापूरचे तरुण उत्साही नागरिक शेट विष्णु सावजी व तेथील पिंपळीकर, सोमण वगैरे वकील मंडळी यांनी अगत्याची शर्थ केली. या कॅंपात मी, गोपाळराव गोखले, शिवरामपंत परांजपे व आणखी दहावीस गृहस्थ दहा दिवस राहिलो होतो. तेथेहि गप्पागोष्टी विनोद यांची चंगळ उडाली. गोखले यांचे माफी-प्रकरण नुकतेच आले असल्यामुळे ते मनातून थोडे रजीसच होते. पण एकप्रकारे गिर्धाराचे धैर्य त्यांच्या अंगी आले होते, व त्यांनी माफी मागितली असली तरी त्यांची आधीच असलेली कीर्ति विलायतेस वेल्बी कमिशनपुढे उत्कृष्ट साक्ष देऊन आल्यामुळे आणखी वाढली होती. यामुळे त्यांना कोणीहि मोठ्या आदरानेच वागवी. शिवाय आम्ही पुण्यामुंबईकडील व थोडेसे प्रतिष्ठित लोक कॅंपात असल्यामुळे स्वागतमंडळातर्फे आमचा समाचार घेण्याला केव्हा दादासाहेब खापर्डे, केव्हा रावबहादूर मुधोळकर, केव्हा मोरोपंत जोशी, अशी मंडळी येत. या दहा दिवसांत सुप्रसिद्ध बंगाली पुढारी उमेशचंद्र बानर्जी हे उमरावतीला जाण्याकरिता आले. त्यांनाहि क्वारंटिनमध्ये काही वेळ अडकावून ठेवले होते. काळ्या-गोऱ्यातील भेदभाव त्या दिवसांत क्वारंटिनमध्ये फारच

दिसून आला गोरासाहेब मग तो युरोपियन असो, युरेजियन असो, त्या नुसते नाव टिपून घेऊन मुक्कामाला जाण्याची त्याला परवानगी मिळे. पण उमेश चंद्र बानर्जी, गोखले वगैरे दुसऱ्या पहिल्या वर्गातून प्रवास करणाऱ्याहि देश पुढाऱ्याना क्वारंटिनमध्ये पडावे लागे प्लेगच्या व्यवस्थेचा एरवी त्रास होताच पण या वर्णभेदामुळे तो जुलूम फारच दुस्सह वाटे

मलकापूरच्या या क्वारंटिन कंपात दादासाहेब खापर्डे यांची व माझ प्रथम ओळख झाली. त्यांचे वर्णन पूर्वी वऱ्हाडच्या विद्यार्थ्यांकडून ऐकले हो व श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे तर खापर्डे यांचे वर्णन मोठे बहारीचे करीत आणि "हा फेटा की थट्टा" हे एक वाक्य खापर्डे या नावाशी माझ्या मना कायमचे जडून गेले होते. यामुळे खापर्डे यांचे प्रथमदर्शन हे सहजच मो कौतुकास्पद झाले. त्यातूनहि त्यांच्या रसाळ वक्तृत्वाचा तो पहिलाच अनुभव यामुळे खापर्डे यानी दोन-तीन तास पहिल्या भेटीत या कंपात घालविले त्या वेळ त्यांच्यासबंधाने जो एकप्रकारचा कुतुहलकारक ठसा मनावर उमटला तो अजू तसाच कायम आहे. आणि खापर्डे यानीहि पण आपल्या पोषाखात व बोलण्या चालण्यात तेव्हाच्याहून फक्त सोनेरी जरतार व रेशमाचा काठ यापेक्षा इत कशात काडीइतकाहि फरक केलेला नाही.

उमरावतीच्या राष्ट्रीय सभेच्या प्रसंगी वादाच्या अशा दोन तीन गोष्टी होऊ राहिल्या होत्या. एक, टिळकाना राजद्रोहाकरिता शिक्षा झालेली म्हणून त्यांच तसबिर सभेच्या मंडपात लावावी की नाही ? दुसरी, त्यांच्यासबंधाने सरकारच निषेधपर असा ठराव सभेत प्रत्यक्ष करावा की नाही ? आणि तिसरी गोपाळरा गोखले यानी सभेत भाषण करावे की नाही ? तसबिरीचा प्रश्न व ठरावाचा प्रश्न नास्तिपक्षीच निकालात निघाला ! आतून सरकारी अधिकाऱ्याचा धाकदपटशा, व बाहेरून नेमस्त स्थानिक पुढाऱ्याचा असा युक्तिवाद की, "टिळकाना शिक्षा झाल ही गोष्ट कोणाला कितीहि अप्रिय वाटली तरी बोलूनचालून तो न्यायकोर्टाच निकाल आहे आणि फिरून एका न्यायकोर्टाचा नव्हे तर दोन न्यायकोर्टाचा कारण शिक्षेनंतर विलायतेस प्रीव्हि-कौन्सिलकडे टिळकानी बॅरिस्टर ॲस्क्विथ याच्या विद्यमाने अपील केले तेहि नामंजूर झाले ! अर्थात् न्यायकोर्टाच्या निका लाला मान लवविलीच पाहिजे." "राष्ट्रीय सभेच्या मंडपात टिळकाची तसबिर मांडून, किंवा त्यांच्यासबंधी ठराव करून, इतकी उजळ माथ्याची सहानुभूति

प्रकट करणे म्हणजे तो दुसरा राजद्रोहच होय" असे उमरावतीच्या प्रमुख पुढाऱ्यांनी ठरविले. त्यातूनहि ते मोठ्या केविलवाणेपणे म्हणत की, "आम्ही मोठ्या कष्टाने राष्ट्रीय सभा भरविण्याची येवढी जबाबदारी पत्करली ती कशीबशी पार पाडू द्याल की नाही? का मध्येच विघ्न आणणार?" वास्तविक यात सभेला विघ्न असे काहीच नव्हते. परतु उमरावतीच्या पुढाऱ्याप्रमाणे बाहेरून आलेल्या पुढाऱ्यानीहि या कामी नेट न धरता पडते घेतले खरे. कलकत्त्याहून या सभेला बाबू मोतीलाल घोस, सुरेन्द्रनाथ बानर्जी, हिरेन्द्रनाथ दत्त वगैरे पुढारी आले होते. टिळकाच्या खटल्यात डिफेन्स फड उभारून व इतर रीतीने जरी यानी पुष्कळच मदत केली होती तरी त्याच्याहि हातून टिळकाच्या सहानुभतीचा ठराव विषय-नियामक कमिटीच्या गळी उतरविता आला नाही; व अध्यक्ष शकरन् नायर व स्वागत सभेचे अध्यक्ष खापर्डे याच्या भाषणात टिळकासबधाने जेवढा ओझरता उल्लेख आला तितक्यावर सर्वांना समाधान मानून घ्यावे लागले.

गोपाळराव गोखले हे राष्ट्रीय सभेत हजर होते, व त्यांना प्लॅटफॉर्मवर खुर्ची देऊन स्थानिक पुढाऱ्यांनी आदराने बसविले होते. परतु त्याची विशेष परिस्थिति लक्षात घेऊन त्याना कोणत्याहि ठरावावर बोलण्याची विनति कोणी केली नाही, व सभेत भाषण न करण्याचाच आपला निश्चय आहे असे त्यानीहि जाणविले होते. याहिउपर काही लोकाची अशी तयारी होती की, जर गोखले भाषण करण्याला उभे राहिलेच तर त्याना हुश् हुश् करून बोलू द्यावयाचे नाही, खाली बसवावयाचे. पण सर्वांच्या शहाणपणाने एथपर्यंत मजल गेली नाही. बगालचे पुढारी मोतीलाल, सुरेन्द्रनाथ वगैरे, तसेच पंडित मदन मोहन मालवीय, जी. सुब्रह्मण्य अय्यर वगैरे पुढाऱ्याची व माझी ओळख प्रथम उमरावतीस झाली. "प्रातिक गव्हर्नर हे सिव्हिलियन असावे की विलायतेहून आणावे" या विषयीच्या ठरावावर मला भाषण करण्याबद्दल सागण्यांत आले, व मी ते केले. राष्ट्रीय सभेत भाषण करण्याचाच काय, पण इग्रजी भाषण करण्याचाहि माझा तो अगदी पहिलाच प्रसग होता. तथापि नव्या उमेदीच्या भरांत मी न अडखळता भाषण केले.

उमरावतीची कॉंग्रेस सपल्यावर परत फिरण्याच्या सुमारास मला नागपुरास जाण्याकरिता निमत्रण आले. जी. सुब्रह्मण्य अय्यर यानाहि तसेच निमत्रण आले होते. अनायासे नागपूर पाहवयास सांपडते म्हणून मी जाण्याचे कबूल

केले बरोबर कै. मोतीबुलासा हे आले होते मोतीबुलासा हे खाडव्याचे मारवाडी त्याचे शिक्षण नागपुरास झाले होते. पण तेव्हा नागपूर शहर विशेष पुढारलेले नसल्यामुळे तिकडील हौशी होतकरू तरुण पदवीधर पुण्याकडे धाव घेत या सुमारास मोतीबुलासा यांच्याप्रमाणे कै. प्रो. वासुदेवराव पटवर्धन व कै. वासुदेव गोविंद आपटे हेहि इकडे पुण्यास आलेले होते मोतीबुलासा हे मोठे उत्साही व सच्चेपणाची आवड असलेले गृहस्थ होते ते व मी विरुद्ध पक्षातले होतो तरी त्यांचा माझा स्नेह होता; व मला नागपुरास बोलावण्याची कल्पना बहुधा त्यांचीच होती आम्ही नागपुरास कै. राजारामपंत दीक्षित यांचे पाहुणे होतो मोतीबुलासा यांनी त्यांच्याच घरी राहून शिक्षण घेतलेले. राजारामपंत हे मुंबईचे सॉलिसिटर कै. हरि सिताराम दीक्षित यांचे बंधु आणि टिळकावरील खटला व जी आय पी. तारमास्तरांचा संप या दोन प्रसंगांनी माझा व दीक्षितांचा बराच परिचय झालेला होता. तात्पर्य, सर्वच कारणांनी दीक्षितांचा पाहुणचार घेणे ओघानेच आले व त्यांनी माझा सत्कार चांगला केला त्या वेळी राजारामपंतांचा धाकटा मुलगा मोरोपंत हा तेथ कॉलेजात असून त्याच्या होतकरूपणाबद्दल सगळ्या नागपूरच्या लोकांना मोठी आशा होती त्याप्रमाणे पुढे तो विलायतेस जाऊन बॅरिस्टर होऊन आला. त्याचा धंदा चांगला चाले व अखेर कौन्सिलात निवडणूक होऊन तेथील कामकाजाच्या हुशारीबद्दल त्याचे नावहि आले. परंतु त्याला मद्यपानाचे व्यसन बेसुमार जडले आणि एका युरोपियन स्त्रीशी त्याने जवळ जवळ लग्न केल्यासारखेच होते या सर्वांचा परिणाम असा झाला की, त्याचा वाह्यातपणा दिवसेंदिवस वाढून अखेर त्याला प्रत्यक्ष वेड्यांच्या हॉस्पिटलात ठेवावे लागले व तेथेच तो मेला.

मोरोपंत दीक्षित व मोतीबुलासा यांनी नागपुरास जाऊन हॉलमध्ये जी सुब्रह्मण्य अय्यर व मी यांची व्याख्याने करविली अय्यर हे अनुभविक संपादक व तयार वक्ते तेव्हा त्यांच्या जोडीला माझे व्याख्यान म्हणजे ते काही तरी शेपूट डकविल्यासारखेच होते. तथापि वयाने लहान व केसरीचा संपादक या नात्याने श्रोते मंडळी मला सभाळून घेण्यास किंबहुना कौतुक करण्यास मनाने तयार होती तो प्रसंग साधून पुण्यातील प्लेगच्या व प्लेग व्यवस्थेच्या जुलमाचे वर्णन मी केले ते, माझ्या वक्तृत्वामुळे नव्हे पण त्यातील हकीकतीमुळे लोकांना

आवडले. अद्यापि वऱ्हाड-नागपूराकडे प्लेगचा प्रादुर्भाव झाला नव्हता. यामुळे इकडील जी जी हकीकत सांगावी ती त्यांना भयप्रद व अद्भुत वाटे.

उमरावतीच्या राष्ट्रीय सभेला जाताना व येताना ठिकठिकाणी अनेक स्टेशनावर सिग्नलर लोकांनी माझी चौकशी करून पाहुणचारहि केला कारण या तारमास्तरांची गाऱ्हाणी फार असून त्यांनी आपली एक असोशिएशन बनविली होती. हा संघ मुख्यतः महाराष्ट्रातील तारमास्तरांचा बनलेला असून लोणावळ्याचे तारमास्तर शंकरराव चितळे हे संघाचे एक चिटणीस असल्यामुळे, तारमास्तरांचे अर्ज एजंटाकडे करावयाचे संघाचे काम मजकडे आले होते पुढे पुढे मला त्यांनी सेक्रेटरी नेमल्यामुळे माझ्या नावानेच पुष्कळसा पत्रव्यवहारहि वरिष्ठ अधिकाऱ्याकडे झाला तारमास्तर बरेच गांजलेले होते म्हणून आपल्या मागण्या एजंटाने झिडकारल्या तर संप करावयाचा निश्चय त्यांनी केला होता; व मुंबईचे सॉलिसिटर हरि सिताराम दीक्षित यांनी मजप्रमाणे त्यांची दाद लावण्याचे मुंबईस होणारे काम पत्करले होते अखेर एजंट दाद देईना, तेव्हा सुमारे ५००—६०० सिग्नलर संप करून बाहेर पडले तारमास्तरांचा संप हा रेल्वेला बराच जाणवणारा असतो यामुळे रेल्वेच्या टाइमटेबलावर पुष्कळच परिणाम झाला. परंतु अशा प्रकारचा हा पहिलाच सामना असल्यामुळे जशी तार मास्तरांनी तशीच रेल्वे कंपनीनेहि कडेकोट तयारी केली होती. अखेर ठराविक पद्धतीनेच संपाचे पर्यवसान झाले.

मद्रासेकडील अर्धेकच्चे किंवा नवशिके तारमास्तर आणून कंपनीने आपले काम कसेबसे निभावले संप मोडला. कारण संपवाल्याजवळ घरी बसून खाण्याइतके पैसे नव्हते. मग नवीन त्यांची वर्गणी ती कितीशी जमणार ? तेव्हा पुष्कळसे संपवाले नाइलाजाने कंपनीला शरण गेले. त्यातल्या पुढाऱ्यांना अद्दल घडावी म्हणून एजंटाने कामावर घेतले नाही ! अशांपैकी कांहींचे हाल होऊन दारिद्र्यांत त्यांचा अंत झाला ! काहींनी दुसरे धंदे करून कशी तरी दोन्ही तोंडे मिळवून घेतली मात्र दहा-वीस असे निघाले की, कोणी वकिलीची परीक्षा दिली, कोणी व्यापारात शिरले. आणि या नवीन धंद्यात त्यांना इतके यश आले की, संप झाला हे ते आपले सुदैवच मानीत ! पुण्याचे एक वकील कै धारप हे अशांपैकी होते. संप झाल्यावर ते टिळकांच्या लॉ क्लासात माझ्या हाताखाली शिकले, व परीक्षा पास होऊन त्यांनी पुढे पैसे चांगले मिळविले. असो. संप करणे ही गोष्ट फार अवघड म्हणून संप करण्याचा सल्ला देणे ही गोष्ट देखील कोवळ्या

मनाच्या व विवेकी मनुष्याला ,सहजच अवघड होऊन बसते. आणि याचा जो अनुभव मला तारमास्तराच्या या संपाच्या वेळी तेव्हां आला तोच अगदी अलीकडे म्हणजे १९३० साली रेल्वे मेन्स युनियनच्या संपाच्या वेळी आला.

दोन्ही वेळी संप कसे होतात याची मला चक्षुर्वैसत्य माहिती मिळाली. ते कसे होतात या प्रश्नाचे उत्तर असे की, काही उत्साही पण उतावळे नोकर संघाचें अधिकारी बनतात. निर्णायक सत्ता त्यांच्या हाती जाते व इतराना त्यांचा निर्णय नाखुषीने मान्य करावा लागतो. संप झाल्यावर अधिकारी या पुढाऱ्यांचे तर नुकसान करतातच. परंतु केवळ परोपदेशाने संपात सामील झालेल्या अशांहि पुष्कळांचे नुकसान होते, व हाती काहीं इलाज नाही म्हणून ते त्यानी सोसलेले तिऱ्हाइताला मुकाट्याने पाहवे लागते. या पहिल्या संपाच्या वेळी लेखी अर्ज वगैरे करण्याचे काम मजकडे होते, व प्रत्यक्ष अधिकाऱ्यांशी भेटून बोलावयाचे ते काम दीक्षित सॉलिसिटर करीत. पण १९३० च्या संपाच्या वेळीं पुढाऱ्यांचा अड्डा दिल्लीस आमच्या बंगल्यावर पडला होता व कोणाचे खेळ कसे चालतात हे सर्व आम्ही पाहिले. तसेच या वेळी आम्ही असेंब्लीचे सभासद असल्यामुळे रेल्वेच्या सर्वांत वरिष्ठ अधिकाऱ्याकडे जाऊन खासगी रीतीने रदबदली करण्यासारखी आमची स्थिति होती. आणि त्या कामी बापूजी अणे व मी यांनीं काही कमी केले नाही. परंतु ठरल्याप्रमाणे संप झाला, ठरल्याप्रमाणे संप मोडला, व ठरल्याप्रमाणे पुष्कळांचे नुकसान झाले. पहिल्या संपाच्या वेळी या खटपटीत असलेले सॉलिसिटर दीक्षित याना, ते मुंबईस असल्यामुळे, गिरण्या वगैरेतून संप-वाल्याना कांही काम मिळवून देता आले इतकेच काय ते ! मला मात्र वर्तमान-पत्रांतून रेल्वे कंपनीला शिव्या देऊन आपले समाधान करून घ्यावे लागले.

केसरी व मराठा दोन्ही पत्रांचे संपादकत्व मी आपण होऊन मागावयास गेलो नसतां ते टिळकांच्या सल्ल्याने व इच्छेने मजकडे देण्यात आले. त्याप्रमाणे ते खाडिलकराना देऊ केले असते तर मात्र मराठ्याचे त्यानी नाकारले असते, व फक्त केसरीचे घेतले असते. पण मजकडे दोन्ही पत्रे देणारांची दृष्टि कांही विशेष प्रकारची होती. खाडिलकरांचा कोणत्याहि प्रकारे कमीपणा करण्याची त्यांची इच्छा नव्हती, तरी ते इंग्रजी लिहू शकत नाहीत म्हणून मराठ्याचे संपादक होण्याला पात्र नाहीत हे त्यांना पक्के माहीत होते. खाडिलकरांना पुढे आणावयाचे तर

एकट्या केसरीचें संपादकत्व त्यांना देण्याला हरकत नव्हती, व तें दिलें असतें तर खाडिलकरांनीहि घेतलें असतें. तथापि त्या वेळी खाडिलकर व मी यांच्यामध्ये या मंडळीकडून फारसा पृथक्‌पणा मानला गेला नव्हता. संपादकत्व देण्यानें त्या मनुष्याला मोठेपणा देण्यात येतो व तें न दिल्यानें कमीपणा होतो अशी त्यांची दृष्टिच नव्हती. कोणीकडून तरी वर्तमानपत्राचें काम नीट चालावें, व टिळकांच्या अभावी मी व खाडिलकर असे दोघे मदतनीस प्रत्यक्ष काम करणारे असल्यामुळे दडपशाहीला दोन्ही वर्तमानपत्राकरिता मिळून दोघां ऐवजी एकच बळी तयार करून ठेवावा व पत्रें चालावीं, म्हणून एक तुरुंगात गेला तर दुसरा उरवावा अशी व्यक्तिनिरपेक्ष दृष्टि त्यांची होती.

पण खाडिलकरांचें व माझें केसरीच्या बाबतींत जमावें तितकें जमलें नाही! मराठा सर्व मीच एकटा लिहित असें; खाडिलकरांनी कधी त्यांत एक ओळहि लिहिली नाही. तेव्हा त्यांत मतभेदाचा संबंध अर्थातच नव्हता. पण केसरीचा संपादक मी व मुख्य लेखक या नात्यानें अग्रलेखासुद्धां बहुतेक मजकूर लिहिण्याचें काम खाडिलकरांचें. यामुळे मतभेद व घासाघीस होई. हा प्रसंग मुख्यतः शेवटची प्रुफें पहातांना येई. कारण त्यांच्या लेखांत कांही अयोग्य वाटलें तर मी तीं वाक्यें किंवा शब्द त्यांच्यादेखत काढून टाकीत असें. याचें खाडिलकरांना वैषम्य वाटे. पण मी जबाबदार संपादक असल्यामुळे त्यांचा इलाज चालत नसे. मी झालों तरी सुखासुखी किंवा उगाच आपला हक्क बजावावा, किंवा आपल्या सूक्ष्म अभिरुचीचें स्तोम माजवावें, म्हणून दुरुस्त्या करीत नसें. तर माझ्या नांवावर मजकूर गेला असतां मला उद्यां खालीं पहावें लागेल असें वाटे तेवढाच मजकूर काढण्याचा मी आग्रह धरी. मतभेदाची मुख्य बाब यावयाची ती सरकारासंबंधी लिहिलेल्या मजकुराची बहुधा नसे कारण पीनल कोडाच्या दृष्टीनें काय लिहूं नये हें खाडिलकर यांनाहि कळण्यासारखें होतें. परंतु नेमस्त प्रतिपक्षी, म्हणजे एकंदर वर्ग व विशिष्ट व्यक्ति, यांच्या संबंधानें किती टाकून लिहावें याविषयीं त्यांचें माझें जुळत नसे. मलाहि पक्षाभिमान होता. त्यांत कांही जातीचा म्हणजे स्वाभाविक तर कांही कर्तव्याच्या क्रमानें प्राप्त झालेला असा त्यांत भेद असे. परंतु अभद्र शब्द लिहिणें हें माझ्या स्वभावाविरुद्ध होतें, व हेतूंचे आरोप करतांना थोडीबहुत काळजी घ्यावी असें मला प्रामाणिकपणें वाटे. असो. अशा रीतीनें मी प्रुफांत दुरुस्त्या केल्या म्हणजे जात्या

रागीट स्वभावाचे खाडिलकर रागावत व चडफडत. बोलूनहि दाखवीत की, "ठीक आहे. तुम्ही जबाबदार सपादक आहां तेव्हां तुम्ही दुरुस्त्या करणार हे ओघानेच येते. मला त्याबद्दल वाईट वाटून काय उपयोग!"

दुर्दैवाने यावेळी दोन गोष्टीना महत्व आले होते. एक अशी की, "टिळकांवर खटला झाला तो काही प्रमुख नेमस्तांच्या शिकवणीने व चिथावणीने झाला." मला ही गोष्ट फारशी पटत नसे. केसरीतील काही लेखाची भाषांतरे करून काही नेमस्तांनी ती मुबईच्या टाइम्सकडे पाठविली ही गोष्ट कर्णोपकर्णी मीहि ऐकून होतो. परंतु टिळकांनी सरकाराविरुद्ध एरवी कितीहि लिहिले तरी त्यांच्यावर जो खटला झाला नाही तो रॅडसाहेबाच्या खुनामुळे झाला. उलट तो खून झाला नसता तर नेमस्तांनी कितीहि चहाड्या केल्या तरी खटला झाला नसता असे माझ्या मनाला वाटत असे. म्हणून टाइम्स पत्रांतील टीकांना उत्तर देतांना मी एकादी कोपरखळी नेमस्ताना मारी, तरी खाडिलकरांइतका वाहवत जात नसे. दुसरी गोष्ट प्रोफेसर गोखले याच्या माफी सबंधाने. या बाबतीत माझे मत असे होते की, गोखले यांना माफी मागणे टाळतां आले असते. पण दाक्षिण्यबुद्धीने त्यांनी माफी मागितली तरी ती मागितली इतकी अघळपघळ मागावयास नको होती. हे माझे मत मी वर्तमानपत्रांतून लिहिले व केव्हांहि लिहिण्यास तयार होतो. किंबहुना माझे हे मत मी खासगी सभाषणात गोखल्याच्या तोंडावर सागितलेहि होते व त्यांच्याशी वाद केला होता. गोखल्याची विद्वत्ता व त्यांनी यापूर्वीची आठदहा वर्षे केलेली कामगिरी हे लक्षांत घेतले असतांहि गोखले यांनी चूक केली असे म्हणावयास मी तयार होतो. परंतु खाडिलकरांप्रमाणे त्यांना शेणखळ्यांत लोळविण्यास तयार नव्हतो.

खाडिलकरांच्या लेखांत मी दुरुस्त्या करीत असे याचे आणखी एक कारण असे की, खाडिलकरांना इंग्रजी लिहितां येत नव्हते, पण मला मराठी लिहितां येईल असा आत्मविश्वास होता. आणि मी नुसता दुरुस्त्या करणारा संपादक नव्हे हें जाणविण्याकरितां यावेळच्या दीड-पावणेदोन वर्षांच्या संपादकत्वाच्या मुदतीत मी केसरीत केव्हां स्फुटे व केव्हां केव्हां अग्रलेखहि लिहित असे. वासुदेवशास्त्री खरे यांच्या ऐतिहासिक लेखमालेच्या परीक्षणाची मी एक मोठी लेखमालाच लिहिली. तेव्हां खाडिलकर यांनाहि वाटले असेल की, मी कांही नुसता नामधारी

संपादक होऊन बसणारा नव्हे. स्वतः विचार करणारा व लिहिणारा आहे, व केसरीत लिहिणे ही चीज मला आटोक्याबाहेरची वाटत नाही.

खाडिलकर पुण्यास आले तेव्हां पहिल्यापासूनच त्यांचा कंपू वेगळा असे. आणि मला जवळ जवळ कपूच नव्हता असे म्हटले तरी चालेल. याचे कारण असे कीं आम्ही दोघे रिकामपणाच्या वेळेचा उपयोग दोन तऱ्हेनी करीत असू. खाडिलकरांचा स्वभाव असा की, जरूर पडेल तेंच व जरूर पडेल तेव्हांच कोणतेहि काम करावयाचे. उरलेला वेळ ते केव्हांहि आपल्या ठराविक चार मडळींत बसून चर्चेत गप्पागोष्टीत घालवीत. त्यांच्या खाजगी बोलण्यांत विनोद असून शिवाय त्यांच्या नाटकांत दिसून येणारी एक कला खाजगी सभाषणांतहि दिसून येई. ती अशी की, कोणत्याहि विषयांत मधून मधून तत्त्वज्ञानाच्या झाकेची वाक्ये यावयाची; व यामुळे त्यांच्या विचारगांभीर्याचेहि एकप्रकारचे तेज स्नेहीमंडळीवर पडे. आणि ती त्यांच्या सगतीची मोठी अभिलाषी बने. त्यांच्या कपूत प्रथमपासून के. एच्. केळकर व शिवरामपत पराजपे याच्यासारखे लोक होते. या दोघाचाहि त्यांचा परिचय डेक्कन कॉलेजापासूनचा होता. वासुदेवराव जोशी हे त्यांचेहि नवे स्नेही. पण त्यांचा व यांचा स्वभाव जुळे. वासुदेवराव यानीहि माझ्याशी प्रथमपासून चागला स्नेहभाव ठेवला होता, व मला खाणावळीत न जाऊ देतां कांही दिवस आपल्या घरीच जेवण्याची व्यवस्था आग्रहाने केली होती हे पूर्वी मी एका ठिकाणी सागितलेच आहे. परंतु अंतरगातले बोलण्याची वेळ आली म्हणजे त्यांची व माझी विचारसरणी जी जुळत नसे ती त्यांची व खाडिलकर परांजपे याची जुळे. मी सार्वजनिक सभेच्या क्लबांत गेलो तरच तेथे यांची माझी गाठ पडावयाची. एरवी मी घरी किंवा लायब्ररीत बसून आवडीची पुस्तके वाचीत असे. या इतरांचा मात्र एकहि दिवस असा सुना जात नसे की, तास दोन तास एकत्र बसून थट्टामस्करी व गप्पागोष्टी झाल्या नाहीत. जो खासगी स्वभाव तोच वर्तमानपत्रांत लिहितांनाहि प्रकट होतो. म्हणून माझ्या लिहिण्यांत बऱ्याला बरे, वाईटाला वाईट, असा विवेक स्वाभाविकपणे होई. उलट वरील इतर सर्व मंडळीचा स्वभाव कांही विशिष्ट वर्गासबंधाने व व्यक्तीसबंधाने कधीहि बरे न म्हणण्याचा किंवा त्यांचा कोणताहि गुण न घेण्याचा. सरकारविषयी लिहितांनाहि, कांही बरें दिसले तर मी त्यांच्या-संबंधाने विवेचकबुद्धीने दोन शब्द बरे लिही. अर्थात् टीका ही करीतच असे व

त्यांत कसूर होत नसे. तथापि सरकारासबंधाने व विशेषतः नेमस्त पक्षासबंधाने किंचित् कोठे बरा शब्द लिहिण्यात आला की, तो याना नापसत होई. त्याविषयी माझ्यापरोक्ष या मडळीत टीका चाले; व हाच प्रकार पुढे सतत चालला, किंबहुना वाढत गेला. गोपाळराव गोखले हे पुण्यातील नेमस्त पक्षाचे पुढारी. त्याजवर हल्ला करणे हे सरकाराखालोखाल नबर दोनचे राजकारण होऊन बसे. वास्तविक प्रतिपक्षी म्हटला म्हणजे त्याच्यासबंधी आपल्या मनात कसलाहि बरा विचार येण्याच्या सर्व वाटा बद करून बसले पाहिजे, तरच मनुष्याला खऱ्या पक्षाभिमानाने वागता येते व पक्षपात यशस्वी होतो. उलट प्रति-पक्षासबंधाने बरा विचार कोणत्याहि कारणाने मनात आला की, त्याच्यावरील टीका दिसण्यात लुळी-पांगळी होते ही गोष्ट अगदी यथार्थ आहे. या दृष्टीने, म्हणजे पक्षाभिमानाच्या दृष्टीने, पाहता पुढारी ( किंवा त्या वेळी पुढारीपणाचा प्रश्न नव्हता म्हणून टिळकाच्या विश्वासातले सल्लागार ) होण्याला खाडिलकर, पराजपे, जोशी हीच मडळी मजपेक्षा अधिक लायक होती. या दृष्टीने टिळकाच्या हिशेबी मी केव्हाहि कमी पडत होतो तरी माझ्या इतर व एकदर उपयुक्ततेमुळे त्याना मी हवा होतो व म्हणूनच टिकलो. त्यांनी बहुधा प्रथमपासूनच मनाशी ठरवून ठेविले होते की, पक्षाभिमानाची विशेष गोष्ट उपस्थित झाली असता ती मजवर न सोपविता त्याच्या या कसोटीला उतरणाऱ्या इतर लोकावर ती सोपवावयाची पण मीहि उलट असे दर्शवीत असे की, मला ही गोष्ट कळते पण मी त्याचा विषाद मानीत नाही.

या वादग्रस्त विषयाची या वेळेपुरती पूर्तता करून टाकण्याकरिता थोडे पुढचे आधी लिहितो. टिळक तुरुंगातून सुटून परदेशचा प्रवास करून परत येऊन त्यानी पुनः केसरी आपल्या हाती घेतला तेव्हा वर्तमानपत्रांत लिहिण्यासबंधाने होणारा खाडि-लकरांचा व माझा मतभेद यापुढे टळला. मजकडे मुख्यतः मराठ्यात लिहिण्या-चेच काम होते. टिळक मराठ्याची प्रुफेहि पाहत नसत. फक्त विशेष प्रसगी काय लिहावयाचे याविषयी आधी खाजगी इषारा देत. आणि त्यांचा इग्रजी पत्रव्यवहार ते पुष्कळ वेळां तोंडाने मजकूर सांगून मजकडून लिहवून करून घेत. यामुळे त्यांची मते त्यांनी मुद्दाम खासगी इषारा मला न देतांहि आपोआप कळतच. असे असतां-हि माझ्या हातून मराठ्यांत लिहितांना त्याना नापसत अशी वाक्ये किंवा कबुल्या किंवा विचारसरणी येऊन जाई. पण टिळकांचा स्वभाव असा की, जे लिहून छापून गेले त्याबद्दल कोणालाहि विशेष कांही दोष देऊन रागवावयाचे नाही. "मराठ्याचा

जबाबदार संपादक वेगळा आहे, तेव्हां तो सुचेल तसे लिहितो'' असेंहि सांगून टाकून केसरी व मराठा याच्यामध्ये दिसून येणाऱ्या मतभेदाचा ते परिहार करीत. केसरीचे जबाबदार मपादक ते पुढे झाले यामुळे केसरीची प्रुफ ते अर्थातच वाचीत, व खाडिल-करांच्या लिहिण्यांत दुरुस्तीच करावयाची झाली तर त्यानी कोणाला टाकून लिहि-लेल्या दुरुत्तरांची किंवा फाजील कडक शब्दांचीच करावी लागे. मी पक्षाभिमानांत कमी पडलो म्हणून प्रतिपक्षाविषयी भलेपणानें लिहिले असा माझा दोष काढण्याचा टिळकांना शभर वेळा प्रसग आला असेल, तर तसा दोष खाडिलकरांच्या लिहि-ण्यांत काढण्याचा त्याना एकहि प्रसग कधी आला नसेल. प्रसग येत असतील तर ते उलट्या बाजूचे.

असो. टिळक परत येऊन दाखल होण्याच्या आधी शिवरामपत परांजपे यानी आपले 'काळ' पत्र सुरू केले. माझ्या धोरणासबधानें नापसती प्रगट करावयाची झाल्यास हे एक आयतेंच साधन या मडळीना उपलब्ध झाले. खाडिलकर व पराजपे यांनीं टीका करण्याशिवाय प्रत्यक्ष उपयुक्त काम असे किंवा विधायक काम असें काही एक न करण्याची जवळ जवळ शपथच वाहिली होती. आणि मी वर्तमानपत्रां-तून टीका करणारा झालो तरी प्रत्यक्ष कांही काम करण्याची हौस मला वाटे. याचें तेव्हांचे एक उदाहरण म्हणजे प्लेगव्यवस्थेचा सरकारी जुलूम टाळण्याकरितां स्वयंसेवक पथकात नांव दाखल करण्याचा. सोल्जर लोकांच्या घरतपासणीचा आणि क्वारंटिन कँप, प्लेग इस्पितळ यातील व्यवस्थेचा जुलूम लोकांना असह्य होई, तो टळावा म्हणून गांवच्या प्रतिष्ठित लोकांनी स्वयसेवक बनावे असे ठरले होते. स्वय-सेवकांना आडमुठ्या उर्मट सोजिराबरोबर हिंडणे फिरणे किंवा प्लेग अधिकाऱ्यांशीं हुजत घालणे ही मोठ्या जिकिरीची व किंचित् अपमानाची अशी गोष्ट होई. तरी लोकोपयोगाकरिता मोठमोठ्या लोकांनीहि ही सेवा पत्करली होती. त्यांतच हरिभाऊ आपटे मी वगैरे लोक दाखल झालेले असून एकंदरीने आमचा लोकांना पुष्कळ उपयोग झाला. आमचे शिक्षण, आमची चालचलणूक, पाहून युरोपियन प्लेग अधिकाऱ्यांवरहि बराच दाब बसला. रँडसाहेबाचा खून प्लेग-व्यवस्थेच्या जुलमा-मुळे झाला ही गोष्ट लक्षांत घेऊन त्यांच्या मागून कर्नल के, मेजर रीड वगैरे अधिकारी आले, त्यानी लोकाना फार चांगले वागवून मोठी लोकप्रियता सपादली. प्लेग संपून ते परत निघाले तेव्हां अर्थातच त्यांना पानसुपाऱ्या झाल्या व त्या प्रसगी आभारप्रदर्शक अशी परस्पर भाषणेहि होत. पण खाडिलकर

परांजपे वगैरे मंडळी स्वतः स्वयंसेवक झाले नाहीत, व 'काळ' पत्रांतून या पान-सुपाऱ्यांची व आभारप्रदर्शक भाषणांची टवाळीच करण्यांत आली. एका अशा प्रसंगावर यज्ञाचे रूपक करून परांजपे यांनी ते आपल्या स्वभावाप्रमाणे रगविले होते, व त्यांत माझा प्रच्छन्न नामनिर्देश करून उपहास केला होता हे मला पक्के स्मरते. पण मीचसा काय अशा कामी टिळकाची सरकाराशी सहकारिता त्याना टीकास्पद वाटे. वास्तविक टिळकानी पुढाकार घेऊन खासगी प्लेग इस्पितळ काढले, व क्वारंटिन कॅपमधील अव्यवस्था सुधारली. या कामी गांवातील प्रतिष्ठित पेन्शनर सरकारी नोकर यांचेहि त्यांना सहाय्य झाले. परतु आपल्या गुरूच्या या धोरणाचे अनुकरण परांजपे किवा खाडिलकर यांनी केव्हाहि केले नाही. उलट खुद्द टिळकांवर नव्हे पण अशा कामांत पडलेल्या इतरांवर त्यांनी बरेच वेळां निंदाव्यजक टीकाहि केली.

१८९७ सालांतील राजद्रोहाचे खटले झाल्यावर सरकाराने वर्तमानपत्रां-संबंधाने एक नवे धोरण योजून पाहिले. ते म्हटले म्हणजे 'प्रेस कमिट्या' नांवाची मंडळे नेमून त्यांच्याद्वारे वर्तमानपत्रांत कोठे काय येते हे दक्षतेने माहीत करून घेण्याचे. या मडळांवर कांही सरकारी अधिकारी व कांही सर-कारच्या विश्वासांतले खासगी गृहस्थहि नेमण्यांत येत. वर्तमानपत्रे बारीक दृष्टीने वाचून त्यांत आक्षेपार्ह मजकूर दिसेल तो डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यास कळविण्याचे काम त्यांच्या गळयांत घालून दिले होते. हा मजकूर लक्षात आल्यावर पुढे मार्ग दोन. एक खटला करणे व दुसरा सपादकाला समक्ष बोलावून त्याच्याशी सभाषण करणे. या संभाषणांत फिरून दोन प्रकार असत. सपादक सामान्य व लेचापेचा आढळला तर त्याला जरब देऊन वाटेस लावणे; व तो बरोबरीच्या नात्याने बोलणारा भेटला तर त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करणे. टिळकाच्या खटल्यानतर मजकडे दीड वर्षावर सपादकत्व होते. त्यांत असे प्रसग चार-दोन आले. पण मजवर खटलाच करावा इतका, म्हणजे टिळकांइतका, मी सरकाराला त्रासदायक झालो नव्हतो. हा एक तरुण मुलगा कडक लिहीत असेल तर नव-शिकेपणाच्या भरांत असे लिहीत असेल असे समजून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडून मला संभाषणाकरितां निमंत्रण पाठविले जाई.

या अवधीत अशा रीतीने बोनस, शेपर्ड व लॅब या कलेक्टरांनी व कमिशनर वुडबर्न यांनी मला भेटीला बोलाविले. पहिला प्रसंग बोनस

यांच्याशी झाला तो १६ मार्च १८९८ रोजी. या भेटींत चर्चा झालेला प्रश्न 'पायपर केस'संबधी होता. या खटल्यांत हकीकत अशी होती की, क्लार्क व पायपर या नांवाचे दोन सोजीर पुण्याच्या आसपास शिकार करीत असतां त्यांच्या हातून अर्जुना तुळशीराम नांवाचा मनुष्य बदुकीच्या गोळीने मारला गेला रीतिप्रमाणे पायपर याजवर मुबईच्या हायकोर्टामध्ये खटला चालला, पण युरोपियन ज्यूरीने त्याला सोडून दिला आणि क्लार्क याला तर आधीच सोडून देण्यांत आले होते. पायपर याच्या गोळीने मनुष्य मेला, पण गोळीचा अपघात झाला की गोळी मुद्दाम घातली गेली हा मुख्य मुद्दा ठरून, अपघात झाला असे ज्यूरीने सांगितले यावर मराठ्यांत मी सडकून टीका केली होती व एका वाक्यांत असे म्हटले होते की, " दुष्काळाप्रमाणे सोजीर लोकांच्या हातून अशी कृत्ये नित्य नियमाने होत असतात यासबधाने सरकारची छाती असेल तर त्याने आजपर्यंतची अशी उदाहरणे एकत्र करून प्रसिद्ध करावी, व इतके अपघात कसे होतात ह्याविषयी लोकाची खात्री पटवून द्यावी न्यायदानांतहि जात्याभिमान इंग्रजांचा सुटत नाही तो हा असा ! बोलून टीका करील तो मात्र पापी ! आणि कायद्याचे लोखंडी पजे असे भक्कम बनविण्यांत आले आहेत की, त्यांत धरून बोलणाराची जीभ सहज चुरडून टाकता येते यासबधाने सरकार घालावे तितके लक्ष घालीत नाही " बोनस यांनी मला असे विचारले की, " या तुमच्या म्हणण्याला आधार काय ? " मी म्हणालो, " जे घडत आहे असे दिसते तोच आधार. ज्यूरीचा निकाल सरकारच्या हाती नसेल, पण निदान सोजिरांना खात्याचा मुख्य अधिकाऱ्याकडून शिक्षा करणे, व मयताच्या वारसांना नुकसान भरपाईदाखल काही रक्कम ताबडतोब देणे, ही तरी गोष्ट सरकारच्या हातची आहे की नाही "? त्यावर खालील संभाषण झाले:—

" सरकार व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांच्या दरम्यान यासबंधी पत्रव्यवहार सुरू आहे हे तुम्हाला माहीत आहे काय ? "

" तुमचा पत्रव्यवहार मला कशाने कळणार ? "

" तुम्ही त्याबद्दल मला लिहून विचारावे की नाही ? "

" तुम्हाला विचारावे असे तरी मला कसे वाटावे ? भर कौन्सिलांत प्रश्न विचारले तरी तुम्ही सरळ उत्तर देत नाही. मग डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व सरकार

याच्या दरम्यान चाललेल्या पत्रव्यवहारासबधानें सपादकानें खासगी लिहून विचा-रावें व तुम्हीं त्याला माहिती द्यावी हे मला सभवनीय तरी कसें वाटावें ! तेव्हां कडक टीका करणें हा एकच उपाय उरतो. कारण ती वाचून तरी तुम्ही जागे होता."

"१८९३ साली सरकारानें शिकारीबद्दल नियम केले हे तुम्हाला माहीत आहे काय ?"

"नाही. पण टीका करण्याचा हेतुच हा असतो की, आमची माहिती चुकी-ची असल्यास सरकारानें तिची दुरुस्ती ताबडतोब करावी."

"पण कशाकशाला म्हणून उत्तरे द्यावी हे सरकारला कसें कळणार ?"

"कां बरे ! मग तुमचा नेटिव्ह प्रेसचा रिपोर्टर याचें काय काम ? वाटेल तर सरकारनें स्वतःचें वर्तमानपत्र काढावें किंवा या कामी अॅंग्लो-इंडियन पत्राचा उपयोग करावा. पण कोणत्याहि रीतिनें कां होईना सवालास जबाब व टीकेला उत्तर द्यावें."

"होय. तुम्ही हे म्हणत असाल तर त्यांत बरेंच तथ्य आहे. विलायतेंत मंत्रिमंडळावर वर्तमानपत्रांत टीका आली की, लगेच सरकार त्याला उत्तर देत असते."

"मी झालो तरी तेंच म्हणतो. मी पायपर केसवर जे लिहिलें ते वाचकांनी वाचलें. पण ते बरोबर नाही असें जर सरकारचें म्हणणें असेल तर ते लोकांपुढे एरवी कसें यावें ? पूर्वी अशाच रीतीनें हडसन नांवाच्या इंग्रजावर केसरींत टीका आली तेव्हां तुम्हींच नाही कां मजकडे हडसन साहेबाचा खुलासा पाठविला ? तो मी छापला. तसेंच याहि प्रकरणी सरकारचा खुलासा मजकडे येता तर मी तोहि छापला असता."

"होय. असें होईल तर बरें होईल असें मलाहि वाटतें."

"यापुढे संपादकांनी माहिती मागावी व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनी ती पुरवावी असें झालें तर ते सोन्याहून पिवळें. पण जुना अनुभव काय आहे व त्यावरून मी अनुमान कोणतें काढतो हे तुम्हाला मघाशीच सांगितलें. असो. तुम्ही मला भेटीला बोलाविलेंत हे लोकांना कळलें आहे, तर तुमचें व माझें संभाषण काय झालें हे मी मराठ्यांत प्रसिद्ध केल्यास त्याला तुमची कांही हरकत आहे काय ?"

" मुळीच नाही. तुम्ही खुशाल प्रसिद्ध करा. "

बोनस साहेब हा अतिशय शांत स्वभावाचा होता. आणि त्याच्याइतके अगदी कामापुरते मोजके शब्द बोलणारा दुसरा साहेब मी आजपर्यंत पाहिलाच नाही.

यानतर मेमध्ये तेव्हाचे कलेक्टर लॅबसाहेब याच्याशी असाच एक प्रसंग आला. पण त्यात बरीच भानगड झाली. तारीख १३ मे रोजी लॅबसाहेबाच्या निमत्रणावरून मी त्याच्या भेटीला गेलो. या भेटीत त्यानी मराठ्यातील काही लेखासंबंधाने मला खुलासा विचारला, व मुबईसरकारच्या हुकुमावरूनच मी हा खुलासा मागत आहे असे ते मला म्हणाले. मला समक्ष तोंडी काय खुलासा देतां आला तो मी दिलाच. पण घरी आल्यावर मी त्याना पत्र लिहून विचारले की, "तुम्ही माझा खुलासा तोंडी घेतला तो सरकारकडे पाठविणार असाल. परतु मला असे वाटते की, सरकारकडून तुम्हाला आलेल्या पत्राची एक प्रत तुम्ही मजकडे पाठवा. मी त्यावर लेखी खुलासाच तुम्हाकडे पाठवीन तो तुम्ही सरकाराकडे पाठवावा हे बरे. दुसरे असे की, बोनस याच्याशी माझे पूर्वी काय बोलणे झाले हे मी तुम्हाला समक्ष सागितले. तरी आता फिरून विचारितो की, पायपर-केस-सबधाने डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व सरकार याच्या दरम्यान काय पत्रव्यवहार झाला किंवा चालला आहे हे मला कळवाल तर बरे. कारण फिरून मला पायपरकेसवर मराठ्यांत लिहावयाचे आहे. तर त्याविषयी खरी सरकारी हकीकत कळलेली बरी. " याला लॅबसाहेबा-कडून खालील आशयाचे उत्तर आले. " मी तुम्हाला भेटावयाला बोलाविले ते तुमचा खुलासा विचारण्याकरितांच केवळ नव्हे, तर मुबईसरकारच्या मनात माझ्यामार्फत तुम्हाला कांही खुलासा कळवावयाचा होता तो कळवावा म्हणून. तुम्ही मागतां त्या पत्रव्यवहाराच्या नकला सरकारच्या परवानगीशिवाय तुम्हाला देता येत नाहीत. पण बोनस यानी सरकारकडे केलेल्या रिपोर्टाखेरीज मला दप्तरांत दुसरा कांही पत्रव्यवहार सांपडलाच नाही. "

पण मी लॅबसाहेबांचा पिच्छा सोडला नाही. लगेच मी त्यांना एक पत्र लिहिले व त्याबरोबर एक मसुदा पाठविला. त्यात समक्ष भेटीत त्यांचे माझे जे बोलणे झाले त्याचा सारांश लिहून काढला होता. मी तो प्रसिद्ध करण्याची त्याना परवानगी मागितली. कारण असे दाखविले की, "तुम्ही आम्हाला भेटीला

बोलावितां ती गोष्ट बरीच आहे. कारण पुष्कळ गोष्टींचा परस्पर खुलासा समक्षच होतो. पण तुम्ही पडला मॅजिस्ट्रेट आम्ही पडलो संपादक. तुम्ही आम्हाला भेटीला बोलाविले असे बाहेर कळल्याने तुमच्याविषयी कांहीच गैरसमज होण्यासारखा नाही. पण आमच्याविषयीं मात्र तर्कवितर्क सुरू होतात. कोणी म्हणतो यांना मॅजिस्ट्रेटाने तबी दिली ! कोणी म्हणतो हे मॅजिस्ट्रेटजवळ कांही कांही कबुल्या देऊन आले ! तेव्हां उत्तम मार्ग म्हटला म्हणजे तुमचें आमचें झालेले भाषण सारांशरूपाने प्रसिद्ध व्हावे. तुम्ही होऊन ते करणार नाहीच पण आम्ही करू. कारण आम्हाला त्याची गरज. भाषणाचा सारांश प्रसिद्धच करणार त्याअर्थी त्यांत न घडलेली गोष्ट किंवा न बोललेले शब्द अर्थातच मी लिहिणार नाही. पण साराश छापल्यानतर तुम्ही तो वाचावा त्यपेक्षां तो छापण्या-पूर्वी तुम्हाला दाखवावा हे अधिक योग्य. म्हणन मी तो तुमच्याकडे आगाऊ पाठवीत आहे. तरी कांही चुकबिक असली तर दुरुस्त करून कागद मजकडे परत पाठवावे. पायपर केसबद्दल कलेक्टर ब्रोनस व मी याचे असे ठरले होते की मी माहिती विचारावी, त्यानी द्यावी व मग मला काय लिहावयाचे ते लिहावे. तरी पायपरला शिक्षा कोणती दिली, मयताच्या वारसाना सरकारने किती रक्कम दिली किंवा देण्याचे योजिले आहे हे कळले म्हणजे तसे प्रसिद्ध करू. आणि खरी हकीकतच प्रसिद्ध केली म्हणजे मग अज्ञानाने टीका होण्याचे कारणच उरत नाही." या पत्राला लॅबसाहेबांनी उत्तर पाठविले ते असे की "ब्रोनससाहेबाना संभाषण छापण्याची परवानगी तुम्ही मागितली होती तशी मला मागितली नाहीत यावरून आपले सभाषण छापण्याचा तुमचा इरादा नसावा असे वाटले होते. पण आतां तुमचा तसा इरादा दिसतो म्हणन मी सागतो की आपले संभाषण खासगी होते अर्थात् ते प्रसिद्ध करण्याला माझी हरकत आहे. तुम्ही पाठविलेल्या कागदांत मी काही दुरुस्त्या केल्या आहेत पण त्या तुमच्या खासगी माहितीकरिता आहेत असे समजावे."

लॅबसाहेबाच्या व माझ्या सभाषणात रागाची अशी बरीच उत्तरे प्रत्युत्तरे झाली होती. ती प्रसिद्ध करण्याला माझी तयारी होती पण लॅबसाहेबांची नव्हती. यांत त्यांच्याकडे सहजच कमीपणा येत होता. याचा मी पुरा फायदा घेतला भाषणांतील एक मुद्दा असाहि होता की प्लेगच्या व्यवस्थेत ज्या सवलती एका गावी लोकाना मिळत नाहीत त्या दुसऱ्या गावी लोकानी दंगेधोपे केले असता

त्यांना मात्र मिळतात. 'मराठा' पत्रांत मी हे विधान उघड केले होते. त्यावर सरकारचे म्हणणे असे की, "आम्ही सवलती देतो त्या कोणाच्या दंग्याधोप्याला भिऊन देत नाही. आम्हाला त्या योग्य वाटतात म्हणूनच देतो." या विधानासंबंधाने आमच्या संभाषणांत बरीच चर्चा झाली. त्या चर्चेत लॅबसाहेबांचा युक्तिवाद लटपटीत व भाषण फुकट गुर्मीचे, आणि उलट माझा युक्तिवाद भरीव, भाषणहि जोराचे असे असल्यामुळे, लॅबसाहेब ते प्रसिद्ध करू इच्छित नव्हते हे उघड झाले. म्हणून या विषयावर मराठ्यात एक स्वतंत्र अग्रलेखच 'The Editor and The Magistrate' या नावाखाली मी घातला, व त्यात खालीलप्रमाणे स्पष्ट लिहिले. "संभाषणप्रसिद्धीला जर बदी, तर मला भेटायला यानी बोलवावेच कां? त्याचे म्हणणे त्याना पत्राने मला कळवितां आले नसते काय? बरे, बोलावून इकडले तिकडले मराठ्यांतले पुष्कळ लेख काढून हा असा वाईट आहे तो तसा वाईट आहे असे त्यानी मला सागितले. पण त्याला मीहि कशी उत्तरे दिली हे साहेब जाणतातच. ती उत्तरे किंबहुना ते सर्व सभाषण प्रसिद्ध करण्याला मी तयार असता मॅजिस्ट्रेटसाहेबांनी मात्र तयार न व्हावे हे आश्चर्य नाही काय? मॅजिस्ट्रेटनी भेटीला बोलावलें आणि आम्ही सपादक लोक गेलो तरी पचाईत. भेटीला गेलो म्हणजे त्यांनी आढ्यतेने बोलावे. पण आम्हालाहि स्वाभिमान नसतो असे नाही. आम्हीहि उत्तरास उत्तर देतो. मग ती छापण्याला हरकत कां असावी? आम्ही लिहितो त्यांत कांहीं गुन्हा असेल तर आमच्यावर खटला करावा. पण तोंड दाबून 'खाजगी सभाषणाचा' हा बुक्क्याचा मार का!"

हे प्रकरण मी असे चव्हाट्यावर आणले त्याने फारच मौज झाली. हिंदुस्थानांतील बहुतेक हिंदी पत्रानी माझा अग्रलेख आणि हा सर्व पत्रव्यवहार प्रसिद्ध केला, व या सरकारी कारवाईवर सडकून टीका केली. त्याचा परिणाम बराच चांगला झाला. कोणी म्हणाले, "केळकरांनी चांगलेच धैर्य दाखविले." कोणी म्हणाले, "केळकरांनी लॅबसाहेबाची अब्रू चांगलीच बाहेर काढली." 'हिंदु' पत्रानें तर असें म्हटले की, "लॅबसाहेबांनी केळकरांवर जो पाश टाकला त्यांत स्वतः तेच बिचारे सांपडले!" असो. पायपर केसची पाठ मी सोडली नव्हती, व दर पत्रांत माहिती मागतच होतो. शेवटी तीन महिन्यांनी लॅंबसाहेबांनी मला पत्र लिहून खालील गोष्टी कळविल्या. "(१) पायपरला त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी कांही शिक्षा केली आहे. पण अशा कामी शिक्षेचा तपशील प्रसिद्ध करतां येत नाही. (२)

मृताच्या कुटुंबाला सरकाराने कांही रक्कम तावडतोब दिली पण नक्की आंकडा जाहीर करतां येत नाही. तथापि विचार चालू आहे. ( ३ ) सोजिरांनी शिकारीला जाण्यासंबंधाचे नियम पूर्वीचे आहेत त्याहून अधिक कडक केलेले नाहीत. ( ४ ) बोनससाहेबांनी घडल्या प्रकाराची चौकशी वेगळी केली. पण तिचा रिपोर्ट सरकार प्रसिद्ध करू इच्छित नाही " हे उत्तर म्हणजे निर्लज्ज-पणाची कमाल होय असे वर्तमानपत्रांनी म्हटले. अर्थात् हे पत्र प्रसिद्ध करून मी त्यावर पुनः टीका केली. बोनससाहेब मला फिरून भेटते तर त्यांच्याच सभाषणाची आठवण देऊन विचारले असते की, "आता बोला वर्तमानपत्रांनी माहिती मिळवून मग टीका करावी असे तुम्ही साळसूदपणाने म्हणाला; पण माहिती देण्याघेण्याचा हा प्रकार कसा आहे ?"

लॅबसाहेबाच्या भेटीचा फिरून एकवेळ प्रसग आला. त्याचे कारण ली वॉर्नरसाहेबांचे 'हिंदी नागरिक' या नांवाचे पुस्तक प्रसिद्ध झाले होते त्यावर मी बरीच टीका केली होती. पण या भेटीत ते माझ्याशी जपून बोलले. यानतर ते लवकरच बदलून गेले. पुढे ते कमिशनर व कौन्सिल मेबर होऊन आले असतां त्यांच्या माझ्या कारणपरत्वे भेटी होत, पण पूर्वीची डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटची त्यांची उर्मटपणाची वृत्ति राहिली नव्हती.

यानंतर कमिशनर वुडबर्न यांनी मला असेच एकदां भेटीला बोलाविले. त्याचे कारण असे घडले. वायव्य सरहद्दीवरील युद्धात ब्रिटिश सैन्याला फारसे यश आले नाही याबद्दल चोहोकडे थट्टा होत होती. त्याप्रमाणे मीहि मराठा पत्रांत केली. भेटीतील संभाषणांत त्यांनी माझी अशी खात्री पटविण्याचा प्रयत्न केला की, इंग्रजी सैन्याचा खरोखरच जय झाला ! मी म्हटले, "तो कसा ?" साहेब म्हणाले, "आमचे सैन्य एका बाजूने टिऱ्हा प्रांतात शिरले व दुसऱ्या बाजूने बाहेर पडले." त्यावर मी थट्टेने विचारले की "एका बाजूने शिरून फक्त दुसऱ्या बाजूने परत आपल्या मुलखांत यावयाचे यालाच तुम्ही विजय म्हणणार की काय ? मग हा प्रवास न करतांच तुमच्या सैन्याला घरबसल्या आमचा जय झाला असे म्हणतां आले नसते काय ?" तेव्हां वुडबर्नसाहेबांना खरोखरच हंसू आले, व त्या विषयावरचें भाषण सपवावे म्हणून ते इतकेच म्हणाले की, "केळकर, तुम्ही हल्ली लहान आहांत. या लष्करी गोष्टीचे महत्व अजून तुम्हांला कळत नाही. ते पुढे कळेल."

याच भेटीत वुडबर्न साहेबांनी एक गमतीचा प्रश्न मला विचारला. त्यापूर्वी सुमारे एक वर्षभर मी प्लेग-व्हॉलटियरचे काम चांगले बजाविले होते म्हणून हरि नारायण आपटे व इतर एक दोन प्रोफेसर (मला वाटते त्यांत प्रो. गोखले याचेहि नाव होते) यांच्या नांवाबरोबर माझेहि नाव वर सरकाराकडे कळविण्यांत आले होते. ही गोष्ट मला सांगून वुडबर्न साहेबांनी औपचारिकरीत्या माझे अभिनदन केले. पण ते मला हळूच म्हणाले, "तुम्हाला एखादी पदवी देण्यासबधाने मी सरकाराला लिहिले तर तुमची काही हरकत आहे काय?" त्यावर मी म्हणालो, "नको. कृपा करून तसे कांही एक करूं नका." ते म्हणाले, "मग तुमच्या कामगिरीबद्दल गुणग्रहणदर्शक असे कांही करावेसे सरकारला वाटले तर त्यानी काय करावे?" हा प्रश्न ऐकून प्रथम मी थोडा गोंधळांत पडलो. पण लगेच मला उत्तर सुचले. मी म्हणालो, "आम्ही लोक प्लेग-व्हॉलटियर झालो ते गांवच्या नागरिकांच्या हिताच्या दृष्टीनें. कर्तव्य म्हणून. इतर पुष्कळ लोकांनी असेच आस्थेने काम केले आहे. तेव्हा त्यांना "चागल्या नागरिकत्वा"-चे सर्टिफिकेट आपण मनाने घालच. पुणे शहर म्युनिसिपालिटी ही मुख्यतः अशा नागरिक सभासदांचीच आहे. तेव्हा या सर्व प्लेग-व्हॉलटियरांचे गुण सरकार घेते हे त्यांना दाखवावयाचे तर शहर म्युनिसिपालिटीवरील प्लेगच्या खर्चाचा बोजा सरकारने कमी करावा, व म्युनिसिपालिटीवर असलेल्या सरकारनियुक्त सभासदांची सख्या पूर्वीइतकीच ठेवावी. ती आठांनी वाढविणार असे म्हणतात तर वाढवूं नये." माझ्या या उत्तराने वुडबर्नसाहेबांना आश्चर्य वाटले ते त्यांना गुप्त ठेवतां आले नाही. त्याचे कारण उघडच असे होते की, इतर कित्येक गृहस्थांनी आमच्यासारखेच प्लेग-व्हॉलंटियरचे काम केले होते, पण त्याकरितां रावबहादुरी किंवा रावसाहेबी उघडपणे मागून केलेले अनेक अर्ज कमिशनरच्या टेबलावर पडले होते. म्हणून त्यांचे नेटिव्ह असिस्टंट, बाबासाहेब पेंडसे, यांच्याजवळ वुडबर्नसाहेब मागाहून म्हणाले की, "केळकरांनी माझ्या एका प्रश्नाला अपेक्षेबाहेर उत्तर दिले."

याच सुमारास नवीन 'काळ' पत्राचे संपादक शिवरामपंत परांजपे यांच्याहि लेखाकडे प्रेस-कमिटी व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांचे लक्ष गेले. युरोपियन लोक देशी लोकांना छळतात मारतात हा नेहमीचाच विषय परांजपे यांनी लिहिला होता. पण तो अर्थात् त्यांच्या पद्धतीने म्हणजे कुत्सित विनोदपद्धतीनें. ते सरळ

रागावून लिहित नसत. वक्रोक्तीचा आश्रय करीत. अशाच रीतीने एका अंकात त्यांनी असे लिहिले होते की, "युरोपियन लोकांनी हिंदी लोकांना लाथा मारल्या म्हणून काय झाले ? त्यांच्या दहापाच लाथाहि न सोसण्याइतके हिंदी मनुष्यानें नादान कमकुवत राहावे ही काय रीत झाली ?" इत्यादि इत्यादि. परांजपे यांची वक्रोक्ति एकदां सुरू झाली म्हणजे मग ती वरील पद्धतीने कशी फैलावत जात असे त्याचा परिचय मराठी वाचकवर्गाला चांगलाच आहे. परतु सांगण्याचा मुद्दा हा की, सरळ रागाने शिव्या दिल्या व नांवे ठेविली तर मनुष्य जितकें चिडते त्यापेक्षां अशा वक्रोक्तीच्या म्हणजे कुत्सित विनोदाने अधिक चिडते याचें एकप्रकारे प्रत्यतरच मिळाले. कारण याच विषयावर मराठ्यात मी या वर्षात कांहीं नाही तरी दहावीस वेळा स्फुटे किंवा अग्रलेख लिहिले असतील. आणि माझीच गोष्ट म्हणून मी सांगत नाही, पण नेव्हाचे ते लेख आजहि वाचताना मी यथार्थ-पणे असे म्हणू शकतो की ते लेख पुष्कळच कडक होते अलीकडच्या केसरी-मराठ्यातील लेखापेक्षा ते कमी कडक होते असे मुळीच वाटत नाही आणि त्यांच्यावर खटले कसे झाले नाहीत याचे एकप्रकारे आश्चर्यच वाटते. तें कसेहि असो माझ्याप्रमाणे शिवरामपतावरहि प्रेस-कमिटीचा हात पडला. कमिटीचे अध्यक्ष डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनी पराजपे याना एक दिवस बोलावणे पाठविले, व सरळ असे विचारले की, "या तुमच्या लेखाबद्दल माफी मागता की नाही ? बोला." पुढील आठवड्याच्या अकांत त्यानी माफी मागताना सरकाराला दोष दिला, व आपली टीका यथार्थ होती असाहि युक्तिवाद केला. परंतु दिलगिरी प्रदर्शित केली यामुळे युक्तिवादाला फारशी किमत उरली नाही. या गोष्टीचा मराठ्यांत उल्लेख करून मी फक्त इतकेच म्हटले की, "काळकर्त्यांनीं माफी मागून टाकल्यामुळे त्यांचा लेख राजद्रोहाच्या कलमाखाली येतो की नाही हे पाहण्याची सधि उरली नाही." "मी लिहिले ते विनोदबुद्धीने लिहिले. त्यांत त्या विषयावर इतर लोक टीका करतात त्याहून विशेष वावगे असे कांही नाही. आणि प्रेस-कमिटी झाली म्हणून तिने विनोदी लिहिणे काय म्हणून वावगे मानावे ? जाऊ द्याच हा वाद कोर्टापुढे" असे म्हणून, माफी न मागतां, परांजपे यांनी यापुढील जबाबदारी प्रेस-कमिटीवर टाकली असती तर बरे झाले असते असा माझा रोख होता. पण कोर्टहि उघड व शुद्ध रागापेक्षां कुत्सित विनोदालाच अधिक चिडते ! असो. एकंदर धोरण असें दिसले कीं, आज प्रेस कमिटी नेमली तिच्या अनुभवावरून सरकार

वाटते की, अशा बाबतीत टिळकांचे म्हणून कांही एक विशिष्ट धोरण आहे, व ते तुम्ही संभाळीत नाही. पुण्यास असतांना मला दिसून आले होते की, वासुदेवराव जोशी व खाडिलकर हे तुमच्याशी फारसे मोकळ्या मनाने वागत नाहीत. येथे रा. राजवाडे यांच्याशी बोलणे झाले त्यांत त्यांचे म्हणणे असेच होते. राजवाड्यांनी मला सहज ओघांत सांगितले की, "वरील सन्मान-समारभाच्या कामी तुम्ही रावबहादुर पक्षाशी सहकारिता केली अशाविषयी तक्रारीची पत्रे पुण्याहून मजकडे काही आली आहेत." अर्थात् अशा तक्रारीना व कुरकुरीला कितपत महत्व द्यावे व त्याची किमत किती मानावी हे तुम्ही जाणताच. कदाचित यामध्ये मत्सरबुद्धीचा भाग असावा. कांहीचा गैरसमजहि असेल. कसेहि असो. आतां टिळक सुटून आले असल्याने इतरानी या गोष्टी त्याजकडे काढण्यापूर्वी तुम्ही होऊनच त्या काढाव्या हे बरे. त्यांना इतकेच म्हणावे की, "माझी दुसरी बाजू ऐकल्याशिवाय अशा कामी तुम्ही आपले मत बनवू नये' इतराच्या नादी न लागतां सर्व विश्वास त्यांच्यावर टाकण्याने कार्य होईल असा आमचा भरवसा आहे. ही म्हणजे काही मोठीशी बाब नाही, पण तिजकडे अगदीच दुर्लक्ष करितां येत नाही. वेळीच सावध असलेले बरे. ( नारायण चिंतामण केळकर, सातारा. )

(२९ ऑक्टोबर, १८९८) पुण्यांतील प्लेग कमी झाला आणि तुम्ही म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीत यशस्वी झाला या दोन्ही गोष्टी वाचून आनद झाला. तुम्ही म्युनिसिपालीटीत काम चांगले कराल अशी माझी खात्री आहे. मराठ्यांतील तुमचे कांही लेख फार कडक टीका करणारे आहेत. विशेषतः परवा तुम्ही लिहिले की, 'कुली लोकांना सोल्जर लोक मारहाण करतात.' पण याविषयी सर्वच सोल्जर असे वाईट असतात काय ? आणि त्यांचे वरिष्ठ लष्करी अधिकारी त्यांच्या कृत्यांचे समर्थन करितात असा तुमच्या लिहिण्याचा झोक दिसतो ! अशा तुमच्या टीकेबद्दल मी गोखले याच्याजवळ बोललो ते त्यांनी तुम्हाला कळविले असे दिसते. मात्र वर्तमानपत्राच्या संपादकाशी अधिकारी लोकांची वर्तणुक कशी असते याविषयी तुमची तक्रार काहीशी बरोबर आहे. त्यांनीहि संपादकाशी भलेपणाचे वर्तन ठेविल्यास उभयपक्षी द्वेष कमी होईल. प्रो. गोखले भेटल्यास त्यांना माझे नमस्कार सांगा. (कर्नल के, रेसिडट, एडन )

( २ नोव्हेबर, १८९८ ) तुम्ही मराठ्यांत आपली मते ठासून मांडल्यास त्याविषयी वाचकांना आदर वाटेल. तुमची जागा महत्त्वाची पण नाजुकहि आहे.

यशाची किल्ली म्हणून तुम्हाला सागून ठेवतो. ती ही की, केसरीच्या धोरणालाच चिकटून रहा. आणि आपली मते त्यावरून निश्चित करा. टिळकांशी खुल्या दिलाने व सरळपणाने वागा. लोकाच्या सागण्यावरून तुमच्याविषयी टिळकाचा ग्रह दूषित होऊं नये याविषयी खबरदारी ठेवा. इतर लोकाची त्यांच्याशी भाडणे झाली, पण मी त्यांच्याशी चिकटून राहूं शकलो याचे कारण हेच आहे. मी हा तुम्हाला वडीलकीच्या नात्याने सल्ला देतो. तो ध्यानात ठेवा. कारण तुम्ही आतां केसरी सस्थेशी कायमचे निगडित होणार. तुम्ही प्रारभ फार चांगला केला आहे असे दिसते. सार्वजनिक सभेवरील बदी उठविण्याविषयी तुम्ही सर चार्लस ऑलिव्हन्ट यांजपाशी गोष्ट काढली हे ऐकून आनद झाला. पुढील खेपेस बापू पुरुषोत्तम जोशी याना सार्वजनिक सभेचे चेअरमन करा. आणि तुम्ही व वामन विष्णु लेले असे चिटणीस व्हा. शकरराव लवाटे यांना असिस्टट म्हणून घ्या. इटालीच्या इतिहासासबधी पुस्तके लवकरच पाठवितो. ( म. रा. बोडस, मुंबई.)

( २६ नोव्हेंबर, १८९८ ) तुम्ही म्हणता त्या गोष्टीचा निकाल केला पाहिजे हे माझ्या ध्यानांत आहे. पण प्रथमतः केसरी छापण्याच्या गोष्टीकडे मला लक्ष पुरविले पाहिजे. एक गोष्ट मी मनाशी निश्चित ठरविली आहे ती ही की, कंत्राटी कामाने योग्य भाव देऊन जर केसरी-मराठा पत्रे कोठे छापून घेता आली तर तूर्त स्वतःच्या मालकीचा छापखाना घेण्याचे कारण नाही. येत्याच जानेवारीपासून अगर पुढील वर्षी शक्य तितक्या लवकर केसरीचा आकारहि वाढविण्याचे माझ्या मनात आहे. माझ्या पुस्तकाची तीन प्रकरणे मी लिहून संपविली व बाकीचे पुस्तक पुढील पंधरवड्यांत संपवून टाकतो.

'मेमोरियल' तुम्ही अद्याप तयार करून पाठविले नसल्यास ताबडतोब पाठवा. ( बा. गं. टिळक, सिंहगड. )

( १२ जानेवारी, १८९९ ) जगांत बाहेर पडून मनुष्य हिंडू लागला तर त्याला नव्या माणसांत किती तरी चागल्या व्यक्ति आढळतात हे तुमचे म्हणणे खरे आहे. तुम्ही पुण्याची मडळी मजकडे उतरला तेव्हां तुमचा स्वार्थत्याग व सौजन्य या गोष्टीचा इकडे अनेकांच्या मनावर फारच चांगला ग्रह झाला. माझे घर यापुढे तुमचेच घर आहे असे समजा. तुमच्या कोणत्याहि चांगल्या कामगिरीत मी तुमच्याशी सहकारिता करीन. पंडित गगाप्रसाद वर्मा काल लखनौकडे

परत गेले. टिळक व काही मडळी रामेश्वराकडे जात आहेत. ( एस्. बिलिगिरी अयंगार, सॉलिसिटर, मद्रास. )

( २१ जानेवारी, १८९९ ) आशीर्वाद वि. तुमच्याकडून आलेले सविस्तर पत्र चि. आप्पाकडे पाहण्यास पाठविले आहे. ते लिहितांना तुम्हाला जो आनंद होत असेल तोच मला वाचताना होत होता. रा. फणसळकर मद्रासच्या राष्ट्रीय सभेहून परत आले. तेहि मला सांगत होते की, ठिकठिकाणी तुम्हाला लोकांनीं मोठ्या कौतुकाने व आदराने वागविले. सार्वजनिक आयुष्यांतील असल्या चांगल्या गोष्टी स्वतःच्या हातून घडाव्या, व आपणाविषयी लोकांनी गुणग्राहक बुद्धि दाखवावी, हे कोणालाहि आवडेलच. पण या गोष्टी आपल्या वांट्याला न आल्या आणि त्या आपल्या धाकट्या भावाच्या वाट्याला आल्या तरीहि मनुष्याला तितकाच आनंद व्हावा! स्वतः मी महत्त्वाकाक्षी नाही. शिवाय माझ्या कामाच्या मानाने लोकांची पसंती मला योग्य ती लाभतच आहे. यामुळे तुमची वाढती योग्यता पाहून मत्सर तर वाटत नाही उलट आनंदच होतो. सुखाचे बीज यांतच आहे. मी तुम्हाला पुन्हा एकवार सांगतो की, मी व चि. आप्पा हे दोघे आतां सरकारी नोकरीत कायमचे गुरफटून गेलो आहो. सरकारी नोकरीतहि मनुष्याच्या हातून लोकोप-योगी काम होऊ शकते. पण अर्थातच हवा तितका मोकळेपणा मिळत नाही. म्हणून तुम्हाला आयतेच कार्यक्षेत्र चागले मिळाले आहे व नोकरीकडे पाह-ण्याची गरज नाही हे एक प्रकारे भाग्यच समजले पाहिजे. तुम्हाला प्राप्ती कमी यामुळे केव्हां कांही उणे पडलेच तर आम्ही ते पुरे करण्याला आहोच असें समजावे. असो. तुम्ही सार्वजनिक आयुष्यातील खरे काम काय व कोणचे याविषयी आपला जो अदमास व कल्पना लिहिली ती पाहून फार आनद झाला. बाहेर लोकांनी आपल्याला बरे म्हटले, स्तुति केली, तर त्यामुळे आणखी काम करण्याला उत्साह येतो हे खरे आहे. पण ही स्तुति म्हणजे साध्य नव्हे. तें फक्त एक साधन आहे. आपण काम केले त्यांत आपण आपले कर्तव्य केले हीच भावना काम करणाराची मुख्यतः असली पाहिजे, व तोच कार्याचा मुख्य हेतु असावा असें कोणीहि म्हणेल. ( नारायण चिंतामण केळकर, हायस्कूल, सातारा. )

# माझा ‘अधिकारयोग’

सन १८९९ पासून १९०८ पर्यंत माझे मराठापत्राचे काम सुरळीत चांगले चाललें होते. केसरीचे काम असे या अवधीत मला मुळीच पडत नसे. केव्हां हौसेनें मी होऊन काही लिहीन तेवढेच. टिळकहि क्वचित् एखादे वेळी लिहिण्यास सांगत. या अवधीत ‘विसाव्या शतकाचा प्रारंभ,’ गॅरिबाल्डि, मॅझिनी यांच्या संबंधाचे लेख, खरेशास्त्री यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहासंबंधी काही लेख, असे तीस पसतीस लेख तरी मी केसरीत लिहिले असतील. ते टिळकांना पसंत पडले होते यांत मला शंका वाटत नाही. याचे एक उदाहरण देतो. १९०१ सालच्या ता. १ जानेवारीच्या केसरीच्या अंकांत लाहोरच्या राष्ट्रीय सभेचीच सगळी हकीकत भरली होती. त्यांत अग्रलेखहि घालता आला नाही. चार दिवसांनी टिळक राष्ट्रीय सभेचे काम संपवून लाहोरहून परत आले ते दमून आले. त्यांनी मला ता. ८ जानेवारीच्या अंकाकरितां अग्रलेख लिहा म्हणून सांगितले. आणि ‘विषय कोणता घेणार’ असे म्हणाले, तेव्हां मी म्हणालो, “१९ वे शतक संपले ही एक मोठी गोष्ट घडली म्हणून त्यावरच लेख लिहितो.” चांगला प्रसंग साधून रंगवून लेख लिहावा ही हौस मला प्रथमपासून होती. आणि टिळकांच्या लक्षांतहि ती या माझ्या सूचनेने आली.

“१९ वे शतक” हा मथळा घालून मी अग्रलेख लिहिला त्याचा प्रारंभ असा होता. “गेल्या मंगळवारी १९वे शतक संपून २०व्या शतकाला प्रारंभ झाला. शतक बदलायचे म्हणजे त्या दिवशी उल्कापात रुधिरवृष्टि वगैरे अनिष्टसूचक चिन्हे होतात, अगर दिव्य घटानाद अमृतवृष्टि वगैरे शुभ शकून प्रत्ययाला येतात असें थोडेच आहे ! त्याहि दिवशी सूर्य उगवावयाचा तिकडेच उगवतो व मावळावयाचा तेव्हांच मावळतो. फार काय पण साधारण कामधंदा करणाऱ्या माणसाला कॅलेंडराचे पान बदलावे लागते तितकासुद्धां उपद्व्याप, शतक बदलले असतां परमेश्वराच्या घरच्या कारखान्यांत करावा लागत नाही. आणि तेंहि बरोबरच आहे. या अगाध काळसमुद्रांत एक शतक निघून जाणें म्हणजे पृथ्वीवरील खऱ्या समुद्रांतले एक शिंपलीभर किंवा टिटवीच्या चोचीत मावण्याइतके पाणी कमी होणे यापेक्षां अधिक कांही नाहीं. शतक म्हणजे कालावधीचे एक माप होय. परंतु ‘राजा कालस्य कारणम्’ ही म्हण येथे

अक्षरशः लागू पडते. ज्याचा राजकीय अंमल त्याचाच शक चालावयाचा. म्हणून शालिवाहन शकाने आम्ही आपला काल मोजण्याचे टाकून तो खिस्ती शतकांनी मोजूं लागावे हे साहजिक आहे. परतु मापे नवीन केली म्हणून मापाने मोजण्याचा पदार्थ हा कांही नवीन नाही."

याप्रमाणे प्रस्तावना करून मी पुढे असे लिहिले की, "ज्याप्रमाणे मुलाच्या गर्भावस्थेतील दिवस त्याच्या वयाच्या हिशेबांत धरीत नाहीत, त्याप्रमाणे वैभवाच्या दृष्टीन खिस्तशकाभिमानी लोक त्या शकापूर्वीचे जगाचे वैभव हिशेबांत धरीत नाहीत. आणि जणूं कांही खिस्ती शकापासूनच जगाच्या खऱ्या वैभवाला प्रारंभ झाला असा बहाणा करितात." पण हा बहाणा खोटा कसा हे दर्शविण्याकरितां मी खिस्तजन्मापूर्वी होऊन गेलेल्या अनेक थोर महानुभाव वैभवसपन्न स्त्रीपुरुषाच्या नांवांची यादीच दिली. आणि युरोपियन लोक खिस्तिशकाला वाजवीहून अधिक महत्त्व देतात ते "माझ्या दारचा कोंबडा आरवला तेव्हांच खरा अरुणोदय झाला" असे म्हणण्याइतके मूर्खपणाचे आहे असा शेरा मारला. तथापि पुढे माझ्या स्वभावाप्रमाणे १९ व्या शतकाचे गुणहि मी निरनिराळ्या रीतीनी गाइले ! त्यांत मुख्यतः त्या शतकांत झालेल्या शास्त्रीय ज्ञानाला मी महत्त्व दिले. ज्ञानाच्या वाढीबरोबरीने समाजाचे सुख आणि धार्मिक बुद्धि याचा ऱ्हास होऊन शेवटी १९ व्या शतकाची फलश्रुति म्हणून मी असे म्हटले की, "१९ व्या शतकांत व्यक्तीला प्राधान्य येऊन तिला राजकीय बंधनाखेरीज बहुधा इतर बधन काहीहि उरलेले नाही." आणि "न देवे देवत्वम्" इत्यादि कलिमहात्म्यांतील श्लोकाने मी अग्रलेखाची समाप्ति केली.

केसरीतील हा लेख इतका चांगला बनला होता की मंगळवारी सकाळी आठ वाजतां भिंगारकर बोवा तो लेख हातांत घेऊनच टिळकांकडे आले व त्याची फार स्तुति करू लागले. कर्मधर्मसंयोगाने मीहि तेथेच होतो. तेव्हां टिळक त्यांना म्हणाले, "अहो तो लेख मी लिहिलेला नाही. आमच्या केळकरांनी लिहिलेला आहे." "रॅंग्लर पराजपे व धार्मिक शिक्षण" हाहि लेख असाच. त्यांत परांजपे यांजवर टीका असल्याकारणाने त्या लेखाचा बराच गवगवा झाला. पण मौज ही होती की मुख्य लेखापेक्षां त्याचा मथळाच अधिक झोंबणारा होता. मी दिलेला साधा मथळा काढून टाकून टिळकांनी 'प्रासादशिखरस्थोऽपि काको न गरुडायते' असा दुसरा मथळा त्या जागी आपल्या हाताने घातला. यामुळे मौज

अशी झाली की लेख व मथळा दोन्ही एकाचीच समजून कांहीनी मला शाबासकी दिली किंवा शिव्या दिल्या, आणि इतर काहीनी टिळकांचा लेख समजून टिळकांना शाबासकी दिली व पराजपे याच्या पक्षपाती लोकानी त्या लेखाबद्दल टिळकांना शिव्या दिल्या.

वर्तमानपत्र म्हटले म्हणजे त्यात चार लोकांचे हात असावयाचे. पण जबाबदार व्यक्ति एक असल्यामुळे एकाची स्तुति दुसऱ्याला किंवा एकाच्या शिव्या दुसऱ्याला असे गमतीचे प्रकार नेहमी होतातच. कृष्णाजीपंत खाडिलकर याचे कांही लेख टिळकानाहि मागे टाकण्याइतक्या तेजस्वितेचे असत, व बाहेर लेख कोणाचा हे न कळल्यामुळे त्याबद्दल टिळकाना स्तुतीचा आहेर मिळे. पण उलट त्याचा मोबदलाहि टिळकाना मिळाला होता. कारण १८९७ काय किंवा १९०८ काय या दोन्ही साली टिळकावर राजद्रोहाचे खटले झाले त्यांत गुन्हेगारीला पात्र झालेले काही लेख वस्तुतः खाडिलकरांचे होते. टिळकांचे नव्हते. खटला करण्यासारखा लेख टिळकानी केसरीत कधी लिहिलाच नसेल असे अर्थातच नाही. पण वर्तमानपत्राच्या धंद्यात हे असे उलटे सुलटे मोबदले मिळतच असतात हे सामान्य वाचकाला फारसे माहीत नसते.

केसरीचे संपादक टिळक असतां मी जसे कांही लेख केसरीत लिहिले तसेच मराठापत्राचा सपादक मी असता टिळकानीहि त्यात कांही लेख लिहिले आहेत. त्याचा फुकट फायदा मला मिळाला. केसरी व मराठा यांचे धोरण सामान्यतः एकच होते, म्हणून लेख लिहिण्यापूर्वी टिळकांना सांगून मी विषय निवडून घेत नसे. किंवा ते मराठ्याची प्रुफेहि पाहत नसत. विशेष महत्त्वाचा किंवा वादग्रस्त मुद्दा असला तर रोजच्या भेटीत आमची त्याविषयी सहजच चर्चा होई. पुष्कळ लोकाची समजूत आहे की खाडिलकर व मी हे केसरी-मराठ्यांत लिहिण्यांत तरबेज झालो तेव्हा टिळकानी आम्हाला पुष्कळवेळा सांगून लिहविले असेल किंवा नेहमी प्रुफे पाहून गुणदोषचर्चा केली असेल; म्हणजे विद्यार्थ्यांप्रमाणे पढविले असेल. पण हा निव्वळ भ्रम होय. जी काही शिकवण किंवा स्फूर्ति टिळकांपासून आम्हाला मिळे ती चालचलाऊ संभाषणात किंवा चर्चेत मिळे. याहून शिकविण्या-पढविण्याचा संबध मुळीच अधिक नव्हता. आम्हा तिघांची विवेचन पद्धति व भाषासरणी ही स्वभावतःच वेगवेगळी होती. फक्त प्रतिपादनाचे धोरण एक असे. आणि केसरी-मराठ्याच्या प्रतिष्ठेस साजण्यासारखी प्रौढ भाषा तिघांच्याहि लिहिण्यांत आपापल्या

परीने येत असल्यामुळे त्यांत एखादे वेळी सहजच सारखवटपणा भासे, इतकेच काय ते. पण केसरीकचेरीतच काय इतर कोणत्याहि वर्तमानपत्राच्या कचेरीत शिकणे पढविणे हे इतक्याच बेताचे असेल असे वाटते. वर्तमानपत्रातील लेखक ठराविक धोरणाने लिहून लिहूनच तयार होतात. कचेरी जे मिळवून देते, ते इतकेच की सतत लिहिण्याची संधि व ग्रंथादि साधने.

टिळक बाहेरगांवी प्रवासाला गेले असले तरी आपली वर्तमानपत्रे मागवून वाचून त्यांत काय मजकूर येतो कसा लिहिला जातो यावर लक्ष ठेवीत. कांही सूचना त्यांना करावयाच्या तर त्या पत्रद्वारे मला कळवीत, आणि त्या केसरी व मराठा या दोनहि पत्राना मार्गदर्शक अशा समजावयाच्या असत. याची एक दोन उदाहरणे देतो. १८९९ सालअखेर लखनौ येथील राष्ट्रीय सभेनंतर टिळक आपले मित्र वासुदेवराव जोशी यांच्याबरोबर ब्रह्मदेशांत छत्रे याच्या सर्कशीबरोबर हिंडावयास गेले. त्या प्रवासांत त्यानी कलकत्त्याहून मला खालील दोन पत्रे पाठविली.

( १ ) कलकत्ता, ता. १२ जानेवारी १९०० :—" छत्रे याच्याबरोबर मी रंगूनला २० तारखेच्या सुमारास पोहोचेन म्हणून फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्या-शिवाय मी पुण्यात येऊ शकत नाही. फेब्रुवारी महिन्यात बंगाली पत्र साप्ताहिक आहे ते दैनिक होणार आहे हे तुम्ही वाचलेच असेल. अर्थात् अमृतबझार पत्रिकेशी प्रतिपक्षी म्हणून ही स्पर्धा व्हावयाची आहे. म्हणून पुणे, सातारा व सर्वसाधारण महाराष्ट्र यांतून कांही महत्त्वाची बातमी देता आली तर ती तुम्ही पत्रिकेला अवश्य पुरवावी असे मोतीबाबूंचे म्हणणे आहे. पुण्याचे काम तुम्ही करा व साताराचे फणसळकर अगर इतर कोणाला सांगा. मोतीबाबूंना आपल्याला मदत केलीच पाहिजे हे तुम्ही जाणताच.

" फेरोजशहा मेथा यांची गांठ पडून बोलणे झाले. त्यांचे म्हणणे असे की, सॅंढर्स्टसाहेबांच्या स्मारक चळवळीत त्याच्या समतीशिवाय त्याचे नाव सेक्रेटरी म्हणून घालण्यांत आले. पण त्यांच्याशी बोलतां एकदरीत मला दिसते की, कॉटन यांनीं त्यांचे नांव सेक्रेटरी म्हणून घालण्याला त्यांनी अर्धवट समति दिलेली असावी. प्रत्यक्ष सांगितले नाही ही नुसती पोकळ सबब आहे असे वाटते.

" फेब्रुवारीत आपण प्रांतिक परिषद भरविणाच्याहि ते विरुद्ध आहेत. त्यांना असे वाटते की परिषद फेब्रुवारीत भरविली तर लार्ड सॅंढर्स्ट यांचा निषेध करण्या-

करितां मुद्दाम ती त्यावेळी भरविली असा आपल्यावर आरोप येईल. एप्रिल अगर आक्टोबरमध्ये ती सावकाश भरवावी, आतां घाई करूं नये असे शेटजी म्हणतात. मेथा गेले म्हणजे वाच्छाहि गळालेच. स्मारकाच्या चळवळीत मेथाजी तडजोडीची गुळमुळीत भाषा बोलू लागले हे पाहून मला फार आश्चर्य वाटले. त्याच्या मताने अलीकडेच पालट खाल्लेली दिसते. तथापि शेटजींचे पाणी काय आहे, व त्यांची धांव गेली तरी कोठपर्यंत जाईल, हे आपल्याला माहीतच आहे. त्यांच्याकडून यापेक्षां अपेक्षा करण्यात अर्थ नाही.

" टाटा यांच्या घरी प्रास्ताविक सभा भरून चर्चा झाली. पण जाहीर सभा बोलावण्याचा काबराजी यांचा ठराव नापास झाला. लॉर्ड सँडर्स्ट याचे जाहीर सार्व-जनिक स्मारक करावे असे त्याच्या चहात्यानाहि वाटत नाही. यामुळे मित्रांच्या हातूनच या स्मारकाचा गळा कापला गेला आहे असे मेथा म्हणतात. परंतु मेथा कांहीहि म्हणाले तरी त्याबद्दल मला कांही वाटत नाही आणि त्याचे माझें जे सभाषण झाले त्यावरून माझे असे मत झाले आहे की, मेथा दिसतात अगर दाख-वितात तितके ते खऱ्या स्वतत्र बाण्याचे मनुष्य नाहीत. स्वतःला सोयीचा होईल तितका किंवा स्वतःला कोठलाहि धक्का लागणार नाही असा स्वतत्र बाणा दाख-विण्याची, त्याना लहर येते. आणि याकरितां देशी वर्तमानपत्रकारानी त्यांची पाठ थोपटलेली त्याना हवी असते. पण मराठा व केसरी यांना तसे करणे शक्य नाही.

" यावरून लिहिण्याचे एकदर धोरण काय असावे हे तुमच्या लक्षांत येईल. मेथा यांच्या अस्थिर वागणुकीबद्दल तुम्ही त्याचा निषेध तर कराच, पण सेक्रेटरीमध्ये त्यांचे नाव चुकून घातले गेले असल्याचा सभव आहे असे सोडव-णुकीचे लिहून ठेवण्यास विसरू नका. किंबहुना तुम्ही असेहि लिहा की, मेथांचे नांव घालण्यात चूक असेल; पण त्याचा फायदा लोक घेतील हे माहीत असून आजवर मेथा यांनी ते बिनबोभाट राहू दिले ही आश्चर्याचीच गोष्ट नाही काय !

" खाडिलकरांना हे पत्र दाखवून केसरीतहि असेच लिहावयास सांगावे."

( २ ) कलकत्ता, ता. १४ फेब्रु. १९००:—" दोन दिवसापूर्वी आम्ही रंगूनहून परत आलो. बर्मामधील कित्येक स्थळे फार प्रेक्षणीय आहेत, व प्रत्येक ठिकाणच्या नव्या माहितीचा मला फार फायदा झाला.

"मेथा व सर भालचंद्र यांची बाजू जितकी चव्हाट्यावर यावयास पाहिजे तितकी अद्याप आलेली नाही असे मला वाटते. केसरीत तुम्ही अग्रलेख लिहून पुढारी म्हणविणाऱ्या या गृहस्थाची सर्व कारवाई उघडकीस आणा. वाच्छा व सेटलवाड हे मेथा याच्या वागणुकीने कसे फसले गेले, सर भालचंद्र यांना सर्व ब्राह्मणांचे प्रतिनिधित्व कसे मिळाले, व मेजवानीच्या वेळी जोशी व रानडे यांना ओढण्यात येऊन स्मारकाच्या चळवळीत कसे सामील करता आले— या सर्व गोष्टींची हकीकत देऊन एक सुरेख आर्टिकल लिहिता येण्यासारखे आहे. या लोकांचे दोष जगापुढे मांडण्याची हीच वेळ आहे म्हणून कोणाची गय न करिता बेलाशक लिहा. हे सर्व होत असतां आपली लाज अथवा स्वाभिमान याची राखरांगोळी होत आहे हे एकाच्याहि ध्यानात आले नाही. म्हणून त्याची आपण चांगलीच हजेरी घेतली पाहिजे किंबहुना ते आपले कर्तव्यच आहे म्हणाना.

"आणखी दोन आठवडे इकडल्या भागांत घालवावयाचा माझा विचार आहे. या प्रवासाने मला फार बरे वाटले. म्हणून पूर्वी ठरविल्यापेक्षा आणखी आठदहा दिवस उत्तर हिंदुस्थानात घालविण्याचा मी बेत केला. मार्चच्या पहिल्या आठवड्यात मी तिकडे येईनच.

"प्रांतिक परिषद फेब्रुवारीमध्ये भरत नाही असे दिसते. पण त्याचे आश्चर्य वाटत नाही कारण तसे होईल असे आम्हाला वाटलेच होते."

धोरण जरी एक असले तरी कित्येक वेळा मी लिहिलेल्या मराठ्यातील लेखांतील कांही मते टिळकांना अमान्य असत. पण लेख छापून प्रसिद्ध होऊन गेल्यावर मग ते तरी काय करणार ? बरे, मतभेदाला जागा राहू नये म्हणून नित्य आधी प्रुफे पाहावी म्हटले तर तेहि जिकिरीचे म्हणून अशक्यच. यामुळे एखादे वेळी एकाच विषयावरील केसरीतील मते व मराठ्यातील मते यांत उघड दिसण्यासारखा भेद दृष्टीस पडे. असा भेद दिसतांच त्याचा गवगवा व बोभाटा करून, "हे असे कां झाले ? कसे झाले ?" असे विचारून टिळकांना त्रास देणारे पुष्कळ लोक भेटत. पण सर्व परिस्थिति टिळक जाणत असल्याकारणाने ते ठराविक खुलासा करून असल्या अडचणीच्या प्रश्नांतून मोकळे होत. ते म्हणत, "वर्तमानपत्रांना जबाबदार संपादक करावयाचा तो कशाला ? जो जबाबदार असेल तो आपली स्वतःचीं मतें थोडीबहुत लिहिणारच. सर्वसामान्य धोरण त्याने संभाळले म्हणजे पुरे."

या संबंधांत रा. शंकरराव लवाटे याच्या दोन आठवणी मला आढळल्या त्या देण्यासारख्या आहेत. या आठवणी 'लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका' या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडाच्या १७२ पृष्ठावर छापल्या आहेत. लवाटे लिहितातः—

"९७ सालची शिक्षा भोगून बळवंतराव परत आले. त्यानंतर एके दिवशी सध्याकाळी सार्वजनिक सभेच्या तिसऱ्या मजल्यावर नित्याप्रमाणे सर्व मंडळी जमली होती. वेळ बरी आहे असे पाहून मंडळींनी बळवंतरावांभोवती गराडा घातला. बळवंतराव सुटून येण्याच्या अगोदर मराठ्यांत गोखल्यांविषयीं अनुकूल व जिनसीवाल्यावर टीकात्मक असे लेख नुकतेच लिहून आले होते. त्यामुळे नरसोपंतावर मंडळी गरमागरम होती; व म्हणून बळवंतराव आल्याबरोबर त्यानी बार भरण्यास सुरुवात केली. मंडळींनी आपले म्हणणे पुढे टाकल्याबरोबर बळवंतराव म्हणाले की, "नरसोपंतांसारखी तरी माणसे कोठे आहेत ? मला माणूस आणून द्या, व शिवाय गोखल्यांशी आमचे आजपर्यंत जे प्रसंग झाले त्यामुळे एकमेकाच्या मनात एकमेकाविषयी ज्या अढी पडल्या आहेत त्या या त्रयस्थ असलेल्या नरसोपताच्या मनात कशा उतराव्या व त्यांनी त्याप्रमाणे लिहावें अशी आम्ही अपेक्षा तरी कशी करावी ! " बळवतरावांनी असे उत्तर दिल्याबरोबर विषय पुढे न वाढतां तो समाप्त करण्याच्या पंथाला शिष्यमंडळी लागली !"

"बळवंतराव हे सुधारकांचे विरोधी व नरसोपंत हे त्याचे पक्षपाती अशी स्थिति होती. हे सर्वांना माहीत होतें; व बळवंतराव तर ओळखून होतेच. तथापि केळकरांची सुजनता, काम करण्याची तडफ, निष्ठेनें व कष्टपूर्वक कार्य करण्याची हातोटी, आणि योग्यता हे अनन्यसामान्य गुण बळवंतरावांनी अगदी पूर्णपणे जाणले असल्यामुळे, व असा सहाय्यक आपणांस किती जरूरीने जोडून ठेवणे प्राप्त आहे हे ते पूर्णपणे ओळखून असल्यामुळे, नरसोपंतांच्या स्वतंत्र वृत्तीचा ते समावेश करून घेत असत. इंग्रजसरकाररूपी कर्दनकाळाशीहि बेधडक मुसंडी देणारा बळवंतराव आपल्या हाताखाली असलेल्या नरसोपंताशी नमते घेतांना पहाण्याचा एक प्रसग मला आलेला आहे. सुधारक पत्राचा नवा अवतार बाहेर पडला. त्यावर नरसोपंतांनी अनुकूल अभिप्राय प्रासिद्धपणें दिल्याची कुणकुण ऑफिसांत लागली. सकाळची वेळ होती. आम्ही सर्व ऑफिसांत होतो. बळवंतराव होते; पण नरसोपंत त्या वेळीं नव्हते. नरसोपंतांनी दिलेल्या अभिप्रायाबद्दल आमचे उद्गार निघू

लागले; बळवंतरावांनी आपला विरुद्ध अभिप्राय स्पष्ट सांगितला. इतक्यांत नरसोपंतांची स्वारी येऊन दाखल झाली. बळवंतरावांनी अभिप्रायाची गोष्ट काढली; त्याबरोबर नरसोपत चटकन् सटक्यासरशी व किंचित् बेपर्वाईने म्हणाले की, 'हे पहा माझे हे असे आहे; यांत बदल व्हावयाचा नाही; पहा तुम्हांला पटले तर !' हे नरसोपंतांचे शब्द बाहेर पडल्यावर बळवंतरावांनी तो विषय तसाच अजीबात सोडून दिला !"

अशा तऱ्हेचा मतभेद प्रगट झाल्याची उदाहरणे मधून मधून घडतच असत. आणि पुढे पुढे राजकीय चळवळ व तदनुरोधाने जहाल मवाळ या पक्षांतील सामने अतिशय तीव्र होऊं लागले, तेव्हां केसरी-मराठ्यात मतभेद दिसून येण्याचे प्रसंग वाढूं लागले. कारण राजकीय तत्त्वासबंधी दोन्ही पत्रांचे धोरण तेच असले तरी प्रतिपक्षावर, विशेषतः व्यक्तीवर, टीका किती करावी यासंबंधाने खरोखरच टिळकांचा व माझा मतभेद होता; व लेखाची बनावट अर्थातच ज्याच्या त्याच्या स्वभावाप्रमाणे होई. उलट कित्येक वेळां असेहि घडे की मला मनाचा तोल न संभाळतां आल्यामुळे एखादे वेळी लिहिण्याच्या भरात टिळक न योजतील असेहि कडक शब्द माझ्या हातून निघून जात. उदाहरणार्थ, वरिष्ठ कायदेकौन्सिलांत युनिव्हर्सिटी बिलाची चर्चा चालली असता सरकारतर्फे डॉ. भांडारकर यांना जादा सभासद नेमले होते. त्याच्या एका भाषणाचा राग येऊन त्यांच्याबद्दल 'A wretched piece of humanity' असे शब्द माझ्या हातून मराठ्यांत लिहून गेले ! त्याचा सर्व जाणत्या लोकांनी निषेध केलाच. पण ते शब्द वाचून टिळकांना फारच वाईट वाटले. किंबहुना एक दिवसभर त्यांना चैन पडलें नाही. प्रसंग पडल्यास तेहि वादांत भांडारकरांना दुरुत्तरे लिहीत. पण Wretched हा माझा शब्द इतका Wretched होता व अनाठायी होता की, आजपर्यंत टिळकांनीं भांडारकरांना दिलेल्या सगळ्या शिव्यांचा अर्क काढला तरी त्यांतून इतका कडूपणा निघणार नाहीं. माझी चूक स्वतः माझ्याहि लक्षांत मग आली. आणि त्यानंतर गुरुवर्य डॉ. भांडारकर यांचे व माझे संभाषणप्रसंग जेव्हां जेव्हां येत, तेव्हां तेव्हां माझा अपराध मला आठवून मी मान खाली घालीत असे.

दुसरीहि एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. प्रिंसिपॉल रँग्लर परांजपे यांची दुसरी पत्नी ही एकवेळीं त्यांच्याच वर्गांत विद्यार्थिनी म्हणून शिकत होती. अशा स्थितीत

परांजपे यांची पहिली बायको निवर्तली असल्यामुळे त्याना दुसरे लग्न कर्तव्य होते, व त्यांच्या वर्गातील या मुलीचे लग्न त्यांच्याशी व्हावे असे तिचे आप्त व एक-प्रकारचे पालक कै. गोपाळराव जोशी यांनी ठरविले. उभयताचा हा विवाह पुष्क-ळांना आवडला. निदान त्याचा कोणी निषेध केला नाही. मुलगी सई ही हुषार व व कॉलेजचे शिक्षण पुरे करण्यासारखी. तेव्हां ती पुढे एम्. ए. होईल, आणि मग परांजपे व त्यांची बायको ही जोडीने कॉलेजांत प्रोफेसर होतील, असे 'रोमँटिक' विचार माझ्या मनांत येऊन परांजपे यांचे अभिनदन करणारा एक लेख मी मरा-ठ्यांत लिहिला. तो स्त्रीशिक्षणविषयक भावना व इंग्रजी भाषा या दृष्टीनी चांगल वठला होता. परांजपे यांनी त्या मराठ्याच्या सहा प्रति मजकडून विकत नेल्या! इतर चार लोकांनीहि लेखाची वाहवा केली. पण टिळकांना तो मुळीच आवडला नाही. आणि त्यांनी जेव्हा आपली कारणे मला सांगितली तेव्हां खरोखरच त्यांचें म्हणणे मला अधिक सयुक्तिक वाटले. त्या लेखांत मी असे म्हटले होते कीं "रघुवशांत अजाने इंदुमतीसबधाने 'गृहिणी सचिवः .. प्रियशिष्या ललिते कलाविधौ' असे म्हटले होते. म्हणजे आधी पत्नी व मग शिष्या. पण रँग्लर पराजपे यांनीं हे संबंध उलटवून आधी जी शिष्या होती तिलाच सहधर्मचारिणी केले." वाङ्मया-च्या रुचीच्या दृष्टीने मी केलेली कोटी गोड होती. पण टिळक म्हणाले की "या व्यवहारांत एका गहन तत्त्वाचा उपमर्द झालेला आहे. तो असा की आपल्या वर्गात आपल्या हाताखाली शिकणाऱ्या मुलीकडे परांजपे यांनी, भावी पत्नीच्या शुद्ध भावनेने कां होईना, पण प्रेमाच्या दृष्टीने काही काळ पाहिले, असे सहजच सिद्ध होते. कारण, त्यांच्या पसतीशिवाय वधू ठरली नाही. पण अविवाहित शिक्षक लोक अविवाहित मुलीकडे अशा रीतीने पहातील तर स्त्रीशिक्षण ही एक अवघड गोष्ट होऊन बसेल. कारण गुरुशिष्याचे नाते हे पवित्र असते. शुद्ध बुद्धीच्या प्रेमाच्या दृष्टीनेहि त्या नात्याला डाग लागतो." वास्तविक व्यक्ति या नात्याने झालेल्या या विवाहांत नांव ठेवण्यासारखे काहीच नव्हते हे टिळकानाहि मान्य होते. कारण परांजपे हे विधुर होते, आणि गोपाळराव जोशी व त्यांची भाची सई ही मंडळी टिळकांच्या माहितीची होती. मी मराठ्यांत लिहिले नसते तर त्यांनीं आपला मतभेद सांगितलाहि नसता. पण त्यांनी जेव्हा तो असा सकारण सांगितला तेव्हां माझीच खरोखर चूक आहे असे मला कबूल करावे लागले; व मी केलेली कोटी टिळ-कांनीं माझ्याच गळ्यांत उलट घातली असें मला वाटले.

या किरकोळ बाबी सोडून दिल्या तर माझे मराठ्यातील लिहिणे टिळकांना एकंदरीने पसंत होते यांत कोणासहि शंका नव्हती. स्वतः ते ही पसति प्रसंग-विशेषी लोकाजवळ बोलूनहि दाखवीत. गोपाळराव गोखले यांनीहि मजजवळ एकदा उद्गार काढले की "तुम्ही टिळकापेक्षाहि मराठा चागला चालविला आहे." अर्थात् टिळकांचे प्रतिपक्षी या नात्याने टिळकाविषयी त्याची नापसती ही मला जमेस धरावयास पाहिजे होती तशी मी धरीत असे. पण विषयप्रतिपादनापेक्षा इंग्रजी भाषापद्धतीवर गोखले याचा बहुधा रोख असावा; आणि गोखले हे स्वतः इंग्रजी भाषेतले विशेष परीक्षक म्हणून तेवढ्यापुरते त्याचे म्हणणे मी ग्राह्य मानले असले तर त्याला समर्थनपर असा पुरावा त्रयस्थ मित्राकडून मिळत असे! टिळकांची गोष्ट जी मराठी भाषेसबंधाने तीच इग्रजी सबंधानेहि होती. म्हणजे त्यांचा मुख्य भर व कटाक्ष विषयप्रतिपादनांत जोरदार व निर्णयात्मक सिद्धान्त माडण्यावर असे. भाषा सजविण्याकडे नसे. एकवेळ सी. वाय. चितामणी व मी याच्या इग्रजी भाषेची तुलना करण्याचा प्रसग असाच आला असता गोखले असे म्हणालेले आठवतात की "चितामणी याचा विषयाचा अभ्यास जास्ती पण केळकरांची भाषा अधिक चांगली."

मराठ्यांतील लिहिण्याला माझा स्वभावहि कदाचित् अधिक अनुकूल असेल. इंग्रजी वर्तमानपत्र अनेक प्रांतांतून जावयाचे असल्यामुळे मराठ्यातील लिखाणांत व्यापकपणा अधिक असण्याची जरुरी होती. तसेच देशी भाषेत लिहीत असताना जशा त्यांत बोचणाऱ्या खाचाखोचा कोणासहि आणतां येतात तशा इग्रजी भाषेत आणणे सहसा कठिण असते. व्यापकपणा जितका अधिक तितकी तीक्ष्णता कमी हा भौतिक शास्त्राचाहि नियमच आहे. What is gained in breadth or extent is lost in pointedness and intensity. लॉजिक् किंवा तर्कशास्त्र यांत हा सिद्धात मान्य असतो. परक्या इंग्रजी भाषेत एखादे वेळी मेकॉलेसारखे संभावित व भारदस्त वाक्य उठविणे सोपे आहे. पण एखादी ग्राम्यार्थक किंवा व्यवहारांतील शिवी देऊन, एकादा सोल्जर बोलेल तसे इंग्रजी लिहितां येणे हिंदी संपादकाला कठिण. शिवाय केवळ राजकारणाच्या विषयावर सर्व भार घालून न संपवितां मी मराठ्यांत प्रचलित राजकारणाच्या विषयाबरोबर इतरहि एखादा विषय घेऊन त्यावर दुय्यम आर्टिकल लिहीत असे. मग तो विषय काव्य-शास्त्रविनोदविषयक, किंवा समाजशास्त्रविषयक, किंवा एखाद्या नामांकित ग्रंथा-

संबंधी परीक्षणात्मक असो. या दुसऱ्या लेखांत क्वचित् बहुश्रुतपणाहि दिसून येई. यामुळे ठराविक भाषेने ठराविक मते प्रतिपादन करतांना जो रुक्षपणा येतो किंवा जे चर्वितचर्वणासारखे होते ते टळते हा त्यात एक फायदा असे. माझ्या या वैचित्र्ययोजनेचा गुण घेणारे काही वाचक असत.

मी इंग्रजी बरे लिहितो या गोष्टीप्रमाणेच मी जलद लिहू शकतो ही गोष्टहि टिळकाच्या अनुभवाची होती. पुष्कळ वेळा ते एखाद्या लेखाचा, किंवा अर्जाचा, किंवा टीकोत्तराचा, मसुदा मला करावयास सांगत; व फारसा घोळ घालीत न बसता मी तो थोड्या वेळात तयार करून त्याच्यापुढे मांडीत असे. यामुळें मसुद्याचे काम माझ्याशिवाय आमच्या मंडळीत ते दुसऱ्या कोणाकडे सहसा देत नसत. जेथे विशेष कुत्सित लिहिण्याची गरज असे तेथेच एखादे वेळी ते रा. माधवराव बोडस यांचा उपयोग करीत. पण शिवरामपंत परांजपे, खाडिलकर इत्यादि लोकाकडे इंग्रजी मसुदे करण्याचे काम केव्हांहि गेलेले मला आठवत नाही.

एकदां तर जलद लिहिण्यासंबंधाने माझी परीक्षा टिळकांना परस्पर मिळाली. १९०४ साली फौजदारी खटल्याच्या सत्रांतून मुंबई हायकोर्टानें त्यांना कायमचे मुक्त केले. ही गोष्ट एका गुरुवारी घडली. निदान त्या दिवशी जजमेंट हाती आले. या संधीचा फायदा घेऊन ताईमहाराज प्रकरणाची सर्व खुलासेवार हकीकत परप्रांतांतील लोकांना ताबडतोब कळावी म्हणून, मीं गुरुवारचा निम्मा दिवस व शुक्रवार मिळून सबंध मराठा भरेल इतका मजकूर त्या खटल्यासंबधी लिहिला. आणि खरोखरच त्या अंकांत पहिल्या पानाच्या डोक्यावर The Tai Maharaj Case हा जो मथळा सुरू झाला तेथपासून शेवटच्या ओळीपर्यंत तो एकच लेख लिहिला होता. त्यांत त्या प्रकरणाची इत्थंभूत हकीकत तर दिलीच होती. पण लेखांतील टीकेचे कांही नमुने व भाषेचे नमुने कोणालाहि पसत पडण्यासारखेच होते. त्या अंकाची प्रुफे स्वतः टिळकांनीं पाहिली. पण त्यांत पांच चार वाक्यापेक्षां इतर कोठेहि त्यांना दुरुस्ती करावी लागली नाही. या लेखाचा त्यांच्या मनावर परिणाम झाल्याचे त्यांच्या तोंडावरच दिसले. लगेच विलायतच्या पुढच्या डाकेने त्यांनी तो लेख वुइल्यम डिग्बी यांज-कडे पाठवून, तेथे त्याचे स्वतंत्र पॅम्प्लेट काढून, त्याच्या शेकडो प्रति विलायतें-तल्या प्रमुख माणसांकडे रवाना करविल्या. आदले वर्षी लॉर्ड कर्झन यांच्या

दिल्ली-दरबारासंबंधाने मी लिहिलेला लेख असाच समर्पक व चांगला होता आणि त्याकरितां प्रो. पाध्ये यानी मला शाबासकी दिली होती. तात्पर्य आपल्या मताला अधिक चिकटून मराठ्यांत मी लिहावे अशी अपेक्षा जरी टिळकांची सहजच होती, तरी मराठा अधिक चांगला किंवा अधिक यशस्वी व्हावा म्हणून माझ्या जागी दुसऱ्या कोणाची योजना करावी असे टिळकाच्या मनात कधीहि आले नाही. चांगले इंग्रजी लिहिणारे कांही लोक त्याना आढळले त्याचा नैमित्तिक उपयोग ते मराठ्यांत विशेष विषयावर लेख लिहून घेण्याकडे करीत. पण या पलीकडे मजल गेली नाही.

ताईमहाराज प्रकरणावर मी लिहिलेला मराठ्यातील हा लेख कसा होता हे दर्शविण्याकरिता त्या वेळी मुंबईचे दिनशा वाच्छा आणि उमरावतीचे दादासाहेब खापर्डे यांची मला आलेली पत्रे या खाली देतोः—

( मुंबई ८ मार्च १९०४ ) गेल्या मराठ्यांत तुम्ही टिळकांच्या खटल्या-संबंधाने जो लेख लिहिला तो वाचून कौतुक वाटले. तुम्ही टिळकांच्या छळाचे वर्णन दिले ते चित्राप्रमाणे हुबेहुब असून शिवाय मोठे भारदस्त आणि न्यायतत्त्वा-च्या दृष्टीने मार्मिकपणाचे वठले आहे. मला वाटते त्याच्या पन्नास प्रती ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीकडे पाठवाव्यात. सर विलियम वेडरबर्न याजकडेहि कांही प्रति वेगळ्या पाठवा. टिळकांची वर्तणूक या कामी किती सरळ व सत्यनिष्ठ होती व तिचे चीज कसे झाले हे जाहीर झालेच पाहिजे. वेडरबर्न साहेबांना मीहि स्वतः या बाबतीत लिहित आहे. ( दिनशा एदलजी वाच्छा, मुंबई. )

( उमरावती १४ मार्च १९०४ ) टिळकांची सुटका झाल्याचे वाचून अतिशय आनंद झाला. सर्वांच्या प्रयत्नाला यश आले. गेल्या मराठ्यांतील तुमचा लेख सर्व लेखांवर ताण करणारा आहे. मी तो फार आनंदाने वाचला. आणि जो प्रत्येकजण मला भेटतो तो म्हणतो की, तुमच्या या लेखाची कल्पना व लिखाण ही फारच वर्णनीय आहेत. इंग्लंडांतील कांही स्नेह्यांना मी त्याच्या प्रती पाठविणार आहे. बळवंतराव नागपूरकर यांच्यासंबंधाने पुढे काय करावयाचे ठरविले आहे ते कळवा. जोशीबुवांच्या नातीच्या लग्नाकरितां तुम्ही तर याच पण टिळकांना आमंत्रण दिले आहे त्याचा स्वीकार करून त्यानीहि यावे अशी खटपट करा. ( गणेश श्रीकृष्ण खापर्डे, उमरावती. )

याचीच दुसरी बाजू अशी की, पूर्वी सांगितल्याप्रमाणे केसरी व मराठा यांतील मतभेद लोकांच्या नजरेस पडे व तो शक्य तितका कमी व्हावा अशी त्यांची इच्छा असे. पण हे हवे तसे घडून येणे किंचित् दुरापास्त होऊन बसले होते. याची कारणे दोन. मी जरी टिळकाचा असिस्टंट होतो, व माझे त्यांच्याशी एक प्रकारचे शिष्यत्वाचे नाते होते, तरी कोणताहि एखादा विषय चर्चेला निघाला असता टिळकांशी मतभेद प्रगट होईल या भीतीने मी आपले विचार कधीहि दडपून ठेवीत नसे. सरळ मनाने त्यांच्याशी वादहि घाली. या वाद घालण्याचा यांनीहि कधी राग मानला नाही. तसेच वादात माझी बाजू समर्थनीय आहे असे वाटल्यावर, आपले धोरण टिळकांच्या धोरणाशी सोळा आणे ततोतत जुळत नाही असे दिसत असताहि, मी बेताबेतानेच पण आपल्या धोरणाप्रमाणे लिहिण्याचा आग्रह सोडीत नसे. उदाहरणार्थ, प्लेगची लस टोचण्यासंबधाने ही गोष्ट प्रसिद्ध आहे की, प्रथम प्रथम लस वाईट होती, टोचणारे डॉक्टर निष्काळजी असत, कोणीकडून तरी टोचलेल्या लोकांच्या संख्येची भरती करीत, आणि गांवोगांवच्या लोकावर लस टोचून घेण्याचा थोडाबहुत जुलमहि प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष होत असे. यामुळे काही वर्षे केसरी व मराठा दोन्ही पत्रातून इनॉक्युलेशनविरुद्ध एक प्रकारची जोराची मोहीम चालू होती पण पुढे पुढे हे सर्व दोष कमी होऊं लागले, आणि बाहेर जाऊन राहण्याच्या त्रासाला कंटाळून लोकहि हळू हळू आपखुषीने लस टोचून घेऊन कसे काय निभते हे पाहू लागले. ज्याच्या त्याच्या विश्वासाचे खासगी डॉक्टर लोकहि अनुकूल बोलू लागले. तेव्हा मी मराठ्यांत इनॉक्युलेशन-विषयी लिहिताना किंचित् सूर बदलला. ती गोष्ट माझ्या समजुतीप्रमाणे लोक-हिताची म्हणूनच मी केली. आणि जे सांगावे ते स्वतः करावेहि असे थोडेसे माझे तत्त्व असल्यामुळे मी स्वतः 'इनॉक्युलेशन' करून घेतले. या गोष्टीबद्दल टिळ-कांच्या काही अनुयायांचा मजवर रोष झाला. कारण इनॉक्युलेशनला केव्हांहि विरोध करणे हा टिळक सांप्रदायापैकी एक भाग होय अशीच त्या अजाण लोकांची समजूत होऊन राहिली होती !

याच्याच जोडीची दुसरी गोष्ट म्हणजे गणपतिउत्सवांत म्हणण्याची पदे. मेळ्याच्या पदांत राष्ट्रीय राजकारण प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीतीने येणे स्वाभाविक होते. कारण उत्सवाची मूळ कल्पनाच राष्ट्रीय भावना जागृत करण्याची होती. परंतु व्यक्ति-निंदेत त्या भावनेची अतिव्याप्ति होणे हे मला खपत नसे आणि मी आपली नापसंती

झांकून ठेवीत नसे. हजारो स्त्रीपुरुष मेळ्याची पदे ऐकण्याकरितां गायकवाड वाड्यांत जमलेले असतां चिल्लर पोरांनी, ते फक्त मेळेवाले झाले म्हणून, टिळकाच्या समक्ष सरसकट सुधारक वर्गच काय पण गोपाळराव गोखले याच्यासारख्या मनुष्यासबधी जवळ जवळ शेणमाराच्या स्वरूपाची भाषा बोलावी, व आळवून आळवून गावी, हे मला विपरीत वाटे. स्वतः टिळकानी या गोष्टीला सक्त प्रतिबंध करावा अशीहि माझी अपेक्षा. पण एक हात लाकड तर त्याची सव्वाहात ढलपी या न्यायाने, स्वत. टिळकाच्या कल्पनेपेक्षाहि ज्या लोकाच्या राष्ट्रीय भावनेची कल्पना अधिक वाहवलेली, त्यांच्या दुराग्रहापुढे टिळकाचेहि चालत नसे. मग माझे कसे चालणार ? म्हणून अशा वेळी केंव्हा केंव्हां काही निमित्त सांगून मी मंडपांतून उठूनहि जात असे. जी गोष्ट मेळ्यातील पदाची तीच, निदान गोखले यांच्यासबधाने, दादासाहेब खापर्डे यांच्या सारख्या पोक्त विद्वानाची. त्यालाहि मी नापसंती दर्शवी.

ही झाली एक गोष्ट. पण केसरी-मराठ्यांत मतभेद दिसण्याचे दुसरे कारण असे की वरील सर्व बाबतीत, किंबहुन एकदरीनेच माझा स्वभाव व कृष्णाजीपत खाडिलकर यांचा स्वभाव हे परस्पर अगदी विरुद्ध असत. अद्यापहि ते तसेच आहेत. यामुळे केसरीत लिहिण्याचा त्यांचा झोक टिळकांच्या सामान्य अनुयायाना आवडण्यासारखा होता. कारण ज्या दृष्टीने, म्हणजे भाषेच्या दृष्टीने, माझे मराठ्यातील लिहिणे टिळकांना पसत पडे, त्याच दृष्टीने केसरीतील खाडिलकरांचे लिहिणे त्यांना पसंत पडे. आता स्वतः टिळकच जाग्यावर असल्यामुळे केसरी-मराठ्यांतील विरोधाची सारवासारव किंवा समादणी परस्पर होऊ शके. पण स्वतः-च्या मनाच्या समाधानापेक्षा आपल्या अनुयायांच्या मनाचे समाधान करणे टिळकांना कठिण जाई. आणि त्यांच्यापुढे तेंव्हांपासून हा एक रोकडा प्रश्नच येऊन पडला होता की, मराठ्याकरितां केळकर कायमचे लाभले तर हवे व केसरीकरितां खाडिलकर कायमचे लाभले तर हवे, पण या दोघातील मतभेदाचे काय करावयाचे? हाच विरोध टिळक तुरुगात असताना दुस्सह कसा झाला, आणि त्यांतून १९१० साली अखेर मार्ग कोणता निघाला, याची हकीकत मी पुढे लवकरच सागणार आहे. पण येथे इतकेच सांगतो की टिळकांची अडचण माझ्या लक्षात येऊन मराठापत्राचे काम आपखुशीने सोडण्यासहि मी कबूल होतो. आणि टिळकांना तसे एक दोन वेळां, तोंडी बोलणे अवघड म्हणून, मी पत्रांनी कळविलेहि होते.

ही बाब थोडी नाजूक आणि महत्वाची म्हणून त्या पत्रांचा सारांश येथें देतों. पहिले पत्र १९०७ च्या नोव्हेंबर महिन्याच्या १२ व्या तारखेचे आहे. म्हणजे सुरत काँग्रेसच्या आधी सुमारे सहा आठवडे. या पत्रांत मी टिळकांना खालील प्रमाणे लिहिलेः—

"प्रस्तुतचे पत्र लिहिण्याला मला अत्यंत खेद वाटतो. मी ते फार नाखुशीनें लिहीत आहे. कारण तुमच्याविषयी माझ्या मनांत अत्यंत कृतज्ञता व सद्भावना वसत आहे. बारा वर्षांपूर्वी तुम्ही मला वर्तमानपत्रांकडे घेतले. माझी कोणत्याहि प्रकारची परीक्षा आधी न घेतां किंवा कसोटी न लावतां माझी तुम्ही एकदम नेमणूकच केली. तुम्ही मला आपल्या पहिल्याच पत्रांत असेहि लिहिले की " तुम्हा स्नेही हवे म्हणून तुम्हांला बोलावीत आहे. नोकर म्हणून नव्हे. कारण कदाचित् माझे हे अखेरचेच दिवस ठरतील. आणि त्यांत मला कोणी स्नेहीच मदतनीस पाहिजे." मी येथे आल्यावर अशा कित्येक गोष्टी लवकरच घडल्या की, त्यामुळे तुमचे आमचे संबंध निकट आले; व त्यांत मी स्नेही व शिष्य या नात्याने यथाशक्ति तुमची कामे करण्याचा यत्न केला. पण कालांतराने आतां मला असे दिसतें की, गेली दोनतीन वर्षे माझे मराठ्यांतील लिहिणे कांही तुम्हांला समाधानकारक वाटत नाही. तुमचा पक्षपाती किंवा अनुयायी या नात्याने मी असावा तसा नाहीं, कसोटीला थोडा कमी उतरतो, असेहि तुम्हाला वाटत असावेसे दिसते. यामुळे आपण हळुहळू एकमेकापासून मनाने दूर होत चाललो आहो. असा मनुष्य वागवून घ्यावा लागत असल्यामुळे तुमचा सुस्वभाव व सहनशीलता यांच्यावर मी बराच ताण घालीत आहे असे मला वाटू लागते. आतां माझ्या दृष्टीने मी काही फारसे गैर केलें असेहि मला वाटत नाही. पण मी करितो ते योग्य आहे असे वाटले तरी त्यामुळे, मी आज जी गोष्ट तुमच्यापुढे बोलणार आहे ती बोलू नये असे होत नाही.

" सोळा वर्षांपूर्वी तुम्ही केसरीबरोबर मराठापत्र विकत घेतले व त्यावर खर्च करून स्वार्थत्यागपूर्वक ते चालवीत आहां. यामुळे केसरीचीच मते मराठ्यांतून प्रकट व्हावी अशी तुमची अपेक्षा असणे स्वाभाविक होय. भाषा,मतप्रतिपादन,व्यक्तिस्तुति, व्यक्तिनिंदा, समर्थन,निषेध इत्यादि गोष्टीत तुम्ही जसे मराठ्यांत स्वतः लिहिले असते तस माझ्या हातून लिहून झाले नाही. तथापि तुम्ही जाहीररीतीने कोठेहि मज-विषयी निषेध किंवा नापसंती प्रगट केली नाही. अर्थात तुम्ही मनांतल्या मनांतच

मजकरितां एक प्रकारचा जाच सहन केला. पण ही स्थिति अशीच किती दिवस चालूं द्यावी ? तुमच्या सहनशीलतेचे सत्त्व मी किती दिवस पाहवे ? बरं, तुमची सहनशीलता एखादे वेळी ढासळली, ( होय, मनुष्यच आहे. केव्हां तरी तसे व्हावयाचेहि.) तर त्यामुळे माझ्या स्वाभिमानाला धक्का बसावयाचा. आणि स्वतःची चूक नाही असे मनाला वाटत असल्यास कोणाचाहि स्वाभिमान मोठा जागृत व तीक्ष्ण असतो !

"तुमच्या माझ्यामध्ये मतभेद होतो तो सूक्ष्मच असतो व तोहि सार्वजनिक बाबतीत. खासगी नात्याने तुम्ही नेहेमीसारखेच ममत्व दाखविता, व तुमचा स्नेह नष्ट व्हावा अशी कोणती गोष्ट माझ्याहि हातून घडली आहे असे मला वाटत नाही. पण तुमच्या आमच्यातील सूक्ष्म मतभेदात, धोरणाचा म्हणजे तत्वाचा फरक आहे असे बाहेर दिसून येते. आणि लोकहि असे चमत्कारिक की, तुमचा आमचा मतभेद झाला तर त्यात तुमचे काही फारसे बिघडत नसले तरी पण लोकाचेच फार बिघडते ! तेव्हा "तुम्ही केळकरांना का ठेवून घेता" असे या लोकापैकीच एखादा म्हणत उठून तुम्हाला सतावून सोडावयाचा. तेव्हां ही गोष्ट करण्याला दुसऱ्याला जागा न ठेवितां मी आपण होऊनच पुढे येऊन ती गोष्ट कां करूं नये ? कारण मी आपल्या बुद्धीप्रमाणे माझे कर्तव्य तेच करीत आहे. मग मी लोकाचा ओशाळा तरी कां राहूं ? यावर तुम्ही मला म्हणाल की, "लोकाना तुमच्यापासून काय हवे हे जर तुमचे तुम्हाला कळते तर त्याप्रमाणे तुम्ही कां वागू नये ? तसे तुम्ही वागा म्हणजे सर्वच प्रश्न मिटला." पण ती गोष्ट होणे शक्य नाही. कारण मलाहि स्वतःची काही मते आहेत. म्हणून इतर कारणांसाठी मी ती आजवर दाबांत ठेविली तींच पुष्कळ झाली. त्याहून ती मला अधिक दाबांत ठेवितां येत नाहीत.

"तेव्हां आतां हे कोडे सुटण्याला दोनच मार्ग. एक हा की, चालले आहे ते सर्वस्वी ठीक नसले तरी आहे तसेंच चालू राहण्यास तुमची काही हरकत नसावी. आहे तें आहे असेच तुम्हाला चालावे. किंवा दुसरा मार्ग असा की, मी मराठ्याचे संपादकत्व सोडण्याला प्रांजलपणाने तुम्ही मला समति द्यावी. संपादक म्हणून मराठ्याला तुम्ही आपले नांव दिले तर तुम्हाला हव्या त्या विषयावर हवे तेच लिहून उरेल तें मी लिहीत जाईन. आणि अशा रीतीने मराठ्याचें जे काम कमी होईल त्या ऐवजी

मला केसरीचे काम तितक्या बेताचे द्यावे. किंवा ही व्यवस्था पसंत नसेल तर तुम्ही वेगळाच मनुष्य मराठ्याचा संपादक नेमा व त्याजकडून सर्व काम घ्या. मराठा सोडून जाणे ही गोष्ट मला सोपी किंवा सुखाची वाटत नाही. शिवाय बारा वर्षांच्या सहवासाने मलाहि त्या पत्राबद्दल एक प्रकारचे ममत्व वाटत आहे. पण अवश्य असेल तर ते मला सोडलेच पाहिजे व ते मी आनंदाने सोडीन. उभयताचा स्वाभिमान राखला जावा याकरिताच मी हे सुचवीत आहे. कसल्याहि अडचणीतून तुम्ही मार्ग काढूं शकता; व माझा संबंध सुटावा असे तुम्हालाहि सहसा वाटत नसेल. पण मी जे सुचविले आहे त्यांतून ज्या कांही गोष्टी निघतील, ( मग त्या बऱ्या असोत वाईट असोत ) त्या स्वीकारण्याला माझी तयारी आहे."

या पत्राला टिळकाकडून ता. २३ नोव्हेंबरचे उत्तर मला आले, त्यांत त्यांनी खालीलप्रमाणे लिहिले होते:—" तुमचे ता. १२ चे पत्र पावले. असले काहीतरी पत्र तुमच्याकडून येण्याच्या बेतात असावे असे मनाला त्या पूर्वीपासून वाटतच होते. पण ते प्रत्यक्ष आलेच तेव्हां मात्र खेद झाल्याशिवाय राहिला नाही. प्रथम सहवास व सहकार्य होतांना ज्यांची माझी मते एक आहेत त्यांचीच मते पुढे मजहून वेगळी व्हावी हा दुर्दैवाने माझाच योगायोग दिसतो. बारा वर्षांपूर्वी तुम्ही इकडे येऊन मिळाला तेव्हा तुम्ही अगदी तरुण म्हणून तुमची राजकीय मते स्थिर झाली होती असे म्हणतां आले नसते. आणि या बारा वर्षांत केसरीत प्रगट होणाऱ्या मताहून कांही भिन्न प्रकारची मते तुमची परिणत होतील अशी मला मुळीच शंका आली नाही. पण तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे हा ज्याचा त्याचा स्वभाव व ज्याची त्याची विवेकबुद्धि याचाच प्रश्न आहे. म्हणून या बाबतीत मी तुमच्या स्वाभिमानाच्या मार्गांत येऊ इच्छित नाही. केसरी व मराठा ही दोन्ही एका पक्षाची मुखपत्रें आहेत हे तुम्ही जाणतांच. आणि ज्या अर्थी आम्ही आतां आपल्या पक्षाची संघटना करीत आहो त्या अर्थी त्यांचे तेच स्वरूप पुढेहि राखण्याचा माझा विचार आहे. किरकोळ गोष्टीसंबंधाने मी केव्हांहि दुर्लक्ष करीन व आजवर तसे केलेहि आहे. पण विशेष महत्वाच्या प्रसंगी दोन्ही पत्रांनी एकच मत व तेहि सारख्याच नेटाने प्रतिपादन केले पाहिजे. एवढे एक बंधन सोडून दिले म्हणजे तुमचा संतोष व्हावा म्हणून मी इतर काय वाटेल ते करण्यास तयार आहे. तुमचें आमचे सहकार्य सुटावे व तुम्ही आमच्यांतून जावे ही गोष्ट मला अत्यंत दुःखकर वाटेल. कारण

तुमचा प्रेमळ स्वभाव,व स्वार्थत्यागाने तुम्ही स्वतःला आणलेली किंमत किंवा महत्त्व, यांची मला पूर्ण जाणीव आहे. इतकेच नव्हे तर वर्तमानपत्राशी तुमचा इतके दिवस इतका निकट संबंध आल्यामुळें मी त्याच्या आधारावर कांही आशा मनांत धरून बसलो आहे.त्या माझ्या आशा निराधार ठरू नयेत अशी माझी इच्छा आहे.म्हणून माझी तुम्हाला पुनः विनति आहे की मला सांगतां त्या ऐवजी तुम्हीच या सर्व गोष्टीचा विचार करावा; व हल्ली तुम्ही सुचविला त्याहून वेगळा असा कांही मार्ग सुचवावा. तुमच्या विषयी मला बाहेरचा भलता कोणी भलते कांही सांगून माझे मन तुमच्या संबंधाने कलुषित करील हे घडणार नाही. कारण मी तसा हलक्या कानाचा मनुष्य नाहीं. तुम्ही आम्ही एकमेकांना इतकी वर्षे चांगले जाणतो व एकमेकांची मते एकमेकांना पूर्ण माहीत आहेत. तेव्हा पुढच्या आठवड्यांत तुम्ही सिंहगडावर याल तर आपण बसून त्या विषयी बोलूं."

वरील पत्रानतर मी सिंहगडावर गेलो. आणि टिळकांचे माझे या विषयावर बराच वेळ संभाषण झाले. त्यांचा मुख्य मुद्दा काय होता हे मला आजहि चांगलेच स्मरते. मतभेद होता तो सर्वसामान्य राजकीय विषयाबद्दल किंवा तात्त्विक जहालपणाच्या लेखनाबद्दल नव्हता. तर व्यक्तिविषयक टीकेसबंधाने होता. माझे म्हणणें असे की, "आज नामदार गोखले व त्यांच्या पक्षातील इतर व्यक्ति यांच्यावर 'हिंदू पंच' वगैरेसारख्या अत्यंत कमी प्रतीच्या वर्तमानपत्रांतून अतिशय अभद्र व निरर्गल टीका येत आहे, आणि तिच्यामुळे आपल्या पक्षाचे काम चांगलें होत आहे असे आपल्या पक्षांतील लोकांना वाटते हे उघड आहे. अर्थात् त्यांची अपेक्षा मी मराठ्यांतहि इतके टाकून लिहावे अशी असणार. केसरींत अगदी हिंदुपंचादि वर्तमानपत्राइतकी वाईट व्यक्तीविषयक टीका असत नाही हे खरे. तथापि केसरीत जितकी व्यक्तिनिंदा येते तितकीहि मला योग्य वाटत नाही.केसरीत कृष्णाजीपंत खाडिलकर यांना आवडेल ती भाषा ते खुशाल वापरोत व ती लोकांना आवडो. पण तशी टीका व भाषा मराठ्यांत मजकडून लिहिली जाणे हे माझ्या स्वभावामुळे मजकडून होणें कठिण. पण त्यामुळें माझें या दृष्टीचे लिहिणे लोकांना पसंत पडत नाही; व दोन्ही पत्रांनी टीकेसंबंधी सारखाच नेट दाखवावा अशी तुमची अपेक्षा असल्यामुळें तुम्हीहि नाराजच राहणार. तेव्हां त्यांत दुरुस्ती होणार कशी?"

यावर वर्तमानपत्रांत लिहितांना व्यक्तीना राखून संभाळून लिहितां येणे शक्य नाहीं याविषयीं आमच्यामध्ये बराच वाद, उदाहरणे देऊनहि झाला. परंतु टिळकांनी आपले

मत असे सांगितले की "व्यक्तींना सभाळून टीका करतां येणारच नाही असे नाही; पण राजकारण हा बोलूनचालून धकाधकीचा मामला आहे. त्यांतूनहि हल्ली दोन्ही पक्ष हिंदी राजकारणाचे डाव प्रक्षुब्ध अशा गरम वातावरणांत उभे राहून खेळत आहेत. तेव्हां अशा वेळी व्यक्तीवरहि सडकून टीका करावी लागणार; व त्यांत मागे पुढे पहात बसणे म्हणजे मनाचा फाजिल नाजूकपणा प्रगट करण्यासारखें होय." अर्थात् या वादाचा निकाल सिंहगडच्या थंड वातावरणांतहि लागला नाही. पण टिळकांनी या वादांत मजविषयी इतके सौजन्य दाखविले की, त्यांचेच बोलणें आपल्या पदरात घेऊन मला परत जावे लागले तरी राजीनाम्याची गोष्ट मात्र फिरून काढू नये !

पुढे नोव्हेंबरअखेर आली. नागपूरची राष्ट्रीयसभा रहित होऊन ती सुरतेस होण्याचे ठरले. आणि तेथे काय काय प्रकार घडले याचे सविस्तर वर्णन मी टिळक-चरित्राच्या दुसऱ्या खंडांत केले आहे म्हणून त्याचे वर्णन पुनः येथे करीत नाही. पण इतकेच सांगतो की या सर्व प्रकारांनी माझी मनःखिन्नता कमी न होता वाढल्यासारखीच झाली. टिळक सिंहगडाहून खाली आल्यावर राष्ट्रीयसभेच्या वादांत अधिकच आवेशाने पडले. केसरीचा दर अक असा निघे की, त्यांतील टीकेचा खडतरपणा पूर्वीच्याहून थोडा अधिकच. पण वर्तमानपत्रांत लिहिण्याच्या कामापेक्षां ते देशाच्या निरनिराळ्या भागातून, म्हणजे खरोखरच कर्नाटकापासून बंगाल्यापर्यंत, आपले सैन्य शिलेदार व सरदार गोळा करण्याच्या खटपटीस लागले होते. यामुळे केसरीत लिहिण्याचे काम मुख्यतः खाडिलकरांच्याच हाती गेले, व या दिवसात त्यांनी आपल्या विशिष्ट लेखनपद्धतीची हौस पुरी करून घेतली. शिवाय कलकत्त्याची 'वंदेमातरम्' वगैरे इंग्रजी व कांही बंगाली पत्रे असे काव्ययुक्त व कसून लिहीत की केसरीलाहि तुलनेत आपण मागे पडू नये असे सहजच वाटे. खाडिलकरांना अरविंदबाबूंची काव्यपूर्ण टीका साधण्यासारखी नव्हती. ते तत्त्वज्ञान म्हणून अरविंद बाबूसारखे थोडेबहुत लिहीत पण खाडिलकरांच्या लेखणीत जो ग्राम्यपणा होता तो अरविंदबाबूंच्या लेखणीत कोठेहि आढळणे शक्य नव्हते. या बाबतीत त्यांची तुलना इतर कांही बगाली वर्तमानपत्रांबरोबर झाली असती; म्हणजे मराठीतहि कोणी पंचकवडी बानर्जी अथवा पंडित कलिप्रसन्न काव्यविशारद होते असे फार तर यथार्थतेने म्हणतां आले असते.

सुरतेस राष्ट्रीय पक्षाची नवी छावणी उभारली गेली तेव्हा, अगदी शेवटी, राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांच्या म्हणजे रास बिहारी बाबूंच्या निवडणुकीलाच हरकत घेणारी उपसूचना मांडून युद्धास सुरुवात करावी असे आमच्या पक्षातील लोकानी ठरविले. ही गोष्ट प्रथम टिळकांना स्वतःला पसत नव्हती पण राष्ट्रीय पक्षांतील इतर पुढाऱ्याच्या सल्ल्यांत ते अधिकाधिक गुरफटले जात होते, व ती उपसूचना स्वतःच्या हौसेने नसली तरी इतरांखातर त्यांना माडणे प्राप्त झाले आणि कोणती-हि गोष्ट एकदा पत्करल्यावर ती पुरी करण्यात टिळकाचा हात धरणारा कोणीहि नव्हता. कार्याकार्याचा हा लढा राष्ट्रीयसभेच्या तारखेच्या आदल्या रात्रीपर्यंत सुरू होता. प्रसंगोपात्त बोलणे निघे तेव्हा ही गोष्ट करणे ठीक नाही असे मी आपल्या-कडून म्हणत असे. पण नगाऱ्यापुढे टिमकीइतकीच माझ्या सल्ल्याची त्यावेळी किमत होती. त्या रात्री कोणालाच झोप नव्हती म्हटले तरी चालेल सर्व छावणीभर वादविवादाचा जागता पहारा सुरू होता. टाळमृदग कोणी खाली पडू दिलाच नाही.

लोकाना पूर्वी परिचित नसलेले असे दोन स्मरणीय आवाज त्या सर्व दंगलीतून एकसारखे मधून मधून ऐकू येत होते असे मला चांगले स्मरते. एक आवाज डॉक्टर बाबासाहेब पराजपे याचा. त्याच्या चढ्या आवाजाची आणि आग्रही विधानाची सर कोणालाच करतां आली नाही. आणि दुसरा आवाज अच्युतराव कोल्हटकर याचा. त्याचा आवाज इतका चढा नव्हता, पण त्याचा विनोद व हास्य यांचा उत्कटपणाहि तेथे कोणास हार जाण्याइतका नव्हता. सकाळी उठल्यावर मला टिळक म्हणाले कीं, "उपसूचना माडण्याचे मी अखेर निश्चित केले आहे. त्याला तुम्ही सेकंडिग करून दुजोरा द्याल काय ?" तेव्हाहि मी पूर्वीचाच सल्ला दिला. तो टिळकाना तर आवडला नाहीच, पण दूर बसलेल्या काही लोकांची आपापसात माझ्या उत्तरावर अशी टीका झाली की, "केळकरांनी ही गोष्ट करीत नाही म्हणणे हा एक प्रकारे प्रत्यक्ष लष्करी हुकूम तोडण्याचा गुन्हा होय. आणि खुद्द रणांगणावर अशा गुन्ह्याला गोळी घालून देहान्त प्रायश्चित्तहि देत असतात." माझ्या उत्तराचा टिळकां-नाहि इतका राग आला कीं, त्या सबंध दिवसांत त्यांनी माझ्याशी भाषण करण्याचे वर्ज्य केले ! पण त्यांच्यांत व इतरांत फरक हा होता की इतरांनी मला लष्करी हुकमाच्या अमान्यतेच्या गुन्ह्याबद्दल गोळी घालून मारले असते तसे

टिळकांनी तिरस्काराने मला कायमचा दूर करून मारले नाही. इतकेच नव्हे, तर राष्ट्रीय सभा मोडल्यानंतर लगेच नव्या राष्ट्रीय पक्षाची सभा व संघटना झाली त्यात त्यांनी मला संघटनेतील एक अधिकाराचे स्थान दिले. आणि महाराष्ट्राचा व बंगालचा राष्ट्रीय पक्ष मिळून जी सभा झाली तिच्या चिटणीसाचें काम मजकडेच होते !

सुरतेहून आम्ही पुण्यास आल्यावर अर्थातच राष्ट्रीय सभा मोडण्याचे पाप खरे कोणी केले या विषयावर चौफेर मोठा कडाक्याचा वाद झाला. आणि सभेच्या अध्यक्षाचे अधिकार काय असतात याच्या तात्त्विक चर्चेची झोड अनेक दिवस उठत होती "अध्यक्षाच्या निवडणुकीच्या ठरावाला उपसूचना टिळकांनी मांडणे प्रसंगाला योग्य नव्हते. तिने विनाकारण क्षोभ उत्पन्न केला. ते केल्याशिवायहि राष्ट्रीयसभेच्या ठरावात काय असावे काय नसावे हे आपले मत मांडण्याला टिळकांना इतर रीतीने संधि मिळण्यासारखी होती" असे मला वाटत होते पण टिळकांनी जरी ही प्रास्ताविक चूक केली तरी त्यांना ती उपसूचना पुढे आणूच देऊ नये अशा हेतूनें व्यासपीठावरच्या लोकांनी जे कारस्थान केले, व शेवटी अध्यक्षांनी चलाखी करून आपली निवडणूक झाली असा बहाणा करून टिळकांची मुस्कटदाबी करण्याचा जो प्रयत्न केला, तो खरोखरच अश्लाघ्य होता. आणि सुरतेच्या मंडपाच्या रणांगणावर उभय सैन्ये युद्धाला सज्ज असली तरी पहिला गोळा अध्यक्षांनी आपल्या मूर्खपणाने, आणि दुसरा गोळा मुंबईच्या एका मवाळ पारशी सभासदाने खुर्ची उचलून फेकण्याने टाकला अशी माझी खात्री समक्ष प्रकार पाहूनच झालेली होती. म्हणून या सर्व प्रकारावर मराठ्यातून मी टीका केली ती अत्यंत समर्पक व ठसठशीत होती ती टिळकांनी पाहिल्यावर त्यांना फार बरे वाटले. म्हणजे केसरी व मराठा या दोन पत्राच्या टीका एकाच धोरणाच्या व सारख्याच नेटाच्या असाव्या हे जे टिळकांचे ध्येय ते पुष्कळ महिन्यांनी या प्रसंगी टिळकांच्या अनुभवाला उतरले.

तथापि माझ्या मनांतील मळमळ जाऊ शकली नाही. सुरतेची राष्ट्रीय सभा मोडल्यामुळे उभयपक्षांतील वैर अधिकच तीक्ष्ण झाले आणि शिव्याशापांना ऊत आला. यामुळे मराठ्यांतून व्यक्तिनिंदेची झोड उठविण्याची जरुरी शिल्लकच राहिली. इतर लक्षणेहि कांही ठीक दिसेनात. आमच्या पक्षांतील मंडळी मजकडे पूर्वीहून अधिक डोळे वटारून पाहूं लागली. जानेवारी अखेर मी वडील बधूंकडे

मालेगांवास गेलो. त्यांचा सल्ला या कामी घेतला. आणि तारीख २८ जानेवारी रोजी टिळकाना खालीलप्रमाणे पत्र लिहिले. " मी काल येथे आलो. पण प्रकृति अजून ठीक नाही. माझ्या बंधूंचा विचार स्वतन्त्रपणे घेतला. त्यांचेहि मत माझ्या-सारखेच पडले; व पूर्वी ता. १२ नोव्हेंबर रोजी आपणास पत्र लिहिले त्याला धरूनच हे पत्र आहे असे समजावे. पूर्वी सिंहगडावर तुम्ही मला जो उपदेश केला तो गेले दोन महिने अनुभवांत आणण्याचा प्रयत्न मी आपणाकडून केला. तथापि ते काही परिस्थितीशी जुळत नाही. माझा स्वभाव किंवा प्रकृतिधर्म जोपर्यंत बदलू शकत नाही तोपर्यंत बहुधा हे असेच चालणार. म्हणजे मी मराठ्याचा संपादक राहिल्याने धड तुमच्या मनासारखे होऊ शकत नाही व धड माझ्या मनासारखे होऊ शकत नाही. मी माझ्या मतांचा आग्रह धरण्यास शोभण्याइतके कर्तृत्व माझ्या अंगी नसेल, किंवा माझी मतेच मुळी चुकीची असतील. पण इत-रहि अनेक विचार आहेत. तुमच्या निकट सान्निध्यात असणाऱ्या मनुष्यावर तुमच्या पक्षाच्या लोकाचा जितका विश्वास असणे अवश्य आहे तितका त्यांचा मजवर नाही. हे पाहून मला रोज अधिकाधिक वाईट वाटते. मी तुमचा अगदी निकटचा मदतनीस असणे या गोष्टीने तुमच्या कार्याला बळकटी न येता कमकुवत-पणा येतो असे या लोकांना उघड उघड वाटते. पण उलट मला जे प्रामाणिकपणे वाटते आणि या लोकाना मी मराठ्यात जे लिहावे असे वाटते याचा मेळ कसा घालावयाचा हेच मला समजत नाही. तुमची गोष्ट वेगळी आहे. तुम्हाला तुमची सभाषणे व केसरीत येणारे लेख यांचा मेळ घालतां येतो. तात्पर्य, मराठा-पत्राचे डिक्लेरेशन तुम्ही यापुढे आपल्या स्वतःच्या नावे करावे हे उत्तम. तसे झाल्याने बाध न येणाऱ्या अशा पुष्कळ गोष्टी शिल्लक उरतात. झाला तर फरक इतकाच होईल की मग माझ्या स्पष्टोक्तीला, म्हणजे स्वतंत्र स्पष्टोक्तीला हल्लीहून थोडा अधिक मान आपल्या पक्षांत मिळेल. कृपा करून असे समजूं नका की मी हे वैतागाने किंवा केवळ खिन्नतेमुळे किंवा मुद्दाम होऊन कांही तरी वेडे वांकडे करून बसावे म्हणून करीत आहे. कोणी म्हणेल की, १९०५ साली बनारस कॉंग्रेसच्या पूर्वी "केसरी-मराठ्याचा कायम नोकर म्हणून मला तुम्ही विमा पॉलिसी करून द्यावी किंवा पॉलिसीच्या हप्त्यापुरता पगार वाढवावा" असे मी सुचविले होते, ते तुम्ही तेव्हां नाही म्हटले आणि म्हणून तो राग मनांत ठेवून मी हल्ली मराठा सोडीत आहे. पण असें कोणी म्हणेल तर ते मुळीच बरोबर नाही. तेच

खरें कारण असतें तर मी थापूर्वीच राजीनामा दिला असता. हल्लीं मी जे योजिलें आहे त्याचें खरें कारण हेंच की माझी विवेकबुद्धि आणि मराठापत्राच्या पगारी संपादकाचें कर्तव्य यांचा मेळ मला घालतां येणे अशक्य झालें आहे. मी पुण्यास शुक्रवारी परत येतो. दरम्यान मराठ्याकरितां पाठविलेला हा अग्रलेख धोंडोपता-जवळ द्यावा. मी शुक्रवारी आल्यावर इतर मजकूर पुरा करीन. ''

इतकें झालें तरीहि टिळक माझा राजीनामा स्वीकारीनात. मी त्यांना खरो-खरच नकोसा झालो असतो तर त्यांनी पडत्या फळाची आज्ञा म्हणून माझा राजीनामा स्वीकारून मला मोकळें केले असतें व स्वतःहि मोकळे झाले असते. पण मी राजीनामा दिल्यानें आपणाला मोकळेपणापेक्षां अडचणच अधिक होईल असें त्यांना वाटलें असावें. यावेळी केसरीकडे खाडिलकर व लिमये हे दोघे असि-स्टंट होते. तेव्हां त्यापैकी एखाद्याचें नाव मराठ्यावर घालता आले असते तर त्यांनी ती गोष्ट केलीहि असती. पण त्यांना हे पक्कें माहीत होतें की नुसतें नांव घालण्याला यापैकी कोणीहि नाकबूल झाला नसता, तरी त्यापैकी एकाच्याहि हातून स्वतः मराठ्यांतील मजकूर लिहून मराठा चालविणें हे अशक्य होतें. असो, पण पुढे सुदैवानें इतर कामें निघाली त्यांत माझ्या राजीनाम्याचें प्रकरण सहजच बाजूला पडलें.

पुण्यास पुणे–जिल्ह्याची परिषद भरविण्याचा बूट निघाला. तसेंच धुळें येथें प्रांतिक परिषद भरविण्याचेंहि घाटू लागले. कॉंग्रेस कंटिन्यूएशन कमिटीचें काम सुरू झालें. त्यामुळें जुन्या कॉंग्रेसची कन्व्हेन्शन बनवून ज्या प्रांतिक परिषदा इतर प्रांतांतून भरणार त्यांना हरकत आणणें वगैरे उलट्या हल्ल्याचें कामहि निघालें. त्याप्रमाणें अलाहाबाद येथें प्रांतिक परिषद भरणार अशी बातमी आली तेव्हां तिकडे जाऊन खासगी प्रयत्नानें विरोधाचें कोंबडें नाचविण्याचें काम टिळ-कांनी मजकडे सांगितलें. त्याप्रमाणें मी अलाहाबादेस जाऊन बरीच खटपट केली. आणि तेजबहादूर सप्रू, मदन मोहन मालवीय यांच्या पक्षाविरुद्ध जे वकील बॅरिस्टर वगैरे कांही लोक होते त्यांच्या सह्या मिळवून कन्व्हेन्शनतर्फे भरणाऱ्या अलाहाबाद प्रांतिक परिषदेच्या सभेत विरोध नमूद करतां येतो कां पहावा अशी खटपट केली. पण ती साधली नाही.

या प्रसंगाचा फायदा घेऊन मी अलिगड, लखनौ, मुरादाबाद व लाहोर एथपर्यंत गेलो. लाहोरला सरलादेवी चौधराणी ( पंडित रामभुजदत्त यांच्या

पत्नी ) यांचे मला निमंत्रण होते. त्यांची सहानुभूति टिळकाकडे होती. लाला-लजपतराय यांनी नेमस्ताच्या कन्व्हेन्शनवर ( उद्देश पत्रिकेवर ) सही केली होती व ते कन्व्हेन्शनला हजरहि राहिले होते. परंतु दोन्ही पक्षांकडे त्याचा सारखाच ओढा असल्यामुळे, आणि त्याचा व माझा पूर्वीचा परिचय असल्या-मुळे, त्याचाहि पाहुणचार मी घेतला याच दौऱ्यात मी कांगडी येथील गुरुकुल पाहिले. योगायोग असा की त्यावेळी स्वामी श्रद्धानंद हे पूर्वाश्रमीचे लाला मुनशी-राम असून गुरुकुलाचे अध्यक्ष होते. मी गेलो तेव्हांच गुरुकुलाचा वार्षिक समारंभ होता. पंडित लजपतराय हे या समारंभाचे अध्यक्ष होते. आम्हा तिघांची पंगत त्या दिवशी गुरुकुलांत झाली. लाला लजपतराय यांचे भाषण संध्याकाळी झाले तेव्हां गुरुकुलाला मिळालेल्या हजारो रुपयांच्या देणग्यांची तेथे नुसती रास पडलेली पाहून मला आश्चर्य वाटले. आर्यसमाजी लोकांच्या दानशौर्याची ख्याति पूर्वी ऐकली होती पण प्रत्यक्ष प्रकार पाहिला नव्हता लाला मुनशीराम हे घासपार्टीचे म्हणजे आर्यसमाजातील निवृत्तमासपक्षाचे पुढारी, लाला लजपतराय हे मासपार्टीचे म्हणजे प्रवृत्तमांस पक्षाचे पुढारी या नात्याने त्याच्यांत बराच मतभेद होता असे ऐकत होतो म्हणून हे दोघे एकत्र पाहून मला फार बरं वाटले.

याच दौऱ्यात डॉ. मनोहरलाल यांच्या निमंत्रणावरून मी अलिगड येथे गेलो. त्याची आठवण दोन प्रकाराने राहिली. एक प्रकार असा की अलिगड येथील टाऊन हॉलमध्ये माझे व्याख्यान झाले त्याचा रिपोर्ट वर सरकारकडे फार वाईट गेला. आणि माझ्यावर राजद्रोहाबद्दल खटला होण्याची शिफारस झाली ! पण मी तेथे दोन दिवसांचा पाहुणा होतो, कांही चळवळ करण्याकरिता कायमचा गेलो नव्हतो, म्हणून ही शिफारस अमलांत आली नाही, असे पुणे येथील 'डेक्कन हेरल्ड' नांवाच्या पत्रांत मी वाचले तेव्हां एक आगंतुक संकट टळल्यासारखे वाटले. कारण त्या सुमारास राजद्रोहांच्या खटाल्यांची प्रस्तावना झाली होती, व हा खटला मजवर झाला असता तर सहज वर्ष दीड वर्षाची शिक्षा भोगावी लागली असती.

अलिगडची आठवण राहण्याचा दुसरा प्रकार असा. तेथील किल्ला मी हिंडून पाहिला. तो पुण्याच्या शनवारवाड्यासारखा वाटला. गंगा-यमुना याच्या दरम्यान मराठ्यांनी पुष्कळ वर्षे आपली लष्करी ठाणी वसविली होती त्यावेळी

त्यांनीच हा किल्ला बांधला असे म्हणतात. उत्तर हिंदुस्थानात दिल्ली, पानपत व अलिगड ही शहरे मी पाहिली तेव्हा तीन निरनिराळ्या प्रकारच्या भावना मनांत आल्या. दिल्लीस मराठ्याचे स्मरणचिन्ह असते तर ते भूषणभूत वाटावे अशी मराठ्याची स्थिति महादजी शिंद्याच्या वेळी दिल्लीस होती. पानपतचे मैदान पाहिले म्हणजे पराभवाच्या दुःखाचीच एकजात भावना मनात येते. पण अलिगडास हे विशेष वाटले की दुआबातील मराठ्याचे पराक्रम मोठे होते व त्याचे एक दृश्य स्मरणचिन्ह अलिगडच्या या किल्ल्यांत पाहवयास मिळे. दुर्दैवाने दिल्लीत असे स्थान उरलेले नाही. अलिगडच्या या आठवणीचा उल्लेख मी काही वर्षांमागे 'रत्नाकरा'त 'बुरुजात पुरलेले देव' या नांवाची एक गोष्ट लिहिली तीत आलेला आहे.

असो. अलाहाबाद प्रांताकडे हा दौरा करण्यास मला टिळकांनी सांगितलें ते त्यावेळी जसे त्यांना तसेच मलाहि सोईचे होते. त्या दौऱ्यानतर धुळे येथील प्रातिक परिषद झाली, यामुळे त्या उद्योगांत माझ्या राजीनाम्याची आठवण टिळकाना झाली नाहीच पण मलाहि झाली नाही. शिवाय एप्रिलांत बगल्यांतील गोलॅडो येथील घाटावर क्रातिकारकानी आपला पहिला बार उडविला व हे प्रकार आता चोहोकडे असेच होणार अशी चिन्हे दिसू लागली. नेमस्त व जहाल पक्षांतील शाब्दिक वादापेक्षां या नवीन प्रकारांनी उद्भूत झालेल्या भावना व त्यातून पुढे निर्माण होणारी सकटे याची कृष्णच्छाया पडून दोन्ही पक्षाची मने बरीच व्यग्र झाली होती. यामुळे शाब्दिक वादाच्या त्रासांतून आपण सुटलो, व व्यक्ति सोडल्या असता सरकारविरुद्धच जेवढ लिहावयाचे त्यांत मी काही कमी पडणार नव्हतो हे टिळकांना व मला सारखेच माहीत होते. शिवाय सकटाचे दर्शन दुरून होत असतां मराठा वर्तमानपत्र सोडून जाणे हे सहजच वाईट दिसण्यासारखें असून मनाला न पटण्यासारखेहि होते. या अनेक कारणानी मी टिळकांना नोव्हेंबरपासून राजीनामा देण्याच्या गोष्टी बोलू लागलो होतो त्या पुढील एप्रिल पासून बद पडल्या आणि त्या सालच्या उन्हाळयाच्या अखेर प्रथम शिवरामपंत परांजपे यांच्यावर व नतर खुद्द टिळकांवर खटले झाले तेव्हां तर त्या गोष्टी अजीबातच मागे पडल्या.

खटले सुरू झाल्यापासून केसरीतील व्यक्तिविषयक निंदा थोडी कमी झाली. यामुळें मराठ्यांत तितकीच कठोर निंदा आली आहे की नाही हे पाहण्याचे फारसे

कारण राहिले नाही किंबहुना खटले सुरू झाल्यापासून वर्तमानपत्रे कशी तरी भरून काढावयाची, व मुख्य लक्ष आम्ही संपादकांनीहि खटल्याच्या कामाकडे द्यावयाचे, असा प्रकार सुरू झाला. आणि भिन्न मताचे लोकहि सर्वस्वी एकजुटीने वागूं लागले. टिळकांना सहा वर्षांची शिक्षा झाली तेव्हां दुसरे तिसरे दिवशी केसरीचे डिक्लेरेशन करण्याचा प्रश्न निघाला. तेव्हां केसरीत लिहिणारे मुख्य उपसंपादक खाडिलकर यांनीच ते करावे ही गोष्ट ओघानेच प्राप्त झाली. मी खाडिलकराच्या आधी संस्थेला येऊन मिळालेला वरिष्ठ मानाचा आणि म्हणून केसरीचा संपादक मी व्हावे ही गोष्ट कायदेशीर हक्काची होती. आणि पुढे ती तशा स्वरूपाने वादाला निघालीहि. पण या संकटाच्या वेळी तसली गोष्ट काढणे योग्य नव्हते. आणि टिळक जाग्यावर नसले म्हणजे मग केसरीत खाडिलकर जे लिहितील ते तसेच मी मराठ्यात लिहावे अशी अपेक्षा कोण करणार व आग्रह कोण धरणार ? मी थोडा वडील असलो तरी किमानपक्ष आम्ही दोघे सारख्या दर्जाचे होतो. यामुळे गुरु-शिष्यसंबंध उरला नाही. केवळ गुरुबंधुत्वाचेच नाते उरले. यामुळे केसरीत लिहिली तरी खाडिलकरांची मते चूक आहेत व मराठ्यांत मी लिहिली तरी माझीच मते बरोबर आहेत असे मला म्हणतां येण्यासारखे होते असो; अशा रीतीने खाडिलकर केसरीचे संपादक बनले. पण लगेच अशी स्थिति उत्पन्न झाली की खाडिलकराची लेखणी व्यक्तिनिंदेच्या कामी पुन्हा भडकली. वादग्रस्त प्रश्नांविषयी त्यांचे माझे धोरणहि जमेना. तेव्हां असे वाटू लागले की कोणी एकानेच दोन्ही पत्रांचा संपादक व्हावे हाच खरा मार्ग योग्य होय. पण खाडिलकरांना मराठा घ्यावयाचा नव्हता व केसरी सोडावयाचा नव्हता. दोन्ही पत्रे हाती घेण्याची त्यांची इच्छा किंवा धमक नव्हती. मजमध्ये ह्या दोन्ही गोष्टी होत्या. पण खरी अडचण अशी होती की, खाडिलकरांनी केसरी सोडावा व मला द्यावा हे त्यांना सुचवावयाचे कोणी ? आणि मी त्यांना सुचविले तरी ते नाही म्हणाल्यास माझा आग्रह सिद्धीला जाणार कसा ? अशा विवंचनेत मी पडलों. बाहेरगांवी जावे तो लोक केसरीतील ग्राम्यपणाचा निषेध मजजवळ करीत, व आतां तरी शिमगा थांबवा असे म्हणत. पण त्यांच्या शिमग्याला जसा कांही अधिकमासच आला होता. गोखले पूर्वी फक्त स्वराज्यविरोधी होते ते आतां "टिळकांना कैदेत घालणारे आगलावे" अशी कांही लोकांनी आपली समजूत

करून घेतली व पुढच्या गणपति-उत्सवांतून ग्राम्य पदाचा कहर झाला. इतकेंच नव्हे तर पुढे नाशिकच्या कटाच्या खटल्यांत गुतलेल्या लोकांपैकी एका गृहस्थाने प्रत्यक्ष पिस्तुले घेऊन गोखले याचा आगगाडीत खंडाळ्या घाटांत खून करण्याचा प्रयत्नहि केला. अशा गोष्टीना मनांत ठेऊन मी मराठ्यांत लिहीत असे ते केसरी-च्या धोरणाला सोडून होते तरी असे का लिहिता म्हणून विचारणारा कोणीच उरला नव्हता. पण या दिवसात मजवर खरा कठिण प्रसंग येई तो सपादकाच्या टेबलाशी बसण्याचा नव्हे, तर आपल्या पक्षाची चार मडळी बसून कार्याकार्याची चिकित्सा होई, कार्यक्रम आखले जात, अशा वेळी. किवा जाहीरसभांतून किंवा उत्सवासारख्या मजलशीतून ! पग मुदैवाने अशी एक गोष्ट घडली की तिजमुळे मला मनांतून जे हवे होते ते अव्वल दर्जाचे नसले तरी दुय्यम दर्जाचे पण साधले. केसरी व मराठा ही दोन्ही पत्रे माझ्या हाती यावी हे सर्वात उत्तम. पण तसे न घडले तरी निदान दोन्ही पत्रे खाडिलकरांच्या नावावर जावी, व माझ्या नांवावर एकहि पत्र राहू नये, हे त्या खालोखालचे उत्तम असे मी मनाने ठरविले होते आणि ही दुसरी गोष्ट मात्र साधली. तिचा प्रकार असा.

टिळकाना शिक्षा झाल्याबरोबर टिळकाच्या खटल्याचे पुस्तक काढण्याचें काम मजकडे आले. त्यांत माझे दोन अडीच महिने गेले. इतक्यांत हायकोर्टाची बदनामी केल्याचा खटला मराठ्याचा सपादक म्हणून मजवर भरण्याची तयारी झाली. आणि खरोखरच योग असा की, टिळक-केसच्या या पुस्तकाचे अगदी शेवटचे प्रुफ तपासून देऊन इदुप्रकाश छापखान्याची शेवटची पायरी मी उतरलो तोच वरील खटल्यातील आरोपी म्हणून मजवर नोटिस बजावण्यांत आली. पुढे हा खटला चालून मला शिक्षा झाली त्याची हकीकत टिळक-चरित्राच्या दुसऱ्या खंडांत मी थोडीशी दिलीच आहे, व त्यासबंधी आणखी कांही सागावयाचे आहे ते मी या पुस्तकांत अन्य ठिकाणी सागितलेहि आहे. पण प्रस्तुत ठिकाणी सांगण्याची गोष्ट इतकीच की मजवरील खटल्याच्या शेवटच्या दिवशी मी आपल्या मनांत एक कारस्थान जमवून डाव टाकला आणि तो बरोबर बसला !

माझ्या खटल्याचा निकाल न्यायाधीश आतां सांगणार तोच मी खाडिलकरांना जवळ बोलावून घेऊन सांगितले की, " मला कैदेची शिक्षा न झाली तर ठीकच; पण झालीच तर तुम्ही मराठ्याचे संपादक म्हणून डिक्लेरेशन करा." तेव्हां " शिक्षा

झाल्यावर मग पाहू. आणि थोडीच शिक्षा झाली तर डिक्लेरेशन न बदलतांहि भागवू'' असे बोलणे खाडिलकर यांनी काढले. पण ''संपादक तुरुगांत असतां त्याच्या नावे वर्तमानपत्र चालू राहणे हा गुन्हा होईल; तरी तसे न करतां शिक्षा कितीहि झाली तरी तुम्ही मराठ्याचे डिक्लेरेशन कराच'' असा आग्रह मी धरला. आणि ''मी तुरुगात असता माझ्या नांवावर मराठा चालणे हा गुन्हा होत असला किंवा नसला तरी, या मुदतीत भलत्याने भलते कांही तरी मराठ्यांत लिहिले तर त्याची जबाबदारी तरी कायद्याने मजवरच राहणार'' असा युक्तिवाद मी केला, तेव्हा खाडिलकराना नाही म्हणवेना. पुढे मला ऐनजिनसी चौदाच दिवसांची कैदेची शिक्षा हायकोर्टाने दिली तरी, ती मुदत भरल्यावर मी माफी मागणार, ती माफी कोर्टाला पसंत पडणार, व मग ती स्वीकारून कोर्ट माझी मुक्तता करणार, ही गोष्ट थोड्या कालावधीची होण्याचा संभव. म्हणून आमचे ठरल्याप्रमाणे मला शिक्षा झाल्यानंतर खाडिलकरानी मराठ्याचे डिक्लेरेशन केले व त्यांच्या नांवाने मराठा निघू लागला!

चौदा दिवसांच्या शिक्षेच्या अखेरीस मजकडून सॉलिसिटरनी लिहून नेलेली माफी कोर्टाने स्वीकारली व मला सोडून दिले. परत आल्यावर दोन आठवडे मराठ्यासंबंधाने कोणी कांहीच बोलले नाही. पण मग खाडिलकर यानी त्याचे स्नेही वासुदेवराव जोशी यांच्या मार्फत हळूच गोष्ट काढली, व सुचविले की पूर्वीप्रमाणे डिक्लेरेशन करून मी मराठा हाती घ्यावा. या तगाद्याचे कारण माझ्या एकाद्या हक्काचा अपहार होत आहे ही सात्विक बुद्धि नव्हे. तर खरें कारण असे. मराठ्याचे संपादक झाल्याने खाडिलकराना असे संकट येऊन बसले की, रस्त्याच्या उतारावर जसा कांही एखादा भरलेला गाडा अंगावर घसरत यावा. इंग्रजी मजकूर लिहिणे ही गोष्ट त्यांनी पूर्वी जन्मात कधी केली नव्हती. आणि पुढेंहि ती कधी करण्याची हौस किंवा उमेद त्यांना नव्हती. कोणाकडून कांही तरी लिहवून घ्यावे; मुंबईचा कोणी स्नेही कांही लिहून पाठवील तोच मजकूर दडपून द्यावा.

ओढघस्तीच्या अशा स्थितीत त्यांनी महिना सव्वामहिना मराठा कसा तरी चालविला होता. आणि मी मराठा परत न घेणे ही गोष्ट थोडीशी सहेतुक आहे असे जेव्हां त्यांना दिसून आले तेव्हां तर तें त्यांना फारच जड वाटले. पण करतात काय! केसरीचे संपादकत्व त्यांना सोडावयास लावणें हे माझ्या हातचे नव्हते. पण

मी फिरून मराठा हाती न घेणे ही गोष्ट तरी माझ्या हातची होतीच की नाही ? तिला ते काय करणार ? त्यांनी व त्यांच्या गटांतील मित्रांनी मला परोपरीने सांगून पाहिले. आणि माझे मन वळविण्याचा मार्ग सुलभ व्हावा म्हणून, भाऊ भाऊ वांटण्या करतात त्याप्रमाणे, त्यांनी मला आपण होऊन असे सांगितले की, "ऑफिसा-बाहेरचे राजकारण तुम्ही करा; तो वडीलकीचा मान मी तुम्हाला देतो; व फक्त केसरी लिहिण्याचे काम मी माझ्या हाती ठेवतो" पण प्रसगाचा फायदा घेऊन मी म्हणालो, "मी मराठ्यात एक लिहावे, तुम्ही केसरीत दुसरें लिहावें हे कसें चालेल ? लोकांना ते कसे आवडेल ? आणि या दोन पत्रांतला बेबनाव आम्हा-पेक्षा आमच्या पक्षांतील लोकानाच अधिक दुःसह होतो ! यामुळे तर पूर्वी, टिळक जाग्यावर असतां, एकदा सोडून दोनदा मराठ्याचा राजीनामा मी त्यांच्या हाती दिला हे तुम्हाला माहीत नाही काय ? अर्थात् मला नुसते बाहेरचे राज-कारण सोपवून दिल्याने भागणार नाही. तो वडीलकीचा मान मला खराच द्यावयाचा असेल तर माझ्या बाहेरच्या धोरणाशी जुळेल असेच मी मराठ्यांत लिहीन जाईन. आणि वर्तमानपत्रांतील दुःसह बेबनाव टळावा म्हणून मराठ्यांत मी लिहीन त्या धोरणानेच तुम्ही केसरीत लिहीत गेले पाहिजे ! ही गोष्ट तुम्हाला मान्य आहे काय ? पूर्वी टिळक जातीनेच होते तेव्हां केसरीच्या घोड्यामागून मराठ्याच्या गाड्याने चालावे अशी स्थिती होती ते योग्यच होते. टिळक हे तुमचे माझे गुरु होते, पण तुम्ही आम्ही गुरुबंधु आहोत. म्हणून मला वडील-कीचा मान तुम्ही खराच देणार असाल तर आतां टिळक येईपर्यंत मराठ्याच्या गाड्यामागून केसरीच्या घोड्याने चालले पाहिजे हे ओघाने प्राप्त होते. ते तुम्हाला कबूल असेल तर होय म्हणा. मी मराठा पुनः हाती घेतो."

खाडिलकरांना मराठापत्राची गोणी इतकी जड वाटत होती की, माझ्या वरील प्रश्नालाहि त्यांनी होय असे उत्तर दिले ! पण या बाबतीत ते स्वतःचे धनी नव्हते. त्यांना दुसरे दोन धनी होते. एक त्यांचा स्वभाव व दुसरे त्यांच्या कंपूंतील लोक. शिवाय लवकरच अनुभवाहि पदोपदी असा येऊं लागला की, मी बाहेरगांवीं जाऊन कांही एक धोरणाने कांही करावे बोलावे तों इकडे खाडिलकर यांनी केसरीत असे कांही लिहून ठेवावे की माझे तोंड नेमके फुटावे! तात्पर्य, या स्वाभाविक अडचणी जसजशा अधिकाधिक दिसून येऊ लागल्या तसतसा मराठ्याचे डिक्लेरेशन न कर-ण्याचा माझा आग्रह अधिकाधिक सयुक्तिक ठरूं लागला. पण मग माझ्या

मागचा तगादा सुटण्याकरितां, व इंग्रजी मजकूर लिहिण्याविषयी खाडिलकरांची 'सत्वपरीक्षा' न व्हावी म्हणून, मी त्यांना हळूच सुचविले की, "हवी तर मी एक गोष्ट करण्याला तयार आहे. ती अशी की, मी मराठ्याचा संपादक म्हणून डिक्लेरेशन न केले तरी यापुढे मराठ्यातील सर्व मजकूर पूर्वीप्रमाणे माझा मी लिहीत जाईन. त्याची तोशीस तुम्हाला लागू देणार नाही. पण घेईन तेव्हां केसरी व मराठा ही दोन्ही एकदम हाती घेईन, व ते घडत नाही तोपर्यंत नुसत्या मराठ्याचे मात्र डिक्लेरेशन मी करणार नाही!" तेव्हां शेवटी निरुपायाने पण बरेचसे निष्काळजी होऊन खाडिलकरांनी ती गोष्ट मान्य केली.

अशा रीतीने हा वाद त्या वेळेपुरता मिटला, व मराठा हाती घेण्याबद्दलचा माझ्या मागचा तगादा वांचला खरा. पण इतर रीतीने ही स्थिति मला समाधान वाटण्यासारखी नव्हती. का की, दोहोकडून सारखाच पेच होता. टिळक तुरुगांत गेले असतां त्याच्या पश्चात् आपले व खाडिलकराचे बनत नाही म्हणून सस्था सोडून जाणे मनाला कसेसेच वाटे. टिळक जाग्यावर असतां सोडून जाणे ही गोष्ट वेगळी होती. आणि कोणी जर असे म्हटले असते की, टिळकांनीच यांना जा म्हटले तर मजजवळ ते खोडून काढण्यासारखा भक्कम लेखी पुरावा होता. म्हणून मी संस्था सोडली ती केवळ स्वाभिमानबुद्धीने सोडली असे ठरले असते, व त्यांत मला फारसे दूषण आले नसते. असली सस्था सोडून बाहेर पडल्यावर माझे पुढे काय झाले असते हा प्रश्न वेगळा. पण मते जुळत नाहीत म्हणून टिळकांच्या समक्ष आपण होऊन सोडून गेल्यास नालायकीचा छाप डोक्यावर पडण्याची तरी भीति नव्हती. उलट टिळक तुरुंगात गेले असतां संस्था सोडणे हे लोकांच्या दृष्टीने मला खाचित कमीपणाचे झाले असते.

इतक्यांत एक संधि अशी आली की असला कमीपणा पदरी न घेतां सस्था सोडून जाता येईल. ती संधि अशी की, मुंबईस टिळकांच्या खटल्यापूर्वी काढण्याचे योजिलेले व टिळकांना शिक्षा होतांच सुरू झालेले आमच्या पक्षाचे दैनिक पत्र 'राष्ट्रमत' हे त्याच्या चालकांच्या भांडणामुळे डबघाईस आलें होते. हे चालक म्हणजे सिताराम केशव दामले, गणेश बळवंत मोडक व सरदेसाई. यापैकी पहिला भोळा सांब व दुसरे दोघे कूट कारस्थानें करणारे. यामुळे वर्तमानपत्राच्या कचेरीत मासलेवाईक चमत्कार रोज घडत. बिचाऱ्या दामल्यांनी ही कारस्थाने झेपत नाहींत म्हणून आपण होऊन अंग काढून घेतले! पण वर्तमानपत्राच्या कंपनीच्या

डायरेक्टरांना ते या इतर दोघांच्या हाती देण्याची इच्छा नव्हती. यामुळे चिंतामणराव वैद्यप्रभृति डायरेक्टरांनी मला मुंबईस बोलावून नेले, व " हे टिळकांचेच पत्र आहे तरी तुम्ही ते चालवा " अशी मला गळ घातली. पुण्यांतील असमाधानकारक स्थिति, आणि स्वतत्र दैनिकपत्र हाती असल्यास आपली मते लोकांपुढे मांडण्याविषयी होणारी सहज सोय, यांचा विचार मनांत येऊन मी होय म्हटले. आणि फक्त पुण्यास येऊन धोडोपत विद्वास यांची समति घेऊन दोन दिवसांनी मुंबईस जावे व राष्ट्रमत हाती घ्यावे असे मी योजिले. मौज ही की, पुण्यास येऊन खाडिलकर याना विचारतां त्यांनी रुकार दिला ! !

पण धोडोपंतापाशी ही गोष्ट काढतांच त्यांनी त्रागा आरंभिला. ते मला म्हणाले, "मी आज येथे फक्त तुमच्या आधारावर उभा आहे असे समजा. कारण एक दोन हितशत्रूंनी, टिळकांचे चिरंजीव हाती धरून, त्याच्यामार्फत खरी खोटी गाऱ्हाणी टिळकाच्या कुटुंबापर्यंत नेऊन घरात सर्वांची मने मजविषयी कलुषित करण्याचा घाट घातला आहे. नानासाहेब देशमुख हे विचारी गृहस्थ. परतु त्याच्याहि डोक्यात कांही गैरसमजुतीच्या गोष्टी या लोकांनी भरवून दिल्या आहेत. बरे, इकडे केसरी-मराठ्याच्या कचेरीत पाहवे तर खाडिलकराच्या स्वभावाशी माझे एक दिवसहि पटावयाचे नाही. त्यांचा तापटपणा, अपमानास्पद टाकून बोलण्याची पद्धति, सोय-गैरसोय न पाहण्याची प्रवृत्ति, या सर्व गोष्टी मी कशातरी सोसून दिवस काढीत आहे. तुम्ही येथे आहा म्हणून जिवाची गोष्ट बोलण्याला थोडी जागा तरी आहे. चित्रशाळेतून घरचा व केसरीचा कारभार काढून घेऊन तो मी घरी आणला तो बळवतरावांच्या मनांत नसताना आणला, अशा समजुतीने वासुदेवराव जोशांसारख्या तिऱ्हाइत मित्राचा राग मजवर आधीच झाला आहे. दर महिन्यास बळवतरावांना पत्र लिहावयाचें काम व्यवस्थित झाले पाहिजे. खाडिलकराच्या हातून ती गोष्ट मला हवी तशी सोईने करून घेतां येणार नाही. म्हणून काय वाटेल ते झाले तरी मी तुम्हाला येथून जाऊं देणार नाही. हवे तर मराठ्याचे संपादक व्हा अगर होऊं नका. वाटेल ते लिहा अगर लिहू नका. तुम्ही कचेरीत येऊन बसत जा, व तुमचा पगार पूर्वीप्रमाणें पोचविण्याची जबाबदारी मजकडे लागली. या विषयी उद्यां टिळक परत आल्यावर कांही म्हणाले तर त्याचा जाब मी त्यांना देईन. शिवाय मुंबईस तुम्ही गेलां तर आगीतून निघून फोपाट्यांत पडल्यासारखे तुम्हाला होईल. तेथील कारस्थानी लोक तुमच्याशी जरा बिनसले की दामल्यां-

प्रमाणे तुम्हाला त्रास देऊं लागतील. तुमच्या सारख्या सरळ स्वभावाच्या मनुष्याचे तेथे राष्ट्रमतांत काम नाही. आणि सर्व गोष्टीतली गोष्ट अशी की, तुम्ही टिळकांना पत्र लिहून केसरी संस्था सोडून जाण्याला परवानगी त्याची घेतली नाही.''

हा सर्व युक्तिवाद मला बिनतोड वाटला. धोंडोपताना विचारल्याशिवाय मी मुंबईस जाऊन राष्ट्रमत हाती घेण्याचे कबूल केले ही खरोखरच माझी चूक झाली, असे वाटून "मी येऊ शकत नाही" असे तिकडे मुबईच्या लोकांस कळविले. पण पुण्यास पडलेल्या बिकट खोड्यातून पाय काढण्याची ही एक संधि अशी गेली हे पाहून, मी हा खोडा जागच्या जागीच कसा उकलावा याचा अधिक काळजीने विचार करू लागलो. आणि "टिळकाना पत्र लिहून विचारल्याशिवाय जाणे बरे नव्हे" असे जे धोंडोपतानी म्हटले त्यातूनच मला दुसरी एक कल्पना सुचली. टिळकाची शिक्षा वर्ष सहा महिन्याची असती तर गोष्ट वेगळी. तेव्हा अशा कुचंबणेच्या स्थितीत पांच वर्षे काढण्यापेक्षा, टिळकानाच पत्र लिहून येथे पायात पडलेला खोडा तरी काढावा, व ते न होईल तर मग मला संस्था सोडून जाण्याला सरळ मनाने परवानगी द्या असे लिहावे असे मी ठरविले. धोंडोपताची या गोष्टीला संमति मिळाली. तेव्हां ते पुढच्या खेपेस ब्रह्मदेशात जाऊन टिळकाना भेटणार त्यावेळी मी एक खाजगी पत्र टिळकांना द्यावे, व इतर खुलासेवार मजकूर तशी संधि मिळाल्यास धोंडोपंतांनी तोंडी सांगावा, अशी योजना करून ते निघाले तेव्हा त्याचेजवळ मी पत्र दिले. "हा वाद मी पुण्याहून इतका लांब तुरुंगात नेऊन पडलो तरी मला सोडीत नाही" या विचाराने टिळकांना थोडे वाईट वाटेल हे मी जाणून होतो. तसेच खाडिलकर याचे केसरीचे डिक्लेरेशन असतां त्यांना ते सोडून द्या म्हणून सांगणे टिळकांना फार अवघड वाटेल हेहि मी जाणून होतो. म्हणून मी माझ्या पत्राचा झोक असा ठेवला की, खाडिलकरानी केसरी सोडण्याहून दुसराहि एक मार्ग अडचणीतून निघू शकेल व तो असा—( १ ) खाडिलकरांनी केसरी सोडल्यास तो हाती घेऊन चालविण्याची माझी इच्छा आहे व उमेद आहे. केसरीच्या नोकरीत वडीलपणाचा मान मजकडे आहे. १८९७ साली ते व मी दोघेहि उपसपादक असतां, व मजपेक्षा खाडिलकरच केसरीत अधिक लिहीत असतां, दोन्ही पत्रांचें डिक्लेरेशन माझ्याच नांवाने सर्वानुमते करण्यांत आले होते. व त्या योजनेला तुम्हीहि मान्यता दिलीत. आतां आज फिरून तोच प्रसंग आला आहे, व मी दोन्ही पत्रे हाती घेण्याची मागणी करीत आहे. तर ती मला कां न

मिळावी ? ( २ ) हे नको असेल तर मी नुसत्या मराठ्याचें डिक्लेरेशन करण्याला तयार आहे. पण मराठ्याने केसरीचा अनुयायी म्हणून राहण्याची गोष्ट मला पसंत नसल्यानें, मी पूर्वी दोन वेळां राजीनामा देण्यास निघालो हे तुम्हास माहीतच आहे. शिवाय तुम्ही आतां येथे नाही. म्हणून मी पूर्वी मागत होतों ती मोकळीक तुम्ही मला स्पष्ट शब्दानी द्यावी. तुम्ही मला असे लिहावे की "केसरीच्या अनुयायित्वाचे बंधन मी तुमचेवर आतां ठेवीत नाही. तुमच्या विवेकशक्तीवर तुमचा विश्वास आहे म्हणून, मराठ्यात काय लिहावे काय न लिहावे याविषयी निर्णय करण्याची मोकळीक मी तुम्हाला देतो" आणि तुम्ही मला असे लिहिले म्हणजे मग 'केसरीत असे कां व मराठ्यांत असे कां' असे म्हणणारांना मी परस्पर पाहून घेईन. ( ३ ) पण ही गोष्ट देखील तुम्हास मान्य नसल्यास फिरून अशी तोड सुचविती की मी कोणत्याच वर्तमानपत्राचा सपादक म्हणून रहाणार नाही. दोघाचेहि संपादक खाडिलकरांनी रहावे. मग मला मनाला पटेल ते हवे तितके मी दोन्ही पत्रांत लिहीन आणि जबाबदार संपादक म्हणून खाडिलकर यांनी काय वाटेल ते लिहावे. असे झाले असतां खाडिलकर व मी दोघेहि सस्थेत राहू. आणि दोन्ही पत्रांत जी एकतानता असावी असा तुमचा स्वाभाविक आग्रह तोहि साधेल. पण सस्थेत तर रहाच, मराठ्याचे संपादक तर व्हाच, आणि केसरीत खाडिलकर लिहितील तसेच मराठ्यांत लिहा, असा तिहेरी आग्रह तुम्ही म्हणाल तर मात्र मला स्वच्छ नकार द्यावा लागेल."

सन १९०९ च्या मे महिन्यापासून मडाले येथे टिळकांना दर महिन्यास इकडून पत्रे जात, त्यांत ही गोष्ट मी थोडथोडी सुचवीतच असे. पण धोंडोपंतांजवळ दिलेल्या पत्रांत सर्व खुलासा स्पष्टच केला होता. माझे पत्र वाचून व धोंडोपंतांकडून तोंडी हकीकत ऐकून टिळक बरेच बुचकळ्यांत पडले; व शेवटी त्यांनी स्वदस्तुरचे एक खासगी पत्र लिहून मला देण्याकरितां धोंडोपंताजवळ दिले. त्यात मला हवी तशी कबुली जरी टिळकांनी स्पष्ट शब्दांत दिली नव्हती, तरी निदान मला जी पडत्या फळाची आज्ञा हवी होती तेवढी मिळाली, व तिच्या आधारावर मी आपले कार्य करून घेतले.

टिळकांचे पत्र ता. २१ ऑगस्ट १९०९ चे असून त्यांत खालील आशय आहे:—"धोंडोपंतांच्या मागच्या पत्रांत वर्तमानपत्रासंबंधाने मला कांही प्रश्न तुम्ही विचारले आहेत ते वाचून मला फार आश्चर्य वाटलें. कोणत्याहि वर्तमानपत्राच्या

धोरणांत सुसंगतता किंवा अखंडपणा रहाणे ही मुख्य गोष्ट असते. तिच्यावरच मुख्य लक्ष द्यावे लागते आणि एखाद्या वर्तमानपत्राचा संपादक काही काळ आपल्या जागेवरून दूर असला तर ही गोष्ट विशेषेकरून संभाळावी लागते. ती सभाळाव-याची तर आपल्या वर्तमानपत्रासबधाने खालील गोष्टी होणे अवश्य दिसते. ( १ ) केसरीतील बराचसा मजकूर खाडिलकर यानी लिहावा. ते आज पुष्कळ वर्षे त्या पत्राकरितां लेख लिहीत आले आहेत म्हणून त्यांचा केसरीशी त्यांतल्या त्यांत अधिक निकट सबध सहजच येतो. ( २ ) त्याच कारणाकरिता मराठ्यातील पुष्कळसा मजकूर तुम्हीच लिहिला पाहिजे. एरवी मराठ्याचे धोरण सुसगत रहाणार नाही. (३) दोन्ही वर्तमानपत्रे शब्दशः किंवा ततोतत एकच विचाराची न दिसली तरी चालतील. परतु समातर रीतीनें का होईना, त्याची गति एकाच दिशेकडे असली पाहिजे. या तिन्ही गोष्टी साधणे यातच आपल्या संस्थेचे आज हित आहे.

"आतां मला हे समजते की जर या दोन पत्रांत लिहिणाऱ्या दोन निरनिराळ्या व्यक्ति आहेत तर या सर्व गोष्टी साधणे किंचित् अवघड होईल. पण यत्र-शास्त्राच्या दृष्टीने यात असबद्धता कांही नाही. यंत्रशाळेत ताजवे असेच करितात की त्यांनी सूक्ष्म फरक तर दाखवावेच, पण स्वतःचा काटा कायमचा ढळू देऊ नये व नित्य कर्तव्यापासून भ्रष्ट होऊ नये. या गोष्टी आपण आजवर करीतच आलो नाही काय ? एकत्र नीट नादलो नाही काय ? मग आताच अडचण का भासावी हे कळत नाही. पाश्चात्य राजकारणांत कॉन्झर्वेटिव्ह व लिबरल हे आपापल्या पक्षाची धोरणे काय वाटेल ते करून अखड अभंग ठेवतातच की नाही ? मग आपणहि तोच नियम का अनुसरू नये ? असो; या मुद्यावर मी येथून कितीसा युक्तिवाद करणार ? पण तुम्ही समजस आहां. संस्थेवर तुमचे प्रेम आहे. म्हणून तुम्हापुढे या गोष्टी मी विनतिरूप आग्रहाने माडतो. आणि मी ज्या अर्थी पुण्यास नाही त्या अर्थी तुम्ही माझी विनति अधिक मानाल याविषयी मला खात्री वाटते. तुम्हाला डिक्लेरेशनच पाहिजे असेल तर ते एका किंवा दोन्ही पत्रांचे वाटल्यास करा. फक्त वर लिहिलेल्या तीन गोष्टी संभाळल्या गेल्या म्हणजे झाले. कोणच्या वर्तमानपत्राचा संपादक कोण आहे हा मुख्य प्रश्न नसून वर्तमानपत्रे पूर्वीच्याच धोरणाने चांगली चालली आहेत की नाही इतकाच प्रश्न आहे. ती गोष्ट साधली म्हणजे मग बाकी तुम्हाला आपआपसांत वाटेल ते वाटेल तसे करा. तुम्ही कराल ती योजना मला मान्य आहे.

" पण तुम्ही आम्हाला व आमच्या संस्थेला सोडून जाऊ नये. याविषयी तुम्हाला ईश्वराचीच शपथ आहे ! तुम्ही सोडून जाणे याहून अधिक दुःखद गोष्ट मला दुसरी वाटत नाही मी झालो तरी असाच कांही तुरुंगात कुजून मरत नाही. केव्हा तरी बाहेर येईनच. आणि मी फिरून तुम्हा मंडळीत येऊन मिसळलो म्हणजे सर्व कांही पूर्वीप्रमाणे ठीक होईल. पण मी आज तेथे नाही तेव्हां वरील गोष्टी संभाळून वर्तमानपत्रे चालणे, व त्यांच्या कामगिरीत कोणत्याहि प्रकारची हानि न होता ती सुरळीत चालणे याविषयी दक्षता ठेवणे, हे वडीलकीच्या मानाने आतां तुमच्याकडेच ओघाने येत आहे. आता माझ्याजागी तुम्ही क्रमाने आलां आहा. आणि तुम्हाला वर्तमानपत्राच्या कामांतील अडचणी सहजच कळून आल्या आहेत. पण तुमची कार्यकुशलता, तुमचा अनुभव, आणि तुमचा चांगुलपणा या गुणामुळे तुम्ही त्या सर्व अडचणीतून निभावून जाल याविषयी मला खात्री वाटते. तुम्हाला वाटेल तर हे माझे पत्र खाडिलकर याना दाखवा, व माझी विनति म्हणून त्यांना म्हणा की " आपण दोघे मिळून खऱ्या मनाच्या सहकारितेने काम करूं या." कारण वेळ मोठी आणीबाणीची आहे व यावेळी आपसात फूट होणे चांगले नाही.

"केसरी आपल्याच नावावर रहावा असे खाडिलकर यांना कां वाटत असावे याची मला कल्पना होते. कारण केसरीवर एकदां सोडून दोनदा जे खटले झाले त्यांतील लेखांबद्दल खरोखर कोण जबाबदार आहे हे त्यांचे त्यांना माहीत आहे. पण केसरी आपल्या नांवाने व्हावा, व आपण त्याचे डिक्लेरेशन करावे, अशी तुमची आस्थेवाईक आग्रहाची मागणी आहे असे त्यांना कळल्यावर त्यांनी तुमच्या इच्छेप्रमाणे करावयास पाहिजे होते. कारण केसरीचे संपादक तुम्ही झालां तरी पुष्कळसा मजकूर खाडिलकरच लिहिणार म्हणून जुन्या धोरणांत खंड पडण्याची फारशी भीति नाही. तात्पर्य, तुम्ही दोघे मनाने अधिक जवळ या व एकमेकांविषयी अधिक समजुतीने घ्या, म्हणजे काम होईल. किंवा मी तिसरीहि एक तोड सुचवितो ती अशी की, तुम्ही व खाडिलकर यांनी कोणत्याच पत्राचे डिक्लेरेशन करूं नये. केसरी रा. लिमये यांच्या नांवाने काढावा आणि तुमचे हल्लीचे असिस्टंट

रामभाऊ जोशी यांचे डिक्लेरेशन मराठ्याचे करावे. कारण मला इतकेच पाहिजे कीं केसरीत अधिक मजकूर खाडिलकरांनी व मराठ्यांत अधिक मजकूर तुम्ही लिहावा. कोणत्याहि एका पत्राने दुसऱ्याचे अनुयायी होऊ नये तर दोघांनी मिळून एकच व ते पूर्वीचे धोरण ठेवावे. शेवटी तुम्हा दोघांना मी फिरून 'अपील' करतो आणि त्यातल्या त्यात तुम्हाला. कारण तुम्हा दोघांत तुम्हीच वडील आहांत. याहून अधिक कांही लिहिण्याचे कारण नाही व लिहिण्यासारखेहि नाही."

केसरी माझ्या नांवे करण्याची माझी इच्छा आहे असे मी खाडिलकर यांना पूर्वी दर्शविले होते. त्यावर त्यानी असे उत्तर दिले होते की दोन्ही वर्तमान-पत्रे टिळकांची आहेत तेव्हां ते सांगतील त्याप्रमाणे आपण करू. मग मी त्यांना म्हटले की "माझे म्हणणे त्याच्यापुढे गेल्याशिवाय टिळक तरी काय सांगणार ? म्हणून ही हकीकत मी त्यांना पत्रद्वारे कळविणार आहे." या गोष्टीला खाडिल-कर याना हरकत घेतां येत नव्हती आणि त्यानी ती घेतलीहि नाही. नतर मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे १९०९ च्या मे जूनच्या सुमारास धोंडोपताच्या नावे जाणाऱ्या एका पत्रांत ही गोष्ट टिळकाना कळविली. व त्याला जेव्हां हल्लीचे हें उत्तर आले तेव्हां मी ते खाडिलकर यांना दाखविले, आणि म्हणालो की "माझ्या मनास येईल तर केसरीचे डिक्लेरेशन करण्याला टिळकांनी या पत्रात मला अनुज्ञा दिली आहे. तेव्हां तुमचा विचार काय आहे तो कळवावा." तेव्हां खाडिलकर म्हणाले की "त्याला आतां माझी हरकत नाही. या वर्षाअखेर ती गोष्ट आपण करूं."

अशा रीतीने वाद मिटल्यावर आमची कामे पूर्ववत् सुरू झाली. म्हणजे दोन्ही पत्रांचे डिक्लेरेशन खाडिलकर यांच्या नावचेच राहिले, पण मराठ्याचा सर्व मजकूर उपसंपादक रा. रामभाऊ जोशी यांच्या सहाय्याने मी लिहू लागलो. इतकेच काय, पण त्या वर्षी आयर्लंडच्या इतिहासावरचे सुमारे बारा तेरा लेख मी अग्रलेख म्हणून केसरीत लिहिले. माझा हेतु इतकाच होता की कोण-त्याहि पत्राचे काम अडूं द्यावयाचे नाही. दोन्ही पत्रांत वेळ पडल्यास मजकूर हवा तितका लिहावयाचा. पण अट इतकीच की डिक्लेरेशन करावयाचे तर केसरीचे करून मराठ्याचे करावयाचे ! नाही तर कोणत्याच पत्राचे कराव-याचे नाही. अखेर हा माझा हेतू सिद्धीस गेला. त्याला कारण टिळकाची अनुज्ञा हे तर एक होते, पण इतरहि कांही कारणे तशींच घडलीं.

गोपाळराव गोखले यांच्यासबधी बदनामीचा कहर झाला तेव्हा त्यांनी हिंदुपचावर अब्रूनुकसानीचा दिवाणी दावा लावून तो जिकला, व त्याचे तोड बंद केले. पुण्यात सन्मित्रसमाज मेळ्याने अशीच बेअब्रूकारक पदे केली, म्हटली व छापली. त्यावर गोखले यांनी फौजदारी दावा केला. तेव्हां खाडिलकरांनी नेट दाखवून मुबईहून बॅरिस्टर बाप्टिस्टा यांना आरोपीच्या बचावाकरितां आणविलें. पण बॅरिस्टर दाखल होण्यापूर्वीच मेळ्याच्या पदाच्या प्रकाशकाने गोखले यांची सपशेल लेखी माफी मागितली ! त्यामुळे सर्व प्रकरण खाडिलकर यांच्या अंगलट आले. या प्रकरणांत मी तटस्थ होतो. म्हणजे गोखले याच्या निंदकाना माझी बिलकुल सहानुभूति नव्हती. मी उघडपणे या निदकांची निदा करी. यामुळें एकाच गायकवाड वाड्यात या बाबतीत दोन धोरणांचे भाडण लागले, व वर सांगितल्याप्रमाणे खाडिलकराच्या धोरणाचा पाडाव झाल्यामुळे त्यांना फजित व्हावे लागले.

१९०९ च्या अखेर नाशिक येथे जॅक्सनसाहेबांचा खून झाला, व तो कटाचा खटला इतका रगला की महाराष्ट्रातील सर्वच लोक गांगरून गेले. या स्थितीतच हिदुस्थानसरकार प्रेस ॲक्ट करणार अशी वदंता निघून वर्तमान-पत्रांना आपल्या आस्तित्वावर गदा येणार अशी भीति वाटू लागली. इतक्यांत कराराप्रमाणे १९०९ साल पुरे झाले. तेव्हां " आता ठरल्याप्रमाणे मी केसरीचें डिक्लेरेशन करणार " असे मी खाडिलकरांना रीतसर कळविले. खाडिलकरांच्या व माझ्या नव्या कराराप्रमाणे मी मॅजिस्ट्रेटकडे जाऊन मराठापत्राचे डिक्लेरेशन करून आलो, तेव्हां त्या कराराचा दुसरा भाग पुरा करण्याचा हक्क मला प्राप्तच झाला. आदल्या रविवारचा मराठा माझ्या नावाने निघाला हे पाहून मी करार पदरांत पाडून घेण्याच्या उद्योगाला लागलो हे खाडिलकरांना समजून चुकलेच होते. पण दोन दिवसांनी मी केसरीचे डिक्लेरेशन केले ही गोष्ट त्यांना केसरीची प्रुफे वाचतांना समजली. आम्ही सर्व जण प्रुफे वाचीत बसलो होतो; इतक्यांत आठव्या पानाच्या शेवटच्या कॉलमचे प्रुफ वर आले. त्यांत रीतीप्रमाणे जबाबदार संपाद-कांच्या डिक्लेरेशनचा उल्लेख असतो. तेथे खाडिलकर यांच्या जागी माझें नांव घातलेले त्यांच्या नजरेस आले. ते येतांच, विचू झाडून टाकावा किंवा हातावरून निखारा उडवावा त्याप्रमाणे खाडिलकर यांनी हातातले प्रुफ खाली टाकून दिले, व

डोक्याला रुमाल घालून ते जे एकदां जिना उतरले ते टिळक मंडालेहून परत पुण्यास येऊन दाखल होईपर्यंत फिरून केसरी कचेरीची पायरी चढले नाहीत !

अशा रीतीने हा प्रश्न कायमचा सुटला. कारण १९१० पासून पुढे टिळकांच्या मृत्यूपर्यंत केसरी माझ्या नावावर राहिला; व पुढे त्याच्या मृत्यूनतरहि मी मुद्दाम होऊन सोडीपर्यंत तो माझ्याच नावावर राहिला. मी टिळकाबरोबर विलायतेस जाण्याला निघालो तेव्हां माझ्याजागी केसरीवर सपादक म्हणून खाडिलकराचे नांव घालण्यांत आले. पण मी विलायतेहून परत आल्यावर पुनः स्थिरस्थावर झाले तेव्हां फिरून केसरीवर पूर्वीप्रमाणे माझेच नांव घालण्यांत येऊन टिळकानी आपल्याच हाताने केसरी माझ्या हाती दिला. अशा रीतीने केसरीचे सपादकत्व माझ्या हातीं सुमारे पंचवीस वर्षे सतत राहिले. मध्यंतरी १९२८ साली मी रजेवर होतो, आणि पुढे मी संपादक न राहातां फक्त संचालक म्हणून राहिलो, तरी अखेर हुकमत माझ्याच हाती राहिली. म्हणजे वीस वर्षे मराठ्याचा सपादक व पचवीस वर्षे केसरीचा संपादक अशी महत्वाची सजोड कामे मला केसरी-मराठा सस्थेतील एकेचाळीस वर्षांच्या नोकरीत करिता आली हे मी माझे सुदैव समजतो.

केसरी हाती घेण्याचा आग्रह मी धरिला व तो सिद्धीस गेला. पण दोन वर्गांचे लोक दोन निरनिराळ्या कारणाकरिता मी केसरी हाती घेण्याच्या विरुद्ध होते. एक खुद्द माझ्या स्नेह्यांचा वर्ग व दुसरा वर्ग माझ्या प्रतिपक्षीयांचा ! माझ्या मित्रांचे म्हणणे असे की "तुम्ही केसरी हाती घेऊन सुखाचा जीव निष्कारण दुःखांत घालीत आहांत. मराठा लिहिण्याचा तुम्हाला चांगला सराव झाला आहे. तुमचे लिहिणे इकडेच काय पण परप्रांतांतील लोकांनाहि आवडत आहे. अर्थात् केसरी हाती घेतल्यास मराठ्याकडे तुमचे दुर्लक्ष होईल, व तसे झालें असतां आज टिळकपक्षाची जी छाप मराठ्याच्याद्वारे इतर प्रांतांवर पडलेली आहे ती कमी होईल. कारण मतांप्रमाणेच परप्रांतांत इंग्रजी भाषेकडेहि पहातात, व तीं भाषा नीट साधली नाही तर मतांच्या उठावदारपणाला कमीपणा येतो. टिळक तुरुगांत असल्याकारणाने इतर प्रांतांचे लक्ष महाराष्ट्राकडे लागलेले आहे, व हें त्यांचे लक्ष वेधून ठेवण्याचे मराठा पत्र हे उत्तम साधन असल्यामुळे त्याच्यांत बिघाड होऊं देणे यांत टिळकपक्षाची एक प्रकारें हानीच आहे." त्याच मित्रांचे आणखी असेंहि म्हणणें की, "हल्लीं प्रेस ॲक्ट झाला आहे किंवा होणार आहे तो टळला

नाही. अशावेळी तुम्ही केसरी हाती घेतला, पहिल्याखेपेस त्याचा जामीन सरकाराने घेतला, व दुसऱ्या खेपेस तो त्यांनी बुडविला, तर तुमच्या पदरांत अपयश येईल ते विनाकारण कां घेता? ते खाडिलकर आहेत त्यांनाच तो आपल्या हाती ठेवूं द्या. कारण एरवी त्यांना जबाबदारी चांगली कळणार नाही. स्वतःच्या नांवचे डिक्लेरेशन असले म्हणजे लेखक जरा जपून लिहितो. आणि डिक्लेरेशन दुसऱ्याच्या नांवचे असले म्हणजे हाताला व लेखणीला मनाचे तितके बंधन राहात नाही. खाडिलकरांच्या लेखांवरून टिळकांना दोनदां शिक्षा झाली. उद्या केसरीबद्दल तुम्ही जबाबदार झाला, व खाडिलकर पूर्वीसारखे लिहीत राहिले तर फिरून तुमच्यावर तोच प्रसंग यावयाचा. मनुष्य लिहूनच गेला म्हणजे लेखाच्या प्रुफात फारशी छाटाछाट करतां येत नाही. एकमेकाची भीड पडते. शब्द काढून टाकूं न टाकूं असा भ्रम पडतो. न कळत बुद्धीशी वैर होते. आणि नंतर पश्चात्ताप तर होतोच, पण नसते वैर उत्पन्न होते. शिवाय गेल्या दोन तीन वर्षांत इतके तिखट लेख केसरीतून वाचण्याची लोकाना सवय लागली आहे की, तुमचे सारासारविचारयुक्त लिहिणे, मर्यादाबंद लिहिणे, हे त्यापुढे लोकाना मिळमिळीत वाटेल; व लोकाची अशी टीका ऐकूं येऊं लागली म्हणजे कदाचित् तुम्हालाहि स्वभाव सोडून तिखट लिहिण्याची बुद्धि होईल. तात्पर्य, दोन्ही प्रकारच्या कारणाकरिता तुम्ही केसरी हाती न घ्यावा व फक्त मराठाच ठेवावा हे उत्तम होय."

याच्या उलट प्रतिपक्षीयांची दृष्टि. पण म्हणणे तेच. आणि उलट बाजूची टोके केव्हां केव्हां एके ठिकाणी येऊन मिळतात ( Extremes meet ) हे कसे ते या ठिकाणी पहावयास सांपडले. प्रतिपक्षीयांचे म्हणणे असे की, "आज इतके दिवस टिळकांच्या हाताखाली शिक्षण घेऊन खाडिलकर केसरीशी एकजीव झाले आहेत, व त्यांना आतां ही एक संधि आपल्या नांवाने पुढे येण्याला मिळाली आहे. ती तुम्ही कां हिरावून घ्यावी? बरोबरीच्या लोकांत वडीलकीचा मान कसला? त्यांच्या हाती एक पत्र, तुमच्या हाती एक पत्र. तेव्हां ही वांटणी आपोआपच बरोबर होते. शिवाय मराठ्यांत लिहिण्याला तुम्हीच अधिक योग्य आहां. तेव्हां आहे त्याचा बिघाड करून फक्त वडीलकीचा मान सिद्धीस नेण्याकरितां तुम्ही केसरी घेण्याचा आग्रह धरूं नये. टिळकपक्षाच्या अंतरंगांतील भावना केसरीतून खाडिलकरांनाच अधिक उठावदार रीतीने मांडतां येतील. त्यांच्या लिहिण्यांत प्रतिपक्षाविषयी निष्ठुरपणा असावा तो आहे. तो तुमच्यांत नाही. तसेच खाडिल-

करांच्या लिहिण्यांत जो आवेशाचा आवेग असतो तो तुमच्या लिहिण्यांत नसतो. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की, खाडिलकरांचे डिक्लेरेशन टिळकांना शिक्षा झाल्याबरोबर पहिल्या तडाख्यांत होऊन गेले आहे. ते आतां बदलण्याचे काय कारण झाले ? असे लोक सहजच विचारणार; यामुळे ते बदलणे म्हणजे त्यांच्यावर निषेधार्थक किंवा निदाव्यजक शेरा मारण्यासारखे होते."

मौज ही की शत्रुमित्रांच्या भावना मजविषयी वेगवेगळ्या पण दोघांच्या म्हणण्याचा मथितार्थ एकच. म्हणजे मी केसरी हाती घेण्याच्या भानगडीत पडू नये ! पण माझे म्हणणे तिसरेच होते. वर प्रतिपक्षीयांचे म्हणणे संभाषणाच्या स्वरूपाने 'तुम्ही' हा शब्द घालून दिले आहे. परतु खरी गोष्ट अशी की, मला समक्ष त्यांच्यापैकी हे कोणी केव्हां बोलले नाही. त्यांना बोलण्याचा अधिकार नव्हता; व कोणी धिटाईने तसे बोलले तर अशांना झाडून टाकण्याचा माझा स्वभाव त्यांना माहीत होता. पण मला कोणी प्रत्यक्ष तसे बोलले नाही तरी त्यांची चर्चा कर्णोपकर्णी मला ऐकूं येत होती. मी मात्र असे केले की मुद्दाम संधि उकरून काढून प्रतिपक्षीयांशी वाद केला नाही. पण सहानुभूतिने मला नको म्हणणाऱ्या मित्रांशी समक्ष चर्चा करून माझे म्हणणे मी त्यांना समजावून सांगितले. मी त्यांना म्हणालो की "माझ्या आयुष्यांतील हा एक प्रसंग असा आहे की त्यावरून लोकच काय पण माझी मीहि परीक्षा करीन. कारण केसरी व मराठा ही भावंडे म्हटलीं तरी त्यांत सरस निरस ही गोष्ट सिद्ध आहेच. परप्रांतांत मराठाच तेवढा वाचला जातो म्हणून त्याला मान असेल. पण मला आधी आपल्या प्रांतांतील अब्रू मिळविली पाहिजे. नंतर परप्रांतांची गोष्ट. केसरी हा आपल्या पैशाने मराठा जगवितो. यामुळें मराठा हा उपजीवी व केसरीवर वाढलेल्या बांडगुळा-सारखा लोकांना वाटतो. म्हणून त्यांतल्या त्यांत जे मुख्य वर्तमानपत्र म्हणजे केसरी ते हाती घेण्याचा हक्क वडीलकीच्या नात्यामुळे जर मला आहे, तर तो मी कां बजावूं नये ? पूर्वी १८९७ साली खाडिलकर जाग्यावर असतां व लिहित असतां जर केसरीचा सपादक मला करण्यांत आले, तर आतांहि तसेंच करण्यांत खाडिल-करांनी आपला अपमान झाला असे कां मानावे ? मी संपादक असतां त्यांना लिहि-ण्याची हौस फेडून घेण्याची संधि तेव्हां मिळाली तशी ती आतांहि मिळेल. हल्ली खाडिलकरांचे डिक्लेरेशन झाले आहे ते अशा गडबडीच्या व संकटाच्या वेळीं झालें कीं, तेव्हां कोणी कोणताच आग्रह धरणे वाईट दिसले असते. म्हणून मी तो धरला

नाही. पण गोष्ट एखाद्या दुसऱ्या वर्षाची नाही. पुरी सहा वर्षे जावयाची आहेत. आणि आतां मी जर हक्क न बजावीन तर त्याला मी कायमचाच मुकेन. तेव्हां अशी पड खाऊन दुसऱ्याच्या तेजात लपून जाऊन मेलेले अन्न खात बसणे मला आवडणार नाही. मराठी लेखक या नात्याने माझी परीक्षा जरी पूर्वी लोकांना देण्याचा प्रसग फारसा आला नव्हता, तरी ती देण्याची धमक माझ्यामध्ये आहे. मी केसरी हाती घेतला तर चांगला चालवीन असा मला पूर्ण आत्मविश्वास वाटतो. आपल्या मतांचा अभिमान धरणाराहि मी आहे. भाषेचे धोरण कसे असावे याविषयी मतभेद होऊन मी टिळकांशीहि हुजत घातली आहे. आपल्या तत्त्वांचा आग्रह न सोडतां मराठ्याचे सपादकत्वच सोडण्यापर्यंत माझी तयारी होती. टिळकाचा जन्म आतां गेलाच म्हणावयाचा. पण माझा जन्म अजून जावयाचा आहे; व वर्तमानपत्राचे सपादकत्व हाच मी जन्माचा व्यवसाय व उद्योगधंदा करून बसलो आहे. तेव्हां आतां पड न खातां मी धिटाईने पुढे येऊन आपला हक्क बजावून केसरी हाती घ्यावा. भाषा व मते या सबंधाची आपली तत्त्वे लोकांना पटविण्याची, त्यांना शिकविण्याची, जी एक संधि प्राप्त झाली आहे ती मी गमावली तर मी नादान व कमकुवत ठरेन. जो काय सोक्षमोक्ष व्हावयाचा तो आतां यातच होवो. मी सपादक या नात्याच्या कर्तृत्वाच्या परीक्षेला लोकांपुढे उतरलो तर जगेन, न उतरलो तर मरेन. मजमध्ये मतांचा आवेश किंवा भाषेची तीव्रता नाही असे कोणी म्हणेल तर ती गोष्ट कमीपणा आणणारी आहे असे मला वाटत नाही. या गोष्टींची मर्यादा व योग्यायोग्यता ठरविण्याचा अधिकार जसा खाडिलकरांना हवा तसा तो मलाहि हवा आहे. मी आपले धोरण लोकांना पटवून दिले व यशस्वी केले तर माझे काम झाले. उद्यां टिळक आल्यावर ते काय वाटेल ते करोत. मी परीक्षेला न उतरलों तर टिळक परत आल्यावर आपोआप बाजूला सरेन. आणि मग ते स्वतः केसरीचे संपादक होतील किंवा वाटेल त्या दुसऱ्या कोणाला करतील. पण माझ्यामध्यें कर्तृत्व किंवा सामर्थ्य अमुक इतक्यापर्यंत आहे, मात्र त्यापलीकडे नाही, असेंच जर खरोखरी असले तर ते एकदां अशा जाहीर रीतीने सिद्ध झालेलें बरें. आपल्या आकांक्षा मनांत ठेवून 'झुरत', किंवा अहकाराने फुकट 'झुलत', गप्प बसावयाचें हें मला फार अवघड वाटतें."

तात्पर्य, अशा रीतीने मित्रांच्या मनाविरुद्ध, प्रतिपक्षीयांच्या इच्छेविरुद्ध, व कांही अंशी टिळकांना निर्णय करण्याच्या संकटांत घालून, केसरी हाती घेण्याच्या निर्धाराचे जे कृत्य मी तेव्हां केले, तितक्या निर्धाराचे कृत्य करण्याची दुसरी संधि मला माझ्या साऱ्या जन्मांत आली नाही ! माझा स्वभाव सामान्यतः आग्रही नाही. मग मला याच वेळीं इतका आग्रह कोठून सुचला सांगवत नाही. पण मराठ्याचा राजीनामा पूर्वी एक-दोन वेळां दिला तेव्हां संस्था कदाचित् सोडावी लागेल असा संभव दिसत असतां मी जर माघार घेतली नाही, तर टिळक तुरुगांत जाऊन संस्थेतील आम्ही इतर लोक समान दर्जाचे राहिल्यावर मी आपला आग्रह कसा न चालवीन ?

मौज ही वाटते की, १८९६साली घरच्या वडील माणसांना न विचारतां मी टिळकांकडे एकदम निघून आलों व सार्वजनिक कार्यांत पडलो, त्या वेळी तंतोतंत हीच विचारसरणी मी एका पत्रांत आपल्या वडील बंधूंना लिहून कळविली. ते पत्र या ग्रंथांत छापलेच आहे. आणि केसरीचा आग्रह धरतांना त्याच तत्त्वानुसार वागलो. ते पत्र आतां पुन्हां वाचल्यावर वाचकांच्या लक्षांत ही गोष्ट येईल कीं, तें माझे पूर्वीचे धोरणच आतांहि माझ्या उपयोगी पडले. " माझा अधिकारयोग " असा मथळा प्रस्तुत प्रकरणावर घातला आहे त्यांतील 'योग' शब्दाचा खुलासा या सर्व प्रकरणभर वाचकास पाहावयास मिळेल. तो योग १९१० साली मी साधला, पण तो बिघडण्यासारखे पुढ कांही मी घडूहि दिले नाही. माझ्या उत्कर्षात कांही गुण सोन्याचा तर कांही सोनाराचा असे जे मी अभिमानाने म्हणतो ते कां ते यावरून कळून येईल. मनुष्याने अयोग्य अभिमान धरू नये हे ठीकच आहे. पण स्वतःचा झाला म्हणून योग्य तोहि अभिमान न धरील तर तो मनुष्य कसला ? इतर पुष्कळ थोर लोकांच्या मानाने मी लहान, कमी बुद्धीचा, कमी कर्तृत्ववान् असेन व आहेहि. पण टिळकांच्या केसरीशी व टिळकांशी इतकी वर्षे अखंड सहवास मला लाभला, इतकेच नव्हे तर, केसरी संस्था इतकी वर्षे अबाधितपणे पूर्णाधिकारानें आपल्या हातीं मला ठेवतां आली, याहून माझ्यापुरतें पाहिलें तर अधिक यश व सुदैव ते आणखी कोणते ? आणि त्यामुळे माझ्या जन्माचें सार्थक झालें असे मी कां मानूं नये ? मजमध्यें महत्त्वाकांक्षा नव्हती हे खरे; पण होती हेंहि खरें नव्हे काय ?

# दशवार्षिक सिंहावलोकन ( १ )

## १८९९–१९०९

सन १८९९ साली टिळकानी केसरी आपल्या हाती घेतल्यानतर फिरून तो मजकडे १९१० साली कसा आला, आणि तो आल्याने केसरी सस्थेकडील माझे स्थान कसे स्थिर झाले, याची हकीकत एकत्र सुसगत देणे सोईचे म्हणून मी ती मागील प्रकरणांत देऊन पुरी केली आहे. तथापि १८९९ ते १९०९ या दहा वर्षांत मी जे इतर काही उद्योग केले त्याचीहि थोडीशी माहिती द्यावयास पाहिजे ती आता देतो.

**औरंगाबादच्या गमती**—ताईमहाराज प्रकरणाची सविस्तर हकीकत टिळक चरित्रांत मी दिलीच आहे. पण माझा विशेष सबध आलेली एक हकीकत थोडीशी देतो. ती औरगाबाद येथे या खटल्यांतील साक्षी घेण्याचे काम चालू होते त्याविषयी. पुण्याबाहेर एकाच गांवात टिळकांबरोबर माझा बरेच दिवस मुक्काम पडला तो सगळ्यांत अधिक औरंगाबाद येथे. निरनिराळ्या खेपा मिळून हा मुक्काम एकदरीने चारपाच महिने तरी भरेल. कमिशनचे काम औरगाबाद कॅटोन-मेट येथील एका ॲग्लो इडियन मॅजिस्ट्रेटपुढे चालू होते. औरंगाबाद हे निजामी राज्यांत मोडते. तथापि तेथील कॅटोन्मेटमध्ये इग्रज सरकारचा अधिकार चाले. या मॅजिस्ट्रेटला दिवाणी व फौजदारी असे दोन्ही अधिकार असत. त्याला या साक्षी घेण्याचा अधिकार देण्यांत आला होता. सरकारतर्फे बॅ. स्ट्रॅग्मन् हे काम चालवीत होते.

टिळकांतर्फे एक वकीलपत्र मजबरोबर तांबे वकील यांना होते. हेच तांबे वकील पुढे उमरावतीस वकिली करू लागले, नतर नागपूरच्या कायदे-मंडळांत निवडून आलेले सभासद व अध्यक्ष झाले. आणि त्यानंतर एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर आणि दैवाच्या बळावर शेवटी गव्हर्नरहि झाले. तांबे हे पुष्कळसे औरगाबादेस गैर-हजर असत. त्यांना कमिशनमध्ये फारसे काम नव्हते. पण आम्ही औरंगाबादेस नसूं तेव्हां या प्रकरणांतील कांही कामे मामुली स्वरूपाची करावी लागत. ती करण्यांत त्यांच्या वकिलपत्राचा उपयोग होई. साक्षी घेण्याचें बहुतेक काम टिळकांच्या पदव-

णुकीप्रमाणे व यशवंतराव कुलकर्णी यांच्या सूचनेप्रमाणे मीच करीत असे. मला उलट-तपासणी झेपण्यासारखी नसेल तेथे ते काम स्वतः टिळक करीत. स्ट्रॅंग्मन्साहेब आपले काम चांगले करीत. मात्र तोड टाकून एखादे वेळी बोलण्याची खोड त्यांना असल्यामुळे टिळक बसल्या बसल्या हलक्या आवाजाने त्यांना उत्तरे देतच, पण औपचारिक पद्धतीने उत्तरे देण्याचे काम मलाच करावे लागे. हे करतांना अर्थातच मला कायद्याच्या ज्ञानापेक्षां त्यांच्या स्वभावाच्या तापटपणाचा, आणि राग आल्यावर तोंडाला येईल ते बोलण्याच्या अवगुणाचा, भरपूर उपयोग करून घेतां येई. त्याप्रमाणे दोन तीन खटके मोठेच उडाले; व मॅजिस्ट्रेटच्या मध्यस्थीने स्ट्रॅंग्मन्च्या तोंडून निघालेले अपमानाचे शब्द मी परत घेवविले. कमिशनपुढील साक्षीच्या कामांत इतर कायद्यापेक्षा पुराव्याच्याच कायद्याचा उपयोग अधिक. आणि हा कायदा टिळकांनी लॉ क्लासांत शिकविला असल्यामुळे ते स्ट्रॅंग्मन् साहेबाच्या तोडीस तोड देत. ॲंग्लो इंडियन मॅजिस्ट्रेट पोक्त वयाचा आणि सभ्य व शांत स्वभावाचा सुदैवाने लाभला होता. यामुळे कमिशनच्या कामांत कांहीहि उणेपणा उरूं न देतां, किंवा जुलमी हरकती न होता, काम संपवून परत येतां आले.

ताईमहाराज खटल्यांत उभयपक्षी मुख्य भर तोंडी साक्षीपुराव्यावरच होता. आणि दत्तक-विधान औरंगाबादेस झालेले असल्यामुळे तेथलेच साक्षीदार पुष्कळ आणि तेच महत्त्वाचे असे तारतम्य सहजच प्राप्त झाले होते. या साक्षीच्या बळावरच टिळकांवरील सर्व दोषारोपांची मुक्तता झाली आणि दत्तकाचा दिवाणी दावा त्यांना प्रिव्हिकौन्सिलांत जिंकता आला. औरंगाबादच्या मुक्कामांत रात्रंदिवस एकत्र बैठक पडल्यामुळे टिळक हाती धरलेल्या कामी एकाग्र कसे होतात आणि मेहनत किती करतात याचा अनुभव मला प्रत्यक्ष आला. साक्षीदारांच्या सर-तपासण्यांचे सारांश तेच प्रथम योजून कारकुनाकडून लिहवीत, व त्या अनु-रोधाने कोर्टात मी जबान्या घेई या साक्षीच्या तयारीत निजामशाहीतील अस्सल जुन्या थाटाच्या अशिक्षित अर्धशिक्षित लोकांची खूप गम्मत पाहावयास सांपडली. हा लाभ मला मोठा झालासा वाटला. तात्पर्य माझे काम म्हटले म्हणजे उपाध्याच्या हाताखालीं वावरणाऱ्या खटपट्यासारखे होते. उपाध्या हाच धर्मकृत्य चालवितो; परंतु त्यांतील किरकोळ कामे करण्याकरितां उठाबशा काढण्याला, फुंक-णीनें होमाचा अग्नि फुंकायला, हाताखालीं खटपट्या लागतो. मात्र तो साधारण

इतक्या पात्रतेचा व शिक्षणाचा असतो की उपाध्या दमला किंवा त्याचा घसा बसला तर मंत्र म्हणण्यांत तो खळ पडूं न देईल. आणि तितकी पात्रता मला होती. आमच्या यशवंतराव कुलकर्ण्यांना फक्त इंग्रजी येत नाही आणि प्रत्यक्ष कायदा कळत नाही इतकेच. बाकी ते पुरे बॅरिस्टरच. या माझ्या म्हणण्यांत विनोद आहे पण विरोध नाही. कारण दिवाणी मुकद्दम्यांत अवांतर म्हणून करण्याचे जे काम किती तरी असते त्याची त्यांना पुरी माहिती. आणि ते त्यांत चूक करावयाचे नाहीत. नुसती मेहनतच नव्हे तर कारवाईहि करावयाचे व सुचवावयाचे. विशेषतः शिरस्तेदार कारकून यांच्यापर्यंत खाशाचा पल्ला पोचणे कठिण असते. तो पोचविण्याला ते अत्यंत उपयुक्त. शिवाय वेळ पडल्यास बॅरिस्टर किंवा मॅजिस्ट्रेट यांच्या इंग्रजी भाषणांतील कळतील तेवढे अर्धेमुर्धे मुद्दे घेऊनहि उत्तर देण्याइतके हजरजबाबी. यत्रशास्त्रांत 'युनिव्हर्सल जॉइंट' म्हणून एक प्रकारचा साधा असतो. तो आपल्या जागी पक्का खिळलेला, पण कामाप्रमाणे सोईप्रमाणे दाहीदिशांना तोंड फिरवून पडेल ते काम करणारा असा असतो. यशवतरावांना देण्याला ही उपमा समर्पक वाटते. बाबा महाराजाचे नोकर म्हणून त्याचा टिळकांशीं सबंध आला हे खरे, तथापि तो त्यानी टिळकाविषयीच्या आदरबुद्धीने पक्का केला. आणि ते जरी कोणी फर्डे अकौंटंट किंवा हिशेबतपासनीस नव्हते तरी टिळकांच्या पश्चात् जगन्नाथ महाराजाची नोकरी सोडल्यावर आम्ही त्यांना केसरीकडे घेतले ते विश्वासाच्या व निष्ठावंतपणाच्या गुणामुळे. ताईमहाराज खटल्यांत टिळकांच्या बरोबरीने चिंता वाहिली आणि श्रम केले ते एकट्या यशवंतरावांनीच. सांगितल्या कामाला त्यांनी नकार दिलेला मी केव्हांच ऐकलेला नाही. आणि ह्याडाचे कुलकर्णी म्हणून एखादे ठिकाणी टिळकाना न सुचणारी करामतहि त्यांनी केली. असो. औरंगाबादेहून जबान्या कागदपत्र यांच्या सहीशिक्क्याचा नकला आम्ही आणल्या त्याबरोबर तेथील कोर्टाचे आमचे सोहेरसुतक सपले. मॅजिस्टेटचे शिरस्तेदार निळकंठराव कर्वे म्हणून होते. पुण्यांतील शिक्षण प्रसारक मंडळीचे चिटणीस प्रो. कर्वे यांचे ते वडील होत. त्यांच्या मनांत टिळकांविषयी परम आदर असल्यामुळे, केवळ कर्तव्यांत चुकेल तितके वगळून, बाकी आम्हाला ते मनोभावाने मदत करीत.

औरंगाबादेस आमची राहण्या—जेवण्याची सर्व व्यवस्था एका क्लबाच्या जागेंत केली होती. औरंगाबादेच्या मुक्कामांत प्लेग आला तेव्हां झोंपड्यांतहि राहत होतो. सातारचे रा. ब. काळे यांचे वडीलबंधु गोविंदराव काळे,

शिक्षण तपासनीस, दोनशे रुपये पगाराचे, या क्लबाचे प्रमुख होते. त्याच्याबरोबर पुण्याचे रहिवासी श्रीधरपंत जोगळेकर हेहि एक होते. ते औरंगाबाद कॉलेजमध्ये गणिताचे प्रोफेसर असत. मूळचे न्यू इंग्लिश स्कूलचे विद्यार्थी. टिळकांचे कट्टे अभिमानी. औरंगाबादचे नाव प्रथम निघाल्याबरोबर टिळकाना श्रीधरपंतांची आठवण झाली. आणि टिळकांनी एका शब्दाने पत्र पाठवून त्याना जी मदत मागितली ती त्यांनी मरेपर्यंत दिली. दुर्दैवाने ताईमहाराज कमिशनचे काम चालू असताच मध्यतरी ते वारले. त्या क्लबाचे दुसरेहि दोन सभासद आठवतात. ते हरिरामशास्त्री व चुनीलाल. हे दोघे गुजराथी परतु पुरे महाराष्ट्रीय बनलेले. त्याच्याच घरात क्लब व त्यांतच आमची राहण्याची सोय केलेली होती हरिरामशास्त्री हे जुन्या पद्धतीचे शास्त्री इतके त्यांचे वर्णन केले म्हणजे त्यात सर्व आले. चुनीलाल याना मात्र अधिक तारतम्य होते. रा. सा. काळे हे मितभाषणी व किंचित् मान्यतेन वागणारे. याच्या उलट भिक्षुकीवळणाचे लघळ लोक व काही मासलेवाईक वकील तेथ भेटत. त्यांतील राळे चांगले आठवतात. पुण्यांतील रा. ब. राळे यांचे ते बधू. होस हो ठेवून देण्यात राळे मोठे पटाईत. पण त्याची साक्ष होत असता कसे काय निभावते या विचाराने टिळक थोडे चिताग्रस्त दिसत. गावची काही शास्त्रीमडळी येत व दत्तकाच्या वेळी सत्काराला ते हजर असल्यामुळे त्यांचाहि साक्षीला उपयोग झाला. त्यांतीलहि कोणी दगा देईल अशी भीति वाटे.

पण या सर्वापेक्षां अधिक स्मरणात राहणारी औरगाबादच्या मुक्कामांतील व्यक्ति म्हणजे पाध्ये या नांवाचे एक ड्रॉइंग मास्तर होते ते. त्यांच्या गप्पा अशा मजेशीर चालत की, त्यांच्या संगतीत तासनूतास घालविता यावे. मात्र ते जितके तडतड बोलत त्यापेक्षाहि अधिक खदखदा असत. निजामशाहीतील गमती त्यांनी आम्हाला सांगितल्या त्यांची सख्या शभरहि भरली असती. या गमतीतील फक्त एकच नमुनेवाईक म्हणून गोष्ट सागतो. इतरहि आठवतात पण विस्तारभय वाटते. गोष्ट अशी. हैद्राबादेमध्ये पिढीजाद, पण सगळ्या पिढ्याची बेअक्कल शेवटी ज्यांत उतरली असे, दोन बंधु उमराव होते. श्रीमंत होते. त्यांना एका वडिलार्जित रिकाम्या जागेवर नवा वाडा बाधण्याची इच्छा झाली. दोघानी आपापल्या अभिरुचीप्रमाणे योजनेचे नकाशे करवावे असे ठरविले. त्याप्रमाणे त्यांनी कोणाकडून करवून घेतले. शेवटी जागेवर जाऊन पक्का निश्चय करण्याची वेळ आली तेव्हां तेथ दोघांनी ते नकाशे उघडले; व ते एकमेकाला लावून पाहतां त्यांत

असे दिसून आले की एकाच्या नकाशांत ज्या ठिकाणी गोषाची व इतर पवित्र म्हणून मानलेली इमारत दाखविली होती तेथेच दुसऱ्याच्या नकाशात नक्की शौचकूप दाखविण्यात आला होता. हे पाहताच एक भाऊ खवळून कट्यार काढून उठला व दुसऱ्याच्या अगावर जाऊन म्हणाला "माझा जनानखाना म्हणजे शौचकूप आहे की काय?" पण दुसऱ्याहि नकाशांत तीच चूक उलट्या बाजूस झाली होती. तेव्हां "तूहि माझ्या गोषाचा अपमान केलास" म्हणून त्यानेहि कट्यार उपसली. अखेर कोणी तिऱ्हाईत शहाणा माणूस भेटला. त्याने ते नकाशे फाडून टाकले व 'आता ही जागा मोकळी आहे, यावर हवेतसे एकमेक मिळून बांधावयाचे ठरवा' असे म्हणाला

या गोष्टीत बेअकलीपणाचा पुरावा तर आहेच. पण दुसरा एक ध्वनि असा की, सुखवस्तु मनुष्याला कोणत्याही कामाकरिता जागेवरून उठून न जातां परक्याच्या बुद्धीने व परक्याच्या हातून काम करवून घेण्याची जडलेली सवय. पण हे मुसलमान उमरावच काय, आमच्या इकडील सरदार जहागिरदारांत ही खोड कोठे नाही? याचेहि प्रत्यतर आम्हाला तेथेच मिळाले. ते असे. महाराष्ट्रांतील कांही घराण्यांना निजामशाहीत उत्पन्नाचे गांव किंवा नेमणुकी असत त्या वसूल करण्याचे काम ज्या स्थानिक मुखत्याराकडे सोपविलेले असे त्याला वकील म्हणत. आणि वसूल करण्याचे उत्पन्न पन्नास पाऊणशे रुपयाचे असले तरी तो स्वतःला 'दरबार' समजून आपला 'वकील' नेमावयाचाच. आधीच मोगलाई कारभार. कचेरीच्या हातून वकिलाच्या हातात, आणि वकिलाच्या हातून दरबारच्या हातांत उत्पन्न पडताना वाटेत गळती किती होत असेल याची कल्पनाच करावी. हा महाराष्ट्रीयांचा प्रकार पाहून टिळकांना राग आला, व ते म्हणाले 'निजाम सरकार आमच्या या ऐदी लोकांची उत्पन्ने खालसा करील त्या दिवशी मी साखर वांटीन.'

**सातारची प्रांतिक परिषद**—१८९९ साली साताऱ्यास मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद भरली. तिला मी गेलो होतो, आणि त्या प्रसगी टिळकांचा एक हस्तक व अनुयायी म्हणून बरेच मेहनतीचे काम केले. मी सातारकर व पुणेकर या दोन्ही नात्यांनी वावरत होतो. या परिषदेला त्या वेळी फार महत्त्व होते, आणि मेथापक्ष व टिळकपक्ष यांच्यातला तो पहिला उघड सामना ठरला. म्हणून तिची थोडी हकीकत देतोः—

लॉर्ड हॅरिस यांच्याप्रमाणे लॉर्ड सॅढर्स्ट यांचीहि कारकीर्द लोकांना अत्यत अप्रिय झाली होती. तथापि पहिल्याप्रमाणे दुसऱ्याचेहि स्मारक करण्याची खटपट झालीच. आणि दोन्ही खटपटी प्रायः एकाच लोकांकडून झाल्या. मुंबईतील गोरे व्यापारी व पार्शी बॅरोनेट वगैरे मंडळी अशा कामांत पडली तर त्याना नांवे कोण ठेवील ! पण नारायणराव चंदावरकरासारखा एखादा प्रसिद्ध आणि लोकपक्षा-कडील म्हणविणारा गृहस्थ अशा चळवळीत सामील असला म्हणजे कोणालाहि सहजच विषाद वाटतो. असो. मूळ चालकाचा विचार स्मारकाला सार्वजनिक स्वरूप देण्याचा होता. परंतु खुद्द मुबईस वाच्छा, सेटलवाड, नारायणराव गोखले वगैरे लोकांनी विरोध केल्यामुळे त्याला खासगी स्वरूप देण्याचे ठरले.

स्मारकाला सार्वजनिक स्वरूप नाही म्हटले तरी गव्हर्नराच्या मित्रांनी व भक्तांनी खासगी स्वरूपांतच कां होईना पण स्मारकाच्या चळवळीला रंगरूप यावे असा प्रयत्न चालविला. फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत सुमारे चारशे लोकांची एक सभा भरवून चळवळीला सार्वजनिक स्वरूप देण्याचा प्रयत्न झाला. आणि अखेर मेथा वाच्छा सेटलवाड वगैरे लोकहि औपचारिक रीतीने सामील होऊ लागले. आतां ह्याहि बाबतीत मेथा ते मेथा, चदावरकर ते चंदावरकर, व भालचद्र ते भालचंद्र हा फरक दिसून आलाच. परंतु कॉग्रेसमध्ये लॉर्ड सॅढर्स्ट यांच्या अपकृत्यांचे दोषाविष्करण करणे, आणि इकडे त्यांच्या स्मारकाविषयी उपेक्षा-युक्त कां होईना पण सहानुभूति दर्शविणे, या परस्पर विरुद्ध गोष्टीमुळे कॉग्रेसवर परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाही असे टिळकांनी बजावले. केसरीवर खटला केला, म्हणून टिळक हे स्मारकाच्या विरुद्ध अशी व्यक्तिविषयक हेतुमीमांसा कांही लोकांनी या वेळी केली. पण डॉ. भालचंद्र यांना सर ही पदवी मिळाली, व चंदावरकर यांना हायकोर्टाच्या न्यायाधीशाची जागा मिळू घातली होती, म्हणून ते स्मारकाला अनुकूल होते असे त्याला प्रत्युत्तर सहजच देता येण्यासारखे होते.

लॉर्ड सॅढर्स्ट यांच्या स्मारकासंबंधीचा हा वाद आतापर्यंत पुण्यामुंबईत म्हणजे १२० मैलांच्या अंतरावर चालू होता. पण पुढे लवकरच म्हणजे मे महिन्यांत मुंबई प्रांतिक परिषद भरविली तेव्हां पुणेकर व मुंबईकर हे साताऱ्यास एकत्र आले. आणि त्यांच्यामध्यें मोठाच खटका उडाला. परिषदेचे अध्यक्षस्थान मुंबईचे प्रसिद्ध वकील गोकुळदास कहानदास पारेख यास देण्याचे ठरलें होतें. ही परिषद

कराची येथील परिषदेनतर आज चार वर्षांनी भरत होती. सातारकरांचे अत्यत आस्थेवाईक निमंत्रण होते. आणि चार वर्षांच्या अवधीत, बऱ्याच उलाढालीच्या गोष्टी, प्रांतांतील जनतेने एकत्र येऊन मत व्यक्त करण्यासारख्या, घडल्या होत्या. पण प्रतिपक्षीयांचे मर्म परस्परास माहीत ! पुढे होणाऱ्या सामन्याचे स्वप्न टिळकाना आगाऊ पडले असल्यास नवल नाही. परिषदेचे अध्यक्ष हे मुबई प्रेसिडेन्सी असोसिएशनच्या गटांतील असल्यामुळे त्यांच्या सन्मानार्थ व सहाय्यार्थ सदर असोसिएशनच्या गटांतली ही वर नावे लिहिलेली मडळी हजर असावी हे स्वाभाविकच होते. ना. मेथा याच्याकरिता आम्ही बगला गाडीघोडा इत्यादि व्यवस्था उत्कृष्ट केली होती. पण त्याचे येणे झाले नाही. पहिल्या दिवशी स्वागताध्यक्ष विठ्ठलराव पाठक यानी भाषण केले. त्यांत दुष्काळाची पीडा व ती निवारण्याचे उपाय या विषयावरच विशेष भर दिला होता. अध्यक्ष गोकुळदास पारेख यांनीहि याच विषयावर विशेष जोर दिला. कारण तो विषय त्याचा आवडता होता व त्यासबधी त्यानी अलीकडे परिश्रम चालविले होते. या भाषणानतर विषयनियामक कमिटीच्या नेमणुकीसबधी थोडासा लढा पडला ती कशी तरी निवडल्यावर निर्विवाद अशा विषयावरील ठरावांचे मसुदे पार पडले. पण लॉर्ड सँढर्स्ट यांच्या कारकीर्दीचा विषय निघाला तेव्हा एकदम रण माजले. मुख्य मुबईकर मडळीचे मत असे की या परिषदेत लॉर्ड सँढर्स्ट याचे नावहि बिलकूल काढू नये. या विचारसरणीस शक्य तितका मान देऊन प्रतिपक्षाने एक ठराव सुचविला. त्यात लॉर्ड सँढर्स्ट यांचे नांव अजिबात गाळले होते. पण त्यांच्या कारकीर्दीत घडलेल्या अनेक अप्रिय गोष्टीचा उल्लेख केला होता. याहि ठरावास मुंबईकरानी हरकत घेतली. त्याचे कारण असे की अशा मुग्ध ठरावानेहि म्हणे लॉर्ड सँढर्स्ट यांच्या नावाच्या ध्वनि निघतो ! यावर बराच वादविवाद झाला. शेवटी अध्यक्षांनी असा धाक घातला की जर हा ठराव परिषदेपुढे आणण्याचे निश्चित झाले तर आपण राजीनामा देऊ ! तेव्हां तो ठराव सुचविणाऱ्या गृहस्थाने ठरावापेक्षा अध्यक्षच आपणाला विशेष ग्राह्य असे सांगून ठराव मागे घेऊन वादविवाद सपविला. पण ठराव आणण्याचा अधिकार जो एकाला तोच इतरांना. शिवाय अध्यक्षांनी आपले अध्यक्षपद पणाला लावणे हा अधिकाराचा अतिक्रम होय असे पुष्कळांना वाटले. निरनिराळ्या बंगल्यावर प्रतिनिधी उतरले होते तेथें या विषयावर जोराचा वादविवाद सुरू झाला. उलट सुलट प्रयत्न होऊ लागले. सगळ्या रात्रींत कोणालाहि झोंप आली

नाही. एका बगल्यावरून दुसऱ्या बंगल्यावर, दुसऱ्याहून तिसऱ्यावर, अशा पुढारी मडळीच्या येरझारा सुरू झाल्या.

दुसरे दिवशी सकाळी परिषदेच्या कामाला सुरुवात होणार तोच अध्यक्षाच्या हाती दोन अर्ज देण्यांत आले. आणि कामास सुरुवात होण्यापूर्वी आधी त्यांचा निकाल देण्यांत यावा अशी विनति करण्यांत आली. एक तक्रार अशी होती की, विषय-नियामक मडळांत अध्यक्षांनी सभेला न विचारता आपल्या इच्छेने अनेक नवीन गृहस्थ घातले ती चूक दुरुस्त व्हावी. आणि दुसऱ्या अर्जात अशी विनति होती की, मुंबईसरकारच्या राज्यपद्धतींविषयींच्या कांही सूचना करणारा ठराव विषय-नियामक मडळात पसंत झाला नसला तरी तो स्वतत्रपणे प्रातिक परिषदेपुढे मांडण्याचा प्रतिनिधींना हक्क आहे, म्हणून तो पुढे मांडण्यास अध्यक्षांनी परवानगी द्यावी. या ठरावांतील मुख्य भाग असा होता की, "गेल्या कांही वर्षात मुबईसरकारच्या हातून काही गोष्टी घडल्या त्या, लोकांवर त्यांचा विश्वास नसल्यामुळे, त्याचा पाडाव करण्याच्या हेतूने सरकारने केलेल्या होत्या; याबद्दल प्रांतिक सभेस मोठी दिलगिरी वाटत आहे. आणि सभेची अशी प्रार्थना आहे की ही राज्यपद्धति बदलून त्या ठिकाणी लोकांवर विश्वास ठेवून त्यांच्या हिताकरिता झटण्याची इंग्रजी राज्याची जी उत्कृष्ट पद्धत आहे तिचा पुन्हा लवकरच स्वीकार करण्यांत यावा."

या दोन अर्जावर १२४ प्रतिनिधींच्या सह्या होत्या. आणि एकंदर प्रतिनिधींची सख्या १७५ ते १८० होती. हे लक्षांत घेतले म्हणजे परिषदेतील केवढे प्रचंड बहुमत त्या ठरावांना अनुकूल होते हे दिसून येईल. पण टेबलावर अर्ज पडताच अध्यक्ष गोकुळदास पारेख हे कावरे बावरे होऊन, आता अध्यक्षस्थान सोडून जातात की काय असा त्यांनी बहाणा केला. सभागृहातील चारहि बाजूंनी आरडाओरड सुरू झाली. मुंबईची मंडळी व त्यांच्या मताचे पुण्यातील कांही लोक यांनी आपल्या सख्येचे वैगुण्य इतर रीतींनी भरून काढले. सकीर्ण युद्ध सुरू झाले. बसलेल्या दोन दोन चार चार लोकांत बाचाबाच व आरडाओरड सुरू होऊन सभागृहाला मंडईचे किंवा गुजरीचे स्वरूप प्राप्त झाले.

बिचारी सातारकर मंडळी मोठ्या संकटांत पडली. कोणतीहि सभा आपल्या गांवी बोलावणाऱ्यांनी सभेंतील कोणत्याही पक्षाला आपलें पाठबळ देऊं नये, तटस्थ रहावें, असा शिष्टाचाराचा सामान्य नियम आहे. स्वागतमंडळापैकी कांही दुय्यम

प्रतींच्या गृहस्थाच्या सह्या ह्या ठरावाच्या अर्जावर होत्या. तथापि तटस्थपणाची जबाबदारी मुख्यतः सातारच्या पुढाऱ्यावरच होती आणि ती त्यानी फार चांगल्या रीतीने सभाळली. वादग्रस्त प्रश्नासंबधाने स्वतः त्याना काही मत नव्हते असे नाही. आणि उघड मत देण्याची वेळ येती तर त्याच्यातहि दुमत झालेले आढळून आले असते. परतु करंदीकर, महस्त्रबुद्धे, फणसळकर वगैरे गृहस्थानी मनाशी असे ठरविले की कसेहि करून परिषदेचे काम तडीस न्यावे. ती उधळली जाऊ नये. आणि या दृष्टीने त्यांनी दोन्ही पक्षांना सामोपचाराच्या गोष्टी सागितल्या. विरुद्ध बाजूच्या पक्षांत अर्थात् टिळक हेच प्रमुख होते. परतु हा सर्व प्रकार स्वतः टिळकांनी आणि त्याच्या अनुयायानी खुनशीपमाने चालविला आहे अशी काही लोकांनी समजूत करून घेतली असल्याने, या चळवळींत स्वतः टिळकानी पुढारीपण घेणे योग्य नव्हते. आणि ते त्यानी घेतलेहि नाही. परंतु खरा प्रश्न तत्वाचा असतो. वरील प्रकारच्या आरोपाच्या झुकांडीने फसून जाण्यासारखे आम्ही टिळकाचे अनुयायी नसल्यामुळे, आम्ही निरनिराळ्या कॅपातून हिडून वरील ठरावावर प्रतिनिधींच्या सह्या घेण्याचे काम मोठ्या मेहनतीने केले. या कामाला रात्रीचे काही तासच मिळणारे होते. कित्येक लोकानी सह्या करण्यापूर्वी अनेक बाजूनी वाद करून बारीक मोठ्या गोष्टीचा अगदी कीस काढला. यामुळे सह्या मिळविणाराना अलोचन जाग्रण झाले. तरी पण इतक्या सह्या मिळाल्या. सकाळी सात वाजता अध्यक्षाच्या टेबलावर ठराव मांडण्याची जय्यत तयारी झाली. ज्या मंडळीनी अर्जावर सह्या दिल्या त्यांतील बहुतेक परिषदेत हजर होते. मते घेण्याची वेळ आली असता काय होणार हे अध्यक्षांना दिसतच होते. म्हणून त्यांनी प्रथमपासूनच असा आग्रह धरला की, 'विषयनियामक मंडळीच्या बैठकीत ज्या ठरावांचा स्वीकार झाला नाही ते भर परिषदेत पुढे आणणे गैरशिस्त होय. म्हणून मी अर्जांना हातहि लावू इच्छित नाही.' पण भर परिषदेत असे ठराव मांडता येतात, आणि अर्जावरील प्रचंड बहुमत लक्षांत घेऊन तरी अध्यक्षांनी भलताच आग्रह धरू नये, असे विरुद्ध पक्षाचे म्हणणे होते. याचा निकाल कसा लावावा ?

टिळकांकडे या सकाळच्या बैठकीत एक ठराव मांडण्याकरितां देण्यांत आला होता तो त्यांनी मांडावा म्हणून अध्यक्षांनी प्रथम टिळकांना आज्ञा केली. ती मान्य करून टिळक बोलावयास उभे राहिले. अध्यक्षांना अशी आशा होती की, टिळकांना तरी बोलू देतील. दंडेली करणार नाहीत. पण टिळकांनी बोलणे हें

बहुमताला घातक होते म्हणून त्यानाच कोणी पुढे बोलू देईनात. शेवटी सभेचे काम अर्धा पाऊण तास मुद्दाम थाबविण्यात आले. हेतु हा की, मडळी खाजगी रीतीने बसल्यावर कोणी कांही तोड काढील. सभेला खासगी स्वरूप आल्यावर थोडी शातता आली खरीच. १८९१ सालचा दाखला अध्यक्ष आणि त्यांची स्नेहीमडळी याना प्रत्यक्ष कागदोपत्री दाखविण्यात आला तथापि अध्यक्ष आपला हेका सोडीनात. शेवटी टिळकांनी मध्ये पडन अशी तोड सुचविली की, "अध्यक्षानी ठराव आणण्यास परवानगी न दिली तरी चालेल; परंतु अर्ज सह्यानिशी उघड वाचून दाखवावा आणि तो दप्तरी ठेवण्याची गमति द्यावी. तसे झाले म्हणजे खुद्द ठराव पुढे माडण्याचा आग्रह कोणी धरू नये व नतर परिषदेचे काम पुढे चालावे." ही तोड सर्वसमत ठरली. त्याबरोबर विषयनियामक मंडळाच्या घटनेसबधी जो गैरकायदा प्रकार झाला होता तोहि दुरुस्त करून घेण्यात आला. आणि अशा रीतीने हे वादळ जागच्या जागी जिरले

नऊ वाजतां फिरून परिषदेचे काम सुरू झाले. पहिलाच ठराव टिळक यांनी मांडावयाचा होता तो त्यानी माडला. आणि मग अखेरपर्यंत सर्व काम सुव्यवस्थित व आनंदाने पार पडले. टिळकांच्या खटल्याबद्दल जरी सभेत ठराव नव्हता तरी नातूंच्या कैदेबद्दल ठराव होताच. आणि त्यावरील भाषणात मुंबई सरकारच्या धोरणाचा निषेध व्हावयाचा तो प्रत्यक्ष झालाच अशा रीतीने मुंबईकर व पुणेकर यांच्यांतील ही चकमक झडली. फेरोजशहा मेथा हे स्वतः हजर असते तर काय प्रकार घडला असता हे सांगता येत नाही. पण मेथा हे गोकुळदास पारेख यांच्या पेक्षा अधिक मानी व रागीट असले तरी यांच्यापेक्षा ते अधिक युक्तिवादीहि होते. ते समयज्ञहि होते. त्यांनी प्रथमच कांहीं शक्कल लढविली असती, वक्तृत्व करून लोकांच्या मनावर परिणाम केला असता, थट्टा केली असती, मस्करी केली असती, डोळे मिचकावले असते. लडिवाळपणाने हट्टी मुलाला वागवितात तसे खुद्द टिळकांना आपल्याजवळ बोलावून घेऊन बसविले असते, आणि त्यांच्याकडूनच आपल्या अनुयायांना शांत करविले असते. पण गोकुळदास यांच्यामध्ये वर सांगितल्या-प्रमाणे वृद्धपणाच्या गुणाहून दुसरा अधिक कांही गुण नसल्याने बखेडा माजला. मेथा यांनी नेहमीप्रमाणे आपल्या प्रभावळीतला मनुष्य परिषदेचा अध्यक्ष होण्यास पाठविला. पण तोहि असा पाठविला कीं ज्याला लोकांचा अनुनय करण्याची हातोटी बिलकुल नव्हती. टिळक तापट आहेत हे मेथा यांना प्रथमपासूनच

माहित होते. आणि या उभयतांच्या चकमकी पूर्वी घडल्याहि होत्या. पण तो प्रसंग व्यक्तिशः होता. साताऱ्यास उडलेल्या चकमकीत स्वतः मेथा हजर नव्हते. तथापि एका बाजूस त्यांचा बहुतेक कंपू, व दुसऱ्या बाजूस टिळकांचा कंपू म्हणजे नव्या वाढत्या राष्ट्रीय पक्षाचा कंपू, असा सामना होऊन पहिल्या कंपूचा मोड झाला. पण माझ्याकरिता एवढी गोष्ट मान्य करा असे गोकुळदास यांच्या तोंडून वदवून घेतल्यावर नव्याने जुन्याविषयी जी भावना ठेवणे योग्य तीच पुन्हा प्रस्थापित होऊन सभा पार पडली. मात्र साताऱची परिषद हा पुढे येणाऱ्या अशा अनेक प्रसंगाचा केवळ प्रारंभच होता.

या परिषदेच्या भावगर्डीत व वादात सातारकर मित्रांच्या मदतीने मी फार श्रम केले. सर्व रात्रभर जागून घरोघर हिंडून अध्यक्षाकडे द्यावयाच्या अर्जावर सह्या मिळविण्याचे काम मजकडे होते ते मी चांगले पार पाडले. परिषदेच्या जागी मेथापक्षीय अनेक लोकांशी, विशेषतः चिमणलाल सेटलवाड यांच्याशी, माझे बरेच खटके उडाले.

**कायदेकौन्सिलची निवडणूक**—१८९९ मुंबई कायदेकौन्सिलची निवडणूक पुन्हा उपस्थित झाली. मी साताऱ्याच्या ऋणानुबंधाचा म्हणून त्या जिल्ह्यातील कामावर टिळकांनी माझी नेमणूक केली. हे काम करण्यास मला मुख्यतः साताऱचे एक इनामदार तात्यासाहेब मुतालीक यांची मदत होती. पण साताऱचे पुढारी करंदीकर व सहस्रबुद्धे यांनी या निवडणुकीत गोपाळराव गोखले यांना साहाय्य करण्याचे वचन दिले असल्यामुळे त्यांची मदत व्हावी तशी झाली नाही. इतर काही जिल्ह्यांतून तसाच अनुभव आला. तुरुंगवासामुळे टिळकांची लोकप्रियता वाढली, तथापि त्याचमुळे सरकारचा ऋणानुबंध असणाऱ्या लोकांनी या वेळी सरकारच्या रागाची दहशत घेतली. शिवाय टिळक पूर्वी दोनदां निवडून आले, तेव्हां आतां गोखले यानाहि एक वेळ संधि कां मिळू नये असा प्राजळ युक्तिवादहि ऐकू येऊ लागला. तात्पर्य, या निवडणुकीत यश येणार नाही असे पाहून टिळकांनी आपण होऊन माघार घेतली. आणि गोखले हे निवडून आले. या संबंधांत साताऱचे दादासाहेब करंदीकर यांचे मला आलेलें पत्र येथे देतो त्यावरून त्या वेळची परिस्थिति लक्षांत येईल. हे पत्र असेः—

८ आक्टोबर, १८९९—"तुमचे ता. ३ चे पत्र पावले. बाब जराशी नाजूक आहे. आणि स्पष्ट बोलल्याने गैरसमज व्हावयाचा. तथापि तसा तो तुम्ही

करून घेणार नाही असे समजून आमचे कर्तव्य करतो. कौन्सिल निवडणुकीला उभे राहण्याचे टिळकांनी निश्चित ठरविले आहेच असे काही तुम्ही लिहिले नाही. त्यांच्या पुष्कळ स्नेहीमंडळीच्या मनात असे असावेसे दिसते की, शिक्षेमुळे टिळकांचे लोकांमधील वजन कमी झालेले नाही, व राष्ट्रीय कार्याच्या दृष्टीने टिळकांची निवडणूक हे सरकारला एक प्रकारचे आव्हानच आहे. म्हणूनच ते टिळकांना उभे रहा म्हणत असतील. पण आम्हाला मात्र तसे वाटत नाही. उलट टिळक उशिरा पुढे आल्याने, आणि ते उभे राहात नाहीत अशा समजुतीवर, गोखल्यांना ज्यांनी पूर्वीच आश्वासने देऊन ठेविली त्याची स्थिति अवघड केल्याने, टिळक निवडून न येता त्याच्या यशाला व्यर्थ धक्का मात्र बसावयाचा. तरी इतक्या उशिरा तुम्ही उभे राहू नये असे टिळकांना आमच्यातर्फे तुम्ही कळवावे. राहतील तर निवडणुकीला एकटे टिळकच उभे राहावे, म्हणजे निवडणूक नामंजूर करण्याला सरकारला जागाच राहू नये अशी आमची कल्पना. पण दोघे उभे राहिल्याने ती गोष्ट साधत नाही. सरकारी अधिकारी गोखल्यांच्या बाजूने खूप खटपट करणार. लोकांनीहि टिळकांना तितकीच जोराची मदत दिली असती. पण ते उशीरा पुढे आले. येथे विठ्ठलराव पाठक हे गोखल्याच्या करिता खटपट करीत आहेत. ते आम्हाला म्हणतात 'माफीशिवाय गोखल्यांच्या मार्गात दुसरी कांही तरी अडचण आहे काय?' विठ्ठलरावानाहि आम्ही उलट शह दिला असता. पण टिळक उशिरा पुढे आल्याने आमच्यात दुमत झाले आहे. कांहींना वाटते की लोकांचा आपणावर अशा रीतीने विश्वास आहे असे दाखविण्याची टिळकांना मुळीच जरूरी नाही. हे वाचून तुम्हाला कदाचित् असे वाटेल की टिळकांना मागे घेण्याला सांगून गोखल्याची निवडणूक बिनधोक करण्याचा आम्ही हा प्रयत्न करीत आहो. पण आम्हाला योग्य वाटते तेच लिहित आहो. त्याबद्दल गैरसमज करून घेऊ नका." ( र. पां. करदीकर, सातारा )

**रायगडचा उत्सव**—टिळक कैदेत जाण्यापूर्वी १८९६ साली रायगडावर पहिला उत्सव झाला होता. त्यानंतर टिळक सुटून आल्यावर झालेला उत्सव मोठ्या प्रमाणावर होता. तो फारच यशस्वी झाला. या उत्सवाला पुण्याहून आम्ही बरीच स्नेहीमंडळी बैलगाड्या करून भोर हिरडोशी वरंधा घाट या मार्गे महाडास गेलो. तेथून पाचाडच्या मार्गाने रायगडावर चढलो. या वेळी गडावरचा रस्ता फारच अडचणीचा होता. शेवटचा शे-दोनशे फूट रस्ता तर भयप्रद वाटे.

गडावर सर्व प्रकारचे कार्यक्रम झाले. रमणा झाला. मी एक वाढपी होऊन शेकडो पाने वाढली. हे पाहून मला अगमेहनतीबद्दल टिळकानी 'सर्टिफिकेट' दिले! दुसरे दिवशी सध्याकाळी आम्ही परत शिवरामपत परांजपे याच्या घरी आलो. त्या रात्री जेवण बिरवाडीस व्हावयाचे ठरले होते. पण गड उतरून दमून आलेली मडळी बिरवाडीस जाण्याला हलेचनात. पराजपे याच्या अगणातील माडवांत तणावून लोळत पडली होती. या स्थितीत ८।९ वाजले. मग बैलगाड्या निघाल्या त्या रेरे करीत बिरवाडीस बाहेरच्या देवळात रात्री दीड वाजता पोचल्या. मग तेथून वाजत्र्याच्या गर्दीत आणि उखळी बाराच्या धडाक्यांत टिळकाची मिरवणूक निघाली ती मुक्कामाच्या घरी अडीच वाजता पोचली. सुदैवाने स्नाने करण्याची ट्रम निघाली नाही म्हणून उजाडले नाही. पण सर्व मडळी पात्रावर येऊन बसून भोजन सुरू होण्यास पहाटेचे तीन वाजले. मेजवानीचा सर्व थाट यथास्थित होता. जेवणार सर्व मडळी मुकटे कद नेसून सोवळ्याने जेवीत होती. कपाळाला केशरी गध साखळीने लावण्यांत आले. वाढणार बायका पितांबर नेसून सर्व श्रृगार घालून वाढीत होत्या. जेवणाचे इतर पदार्थ निवाले होते. पण भात मात्र ऊन होता. अशा रीतीने पहाटे तीन साडेतीन वाजता झालेली ही मेजवानी माझ्या सगळ्या आयुष्यात एकच म्हणून ती चागलीच स्मरणात राहिली आहे.

**दोन महत्त्वाचीं बिलें**—१९०१ साली दोन महत्त्वाची बिले मुबई कौन्सिलापुढे आली. एक मुबई शहराबाहेरच्या म्युनिसिपालिट्यांच्या पुनर्घटनेचे, व दुसरे लॅड रेव्हेन्यु कोडाच्या दुरुस्तीचे. पहिल्याचा हेतू म्युनिसिपालिट्यांत लोकमताचा प्रवेश थोडा अधिक करावयाचा, त्याच्या माथी अवश्य खर्चाची अशी कांही खाती लादावयाची, आणि म्यु. च्या मुख्य अधिकाऱ्यांना अधिक स्वतंत्रता द्यावयाची असा होता. या बिलाविषयी फारसे रण माजले नाही. परंतु दुसरें बिल अधिक आक्षेपार्ह ठरले. या दुसऱ्या बिलाची योजना अशी होती की, जमिनीचे मालक सरकार असे प्रस्थापित करून काही कांही जमिनी सरकारला त्यांना वाटेल त्याला कांही शर्तीवर देण्याचा अधिकार राहावा. ती जमीन खुष खरेदीने विकतां येऊ नये किंवा सावकाराच्या कर्ज वसुलीकरितांहि विकली जाऊं नये. सरकारानें घातलेल्या अटी जोपर्यंत खातेदार पाळील तोंपर्यंत त्याने ती जमीन कसावी, पण कोणतीहि अट मोडतांच किंवा जमीन कसण्याची मुदत

संपतांच, कलेक्टरला ती जमीन त्याजकडन काढून घेतां यावी. या अटी मूळच्या सर्व्हे सेटलमेटच्या कायद्याच्या विरुद्ध होत्या. पूर्वी सर्व्हे आक्टाप्रमाणे जमिनीचे एकदा खाते झाले म्हणजे खातेदार जोपर्यंत ठरीव सारा देत राहील तोपर्यंत ती जमीन त्याजकडे वंशपरपराहि राही व ती त्याला विकताहि येई. पण नव्या कायद्याने काही बाबतीत तो हक्क काढून घेतला. हे नवे तत्त्व लागू करण्याला पडीक किंवा सरकारजमा झालेल्या जमिनी हव्या. अशा जमिनी पुष्कळच दुष्काळामुळे सरकाराच्या हाती आलेल्या होत्या, व त्यांच्यावर हा प्रयोग करण्यांत येणार होता. सर्व्हे खातेदाराचा मुख्य हक्क म्हणजे खात्याची जमीन वेळ पडल्यास मालकाप्रमाणे विकण्याचा. पण नवीन अटीवर दिलेल्या जमिनी खातेदारास विकता येणार नाहीत ! तसेच शेतजमीन शेतीखेरीज इतर कामाला कोणी लाविली तर बदलून सारा म्हणून नवीन प्रकारचा जमीनभाड्याचा कर तीवर बसणार. हल्ली बदलून साऱ्याचा जो धुमाकूळ माजला आहे व जुलूम चालू आहे त्याचे बीजारोपण याच बिलांत झाले !

मराठ्याचा सपादक व केसरीचा उपसपादक या नात्याने या दुसऱ्या बिलाच्या विरुद्ध चळवळीत मी थोडासा भाग टिळकाच्या प्रोत्साहनाने घेतला. याच चळवळीत मी प्रथम वसई पाहिली, व तेथे या बिलाविरुद्ध व्याख्यान दिले. म्युनिसिपल बिलाशी माझा सबंध पुणे म्यु.चा सभासद या नात्याने आला. त्या बिलाची छाननी करून त्यावर आपले मत सरकारकडे कळविण्याकरिता पुणे म्यु.ने एक पोट कमिटी नेमली होती. तिचा एक सभासद मी असून चर्चेत बराच भाग घेतला होता. तसेच मुबई येथे त्या साली, कराचीचे तैहलराम खेमचद यांच्या अध्यक्षतेखाली, अकरावी प्रातिक सभा भरली होती तीत एक ठराव म्यु. बिलासबंधाने पुढे आला होता त्याला अनुमोदन देऊन मी भाषण केले. या ठरावात असे म्हटले होते की, " म्यु.तून लोकनियुक्त सभासद ज्यास्त असावे या सबधाने कायद्यांत कांही स्पष्ट कलमे नसून, शिवाय म्यु.त अधिक सभासद नेमावयाचे त्यांत जातीचा विचार करण्याचे नवीन तत्त्व पुढे आले ते मान्य नाही." लोकनियुक्त सभासद असले तर म्यु.चे काम कसे चांगले होते याविषयी रा. सा. मंडलीक, याज्ञिक, वगैरेची उदाहरणे मी भाषणांत दिली होती.

**रँग्लर परांजपेः**—हे १९०० डिसेंबर अखेर मुंबईस व पुढच्या आठवड्यांत पुण्यास आले. त्या वेळी पुण्यांत प्लेग असल्यामुळे मी गांवाबाहेर बळवंतराव

परांजपे याच्या पडळीत राहात होतो. तेथेच काशिनाथपंत केळकर, पूर्वीचे माझे राजाराम कॉलेजातील अध्यापक, व या वेळी पुणे जिल्ह्याचे डे. ए. इन्स्पेक्टर हे राहात असत. त्याच्या माझ्या बोलण्यात रँगलर पराजप्याचा सत्कार करण्याची गोष्ट निघाली. पण हा सत्कार सुधारक नेमस्त पक्षाकडून होण्याची अपेक्षा स्वाभाविक होती. इन्स्पे. केळकर याचे स्नेही त्या पक्षात अनेक असल्याने त्यानी त्यांच्या जवळ ही गोष्ट काढून पाहिली पण ती मूळ धरीना तेव्हा ते मला म्हणाले, 'नरसोपत, तुम्ही मराठ्याचे सपादक म्हणून ही गोष्ट करणे योग्य होईल.' मी पूर्वी प्रिन्स रणजितसिंग याच्या सत्कारात पुढाकार घेतला होता. तो समारंभ मोठ्या प्रमाणांत होता. तो फर्ग्युसन कॉलेजच्या आवारात झाला व त्याला सर चार्लस ऑलिव्हंट यांच्यासारखे सरकारी एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलरहि आले होते. रँगलर पराजपे याचा सत्कार साधा पुण्याच्या स्टेशनावर व्हावयाचा होता. त्याची व्यवस्था मी केली. प्रो. कर्वे वगैरे मडळीहि त्याच्या बाजूची आली होती. परांजपे याच्या मनावर सनातनी पुण्याची छाप अजून होती. विशेषतः त्यांचे पालक प्रो० कर्वे व गुरु प्रो० गोखले यांच्या पोषाखाचा साधेपणा त्याच्या डोळ्यांत भरलेला असल्यामुळे, पराजपे मुबईस उतरताच त्यांनी पाटलोण टाकून देऊन धोतराचा आश्रय केला होता. आणि पुण्याच्या स्टेशनावर ते उतरले त एखाद्या नवऱ्या मुलाच्या थाटाने उतरले. म्हणजे धोतर नवे कोरे धुवट, पायातील पुणेरी जोडा नवा म्हणून लालभडक, आणि नवऱ्या मुलाची विशेष खूण म्हणजे डोक्याला न बसणारी व केवळ उपचार म्हणून घातलेली पगडी ! परांजपे याच्या धार्मिक मतांवर केसरीत अग्रलेख लिहून पुढे एकदा मी त्याची हजेरी घेतली. पण त्यांचा पुण्यास प्रथम सत्कार करण्यात मी प्रमुख होतो ही गोष्टहि खरी.

यासबधांत खालील पत्रावरून अधिक माहिती मिळेलः—

"रघुनाथ पुरुषोत्तम परांजप्यांच्या सन्मानाकरितां योग्य ती तजवीज नेमस्ताकडून झाली नाही याविषयी तुम्ही टीका केली ती वाचली. ती वाचून बरे वाटले. याविषयी तुमच्या पक्षाकडून होणारी खटपट अधिक चागली करा. येथे आम्ही सात हजार फंड जमविला. टिळकांना ही गोष्ट माहित आहे. हा फंड परदेशी विद्या शिकण्याला जाणाऱ्या हिंदु विद्यार्थ्यांकरितां आहे. हा फंड सह्य

निरनिराळ्या सिव्हिल सर्व्हिस परीक्षांकरितां आहे. परांजपे रँगलर होऊन परत आले या गोष्टीने या हिंदु एज्युकेशन फंडाच्या कल्पनेला विशेष उत्तेजन मिळण्यासारखे आहे. किंबहुना मी म्हणतो तसे झाले तरच परांजपे यांचे खरे अभिनंदन केले असे होईल. नुसते तोंडचे शब्द काय कामाचे ? या फंडा-संबंधाने जहाल मवाळ दोन्ही पक्षांत मतभेद दिसत नाही हे सुदैव म्हणावयाचे. महाराष्ट्रातील मोठ्या शहरांवर तुम्हा लोकांचे जितके वजन आहे तितके नेमस्त पक्षाचे नाही. पण त्या पक्षातला एखाद गृहस्थ अध्यक्ष होण्याला मिळाला तर चांगले होईल. इलाख्यांतील सर्व कॉलेजांकडून परांजप्यांचे अभिनंदन करून त्यांना एक सुंदर रुप्याची पेटी द्यावी अशा खटपटीत मी आहे. सिंध कॉलेजनेहि संमति पाठविली आहे. बहुधा न्या. मू. रानड्यांना सभेचे अध्यक्ष करूं आणि मेथा चंदावरकर यांना वक्ते म्हणून आणू. चिमणलाल सेटलवाड यांचीहि या कामी मदत आहे. याच प्रसंगाने सरकारमागेहि असे टुमणे लावू की १८६८ सालापासून, म्हणजे लॉर्ड लॉरेन्स यांच्या वेळेपासून, सरकारच्या मदतीने हिंदी विद्यार्थी पर-देशी पाठविण्याची योजना घाटत आहे ती आता तरी पुरी करावी. हल्ली लॉर्ड कर्झन यांचा प्रायव्हेट सेक्रेटरी कोणी एक लॉरेन्सच आहे ! एल्फिन्स्टन कॉलेजातील सभेनंतर फंडाची रकम जमविण्यास आम्ही जोराने लागू. मद्रासेतहि परांजप्यांच्या सत्काराचा ध्वनि उमटावा अशाविषयी मी सेटलूर यांजकडून खटपट करवीत आहे. ( बाळकृष्ण नारायण भाजेकर, हायकोर्ट वकील, मुंबई. )

परांजपे यांच्या सुयशाची वार्ता इकडे १९०० च्या ऑगष्टात आली तेव्हांच भाजेकर यांनी वरील पत्रांत उल्लेखिलेली उपयुक्त चळवळ सुरू केली. त्यानंतर चार महिन्यांनी परांजपे इकडे आले.

**मराठ्याचें रूपांतरः**—१९०२ साली टिळकांनी केसरीची पाने वाढविली. मात्र आकार तोच ठेवला. पुढच्या वर्षी मी मराठ्याचा आकार बदलून मोठा होता तो लहान करून त्याची पाने वाढविली. मराठ्याचा पूर्वीचा आकार साप्ताहिक पत्राच्या मानाने मोठा होता. म्हणून मुंबईतील इंग्रजी साप्ताहिकांचे धोरण डोळ्या-पुढे ठेऊन मी मराठ्याचा आकार लहान व सोयीचा असा केला. नव्या स्वरूपाचा पहिला मराठा निघण्याला एक चांगला योग आला तो दिल्ली येथील दरबाराचा. या विषयावरील माझा अग्रलेख फारच चांगला उतरला होता. आणि मुंबईहून प्रि. द. ग. पाध्ये, संपादक 'इंदुप्रकाश', यांनीं आपण होऊन त्याबद्दल मला शाबासकी

लिहून पाठविली होती. मराठ्याचा आकार बदलावयाला टिळक मनातून फारसे अनुकूल नव्हते. त्यांचे एक म्हणणे असे असे की वर्तमानपत्रांने आपले अंतरंग हवे तितके सुधारावे, त्याला मर्यादा नाही; पण आपले बहिरंग शीर्षक इत्यादि गोष्टी होता होईतो जशाच्या तशा राखाव्या. त्याच्या परंपरागतत्वामध्ये एक तऱ्हेचा सात्विक अभिमान असतो. याचे उदाहरण म्हणून त्यांनी मला लंडन टाईम्सचे दिले. तसेच पीअर्ससोपच्या वड्याच्या पेटीचे उदाहरणहि त्यांनी दिल्याचे स्मरते. ते म्हणाले, "हा श्रीमंताचा साबू. आतील वड्याची किंमत बरीच असते. तथापि पेटीवरील कागद, त्यावरील रेखाचित्रण, पन्नास वर्षापूर्वी होते तसेच्या तसे आज अगदी साधे आहे. यांतील प्रत्येक गोष्ट अधिक चित्ताकर्षक करण्याची कल्पना त्याच्या मालकाला काय सुचली नसेल ? पण नाही. जुने तेच सोने या म्हणीतहि कांही तथ्य आहे." पण मराठ्याचा जुना आकार फाइली बांधण्याला ठीक नव्हता. विलायतेत देखील साप्ताहिक वृत्तपत्राचा आकार फूलस्केपचाच असतो इत्यादि गोष्टी सांगून मी आकार लहान करून किंमत कमी करून आठ पानाचा मजकूर बारा पानांत बसविण्याचा आग्रह धरला तो टिळकांनी शेवटी चालू दिला. हा आकार परवापर्यंत तसाच होता.

**सभा व परिषदाः**—यापुढे ज्या राष्ट्रीय सभा, प्रांतिक परिषदा, इत्यादिकांना मी प्रत्यक्ष हजर होतो व प्रत्यक्ष कार्यात भाग घेतला व भाषणे केली त्यांची थोडीशी हकीकत एकत्र देतोः—

तारीख १४ सप्टेंबर १९०१ रोजी मुंबई प्रांतांची ११ वी प्रांतिक परिषद मुंबई येथे सिंधचे पुढारी तेहेलराम खेमचंद यांचे अध्यक्षतेखाली भरली. या परिषदेत मुख्यतः नव्या लँड रेव्हेन्यु बिलाची चर्चा झाली. परिषदेतील तिसरा ठराव दुष्काळकोडासंबंधीचा होता. तो गोकुळदास पारेख यांनी मांडला. टिळकांनी त्याला अनुमोदन दिले. दोन वर्षापूर्वी साताऱ्यास या दोघांचा जो खटका उडाला होता तो आतां दोघेहि विसरून गेले होते. बाहेरचे संकट आले म्हणजे घरांतील भांडण मिटते या सिद्धांताप्रमाणे हेहि झाले मी म्युनिसिपल बिलावर भाषण केले.

ता. २५ आक्टोबर १९०२ रोजी बारावी प्रांतिक सभा सोलापूर येथे भरली. अध्यक्षस्थानी चिमणलाल सेटलवाड हे होते. सोलापुरास ही सभा अगदी आयत्या वेळी भरली. त्यामुळे तिचे स्वरूप बेताबाताचेच होते. या सभेला टिळक हजर

राहूं शकले नाहीत. कारण याच वेळी ताईमहाराज प्रकरणात टिळकांवर झालेला फौजदारी खटला पुण्यास सुरू होता. सोलापूरची प्रांतिक सभा घाईने वेठीप्रमाणे उरकण्यात आली याविषयी केसरीने वेळीच निषेध प्रकट केला होता.

१९०२ ची राष्ट्रीय सभा अहमदाबाद येथे भरली. या सभेस टिळक हजर राहूं शकले नाहीत. अहमदाबाद पुण्यापेक्षा श्रीमत, तथापि नुकताच दुष्काळ होऊन गेल्यामुळे सभा कशी पार पडते याविषयी चिंताच होती. पण मध्यम वर्गातील तरुण मंडळीच्या प्रयत्नाने सभा चांगली पार पडली. प्रतिनिधींची नेहमींची दहा रुपयांची फी वीस रुपये करण्यात आली होती. आणि दिल्लीदरबाराकडे अनेक लोक गेल्यामुळेहि प्रतिनिधींची संख्या बेताचीच होती. तथापि अध्यक्षस्थानी बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी असल्यामुळे त्यांनीं ती वाण काहीशी भरून काढली. सभेच्या बैठकीत महत्त्वाचे असे कांहींच झाले नाही. कॉंग्रेसचे काम सर्व वर्षभर चालावे अशी इच्छा एका पुढाऱ्याने व्यासपीठावर प्रदर्शित केली. तेव्हां मी खालून आपल्या जागेवरून उठून म्हटले की, "तुमचा नुसता उपदेश नको, तुम्ही व्यासपीठावर बसलेले लोक वर्षांत बाहेर पडून राष्ट्रीय सभेवर जितकी व्याख्याने द्याल त्याच्या सहापट व्याख्याने आम्ही व्यासपीठाखाली बसलेले गरीब लोक देऊ." यामुळे सभा संपल्यावर सुरेंद्र-नाथ यानी मला आपल्या बंगल्यावर बोलावून घेऊन या मुद्याची चर्चा केली. यावर्षी राष्ट्रीय सभेला जोडून औद्योगिक प्रदर्शन भरविण्यांत आले होते. हा नवा उपक्रम मात्र लोकाना फार पसंत पडला.

१३ वी मुंबई प्रांतिक परिषद तारीख २६ मार्च १९०३ रोजी धारवाड येथे भरली. पांडुरंगराव आठवले वकील हे स्वागताध्यक्ष असून अध्यक्षस्थान दाजीसाहेब खरे याना देण्यांत आले होते. या परिषदेला टिळक हजर होते याचे कारण तेथे जमिनबाबीच्या विषयाची चर्चा विशेष व्हावयाची होती. अध्यक्ष दाजीसाहेब खरे यांच्या भाषणातील महत्त्वाचा बहुतेक भाग या विषयाकडेच दिला गेला होता. आणि टिळक व खरे या दोघांनी बसून अनेक जुने रिपोर्ट व सरकारी ठराव वाचून, हल्लीची जमीनमहसूलपद्धति जुन्या पद्धतीपेक्षा जाचक कां व कशी आहे याचे सप्रमाण विवेचन लिहून काढले होते. हा विषय परिषदेच्या आठव्या नंबरच्या ठरावाने मांडण्यांत आला. तो दादासाहेब करंदीकर वकील यांनी मांडला. आणि त्यावर टिळकांनी विस्तृत भाषण केले.

परिषदेला मुंबईची मडळी आली नव्हती. पण फेरोजशहा मेथा यांच्या प्रभावळीतील दाजीसाहेब खरे हे अमल्याने मुबईकर मडळी हजर नव्हती असे भासले नाही. टिळक यदाहि वास्तविक आपल्या खटल्याच्या कामांत पुष्कळसे गुतले होते तथापि दाजीसाहेब खरे यांच्या स्नेहाखातर, आणि त्यांच्या व धारवाडकरांच्या आग्रहावरून, टिळकांनी सवडीत सवड काढली व ते परिषदेला हजर राहिले. इतकेच नव्हे तर वर सागितलेले खरे यांच भाषण तयार करण्यांतहि त्यांनी बरीच मदत केली. जमीनमहमुलाच्या या विषयाला यापूर्वी दोन वर्षे एकसारखे महत्व आलेले असून मुबई कायदेकौन्सिलच्या जुन्या इतिहासात ज्या ज्या चळवळी झाल्या त्यात जमीनमहसूलाची चळवळ ही अत्यत स्मरणीय अशी झाली.

धारवाडच्या प्रातिक परिषदेबरोबर प्रातिक सामाजिक परिषदहि भरली होती. अध्यक्षस्थानी विष्णु मोरेश्वर महाजनी हे होते. महाजनी हे सुधारणावादी असले तरी त्यांच्या व इतर सुधारकाच्या वृत्तीमध्ये फरक होता. अर्थात् त्याचे भाषण अशा परिषदेच्या अध्यक्षाच्या नेहमीच्या भाषणाहून थोडे वेगळे झाले. “जी काही सुधारणा करणे असेल ती धिम्मेपणाने व कळकळीने केली पाहिजे. स्वतःचे आचरण व हेतु शुद्ध असल्यास आपल्या खऱ्या स्वभावाने कोणाहि मनुष्यास आपल्या घरची माणसे वश करून घेता येतात. सुधारक म्हणविणारांपैकी कित्येक लोक मद्याच्या व्यसनापासून अलिप्त नसल्याने त्याच्या आचरणाचे शितोडे सुधारणेच्या कार्यावरहि पडले” असे त्यानी उघडपणे सागितले. सार्वजनिक शिक्षणात धर्मशिक्षण असले पाहिजे असेहि त्यानी मत दिले.

१९०३ ची राष्ट्रीय सभा मद्रास येथे भरली. या सभेला टिळकांना हजर रहातां आले नाही. कारण यापूर्वी ताईमहाराजाच्या खटल्यांत मॅजिस्ट्रेट क्लेमंट्स् यांनी त्यांना दीड वर्षाची शिक्षा दिली होती, आणि या शिक्षेवरच्या अपीलाची सुनावणी सेशनजज्ज मि. ल्यूकस यांच्यापुढे डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यास होऊन फक्त निकाल सांगण्याचे काम तहकूब राहिले होते. पण बसल्या जागी टिळकांचे लक्ष मद्रासच्या सभेकडे होतेच. आणि ते कसे काय होते हे ता. २९ डिसेंबरच्या केसरीतील अग्रलेखावरून वाचकांना दिसून आले. या अग्रलेखावर टिळकांनी ऋग्वेदांतील मंडूक सूक्तांपैकी एका ऋचेचें अवतरण घेतलें होतें. तिचा अर्थ असाः—“ एक जण बैलासारखा तर एकजण बेडकासारखा ओरडतो. एक

जण पिवळट तर एक टिपकेदार ! हे बेटे बेडूक देवाने नेमिलेल्या बाराव्या महिन्याची वेळ कशी अगदी जपून पाळतात कधीच चुकवीत नाहीत." हे अवतरण उपहाससूचक आहे यात शका नाही. ही उपहासबुद्धि सुचण्याचे कारण टिळकानी पुढे लेखात स्पष्ट केले होते. ते म्हणतात 'राष्ट्रीय सभेने अठरा वर्षे खटपट करून सर्व न्यायाच्या मागण्या जोराने सरकारपुढे ठेवल्या. पण पूर्वी एक वेळ स्वतः सरकारला या सभेचे जे भय वाटत होते तेहि त्याना हल्ली वाटत नाही. हे पाहून राष्ट्रीय सभावाल्यानाहि आपले काही तरी चुकते आहे अशी शका सहजच सुचते. सनदशीर चळवळ हाच राष्ट्रोन्नतीचा खरा मार्ग असेल तर तो आम्हाला फलद्रूप का न व्हावा ? आणि तो मार्ग खरा नसेल तर तो सोडून देऊन दुसरा एकादा अधिक श्रेयस्कर मार्ग का न स्वीकारावा ?'

मद्रासच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष लालमोहन घोस हे होते. घोसबाबू हे मोठे नामांकित वक्ते. किंबहुना त्याच्या वक्तृत्वापुढे सुरेंद्रबाबूचेहि वक्तृत्व फिके पडे. याचे कारण त्यांचा आवाज गोड व मोहक असून भाषा सुरेंद्रबाबूच्या भाषेहून अधिक सुटसुटीत व सुश्लिष्ट अशी असे. खुद्द विलायतेत देखील त्याच्याइतके इतर कोणाहि हिंदी वक्त्याचे वक्तृत्व लोकांना पसत पडत नसे असे म्हणत. पार्लमेंटमध्ये शिरण्यास ते सर्वस्वी लायक असल्याने, व त्याना ती महत्त्वाकांक्षाहि असल्याने, त्यांनी उमेदवारीची खटपट एक वेळ करून पाहिली होती पण ती फसली. मद्रास कॉंग्रेसच्या सुमारास घोसबाबू हे सर्व व्यवहार टाकून देऊन एकांतवास पत्करण्याच्या बेतांत होते. पण मेथा वगैरे स्नेहीमडळीच्या आग्रहाने मद्रासचे अध्यक्षपद त्यांनी स्वीकारले. तथापि एक मुख्य भाषण करण्याखेरीज त्यांच्या हातून या सभेत दुसरे कांहीच झाले नाही, व ते त्यांचे भाषणहि त्यांच्यावरील मद्याच्या गुंगीमुळे मधून मधून खडित असेच झाले. राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षाचे काम करीत असतांहि ज्यांना मदिरामोह आवरला नाही त्याच्याकडून मार्गदर्शकाचे काम कितपत होणार ? ही त्यांची उणीव त्यांच्याबरोबर परिचारक म्हणून आलेले त्यांचे जांवई डॉक्टर शरद् मलिक यांनी आपल्या तरतरीने थोडीबहुत भरून काढली. इतर रीतीनेहि ही राष्ट्रीय सभा बेताचीच झाली. कारण मद्रासेकडे डिसेंबरच्या अखेरीच्या सुमारास पाऊस पडतो तो त्या साली फार पडला. प्रतिनिधींची गैरसोय झाली. सभेच्या मंडपांत व कॅम्पांतून लहान लहान तळी साचली. एका ठिकाणांहून दुसरें ठिकाणी जाणे अतिशय कठिण झाले. आणि जेवणाच्या पंक्ति वाढाव्या

तो पाणी शिरून पाने पत्रावळी तरंगू लागाव्या असेहि केव्हां केव्हां घडले. सभेचे काम पावसामुळे अर्धा एक दिवस बंद पडले. पण ते कसे तरी संपविलेच पाहिजे म्हणून सभा अखेर एका इमारतीच्या मुख्य दालनांत भरविण्यांत आली. सभेत झालेल्या बहुतेक ठरावाचा कटाक्ष कर्झनशाहीतील अनेक दुष्कृत्यांवर होता. खुद्द मद्रासचे एक गाऱ्हाणे प्रमुखपणे मांडण्यात आले ते मद्रास इलाख्याचा उत्तर भाग तोडून ओरिसा प्रांताला चिकटविल्यासंबंधाचे होते. ही देखील एक प्रकारची फाळणीच होती आणि या गाऱ्हाण्याला बंगाली पुढाऱ्यांनी आपला पाठिंबा दिला. याचे कारण बंगाल प्रांताचीहि फाळणी पुढे लवकरच होणार असे दुःस्वप्न त्यांना पडूं लागले होते. या बड्या क्षोभकारक फाळणीची तयारी गुप्तपणे कर्झनशहाच्या दरबारच्या अंतरंगांत सुरू होती. आणि या कारस्थानाचे झिरपे थोडथोडे बाहेर येऊं लागले होते. तथापि या विषयावर स्वतंत्र ठराव करण्याइतके परिणत स्वरूप या विषयाला अद्यापि आले नव्हते असे आठवते

१९०३ च्या राष्ट्रीय सभेच्यापूर्वी ए. ओ. ह्यूम व वेडरबर्न वगैरेंनी हिंदुस्थानांत जागृति उत्पन्न होण्याकरिता एक पत्र इकडील पुढाऱ्यांना पाठविले होते. त्याचा उपयोग विशेष झाला नाही. यावेळी मि. डिग्बी, प्रो. गोखले यांच्या सांगण्यावरून विलायतेतील 'इंडिया' नामक काँग्रेसच्या मुख्य पत्राकरितां वर्गणीदार मिळविण्याचे पुण्यांतील बरेच काम मी स्वतः घरोघर हिंडून केल्याचे स्मरते. १९०४ साली मुंबईस राष्ट्रीय सभा भरण्याचे ठरले तेव्हां तिची वर्गणी जमविण्याच्या उद्देशाने मुंबईचे हायकोर्ट वकील व फेरोजशहा मेथा यांचे सहाय्यकारी, नारायण विष्णु गोखले यांनी रुपयाफंडाची कल्पना काढली. ती पैसाफंडाच्या कल्पनेवरून निघाली. "एक रुपयाफंड काढून मुंबईच्या बैठकीला मदत होईल किंवा एकादा लहानसा कायमनिधीहि जमेल. पण सभेचे काम वर्षभर करण्यास कोणी तयार असल्याशिवाय फंडाचा तरी काय उपयोग !" अशी टीका त्यावर इतरांकडून झाली. वुइल्यम डिग्बी यांनी राष्ट्रीय सभेचे काम अखंड चालण्याकरितां एक योजना केली. "फिलिपाईन बेटाप्रमाणे हिंदुस्थानने जर प्रयत्न केला आणि आशियाखंडांतील जागृतीचा फायदा घेतला तर फिलिपाईन बेटाइतके स्वातंत्र्य हिंदुस्थानाला मिळेल" असे मत मि. डिग्बी यांनी व्यक्त केलें. त्या बेटांतील लोक हिंदी लोकांप्रमाणेंच परतंत्र होते ! पूर्वी ब्रॅडलासाहेब इकडे आल्यापासून विलायतेंत हिंदी वकिलात स्थापण्याची कल्पना निघाली होती. पण ते खर्चाचे काम हे एक. शिवाय आपला वेळ मोडून

काम करण्यास कोणी तयार नव्हता. अलाहाबादच्या 'इंडियन ओपिनियन' पत्रानेंहि असेंच लिहिलें. "हिंदुस्थानांत राजकीय चळवळीला यश न येण्याचें कारण हेंच की पुढारी अंग मोडून मेहनत करीत नाहीत. उलट तेलंग, चंदावरकर तय्यबजी, सुब्रह्मण्य अय्यर, शंकरन् नायर या कॉंग्रेस पुढाऱ्यांनी पुढें सरकारी नोकरी पत्करली." हा वाद मुंबईच्या कॉंग्रेसपर्यंत मधून मधून असाच चालला होता आणि त्याचा उच्चार ह्या सभेंत झालाहि. अद्यापि नेमस्त व जहाल यांतील भेद मात्र स्पष्टपणे व्यक्त झाला नव्हता. यामुळें 'कॉंग्रेसमध्यें राहून कॉंग्रेसला नांवें ठेवणारे' म्हणून जहाल पक्षाला कोणास नांवें ठेवतां येत नव्हतीं. उलट कॉंग्रेसच्या त्या वेळच्या पुढाऱ्यांना नांवें ठेवणारे गुरू उपगुरू ह्यूम वेडरबर्न हेच होते हें लक्षांत घेतलें म्हणजे भांडणाचें खरें मूळ कशांत होतें हें कळून येईल.

२० वी राष्ट्रीय सभा मुंबईस ता २४ डिसेंबर १९०४ रोजी भरली. स्वागताध्यक्ष सर फेरोजशहा मेथा व अध्यक्ष सर हेन्री कॉटन हे होते. कॉटनसाहेब हे नुकतेच सरकारी नोकरींतून सुटले असल्यामुळें, आणि राष्ट्रीय सभेला त्यांची प्रथमपासून सहानुभूति असल्यामुळें, त्यांना हौसेनें अध्यक्ष निवडण्यांत आलें. पूर्वीचा मुनित्रयांचा खलिता लिहिणाऱ्यांपैकीं हे एक होते. बरोबर सर वुइल्यम वेडरबर्न हेहि आले होते. या दोघांची मिरवणूक मुंबईत मोठ्या थाटाची निघाली. मद्रास राष्ट्रीय सभेच्या पूर्वीं, टिळकांनी दर्शविल्याप्रमाणें, हिंदुस्थानांत व विलायतेंत राजकीय स्वरूपाचें सभेचें काम सतत जोरानें कसें चालावें हा मुख्य प्रश्न याहि सभेपुढें होता. त्याविषयीं टिळकांनी या दोघांकडेहि जाऊन खासगी रीतीनें त्याची चर्चा केली. मतभेद किंवा भांडणें उघडपणानें झालीं नाहींत. मात्र सर फेरोजशाहा मेथा यांच्यावर लाला लजपतराय यांनी कांहीं आरोप केले होते. म्हणून त्या दोघांची थोडीशी खडाजंगी विषय-नियामक-मंडळांत झाली. नेमस्त व जहाल असे स्पष्ट पक्षभेद अद्यापि व्हावयाचे होते. याविषयीं कॉटनसाहेब आपल्या आठवणीच्या ग्रंथांत लिहितात "बाळ गंगाधर टिळक हेहि आपल्या अनुयायांसह तेथें आले होते. पण या वेळीं जहाल मवाळ हा भेद नव्हता. कारण एका अर्थानें सगळेच या वेळीं नेमस्त किंवा मवाळ होते!" टिळक यांचें स्वागत मंडपांत मोठ्या थाटानें झालें. मुसलमान कॉंग्रेस-भक्त अली महंमद भिमजी यांनी टिळकांचा जयजयकार करण्यांत पुढाकार घेतला. ज्यांना व्यक्तिशः टिळकांविषयीं स्नेहभाव वाटत नव्हता असेहि लोक या जयजयकारांत

सामील झाले. कारण त्या साली मुबई हायकोर्टाने त्यांना फौजदारी खटल्यांतून दोषमुक्त करून सोडून दिले होते.

राष्ट्रीय सभेला घटना असावी असे पहिल्या पाचचार वर्षातच लोकांना वाटूं लागले होते व तोहि एक विषय वादाचा होता राष्ट्रीय सभेच्या दहाव्या वर्षी म्हणजे १८९५ साली पुण्यास ही सभा भरली तेव्हां या प्रश्नाला बराच रग आला होता. कांही घटना कोणी कोणी तयार केल्या होत्या व त्यांचा विचार करण्याकरितां कमिटीहि नेमण्यात आली होती. परतु कॉंग्रेसचे पुढारी पुष्कळसे सर फेरोजशहा मेथा यांच्या मताचे होते. त्याना राष्ट्रीय सभेला घटना अशी नको होती. वर्षातून चार दिवस जमावे. कोणी ती चार दिवसाची धामधूम म्हणावी. कोणी शातपणे चर्चा करण्याची परिषद म्हणावी. पण त्या चर्चेत जे काय निघेल तितकाच जमलेल्या लोकाना किंवा राष्ट्राला फायदा. "आपापल्या प्रातात जे कोणी लोकमत प्रकट करतील त्यांचे एकीकरण करणारी सभा ही राष्ट्रीय सभा मानावी " हे सर फेरोजशहा मेथा याचे मत १९०२ साली सोलापूर प्रातिक परिषदेच्या वेळी चिमणलाल सेटलवाड यानी मुबईचे मत म्हणून प्रकट केले होते. पण लाला लजपतराय वगैरे मडळीना ही गोष्ट मान्य नव्हती पजाबातील प्रतिनिधि १९०२ साली अहमदाबादेस आले नव्हतेच, पण विनवणी केल्यामुळे १९०३ साली काही मद्रासेस गेले होते, तेहि निराश होऊन परत गेले; व राष्ट्रीय सभेला घटना असावी की नसावी यावरून १९०४ साली मेथा व लजपतराय याचे मुबईस भांडण झाले.

राष्ट्रीय सभेत असले हे भांडण मी प्रथमच पाहिले कार्यक्रमांत घटनेचा विषय निघाला तेव्हां, लाला लजपतराय हे कोठे दिसेनात असे फेरोजशहा मेथा यांना वाटून, "आयत्या वेळी तोंड चुकवितात, आणि मग पाठीमागे टीका करितात" असे कायसेसे ते बोलले. खरोखर लजपतराय यानी तोंड चुकविले नव्हते. ते दूर अंतरावर कोणाशी बोलत उभे होते, म्हणून त्यांना मारलेली हांक ऐकू गेली नाही. पण मेथा यांची टीका त्यांना कोणी जाऊन सांगताच लालाजी फणफणत दणदणत येऊन समोर उभे राहिले आणि "तुमचे काय म्हणणे आहे बोला !" असा सवाल त्यांनी मेथा यांना केला. आणि "घटनेसंबधी तुमची काय तक्रार आहे ती सांगा " असे मेथा यांनी म्हणतांच, लालाजींनी सुमारे वीस मिनिटे जोराचे भाषण करून घटनेची आवश्यकता प्रतिपादिली व शेवटी "तुम्ही मुबईचे पुढारीच घटनेला विरोध करता " असा आरोपहि केला.

या मुबई कॉंग्रेसच्या प्रसगी टिळकांबरोबर मी सर हेन्री कॉटन, मेथा इत्यादि लोकाना भेटलो. त्याच्याशी वाद करण्याचे, प्रश्नोत्तर करण्याचे काम टिळकच करीत. तो अधिकार माझा नव्हता. तथापि मी त्याच्याशी बोलण्यात मुळीच भाग घेत नसे असे नाही. मधून मधून आपले म्हणणे, मात्र मोजक्या शब्दानी, माडी. मी बरोबर असता मला बाहेर बसवून टिळक एकटे आंत आऊन मोठ्या माणसाशी बोलले असे बहुधा घडत नसे. ते थोरामोठ्याशी माझी ओळख 'हे आमच्या मराठ्याचे सपादक' अशी मुद्दाम करून देत. कारण पुढे माझेहि अशा लोकाशी दळणवळणाचे प्रसग येणार हे त्यास माहीत असे. हे बडे लोक मराठा पत्र नित्य वाचणारे नसले तरी माझे विशिष्ट लेख त्याच्या नजरेला पडत, यामुळे माझी त्याची मनोमन ओळख आधीच झालेली असे.

**करंदीकर-दीक्षित**—१९०१ साली मुबई कायदे कौंसिलची निवडणूक उभी राहिली तेव्हा दादासाहेब करदीकर वकील आणि हरि सिताराम दीक्षित सॉलिसिटर असे दोघे उमेदवार होते एका अर्थाने दोघे माझे स्नेहीच. पण मी पूर्वीचा सातारकर म्हणून माझ्यावर दादासाहेबाचा हक्क त्यातल्यात्यांत अधिक. तार मास्त-राच्या सपातील कामामध्ये दीक्षित व मी सहकारी होतो म्हणून त्यांनाहि मदत माग-ण्याचा हक्क होता. पण त्याना माझ्या मदतीची फारशी अपेक्षा दिसली नाही. त्याना गोपाळराव गोखले यांच्या पक्षाची सर्वस्वी मदत होती. तशीच मुंबईच्या मेथा कपूचीहि. दादासाहेब करदीकरानी १८९९ च्या निवडणुकीत टिळकांना दगा दिल्यामुळे त्यांना टिळकाचे सहाय्य मागण्याचा हक्क त्या दृष्टीने उरला नव्हता. तथापि ताई महाराज प्रकरणांतील वकीलपत्र दादासाहेबाकडे असे. यामुळे एक नवा वेगळा हक्क उप-स्थित झाला होता. या दोन्ही नात्यानी मी धुळ्यास करदीकरांच्या करिता खटपट करावयास गेलो होतो. तेथील स्नेही व खटपटीचे क्षेत्रोपाध्ये बहाळकर बधू (नाना व तात्या) हे दोघे रा. सा. श्रीधर बाळकृष्ण उपासनी पेन्शनर सबजज्ज याचे भाऊ. धुळ्यास त्याचे वजन फार. त्यांच्या सहाय्याने बाबासाहेब गरूड याना आपलेसे करून धुळे जिल्ह्यातील सर्व मते आम्हास करदीकर याजकरितां मिळविता आली. परंतु महाराष्ट्राच्या इतर जिल्ह्यांतून मिळावी तितकी मते न मिळाल्यामुळे अखेर दीक्षित सॉलिसिटर हे विजयी झाले. निवडणुकीची खटपट म्हणून काय असते याची कल्पना मला तेव्हां चांगलीच आली. ती अशी की जि. लोकलबोर्डाच्या एका सभेत निवडणुकीचा निकालच लागे. कारण या सभेत अंतिम मतदार निवडले

जातील त्यांनीच मते द्यावयाची. आणि आधी खासगी खटपटीने आपलेसे झालेले लोक मतदार म्हणून निवडून आले म्हणजे मग त्याच्याकडून मतपत्रिका भरून घेणे एवढेच काम उरे. १९०१ साली मी धुळ्यास गेलो असता माझे ' राष्ट्रीयत्व ' या विषयावर टॉवर बागेत व्याख्यान झाले. येथपासून माझ्या जाहीर व्याख्यानांना सुरुवात झाली असे म्हणावयास हरकत नाही.

**स्वदेशी कंपनीचा अनुभव** (१९०४)—यापूर्वी थोडे दिवस " स्वदेशी को-ऑपरेटिव्ह स्टोअर्स ' या नावाची एक कंपनी रजिस्टर झाली. तिचा मी डायरेक्टर व चेअरमन निवडलो गेलो. ग. वि. चिपळूणकर नांवाच्या एका गृहस्थाचे शिंप्याचे दुकान पुण्यास बुधवार पेठेत होते. त्यांना या कंपनीची कल्पना सुचली. मी अडीचशे रुपयांचे शेअर घेऊन डायरेक्टर झालो. स्वदेशीच्या नव-युगीन मतप्रसारास नुकतीच सुरुवात झाली होती. कंपनीचे दुकान बरे चालू लागले. चार पैसे येऊन पेटीत पडू लागले. भागीदाराना नफा वाटलाच पाहिजे हे स्वदेशीच्या शास्त्रात सहसा बसतच नाही ! म्हणून पेटीतल्या पैशाला बाहेर पाय फुटले. चिपळूणकरमंडळीनी त्या पैशाचा उपयोग प्रथम भारत भागवत या संस्कृत ग्रंथाच्या छपाईकडे केला. त्यात त्याना नफा झाला असे दिसताच दुकान मागे पडू लागले. म्हणून दुकानाला नवी जागा ढमढेरे याच्या वाड्यांत माडीवर घेतली. मग चिपळूणकर म्हणू लागले की " मला मुंबईस दुकानाची एक शाखा काढू द्या. " म्हणून काळबादेवी रस्त्यावर बिवलकराच्या माडीवर दुकान घातले. पण दुकानाकरितां नवा माल आणण्यात भांडवल खर्च व्हावे ते भारत भागवत प्रकाशनात गुतून राहू लागले. या गोष्टीला आम्ही हरकत घेतली. तेव्हां भागी-दारांच्या सभेत बहुमत करून प्रॉक्सीच्या जोरावर चिपळूणकर यांनी आम्हास डायरेक्टरच्या जागेवरून काढून आपले दुसरे साथीदार डायरेक्टर निवडून घेतले ! ही गोष्ट केसरीत प्रसिद्ध होताच कंपनी एकदम बसली. चिपळूणकर याचे दिवाळे वाजण्याची वेळ आली. त्यानी मुंबईहून मला लिहिले की "मला येऊन वांचवा नाही तर जीव देतो." मग मी माझे स्नेही गणपतराव साठे ऑडिटर यांना मुंबईस नेऊन, तेथील सर्व निरवानिरव करून, कंपनी आपखुषीने लिक्विडेशनमध्ये काढण्याचा ठराव करून घेतला. फडके वकील यांना लिक्विडेटर नेमून भागीदारांस रुपयांत सुमारे तीन आणे मिळवून दिले. पण या कंपनीच्या घोळांत माझे निदान सहासातशे तास

व्यर्थ खर्ची पडले असावे असा माझा अदाज आहे ! ही सर्व हकीकत चार-पांच वर्षांची आहे. पण सोईकरिता ती सर्व एकत्र सागितली.

**कौटुंबिक आपत्ति**—१९०४ च्या ऑगस्ट महिन्यांत धुळे येथे माझे सर्वात वडील बधु नाना हे नवज्वराने वारले. वडील व मातोश्री पूर्वीच कांही दिवस तेथे होती. पुण्यास नानाचे कुटुब प्रसूत होऊन अवघे बारा दिवस झाले होते. मुलाचे बारसे रहित करुन त्याच्या अडीच वर्षाच्या थोरल्या मुलाला बरोबर घेऊन मी धुळ्यास गेलो. त्यानतर दोन तीन दिवसानी ते वारले. त्या प्रसंगाचे मी वर्णन करूं शकत नाही. रडुन रडुन माझे डोळे दुखरे होण्याची वेळ आली. लगेच वडील-मातोश्रीना घेऊन मी पुण्यास आलो. काही दिवसानी नानाच्या कुटुबाला आमच्या वडील बधूनी आपल्या जवळ राहण्यास व थारेपालट करण्यास नेले. पण तीहि नदुर-बार येथे अवघ्या सहा महिन्यानी वारली. अशा रीतीने आमच्या कुटुबाचा एक खांब ढासळला. नानाच्या सबधी सविस्तर माहिती मी या ग्रथात पर्वी दिलीच आहे.

**गायकवाडवाड्याची खरेदी**—या नतर काही दिवसानी टिळकाना गायकवाड सरकारानी पुण्यातील गायकवाड वाडा खरेदी दिला. त्याची सर्व रक्कम देण्याला टिळकाजवळ नव्हती त्यामुळे त्याना दहा हजार रुपये कर्ज काढावे लागले. यावरुन त्यावेळी त्याची सापत्तिक स्थिति काय होती हे दिसून येईल. कर्मधर्मसयोगाने माझ्या बधूच्या विम्याची रक्कम याच सुमारास हाती आली तीहि मला या कामी लावता आली. पुढे सहा महिन्यांनी केसरी कचेरीने ती रक्कम मला परत केली. खरेदीच्या सर्व रकमेचा चेक घेऊन मी बडोद्यास गेलो व ती सरकारी खजिन्यात भरुन पावती घेऊन आलो तीच पावती पुढे पुण्यास रजिस्टर केली. दरबारशी व्यवहाराचा सबध असल्यामुळे मालकी हक्काला एवढा आधार पुरला म्हणून खरेदीखताची स्टॅपड्युटि वांचली. हा वाडा खरेदी घेतला तेव्हां त्यांतील इमारत थोडी व फार जुनी होती. केसरीकडे असलेल्या या वाड्याच्या भागांतील आजच्या बहुतेक सर्व इमारती नवीनच बांधलेल्या आहेत.

**जुन्नरचा दौरा**—१९०४ च्या एप्रिलांत टिळक आम्हां अनेक मडळीसह जुन्नरास गेले. घोड्याचा मोठा शिग्राम व टागे केले होते. परंतु सर्व मजल संपण्याला बारा तासहि पुरले नाहींत. टिळकांचे दौरे ताई महाराज खटल्याचा निकाल लागल्या-पासूनच खरे सुरू झाले. जुन्नरास सत्काराची शर्थ झाली. जुन्नरच्या आसपास यापूर्वी

नुकतेच कांही दरोडे पडले होते. त्यावरून टिळक सहज बोलतांना म्हणाले की "पुण्याहून जुन्नर इतके दूर आहे ते बरेच म्हणावयाचे. उद्या कोणाला बंड करावयाचे झाले तर बंडवाल्याला दोन दिवस तरी निवात मिळतील. पुढे लष्कर किंवा पोलीस येईल ते पहाता येईल." पण आतां मोटारीने जुन्नरचा प्रवास दीड तासातहि होऊं शकतो !

**वेदोक्त व ग्रामण्य**—१९०४ च्या जुलै महिन्यात सयाजीराव गायकवाड पुण्यास आले तेव्हां त्यांनी इतर लोकांबरोबर मलाहि भेटीस बोलाविले होते. महाराजांची व माझी ही पहिलीच भेट. संभाषणात महाराजांचा आवडता धर्मशिक्षणाचा, धर्मविधि चालविणाऱ्या उपाध्येपुरोहितांचा, ग्रामण्याचा, व वेदोक्त कर्माचा इतके प्रश्न चर्चेला निघाले होते. त्यात सार्वत्रिक धर्मशिक्षणाच्या योजनेविषयी मी संमति दर्शविली. ग्रामण्याविरुद्ध सुशिक्षितांनी बंड केले पाहिजे असे मी सांगितले. पुरोहित व उपाध्ये यांच्यासंबंधी कायदा करू नये असे माझे मत होते ते मी सांगितले. आणि वेदोक्तासंबंधी मी थट्टेने म्हणालो की "ही चळवळ बडोद्याहूनच प्रथम सुरू झाली असे म्हणतात व कोल्हापूरकर महाराजांना लोक उगाच दोष देतात. मात्र क्षत्रियांना वेदाधिकार आहे हे कोणी कधीच नाकबूल करीत नाही." या साली पुण्यांत एक दोन ग्रामण्ये झाली. माझ्यावरील ग्रामण्य चालू होते, व टिळकांनी आपल्यावरील ग्रामण्याचा अनुकूल निकाल करून घेऊन पुण्यांत नवीन धर्मसभाच स्थापण्याचा उपक्रम करण्याचा विचार मनात चालविला होता.

**पैसाफंड**—याच सालच्या डिसेंबर महिन्यात मी व अताजीपंत दामोदर काळे यांनी मिळून एक विनंतिपत्र केसरीत छापले. त्यात असे लिहिले होते की, काळे हे जरी पैसाफंड जमवित असले व केसरी पत्र त्यांना उत्तेजन देत असले तरी, एखादी संघटित पैसाफंड कमेटी स्थापल्याशिवाय या कार्याला जोर येणार नाही. अताजीपंत काळे हे माझ्याशी कितीहि भांडोत, परंतु पैसाफंड कमेटीचा उगम त्यांच्याबरोबर माझ्यापर्यंतहि पोंचतो. आदलेवर्षी मी व अताजीपंत काळे यांनी काढलेल्या पत्रकाप्रमाणे मध्यवर्ती शाखा व पैसाफंड कमिट्या स्थापन होऊं लागल्या. त्यापैकी मध्यवर्ती कमिटीचा एक सभासद तर मी नेमला गेलोच, पण पुणे जिल्ह्याकरितां स्थापिलेल्या पैसाफंड कमिटीचा चिटणीसहि मला व्हावे लागले. पुढे हे काम कवडेशास्त्री यांनी आपणाकडे घेतले. मी पैसाफंडावर एक अष्टक पद्यात्मक रचले व स्वतः घरोघर हिंडून पैसाफंड गोळा केला.

**टिळक व गोखले**—१९०५ सालापासून राष्ट्रीय चळवळीला बराच जोर चढला. वंगभंगाच्या चळवळीला बंगाल्यांत खरी सुरुवात झाली होती. नामदार गोखले विलायतेस जाऊन मोर्लेसाहेबाच्या गाठी घेऊन हिंदुस्थानांत परत आल्या-वर बनारस येथें भरणाऱ्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान त्यांना द्यावें असें ठरलें होतें. गोखले हे टिळकांचे प्रतिपक्षी असले तरी, आणि त्यांची राजकीय मतें टिळकांना सौम्य अशी वाटत असली तरी, व्यक्तिशः गोखले हे एकनिष्ठेने व परिश्रमपूर्वक कार्य करीत त्याविषयीं टिळकांची आदरबुद्धि मनांतून असे. याचें प्रत्यंतर पुण्यास गोखल्यांचा जो जाहीर सत्कार झाला त्यावरून दिसून आलें. या सत्कारांत टिळक स्वतः सामील झाले होते. मात्र प्रतिपक्षीयांच्या सलोख्याला उभयतांना साधारण असा कोणी सन्मान्य स्नेही नेहमीच लागतो तो या ठिकाणीं नानासाहेब देशमुखांच्या रूपानें मिळाला होता. देशमुख हे पूर्ण राष्ट्रीय वृत्तीचे असले तरी त्यांची मनोभूमिका टिळकांहून पुष्कळच अधिक निर्विकार होती. स्वतः उघडपणें चळवळींत न पडण्यामुळें ही वृत्ति त्यांना साधली असेल. तथापि त्यांचा मूळ स्वभावच धिमा, शांत व सौजन्यपूर्ण असे. यामुळें त्यांनीं गोखल्यांजवळ टिळकांच्या गुणांचें वर्णन केलें, आणि टिळकांजवळ गोखल्यांच्या गुणांचें वर्णन केलें, तरी त्यांपैकीं कोणास राग येत नसे. नानासाहेबांनीं मुंबईस गोखल्यांच्या सत्कारांत भाग घेतला होता, तसाच तो पुण्यांतल्या सत्कारांतहि त्यांनीं घेतला. आणि त्यांच्या साक्षित्वानें गोखले व टिळक पुण्याच्या मंडईत एका सभापीठावर एकदाच आलेले दिसले ते या वेळीं ! गोखलेहि साऱ्या जन्मांत गायकवाडवाड्यांत दोनदाच येऊन गेले असें मला वाटतें. पैकीं एक प्रसंग वाड्यांत सरतानसिंह यांचे निशाणबाजीचे प्रयोग चालू असतां देशमुखांबरोबर गोखले गायकवाडवाड्यांत आले तेव्हांचा असावा.

**'सवंग लोकप्रियता'**—१९०५ सालीं मुंबईस कै. न्यायमूर्ति माधव रावजी रानडे यांच्या पुतळ्याचा अनावरण समारंभ झाला. समारंभाचे अध्यक्ष मुंबई सरकारचे एक्झिक्यूटिव्ह कौंसिलर सर क्लॉड हिल्ल हे होते. त्यांच्या भाषणांत रानडे यांच्या स्तुतीबरोबर लोकपक्षाच्या पुढाऱ्यांची टवाळी करण्यासारखे कांहीं शब्द आले होते. ते त्यांनीं टिळकांना उद्देशून काढले असावे असा माझा समज झाला. हिल्ल साहेबांची व माझी चांगली ओळख असल्यामुळें मी त्यांना रागानें पत्र लिहून त्यांच्या या कृत्याबद्दल दूषण दिलें. त्याला त्यांजकडून खालीलप्रमाणें उत्तर मला आलें:—

(२७ एप्रिल, १९०५)—" तुम्ही मला लिहिले त्याप्रमाणे तुमची प्रामाणिक मते आहेत हे मला पूर्णपणे माहीत आहे. म्हणून तुमचे समाधान व्हावे याकरिता मी तुम्हाला हे पत्र लिहीत आहे रानडे यांचा पुतळा उघडण्याच्या वेळी 'सवंग लोकप्रियतेला हपापलेले कांही लोक ' असे मी बोललो ही गोष्ट खरी. पण ते बोलताना माझ्या मनांत टिळक नव्हते हे मी तुम्हाला निक्षून सांगतो. त्यांच्याहून फार हलक्या प्रतीचे आणि कमी प्रामाणिक असे वक्ते जी भाषणे करितात त्यानाच उद्देशून माझे बोलणे होते. टिळकाच्या सबधाने तुमचे व माझे बोलणे अगदी मोकळ्या मनाने झाले. असे असता हे शब्द मी टिळकाना उद्देशून बोललो असे टिळकांच्या किंवा तुमच्या मनात तरी कसे आले ? " ( सर क्लॉड हिल, मुबई ).

या पत्रात आपण बोललो ते टिळकाना उद्देशन नाही इतकाच खुलासा हिल साहेबानी केला. आणि त्यांना तो करता आला याचे कारण त्यानी टिळकांचे नांव प्रत्यक्ष घेतले नव्हते. ' पण सवग लोकप्रियतेला हपापलेले ' हे शब्द उच्चारताना टिळकांची व्यक्ति त्यांच्या डोळ्यापुढे नव्हतीच असे मला वाटत नाही. मात्र त्याचा राग फेरोजशहा मेथा याच्यावरहि असल्यामुळे, आणि समारंभ मुंबईतलाच असल्यामुळे, त्याच्या मनात त्या वेळी मेथा हे नसतीलच असेहि म्हणवत नाही. याचे प्रत्यतर पुढील साली मेथा यांना मुबई कॉर्पोरेशनमधील त्याच्या मान्यतेच्या स्थानावरून खाली ओढण्याचा (कॉकस) कट झाला त्यावरून मिळालेच. असो. माझ्या तक्रारीपत्राला हिल साहेबांनी उत्तर दिले हीच मोठी गोष्ट. आणि जगापुरती, बाहेरच्या आवाजाने का होईना, 'मी टिळकांना नांवे ठेवणारा नाही' येवढी कबुली मी काढविली याचे टिळकांनाहि बरे वाटले.

**काशीयात्रा**—१९०५ साली बनारस येथील राष्ट्रीयसभेला मला जावयाचेच होते, व मी एरव्ही बहुधा टिळकांच्याच बरोबर गेलो असतो. परतु आमच्या घरच्या सर्व मंडळीनी काशी प्रयागची कुटुंबयात्रा करावयाचे ठरविले. यापूर्वी पांच वर्षे वडीलमातोश्रीनी आपणापुरती ही यात्रा केलीच होती. तथापि फिरून कुटुबयात्रा म्हणून करावी असे त्यांच्या मनांत आले म्हणून आम्ही निघालो. दिवस थडीचे होते. आणि यात्रेत हे लागेल ते लागेल अशा हव्यासाने प्रत्येकाने इतके सामान बरोबर घेतले की, जळगांवास गेल्यावर त्या सामानाची भीतिच वाटू लागली. म्हणून आम्ही त्यातले निम्मे सामान फालतु ठरवून खरोखरच जळगांवच्या मुक्कामाहून

गुड्स् करून पुण्यास पाठविले ! तरी उरले तेहि पुष्कळच होते असे अनुभवान ठरले. आम्हा यात्रेकरू मंडळीत लहान मुलांची संख्या मोठ्या माणसांपेक्षा अधिक होती. सर्वांत मोठे मूल सात वर्षांचे असेल, व सर्वांत धाकटे मूल चारच महिन्याचे होते. त्यांना गंगेत आपली आपण आंघोळहि करता येत नव्हती. म्हणून प्रत्येकाला स्नानादाखल दंडाला धरून पाण्यांत बुचकळून काढावे लागले ! अलाहाबाद येथे आम्ही दारागंजेस टिळकांचे जावई साने याच्या घरी उतरलो होतो. या प्रसंगाची माझी एक आठवण अशी कीं, सान्यांच्या घरी पोचताच मी प्रथम सगळी कामे सोडून जिना चढून उघड्या माडीवरून गंगा नदी कशी दिसते हे पाहण्याकरिता उत्सुकतेने गेलो. पण गंगा पाहून माझी निराशा झाली ! मात्र यांत चूक माझीच होती. कारण उत्तर हिंदुस्थानात मोठमोठी मैदानेच असतात हे भूगोलातील ज्ञान मी विसरलो होतो, आणि वाल्मीकिकृत गंगास्तोत्रातील 'एतत्तालतमाल' इत्यादि गंगेचे वर्णन माझ्या डोक्यात होते ! आम्ही प्रयाग काशी अयोध्या येथील यात्रा पुऱ्या केल्या. पण काशी येथे बंधु आप्पासाहेब यांना ज्वर येऊ लागल्यामुळे बनारसच्या राष्ट्रीय सभेकरितां थांबू शकलो नाही.

**ग्रंथकार संमेलन**—१९०६ साली माझ्या सार्वजनिक कार्याला भर येऊ लागला. मला व्याख्यानाची आमंत्रणे सर्रास येऊ लागली. आणि मी वक्ता नव्हतो तरी ती निमंत्रणे स्वीकारू लागलो. या वर्षी गणपतिउत्सवांत तर मी अनेक व्याख्याने दिलीच, पण स्वदेशी चळवळीत सामील होऊन त्या विषयावरहि अनेक व्याख्याने दिली. मी स्वदेशी बरोबर बहिष्कारालाहि संमति देत असे. पण परदेशी कपड्यांची होळी करण्याविरुद्ध असून ते कपडे गोरगरीबांना वाटावे असे म्हणत होतो. पुण्यांत शिवरामपंत परांजपे व सावरकर यांच्या व्याख्यानाच्या वेळी होळ्या होत. पण त्यांना मी हजर रहात नसे. मुंबईपासून नाशिक व वाईपर्यंत अनेक ठिकाणी जाऊन मी व्याख्याने दिली. नाशकास मी अकबर जयंती या विषयावर व्याख्यान दिले ते फार चांगले वठले असे मला अजून स्मरते. पण व्याख्यानापेक्षां अधिक जबाबदारीची संघटनात्मक कार्येहि करण्यास मला या वर्षी मिळू लागली. मे महिन्यांत पुण्यास मराठी ग्रंथकारांचे संमेलन झाले. त्याच्या चिटणीसीच्या जागेवर रा. हरि नारायण आपटे यांच्याबरोबर माझी नेमणूक झाली. या ग्रंथकारसंमेलनांतूनच साहित्य परिषदेची कल्पना प्रथम निघाली. आम्ही त्या परिषदेचा प्रारंभ साठ सभासद

मिळवून केला, आणि विनायकराव भावे, कृष्णाजीपंत खाडिलकर, व वासुदेवराव आपटे या त्रिवर्गांना त्या परिषदेचे चिटणीस नेमून घेतले.

**ऐ. लेखांचा संग्रह**—याचवर्षी ऐतिहासिक लेखाचा सग्रह पुण्यात करण्याची कल्पना निघाली. तिचा उगम ग्रथकार समेलनांतूनच झाला. त्याप्रमाणे प्रारभ म्हणून वासुदेवराव मुडले यानी खर्चाकरिता पन्नास रुपयाची वर्गणी देऊन कार्यास सुरुवात केली. परतु कागदपत्र जमविले तरी ते ठेवावयाचे कोठे हा प्रश्न पडला. तेव्हां नटेशराव द्रवीड यानी असे सांगितले की "माझे श्वशुर यवतमाळकर बाबूसाहेब द्रवीड याचे घर शुक्रवार पेठेत आहे. त्यांत मी रहातो, त्या घरातला एक भाग अशा कागदपत्राच्या सग्रहाकरितां मी देईन." हल्ली स्थिरपद होऊन भरभराटीस आलेल्या 'भारत इतिहास मडळा'चा हा अदृश्य प्रारभ होय. या उद्योगात पडण्यास माझी इतिहासाच्या अभ्यासाची हौस ही तर कारणीभूत होतीच, पण हे घर या कार्याला मिळविण्याच्या कामी द्रवीड याचा व माझा स्नेह कारणीभूत झाला. नामदार श्रीनिवासशास्त्री प्रथम या द्रविडांच्या घरीच बिऱ्हाड करून होते. या घरी शास्त्री, ज. रा. घारपुरे, द्रवीड, मी अशी मंडळी मधून मधून जमत असू. शिवाय द्रवीड याचे व माझे जातक त्या वेळी तरी बरेच जुळे. ते पुण्यास येऊन महाराष्ट्र कॉलेजांत इंग्रजीचे प्रोफेसर झाले तेव्हां इग्रजी वाङ्मयाच्या आवडीमुळे त्यांचा माझा स्नेह जमला होता. आणि इंग्रजी लिहिण्याची आवड असल्याने ते मराठा पत्रांत लिहून मला मधून मधून मदत करीत. तात्पर्य, ऐतिहासिक कागदपत्रांच्या सग्रहाला जागा मिळवून देऊन इतिहास सशोधनाच्या कार्याला पहिली एक मदत मी केली. मोठ्या गोष्टीचा उगम लहानातच कसा असतो याचे हे एक उदाहरण म्हणून देण्यासारखे आहे. या उपक्रमानतर पांच वर्षांनी राजवाडे याच्या स्फूर्तीने, पोतदार यांच्या गुरुभक्तीने, काशिनाथपंत साने यांच्या प्रोत्साहनाने, दत्तोपंत आपटे, शकरराव जोशी, आबा चांदोरकर, पांडुरग नरसिंह पटवर्धन यांच्या इतिहास सशोधन–प्रेमाने, आणि तात्यासाहेब मेहेदळे यांच्या अभिजात औदार्याने, मेहेदळे यांच्या वाड्यांत भारत इतिहास मंडळाची स्थापना झाली. पुण्यांत १९०५-०६ सालाइतक्या पूर्वीहि नव्या कल्पना निघत. पण तेव्हां त्या कल्पनांतर्गत कामाचा व्याप थोडा असे, आणि जागा इमारती वर्गण्या याहि थोड्या असत. वंगभंग, स्वदेशी अशा चळवळींतील टिळकांच्या व्याख्यानाला गर्दी किती झाली असे सांगावयाचे तर सार्वजनिक

सभेचा दिवाणखाना भरून गेला असे सांगून भागत असे. पण गुदस्ता नेहरु व सावरकर यांच्या व्याख्यानांना लाऊड स्पीकरहि अपुरे पडले !

**नाट्यसंमेलन**—१९०६ साली किर्लोस्कर नाटक गृहाच्या प्रवेशाचा आणि किर्लोस्कर नाटक मंडळीच्या ज्युबिलीचा असे दोन समारंभ चांगले झाले. त्यांत कांहीं प्रमुख भाग माझ्याकडे होता. तसेंच त्या साली नाशिक येथे भरलेल्या नाट्य संमेलनाचे अध्यक्षपदहि किर्लोस्कर मंडळीने मलाच दिले होते. या प्रसंगाच्या भाषणाकरितां मी भरताचार्यांचे नाट्यशास्त्र मुद्दाम वाचले असे स्मरते. आणि नाट्य संमेलनाच्या अध्यक्षाची जी एकंदर भाषणे आजवर झाली त्यांत माझ्या भाषणाचा नंबर बराच वर लागेल असे मला वाटते.

**विलायतेंतील चळवळ**—१९०४ पासून विलायतेत लिबरल पक्षापुढे जाणारा मजूर पक्ष हळुहळू संघटित होत होता. लिबरल पक्षाला हा आपला प्रतिस्पर्धी असा वाटत असल्यामुळे तो या नवीन पक्षापासून फटकून रहात असे. पण विलायतेत राजकारणामध्ये जो पक्ष अधिकांत अधिक पुढे जाणारा त्याच्याशी ऋणानुबंध बांधल्यानेंच हिंदुस्थानचे झाले तर कल्याण होईल अशी दादाभाई प्रभृतींची समजून असल्याने ते ॲमस्टरडॅम येथे भरलेल्या मजूरपक्ष परिषदेला लंडनहून गेले होते. ही गोष्ट सर विल्यम वेडरबर्न ( ते लिबरल पक्षाचे म्हणून ) यांनाहि मनांतून फारशी आवडली नाही असे म्हणतात. आणि एक वेळ प्रवाद असा होता की मेथाप्रभृति मुंबईच्या पुढाऱ्यांनीहि वेडरबर्न यांच्या सूचनेवरून दादाभाईंच्या धोरणाविषयी नापसंती खासगी रीतीने दर्शविली होती.

१९०४ च्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेमध्ये हिंदुस्थानांत व विलायतेत राष्ट्रीय सभेचे काम जोराने करावे असे ठरले. त्याची अंमलबजावणी १९०५ च्या मे महिन्यांत कांहीं थोडी झाली. तारीख ३ मे रोजी फेरोजशहा मेथा यांच्या अध्यक्षतेखाली जाहीरसभा भरून त्यांत इंग्लंडला शिष्टमंडळ पाठविण्याचे ठरले. सर डब्ल्यु वेडरबर्न व टिळक यानी कॉंग्रेसमध्ये मांडलेल्या ठरावाअन्वये हे डेप्युटेशन जावयाचे होते. सभेनें प्रोफेसर गोखले व बॅरिस्टर महमद अल्ली जिना या दोघांना शिष्टमंडळाचे घटक म्हणून पाठवावे असा ठराव केला. विलायतेंतील राजकारणांत हिंदुस्थानचे हित पाहणारा असा एखादा वेगळा पक्ष निर्माण करावा असा हे शिष्टमंडळ पाठविण्याचा हेतु होता. पण हा पक्ष लिबरलपक्षाच्या अंतर्गत असला तरी

म्हणून एक मंडळ नेमले. तिच्या चिटणीसाच्या जागी म. रा. बोडस यांची नेमणूक करण्यांत आली.

ता. १५ ऑगस्ट रोजी बोडसानी दोन-तीनशे पुढाऱ्यांना उद्देशून एक पत्रक काढून मते मागविली. ती पुढील आक्टोबरपर्यंत येत होती ( यापैकी मतप्रदर्शक कांही पत्रे मी टिळक-चरित्र खंड २, भाग ७, यात दिली आहेत तीं वाचण्यासारखी आहेत. ) या मताचा निष्कर्ष काढून निर्णय करण्याकरितां कलकत्ता येथे ता. ७ नोव्हेंबर रोजी अमृत बझार पत्रिकेच्या कचेरीत निमंत्रित पुढाऱ्यांची खासगी सभा भरविण्यात आली. तिला मी, चिंतामणराव वैद्य, शिवरामपंत परांजपे, डॉ. मुंजे इत्यादि लोक गेलो होतो. सभेला नेमस्त पक्षाचे भूपेंद्रनाथ बसूप्रभृति कांही लोकहि हजर होते.

कलकत्त्याच्या या सभेत बंगालच्या पुढाऱ्यांनी असे आश्वासन दिले की, समेट होणे शक्य आहे, म्हणून वेगळी राष्ट्रीय सभा तूर्त भरवू नये. पण तसे न घडल्यास मद्रासच्या कॉंग्रेसला आपल्यापैकी कोणी जाऊ नये. दरम्यान बंगाल्यांतील नेमस्तांची सभा १५ नोव्हेंबर रोजी भरावयाची होती ती भरली. पण तीत समेटाला फारशी आशा उरण्यासारखे ठराव झाले नाहीत. अर्थात् वेगळी राष्ट्रीय सभा भरविणे हे आवश्यक आहे असे त्या विचाराचे लोक म्हणू लागले. या संबधांत नागपूरच्या लोकानी राष्ट्रीय सभेचे आमंत्रण पूर्वीपासून दिलेलेच होते. म्हणून त्याचा विचार करण्याकरिता ' कॉंग्रेस कंटिन्युएशन ' कमिटीची सभा मुंबईस ता. २८ नोव्हेंबर रोजी ' राष्ट्रमत ' कचेरीत भरण्याचे ठरून चिंतामणराव वैद्य याच्या सहीने निमंत्रणपत्रे गेली. त्याप्रमाणे सभा भरली. या सभेत एक किंवा दोन मते विरुद्ध पडून नागपुरास वेगळी कॉंग्रेस डिसेंबरांत भरविण्याचा ठराव झाला. या दोन भिन्नमतवाल्यापैकी मी एक होतो ! मी भिन्न मत देण्याचें कारण असे सांगितले की, " एकट्या महाराष्ट्राने वेगळी राष्ट्रीय सभा भरविण्याची जबाबदारी घेऊ नये. सुरू केली व मग मोडली असे न व्हावें. परप्रांतांतले कांही लोक अशा सभेला येतील की नाही हे अजून पूर्ण अजमावले गेले नाही. जे गेले आहे त्यावरून थोडीशी डळमळच दिसते. विशेषतः बंगाल्यांत उभयपक्षांमध्ये वैमनस्य कमी हे पबना येथील सभेवरून दिसून आले आहे. कन्व्हेन्शनवाल्या नमस्तांच्या सभेत ता. १५ रोजी जरी हवे तसे अनुकूल ठराव झाले नाहीत, तरी त्यांना एकदम सोडून स्वतंत्र राष्ट्रीय सभेला बंगालचे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी

येणार नाहीत. त्यांच्यापेक्षां आमच्यावर मोतीबाबूंचे प्रेम अधिक आहे हे खरे. तरीपण ते वेगळे, आणि स्वतत्र राष्ट्रीय सभेला येऊन मिळणे वेगळे. ते नेहमीच्या राष्ट्रीय सभेलाहि फारसे जात नाहीत मग आमच्या सभेला या स्थितीत कसे येतील ? अर्थात् परप्रांतांतील लोक यथाप्रमाण येत असल्याशिवाय नुसत्या महाराष्ट्रीयानी स्वतत्र 'कॉंग्रेस' भरविणे योग्य नाही. नागपुराखेरीज इतर कोणत्याहि प्राताने अशी सभा आपल्या प्रातात भरवू असे आजवर म्हटलेले नाही. तसेच 'समितीच्या कायद्या'ने सरकार नागपूरची सभा बद करण्याचा सभव आहे. आणि ती बद केली तर विनाकारण आपण थप्पड खाऊन बसलो असे होईल म्हणून वेगळी राष्ट्रीय सभा न भरविता महाराष्ट्रापुरते एक राष्ट्रीय पक्षाचे कॉन्फरन्स भरवावे. ''

**स्वतंत्र कॉंग्रेसला बंदी**—तथापि नागपुरास स्वतंत्र राष्ट्रीय सभा भरविण्याचा विचार कायम ठरला व त्याप्रमाणे नागपुरास राष्ट्रीय मडळाने आपले स्वागत-मडळ बनवून सर्व तयारी केली अशा प्रकारची सभा भरणार असे ठरल्यामुळे प्रत्येक प्रातात नव्या पक्षाचे असे जे थोडेबहुत लोक होते त्यांनी सहजच डोके वर काढले. त्यांना ह्या चळवळीने उत्तेजन आले. आणि चारदोनच कां होईनात पण आपल्या पक्षाचे प्रतिनिधि नागपुरास जावे अशा इच्छेने त्यांनी निवडणुकी करण्यास प्रारभ केला. स्वयसेवक मंडळाची योजना झाली. उतरण्याची व जेवण्याची जागा मंडप या सर्व व्यवस्थेला नागपूरची मंडळी उत्साहाने लागली. येऊन जाऊन अध्यक्षच काय तो ठरावयाचा होता. इतक्यांत लोकांनी अदमास केला होता त्याप्रमाणे घडले. अस्मानी–मुलतानी प्रकार झाला. तारीख ११ डिसेबर रोजी नागपूर येथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने क्रिमिनल प्रोसिजर कोड १४४ प्रमाणे नोटीस काढली, व असे फर्मावले की "नागपूर येथे होऊ घातलेली २४ वी राष्ट्रीय सभा सरकारकडून बद करण्यांत आली आहे. ११ जानेवारी १९०९ पर्यंत स्वागत-मडळाने या राष्ट्रीय सभेसंबंधाने कोणतीहि जाहीर सभा भरवूं नये. कोणत्याहि इमारती उभारूं नयेत. चालू काम असेल ते बंद करावे. मंडप वगैरे घालूं नयेत." या हुकुमानें राष्ट्रीय पक्षाच्या राष्ट्रीय सभेचे सगळेच गाठोडे नोकरशाहीच्या खुंटीला लागले. या हुकुमाविरुद्ध स्वागत-मंडळाने बरीच तक्रार केली. परंतु सर्व तक्रारी ऐकून घेऊन मॅजिस्ट्रेटने फिरून १६ डिसेंबर रोजी पूर्वी केलेला हुकूम कायम

केल्याचा पक्का हुकूम केला. त्यामुळे स्वागत-मंडळाचे चिटणीस डॉ. मुंजे व नारा-यणराव अळेकर यांनी राष्ट्रीय सभा भरत नाही असे जाहीर केले, आणि झालेली हकीकत 'कॉंग्रेस कंटिन्युएशन कमिटी'च्या अधिकाऱ्यांकडे कळविली.

पण अशा रीतीने नागपूरची सभा बंद झाली तरी बंदीचा हुकूम नागपूर पुरताच असणार यामुळे ती सभा दुसरीकडे का भरू नये अशी पृच्छा कित्येकां-कडून होऊ लागली. कित्येक वर्तमानपत्रांतून अशा अर्धवट बातम्याहि प्रसिद्ध झाल्या की, नागपूरची सभा रहित झाली ती मुंबईस भरणार आहे. वास्तविक नागपुरास बंदीचा हुकूम काढण्याची सरकारची जी कारणे तीच मुंबईसहि लागू होती. म्हणून मुंबईस सभा भरवावी या सूचनेत अर्थ नव्हता. आणि ती भरविली जाणार या वदतेवर कोणी विश्वास ठेवण्याचे कारण नव्हते. पण तशा बातम्या प्रसिद्ध होऊ लागल्यामुळे माधवराव बोडस यांनी वर्तमानपत्रांतून स्पष्टपणे जाहीर केले की "मुंबईस सभा भरणार ही गोष्ट खोटी. तसा विचारच नाही. आणि कोणीहि ही वदता खरी मानू नये" बोडस हे व्यक्तिशः वेगळी राष्ट्रीय सभा भरविण्याच्या विरुद्ध होते. एवढेच नव्हे तर, नागपूरची सभा बंद झाली हे ऐकून त्यांना मना-तून आनंद झाला. आणि त्यांनी तो ताबडतोब मराठा पत्राच्या द्वारे व्यक्त केला. ते लिहितात, "मुंबईस सभा भरणार ही गोष्ट कॉंग्रेस कंटिन्युएशन कमिटीला मान्य नाही व माहितीहि नाही. राष्ट्रीय सभा वेगळी भरवावी या गोष्टीला मी पहिल्या पासून विरुद्ध आहे मी संयुक्त राष्ट्रीय सभेच्या कल्पनेचेच सतत समर्थन केले आहे. एकतर्फी राष्ट्रीय सभा भरविणे हे इष्ट नाही. तिला लोकांच्या दृष्टीने काही किंमत असणार नाही. उद्यां नेमस्त लोकांना अधिक शहाणपणा सुचून त्यांचा पक्षाभिमान हटेल व संयुक्त राष्ट्रीय सभा भरेल अशी मला आशा आहे. नेमस्त पुढाऱ्यांबद्दल व्यक्तिशः मला अत्यंत आदर वाटतो, व लॉर्ड मोर्ले यांच्या सुधार-णांच्या योजनेतून दरम्यान कांहीं भरीव असा फायदा हाती लागेल अशी आपण सर्वांनी आशा करावी हे योग्य आहे. नागपूरच्या अधिकाऱ्यांनी सभाबंदीचा हुकूम काढला हे दिसण्यांत संकट असलें तरी वस्तुतः ती ईश्वराची कृपाच होय. कारण आमचे नागपूरचे उत्साही मित्र जी मोठी चूक करणार होते ती अशा रीतीने परस्पर बचावली गेली."

नागपूरची सभा थांबल्यानंतर राष्ट्रीय पक्षाची वेगळी कॉंग्रेस भरण्याची कल्पना पुढे केव्हां निघालीच नाही. मात्र १९०८-१४ या वर्षांत नेमस्तांकडून

राष्ट्रीय सभा या नावाने भरविली जाणारी सभा रोडावत जाऊन लोकांत अप्रिय झाली होती. आणि संयुक्त राष्ट्रीय सभा भरवू इच्छिणारा पक्ष हळुहळू बळावत होता.

टिळकांचा खटला, त्यावरील अपील, विलायतेतले अपील, व संयुक्त राष्ट्रीय सभेची खटपट या संबंधाने या अवधीत मला स्वतःला आलेली कांहीं पत्रे या खाली देत आहे:—

(ता. १७ जुलै १९०८)—"सहज २६ जूनचा एका इंग्लिश वर्तमानपत्राचा अंक विकत घेतला. त्यात असे आढळले की, बळवंतरावाना पकडण्यात आले. तुम्ही लिहिल्याप्रमाणे या दिवसात सरकार काय करील, काय न करील याचा नियम नाही हे तर खरेच. पण ज्या पत्रात ही बातमी होती त्यांतच टिळकांच्या लेखाचा जो साराश म्हणून दिला होता त्यावरून मला वाटते की, ते लेख १८९७ साली शिक्षा झालेल्या लेखांहून कमी कडक आहेत. बळवंतराव आपला खटला स्वतः चालविणार या गोष्टीने त्यांच्या पक्षाच्या दृष्टीने फायदा होईल हे खरे. पण स्वतः त्यांचे माव नुकसान होईल असे मला वाटते पण मी खुळा मनुष्य पत्रांत हे जे लिहितो ते काय? तुमच्या हाती हे पत्र पोचण्यापूर्वीच कदाचित् खटल्याचा बरा-वाईट निकालहि लागून गेला असेल. बळवंतरावांना या प्रसंगी एखाद्या लेखापेक्षां स्वतःचे समर्थन अधिक करावयाचे आहे. म्हणून स्वतःचा डिफेन्स देतांना त्याच्या मनांतले विचार पुढे येऊन त्यांचाहि दोष त्यांच्या युक्तिवादाला बाधाव-याचा!" (श्री. मो. साने, जर्मनी.)

(ता. ३ ऑगस्ट १९०८)—"टिळकांच्या खटल्याचा निकाल ऐकून इकडे सर्वांना फार वाईट वाटले. त्यांची आमची मते जुळत नसतील. पण त्यांची बुद्धिमत्ता त्यांचे मनःस्वातंत्र्य व त्याची देशभक्ति याविषयी कोणाचाहि मतभेद नाही. त्या बाबतीत त्यांचे कौतुक करावे मान द्यावा तेवढा थोडाच आहे. स्नेही या नात्यानें मी तुम्हाला लिहितो की, या दिवसांत तुम्ही फार जपून लिहा. हे वाचून तुम्ही म्हणाल 'नटेसन तू भित्रा आहेस!' तसे वाटेल तर म्हणा. पण उगीच दगडाला टक्कर देण्यांत तरी काय अर्थ असे मीहि तुम्हाला विचारतो.' (जी. ए. नटेसन, मद्रास.)

(ऑगस्ट १९०८)—"माझे खटले कोर्टात केव्हां निघतील याची कल्पना नाही. डिसेंबरापूर्वी ते निघत नाहीत. या खटल्यामुळे इंग्लंडला जाण्याचा

तूर्त थांबलो. विलायतेस गेलो तरी माझ्या हद्दपारीसबधाने कोणतीहि खटपट करण्याचा माझा विचार नाही. मात्र भाषणांतून त्यांवर टीका करीन. तेथे एक वर्षभर राहून राजकीय चळवळींचे व ग्रंथ लेखनाचे काम करण्याचा माझा विचार आहे. ब्रिटिश न्यायदेवतेवर माझा विश्वास नाही. टिळकाच्या खटल्यात अपील करून काही फायदा होईल असे मला वाटत नाही मात्र त्या खटपटीकरिता तुम्ही किंवा कोणी जात असेल तर टिळकाच्या सबधाने इतर खटपट करण्याला मीहि जाईन. तुम्ही व दाजीसाहेब खरे जाल तर चागले होईल. मी तुमच्या बरोबर येईन. मात्र त्याकरिता शक्य तितके लवकर गेले पाहिजे." ( लाला लजपतराय, लाहोर.)

(ता. ८ ऑगस्ट १९०८)—"टिळकांच्या खटल्याची समग्र हकीकत एका मोठ्या पुस्तकाच्या रूपाने तुम्ही काढीत आहा असे पत्रांत वाचले. सखाराम गणेश देऊस्कर याची इच्छा बगालीत या खटल्याची हकीकत प्रसिद्ध करण्याची आहे. केसरी-मराठ्यातील हकीकत त्रोटक असणार. म्हणून देऊस्कर यांची तुम्हाला अशी विनती आहे की, या पुस्तकाचा प्रत्येक फॉर्म छापून झाल्याबरोबर त्याची एक प्रत त्यांच्याकडे पाठवावी. म्हणजे ताबडतोब ते भाषातर करून घेतील." ( बाबूराव पराडकर, कलकत्ता.)

(ता. १५ सप्टेंबर १९०८)—"हाइंडमन यांची गांठ पडल्याचे मागील पत्री लिहिलेच आहे. आज नेव्हिनसन, रॅडक्लिफ व कॉटन याना नॅशनल लिबरल क्लबांत भेटलो. गोखले याचा हात दुखावला म्हणून ते परत आले आहेत. जर्मनीत त्याचा हात दुखावला. उद्या ऑक्सफर्ड येथे विश्वधर्म परिषद भरणार आहे तिला मी जातो. नेव्हिनसन म्हणाले 'तुम्ही ही साधि वाया दवडू नका.' तेथे प्रतिष्ठित लोक येतात. जो तो म्हणतो की रुफस आयझॅक्स यांनाच वकीलपत्र द्या. ते फौजदारी कामकाजांत अतिशय उच्च दर्जा मिळविलेले बॅरिस्टर असून शिवाय पार्लमेंटचे सभासद आहेत. आमचे वकिलपत्र घेण्याला त्याना सवड सांपडेल की नाही याविषयी शकाच वाटते. पण मागेल ती फी देऊ. नाहीतर काय करणार !" ( ग. श्री. खापर्डे, लंडन. )

( ता. २२ सप्टेंबर १९०८ )—तुम्ही माझ्या साहेबी टोपीला म्हणून सलाम पाठविला. पण मी माझा नेहमीचा रुमालच अजून ठेवला आहे. परकीय लोकांच्या अशा पोषाखाची लंडनच्या लोकांना अलीकडे थोडीबहुत संवय झाली आहे. म्हणून

पूर्वीप्रमाणे फारसा त्रास होत नाही. तरीपण एक टोपी घेऊन ठेवलीच आहे. ती एखाद वेळ डोक्यावर ठेवून आरशात पाहून मी खूप हसतो, व मला टोपी घातलेला पाहून तेथ्यांनाहि हंसू येईल. टिळकांच्या अपीलाच्या कामी डालग्यॅडो नांवाचे एक सॉलिसिटर आम्ही केले आहेत. पारीख या नांवाचे एक बॅरिस्टर इकडे दहा वर्षे धदा करीत आहेत त्यांना दुय्यम म्हणून नेमू. सर हेन्री कॉटन याचे चिरंजीव यांनीहि काम करण्याचे कबूल केले आहे. आता मुख्य बॅरिस्टर कोण मिळतो पाहावे. रुफस आयझॅक्स की, सर एडवर्ड क्लार्क ? आज दोघेहि सर्वात श्रेष्ठ बॅरिस्टर आहेत. आणि दोघेहि सारखेच हुशार आहेत. टिळकाच्या खटल्याला अर्धवट राजकारणाचे स्वरूप आहे म्हणून हुशार बॅरिस्टर असून शिवाय व्यावहारिक मुत्सद्दी असा असेल तर अधिक बरे. खुद्द पार्लमेंटमध्ये चळवळ होण्याचा सभव हल्ली फारच कमी दिसतो. कारण सरकारी कामाकरितांच प्रधानमडळाने सर्व दिवस आखून घेतले आहेत. तेव्हां खासगी सभाषणातून काय लाभ होईल तेवढा खरा " ( ग. श्री. खापर्डे, लंडन. )

(ता. ३० सप्टेंबर, १९०८)—"तुम्ही तिकडील मडळी सहजच निराश झालेली दिसता. पण प्रयत्नाखेरीज आपण कोणीहि काय करणार ? मेरिडिथ येथे सर विलियम वेडरबर्न यांची गाठ घेतली. केवढा त्यांचा वाडा व केवढी त्याची उद्यानभूमि ! स्वागतपूर्वक ते माझ्याशी पुष्कळ बोलले. सर एडवर्ड क्लार्क यांच्यापेक्षां ते रुफस आयझॅक्सच अधिक पसत करतात. राष्ट्रीय सभा फिरून संयुक्त पक्षाची व्हावी असा प्रयत्न एक दोन वर्षे तरी आणखी करावा असे त्यांचे म्हणणे आहे. नेव्हिनसन यांनी मला फराळास बोलाविले होते. लजपतराय, पार्लमेंटचा एक सभासद, व वर्तमानपत्रांच्या धद्यांतील तीन लोक तेथे होते. या लोकांची माझी ओळख व्हावी म्हणूनच नेव्हिनसन यांनी इतका खर्च केला. लजपतराय हे आपण इकडे कां आलो हे नीट सांगत नाहीत. मुलाला इकडील एका शाळेत ठेवण्याचा त्यांचा हेतू असावा. बिपिन पालहि येथे आहेत. लेखकाचा धंदा करून इकडे राहण्याचा त्यांचा विचार दिसतो. बॅप्टिस्टा यांनी हायकोर्टाकडे अर्ज देतांना फारच चांगले भाषण केले. दादासाहेब करंदीकर यांच्याबरोबर कागदपत्र येताच अपील अर्ज दाखल करूं. टिळकांच्या खटल्याचे पुस्तक तुम्ही काढले त्याची प्रत आतांच पोचली. त्याची प्रस्तावना तुम्ही फारच हुषारीने व कुशलतेने लिहिली आहे. म्हणून या पुस्तकाच्या पाठविता येतील

तितक्या प्रती इकडे पाठवा. म्हणजे त्या हळूहळू इकडच्या मंडळींत पेरण्याचा माझा विचार आहे." (ग. श्री. खापर्डे, लंडन.)

( ३० सप्टेंबर, १९०८ )—" टिळकांच्या खटल्याची हकीकत लक्षपूर्वक वाचीत आहे. त्यांच्या पहिल्या खटल्याचे अपील ने. ना. ॲस्क्विथ यांनी प्रिव्हि-कौन्सिलपुढे चालविले तेव्हा मी कोर्टात हजर होतो. बादशहाकडे अपील करण्या-संबधाने काही तरी जोराची चळवळ का होऊ नये ? हाइडमन वगैरे लोक तिक-डेहि चळवळ करतील आमचा हिंदी ख्रिश्चन समाज या बाबतीत चळवळ कर-ण्याला तयार आहे. चिदंबरम पिले याचे अपीलहि पुढच्या पाच तारखेला निघणार आहे. अपीलांत कदाचित् त्याची शिक्षा कमी होईल. त्याचा खटला मी चालविला. त्यांच्याकरिता एक फंड जमविण्याचा माझा विचार आहे व त्यातील २–३ हजार रुपये बिचाऱ्या त्याच्या कुटुंबालाहि द्यावे असे वाटते. तुमची काही पत्रे मला उशिरा पोचली, त्याचे लिफाफे मी तपासून पाहिले नाहीत तरी पण पत्रे उघडून पहाण्याचा त्रास इकडे कमी आहे." ( पॉल पीटर पिले, मदुरा. )

( ६ नोव्हेंबर, १९०८ )—" बादशहाचा जाहीरनामा वाचला. राजकीय गुन्हेगाराना माफी देण्याचे त्यात लिहिले आहे तेहि पाहिले. या माफीचा फायदा बळवंतरावाना मिळेल काय ? मला वाटते कांही झाले तरी त्यांना जानेवारीपूर्वी सोडणार नाहीत. या आठवड्यात येथे मोठी खळबळ उडाली आहे. डेली टेलिग्राफ पत्रांतील मुलाखत वाचून जर्मन वर्तमानपत्रे उसळली आहेत, व कायसरने अधिकाराचा अत्याचार केला असे म्हणत आहेत. चॅन्सेलर फॉन ब्यूलो यांनी सर्व जबाबदारी आपणांवर घेऊन राजीनामा देऊ केला. पण तोहि बादशहाने घेतला नाही. मोरोक्कोमधील फ्रान्स व जर्मनी याची चुरस फार वाढली असून युद्धाच्या गोष्टी लोक बोलूं लागले आहेत." ( श्री. मो. साने, जर्मनी.)

( १० डिसेंबर, १९०८ )—" आज टिळक असते तर त्याचे मन मी वळवू शकलो असतो. पण त्यांच्या अनुयायांचा तेवढा मजवर विश्वास दिसत नाही ! डॉ. मुंजे यांना मी पत्र लिहिले आहे त्याचा सारांश असाः—

" तुम्ही आपलेच मत घेऊन बसला आहा. तरी मला जे वाटते ते तुम्हांला लिहितो व ते माझे मत कायम आहे. आम्ही आज वर्षभर संयुक्त कॉंग्रेस झाली तरच कॉंग्रेस, नाही तर कॉंग्रेस नाही, अशी चळवळ केली असती तर मद्रासच्या

कॉंग्रेसला तुम्हाला बराच गौणपणा आणता आला असता, व एक दोन वर्षात तुम्हांला राष्ट्रीय सभा काबीज करता आली असती. आम्ही इकडे कॉंग्रेसला जाऊन मिळालो नाही. आणि एक प्रकारची तटस्थ वृत्ति धरून बसलो आहो. पण तुम्ही जर वेगळी कॉंग्रेस काढली तर आधीच जे दोन पक्ष आहेत त्याचे तीन होतील, व तुम्ही आम्ही एकमेकातच झगडल्यासारखे होईल. तुमच्याप्रमाणेच आमचेहि म्हणणे असे की प्रतिज्ञापत्रक नसावे. या दृष्टीने तुमचे आमचे अधिक जुळते ही गोष्ट खरी. राष्ट्रीय पक्षावर स्टेटस्‌मन वगैरे पत्रातून हल्ले होतात त्याना पत्रिका उत्तर देत असते. पण वेगळ्या कॉंग्रेसचे समर्थन करवत नाही. पबना येथील आमच्या ठरावाप्रमाणे कोणत्याच कॉंग्रेसला जावयाचे नाही असे आम्ही ठरविले आहे तरी पण वेगळी कॉंग्रेस निघाली म्हणजे एखाद दुसरा इकडे जाईल, एखाद दुसरा तिकडे जाईल. तुम्ही आम्ही सर्व एक विचाराने आवळून बसलो तर मेथा वगैरे लोकांना कठिण जाईल ! वेगळी सभा काढून बंगालची सहानुभूति यावेळी घालवू नका." ( मोतीलाल घोस. देवघर, बंगाल. )

( ता. १५ जानेवारी, १९०९ )—"टिळकांच्या खटल्याचे ब्रीफ रुफस आयझॅक्स् यांनी परत केले असे ऐकतो. माझे मत असे आहे की टिळकांच्या स्नेह्यांनीच घात केला. त्याना बेफामपणे बोलता येते पण आपली टिमकी ऐकू जाईल अशी कशी वाजवावी हे त्यांना कळत नाही. राष्ट्रीय पक्षात पुष्कळ बखेडे झाले आहेत. त्यांतील अनेकांचे एकमेकाशी पटत नाही. तरी मोर्ले याच्या सुधारणावर राष्ट्रीय पक्षाचे म्हणणे काय आहे हे ठरवून प्रसिद्ध करण्याकरिता एक परिषद भरवावी. बाबू मोतीलाल हे मला लिहितात की नवीन लेफ्टनंट गव्हर्नर व व्हाइसरॉयचे प्रायव्हेट सेक्रेटरी यांच्याशी त्याची मुलाखत झाली. त्या दोघाचे म्हणणे असे की सुधारणावर राष्ट्रीय पक्षाचे काय म्हणणे आहे ते सविस्तर सांगा. टिळक आज असते तर ते हीच गोष्ट करते. बहिष्कार व त्याग हा टायमन ऑफ अथेन्सला शोभतो व विलायतेत त्याची बडबड करणे ठीक आहे. पण येथे ते निरुपयोगी आहे. रा. ब. जोशी याचेहि मत असेच आहे. तरी त्यांचाहि विचार घेऊन काय ते लौकर ठरवा." ( म. रा. बोडस, मुंबई. )

( ता. १८ फेब्रुवारी, १९०९ )—"नॅशनल पब्लिशिंग कंपनीची सभा झाली. त्यांच्या विनंतिप्रमाणें 'राष्ट्रमत' हे पत्र तुम्ही घेऊन आपल्या जबाबदारीवर

चालवाल काय ? तसे केले तर आम्ही फार आभारी होऊ." ( दि. धो. साठ्ये, डॉक्टर, मुंबई. )

(ता. ७ एप्रिल, १९०९ )—"लॉर्ड मोर्ले यांच्या योजनेवर आपण परिषद भरवून ठराव केले त्याच्या छापील प्रती आपण इकडे पाठविल्या. त्या पार्लमेंटच्या सभासदामध्ये वाटण्याची मी खटपट करीत आहे मोर्ले हे लिबरल पक्षाचे असल्यामुळे त्या पक्षाचे लोक तुमचे ठराव उचलून धरणार नाहीत कॉन्झर्व्हेटिव्ह लोकांविषयी बोलावयासच नको म्हणून मजूरपक्ष व आयरिश नॅशनॅलिस्ट पक्ष याच्यांत पुष्कळशा प्रती वाटल्या. मी परत निघण्यासंबधाने केरहार्डी म्हणतात की मे अखेरपर्यंत तुम्ही इथे राहा. ते पार्लमेंटच्या इंडिया कमिटीपुढे हे प्रकरण ठेवणार आहेत ते झाल्यावर मी मे जूनच्या सुमारास निघतो व नंतर बर्लिनला जाऊन साने यांना भेटून तिकडे परत येईन. " ( ग. श्री. खापर्डे, लंडन. )

( ता. १० सप्टेंबर, १९०९ )—हुगळी येथील परिषदेने संयुक्त राष्ट्रीय सभा भरविण्याकरितां एक कमिटी नेमली आहे. त्यांत सुरेंद्रनाथ व अरविंद घोषहि आहेत. पंजाबातील लोकमतहि याच बाजूचे आहे. मध्यप्रांतचेहि तसेच. इतर ठिकाणीं जिल्हा-सभांतून असेच ठराव होत आहेत. तरी पुणे सार्वजनिक सभेने आपलीहि एक कमिटी नेमावी व बंगाल व इतर प्रांतातील पुढाऱ्याशी सहकारिता करण्यास तिला सांगावें. " ( ग. व्यं. जोशी, पुणे.)

(ता. २८ डिसेंबर, १९०९)—"येथे पुष्कळ लोकांशी मी समेटाविषयी चर्चा केली. त्यांचे म्हणणे नेमस्त लोकांना परत आणून सर्वांची एकच कॉंग्रेस करावी. असे करताना व पुढेहि कडक भाषा व व्यक्तिविषयक टीका परस्पर टाकून दिली पाहिजे! कलकत्ता येथील १९०६ च्या कॉंग्रेसचा ठराव हे सर्वांना समान अधिष्ठान आहे. इतर गोष्टी गौण मानाव्या. आपटे, भानु, लिमये, यांच्याशी मी पुण्यास आल्यावर चर्चा करीन व नंतर काहीतरी समेटाचा मार्ग हुडकून काढू." ( बळवंत बाबाजी देशपांडे, नगर. )

# अधिकारयोगाचा उत्तरार्ध

मी केसरीचा संपादक झालो व खाडिलकर यांनी केसरी कचेरी सोडून दिल तेव्हांपासून मला अंतर्बाह्य निश्चिंतता लाभली. आणि त्यापुढील पांच वर्षे, अनेक विषयाचा अभ्यास करून, केसरीत लेख लिहिण्याची हौस मला फेडून घेतां आली. जॅक्सनच्या खुनाचा खटला संपल्यानंतर महाराष्ट्रांत एक प्रकारची उदासीनता व निष्क्रियता आली. वायु झालेला मनुष्य ती लहर जोरांत असता आपल्या आवाक्या-बाहेर शारिरिक श्रम करतो; तो वायूचा झटका उतरला म्हणजे प्रतिक्रिया होऊन निपचित पडतो; व वायूच्या लहरीपूर्वी त्याच्या अंगात जितके त्राण असते तित-केहि त्या लहरीचा उपमश झाल्यावर उरत नाही. तशी स्थिति महाराष्ट्राची झाली. नवे नवे वाद किंवा नवे नवे उपक्रम सुरू करणारे टिळक तुरुंगात डांबून बसले. राष्ट्रीय पक्षाने राष्ट्रीय सभेवर बहिष्कार घातला पण त्या ऐवजी स्वतःची अशी संघटना त्याने काहीच केली नाही. " टिळक परत येतील व मग जे काय कराव-याचे ते करतील " असाच हवाला जो तो देत होता !

दुसरे पक्षी, पूर्वी राष्ट्रीय पक्षाचे लोक राष्ट्रीय सभेत असताना जरी कलह होत तरी त्यामुळे राजकारणात जागृति राहिली होती. पण सुरतेच्या राष्ट्रीय सभेनंतर राष्ट्रीय पक्ष बाहेर पडून जरी नेमस्त पक्षाला एकतंत्री राज्य लाभले, तरी त्या राज्यांत काही स्वारस्य उरले नाही. विरोधामुळेच पुष्कळ गोष्टींना महत्त्व व तेज रहाते. पण तो विरोध संपला म्हणजे ते तेज नाहीसे होते. रस्सीखेचीच्या खेळांत दोन पक्ष दोहोकडे ओढीत असतात तो पर्यंत त्यांच्या हातातील दोर लोखंडाच्या कांबीसारखा ताठ रहातो; व दोन्ही बाजूचे गडी पवित्र्यावर उभे राहून आपली शक्ति प्रगट करण्याची कमाल करीत असतात. पण ताण ऐन जोरांत असतां दोर तुटला, किंवा एका बाजूच्या लोकांनी अवचित तो सोडून दिला, तर दुसऱ्या बाजूचे लोक नुसते कोलमडून पडतात ! त्याप्रमाणे राष्ट्रीय पक्ष निघून गेल्यामुळे राष्ट्रीय सभेची दुर्दशा झाली. राष्ट्रीय पक्षाबरोबर त्या पक्षांत सामील नसलेल्या अशाहि अनेक लोकांनी राष्ट्रीय सभेला जाण्याचे सोडले. सर फेरोजशहा मेथा प्रभृति लोक आळशी व मिजासी असल्यामुळे, राष्ट्रीय सभेला जाऊन सर्व वेळ हजर राहून निरनिराळ्या युक्त्यांनीं तिला महत्त्व आणून ती चित्ताकर्षक करण्याचे काम

त्यांच्या हातून झाले नाही. सभेचे ठराव म्हणजे मिळमिळीतपणाचे प्रदर्शन होऊं लागले. प्रतिनिधीची संख्या रोडावत चालली. १८९० च्या सुमाराला ही प्रतिनिधींची सख्या जी दोन हजारापर्यंत गेली होती ती १९१२–१९१३ च्या सुमाराला अवघ्या ३०० वर येऊन ठेपली. आणि अध्यक्षहि मुधोळकरासारखे लाभूं लागले होते. म्हणजे असे की, त्यांच्या भाषणांत, युक्तिवादांत, कृतीत, नुसत्या राजकीय तेजस्वितेचाच अभाव नव्हे तर मूर्तिमत रुक्षपणाचा अवतार प्रगट होऊं लागला होता.

अशा रीतीने राष्ट्रीय पक्ष कुढून बसलेला, व नेमस्त पक्ष हालचाल करीत असला तरी त्या हालचालीने सरकारच्या तोंडावरची माशीहि न उठणारी ! टिळकांना काळ्यापाण्याची शिक्षा झाल्यामुळे वक्ते व लेखक याच्यावर जरब बसलेली. आणि प्रेस ॲक्ट झाल्यामुळे वर्तमानपत्रेहि सभाळून लिहिण्याची सवय करू लागलेली. अशा स्थितीत चालू राजकारण म्हणून फारसे उरलेले नव्हते. वरिष्ठ कायदे कौन्सिलात होणाऱ्या कामालाच काय ते थोडेबहुत महत्त्व होते. कारण व्यापारी लोक म्हणजे सर इब्राहिम रहिमतुल्ला, सर विठ्ठलदास ठाकरसी, असे कौन्सिलांत शिरल्यामुळे त्यानी व्यापार व उद्योगधंदे याविषयीच्या प्रश्नांना एक नवे महत्त्व प्राप्त करून दिले होते. आणि गोखल्याचे कायदे कौन्सिलातील काम व त्यांच्या विलायतेतील येरझारा हाच काय तो चर्चेचा मुख्य विषय होऊन राहिला होता.

या सुमारास काही वेळ हिंदुस्थानांतील राजकारणा ऐवजी दक्षिण आफ्रिकेतील राजकारणाला महत्त्व आले होते. आजचे महात्मा गांधी तेव्हां नुसते मोहनदास गाधी या नांवाने ओळखले जात असत. त्यानी सत्याग्रहाची चळवळ करून दक्षिण आफ्रिकेतील सरकारास थोडेसे जेरीस आणले होते. विलायतेच्या एका खेपेनतर गांधी यानी गोपाळराव गोखले याना दक्षिण आफ्रिकेस निमत्रण केले. ते तिकडे जाऊन त्यांनी सामोपचार केला तो इकडे फेरोजशहा मेथा वगैरे लोकानाहि आवडला नाही. परतु गोखल्यांच्या प्रोत्साहनाने हिदुस्थानांत वर्गणी जमवून इकडील लोकांनी गाधीच्या चळवळीचा तिकडे पाठपुरावा केला व सक्रिय सहानुभूति प्रकट केली. या वेळची एक मौजेची गोष्ट अशी की, आजचे अनेक कट्टर गाधीभक्त त्या वेळी गांधीना शिव्या देत होते व त्यांची चेष्टा करीत होते. पण उलट केसरीच्या द्वारे मीच पांच हजार रुपये वर्गणी गोळा करून गांधीना पाठविली !

असो. वर दर्शविलेल्या शिवाय इतर विशेष प्रकारच्या चळवळी हिंदुस्थानात तेव्हां चालू नव्हत्या. बंगाल्यांतहि असेच सामसूम होते. अरविंद घोष पॉंडेचरीला जाऊन बसले. त्यांची वर्तमानपत्रे बंद पडली. त्यांच्या लगत्याची मंडळी विस्कळीत झाली. चित्तरंजन दास यांचे नाव पुढे आले होते तरी यावेळी ते स्वतंत्रपणे कांही चळवळ न करिता सर्व वेळ वकिली करून पैसे मिळविण्यातच घालवीत होते. नाही म्हणावयाला एखादा क्रांतिकारक तरुण एखादा अत्याचार करी, व दास बाबूसारखे वकील त्याचा डिफेन्स करण्याला लाभल्यामुळे, अशा लोकांची न्याय-कोर्टातील चौकशी हाच एक मोठा लोकचित्ताकर्षक विषय होऊन रहात असे. महाराष्ट्रांत दडपशाही खप जोरात सुरू होती. समर्थ विद्यालयासारख्या संस्था बेकायदा ठरवून बुडवण्यांत आल्या; व गुप्त पोलिसांच्या कारभाराचा इतका सुळसुळाट झाला होता की त्यांच्या बेसुमार त्रासामुळे व छळामुळे मोठे धीराचे लोकहि हातटेकीस आले.

अशा वेळी केसरी चालविणे हे काम बिकट होऊन राहिले असल्यास नवल नाही. चालू राजकारणाची गर्दी नसल्यामुळे त्यासंबंधी लिहावयाला विषय थोडे आणि रुक्ष मिळत. यामुळे अवांतर विषय घेऊन ते अग्रलेखाच्या रूपाने मी वाचकांपुढे मांडीत असे. १९०९ साली खाडिलकर केसरीचे संपादक असतांच आयर्लंडच्या इतिहासावर मी जी एक मोठी लेखमाला लिहिली तिला राजकारणाचे तरी स्वरूप होते. पण पुढे १९११ साली मी 'संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन' ही लेख-माला लिहिण्याला घेतली तीत राजकारण हुडकू गेले तरी मिळावयाचे नाही. तथापि ती लेखमाला विद्वान लोकांना तर पसंत पडलीच पण सामान्य वाचकांनाहि आवडली; व तिचे एक स्वतंत्र पुस्तकच काढा अशा सूचना मजकडे आल्या. नामदार भूपेंद्रनाथ बसू यांनी विशिष्टविवाहाचे म्हणून एक बिल यावेळी वरिष्ठ कायदेकौन्सिलापुढे आणले होते. त्याला वादग्रस्त स्वरूप असल्यामुळे, चालू राज-कारणाच्या विषयाच्या अभावी, त्याला नसते महत्त्व आले. बसू यांच्या बिलाचे तात्पर्य इतकेच होते की, "सिव्हिल (स्पेशल) मॅरेज आक्टाप्रमाणे विवाह करूं इच्छिणाऱ्या वधुवरांना आपण कोणत्याच धर्माचे नाही असे लिहून द्यावे लागत होते; परंतु ही अट त्यातून काढली जावी आणि रूढ धर्मविधी न करतां एखाद्याला सिव्हिल पद्धतीने लग्न करावयाचे झाल्यास तशी परवानगी असावी." भूपेंद्र बसू हे 'ब्राह्मो' होते, व ब्राह्मो समाजाच्या उपक्रमावरूनच मूळांत हा

कायदा करण्यांत आला होता. परंतु या अटीमुळे हिंदुसमाजांतील सुधारकांना पेच पडे. तो असा की, एक धर्म तरी सोडावा किंवा विवाहविधीच्या बाबतीत रूढाचाराला तरी मान लववावी. असा बिकट प्रसंग त्यांच्यावर येई. पण " विवाहविधीच्या बाबतीत स्वातंत्र्य देणे हे, एकंदरीने हिंदुसमाजाच्या दृष्टीने, धर्मातून माणसे घालवून देण्यापेक्षां अधिक बरे. हिंदुसमाजाची सख्या आधीच घटत आहे ती अशामुळे आणखी घटविणे बरे नव्हे " अशा विचाराने मी बसू बिलाला समति दिली. पण राष्ट्रीय पक्षांतील एका वर्गाला हे धोरण आवडले नाही. त्याने सार्वजनिक सभेमध्ये जाहीर सभा भरवून केसरीचा म्हणजे संपादक या नात्याने माझा निषेध केला.

टिळक मंडाल्याहून परत येण्यापूर्वी, राष्ट्रीय पक्षाने फिरून कॉंग्रेसमध्ये जावे की नाही व गेल्यास कोणत्या अटीवर जावे या सबंधाने वाद उपस्थित झाला होता. त्याला साताऱ्यास तोंड पडले. सातारकर मडळींनी उभय पक्षाचा समेट व्हावा असा कांही उपक्रम करण्याकरितां एक परिषद भरविण्याचे ठरविले. तींत साताऱ्चे नेमस्त पुढारी रावबहादूर विठ्ठलराव पाठक हे तेथील राष्ट्रीय पक्षाशीं सहकारिता करीत होते, व त्यांना सातारकराची अनुकूलता होती. परंतु बाहेरून आलेल्या लोकांत मतभेद होता. सभेचे अध्यक्षस्थान नामदार बेळवी यांना देण्यांत आले होते. मुख्य ठरावासबधाने आमच्या आमच्यांत दोन तट होते ते असे. राष्ट्रीय सभेत जाण्याचा दुरून कां होईना पण उपक्रम करावा, निदान कोणी त्रयस्थ लोक सद्बुद्धीने समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करू म्हणतील तर त्याला तरी विनाकारण नाही म्हणूं नये, अशा मताचा मी होतो, आणि परांजपे खाडिलकर वगैरे मंडळी उलट मताची होती. त्यांचे म्हणणे असे कीं, "टिळक परत येईपर्यंत या बाबतीत कोणत्याहि प्रकारचे मत प्रकट करण्याची जबाबदारी आपण घेऊ नये." ते तोडाने इतकेच म्हणत. परतु "राष्ट्रीय सभेत राष्ट्रीय पक्षाने हल्लीच्या स्थितीत तर शिरू नयेच, पण हल्लीचे निर्बंध व अटी दुरुस्त करून घेण्याचा प्रयत्नहि आपण करूं नये. त्यांत आपल्याला कमीपणा येतो." असे त्यांना मनांतून वाटे. त्यावर माझे म्हणणे असे होतें कीं, " स्वतःला कोणत्याहि प्रकारे बांधून न घेतां कोणी तिऱ्हाईत सामोपचाराचे बालणें बोलेल तर त्याला 'ठीक आहे, प्रयत्न करा' असे म्हणण्यांत आपले कांहीं वेचत नाही. कॉंग्रेसच्या नव्या घटनेला जर आपण नांवे ठेवीत आहो तर तींत काय दुरुस्ती व्हावयाला पाहिजे

हे पर्यायाने सुचवीतच आहो की नाही ? मग तेच ठरावाच्या रूपाने मांडण्याला का हरकत असावी ? टिळकांनी सुरतेची राष्ट्रीय सभा मोडल्यावर कॉंग्रेस कन्टिन्युएशन कमिटी नेमली ती फिरून कॉंग्रेसमध्ये जाण्याकरितां की न जाण्याकरितां ? टिळक तुरुंगांत असतांहि आम्ही कोणाशी सामोपचाराने बोललो तर टिळकांना उद्यां परत आल्यावर त्याचे वैषम्य वाटणार नाही. शिवाय आपण कोणत्याहि तऱ्हेने त्याना बांधू इच्छित नाही. ते परत आल्यावर योग्य ते करतीलच. पण आपणालाहि कांही विचारशक्ति म्हणून आहेच की नाही ! तिचा आपण कां उपयोग करू नये ? "

असा दुतर्फी वाद सुरू झाल्यावर, जणू काही एखादी पैज लागावी त्याप्रमाणे रोकडा हाच प्रश्न निघाला की, टिळक आज येथे असते तर ते काय करते ! तेव्हा फिरून मतभेद झाला. मी म्हणालो, " टिळक असते तर सातारकरांच्या ठरावाला विरुद्ध गेले नसते. " पराजपे खाडिलकर म्हणत " ते हटकून विरुद्ध गेले असते." पण हा वाद तुटण्यासारखा नव्हता. टिळकाना कोणी कसे त्यांचे मत विचारावयाचे ? आणि ते मडाले येथील तुरुगातून आपले मत कसे सांगणार ! अर्थात्, ज्याने त्याने आपल्या मतासारखेच टिळकाचे मत पडले असते असे प्रतिपादावे इतकेच उरले. शेवटी साताराच्या सभेत परांजपे खाडिलकर याच्या मताप्रमाणेच झाले. पण मौज ही की, पुढे टिळक परत आल्यावर सातान्यास उपस्थित झाला तोच प्रश्न त्यानी होऊन उपस्थित केला व मी म्हणत होतो तसेच अगदी बरोबर मत त्यांनी दिले !

इतकेच नव्हे, तर सातान्यास विठ्ठलराव पाटकासारखे नेमस्त म्हणजे ज्याच्या हाती त्या वेळी कॉंग्रेस होती, त्याच्यातलेच एक पुढारी समेट सुचविण्याला पुढे आले होते; पण टिळकांनी जो उपक्रम पुढे केला त्यांत अशा नेमस्त पुढाऱ्याचे निमित्तहि सांगण्याला मिळण्यासारखे नव्हते. तरीहि उघड उघड खटपट अशी सुचविण्यांत येत होती की, निरनिराळ्या प्रांतांतील राष्ट्रीय पक्षांच्या लोकांनी कॉंग्रेसची विद्यमान घटना बदलण्याविषयी योग्य अटी 'आपण होऊन' सुचवाव्या. अटी मान्य होऊन त्याप्रमाणे दुरुस्ती न झाली तर बाहेर राहिलेल्या लोकांनी कॉंग्रेसमध्ये जाऊं नये, पण स्वतःच दुरुस्त्या सुचवण्यांत कमीपणा मानू नये.

बेळगांवास १९१६ साली राष्ट्रीय पक्षाची प्रातिक परिषद भरली तीत हा प्रश्न मोठा वादग्रस्त होऊन राहिला. आणि टिळकांच्या अनेक अनुयायांनी आपली मत त्या प्रसं गी टिळकाच्या मताविरुद्ध दिली ! नाही म्हणावयाला खाडिलकरांनी मात्र आपले पूर्वीचे मत बदलले. कारण साताऱ्यास जी गोष्ट टिळकांनी केली नसती असे ते निश्चयाने सागत होते त्याच्या बरोबर उलट मत स्वतः टिळकांनी आतां प्रतिपादल्यावर ते काय करणार ? पण त्याच्यात व पराजपेप्रभृति मडळीत फरक होता तो हाच. खाडिलकराचा टिळकाच्या शहाणपणावर पक्का विश्वास. टिळक म्हणतील ते बरोबर असलेच पाहिजे, व ते आपण डोळे मिटून खुशाल करावे असा त्याचा निश्चय. परांजपे, वासुदेवराव जोशी वगैरे मडळी ही देखील टिळकाची अनुयायी खरी. पण अनुयायी या शब्दाच्या अर्थाप्रमाणे पावलावर पाऊल ठेवून जाणारे अनुयायी नव्हेत, तर पायात घुटमळून आडवे पडणारे अनुयायी ! पण कांही अशी खाडिलकरानी रागाला राग उभा करून आपल्या स्नेहीमडळीना चागल्या शिव्या हासडल्या तेव्हां टिळकाच्या मताप्रमाणे ठराव मजूर झाला.

काय कारण घडले लक्षांत नाही, पण मी या चिरस्मरणीय बैठकीला हजर नव्हतो. म्हणून या बैठकीतील मौजा पहाण्याला मला सांपडले नाही. मी असतो तरी मला बोलण्याचे कांहीच कारण नव्हते. कारण या बाबतीत माझे मत स्वतः टिळकच आग्रहाने प्रतिपादीत होते. पण अखेर बेळगांवच्या सभेत राष्ट्रीय पक्षाने राष्ट्रीय सभेत फिरून जाण्याची खटपट करावी असा ठराव झाल्याचें मी ऐकले तेव्हां मला फार समाधान झाले व साताऱ्चा सूड बेळगांवाने घेतला असे उद्गार मला काढतां आले.

केसरी माझ्या हाती. खाडिलकर रिकामे. आणि परांजपे याचे काळपत्र बंद पडलेले. तेव्हां उघड रीतीने टिळकांच्या धोरणाविरुद्ध लिहितां येण्याला परांजपे याना साधन नव्हते. पण त्यांच्या नेहमीच्या पद्धतीने स्नेहीमडळीची मने कुरतुडण्याची खटपट आतून चालूच होती. टिळकांनी तुरुगांतून सुटून आल्यावर शांततेचा जाहीरनामा काढला व त्यानतर राष्ट्रीय सभेत शिरण्याचा असा हा प्रयत्न सुरू केला हे पाहून परांजपेप्रभृति मंडळी—टिळकांच्या तोंडावर नव्हे पण मनांतून—त्यांना नेमस्त किंवा मवाळ म्हणूं लागली होती यांत शंका नाही. पण १९०८ साली परांजपे सावरकर प्रभृतीनी टिळकांना जवळ जवळ हेच विशेषण लावलेले

असल्यामुळे हे प्रकरण फक्त 'मागील अंकावरून पुढे चालू' असे म्हणण्या-सारखे होते.

साताऱ्यास घडलेल्या गोष्टी सांगत असतां त्याच अनुसंधानाला धरून पुढें घडलेल्या कांहीं गोष्टी मी आगाऊ सांगितल्या. म्हणून पूर्वीचाच विषय पुढे चालवा-वयाचा तर तो असा की, माझ्या संबंधाने ही अशी धुसफूस नेहमी सुरूच होती. पण मीहि एक गोष्ट मनाशीं ठरवून ठेवली होती की, भाडून तंडून हडसून खडसून टिळक मंडाल्यास असतां मी केसरी हाती घेतला तेव्हां इतरांच्या असमाधानाला कोण पुसतो ? कोणी स्नेहबुद्धीने किंवा विरोधाने जर असे म्हणाला कीं, "तुम्ही लिहितां किंवा बोलतां ही अमुक एक गोष्ट केसरीला न शोभणारी व टिळकांना न आवडणारी अशी आहे" तर मी त्यांना शांतपणें उत्तर देत असे की, "माझ्या सपादकीय कचेरीत मी एक मोठी पिशवी खुंटीला टांगून ठेवली आहे. तींत मजविरुद्ध ज्या कोणाच्या कांहीं तक्रारी असतील त्या घालून ठेवीत असतो. उद्यां टिळक परत आले म्हणजे ती पिशवी आणि केसरी लिहिण्याची लेखणी त्यांच्यापुढे ठेवीन, व मग ते स्वतः वाटेल ते करण्याला मुख्यत्यार व समर्थ आहेतच." पण मौज अशी झाली की, टिळक परत आल्यावर ती तक्रारीची मोठी पिशवी अदृश्य झाली. पिशवी काल्पनिकच होती; व ती अदृश्य झाली याचा अर्थ मजविरुद्ध टिळकांकडे तक्रार मांडण्याला कोणी पुढे आलाच नाहीं. आणि टिळक येण्यापूर्वी केसरीची लेखणी जशी माझ्या हातीं होती तशीच ती पुढेहि अबाधित राहिली.

टिळक मंडाल्याहून सुटून आले तेव्हा त्या रात्रीं मी त्यांना भेटून नमस्कार करून कांहीं वेळ बसून घरीं परत आलो. दुसरे दिवसापासून पुढे आणखी दोन दिवस मी असा क्रम ठेवला कीं, कोठे तारा पाठवणे, पत्रें पाठविणें, अपरिचित लोकांना नेऊन टिळकांना भेटविणे, वगैरेपुरतां मी टिळकां-कडे जाई. परंतु उगाच त्यांच्यापुढे गप्पा मारीत बसलो नाही. एरवींच्या शिरस्त्या-प्रमाणें ही गोष्ट व्हावयाची. पण ती त्या महत्त्वाच्या दोन दिवसांत घडली नाहीं. हे टिळकांच्या लक्षांत आले. मग तिसरे दिवशीं ते मला म्हणाले, "कां हो तात्या, इतके लोक येऊन बसून बोलून जातात. पण तुम्ही तर कांहींच विचारीत नाहीं व कांहींच सांगत नाही याचा अर्थ काय ?" तेव्हां मी प्रथम साळसूदपणाने म्हणालों, "तुम्ही इतके वर्षांनीं तुरुंगांतून सुटून परत आलां तेव्हां तुमच्याशीं बसून बोलण्याची अपर्वाई परक्या किंवा लांबच्या लोकांना फार. ती त्यांची

अपूर्वाई संपली म्हणजे आम्ही तर काय घरचेच व रोजचेच आहो." पण इतके बोलून किंचित् मिस्किलपणाने मी पुढे म्हणालो, "तुमच्या गैरहजेरीत तक्रारी करण्यासारख्या ज्या गोष्टी मजकडून घडल्या असतील त्या तक्रारीच्या पिशव्या तुमच्यापुढे लोकांकडून ओतल्या जात असतील. तेव्हां त्या सर्व ओतून झाल्या म्हणजे मगच तुमच्याशी एकदां स्वस्थ बसून बोलावे व त्या तक्रारीचा निकाल करून घ्यावा म्हणतो."

"टिळकांना सहा वर्षांचा अज्ञातवास घडल्यामुळे तुरुगांत जाण्यापूर्वी ज्या त्यांच्या कल्पना व भावना होत्या त्या घेऊनच ते परत आलेले असतील. तसें झाले असता, मला केसरीचा सपादक होण्याला जरी त्यांनी हरकत घेतली नाही तरी, मराठ्यातील मतप्रतिपादनासंबंधाने पूर्वी जो त्यांचा व माझा मतभेद होता तो आजहि असेल. तसे असल्यामुळे आपल्या पक्षांतील लोकांना नापसत असणारी मतप्रतिपादनपद्धति मी केसरीत ठेवली तिजवर स्वपक्षीय लोक नाखुष झाले असल्याची भीति टिळकांच्या मनांत असेल. आणि कदाचित् ते आल्याबरोबर कांही लोकांनी त्या थोडक्या वेळांतहि माझ्याविरुद्ध कागाळ्या त्याना आपलेपणाच्या भावनेने सांगितल्या असतील." अशा अनेक शका मनांत असल्यामुळेच मी वर लिहिल्याप्रमाणे दुरून दुरून वागत होतो. पण टिळकांना मी मुद्दाम संकोच करीत आहे असा सशय येऊन ते मला म्हणाले, "आता आज रात्री जेवावयालाच या म्हणजे आपण स्वस्थपणे बोलत बसूं." त्याप्रमाणे मी रात्री भोजनाला गेलो तेव्हा ते मला म्हणाले, "तुम्ही असे कां वागत होतां हे माझ्या लक्षांत आले. पण मी खरोखरच तुम्हाला सागतो की, जो जो मला भेटला त्याने तुम्ही केसरी फार चांगला चालविला असेच मला सांगितले. कोणीहि तक्रार सांगितली नाही किंवा कागाळी केली नाही." नंतर मीहि त्यांना आपली बाजू खुलासेवार सांगितली व ती त्यांना पटली असे दिसलें.

टिळक सुटून आल्यावर सरकाराने जाहिरनामे काढून त्यांची नाकेबंदी केली त्याविरुद्ध टिळकांनी स्टेट सेक्रेटरीपर्यंत तक्रारी केल्या. पण पुढें महायुद्ध सुरू झाल्यामुळे टिळकांनी एक जाहीरनामा काढला व सरकारने त्यांच्यावरील ही नाकेबंदी उठविली. तेव्हां सहजच टिळकांनी आपल्या कार्याला नवीन प्रारंभ केला. त्यांत राष्ट्रीय सभेची घटना दुरुस्त करून घेऊन राष्ट्रीय पक्ष तीत घुसवावयाचा हा एक भाग होता. पण ते लवकर घडून न आले तर तेथपर्यंत स्वतःच्या

पक्षाची म्हणून कांही राजकीय चळवळ सुरू करावयाची असाहि दुहेरी कार्यक्रम होता. टिळक परत आल्यावर खाडिलकरहि पूर्वीप्रमाणे येऊं जाऊं लागले. पण मी केसरीचा संपादक असल्यामुळे त्यांना केसरीत विशेष लिहिण्याचे कारण नव्हते व टिळकहि त्यांना विशेषसे लिहिण्याला सांगत नव्हते पण पुढे रा. दत्तोपंत लिमये, केसरीचे एक सहकारी संपादक किंवा उपसंपादक, हे वारल्यामुळे तेव्हांपासून खाडिलकर सहसंपादक म्हणून कायमचे जोडून घेण्यात आले. अग्रलेख वगैरे मीच लिहीत असे. पण केसरी आठ पानांचा असल्याने अर्थात् सहसंपादक लागत. म्हणून युद्ध हा रा. खाडिलकरांचा आवडता विषय असल्यामुळे केसरीतील त्या लिखाणाचे खाते खाडिलकरांच्याकडे देण्यात आले, व तो विषय ते हौसेनें रंगवून लिहीत. युद्धाचा विषय अद्भुतरम्य असल्यामुळे त्यानें खाडिलकरांची लिहिण्याची हौस पुरी भागविली, तथापि मीहि त्या काळात याच विषयावर केसरीत बरेच अग्रलेख लिहिले.

महायुद्धाच्या विषयावर केसरीचे धोरण काय असेल हे न सांगतांहि समजण्यासारखे आहे. जर्मन लोकांचा प्रत्येक विजय हा आम्हाला प्रिय वाटे. कारण इंग्रजावर स्वतः आम्हाला सूड उगविता येत नाही अशा वेळीं त्यांची रग जिरविणारा, त्यांची हाडे मऊ करणारा, शेरास सव्वाशेर भेटलेला पाहून आम्हाला बरे वाटल्यावाचून कसे राहील ? हिंदुस्थानांत त्या वेळी अत्यंत शांतता होती. क्रांतिकारक लोक स्वस्थ बसून काय काय होते ते उत्सुकतेने पहात होते. लॉर्ड हार्डिंज यांनी हिंदुस्थानातील जवळ जवळ सगळे काळे गोरे सैन्य युरोपकडे धाडून, हिंदुस्थानचे संरक्षण स्थानिक ॲंग्लो-इंडियन व रेल्वे वगैरे स्वयंसेवक यांजवर सोपविले होते. जर्मनीच्या धाकाने आपण होऊन राजकीय सुधारणा हिंदुस्थानांत करण्याच्या गोष्टी सरकार बोलूं लागले होते. म्हणून ही वेळ आपलें चळवळीचे घोडे पुढे दामटण्याला बरी आहे असें टिळकानी मनाशी ठरविले व राष्ट्रीय सभेत शिरून ती हाती कशी घेता येईल याचा विचार चालविला. पण राष्ट्रीय सभा एकदम हाती येण्यासारखी नव्हती. तिजमध्ये एकदां प्रवेश झाल्यावर ती काबीज करणे तेव्हां कठिण नव्हते, पण प्रवेश होणे हेच अधिक कठिण होते. या कठिणपणाचे कारण असे की, सुरतेस मवाळांनी जी 'कन्व्हेन्शन' बनविली तिच्या नियमावरून पहातां, राष्ट्रीय सभा म्हणविल्या जाणाऱ्या या कन्व्हेन्शनमध्यें कोणाला येऊं द्यावे न द्यावे याचा अधिकार, तिच्या अधिकाऱ्यांच्या हातीं

गेला होता. प्रतिनिधि पूर्वीप्रमाणे निवडणुकीनी स्वतंत्रपणे व स्वतःच्या अधिकाराने जाणे शक्य राहिले नव्हते. अर्थात् राष्ट्रीय पक्षातील जहाल गणल्या जाणाऱ्या पुढाऱ्यांना निवडून काढून त्याना मज्जाव, व त्यामुळे त्याचा व सबध राष्ट्रीय पक्षाचा अपमान, होण्याचा सभव होता. म्हणून कन्व्हेन्शनचे नियम ढिले करावे असा जहाल पक्षाचा प्रयत्न सुरू होता; व त्याला उत्तर म्हणून ते ढिले न होऊ देण्याचा मवाळ पक्षाचा प्रयत्न सुरू होता. मवाळानी एक प्रकारचा घटना-तट बांधून त्यापुढे खदक खणून आपल्या रक्षणाची तजवीज केली होती. आणि आत येऊं इच्छिणारानी प्रथम कन्व्हेन्शनच्या प्रतिज्ञालेखावर सही करावी, म्हणजे खदकावर पूल टाकून आम्हाला वेशीतून आत घ्या असे विनवावे, व मग अधिकाऱ्यानी त्याचा चेहरा न्याहाळून तपासून त्याची झडती घेऊन त्याना आत सोडावे, असा प्रकार होता. तो सर्व बदलणे हे कालावधीचे काम होते. म्हणून ते चालू ठेवून इकडे, त्यांत यश येईपर्यंत, आपण सख्येने मोठे आहो, आंत घ्याल तर कॉंग्रेसला भरदार करून तिला बाळसे आणू, व न घ्याल तर त्याच बळाचा उपयोग देशभर तुमची नालस्ती करण्याकडे करू, असा धाक या किल्ल्यातल्या लोकांना घालावा असे टिळकानी ठरविले. आणि या हेतूने बरेच दिवस बद पडलेल्या मुबई-प्रातिक परिषदेचे पुनरुज्जीवन करण्याचे त्यानी ठरविले.

प्रातिक परिषदेत यश मिळण्याची आशा टिळकाना होती, पण राष्ट्रीय पक्षाची म्हणून स्वतत्र राष्ट्रीय सभा भरण्यांत यश येईल असे मात्र टिळकांना वाटत नव्हते. याचे कारण असे की, प्रांतिक परिषद म्हटली म्हणजे ती मुबई इलाख्यापुरती. या इलाख्यातील सिंध प्राताने आपली उपप्रातिक परिषद वेगळी भरवावी असे ठरविले होते. कारण सिंध फार दूर पडला. उरलेल्या तीन उपप्रांतांपैकीं महाराष्ट्र व कर्नाटक यांतील लोकमत बहुतेक सर्व टिळकांच्या बाजूचे असल्यामुळे टिळकांनी भरविलेल्या प्रातिक परिषदेला प्रातिनिधींची संख्या कधीहि कमी पडली नसती. आणि गुजराथेतील लोकमत जरी कांही प्रमाणांत टिळकांना अनुकूल नसले तरी गुजराथेतून कांही थोडे तरी प्रतिनिधि हटकून आले असते. म्हणजे एकंदरीनें राष्ट्रीय पक्षाची प्रांतिक परिषद म्हटली तरी भरदार व प्रातिनिधिक स्वरूपाची खचित झाली असती.

पण 'राष्ट्रीय सभा' म्हटली म्हणजे तिला भरदार व प्रातिनिधिक स्वरूप येण्याला निरनिराळ्या अनेक प्रांतांचे प्रतिनिधि यावयास हवे. ते केवळ राष्ट्रीय

पक्षानें काढलेल्या राष्ट्रीय सभेला येणें शक्य नव्हते. याशिवाय दुसरें एक कारण असे की, स्वतः टिळकांनाच दोन राष्ट्रीय सभा व्हाव्या अशी मनांतून खरी इच्छा नव्हती. सगळ्या राष्ट्रांतील मत व्यक्त करावयाचे ते होतां होईतो एकाच राष्ट्रीय सभेच्या मुखानें व्यक्त व्हावे ही टिळकांना महत्त्वाची गोष्ट वाटे. आणि त्यांचे म्हणणे मवाळ पक्षाला नेहमी असे असे कीं, " तुमच्या हाती राष्ट्रीय सभा राहिली तरी इतर कोणत्याहि पक्षाला तींत येण्याला प्रतिबंध होईल अशी तरी तिची घटना तुम्ही करूं नका. उलट आमच्या हाती राष्ट्रीय सभा आली तरी आम्ही तशा प्रकारची घटना करणार नाही. राष्ट्रीय सभा म्हटली म्हणजे तिची बैठक इतकी मोठी व विस्तृत असावी कीं, तीत सर्व राजकीय पक्षांचा समावेश होऊन त्यांना बरोबरीच्या नात्याने त्या बैठकीवर बसतां यावे." या बाबतींत ते पार्लमेंटचे उदाहरण नेहमीं घेत व म्हणत कीं, पार्लमेंटमध्ये आज एका पक्षाचे बहुमत, आज एका पक्षाचे प्रधानमडळ, तर उद्यां दुसऱ्या पक्षाचे बहुमत व प्रधानमडळ, असे होतेच कीं नाहीं ? तसेच राष्ट्रीय सभेचेहि असावे.

असो. इकडे सर्वांची मिळून एक राष्ट्रीय सभा होण्याचा प्रयत्न चालूं असतां, प्रांतिक परिषद मात्र प्रयोगादाखल राष्ट्रीय पक्षाची म्हणून वेगळी भरविण्याचा टिळकांनीं विचार केला. त्यांत युक्ति इतकीच केली की, कन्व्हेन्शन काँग्रेसनें जे ध्येय म्हणून पहिल्या कलमांत घातले होते त्यांतील 'स्वराज्य हे साम्राज्यांतर्गत असतांहि व साधनमार्ग सनदशीर पद्धतीचे असा उल्लेख असतांहि ते कलम मात्र आपणाला मान्य', पण 'प्रतिनिधींची निवडणूक होण्याची घटनेतील इतर कलमे अमान्य' असा भेद केला. आणि राष्ट्रीय पक्षाच्या प्रांतिक परिषदेलाहि या पहिल्या कलमाचे बंधन, मात्र ते गर्भित बंधन ठेवले. अर्थात् कन्व्हेन्शनवाले व जुने राष्ट्रीय सभावाले यांच्यामध्ये खरा भेद किती थोडा आहे हे दाखविण्याचा तो एक उत्कृष्ट मार्ग होता. ही परिषद प्रथम बेळगांवास भरावी असे ठरत होते. परंतु ती अखेर पुण्यासच भरवावी असे ठरले. या सुमारास मला ताप येऊ लागल्यामुळे मी तीन आठवडे सिंहगडास टिळकांच्या बंगल्यांत प्रकृति सुधारण्याकरितां जाऊन राहिलो होतों. मी सिंहगडावर असतांच टिळकांचा वरील बेत ठरला. पण या परिषदेच्या मुख्य चिटणीसाचे काम मजकडे द्यावयाचे असें टिळकांनी योजिले असल्यामुळें, मी बरा होऊन परत येण्यासाठीं म्हणून त्यांनीं प्रत्यक्ष कार्यारंभ एक आठवडा पुढे ढकलला.

मी सिंहगडाहून परत येतांच परिषदेच्या तयारीला सुरुवात केली. परिषदेला अध्यक्ष शक्य तर विठ्ठलभाई पटेल याना मिळवावे अशी टिळकांची इच्छा होती व त्याप्रमाणे मी वान्द्रे येथे जाऊन बरीच खटपट केली. पण विठ्ठलभाई हे पुढे ज्वलज्जहाल झाले तरी प्रथम ते मुंबईच्या नेमस्त पक्षांतच जवळ जवळ मोडत होते. त्यांनी मला स्पष्ट सांगितले की, " राष्ट्रीय सभेची घटना आहे तीच मान्य करून तुम्ही प्रांतिक परिषद भरवीत असाल तरच मी अध्यक्षपद स्वीकारीन." अखेर बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांना अध्यक्ष होण्याची विनति करण्यांत आली ती त्यांनी ताबडतोब मान्य केली. अशा रीतीने ही प्रांतिक सभा भरली व ती मोठ्या थाटाची झाली. बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनी १९०८ सालीं टिळकांच्या खटल्यांत मोठ्या धीटपणाने मदत केली होती. ती निःस्वार्थीपणाने केली होती. आणि या मदतीमुळे त्यांच्यावर सरकारचीच काय पण हायकोर्टातील न्यायमूर्तींची अवकृपा होऊन त्यांचा बॅरिस्टरीचा धंदा जवळ जवळ बसण्याच्या बेतांत आला होता एवढी माहिती बाहेरगांवीहि होती. तसेच त्या सुमारास झालेल्या बाँबच्या व राजद्रोहाच्या इतर खटल्यांत ते वकिलीचे काम चालवीत ही त्याची कीर्ति कर्नाटकापर्यंत होती. यामुळे टिळकांनी घडविलेली राष्ट्रीय पक्षाची प्रांतिक परिषद व तिचे अध्यक्ष बॅरिस्टर बॅप्टिस्टा होणार या दुहेरी कारणांनीं पुष्कळ प्रतिनिधि परिषदेला आले होते.

परिषदेची सर्व व्यवस्था मजकडे होतीच, आणि स्वागताध्यक्ष अण्णासाहेब पटवर्धन हे नांवाचे स्वागताध्यक्ष असल्यामुळे, बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांच्या गैरहजेरींत विषयनियामक कमिटीचे बरेचसे काम मलाच करावे लागले. तात्पर्य, टिळकांनीं अशा प्रकारे आपला विश्वास व कार्याचा भार मजवर टाकलेला लोकांच्या निदर्शनाला आला. यामुळें खाडिलकरांच्या हातून मी केसरी ओढून घेऊन बळकावून बसलों अशी अढी व असा राग ज्यांनीं मनांत प्रथम धरला होता त्यांच्या त्या रागावर आपोआप विरजण पडले. यानतर बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांच्या मूळ सूचनेवरून बेळगांवास पुढील वर्षी होमरूल लीगची स्थापना झाली तिचाहि मुख्य चिटणीस मलाच नेमण्यांत आले. यामुळें टिळकांच्या विश्वासाच्या पहिल्या शिक्क्यावर आणखी हा दुसरा शिक्का बसला. प्रांतिक परिषदेचा व होम-रूल लीगचा चिटणीस होण्याला जर मीच इतरांपेक्षां लायक ठरलों, तर केसरीचा संपादक होण्याला मी लायक नाहीं असे कोणास म्हणतां आलें असतें ! शिवाय

माझ्या या पात्रतेचे वेगळे सर्टिफिकेट टिळकांजवळ लोकांनी परस्पर दिल्याचे मी वर सांगितलेच आहे.

वऱ्हाड, मध्यप्रांत, मध्य महाराष्ट्र, कर्नाटक या चारहि भागांत माझे समवयस्क, आणि शिक्षणाने व हुशारीने बरोबरीचे, असे लोक म्हटले म्हणजे मुंजे, अणे, शिवरामपंत परांजपे, खाडिलकर, बेळवी, गंगाधरराव देशपांडे, इत्यादि लोक होत. यापैकी परगावचे लोक पुण्यास येऊन, केसरी चालविण्याला मजपेक्षा अधिक लायक ठरून, टिळकांच्या योजनेने माझ्या हातचा केसरी आपल्या हाती घेतील हे शक्यच नव्हते. येऊन जाऊन वर्तमानपत्राच्या कार्याला उपयोगी पडण्यासारखे लेखक म्हटले म्हणजे परांजपे व खाडिलकर हेच काय ते. पैकी परांजपे यांची इतर रीतीची योग्यता टिळक जाणून होते तरी केसरी हा परांजपे यांच्या हाती द्यावा असे टिळकांच्या स्वप्नीहि कधी आले नसते. परांजपे यांची राजकीय मते एकंदरीने टिळकांना आवडण्यासारखी असली तरी, आणि परांजपे यांच्या वक्रोक्तिपूर्ण लेखन-शैलीचे ते दुरून कौतुक करीत तरी, आपले व परांजपे यांचे व्यावहारिक राज-कारणाचे मार्ग जुळणारे नाहीत हे टिळक पूर्ण जाणून होते. त्यांच्या निवृत्तिपर धोरणाचा टिळकांना राग येई. केसरीची भाषासरणी व परांजपे यांची भाषासरणी यांत फार फरक आहे, इतकेच नव्हे तर परांजपे यांची भाषासरणी केसरीला लावू नये असेहि टिळकांना मनापासून वाटे. येऊन जाऊन खाडिलकरच काय ते उरले. पण आपल्या गैरहजेरीत प्रेस ॲक्ट सारख्या संकटांतून निभावून "केळकरांनी केसरी जिवंत ठेवला, इतकेच नव्हे तर धोरण बिघडवू न देता लेखननैपुण्याच्या दृष्टीनेहि उत्तम चालविला" असे लोकांनी टिळकांजवळ प्रांजलपणाने बोलून दाखविल्यावर माझ्या हातून केसरी काढून घेण्याला त्यांना काहीच सबळ कारण नव्हते. तसे मनांत असते तरी त्यांना निदान एक गोष्ट करावी लागली असती. ती अशी की, प्रथम १८९९ प्रमाणें स्वतः आपले नांव केसरीवर घालून केसरी मजकडून आपल्या हाती घ्याव-याचा, आणि मग हळूच केव्हां तरी तो खाडिलकरांच्या हाती द्यावयाचा. परंतु केसरी खाडिलकरांच्या हाती देण्याची इच्छा जशी त्यांना उरली नाही, तशीच केसरी स्वतःच्या नांवाने चालविण्याची इच्छाहि त्यांना आता उरली नव्हती.

एक तर टिळकांचे वय या वेळी ५८ वर्षांचे झाले होते. प्रकृतिहि पूर्वीइतकी सुदृढ नव्हती. औषधे व पथ्येहि त्यांना जडल्यासारखी झाली होती. फिरून दुसऱ्या कोणी केसरींत कांहीं लिहून त्याकरितां आपणाला व्यर्थ शिक्षा भोगावी लाग-

ल्यास यापुढे ते फार जाचक होईल असे त्यांना वाटू लागले होते. संपादक व लेखक या नात्यानें अधिक कीर्ति मिळविण्याचे त्यांना उरलें नव्हते. पुढे मागें केव्हा तरी हाताखाली तयार होणाऱ्या लोकांच्या स्वाधीन केसरी केलाच पाहिजे हे वय-परत्वें ओघानेंच प्राप्त होणार होतें. मग ते आजच कां न करावें ? इतर कोणी केसरीचा संपादक असला तरी त्यांत प्रसंगविशेषीं हवें ते लिहिण्याला टिळकांना कोणी नको म्हणणार नव्हतें कारण ते मालक ! केळकर खाडिलकर कोणी झाले तरी असिस्टंट. म्हणून स्वतः हवे ते लिहिण्यानें किंवा लिहिण्यास सांगण्यानें मतप्रसाराचें कार्य हवें तसें साधण्यासारखें होतें. शिवाय राजकारणांत पडावयाचें ठरून एखादी नवी चळवळ हातीं घ्यावयाची तर, स्वतःच्या डिक्लेरेशनमुळें पुण्याला व केसरीला बांधून जखडून पडणें ही एक प्रकारची अडचण होण्यासारखी असल्यामुळें स्वतः संपादक व्हावयाचें नाहीं हे जसें टिळकांनी ठरविलें, तसेंच केळकराच्या हातून केसरी काढून खाडिल-कराच्या हातीं द्यावयाचा नाहीं हेंहि त्यांनी निश्चित केलें होतें. आणि टिळक मजवर विश्वासानें कामाचा भार अधिकाअधिक टाकूं लागलेले पाहून, खाडिल-कराचे मित्र किंवा चहाते यांच्यापैकी कोणालाहि यानंतर पुढे केव्हा टिळकांकडे जाऊन तसें सुचविण्याचें धाडस झालें नसेल असेंच मला वाटतें.

बेळगांव येथे पुढे झालेल्या समेटाच्या वादांत मी विशेषसा भाग घेतला नाही. कारण टिळकांचे मत काय होतें किंबहुना ते तेथे काय घडवून आणणार याची अटकळ मला होती. आणि तसें घडलेंहि. अर्थात् राजकीय महत्त्वाच्या एका मोठ्या प्रश्नांत, टिळक सुटून येण्यापूर्वी एक वर्षभर, मी जे मत टिळकांना पसंत पडेल असें अनुमानानें लोकांना सांगितलें होतें तेंच तंतोतंत त्यांना पटलें, असें पाहिल्यावर माझा हेवा करणाऱ्या लोकांच्या तोंडांत परस्परच चपराक बसली. आणि केवळ भाषेच्या दृष्टीनें नव्हे तर राजकीय मताच्या दृष्टीनेंहि केसरीतून मतप्रसार करण्याला मी योग्य आहे, अशी कबुली त्यांना मनांतल्या मनांत द्यावी लागली. खाडिलकरांची व माझी तुलना करावयाची तर केळकरांचे मत टिळकांच्या गैरहजेरीत जे होतें तेंच ते आल्यावरहि राहिलें, पण खाडिलकरांच्या मतांत मात्र चलबिचल झाली हेंहि लोकांना दिसून आलें.

पुण्याची प्रांतिक परिषद होऊन गेल्यावर, तींत नेमलेल्या टिळक-बॅप्टिस्टा-बेळवी यांच्या कमिटीनें समेटासंबंधानें जो रिपोर्ट प्रसिद्ध केला

त्यालाच बेळगांवच्या परिषदेने दुजोरा दिला. समेटाच्या ठरावांत खालील प्रमाणे शब्द होते. "स्वदेशाच्या हिताकडे दूरवर दृष्टि देतां व सध्यांची परिस्थिति पहातां समेट होणे इष्ट आहे." 'सध्याची परिस्थिति पहातां' या शब्दांत थोडी खोच होती. त्या शब्दांचा टिळकांचा अर्थ असा होता की, "कॉंग्रेसच्या बाहेर राहून कांही एक काम झाले नाही. समेट होऊं नये, राष्ट्रीय पक्षाने जरूर तर स्वतत्र कॉंग्रेसहि काढावी, असे म्हणणारांनीं जर माझ्या गैरहजेरीत कांही विशेष काम करून दाखविले असते, तर तेच पुढे चालवा असे मी म्हटले असते." "पण माझी वाट पहात तुम्ही स्वस्थ बसला. कोणीच कांही केले नाही. आणि मी बाहेर येतो तो महायुद्धामुळे परिस्थिति बदलली. तेव्हां आतां माझ्याच मताप्रमाणे करा" असे वेगळ्या शब्दांत टिळकांनीं आपल्या प्रमुख अनुयायांना सांगितले. असो; फिरून कांही करणे कांही न करणे या बाबतीत खाडिलकराची व माझी तुलना उपस्थित झाली. तीत असे दिसून आले की, मी वर्तमानपत्राच्या द्वारे करतां येईल तितके तरी केले, पण खाडिलकर यांनीं केसरी ऑफिसवर बहिष्कार घातला आणि त्या अवधीत फक्त कांही नाटके मात्र लिहिली ! टिळक परत आल्यावर आपल्या कांही नाटकांचा एक सेट खाडिलकर यांनी तो चांगला बांधून सवरून टिळकांच्या हाती दिला. हेतु हा की, टिळक त्या कृतीचे कौतुक करतील. पण पाहणारे असे सागतात की, टिळकांनी तो सेट भिरकावूनच कांहीं दिला नाहीं पण दूर सारून ठेवून दिला; एक पानहि उघडले नाही; व बऱ्याच रागाने खाडिलकरांना म्हणाले की, "या सहा वर्षांत हेच राजकारण केलेत वाटतें ?" या अवधीत मीहि एक दोन नाटके लिहिली होती. पण माझा शिरस्ताच असा होता कीं, असली पुस्तके स्वतःची असलीं तरी तीं टिळकांना नजर करावयाची नाहीत. तसेच रगभूमीवर माझी नाटके चालू असतां, 'तीं पहाण्यास चला असे, खाडिलकरांच्या कंपनीप्रमाणे, तुम्ही टिळकांना म्हणावयास जाऊ नका' अशी सक्त ताकीद मी माझ्या नाटकमडळीला दिली होती. मग मी स्वतः तसली विनंति करण्याची गोष्टच बोलावयास नको ! नाट्यविषयासंबंधानें टिळकांची अप्रीति मला चांगली माहीत होती. पण त्याहून महत्त्वाची गोष्ट ही होती कीं, या सहा वर्षांत मी काय केलें याचे उत्तर टिळकांना लोकांकडूनच परस्पर मिळाले होते.

बेळगांवास ता. २८ एप्रिल १९१६ रोजीं होमरूल लीगची स्थापना झाली व तिचा चिटणीस, माझ्या गैरहजेरीतहि, मीच नेमला गेलो यामुळे माझ्याविरुद्ध

होणाऱ्या कारस्थानावर आणखी एक दडपण बसले. आजपर्यंत मी व्याख्याने वगैरे देण्याला बाहेर फारसा फिरत नव्हतो, तो होमरूल लीगचा चिटणीस या नात्याने बराच फिरू लागलो. ठिकठिकाणी होमरूल लीगची केन्द्रे स्थापावयाची, सभासद जोडावयाचे, वर्गणी जमवावयाची, ही कामे करण्याला मला बाहेर फिरणे अवश्य होते; व एकट्याने किंवा जोडीला दा. वि. गोखले अथवा इतर कोणी व्याख्याते व प्रचारक लोक घेऊन मी दौरे काढूं लागलो. त्या वर्षाच्या मे महिन्यांत अहमदनगर येथे जिल्हासभा भरली तिचे अध्यक्षस्थान मला देण्यांत आले होते, व त्याच सभेला टिळकांनाहि सन्मान्य पाहुणे म्हणून निमंत्रण करण्यांत आले होते. जिल्हासभा व होमरूल लीगचे कार्य यांचा मेळ पडण्याला होमरूल लीगच्या चिटणीसालाच जिल्हासभेचे अध्यक्ष केले म्हणजे एकांत दोन कामे झाली, असा नगरच्या पुढाऱ्यांचा विचार होता. नगरचे पुढारी बाळासाहेब देशपांडे हे नुकतेच निवर्तले होते, यामुळे नगरच्या राष्ट्रीय पक्षाला थोडा लंगडेपणा आला होता. पण रावबहादूर चितळे व हरिभाऊ पटवर्धन यांना पुढारीपण देऊन आपसांतील एकी करून नगरांतलि राजकीयपक्षांनी तो लंगडेपणा भरून काढला होता.

होमरूल लीगचा चिटणीस म्हणूनच नव्हे तर व्यक्तिशःहि मीच जिल्हा परिषदेचा अध्यक्ष व्हावे अशी नगरच्या लोकांची फार इच्छा होती, व त्यांनी बेळगांवासच आधी मजकडून तसे वचन घेतले होते. मी अध्यक्ष व टिळक पाहुणे म्हणून मिरवणूक फारच थाटाने निघाली. जिल्हासभेचे कामहि माझ्याहातून यशस्वी रीतीने पार पडले. वरून एकी झाली असली तरी नगरांतल्या जहाल मवाळ पक्षाचे स्वरूप विषयनियामक कमिटीत बरेच प्रकट होत होते. पण विरोधकांचा मेळ घालून देण्याच्या माझ्या स्वभावाचा या ठिकाणी पुष्कळ उपयोग झाला. वर्तमानपत्रांत लेख लिहिल्याप्रमाणे मी परिषदेचा अध्यक्ष म्हणून चांगले भाषण करू शकतो व सभाहि चांगली चालवूं शकतो या गोष्टीच्या प्रतीतीने माझे पारडे अधिकच स्थिर झालें. माझ्या प्रतिपक्षांना गौण स्थान स्वीकारून गप्प बसावे लागले.

बेळगांवानंतर होमरूल लीगच्या मतप्रसाराचा नगरास आलेला हा पहिलाच प्रसंग असल्यामुळे तेथे टिळकांची त्याच विषयावर दोन व्याख्याने झाली. मी होमरूल लीगचे ऑफिस मांडून बसलोच होतो. पण स्वराज्य संघाचे सभासद

होण्यास फारच थोडे लोक मिळाले. स्वराज्य संघ स्थापू पहाणे किंवा होमरूलच्या स्वरूपाचेंहि स्वराज्य मागणे ही राजद्रोहाची गोष्ट आहे असा बभ्रा करण्याला सरकाराने सुरुवात केली होती. म्हणून तोंडाने स्वराज्य मागण्याला किंवा स्वराज्याच्या चळवळीला म्हणून वर्गणी देण्याला लोक तयार असले तरी सभासद पत्रिकेवर सही करण्याला लोक कचरत, ही गोष्ट आठवली म्हणजे आतां त्याचें नवल वाटते.

असो. इंग्रजीतूनहि या विषयावर व्याख्याने द्यावी असे ठरले, व त्याप्रमाणें चिटणीस म्हणून माझेंच पहिले व्याख्यान किर्लोस्कर नाटकगृहांत बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखाली झाले. या चळवळीतील व्याख्यानावर खटले करावे असें सरकारचें ठरले असल्याचें प्रगट झाले होतें; व त्याप्रमाणे बेळगांव व नगर येथील टिळकाच्या भाषणावर खटलाहि भरला गेला होता. तथापि व्याख्याने तर थाबवावयाची नाहीत आणि पोलिस रिपोर्टरांच्या हाती तर सांपडावयाचें नाही—मग स्वतः जाणून बुजून लिहिलेल्या शब्दाबद्दलच काय व्हावयाचे ते होवो—अशा विचाराने या पुढील व्याख्याने, निदान टिळकांच्या खटल्याचा निकाल होईपर्यंत, शक्य तेथवर लिहून वाचावी असे धोरण आम्ही ठरविले; व त्याप्रमाणें माझे इंग्रजी व्याख्यान लिहून छापून वाचण्यांत आले. या सभेपासूनच स्पेशल सरकारी रिपोर्टर सभाना पाठविण्याची सुरुवात झाली. आणि पुढे सात आठ वर्षेपर्यंत आम्ही कोणींहि व्याख्यानास निघालो म्हणजे पोलिस रिपोर्टर आमच्या परिवारात मिसळून आमच्याच बरोबर त्याने प्रवास करावा असा योग येत होता. पुण्याच्या माझ्या व्याख्यानाच्या दिवशी आयत्यावेळी म्हणून एक्झिक्युटिव्ह कौन्सिलरांचे खास लघुलेखक पाठविण्यात आले होते. पण पुढे अनेक रिपोर्टर पाहिजेत म्हणून अधिक माणसें ठेवण्यात आली, आणि आम्ही स्वराज्याच्या चळवळीत त्यांना अन्नाला लावून लघुलेखन घटविण्याकरिता शाळाहि घालून दिली असें म्हटले तरी चालेल! टिळकांवरील खटल्यात डि. मॅ. ने त्याचा जामीन घेतल्यामुळे पुढे हायकोर्टात तो रद्द होईपर्यंत व्याख्यानांचे काम व दौऱ्याचें काम थोडेसें दबून दबूनच चालू होते. पण हायकोर्टाने जामीन रद्द केल्यावर व्याख्यानाची व दौऱ्याची जी कांही लाट उसळली ती सांगतां पुरवत नाही. स्वराज्य संघाचे सभासद शेकड्यांनी व हजारांनीं होऊं लागले. वर्गण्याहि शेकडो-हजारोंनी जुळूं लागल्या. शहरोशहरी व खेडोखेडी व्याख्याने सुरू झाली. अनेक ठिकाणी संघाची ठाणी बसली. आणि पायाला चाक

बांधल्याप्रमाणे टिळकांबरोबर किंवा स्वतंत्र रीतीने मी व माझी सहकारी मंडळी फिरूं लागलो.

अशा रीतीने माझ्या कार्यात व उपयुक्ततेत कणाकणांनी भरच पडूं लागली असता, त्यांतल्यात्यांत आणखी एक प्रकरण असे निघाले की त्यामुळे माझे वर्चस्व प्रतिपक्षाना दुःसह होण्याइतके वाढले. टिळकावरील खटल्याचे सरकारी बेत चालू असता टिळकांचा एकसष्टावा वाढदिवस येऊन ठेपला. अर्थात् हा फार मोठा प्रसंग कसा चागला साजरा करावा याविषयी आमच्या आमच्यात चर्चा सुरू झाली. टिळक तुरुगात असताना कवडेशास्त्री यानी टिळकाचा वाढदिवस पाळण्याचा उपक्रम केला होता. त्यालाच यंदा जाहीर समारभाचे स्वरूप द्यावे असे ठरलें. सार्वजनिक सभेत आमच्या मडळीची मोठी खासगी सभा भरली व अध्यक्षांनी समारंभाच्या सूचना मागितल्या. तेव्हा ओला कोरडा दानधर्म, मंत्रजागर, दीपोत्सव, पुराण, कीर्तन, मेजवानी, सभा, असे एका दिवसात व थोड्याबहुत खर्चात संपून जाणारे प्रकार सुचविण्यात आले. त्यावेळी काय झाले कोणास ठाऊक, पण मला एकप्रकारची स्फूर्ति होऊन अशी कल्पना सुचली की, एक लक्ष रुपयाची वर्गणी जमवून तिचा अहेर या वाढदिवशी टिळकाना करावा, म्हणजे टिळकाच्या मागे अनुयायाचे बळ किती आहे हे सरकाराला कळून येईल! त्या योगे आजवर कोणाचा झाला नाही असा गौरव टिळकाचा होऊन शिवाय हे लाख रुपये एकदम किवा वार्षिक व्याजाच्या रूपाने सार्वजनिक कार्याला आणि चळवळीला उपयोगी पडतील. ही कल्पना मी बोलून दाखवितांच कांहीना ती फारच आवडली व कांहीना ती फारच नापसंत झाली. पसत पडणाराना माझी विचारसरणी पटली. पण माझ्याविरुद्ध असणाऱ्या पराजपे जोशी वगैरे मडळीनी नाके मुरडून आपसांत कुजबूज सुरू केली. त्यांचा मुख्य आक्षेप हा की, उपक्रम करून फसला म्हणजे हसे होईल त्यापेक्षा तो न केलेलाच बरा! तेव्हां प्रश्न निघाला की शितावरून भाताची परीक्षा या न्यायाने बसल्या बैठकीस किती रुपये जमतात हे पहावे. तेव्हां मी कागद पुढे घेऊन सुरुवातीचा एक हजार रुपयांचा आंकडा घातला. माझे धनिक मित्र रा. हरिभाऊ तुळपुळे यांनीहि एक हजार रुपयांचा आंकडा घातला. मग आणखी काही लोकांचे इतके नाहीत तरी बरेच मोठे आंकडे पडून पांचसात हजारांची रक्कम जुळली. तें पाहून सुचलेली कल्पना अमलांत आणण्याचे ठरले. आणि मी व माझे कांही मित्र यांनी या

कामास निश्चयाने सुरुवात केली. माझे प्रतिपक्षी मात्र चुरमुरे खात स्वस्थ बसले. शिताची परीक्षा पास होऊन भात शिजणार हे त्याना नाकबूल करतां येईना. पण कबूल करावे तर वर्गणी द्यावी लागते, व त्याहिपेक्षां विषादाचे मोठे कारण हे कीं नावडत्या माणसाने काढलेली कल्पना यशस्वी ठरण्यास मदत होते. पण मी हे ओळखून त्यांची वाटच सोडून दिली व आपल्या कामास लागलों.

ही योजना अवघ्या तीन आठवड्यांत, आणि ती देखील सर्वस्वी खासगी किंबहुना गुप्त अशा प्रयत्नाने, यशस्वी कशी व किती झाली याची हकीकत सविस्तर रीतीने टिळक चरित्र खंड ३, भाग २ यांत मी दिलीच आहे. येथे इतकेच सांगतो कीं माझी कल्पना जितकी चांगली तितके तिला यशहि निर्विवाद आले. खटपट करणारानी अर्थात् टिळकांच्याकरितांच ती खटपट केली, पण कल्पना मी काढली असे कर्णोपकर्णी कळल्यावर माझ्या पत्रांनीच इतके काम झाले की मला या टोकापासून त्या टोकापर्यंत, म्हणजे कर्नाटकापासून नागपूरपर्यंत, एक नुसती धावती खेप घालून येण्यापेक्षां स्वतः काहींच करावे लागलें नाही. ही कल्पना प्रथम टिळकाना होतां होईतो कळूच द्यावयाची नाही असा आमचा बेत होता. यामुळे गांवोगांव पत्रे लिहिणे, मनुष्ये पाठवणे वगैरे कामे टिळकांना चोरून, म्हणजे गायकवाड वाड्याच्या बाहेर, होतां होईतो मी करीत होतो. कल्पना यशस्वी करून जमले तर टिळकांनाहि आश्चर्यचकित करावे अशी आम्हाला हौस वाटत होती. पण चार सहा दिवसांनीं टिळकांना ही गोष्ट नक्की कळली. तेव्हा त्यानी मला विनोदाने म्हटले की, "तुम्ही मला एक लक्ष रुपये देऊन एकदम श्रीमंत करण्याचा विचार केलेला दिसतो." त्यावर मी इतकेच म्हणालो की, "तुम्ही नेहमीचेच श्रीमंत आहा. तुम्हाला काय कमी पडणार! आणि लोकाच्या पैशाने श्रीमंत होणारे तुम्ही नाही हेंहि आम्हाला कळते. पण शक्यतर एक लक्ष रुपये जमवून तुम्हाला दिल्याने सरकाराला लागला तर नाजूक धाक लावावा अशी कल्पना मंडळीत निघाली; आणि ती कशी काय साधते हे पहाण्याच्या हौसेने आम्ही वर्गणी जमविण्याचा हा खेळ करीत आहो. तुमचा त्यांत कांही एक संबंध नाहीं. कल्पना सिद्धीस गेली तरी वाहवा, न गेली तरी वाहवा!"

वऱ्हाडकरांना या कल्पनेस बिनतक्रार पाठबळ दिले. इतकेच नव्हे तर या वेळी आधी कांही दिवस अच्युतराव कोल्हटकर हे 'मेसेज' पत्राकरितां वऱ्हाडांत

वर्गणी गोळा करीत होते त्यांना वऱ्हाडच्या पुढाऱ्यांनी स्पष्ट सांगितले की, " टिळ-कांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त त्यांना एक लक्ष रुपयांची थैली अर्पण करण्याची कल्पना निघाली ती उत्तम असून तिचा आम्ही पहिला मान करणार. त्या कार्याला प्रथम वर्गणी देऊ. आणि तुमच्या मेसेज पत्रालाहि देऊ पण मागाहून देऊ. " पण नागपुरास कांही मंडळी अशी होती की, त्यांना आधी विचारल्याशिवाय पुण्यांत काहीं कल्पना निघाली तर त्यांना त्याचा राग येई. आणि हे पुणेकर कल्पना काढतात आणि आमच्यावर लादतात, हा एक प्रकारचा जुलूम होतो, असे त्यांना वाटे. पण ही कल्पना अगदी स्वयंस्फूर्तीनें एकदम उत्पन्न झालेली, नागपुरकरांना विचारण्याला अवसरहि नव्हता, तेव्हां त्यांना कसे विचारणार ! हे कांही असले तरी वरील विचारसरणीच्या मंडळीनी रुष्ट होऊन थोडासा खो घातला. मात्र कल्पनेत नांवे ठेवण्यासारखे कांही नसल्यामुळे आपला रोष आपणच खाऊन टाकून त्यांना या कार्याला वर्गणी द्यावी लागली.

ठरल्या तारखेस समारंभ झाला. अखेरच्या दोन दिवसांत पैशाचा पाऊस पडावा असे झाले. समारंभांतील मानपत्र वाचण्याला मी उभा राहिलों असतांहि माझ्या हातांत लोक नोटा आणून देत होते; व वाटचालींतील रकमा जमेस धरल्या असता एक लाखाची बेरीज भरत होती. एकंदर समारंभ फारच चांगला झाला. तारीख ३० जून रोजी रात्री ८७३३६ रुपये प्रत्यक्ष वसूल झाले. अर्थात् बाकीचे जमण्याला उरलेले दिवस पुरे होते. समारंभाला बाहेरगावची मंडळी आधी वर्गणी पाठवून किंवा बरोबर घेऊन आली होती. अशा रीतीनें हा समारंभ अकल्पित रीतीनें यशस्वी झालेला पाहून टिळकांनाहि फार आनंद झाला हे सांगावयास नकोच. आणि मजजवळ जरी बोलून दाखविले नाही, तरी मी ही कल्पना काढून यशस्वी करून दाखविल्याबद्दल त्यांनी अनेकांजवळ मजसंबंधी प्रशंसापर उद्गार काढले. मजबरोबर या कामी सहकार्य करणारांनाहि अशी इच्छा झाली की, मी हे मोठे काम केले म्हणून एखादा खासगी समारंभ करून माझा कांहीतरी सत्कार करावा. त्यांना मी परोपरीनें मोडा घातला; व अगदी अंतरगांतल्या दोघा तिघांना असे सांगितले की, " तुम्ही मजविषयी अशी भावना धरतां यांत मला सर्व मिळालें. माझा अभिमान धरून ही गोष्ट तुम्ही करणार असाल तर, ही कल्पना काढून मी सिद्धीस नेऊं शकलों ही गोष्ट माझ्या प्रतिपक्षांना लाजविण्याला पुरेसे आहे. फिरून त्यांच्या जखमेत मीठ कां घालतां ? या तुमच्या समारंभाने माझ्या

विषयीचे त्यांचे वैषम्य व्यर्थ वाढेल." तरी सुद्धा त्यांनी सार्वजनिक सभेच्या तिमजल्यावर अनेक लोकांना निमत्रणे करून मला एक पुष्पहार व एक सोन्याची आंगठी नजर केली. माझ्या अपेक्षेप्रमाणे काही ठराविक लोक या समारंभाला हजर राहिले नाहीत. त्यांना त्या समारंभामुळे फारच वाईट वाटले !

ही एक लक्ष रुपये वर्गणीची गोष्ट मोठी झाली असे लोकांना वाटण्याचे मुख्य कारण असे की, यापूर्वी महाराष्ट्रात इतकी मोठी वर्गणी कधी झाली नव्हती. यापूर्वीची जाहीर वर्गणी म्हटली म्हणजे कै. माधवरावजी रानडे यांच्या स्मारकाप्रीत्यर्थ जमविलेली वर्गणी. रानड्यांइतके मोठे नांव तेव्हां महाराष्ट्रांत दुसरे झाले नव्हते. नामदार गोखल्यांसारखा मनुष्य हे काम हातीं घेऊन निश्चयाने सरसावला होता. सरकार, सस्थानिक, लोकलबोर्डे, म्युनिसिपालिट्या, अशा सर्वांची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष मदत या स्मारकाला घेतली होती. आणि रानड्याना प्रिय व महाराष्ट्राला उपयुक्त असा जो उद्योगधंद्याच्या वाढीचा विषय त्यासाठी Ranade Economic and Industrial Institute या नावाची सस्था काढून हे स्मारक करावयाचे असा हेतु प्रसिद्ध करण्यांत आला होता. अशा रीतीने सर्व बाजूनी अनुकूल परिस्थिति असतां या स्मारकाला वर्गणी पाऊण लाखावर जमली नाही; व ती जमविण्याची खटपटदेखील कितीतरी दिवस जाहीररीतीने सुरू होती. त्याच्या उलट ज्यांच्या नांवाशी सबंध ठेवण्याला श्रीमंत लोक कचरत होते अशा टिळकांच्या वाढदिवसाचा समारंभ, आणि त्या करिता अवघ्या तीन आठवड्यांत गाजावाजा न होताहि विद्युद्वेगाने एक लक्ष रुपये जमले, या गोष्टीचा अचंबा लोकाना वाटल्याशिवाय कसा राहील !

या वाढदिवसाच्या समारंभाच्या दिवशीच सकाळी टिळकांवर जामीनकीच्या खटल्याची नोटीस बजावण्यांत आली. त्यासबंधीची हकीकत व पुढील खटल्याची हकीकत मी टिळकचरित्र खड ३ यामध्ये सविस्तर दिली आहे म्हणून त्यासबंधाने येथे कांही लिहीत नाही. पण माझ्यापुरते म्हणून इतकेच सांगतो की, या खटल्यांतील खटपट ओघानेच मजकडे आली होती. मुंबईस जाऊन बॅरिस्टर जिना वगैरेना भेटून त्यांना टिळकांचे वकीलपत्र घेण्याला विनति करणें वगैरे गोष्टी मीच केल्या. आणि इकडे खटला सुरू असतांहि नवीन स्थापलेल्या होमरूल लीगची चळवळहि मी सुरू ठेवली होती.

याच साली लखनौ येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेला मी टिळकांबरोबर गेलो होतो. डॉ. साठे वगैरेच्या खटपटीने जी. आय्. पी. रेल्वेच्या अधिकाऱ्यांकडून स्पेशल ट्रेन काढविण्यांत आली होती. एक सबध आगगाडी भरेल इतके टिळकांचे मित्र व अनुयायी सगळ्या वाटभर जयघोष करीत, जयघोष ऐकत, मेजवान्या खात चालले होते. त्यावेळच्या उत्साहाचे वर्णन करणे जवळ जवळ अशक्य आहे. टिळकानी प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेत जाऊन आपले बहुमत करण्याचा प्रसंग अजून दूर होता. किंबहुना तो प्रत्यक्ष आलाहि नाही. टिळक कॉंग्रेसच्या प्रतिज्ञापत्रिकेवर सही करून राष्ट्रीय सभेला जाणार असे कळल्याबरोबर मुंबई टाइम्सने बिगूल फुकून इषारा दिला, व नेमस्ताना हलवून जागे करून सांगितले की, "हा ! संभाळा ! टिळक राष्ट्रीय सभा कार्बीज करण्याला निघाले !" पण नेमस्ताना हे भविष्य आधीच कळून चुकले होते प्रतिज्ञापत्रिकेवर सही करून जाऊ नये असा राष्ट्रीयपक्षाच्या छावणीत जोपर्यंत पुकारा सुरू होता तोपर्यंत आपण सुरक्षित आहो असे नेमस्ताना वाटत होते. पण प्रतिज्ञापत्रिकेवरहि सही करू पण राष्ट्रीय सभेत घुसू असा त्या छावणीत उलटा पुकारा होऊ लागताच नेमस्ताना आपले भवितव्य कळून चुकले. आणि टिळकाच्या जयघोषात निघालेली ही स्पेशल ट्रेन म्हणजे, हल्ल्याचे नव्हे तर एकप्रकारे विजयाचेच, रणशिंग होय असे ते घेऊन चालले. १९०७ साली सुरत येथे राष्ट्रीय सभेच्या मंडपात उभे राहिलेले टिळक व १९१६ साली लखनौच्या राष्ट्रीय सभेच्या मंडपात उभे राहिलेले टिळक या दोहोत किती अंतर पडले होते हे, ज्याने ते दोन्ही प्रसंग पाहिले असतील त्यालाच कळून आले असते. लखनौ येथील सभेत गांधी व टिळक यांचा प्रत्यक्ष विरोध नव्हता. पण टिळकांकडे नेमस्तांची वकिली करण्याकरिता ते येत; व त्या दोघांमधील बोलणे किंवा पत्रव्यवहार करण्याचे काम मजकडे आले होते.

तसेच लखनौ कॉंग्रेसचे अध्यक्ष अंबिकाचरण मुजुमदार यानी विषय-नियामक कमिटीतील त्यांच्या सेक्रेटरीचे काम मजकडे दिले होते. १९०७ साली, म्हणजे सुरतेच्या राष्ट्रीय सभेच्या वेळी परप्रांतांत माझी फारशी प्रसिद्धी नव्हती, व सुरतेच्या सभेनंतर १९१६ सालीच प्रथम मी फिरून राष्ट्रीय सभेत गेलों. तथापि दरम्यानच्या या काळांत मराठा पत्राचा संपादक या नात्याने इतर प्रांतांतून माझी बरीच प्रसिद्धी झाली होती. येथपासून राष्ट्रीयसभेच्या विषय-नियामक कमिटीत माझी निवडणूक नेहमी होत असे; व या सभेतील चर्चेमध्ये मी ठराव मांडून

किंवा उपसूचना मांडून वादविवादांत भाग घेत असे. मात्र या सूचना उपसूचना टिळकाच्या समतीने तयार केलेल्या व अप्रत्यक्ष रीतीने त्याच्या धोरणाला उपयोगी अशा असत.

टिळकानी पहिल्या प्रवेशानेच राष्ट्रीयसभा जवळ जवळ काबीज केली होती. मंडपाच्या बाहेर तर त्याचाच जयघोष सुरू असे. त्यामानाने गाधी हे अजून प्रसिद्धीला आलेले नव्हते; व खुद्द त्याचा असा म्हणण्यासारखा अनुयायीवर्गहि फारसा नव्हता. लखनौ येथील विषयनियामक कमिटीच्या सभासदाच्या दुतर्फी यादी तयार झाल्या. त्यापैकी एकीतहि गाधी याचे नाव नव्हते. पण ते आयत्यावेळी सुचविले गेले व टिळकपक्षातील मते मिळाल्यानेच ते निवडून आले! टिळकाविषयीचा द्वेष नेमस्त पक्षाने मात्र अद्यापि सोडून दिला नव्हता. पण त्यातल्या त्यात मुबईच्या नेमस्ताचा त्याच्यावर फार रोष; व तोहि ते अगदी उघड रीतीने प्रगट करीत. विषय-नियामक कमिटीच्या निवडणुकीत एका विरुद्ध एक नाव मताला घालण्याची वेळ आली तेव्हा टिळकाविरुद्ध मुंबईच्या मडळीनी गोकुळदास पारेख याना पुढे केले. परतु अखेर टिळकानाच बहुमते पडून ते निवडून आले.

यावेळी राष्ट्रीय सभेत एक प्रकारचा तिरगी सामना चालू झाला. एक पक्ष मुंबईकर प्रमुख नेमस्तांचा, दुसरा पक्ष टिळकाच्या राष्ट्रीय होमरूलर लोकांचा, व तिसरा पक्ष बेझट बाईच्या थिऑसॉफिस्ट होमरूलर लोकाचा बाईचा ओढा, म. गांधीप्रमाणे, त्यातल्या त्यांत नेमस्त पक्षाकडेच अधिक असे. परतु टिळकाबरोबर बाईनीहि होमरूल सस्था स्थापन केलेली असल्यामुळे त्याना टिळकांना उघड विरोध करता येत नसे; व त्यांच्या अनुयायांमध्ये तर नेमस्तापेक्षा टिळकाकडेच सहानुभूतीचे पारडे अधिक झुकते. राही. या दोन्ही होमरूल लीगच्या विद्यमाने लखनौ येथें राष्ट्रीय सभेच्या बैठकीनतर सयुक्त सभा म्हणजे 'स्वराज्यसंघ परिषद' भरली. त्याला सुमारे एक हजार होमरूलर हजर होते. होमरूलर लोकांचे हे संख्याबल पाहून राष्ट्रीयसभा आतां आपल्या हातून गेली असे नेमस्तांनी पक्के मानले; व त्याप्रमाणे पुढच्या वर्षापासून नेमस्त पुढारी राष्ट्रीयसभेला येईनासे झाले. सुमारें चार दिवस खासगी भेटी, बैठकी, चर्चा, सभा, समारंभ चालू होते; व या सर्वांमध्यें टिळकांचा असिस्टंट, किंवा दुय्यम किंवा मदतनीस म्हणून पुष्कळसे काम

जबाबदारीने मला करावे लागले. अशा रीतीने प्रत्यक्ष परिचय वाढल्यामुळे एक प्रांतीय पुढारी या नात्याने माझी गणना होऊ लागली.

लखनौ कॉंग्रेसनंतर टिळक व आम्ही मंडळी कानपूरला गेलो; व तेथून पुढें निरनिराळे लोक निरनिराळ्या भागाकडे गेले. मोतीलाल घोष यांना भेटण्याकरिता खापर्डे व वासुदेवराव जोशी यांना घेऊन टिळक कलकत्त्यास गेले व नागपुरावरून परत पुण्यास आले. नागपुरच्या नेमस्त लोकांनी या वेळी टिळकांशी बरेंच सहानुभूतीचे वर्तन केले. याचा अर्थ नऊ दहा वर्षांपूर्वी नागपूर येथे झालेले जहाल व मवाळ यांचे रणसंग्राम लोक विसरून गेले होते. मी टिळकांबरोबर न जातां केसरीच्या कामाकरिता दोन दिवस आधीच निघून तानडीनं पुण्यास आलो, व 'स्वराज्याचे निशाण लखनौ येथे रोवले' अशा अर्थाचा अग्रलेख केसरीत लिहिला. पर्वीचे स्वराज्यविषयक मर्यादित लिहिणे व लखनौ येथे कॉंग्रेस-मुस्लीम लीग यांनी एकमताने बनविलेली स्वराज्याची घटना मंजूर झाल्यावरचे लिहिणे, या दोहोंमध्ये त्या वेळी मनाचा मनालाच मोठा फरक वाटला पूर्वी मनात ध्येय तेंच असता कोणास स्पष्ट बोलवत नसे. प्रकाशाचा किरण सूर्यावरून सुटला आहे, पण आकाश मेघाच्छादित असल्यामुळे उजेड पडत नाही, अशी पूर्वीची स्थिति होती. पण सगळे ढग वाऱ्याने उधळून लावावे, व आकाश मोकळे होऊन जिकडे तिकडे प्रकाशच प्रकाश पसरावा, तशी आताची स्थिति वाटू लागली.

सन १९१७ च्या जानेवारीत गायकवाडवाड्यांत आमच्या स्वराज्यसंघाची पहिली मोठी सभा भरली लखनौ येथील राष्ट्रीयसभेने आपल्याशी संघटित असलेल्या संस्थांना स्वराज्याच्या चळवळीचा प्रसार करण्यास आज्ञा केली होती. आम्ही आमचे स्वराज्यसंघ हे राष्ट्रीयसभेचे घटक म्हणून तिच्याशी संलग्न करून घेतले नव्हते. पण स्वराज्याच्या चळवळीच्या कार्यात किंवा अधिकारदानांत या स्वराज्यसंघांना घेऊ नये, त्यांची प्रवृत्ति जहाल म्हणून त्यांना बहिष्कृत मानावे, असा गिल्ला नेमस्तांनी लखनौ येथे केला होता परंतु अखेर तो जुमानला गेला नाही; यामुळे स्वराज्यसंघ हे जणू काही आपण राष्ट्रीयसभेचेच अधिकारी अशा भावनेने खुल्या दिलाने स्वराज्याची चळवळ करूं लागले. पुण्यांत स्वराज्यसंघाची सभा झाली तीत आढावा घेतला त्यावरून असे दिसले की, आमच्या स्वराज्यसंघाच्या सहा शाखा प्रस्थापित झाल्या. तीन

हजारांहून अधिक सभासद झाले आणि वर्गणी व देणगी मिळून ७००० हजार रुपये जमले. या सभेत अधिक प्रचारक नेमून दौरे काढावयाचे ठरले. आणि निरनिराळ्या ठिकाणची निमत्रणे येऊ लागल्यामुळे मला निम्मे दिवस पुण्यास काढावे व निम्मे दिवस बाहेर हिडावे असा कार्यक्रम आखावा लागला.

या सुमारास टिळकांनीं लष्करभरतीचा उपदेश सर्रास सुरू केला. बेझंट-बाई तर महायुद्धात इंग्लडला सर्वस्वी मदत करावी अशाच मताच्या होत्या. तथापि होमरूल मागणाऱ्यांनी साम्राज्याला मदत करावी असे म्हणणे हा नुसता वरकरणी बहाणा असून आंतील इगित वेगळेच आहे असे मानून सरकारने, लष्कर-भरतीच्या उपदेशाचे उपकार न स्मरता, होमरूल लीगच्या चळवळीचा अपकार मात्र मनांत ठेवला. आणि बेझट-बाई व टिळक याना निरनिराळ्या प्रातांत प्रवेश करण्याच्या बदीचे हुकूम सुटू लागले. लष्कर भरतीचा उद्योग खाडिल-करांना पसत असला तरी त्यांच्या नेहमीच्या मित्रांना तो अप्रिय होता; व महायुद्धात सरकारला लष्करभरतीची मदत हिंदी लोकानी करणे हा अगदी खुळेपणा होय, यांत धोरण अगदीच चुकते, असे वाटत होते. असे पाहून टिळ-कांनी अशी युक्ति केली की, लष्कर व युद्ध हे खाडिलकराचे आवडते विषय म्हणून, लष्करभरतीच्या चळवळीत, त्यांनी खाडिलकर यांना आपले मदतनीस म्हणून मुद्दाम घेतले. या वर्षी एप्रिल महिन्यांत टिळकांच्या बरोबर कर्नाटकांतील दौऱ्यावर मी व खाडिलकर गेलो होतो; व ठिकठिकाणी सभांतून आमचीहि भाषणे टिळकांच्या आगेमागे होत असत.

पुढे मे महिन्यांत नाशिक येथे मुंबई प्रांतिक परिषद भरली. तिचे अध्यक्षस्थान कोणाला द्यावे असा प्रश्न निघाला तेव्हां मी भीत भीत नामदार श्रीनिवास शास्त्री यांचे नांव सुचविलें. भिण्याचे कारण असे की, शास्त्री हे नेमस्त पक्षाचे एक पुढारी. अर्थात्, राष्ट्रीयपक्षांतील एकाद्या पुढाऱ्याचे नांव सुचवावयाचे ते टाकून हे कसें सुचवावे ! पण टिळकांनाहि ती सूचना मान्य झाली. फेरोजशहा मेथा गोखले हे दोघेहि गेले, तेव्हां त्यांच्यामागून येणाऱ्या दुसऱ्या पिढींतील पुढारी सामोप-चारानें वश करून घेतां आले तर पहावें, हे धोरण टिळकांना इष्ट वाटलें. शिवाय आतां राष्ट्रीय सभेंत सर्व पक्ष मिसळून गेले होते, इतकेंच नव्हें तर होमरूलची मागणी करण्यांत सर्व पक्ष जवळ जवळ एकच होते; फक्त राष्ट्रीय सभेनें होमरूल

या शब्दाला आयर्लंडचा वास येतो म्हणून त्या ऐवजी वसाहतीचे स्वराज्य हे नांव आपले ध्येय प्रगट करण्यास स्वीकारले होते इतकेच काय ते. 'टिळक-पक्षाने आपणाला मोठेपणा देऊन नाशिक प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष नेमण्याची खटपट केली म्हणूनच ते घडले, एरवी मुबईच्या नेमस्तांना आतां जवळ जवळ कांहीच स्थान उरले नव्हते; फेरोजशहा मेथा यांनी आपल्या प्रभावळीतील मंडळी एकामागून एक अध्यक्ष म्हणून बाहेर जिल्ह्यावर लादण्याचे दिवस गेले; व ही सत्ता पुण्याच्या नेमस्तांच्या हाती केव्हांच नव्हती;' या गोष्टीची जाणीव श्रीनि-शास्त्री यांना होती. अध्यक्ष या नात्याने त्यांनी एखाद्या होमरूलरप्रमाणेच भाषण केले व परिषद संपल्यानंतर मला मुद्दाम पत्र लिहून कळविले की " मला अध्यक्ष केल्याबद्दल मी टिळकांचे व तुमचे आभार मानतों." नाशिक येथे परिषद सुरू असतां नामदार शास्त्री याना मराठी भाषा समजत नसल्यामुळे त्यांचा प्रतिनिधि म्हणून विषयनियमक कमिटीत व परिषदेताहि सभांचे सर्व याज्ञिक चालविण्याचे काम मजकडे आले होते; व जवळ जवळ मीच अध्यक्ष या नात्याने परिषदेच्या सर्व व्यवहारांत लोकानी मला मानून वागविले.

यानतर मद्रासेकडे गव्हर्नर लॉर्ड पेटलंड व बेझंटबाई यांचा पुरा बेबनाव झाला; व अखेर बाईना व त्यांच्या एकदोन मदतनिसांना उटकमंड येथे नजर कैदेत ठेवण्यांत आले. बाई मद्रासेहून जाण्यापूर्वी तेथे त्यांचा पुष्कळच सत्कार झाला; व बंधुत्वाच्या नात्याने महाराष्ट्र स्वराज्यसंघाचा प्रतिनिधि म्हणून टिळकांनी मला मद्रासला बाईना भेटण्याला पाठविले. याप्रसगी बेझंटबाईचा पाहुणा म्हणून मी अड्यार येथे राहिलो, व बाईच्या सांगण्यावरून त्याच्या 'न्यू इंडिया' पत्रांत एक प्रासंगिक अग्रलेख आपल्या सहीवर लिहिला. त्याची बाईनीं बरींच प्रशंसा केली. बेझंटबाईना अटक झाल्याचा राग येऊन राष्ट्रीयसभेने चळवळ करा-वयास पाहिजे होती. परंतु तिनें तशी कांहीच केली नाहीं. तथापि उभय स्वराज्य-संघांच्या आम्ही चिटणीसांनी ती चळवळ करून, पूर्वी होमरूलर नसलेले लोक 'आम्ही यापुढें होमरूलर बनलों' असे जाहीर करण्यास पुढें येतील अशी खटपट केली. या चळवळीमुळें स्वराज्यसंघांच्या सभासदांची सख्या एकदम तुफान वाढली. नेमस्तपक्षांतहि हा आवेश अर्थात् स्वतंत्रपणें संचरला. आणि सुरेन्द्रनाथ बानर्जी, बॅरिस्टर जिना, सी. वाय्. चिंतामणी, वगैरे लोकहि आम्ही होमरूलच मागणारे आहो असे म्हणून प्रतिज्ञापत्रकांवर सह्या करण्यास तयार झाले.

याच सुमारास गांधींनी चंपारण्यांत सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. अद्यापि त्यांनी हिंदुस्थानांत प्रत्यक्ष राजकारणात या शस्त्राचा उपयोग सुरू केला नव्हता. पण किसानवर्गाची त्यांना मनांतून विशेष सहानुभूति वाटत असल्यामुळे त्यांनी ते नवीन शस्त्र त्या वेळी या कार्यांत चालविले. मुंबईची प्रांतिक कॉंग्रेस कमिटी अद्यापि मुंबईतील प्रमुख नेमस्तांच्याच हाती असल्याने तिने सत्याग्रहाच्या चळवळीस मान्यता द्यावी की नाही हा नाजूक प्रश्न उपस्थित केला. त्यासंबंधाने मी एक प्रबंध या विषयाची चर्चा करून लिहिला. आणि शेवटी नारायणराव समर्थ व मी, यांनी इतर एक दोन सहकारी यांच्या मेळाने, सत्याग्रहाची तत्त्वे व त्याच्या मर्यादा ठरविल्या व तो रिपोर्ट कॉंग्रेसकमिटीपुढे मांडला. त्यावर कमिटीत बराच वादविवाद झाला व शेवटी गांधी टिळक व चंदावरकर या तिघांनी मिळून एक ठराव तयार केला तो प्रांतिक कमिटीने मंजूर केला.

याच सुमारास हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मि. मॉंटेग्यु यांनी ऑगस्ट महिन्यांत एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यात स्वराज्यदानासंबंधी नेहमीप्रमाणे मोघम भाषा वापरली होती. पण त्यांतल्या त्यात विशेष महत्त्वाची गोष्ट ही सांगितली होती की, ते व गव्हर्नर जनरल लॉर्ड चेम्सफर्ड हे उभयता मिळून खुद्द हिंदुस्थानांत अनेक ठिकाणी हिंडून लोकांच्या आकांक्षा व योजना समजावून घेणार, व नंतर सुधारणाची आपली योजना प्रधानमंडळापुढे मांडून ठरेल त्याप्रमाणे पार्लमेंटकडून त्या योजनेला कायद्याचे स्वरूप देणार. या जाहीरनाम्यामुळे हिंदी राजकीय वातावरणात एकदम फरक पडला. आशेच्या ऊबदार किरणांनी निराशेचे धुके वितळून गेले; व स्वराज्याची चळवळ जरी थांबली नाही तरी उभयपक्षी भावनेची जी तीव्रता पूर्वी उत्पन्न झाली होती ती शमली. ब्रिटिश सरकारनेच स्वराज्यदानाचा विचार केला ! मग स्वराज्याच्या नावाने कोणी कांही मागितले तर त्यांत वावगे असे कांहीच म्हणतां येत नव्हते. येऊन जाऊन रागाचा प्रश्न. पण देत नाही म्हणेपर्यंत राग ! " देणार आहो, देण्याच्याच विचारांत आहो " असे स्वतः सरकारच म्हणू लागले तर मग रागवावयाचे कोणावर व काय म्हणून ! तात्पर्य, आवेशाची व उद्योगाची दिशा किंचित् बदलून स्टेट सेक्रेटरी व व्हाइसरॉय यांनी ' वर मागा ' म्हणून आव्हान केले तर त्यांच्या पुढे उभे राहून काय मागावे या विधायक विचाराला सुरुवात झाली.

या जाहीरनाम्याचा शुभशकून समजून विलायतेत जाऊन यावेळी कोणी चळवळ केली तर तिचा बराच उपयोग होईल, म्हणजे मॉटेग्युसाहेब इकडे असता चळवळीचा प्रतिध्वनि तिकडे कोणी काढला तर तिकडील लोकाचे लक्ष सहजच अधिक जाईल, अशा विचाराने आमच्या स्वराज्यसघाचे अध्यक्ष बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनाच विलायतेत पाठवावे असे टिळकानी ठरविले. बेझंटबाई स्वतः विलायतेस वरचेवर जातच असत. तेव्हा आपल्या स्वराज्यसघानेहि कोणी तरी तिकडे पाठवून चळवळ करावी हे युक्त व अवश्य आहे अशा विचाराने टिळकाकडून बॅप्टिस्टा याना धाडण्यात आले. विलायतेत चळवळ करणे अगत्याचे असले तरी आपणां स्वतःपेक्षां या कामाला बॅरिस्टर बॅप्टिस्टा हेच अधिक लायक आहेत असे टिळकांना वाटत होते. म्हणून होमरूल लीगच्या खजिन्यात त्या वेळपर्यंत जितका पैसा शिल्लक होता तितका सर्व या कामाकडे लावण्यात आला. ही गोष्ट बेझंटबाई याना पटून त्यानीहि जरूर लागेल ती मदत देण्याचे आपण होऊन कबूल केले. पण आपल्यालाहि विलायतेस पुढे मागे जावे लागणार असे टिळकांना माहीत होते. कारण चिरोल माहेबावर त्यानी लावलेली फिर्याद पुढे मागे लवकरच सुनावणीस निघणार होती. त्या वेळी वादी या नात्याने आपणाला जी साक्ष द्यावी लागेल ती, इकडे कमिशनपुढे देण्यापेक्षा विलायतेतील ज्यूरीपुढे दिली तर, अधिक श्रेयस्कर होईल, आणि या साक्षीकरिता विलायतेस जाऊ तेव्हां तेथील चळवळहि चालवू असा एका खेपत दोन कामे करण्याचा टिळकांचा विचार होता.

इतक्यांत बेझंटबाईची बंधमुक्तता झाली; व त्यांचा ७१ वा वाढदिवस त्यांच्या अनुयायांनी विशेष समारंभाने साजरा केला. अलाहाबादेस भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेसाठी टिळक व बेझंटबाई दोघेहि गेली, तेव्हां दोघांची मिळून मोठी जंगी मिरवणूक अलाहाबादच्या लोकानी काढली. या वेळीं पंडित मदन मोहन मालवीय हेच अलाहाबादेस राज्य करीत होते. पंडित मोतीलाल नेहरू अजून ऐषरामांतच लोळत असून कायदे कौन्सिलच्या कामाखेरीज राजकारणांत फारसे पडत नसत !

या सभेनंतर दोन आठवड्यांनी पंढरपूर येथे सोलापूर जिल्हा सभा झाली. तेथेहि नगराप्रमाणेच मला अध्यक्षपद देऊन टिळकांना सन्मान्य पाहुणे म्हणून मुद्दाम बोलावण्यांत आले होते. कोठेहि यःकश्चित जिल्हासभेचें अध्यक्षस्थान

टिळकांना देण्यांत त्याचा कांहीच सन्मान होण्यासारखा नव्हता. कारण ते आतां जवळ जवळ राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षपदाच्या मानापर्यंत जाऊन पोचले होते. पण आपल्या हातून होईल ते तरी करू अशा बुद्धीने पंढरपूरकरांनी टिळकांच्या सत्काराची शर्थ केली. एका पंढरपूर शहरांत त्यांच्या स्वागतार्थ ३०० कमानी उभ्या करण्यांत आल्या होत्या. टिळकांचे चन्द्रभागेच्या वाळवटांत व्याख्यान झाले तो प्रसग चिरस्मरणीय होता. तसाच बाजारपेठेतील व्याख्यानाचाहि. इतर ठिकाणाप्रमाणे याहि ठिकाणी जिल्हासभेला जोडून इकडील केंद्राच्या स्वराज्य-संघाच्या सभासदांचे समेलन भरविण्यांत आले.

नोव्हेंबर महिन्यात मॉटेग्युसाहेब हिंदुस्थानांत येऊन त्यांनी शिष्टमंडळांच्या भेटी घेण्यास सुरुवात केली. आमच्या स्वराज्यसघातर्फे दिल्लीस पाठविलेल्या शिष्ट-मंडळांत टिळक, खापर्डे, करंदीकर, मी स्वतः, बेळवी, गंगाधरराव देशपांडे, डॉ. मुंजे इत्यादि मंडळी होती. पुण्यास खाडिलकर व इतर मंडळी यांच्या स्वाधीन वर्तमानपत्रे करण्यांत आली होती. डिसेंबर महिन्यांत मॉटेग्युसाहेब मुंबईस आले. तेथे सार्वजनिक सभेतर्फेचे डेप्युटेशन आपली कैफियत घेऊन पाठविण्यांत आले या शिष्टमंडळांत माझी नेमणूक झाली होती. या शिष्टमंडळासबंधाने एक गोष्ट सांगावयाची ती ही की, या दोघांकडून ज्या कैफियती दाखल करण्यांत आल्या त्यांचे कच्चे मसुदे करण्याचे काम मजकडे देण्यांत आले होते. आणि त्याचेंहि फिरून कारण असे की, यापूर्वी पण या प्रसगांना उद्देशूनच, मी The case for Indian Home Rule हे सुमारे दोनशे पानांचे पुस्तक इंग्रजीत लिहिले; व तेंहि स्वराज्यसघाचा चिटणीस म्हणून. यामुळे त्याला व्यक्तिगत महत्त्वापेक्षा स्वराज्य-सघाची कैफियत असेच स्वरूप जवळ जवळ होते. टिळक मंडाल्याहून परत आल्या-नंतर, पूर्वी ते मंडाल्यास जाण्यापेक्षांहि, एक प्रघात अधिक सरोस पडला होता तो असा की टिळकांना कोणत्याही विषयावर कांहीं विशेष लिहावयाचे असले म्हणजे (त्याला खासगी पत्राचे स्वरूप नसून आमच्या राष्ट्रीयपक्षाच्यातर्फे लिहिलेल्या कागदाचे स्वरूप असल्यास) अशांचे कच्चे मसुदे टिळक प्रायः मला करावयास सांगत. किंवा त्यांना स्वतः लिहावेंसे वाटले तरी प्रत्यक्ष हाताने लिहिण्याकरिता तें मलाच मदतीस बोलावून घेत. हेतु हा कीं, अशा कामात एकास दोघे असलेले बरे; व लिहितां लिहितां ओघानें सूचना केलेल्या अधिक उपयोगी पडतात. यामुळें कांहीं टिळकांनीं लिहावें, कांहीं मी लिहावें, कांहीं त्यांनीं तोंडाने सांगून

मी हातानें लिहावे, अशा सरमिसळ रीतीने टिळकांकडून जाणारे कागद लिहिले जात. परंतु The Case for Indian Home Rule हें मोठे पुस्तकच व्हावयाचे असल्यामुळे त्यांत काय विषय यावेत याची फक्त चर्चा माझ्याशी करून ते लिहिण्याचे एकदर काम टिळकांनी मजकडे सर्वस्वी अखत्यारीने सोपविले. मधून मधून मी त्याना विचारी व त्याचा सल्ला घेत असे, व अगदी शेवटची प्रुफे ते पहात असत. हे पुस्तक लिहिण्याची कल्पना बऱ्याच उशिरा निघाली. म्हणजे मॉटेग्यु साहेब इकडे येऊन दाखल होण्याच्या सुमारास ते छापून तयार होऊन त्याच्या हातीं पडावे तर त्याला फक्त सात आठ आठवड्यांची अवधी होती. पण हे काम मजकडे विश्वासाने सोपविलें असल्यामुळे मी रात्रीचा दिवस करून सर्व पुस्तक लिहून व छापूनहि काढले. या कामी ज्ञानप्रकाश छापखान्याची बरीच मदत झाली. एरवी ते पुस्तक छापून इतक्या अवधीत तयार झाले नसते. हे पुस्तक किती थोड्या वेळात लिहून व छापून झाले याचा जाहीर उल्लेख मी त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेतच केला आहे. तेव्हां ही गोष्ट इतक्या वर्षांनी मी आता फुगवून सांगत आहे असे कोणी समजण्याचे कारण नाही; आणि "केळकर होते म्हणूनच हे पुस्तक इतक्या लवकर लिहून व छापून होऊ शकले, एरवी आपल्या पक्षांतील दुसऱ्या कोणाच्याहि हातून ते झाले नसते" असे टिळकानी अनेक लोकापाशी माझ्या परोक्ष बोलून दाखविले. या पुस्तकाच्या प्रति स्वराज्यसंघातर्फे इकडे व विलायतेतहि पुष्कळ ठळक लोकांकडे पाठविण्यांत आल्या. अशा रीतीने या चार वर्षांत मी नुसता केसरीचा संपादकच नव्हे तर टिळकांचा प्रायव्हेट सेक्रेटरी व पोलिटिकल सेक्रेटरीहि होऊन राहिलो होतो.

१९१८ च्या प्रारंभी बॅरिस्टर जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं लोणावळा येथे पुणे जिल्ह्याची परिषद आम्ही भरवली. मला वाटते, याचवेळीं टिळकांचा व जयकरांचा प्रथम परिचय झाला. यापूर्वी टिळकांच्याविषयी जयकरांच्या मनांत आदरभाव असेल, परंतु ते जातीने जाऊन टिळकांना कधीं भेटले नव्हते. टिळकांबद्दल त्यांना आदर असला तरी ते त्यांच्याशी दुरूनच संबंध ठेवीत !

यानंतर लवकरच टिळक हे त्यांच्या सुप्रसिद्ध अशा मोठ्या दौऱ्यावर निघाले. या दौऱ्याची सविस्तर हकीकत मी टिळक चरित्रांत दिली आहे. मात्र ती दुय्यम पुराव्याच्या स्वरूपाची म्हणजे दुसऱ्याकडून ऐकलेल्या माहितीवरून व

दुसऱ्यांनी लिहिलेल्या लेखावरून दिलेली आहे. कारण या दौऱ्यात मी टिळकांच्या बरोबर जाऊ शकलो नाही. खाडिलकर गोखले वगैरे मडळी गेली होती. मध्य महाराष्ट्रांतील व वऱ्हाडांतील पुढाऱ्यानी व अनुयायांनी या दौऱ्याची व्यवस्था ठेवली होती व तो अत्यत यशस्वी झाला. अशा प्रकारचा दौरा यापूर्वी हिदुस्थानात कोणत्याहि पुढाऱ्याचा निघालेला नव्हता. त्या दौऱ्याची बरोबरी पुढे महात्मा गाधी याच्या दौऱ्यानीच काय ती केली, किबहुना काही अंशीं त्याना मागेहि टाकले असे म्हणण्यास हरकत नाही.

ह्या दौऱ्यांत सुमारे पाऊण लक्ष रुपये इतकी वर्गणी देणगीच्या रूपाने मिळाली व ती अगदी वेळेवरच मिळाली. कारण बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांची टिळकाना विलायतेस बोलावण्याची निकडीची पत्रे येऊ लागली म्हणन टिळकानीहि जाण्याचे ठरविले. विलायतेस डेप्युटेशन जावयाचे तर ते बऱ्याच खर्चाचे काम. त्याला ही रक्कम आयतीच उपयोगी पडली. टिळकांच्या हालचालीना व भाषणांना इकडे अधिकाधिक बंदी होऊं लागली होती. यामुळे विलायतेस जाऊन चळवळ करणे अधिक सोईचे असेहि वाटूं लागले. त्याप्रमाणे त्यानी स्वतः जाण्याचे ठरवून शिवाय बिपिनचद्र पाल, दादासाहेब खापर्डे, व मी इतक्याना आपणाबरोबर नेण्याचे ठरविले.

या वेळी पासपोर्टस् व पॅसेजेस् ही दोन्ही मिळण्याचे मोठे कठिण झाले होते. पासपोर्ट कसे तरी मिळाले. पण मुबईहून आगबोटीचा पॅसेज मिळणे दुर्घट झाल्यामुळे आम्ही कोलबोहून जाण्याचे निश्चित केले. टिळक विलायतेस जाणार ही गोष्ट लोकांना अद्भुत तर वाटलीच. पण उतार वयात दूरदेशची सफर, समुद्रांतील महायुद्ध अजून पूर्णपणे थाबलेले नसून मधून मधून आगबोटीना अपघात होत. टिळकांना मधुमेहाचा विकार असल्यामुळे व ते कट्टे शाकाहारी असल्यामुळे त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था कशी काय निभेल याविषयी लोकांना सहजच चिंता वाटे. यामुळे मोठ्या कार्यावर निघण्याकरितां म्हणून निरोप द्यावयाचाच, पण कदाचित् तो निरोप शेवटचाच होण्याचा सभव अशा भावनेनेहि तो द्यावयाचा. तेव्हां सत्कार समारभ कसे झाले असतील याची कल्पना कोणासहि होईल. अधिक माहिती मी येथे देत नाही, कारण ती टिळकचरित्रांत मी भरपूर दिली आहे.

आम्ही मडळी कोलबोचा प्रवास करीत असत। इकडे हिदुस्थान सरकार व विलायत सरकार याच्या तारा एकमेकात सुरू होत्या, व खल असा चालला होता की टिळकांना या वेळी विलायतेस जाऊ द्यावे की नाही ? आणि अखेर जाऊ देऊ नये असे ठरून अगदी शेवटच्या तासाला आमचे पासपोर्ट रद्द करण्यांत आले. ती हकीकतहि मनोरजक असून चारित्राच्या तिसऱ्या खडांत तिसऱ्या भागांत मी दिली आहे. टिळकांबरोबर इतरांनाहि ही बदी झाली होती. मिसेस् नायडू याना असाच प्रतिबध झाला. जॉर्ज जोसेफ हे बेझटबाईच्या स्वराज्यसघातर्फे म्हणून गेले. त्याना जिब्राल्टरपर्यंत जाऊ दिले व तेथ अटक केली ! पासपोर्ट रद्द केल्यामुळे अर्थातच कोलबोहून आम्हा सर्व मडळींना परत मुबईस यावे लागले. शिवाय पॅसेजेस् म्हणजे बोटीवरील जागेसबधानेहि इतकी अडचण झाली की, "नोव्हेंबरपर्यंत मुबईहून निघणाऱ्या एकाहि टपाल बोटीवर एकट्या टिळकांनाहि जागा मिळणार नाही, कोलबोहून केप ऑफ् गुड् होप वरून जपानी बोटीने कोणी जाण्यास तयार असल्यास कळवावे," असे टॉमस् कुक कपनीने आम्हाला पुण्यास कळविले ! पुढे बॅप्टिस्टांनीहि कळविले की इकडे किंचित चलबिचल झाल्यामुळे टिळक तूर्तच न येता मागाहून आलेले बरे. शिवाय पुढील राष्ट्रीय सभेच्या वेळी टिळकांना अध्यक्षस्थान देण्याचे घाटत होते, तशा स्पष्ट सूचना होत होत्या, व राष्ट्रीय-सभेचे अध्यक्ष या नात्याने राष्ट्रीय सभेची हुकमत घेऊन टिळक विलायतेस जातील तर त्याचे वजन अधिक पडेल व काम अधिक चागले होईल असे बॅप्टिस्टा यांनीं लिहिले. इग्लडांतलि गडबड म्हणजे आयरिश होमरूलच्या जोराच्या खटपटीची. महायुद्धाकरिता लष्करी नोकरीची सक्ति आयरिश नागरिकांवर कशी करितां येईल असा प्रश्न निघाला होता. आणि स्वराज्य भोगणाऱ्या इंग्लडांतहि जर अशी सक्ति करणे कठिण, तर आयर्लंडात ती करावयाची असल्यास आधी निदान होमरूलच्या स्वरूपाचे स्वराज्य तरी आयरिश लोकांना द्यावयास पाहिजे. अर्थात् अशा वेळी टिळकांनी विलायतेत जाऊन "हिदुस्थानालाहि होमरूल द्या, आम्हीहि लष्करी नोकरी करण्याला तयार आहोत" असे म्हटले तर त्याना ते नाही कसे म्हणतां येईल ? या अवघड विचारांत विलायतचे मुत्सद्दी गढून गेले होते. म्हणून त्यांनीं ठरविले कीं तूर्त विलायतेत हिंदुस्थानच्या स्वराज्यासंबधी चळवळ होऊंच देऊं नये, व इकडे हिंदुस्थानांत युद्धपरिषदा भरवून लोकांचा रागरंग काय आहे तो पहावा.

त्याप्रमाणे दिल्ली येथे एक मोठी युद्धपरिषद भरविण्यांत आली. पण टिळकांना आमंत्रण करण्यांत आले नाही. वास्तविक टिळक सैन्य भरतीला अनुकूल असे लेख केसरीत लिहीत होते. मुंबईस त्यानी सभा भरवून आठशे लोक सैन्यांत शिरण्याकरितां तयार करून त्यांची नांवे नोंदविण्याचे सुरू केले; व मी आपला एक मुलगा लष्करभरतीत पाठविण्यास तयार आहे असेहि जाहीर केले. इतके असूनहि टिळक हे महायुद्धात सरकारला मदत करण्याच्या विरुद्ध बोलतात असा खोटा समज करून देऊन त्याना काही ठिकाणी भाषणबंदी करण्यात आली होती. टिळकाप्रमाणे बेझंटबाईनाहि निमंत्रण नव्हते. हा अन्याय वाटून महात्मा गांधी हे पहिल्या दिवशी युद्ध परिषदेतून उठून गेले. पण व्हाइसरॉयानी त्याची समजूत घालून दुसरे दिवशी त्याना हजर ठेविले ! युद्धात मदत हवी तर हिंदी शिपायाचे पगार वाढवा अशी सूचना एका सभासदाने केली त्याला सरकाराने "याचा रीती-प्रमाणे विचार करूं" असे कोरडे उत्तर दिले, व खापर्डे यानी स्वराज्यदानाचा प्रश्न उपस्थित केला तेव्हा तो परिषदेच्या कक्षेच्या बाहेर आहे असे ठरवून व्हाइसरॉय साहेबांनी काढून टाकला.

पण हाच प्रश्न मुबईस प्रांतिक युद्धपरिषद भरली तीत निघाला. दिल्लीची चूक दुरुस्त करून टिळकाना निमत्रण करण्यात आले होते. तसेच त मलाहि आले. तेव्हां दिल्लीस घडलेला प्रकार लक्षांत घेऊन, मी गव्हर्नर लॉर्ड वुलिंग्डन याच्या सेक्रे-टरीना पत्र लिहून असे विचारले की "आम्हाला परिषदेस बोलावतां त्या अर्थी आम्हास तेथे भाषणे करण्याची इच्छा आहे. तरी वाटेल त्या माणसाला तुम्ही बोलू द्याल की ठराविक माणसांकडून ठराविक भाषणे करवूनच परिषद गुंडाळून घ्याल ? तसेच सभेचा कार्यक्रम काय ठरला आहे? मुख्य ठराव मांडल्यावर त्याला कोणी उपसूचना आणली तर ती आणू द्याल की नाही ?" त्यावर उत्तर आले की, "ठराविक वक्ते आधी बोलून ठराव मांडतील. त्यावर उपसूचना आणण्यास परवानगी मिळणार नाही. परंतु जाहीर चर्चेत कोणाला बोलावयाचे असल्यास परवानगी देऊ." तेव्हां सभेत काय बोलावयाचे हे आधी ठरवून टिळकांनी व मी आम्ही आपापली भाषणें लिहून काढली. त्यांत मुख्य मुद्दा हा होता की, लष्करी मदत सरकारला हवी तितकी मिळेल, परंतु स्वराज्य दिल्याशिवाय मात्र नाही. स्वराज्य व लष्करी नोकरी यांचा संबंध तोडतां येत नाही. मग अदमासाप्रमाणेच घडले. म्हणजे टिळकांना बोलण्याची परवानगी मिळून ते या मुद्यावर येतांच लॉर्ड

विलिंग्डन यांनी त्यांना थांबविले, व हा अवांतर विषय तुम्ही बोलूं नये असे सांगितले. असे होणार याचे स्वप्न पडलेच होते, म्हणून ठरल्याप्रमाणे टिळक परिषद सोडून निघून गेले. नतर माझी पाळी आली. मलाहि त्याचप्रमाणे लॉर्ड विलिंग्डन यानी मध्येच थांबविले व मीहि सभागृह सोडून निघून गेलो. आमच्यामागून बमनजी शेट पारशी हे काही न बोलतांच निषेध प्रदर्शीत करण्याकरिता उठून गेले. हॉर्निमन, जमनादास द्वारकादास, वगैरेनीहि तोच मार्ग स्वीकारला. बॅरिस्टर जिना व लॉर्ड विलिंग्डन याची बरीच प्रश्नोत्तरे झाली. नतर शातारामाच्या चाळीत गांधी यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरून गाधी व जिना यानी लॉर्ड विलिंग्डन याच्या कृत्याचा निषेध केला. " स्वराज्य राहो पण लष्करभरती हवी तशी झाल्यास लष्करातील वरिष्ठ अधिकाराच्या जागा तरी हिंदी लोकाना देण्याचे आश्वासन द्या " असे हिंदी पुढारी म्हणूं लागले. परंतु सरकारला मिळेल ते घ्यावयाला पाहिजे होते, काहीहि द्यावयाला नको होते. गाधी हे बिनशर्त लष्करभरती करून देण्यास तयार असून त्याप्रमाणे खटपटहि करीत होते. परतु " टिळकाना लष्करभरतीवर भाषणे करण्याची सरकाराने मनाई केल्यामुळे माझ्या रिक्रूटिंगच्या कामाला हरकत होत आहे " अशी गांधी यांनी गव्हर्नरसाहेबाकडे तक्रार केली.

यानतर मुबई येथे राष्ट्रीय सभेचे जादा अधिवेशन मुद्दाम भरविण्याचे ठरले. त्याला टिळक व त्याची मडळी हजर होती. बंगाल्याहून बरेच पुढारी आले होते. मुख्य ठराव मॉटेग्यु–चेम्सफर्ड रिपोर्टाच्या आधारे स्वराज्य मागण्याचा मंजूर झाला; व विलायतेस शिष्टमडळ पाठविण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. मुंबईहून परत जातांना बाबू मोतीलाल घोस, शामसुंदर चक्रवर्ती, चित्तरंजन दास, बिपिनचद्र पाल, बॅरिस्टर लहिरी, वसंतकुमार घोष, चिदंबरम् पिले वगैरे मडळीना 'सार्वजानिक सभेच्या मॅनेजिग कमिटीचा चेअरमन म्हणून' मी पुण्यास येण्याकरितां निमत्रण दिले. त्याप्रमाणे ही मडळी पुण्यास आली व गायकवाड-वाड्यांत त्यांची व्याख्याने झाली. पण या वेळी, टिळकांना डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखाली भाषण बंदीचा हुकूम होता, म्हणून टिळकांनी या सर्व प्रसंगांत साक्षीभूत होऊन बसावे, व त्यांच्याकरितां भाषणे वगैरे करावयाची ती अध्यक्ष या नात्याने मी करावी अशी योजना करणें भाग पडले.

यानतर लवकरच टिळक विलायतेला गेले. "चिरोलसाहेबाविरुद्ध मी फिर्याद केली ती मला चालवावयाची आहे, मला जबानी देण्याकरितां लंडनच्या ज्यूरीपुढे जावयाचे आहे, तरी मला पासपोर्ट व परवानगी द्यावी," असा आग्रह टिळकानी धरून एकसारखा पत्रव्यवहार सुरू केल्यामुळे सरकाराला नाही म्हणतां येईना. म्हणून त्यांनी "विलायतेत कोणतीहि राजकीय चळवळ करावयाची नाही" या अटीवर "फक्त वकील व एक दोघे सोबती घेऊन जाण्याची" परवानगी दिली होती. त्याप्रमाणे टिळक अवचित निघून गेले. अर्थात् या वेळी त्याच्या जाण्या-संबधाने कोणताहि सत्कार समारभ वगैरे झाला नाही. आपली निघण्याची तारीख त्यांनी फारशी कोणास कळविली नाही; कोणच्याहि समारभाला एकप्रकारचा प्रतिबधच केला;आणि एकदम उठून एखाद्या गांवी जावे त्याप्रमाणे मुबईस जाऊन बोटीत बसले. बरोबर वकील म्हणून दादासाहेब करदीकर, सोबती वासुदेवराव जोशी, व नोकर किंवा परिचारक म्हणून गणपतराव नामजोशी इतक्यानांच बरोबर नेण्यात आले.

हे झाल्यानतर ऑल इडिया कॉंग्रेस कमिटी भरली तीत टिळकांना सर्वानु-मते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडण्यात आले. पण टिळक ऑक्टोबरला विलायतेस पोचणार, व राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होण्याकरिता चिरोल केस सपवून हिंदुस्थानास परत येणार, ही गोष्ट अशक्य होती हे त्याची निवड करणारानाहि पुरे माहीत होते. म्हणून " न खात्या देवाला नैवेद्य " दाखविण्याचाच तो एक प्रकार झाला. तथापि विलायतेस गेल्यावर जेव्हा टिळकांवरील बदी उठेल तेव्हा तरी त्याना हा निवडणुकीचा मान उपयोगी पडेल अशी समजूत होती; व ती मात्र यथार्थ होती. टिळकाना अध्यक्ष निवडल्याची बातमी त्याना कॉंग्रेस कमिटीने पोर्ट सय्यद येथे तारेने कळविली, उलट टिळकानी तारेने कॉंग्रेस कमिटीचे आभार मानले व अध्यक्ष निवडणुकीच्या स्वीकारास नकार दिला. तेव्हां त्यांच्याजागी ऑ. इ. कॉ. कमिटीकडून पडित मदन मोहन मालवीय यांची निवडणूक झाली. राष्ट्रीय सभेचे अधिवेशन दिल्लीस झाले. त्याला आमची होमरूल लीगची मंडळी पुष्कळ गेली होती. त्याचप्रमाणे बेझटबाई आपलेहि पुष्कळसे होमरूलर घेऊन आल्या होत्या. सभेत मॉटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्टावर 'असमाधानकारक व निराशा-जनक' असा शेरा मारण्यांत आला. नेमस्तपक्षाने या शब्दांना हरकत घेतली पण त्यांचे कांही चालले नाही. कॉंग्रेसतर्फे विलायतेत शिष्टमंडळ पाठवावे असाहि ठराव या सभेत झाला. आणि पंडित मालवीय यांनी दिल्लीस खटपट करून

सरकारकडून याविषयीं एक पत्र आणविल होते तें वाचून दाखविण्यांत आले. त्यांत असे म्हटले होते कीं, 'कॉंग्रेसने आपले शिष्टमंडळ विलायतेस पाठविण्याचे ठरविल्यास त्यांतील सभासदांना पासपोर्ट देण्याची व्यवस्था करण्यांत येईल.'' या डेप्युटेशन संबंधाने खटपट करण्याचे काम सेक्रेटरी म्हणून मी व विठ्ठलभाई पटेल यांजकडे सोपविण्यांत आलें होते; व त्याप्रमाणे मी त्या कामाला लागून एकसारखा अनेक लोकांशी पत्रव्यवहार सुरू केला. पत्रव्यवहाराचा उद्देश कोण विलायतेस जातात, कोण जात नाहीत, हे प्रथम समजावून घ्यावे; मग त्याची नेमणूक करवून घ्यावी; आणि नंतर त्याचे पासपोर्ट व पॅसेजेस मिळविण्याची खटपट करावी असा होता. या कामाचा निकाल बरेच दिवस लागला नाही. तेव्हां पटेल व मी यांनी असे ठरविले की, कोणी येवो, कोणी न येवो, तुम्ही आम्ही व इतर चार लोक तुमच्या आमच्या बरोबर जाण्यासारखे असतील ते घेऊन आपण मार्च-एप्रिलात निघूच निघू. कॉंग्रेसचे डेप्युटेशन गेल न गेले तरी आमच्या होमरूल लीगचे जावयाचेच होते. त्याचे अध्यक्ष टिळक हे पूर्वीच विलायतेस जाऊन राहिले होते; व सेक्रेटरी म्हणून मी जावे असे ठरले होते. तेव्हां माझ्याबद्दल प्रश्नच नव्हता. पण मे–जून महिन्यापर्यंत मॉंटेग्युसाहेब हे आपले बिल पार्लमेंटपुढे आणणार नाहीत असे प्रसिद्ध झाले असल्यामुळे तेथपर्यंत मला सवड होती.

दरम्यान १९१९ च्या फेब्रुवारीत चिरोल केसचा निकाल प्रतिकूल झाला; व तो होताच एक आठवड्याचे आत आम्ही या केसच्या खर्चाप्रीत्यर्थ सुमारे तीन लक्ष रुपये फंड जमविण्याचे ठरविले. ही कल्पना प्रथम पुण्यास मी, डॉ पळसुले व आणखी एक दोन स्नेही मंडळी यांनी काढली. मुंबईस अण्णासाहेब नेनेप्रभृतींनी त्याला ताबडतोब संमति दिली. आणि मग वऱ्हाड नागपूर प्रांतांच्या स्नेही मंडळीची संमति घेऊन वर्गणी जमविण्यास एकदम सुरुवात झाली. विलायतेस जाण्याला दोन महिने अवकाश होता तो मला या वर्गणीची खटपट करण्याला चांगला उपयोगी पडला. तिकडे विलायतेत युद्ध सपून तात्पुरता तह झालेला असल्याकारणाने टिळकांवरील भाषणबंदी उठली; व त्यांनी बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांच्या सहाय्याने होमरूल लीगच्या नावाने अर्ज, प्रसिद्धिपत्रके, वगैरे काढून चळवळ सुरू केली.

नंतर बॅरिस्टर बॅप्टिस्टा व दादासाहेब करंदीकर हे एकामागून एक विलायतेहून इकडे परत आले, तेव्हां टिळकांनीं मला विलायतेस लवकर येण्याची घाई केली. त्याप्रमाणे मी व विठ्ठलभाई पटेल हे एप्रिलच्या अखेरीस विलायतेस निघून गेलो. माझ्यामागून कांही दिवसांनी दादासाहेब खापर्डे हे आले. इतक्यांत कॉंग्रेसच्या डेप्युटेशनपैकी आणखी कांही लोक आले. आणि टिळकांच्याच घरीं होमरूल लीगचे डेप्युटेशन व राष्ट्रीय सभेचे डेप्युटेशन यांच्या कामाची एकत्रच व्यवस्था सुरू झाली. डेप्युटेशनच्या कामाच्या तयारीबरोबर आम्हाला दुसरेंहि एक काम करावे लागले ते असे. विलायतेत ब्रिटिश इंडियन कॉंग्रेस कमिटी ही संस्था आणि तिचे मुखपत्र इन्डिया ही दोन्ही कॉंग्रेसच्या खर्चाने चालत असता नेमस्त पक्षाला सामील झाली होती, ती आपल्या ताब्यांत घ्यावयाची. त्याप्रमाणे टिळक पटेल व मी मिळून, ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीतील काही सभासदांची मदत घेऊन, प्रथम इंडिया पत्र ताब्यांत घेतले. दक्षिणा एकाची घ्यावयाची व आशीर्वाद दुसऱ्याला द्यावयाचा असा प्रकार या कमिटीने चालविला होता, तो इंडिया पत्र आमच्या स्वाधीन झाल्याने थांबला. लडनचे सॉलिसिटर मि. पोलाक हे गांधी व गोखले यांचे मित्र आणि नेमस्त लोकाचे पक्षपाती. त्यानी कॉंग्रेसचा हुकूम धाब्यावर बसवून पूर्वीप्रमाणे इन्डिया हे पत्र आपल्या ताब्यात ठेवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परन्तु तो सिद्धीस मात्र गेला नाही. आणि या पत्रासंबंधी पूर्वी सहसपादकाचे काम करीत असलेल्या आयरिश बाई मिस् नॉरमेन्टन् यांना व मला सजोड सहकारी संपादक नेमण्यांत आले.

इडिया पत्राचे काम अंगावर पडल्यामुळे माझा बहुतेक वेळ त्यांत जाऊं लागला. कारण दर आठवड्याला एखादे दुसरे आर्टिकल लिहावयाचे ते लिहून, शिवाय सिलेक्ट कमिटीच्या सभाना हजर राहून, तेथील कामाचा सारांशरूपाने अहवालहि द्यावयाचा असे. तिकडील छापखानेवाले इकडच्या पेक्षां मोठे टिपणबाज. म्हणजे ठरीव वेळेला त्यांना मजकूर दिलाच पाहिजे. द्यावयाचा तो अगदीं शुद्ध स्वच्छ दिला पाहिजे. टाइपिस्टची घरी सोय नव्हती; यामुळे माझा मजकूर हातानेंच लिहून द्यावा लागे. प्रुफे वाचण्याला वेळेवर गेलें पाहिजे; व एखाद्या लहानशा शब्दापलीकडे प्रुफांत करेक्शन केले तर त्याकरितां छापखानेवाला वेगळा आकार घेई! यामुळें वर्तमानपत्राचे काम मोठ्या जिकिरीचें होई. माझा मीच सेक्रेटरी असल्यामुळे पार्लमेंटरी कमिटीला हजर राहण्यापासून छापखान्यांत

जाऊन प्रुफे पहाण्यापर्यंत सर्व गोष्टी माझ्या मलाच कराव्या लागत. वर्तमान-पत्राचे हे काम या प्रसंगी अवघड होण्याचे विशेष कारण हे की, कॉंग्रेस डेप्युटेशन जन्या वतनदाराच्या हातून हिसकावून ते आपल्या हाती घेतल्यामुळे त्यांतील उणेपणा काढण्याला ते टपून बसले होते. हिंदुस्थानातील निरनिराळी डेप्युटेशने कधी नव्हे ती विलायतेस गेलेली; यामुळे विलायतेत हे इंडिया पत्र एरवीं सहसा न वाचणारे लोकहि मधून मधून वाचीत. शिवाय हे पत्र विशेष जहाल-पणाने चालविले जावे असे टिळकांच्या पलिकडेहि जाऊन म्हणणारे हॉर्निमनसाहेब लंडनलाच होते. ते या अंकात अमुक आले नाही, त्या अंकात तसे लिहिले नाही, अशा तक्रारी ऑफिसांत येऊन करीत. त्या इतक्या की, शेवटी एक दिवस कंटा-ळून मी आमच्या कमिटीला म्हणालो "हे पहा, हॉर्निमन साहेबाचे म्हणणेच बरोबर असेल तर इंडिया पत्राचे संपादक त्यांना नेमा. मी सहकारी संपादक म्हणून त्यांना मदत करीन." पण टिळकांना हॉर्निमन साहेबांच्या तक्रारी असाव्या तितक्या सयुक्तिक वाटत नसत. आणि त्यानी आहे तीच व्यवस्था दडपून चालू ठेवली. यामुळे व्याख्यानांचे कार्यक्रम काही ठरविण्यात आले त्यांत मला लंडन सोडून फारसे दूर व्याख्याने देण्यास जातां आले नाही.

टिळकांबरोबर मी ऑक्सफोर्ड व केंब्रिज येथे गेलो होतो पण त्यांच्या-बरोबर मला स्कॉटलंडला जाता आले नाही. मी फक्त बर्मिंगहॅम्, ब्रिस्टल् वगैरे जवळच्या ठिकाणी व्याख्याने देण्याला जाऊं शकलो. पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्षी द्यावयाच्या त्या व्यक्तिशः जातील तितक्या लोकांच्या न घेता गटागटानी घेण्याचे ठरले. यामुळे कॉंग्रेसतर्फे एकटे पटेल, बेझंटबाईच्या होमरूल लीगतर्फे एकट्या बाई, आणि आमच्या होमरूल लीगतर्फे एकटे टिळक, इतक्यांच्या साक्षी झाल्या. त्यांत मला स्थान नव्हते. पण मुलाखती वगैरेकरिता आम्ही सर्व मिळून जात होतो. मॉंटेग्युसाहेबांच्या भेटीला, लेबरपार्टीने दिलेल्या भोजनाला, व अशाच इतर अनेक प्रसंगी मी डेप्युटेशनचा एक सभासद म्हणून जाई. पण लंडनच्या सर्व मुक्कामांत माझे मुख्य काम इंडिया पत्राचा संपादक या नात्यानेंच राहिले. आणि या पत्राकरितां नेमलेल्या कमिटीने व ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीने मला अखेर निरोप देतांना एक रुप्याचे तबक आठवण म्हणून नजर केले.

टिळक पायाने अधू व त्यांच्या डोळ्यालाहि दूरचे दिसत नसे, यामुळें गणपतराव नामजोशी हे नेहमी त्यांच्याबरोबर हात देण्याला असतच. परंतु

त्यांच्या सेक्रेटरीचें म्हणून जे काम असे ते मलाच करावे लागे. आणि याच कामाकरिता म्हणून टिळकांनी मला विलायतेस बोलावले होते. इन्डिया पत्राचे काम मजकडे येईल अशी कल्पना मला बोलावतांना व जातांना कोणालाहि नव्हती. सिलेक्ट कमिटीचे व डेप्युटेशनचे काम संपल्यानतर, हिवाळ्याच्या तोंडी, हिंदुस्थानला परत येण्याची सर्वच शिष्टमडळांची घाई सुरू झाली. जातांना आगबोटीवर जागा मिळण्याची जशी पंचाईत झाली तशीच परत येतांनाहि ती पडली. नेमस्तपक्षाचे लोक सरकारला आवडते. त्याच्या करितां इंडिया ऑफिसचे लोक सवलती करून देत. पण टिळक व त्यांची मंडळी हे नावडते लोक. यामुळे आमच्याशी ते काटेकोरपणाने वागत. याचा परिणाम असा झाला की, मिळेल त्या बोटीवर जागा घ्यावी पण लडनहून लवकर पाय काढावा! मिळा-लेली साधि दवडली तर फिरून ती केव्हां मिळेल याचा नेम नाही यामुळे नोव्हेबरच्या पहिल्या आठवड्यात इजिप्त नावाच्या बोटीवर आम्हाला जागा मिळाल्या त्या घेऊन आम्ही इकडे निघून आलो. ही बोट मार्सेलला लागणारी नव्हती. यामुळे मला तेव्हां फ्रान्समध्ये उतरता येत नव्हते. सगळा प्रवास फक्त समुद्रमार्गाने एकदम पुरा करावा लागला. टिळकाना युरोपखडात प्रवास करावयाची इच्छाच नव्हती, यामुळे त्यांना यांत गैरसोय झाली नाही. मला मात्र वाटे कीं, इतके लाब आल्यासारखे जमल्यास युरोपखडहि एकदा पाहून घ्यावे. पण बोटीची गैरसोय वर सांगितल्या-प्रमाणे. मागे राहून प्रवास करावा तर आणखी किती महिने रहावे लागेल व किती खर्च करावा लागेल याचा नेम सांगवेना. शिवाय एक महिन्याने डिसेबरांत अमृतसर येथील राष्ट्रीयसभेचे अधिवेशन व्हावयाचे असून, ते बरेच वादग्रस्त होण्याचा सभव दिसूं लागला होता. या सर्व कारणांमुळे मी देखील टिळकांच्या बरोबरच परत जावे असे ठरले. आम्ही त्याप्रमाणे नोव्हेबरच्या शेवटच्या आठव-ड्यांत मुंबईस येऊन दाखल झालो.

अमृतसर येथील राष्ट्रीयसभा अदमासाप्रमाणे वादग्रस्त झाली. पार्लमेंटने केलेल्या कायद्याने नेमस्त पक्षाचे सर्वस्वी समाधान झाले, व या कायद्याला राष्ट्रीय सभा नांवे ठेवणार असे भाकीत कळल्यावरून नेमस्तपक्षाचे लोक या सभेला कोणीहि आले नाहीत. गांधी याचे मत नेमस्तपक्षाप्रमाणेच होते तरी ते सभेला आले होते. कारण पंजाबांतील अत्याचार, मार्शल लॉ, वगैरें प्रकरणे कॉंग्रेसमध्ये निघावयाचीं होती. "या प्रकरणापुरतेच मी यंदाच्या सभेत लक्ष घालूं इच्छितों,

इतर बाबतीत मी तटस्थ राहीन " असे गांधीचे म्हणणे होते. पण त्यांना कोणी तसे बसूं देईना. टिळक, दास वगैरे लोकांशी गांधीचे विशेष सख्य नव्हते; होते ते मोतीलाल नेहरू, मदन मोहन मालवीय यांच्याशीच होते. अर्थात् या दोघांनी टिळक व दास यांच्याबरोबर झगडण्याला गांधीनाच तोंडाशी दिले. वाद म्हणण्यासारखा कांहीच नव्हता. अगदीच शुष्क, म्हणजे एक दोन विशेषणें घालावी की न घालावी यापुरताच होता. तरी देखील वादाला बराच रंग चढला. टिळकांचे निरोप घेऊन गांधी व नेहरू यांच्या छावणींत मी जाई, तेव्हां नेहरू गांधी वगैरेंचे सख्य कांही एका विशेष कारणाने त्यावेळी कसे जडले होतें हे मला तेव्हां प्रथम पहावयास सांपडले. नेहरू मंडळी व गांधी यांचें बंधुप्रेम नातलगाहून अधिक असे जे आज सतरा अठरा वर्षे लोकांना पहावयास सांपडलें त्याचा उगम प्रथम अमृतसर येथे झाला.

राष्ट्रीय सभेहून परत आल्यावर पुढे कायदे कौन्सिलच्या निवडणुकी उभ्या राहिल्या. त्यांत आपल्या पक्षाचे उमेदवार उभे करणे व आपल्या पक्षाचा म्हणून एखादा जाहीरनामा काढणे या गोष्टी ओघाने प्राप्त झाल्या. मग त्याच गडबडीत माझे काही दिवस गेले. स्वतः मी पुणे शहरच्या मतदारसघातर्फे निवडणुकीला उमेदवार म्हणून उभा राहिलो. ब्राह्मणेतर पक्षाने विठ्ठल रामजी शिंदे याना उभे केले होते. कारण ब्राह्मण-ब्राह्मणेतराच्या वादाला पूर्वी दोन तीन वर्षापासून प्रारभ झाला होता व तो यावेळी चांगलाच रंगाला आला होता. भावी युद्धांत ब्राह्मणेतराच्या छावणीत शिरून त्यांच्या सहकारितेने राष्ट्रीयपक्षाशी लढावे असे धोरण महाराष्ट्रातील नेमस्तपक्षाने योजिले होते. त्याचा प्रत्यय आम्ही मंडळी विलायतेहून परत आल्यावर टिळकांना व मला पुण्याच्या नागरिकांनी व पुणे म्युनिसिपालिटीने मानपत्रे दिली त्यांच्या जाहीर समारंभाच्या वेळीच आला होता. पण टिळकांची लोकप्रियता यावेळी इतकी होती की, नेमस्त व ब्राह्मणेतर यांनी सगनमत केले त याचा परिणाम राष्ट्रीयपक्षावर काहीच होण्याचा संभव नव्हता याच सुमारास बझटबाईनीहि टिळकांशी राजकीय दावा मांडला होता. या दाव्यांतील आपल्या कैफियती लिहिणे, प्रसिद्ध करणे, या शिवाय नवीन दौऱ्यांचें कामहि टिळकांना करावे लागले. जुन्नर येथील जिल्हासभेच्या प्रसंगी नेमस्तांनीं आपली शर्थ करून पाहिली. उन्हाळ्यांत सोलापूर येथे प्रांतिक परिषदेचें अधिवेशन व्हावयाचे ठरले होते. तेथेहि नेमस्तपक्ष व बेझंटबाईचे होमरूलर जमून

फिरून एक युद्ध होणार अशी चिन्हे दिसत होती. या परिषदेचे अध्यक्षस्थान मला देण्याचे स्वागतमंडळाने ठरविले ते टिळकाना आधीं विचारूनच ठरविले होते.

या परिषदेची हकीकत मी टिळक चरित्रांत सविस्तर दिलेलीच आहे. म्हणून त्याविषयी येथे अधिक तपशील लिहीत नाही. परंतु इतकेच सांगतो की, या परिषदेचे अध्यक्षपद ही एक माझी कसोटी ठरण्याचाच प्रसंग होता. पण त्या कसोटीला मी सर्व बाजूनी उतरलो असे लोकमत शेवटी मला ऐकावयास सापडले. कसोटी लागण्याचे कारण असे की, " या प्रांतिक परिषदेत हटकून बखेडा करावयाचा. टिळक म्हणतात इतके बहुमत त्यांच्या बाजूला नाही. ते स्वतःला लोकप्रिय मानीत असले तरी त्यानाहि गदगदा हलवून सोडण्याइतके बळ आम्ही तिघे—म्हणजे नेमस्तपक्ष, बेझंटपक्ष, व ब्राह्मणेतरपक्ष—इतके एकजुटीने वागलो असतां आम्हाला खचित निर्माण करता येईल " अशा आत्मविश्वासाने हे तीन्ही पक्ष सोलापुरास आले होते; आणि हजारो रुपये खर्च करून प्रतिनिधींची भरती त्यानी केली होती. स्वतः टिळक जरी खबीर व कार्यकुशल असले तरी अध्यक्षस्थानीं ते बसावयाचे नव्हते, मी बसावयाचा होतो. आणि सर्व तट्या-बखेड्यांतून व मारामाऱ्यांतून परिषद तडीला नेण्याची जबाबदारी मुख्यतः मजवर होती. ही माझी जबाबदारी पार पडली तर लोक मला बरे म्हणणार; व कोणत्याहि कारणाने परिषद उधळली गेली किंवा तीत बखेडा होऊन तिचे काम वेडेवाकडे विपरीत कांहीं तरी झाले, तर त्या दोषाला दुसरे लोक कारण असले तरी अखेर अपयशाचा धनि मीच होणार; असा तो बिनतोड प्रसंग होता. स्वतः टिळक परिषदेला हजर रहाणार यामुळे मला पाठबळ फार मोठे होते. परंतु अध्यक्ष या नात्याने वादामध्ये निःपक्षपातीपणा ठेवूनच मला काम केले पाहिजे होते. ती जबाबदारी टिळकावर नव्हती. यामुळे प्रसंगविशेषी टिळकांना व आमच्या पक्षांतील इतर लोकाना अप्रिय होण्यासारख्या कांही गोष्टी कदाचित् मला कराव्या लागतील असाहि संभव उघड दिसत होता. त्याप्रमाणे भर परिषदेत व विषयनियामक कमिटींत मला अध्यक्ष या नात्याने अप्रिय असे काम दोन तीन प्रसंगीं करावेंहि लागले. तथापि एकंदरीने आमच्याच पक्षाची छाप परिषदेवर सर्वस्वी पडली आणि असे होऊनहि मी निःपक्षपातीपणा अध्यक्षपदाला शोभेल असाच राखला, असे सर्टिफिकीट मला प्रतिपक्षाकडूनहि मिळालें.

परिषदेच्या प्रारंभी ब्राह्मणेतरांनी मंडपांत घुसण्याचा पुंडावा केला; दगड-फेक होऊन कांही लोकांच्या डोक्याला जखमा झाल्या. या सर्व दंगेखोरीला रँग्लर परांजपे व ब्राह्मणेतर पक्षाचे त्यावेळचे पुढारी रा. वालचंद कोठारी यांची फूस होती. परतु अध्यक्ष या नात्याने सोलापूरच्या कलेक्टराशी बोलणे चालणे करून मी प्रतिपक्षाचे कारस्थान उघडकीस आणू शकल. परिषदेच्या मंडपांत जरी प्रत्यक्ष पोलिसांची मदत घेण्याचे मी नाकारले तरी कलेक्टर यानी खरा प्रकार ओळखून बाहेर योग्य तो बंदोबस्त ठेवला. यामुळे पुढे गडबड कांही झाली नाही; व परिषद उधळण्याचा डाव फुकट गेला. विषयनियामक कमिटीतील काम मी झटपट व तातडीने सर्व संपवून तडीला नेले. हे पाहून, बेझंटबाईच्या विरुद्ध मी अध्यक्ष म्हणून एक-दोन निकाल दिले असतांहि, शेवटी मजजवळ येऊन "तुम्ही आपले काम फार चांगले केले;, व कामाचा उरक फार चागला दाखविला" असे गौरवपर शब्द त्या मला मुद्दाम बोलल्या.

मुख्य परिषदेतहि कांहीसा असाच प्रकार झाला. नवीन सुधारणांच्या कायद्याला नांवे ठेवण्यासारखा ठराव टिळक आपल्या अनुयायाच्या बळावर परि-षदेंत करणार. तरी तो पास होऊ देऊ नये अशा ईर्षेने रँग्लर परांजपेप्रभृति नेमस्त व बेझंटबाईसह त्याचे अनुयायी आले होते व त्यानी या कामी ब्राह्मणेतर पक्षाची मदत घेतली होती. अर्थात् हाच ठराव महत्त्वाचा व वादग्रस्त, म्हणून परिषदेच्या कार्यक्रमांतील एका सकाळची सर्व बैठक त्याकडेच देण्यांत आली होती. ठरावावर उपसूचना आल्या होत्या व उलट सुलट बोलणाऱ्या वक्त्यांचीहि मोठी यादी मज-कडे आली होती. अशा रीतीने वादविवादाचे रण तुंबळ माजणार होते. यामुळे कोणाहि अध्यक्षाचा स्वभाव व सभा चालविण्याचे कौशल्य याची परिक्षा होण्या-सारखाच एक प्रकारचा तो प्रसग होता. तो लक्षांत घेऊन, मी वक्त्यांची नांवे अशा रीतीने आपल्या अधिकारांत एका पुढे एक ठेऊन दिली होती की, त्यांच्या भाषणांत सहजपणे उत्तर प्रत्युत्तर असा प्रकार घडून वादाला रग चढावा; आणि अखेर निकाल कसाहि झाला तरी कोणालाहि अन्याय झाला नाही इतके तरी समाधान सर्वांना वाटावे. घंटा व घड्याळ यांच्या सहाय्यानें मी ठरीव मुदती-पलीकडे कोणालाहि, प्रत्यक्ष टिळकांनाहि, बोलूं दिलें नाही.

शेवटी उपसूचना मांडावयाच्या तशा क्रमाने मताला घातल्या; व मुख्य ठरावावर मते घेऊन राष्ट्रीय पक्षाचा ठराव मंजूर झाला असे मी मोघम रीतीनें

जाहीर केले. परंतु प्रत्यक्ष हात मोजले असतां आपल्या बाजूचीं मतें अगदीच थोडी दिसणार नाहीत, टिळकांचा प्रत्यक्ष पराभव न केला तरी त्यांना आपले बळ तरी जाणवले असे म्हणतां यावे, म्हणून रॅंग्लर परांजपे व बेझंटबाई यांनीं मला अशी विनंति केली की "दोन्ही बाजूचे नक्की आंकडेच न सांगितले तरी साधारणपणे त्याचे प्रमाण तरी जाहीर करा;" व तसे करणे योग्य असे वाटून मी ते जाहीर केले. त्याने त्यांचें समाधान झाले. आमच्या पक्षालाहि कमीपणा येण्यासारखे या निकालांत कांही नव्हते. तथापि माझ्या या करण्यानें टिळक थोडेसे मनांतून नाखूष झाले. "उलट सुलट मतांचे प्रमाण सांगा ही विनतिच मी अमान्य करावी, पण बेझंटबाईची भीड मला आवरली नाही, मी त्यांच्या आहारी गेलो," असे टिळकाना वाटले. आणि त्याप्रमाणे त्यांनी स्वतः या परिषदेवर त्याच दिवशी दोन प्रहरीं खाडिलकरांना तोंडी मजकूर सांगून केसरीकरितां अग्रलेख लिहून पाठविला त्यांत या मताचा उद्गार काढला. कदाचित् इतरांना तो उमगला नसेल, पण मला तो जाणवला. तथापि त्याच अग्रलेखांत त्यांनीं इतर रीतीने माझ्या कामाची प्रशंसा करून, अध्यक्ष या नात्यानें माझे भाषण खुद्द राष्ट्रीय सभेच्या एखाद्या अध्यक्षाला शोभेसें झाले असे म्हटले होते.

हा रागलोभ अर्थात् आमच्या आमच्यांतला होता. पण अकल्पित-रीतीने एका भलत्या गृहस्थाकडून माझ्या कामाबद्दलची शाबासकी या प्रसंगी मला मिळाली. सकाळच्या बैठकीतील ठराव निकालांत निघून परिषद खलास झाल्याचें मी सांगितल्यावर, मी खुर्चीवर बसलों असतांच, सर नारायण-राव चंदावरकर हे आले व माझ्या पाठीशी खुर्चीवर हात ठेवून ते मला म्हणाले, "मि. केळकर, तुम्ही आज अध्यक्षाचे काम व एकंदर परिषदेचे काम इतकें चांगले केलें की त्यावरून, उद्यां आम्ही लोक स्वराज्य चालविण्याला पात्र आहों कीं नाही असें कोणी मला विचारल्यास मी या परिषदेचेच उदाहरण देऊन म्हणेन कीं, होय, आम्ही स्वराज्याला पात्र आहो." सर नारायणराव चंदावरकर हे भावनेच्या भरांत बिनहिशेबी शब्द बोलूं शकतात हें मला माहीत असल्यामुळें, त्यांनीं केलेली ही स्तुति त्यांत घालावयाचा तो बट्टा घालूनच मी स्वीकारली. कदाचित् टिळकांसारख्यांनाहि थोडेसें नाखुष करण्याचें धैर्य मी दाखविले या गोष्टीचाहि परिणाम त्यांच्या मनावर झालेला असेल. तथापि उलटसुलट सर्व पुरावे लक्षांत घेतां माझ्या हातून सोलापूर परिषदेचें काम चांगलें पार पडलें असें मलाहि

म्हणण्यास हरकत वाटत नाही. या परिषदेने टिळकांच्या हाताखालचा मुख्य प्रांतिक पुढारी या नात्याने लोकमतांत माझी प्रस्थापना झाली, हे उघड दिसून येण्यासार होते.

आदल्या वर्षीहि विजापूर येथे प्रांतिक परिषद भरली तिचे अध्यक्ष विठ्ठलभाई टल हे होते तरी त्यांना मराठी चांगलें येत नसल्यामुळे, पूर्वीच्या नाशिकच्या प्रांतिक परिषदेप्रमाणे, येथेहि परिषदेचे चालकत्व मजकडेच येऊन राहिलें होतें. अशा रीतीनें या दोन्ही तिन्ही प्रसंगावरून अशा सभांचे प्रसंग पार पाडण्यास मी लायक आहे असे लोकमत सहजच बनले, व माझ्या समजुतीने या बाबतीपुरते तरी लोकमत मजसंबंधाने अखेरपर्यंत कायम टिकलें. विषयनियामक कमिटी म्हणजे तो जवळ जवळ गोंधळाचा व बखेड्याचा मोठाच प्रसंग असतो. पण अशा सभांना अध्यक्ष होण्याचा, किंवा सेक्रेटरी म्हणून काम चालविण्याचा, जेथे जेथे म्हणून प्रसंग आला, तेथे तेथे मी इतका उरक दाखविलेला लोकांना दिसला की, या कामांतला एक पंडित असे अशा कामांतले जाणते लोक थट्टेने मला म्हणत. वास्तविक या गोष्टीला फारसे चातुर्य लागत नाही. जो खरा गुण लागतो तो इतकाच कीं, स्वतः दीर्घसूत्रीपणा करावयाचा नाही, डोक्यांत किडे पाडून घ्यावयाचे नाहीत. इतर पुष्कळांच्या अंगी केवळ हा गुण नसल्यामुळेंच गोंधळ माजून सभांचे काम डोईजड होते.

असो. यानंतर सांगण्यासारखा प्रसंग म्हटला म्हणजे १९२० मेअखेर पुण्यास टिळकांच्या वाड्यांत झालेला पर्सफंड समर्पण करण्याचा समारंभ. या समारंभाची सविस्तर हकीकत मी टिळक चरित्रांत दिलीच आहे. माझ्या संबंधाची या समारंभांतील गोष्ट म्हटली म्हणजे, टिळकांनी आपल्या आभार प्रदर्शनाच्या भाषणांत अच्युतराव कोल्हटकर यांच्या विषारी टीकेला खूप खरपूस उत्तर देऊन, रा. अण्णासाहेब नेने व मी यांच्या सबधाने प्रशंसापर व विश्वासाचे काढलेले उद्गार ही होय. समारंभाला बाहेरगांवचे पुष्कळच प्रतिनिधि आले होते. गायकवाड्याचें सर्व विस्तृत अंगण प्रेक्षकांनी फुलून गेले होते. त्याप्रसंगी प्रास्ताविक भाषण करण्याचे काम मजकडे आल्यामुळे, आम्ही पर्सफंडाची योजना कशी केली, वर्गणी कशी जमली, वगैरे गोष्टी मी सविस्तरपणे सांगितल्या. फंडाच्या कल्पनेवर आक्षेप घेणाऱ्या माधवराव बोडसादिकांवर, पण कोणाचीहि नांवे न घेतां मी सौम्य टीका केली. व

समर्पक उत्तर दिले. ज्युबिली फंड हा उत्साहाचा होता. पण पर्सफंड हा खेदाचा व ईर्षेचा होता. म्हणून आम्ही योजली ती पद्धति, म्हणजे तिकिटे काढून जबाबदारीने वर्गणी गोळा करण्याची पद्धति, हीच योग्य होती असे मी सांगितले. याहि गोष्टीचा कांहींनी विपर्यास केला. पण एकदरीने माझे भाषण कोणालाहि आवडले नाही असे झाले नाही. मात्र योग असा आला की पर्सफंडाच्या आक्षेपकांस उत्तर हाच या सभेतील मुख्य विषय होऊन बसल्यामुळे, अच्युतराव कोल्हटकर यांचे कपट नाटक उघडकीस आलेले पाहून व त्याची खती वाटून, बाबासाहेब खापर्डे, वामनराव जोशी, नारायणराव वैद्य वगैरे वऱ्हाड–नागपूर-कडल्या अच्युतरावांच्या स्नेह्यांनीच अच्युतरावांवर सडकून टीका केली.

शेवटी टिळकांनी तर अच्युतरावावर फारच जोराचा हल्ला केला. प्रथम चिरोलकेसला उद्देशून ते थोडे बोलले, व शेवटी तीन लक्ष रुपये देऊन देशाने मला विकत घेतले असे सद्गदितपणे बोलून त्यानी आभार मानले. पण मधला सर्व भाग बोलत असतां मात्र ते अतिशय रागाने व आवेशाने बोलत होते. ते भाषण पुष्कळच लांब आहे म्हणून मी अधिक न लिहिता, माझ्यासंबंधाने टिळ-कांनी जे उद्गार काढले तितकेच येथे उद्धृत करतो. ते म्हणाले, "आपला गुन्हा छपविण्याकरितां अच्युतराव यानी अशी युक्ति केली की तात्यासाहेब केळकर यांना आपण वादांतील सर्व रक्कम रोख दिली आहे असे म्हणावे, व एका स्नेही वकिलाकडून केळकरांना अभावितपणे मोघम कांही तर लिहून त्यांजकडून एखादे उत्तर बेसावधपणे भलतेच कांही तरी आले तरी त्याशी याचा संबंध कसा तरी जोडून तो पुरावा म्हणून पुढे करावा मी आधीच सामान्यतः रागीट माणूस. त्यांत हे पत्र पाहून मला अधिकच राग आला. आणि अच्युत-रावांना बोलावून घेऊन मी त्यांना असे सांगितले की 'या पत्रावरून एक केळकर तरी लबाड असले पाहिजेत किंवा तुम्ही तरी लबाड आहात. मग यापैकीं खरा लबाड कोण हे मला सांगा.' या निग्रहाच्या प्रश्नाला 'तुम्ही आतां रागांत आहा सध्या जबाब देत नाहीं.' असे सांगून अच्युतराव निघून गेले. खोटे चेक देणे, आणि अमुक एक रक्कम रोख एखाद्यास दिलीच आहे असा त्यावर खोटाच आरोप करणें, या काय प्रामाणिकपणाच्या गोष्टी आहेत! माझा आणि केळकरांचा आज वीस वर्षांचा संबंध आहे व त्यांच्याविषयीं मला पूर्ण भरंवसा आहे. माझे मित्र तात्या-साहेब केळकर, अण्णासाहेब नेने, आणि नानासाहेब देशमुख यांच्यासारख्यावर आक्षेप

घेणे हे उलट्या काळजाचे लक्षण होय. तात्यासाहेब केळकरांवर अच्युतरावांचा आक्षेप असा की ते फंडावर पोट भरतात. ( 'फड-गुंड' हा शब्द असल्या प्रकारच्या आक्षेपांतूनच निघाला आहे. ) पण हे जर खरे असते तर मीं या फंडांतून एक पैहि घेतली नसती ! " असो. या समारंभाच्या प्रसंगीं कसलाहि वाद निघू नये असे अणेप्रभृति काही लोकाना वाटत होते हे खरे. आणि समारंभाच्या आधी खाजगी रीतीने हा प्रश्न निघाला तेव्हां हा वाद यावेळी काढू नये, त्याने विषाद उत्पन्न होऊन समारभाचे स्वारस्य थोडे कमी होईल, असे मीहि आपले मत दिले होते. परंतु अण्णासाहेब नेने यांची कामगिरी या कामीं फार मोठी झाली असे टिळकाना वाटत होते; अच्युतरावाना याच समारभांत तुम्ही उत्तर दिले पाहिजे असा वैतागल्याप्रमाणे, अण्णासाहेबानी आग्रह धरला होता; आणि खुद्द टिळकहि अखेरच्या दिवसापर्यंत अच्युतरावांचे कुत्सित लिहिणे पाहून बेसुमार रागावले होते, यामुळे त्यांनी अखेर त्यांना उत्तर देण्याचे निश्चित केले

वऱ्हाड-नागपुराकडे काही दुटप्पी वागणारे लोक अच्युतरावांचे स्नेही होते. त्यांनी याविषयी बराच कागावा केला. परंतु टिळकांच्या परिवारांतील बाहेरगावच्या अनेक प्रमुख लोकांनी खऱ्या प्रकाराबद्दल केसरीकडे अनेक पत्रे पाठविली व ती सर्व समग्र छापली गेली. यामुळे या कांगावखोरांचे तोंड बद झाले. या प्रकारानंतर अच्युतराव कोल्हटकर यानी टिळकांवर अपशब्दाचा भडिमार सुरू केला व आपलें ग्राम्य स्वरूप व मनाचा अधमपणा खरा प्रगट केला. परंतु टिळकांनी आधीच इतके समर्पक व साधार असे या प्रश्नाचे विवेचन करून ठेवले होते की, तोंड आहे म्हणून बोलावे व लेखणी आहे म्हणून लिहावे या पलीकडे अच्युतरावांना कांही आधार उरला नाही. त्यांच्या गुन्ह्याचे समर्थन तर कोणीच केले नाही. पण उलट त्यांनी पूर्वी राष्ट्रीय पक्षाची सेवा केली व तुरुगवास सोसला त्या सर्वांचे पुण्य या एका अपकृत्याने नाहीसे होऊन त्यांचा अधःपात झाला ! टिळकांचे मात्र काहीएक नुकसान त्याच्याने करवले नाही.

यानंतर लवकरच टिळक जगन्नाथमहाराज यांच्या मुबई हायकोर्टातील अखेरच्या दाव्याच्या कामी गुतून व गढून गेले. त्यांनी पांच पन्नास छापिल पानांचे एक पुस्तक लिहून जगन्नाथमहाराजांची कैफियत तयार केली, व ती बॅरिस्टरला समजावून देण्याकारितां स्वतः मुंबईस जाऊन राहिले. तेथेंच त्यांना

अखेरचा ज्वर आला तो कांही केल्या निघाला नाही, व ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं त्यांतच त्याचा अंत झाला. याच्या आधी पांच सहा दिवस धोंडोपंत विद्वांस यांनी मला तार करून मुंबईस बोलावले. कारण त्यांना स्वतःला हे चिन्ह कांही ठीक नाही असे वाटूं लागले होते. त्याप्रमाणे मी व इतर कांही मंडळी पुण्याहून मुंबईस गेलो. तेथे औषधोपचाराला डॉक्टर मित्रांनी कांही एक कमी पडूं दिले नाही. परतु आयुष्यच भरले तेथे कोणाचा इलाज चालेना. सुमारे दोन-तीन वर्षांपासूनच टिळकांची प्रकृति खालावत चालली होती. ते विलायतेस गेले ते केवळ मानसिक उत्साहाच्या जोरावर. शरीरात जोर असा कांहीच राहिला नव्हता. शिवाय परत आल्यावर त्यांनी फिरून दौरे आरभिले; व इतर रीतीने श्रमाचीं अशी अनेक कामे अंगावर घेतली. सोलापूर परिषदेच्या आदल्या आठवड्यांत सिंधमधील त्यांच्या भक्तांनीं त्याना दौऱ्यावर ओढून नेले तो केवळ अविचारच झाला. कारण टिळकाच्या प्रकृतीला उन्हाळा सोसत नसे, व दौऱ्यांत तर त्यांना सिंधमधील प्रखर उन्हाळा रात्रदिवस भोगावा लागला. सोलापुराकडे येण्याला निघाले तेव्हां वाटेत दोन दिवस त्यांनी कांही खाल्ले नाही, तर नुसतें बर्फ व सोडावॉटर पीत पीत आले असे सांगतात! प्रकृतीला न संभाळतां काम करण्याचा टिळकांचा परिपाठ असल्यामुळे त्यांना आला हा खरोखर अपमृत्यूच होता यांत शंका नाही. आणि मला तर असे वाटते की, सहा वर्षे त्यांना ब्रह्मदेशांत एकांतवास घडला यामुळे चौसष्ट वर्षांपर्यंत तरी ते वाचले. नाही तर चार पाच वर्षे आधीच जावयाचे. त्यांना अखेरीला ताप आला तेव्हां शरीर आंतून अगदीं पोखरल्यासारखे झाले होते. यामुळे डॉक्टर लोकाचा प्रथमपासूनच धीर सुटला होता. तीन दिवस आधीपासून अशी स्थिति झाली होती की, त्यांच्या खोलीपासून कोणी बाहेर पडावे तेच कदाचित् टिळकांच्या जिवतपणचे त्याचे अखेरचे दर्शन त्याला घडते की काय अशी भीति वाटे.

मृत्युपूर्वी एक दिवस डॉ. नानासाहेब देशमूख, अण्णासाहेब नेने, व दादासाहेब करदीकर यानी असा विचार केला की, टिळकांनी पूर्वी कोलंबो येथे केलेलें मृत्युपत्र शिल्लक होते तरी, त्यानतर घडलेल्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन, आणि टिळकांच्या सांपत्तिक स्थितीत पडलेल्या फरकाला अनुसरून, एखादा मृत्युपत्राचा मसुदा करावा. मुंबईस त्या वेळी टिळकांसंबधांची सर्व माणसे म्हणजे मुलगे मुली जावई वगैरे हजर असल्यामुळें, त्यांपैकीं प्रत्येकाला विचारून मिळेल ती माहिती घ्यावी;

ती सर्व सुसंगत रीतीने कायदेशीर लिहावी, अशा सर्वसंमत रीतीनें तयार झालेला मसुदा टिळकांना वाचून दाखववावा; व त्यांना तेवढी शक्ति असेल तर त्यांची सही घेऊन साक्षी घालून डॉक्टर मडळीसमक्ष मृत्युपत्र पुरे करून घ्यावे. त्याप्रमाणे वडील जावई रा. केतकर वकील यांनी टिपणे केली, व दादासाहेब करदीकर यांनी ती सर्वांना वाचून दाखवून सर्वसम्मत म्हणून त्यावर आपली सहीहि करून ठेवली. परंतु ती टिळकाना वाचून दाखवून सही घेण्याच्या स्थितीत पुनः केव्हांहि टिळक आले नाहीत; व क्षणोक्षणी आम्हा सर्व मडळींचे लक्ष इतर व्यवहारातून निघून आसन्नमरण झालेल्या टिळकांच्याकडे लागून राहिले.

मरणाच्या रात्री आवशी महात्मा गाधी हे एकदा येऊन टिळकाचा समाचार घेऊन गेले; व मरणानतरहि पुन्हा येऊन कांही वेळ बसले होते. आदले दिवशीं मुंबईच्या पोलीस कमिशनरने, सभ्यपणाच्या रीतीने, समोरच्या इमारतीतून म्हणजे सरदारगृहातून आपल्या कचेरीत मला बोलावून नेले, व मोठ्या सहानुभूतीने टिळकांच्या प्रकृतीविषयी विचारपूस केली. तेव्हांच, टिळकांचे दहन सोनापुरांत होऊ शकेल की काय, किवा समुद्रकाठी मोकळ्या जागेवर करावे लागेल की काय, व त्याकरिता अगाऊ कांही तजवीज परवानगी वगैरेची व्यवस्था केली पाहिजे की काय, असा दूरदर्शी विचारहि त्यांच्या मनांत आला असावा, असे त्यांच्या एक-दोन ओझरत्या वाक्यांवरून मला दिसले. कारण टिळक जगण्याची आशा नाही हे यावेळीं जवळ जवळ सर्वतोमुखी झाले होते. पण 'मरणा आधी सरणांत घालणे' ही म्हण निषेधार्थी सर्वांनाच पटणारी असल्यामुळे, पोलिस कमिशनरला याहून अधिक काही बोलतां आले नाही. टिळकांचे देहावसान झाल्यावर सुमारे पांच तास रात्र शिल्लक होती तरी दुसरे दिवशी प्रहर दिवसपर्यंत त्यांची स्मशानयात्रा निघू शकत नाही हे निश्चित होते. यामुळे सरदारगृहांत जमलेली सर्व मडळी निरनिराळे गट करून ठिकठिकाणी हलक्या आवाजाने व व उदास मनाने बोलत बसली व ती रात्र त्यांनी तशीच काढली. याच अव-धीत टिळकांच्या अगदी विश्वासांतल्या दहा-पांच लोकाची वेगळी सभा भरून, पुढे टिळकाचे धोरण चालवून त्याचे कार्य चालू ठेवण्यासाठी पचमंडळहि सभेत नेमण्यांत आले असे मला समजले.

'असे मला समजले' हे शब्द मी घातले ते अशा करितां कीं त्यापूर्वी मी उठून माझ्या कामाला लागलो होतो; व ते काम म्हटले म्हणजे दोनच दिवसांनंतर

निघणाऱ्या केसरींत टिळकांसंबंधाचा मृत्युलेख लिहिण्याचे. सोलापूर परिषद संपल्या-नंतर लवकरच मी केसरीचे डिक्लेरेशन करून तो फिरून हाती घेतला होता. अर्थात् टिळकांच्या मृत्युसबंधी अग्रलेख लिहिण्याचें दुर्घट काम मजवरच पडणार होते. आणि टिळकाच्या मृत्युमुळे इतर सर्व गोष्टी विसरून जाण्याइतके दुःख इतरांप्रमाणे मलाहि झाले होतें तरी, केसरीचा संपादक होण्याची खरी जबाबदारी काय हे साऱ्या जन्मात त्यावेळी मला जितके जाणवले तितके एरवी केव्हाहि जाणवले नव्हते. आणि म्हणून या जबाबदारीच्या जाणीवेने त्या दुःखाचाहि मला विसर पाडून कार्यप्रवृत्त केले. टिळक वारले तो उजाडता रविवार होता. अर्थात् पुढचा केसरी काढण्याला फक्त तो रविवारचा व सोमवारचा दोनच दिवस उरले होते. अशा वेळी केसरीत टिळकाविषयी अग्रलेख सामान्य प्रतीचा किंवा अपुरा आला तर माझ्या संपादकत्वाची सगळी अब्रू जाणार, व खरी अडचण लक्षांत न येता केसरीतील टिळकावरचा अग्रलेख वाच-णारे लोक केसरी प्रसंगाला जागला नाही अशी नांवे ठेवणार. अर्थात् नुसता हा आक्षेप टळावा इतकेच नव्हे, तर टिळकाचा मृत्युलेख मनासारखा वाचण्यास मिळावा अशी जी वाचकाची स्वाभाविक इच्छा ती सफळ व्हावी हे माझे कर्तव्य जाणून, मी आमच्या मंडळीतून उठलो व त्यांना ही माझी अडचण सांगितली. अर्थात् ती तेव्हांच त्यांच्या लक्षांत आली व त्यानी मला सांगितले की, यापुढे तुम्ही आपल्या कामाला लागा, इकडे कांही एक पाहूं नका. इतकेच नव्हे, तर तुम्ही सकाळच्या एक्स्प्रेस गाडीने पुण्यास निघून जा. स्मशानयात्रेकरितां रहाल तर सोमवार सकाळपर्यंत तुम्हाला पुण्यास पोचता येणार नाही, व एथल्या गडब-डीत तुमचे कांहीहि लिहून होणार नाही असेहि त्यांनी सांगितले.

माझा विचारहि तोच होता, व त्याला इतरांकडून ही पुष्टि मिळालेली पाहून मला बरे वाटले. लगेच डॉ. विष्णुपंत भट, माझे आसिस्टंट, जवळच होते त्यांना मी चला म्हटले, व अगदी लांबच्या अशा खोलीत जाऊन बसून केसरीत उद्या काय लिहावयाचे याचे टिपण करून अग्रलेखाची चार-दोन पहिली पानेहि भटांना तोंडाने मजकूर सांगून लिहविली. आणि सकाळी गाडीची वेळ होताच ते कागद घेऊन स्टेशनावर गेलो. परंतु पुण्यास पोचल्यावर कांही वेगळाच प्रकार तेथे होऊन राहिला होता; त्यामुळे ताबडतोब घरी जाऊन पुढील उद्योगास लागण्याचा माझा विचार फुकट गेला. मी मुंबईहून पुण्यास निघालो अशी बातमी पुण्याच्या मित्रमंडळीला

तारेने कळली होती. त्यामुळे बराच मोठा घोळका जमून त्यांनी मला पुण स्टेशनावर उतरतांच जवळ रानडे कॉन्ट्रॅक्टर याच्या काम्पाउंडांत नेले. तेथे आणखीहि शेदोनशे मंडळी जमली होती. ते मला म्हणूं लागले कीं, आम्ही पुण्याचे लोक टिळकांची प्रेतयात्रा मुंबईस होऊ देणार नाही. त्याचे शव पुण्यास घरी आणून तेथून ते समारंभाने ओंकारेश्वरावर नेऊ. याकरिता आमचे कांही लोक सकाळच्या गाडीने मुंबईस रवाना झाले आहेत. पण आमचा हक्क सागून भांडण्यास तुमच्यासारखा वजनदार माणूस पुणेकरांना कोण लाभणार ? तेव्हां आतां येथून मुंबईस तार करा, प्रेतयात्रा थांबवा, व पुढच्याच गाडीने परत मुंबईस चला. आम्ही तुम्हाला पुण्यास जाऊं देणार नाही. मी परोपरीने त्याना सागून पाहिले व म्हणालो की, "या कामी मुंबईच्या लाखो लोकांपुढे तुमचे काय व माझे काय—कांहीच चालणार नाही. एव्हाना प्रेतयात्रा सरदारगृहातून बाहेर पडून बऱ्याच अंतरावर गेली सुद्धां असेल. म्हणून मी किंवा तुम्ही यानंतर मुंबईला जाण्यांत कांहीच अर्थ नाही. आणि पुण्याहून गेलेल्या लोकांना आपला हक्क चालविता आला असता तर अशी तार तुम्हाला यापूर्वीच आली असती." पण माझे बोलणे कोणीच ऐकून घेईना. रात्रीचे अलोचन जागरण व कष्ट, बारावर दोन वाजून गेले तरी माझे शौचमुखमार्जनहि झालेले नाही, अशा स्थितीत मी या मंडळीशी बोलतांना अगदी जेरीस आलो. शेवटी ज्या विशेष कामाकरितां प्रेतयात्रा टाकून पुण्यास निघून आलो त्याचे महत्त्वहि त्याना समजावून सांगितले. परंतु सर्व व्यर्थ ! शेवटी बेळगांवचे बेळवी वकील मला भेटण्याकरिता स्टेशनावर आले होते, त्यांनी लोकांची कशी तरी समजूत घातली. पण ती देखील झाली ती त्यांनी स्वतः मुंबईस जाण्याचे कबूल केल्यावर ! ते व डॉक्टर लोहोकरे यांना जेव्हां मोटारीत बसवून लोकांनी मुंबईस रवाना केले तेव्हां मी टांग्यांत बसून घरी निघालो.

घरी गेल्यावर आंघोळ करून दोन घास खातो न खातो तोंच श्रमानें मला इतकी झोप आली की, केसरीतील मजकूर लिहिण्याचे विचार तसेच राहून, रात्री सातआठ वाजतां झोप होऊन थोडी विश्रांति मिळल्यावर मी लेख लिहिण्याला सुरुवात केली; व दुसरे दिवशी सबंध दिवस मजकूर लिहिणे व प्रुफे तपासणें हे काम बैठक न सोडतां रात्री दहापर्यंत मी करीत होतो. यामुळे केसरींत दहा कॉलमचा अग्रलेख व दहा कॉलम इतर माहिती वगैरे घालून मंगळवारी सकाळी वेळ न चुकता केसरी वाचकांच्या हातांत मला टाकतां आला. तो वाचल्यावर

जाणते होते त्यांनी अर्थातच या कामगिरीचे कौतुक केले. पण " केळकर प्रेत-यात्रा टाकून मुबईहून पुण्यास गेले " या अर्धवट सत्याचा पुकारा व गवगवा अच्युत-राव कोल्हटकर यांनी सदेश पत्रात करून माझी नालस्ती चालविली. मंगळ-वारचा केसरी वाचून त्यांना या टीकेबद्दल मूर्खात काढणे ही कोणासहि अगदी साध्या समंजसपणाची गोष्ट होती. पण असमंजस लोक हेच संदेशपत्राचे भांडवल होऊन बसल्यामुळे मजवरचा हा वृथा अपवाद नाहीसा होण्याला कांही काळ लागला. या पहिल्या हल्ल्याच्या वेळी माझ्यावर कोणत्याहि स्वार्थबुद्धीचा आरोप करतां आला नाही. फक्त टिळकांविषयी माझी भक्तिच कमी इतकाच बहाणा करतां आला ! पण पुढे टिळकांच्या मुलांचा व आम्हा ट्रस्टीचा वाद सुरू झाल्यावर, मी पुण्यास धावत आलो तो मृत्युपत्र हस्तगत करून घेण्याकरितां आलो व टिळकांच्या मुलांना लुबाडण्याकरितां आलो, असा एक नवीन आरोप माझ्या शत्रूना मजवर आणता आला व तोहि आणल्याशिवाय त्यानी सोडले नाही !

टिळकांच्या शवाला पुण्याला आणता आले नाही ! तरी त्याच्या अस्थीना समारंभाने आणावे असे अर्थातच ठरले. आणि काही विशेष उत्साही मंडळीनी आम्हा कोणाला न विचारतां, पुणे स्टेशनावर जाऊन बोरीबंदरावर तार करून स्पेशल ट्रेन ठरवली. तिच्यांतून टिळकांच्या अस्थि आणण्यांत आल्या; व त्यांच्या शहर प्रवेशाचा फार मोठा समारभ झाला. पुढे क्रिया-कर्मान्तर सुरू झाले. ते निम्मेशिम्मे कसे तरी पार पडले. पण टिळकांच्या चिरजीवांनी आम्हाला अमुक अमुक गोष्टी मुळीच करावयाच्या नाहीत असे सांगितले. तेव्हां उरलेली क्रिया धोडोपंत विद्वांस यांनीं केली ! टिळकांच्या हयातीत त्यांच्या मुलांचा बाहेर कोणाशी विशेष संबंध येत नसे. यामुळे त्यांचे स्वभाव कळून आले नव्हते. परंतु या क्रियाकर्मान्तराच्या वेळी त्यांनी प्रथमच लोकांना आपल्या स्वभावाची जी परीक्षा जाहीर रीतीने दिली ती पाहून लोक खरोखरच मनात दचकले. आम्हाला त्यांच्या स्वभावाचा थोडथोडा परिचय होता. परतु टिळक वारल्यामुळे आतां त्यांचा आमचा प्रत्यक्ष संबध येथून पुढे सतत येणार म्हणून आमच्याहि मनांत चिंता वाटण्याला प्रारभ झाला. पण तेराव्या दिवशी दुखवट्याचे अहेर झाले तेव्हां, धाकटा मुलगा श्रीधर-बापू याने अहेर करणारांचे आभार मानून " वडिलांचा लौकिक कायम ठेवण्याचा प्रयत्न करूं" असे सांगितले त्याने सर्वांनाच बरें वाटलें !

चौदाव्या दिवशी लोकमान्यांच्या उत्तरक्रियेसबंधी सर्व गोष्टी निकालांत निघाल्या. तेव्हां आतां पुढे घरची, व वर्तमानपत्रे छापखाना यांची, काय व्यवस्था करावयाची ? याविषयी उभयतां जावयांनी, म्हणजे साने व केतकर यांनी, टिळकांच्या मुलांपाशी हळूहळू गोष्ट काढली. टिळकानी कोलंबो येथे मृत्युपत्र केले होते तेच अखेरचे ही गोष्ट मुलासुद्धा सर्वांना माहीत होती. अर्थात् त्यांतील कलमांप्रमाणे व्यवस्था व्हावयाची हे सर्वसंमत झाल्यासारखे होते. कारण ते मृत्युपत्र खोटे आहे, किंवा बेकायदेशीर आहे, किंवा त्यानंतर दुसरे मृत्युपत्र पुरे केल्यामुळें हे पहिले निरुपयोगी ठरते, असली कुकल्पना तेव्हां मुलांच्या मनांत आली नव्हती; व ती त्यांच्या मनांत भरविण्याला इतर कोणालाहि तोपर्यंत संधि मिळाली नाही. पण सर्वांत सुदैवाची गोष्ट म्हटली म्हणजे हे मृत्युपत्र टिळकांच्या माडीवर खासगी कागदांत राहिलेले नसून, खाली केसरी–कचेरीच्या कागदांत, म्हणजे धोंडोपंत विद्वांस यांच्या ताब्यात राहिले होते.

वास्तविक हा अत्यंत खासगी स्वरूपाचा कागद म्हणून तो खुद्द टिळकांच्या टेबलांत रहावयाचा. परंतु टिळक विलायतेस जाण्यापूर्वी एकदा अशी गोष्ट निघाली की, "कोलंबो येथील मृत्युपत्र अगदी घाईने झाले होते, म्हणून आतां थोडी सवड काढून स्वस्थपणाने टिळकांनी स्वदस्तुरचे मृत्युपत्र नवीन लिहावे, व त्यांत सर्व व्यवस्था मनासारखी करून मगच विलायतेस जावे." पण ती गोष्ट टिळकांनी फारशी मनावर घेतली नाही. "तुम्हांला काय मसुदा करावयाचा असेल तो करून मला दाखवा," असे त्यांनी मला व धोंडोपतांना सांगितले, आणि त्याकरितां म्हणून कोलंबोचे मृत्युपत्र धोंडोपंतांच्या स्वाधीन केले. त्याप्रमाणे आम्ही एक कच्चा मसुदा तयार केला व तो त्याना दाखविला. तो त्यांनी वाचला. पण तोहि परत धोंडोपंतांच्या स्वाधीन करून ते म्हणाले "माझ्या पूर्वीच्या मृत्युपत्रांत व या तुमच्या मसुद्यांत फरक म्हणण्यासारखे विशेष नाहीत. सार्वजनिक देणग्या वगैरे तुम्ही सुचविल्या ती गोष्ट नवीन आहे. तथापि पहिल्या मृत्युपत्रांतहि वर्तमानपत्रांचा ट्रस्ट केल्याचे लिहिलेच आहे. शिवाय विलायतेत काय काय गोष्टी घडतात व मग आपली सांपत्तिक स्थिति कशी काय होते याचा आज अदमास लागत नाही. याकरिता तो लागल्यावर मग वाटल्यास दुसरा कागद करू. तोपर्यंत हे सर्व कागद असेच तुजजवळ ठेवून दे." त्याप्रमाणे धोंडोपंतांनी ते आपल्या ऑफिसच्या कागदांत ठेवले. टिळकांच्या गैरहजेरीत

त्याच्या माडीला बहुधा कुलूप लावून ठेवलेले असे; व ते नसले म्हणजे त्यांच्या खासगी पत्राना विशेष कारणाशिवाय कोणी हात लावूं नये अशी टिळकांची इच्छा व धोंडोपतांचा प्रघात असे

टिळक विलायतेस गेल्यावर चिरोल केस हरल्यामुळे त्यांची सांपत्तिक स्थिति जशी एकदम खालावली, तशीच पुढे आम्ही पर्सफंड गोळा केल्यामुळे ती उलट एकदम सुधारली! यामुळे टिळकाना चितेचें कोणतेहि कारण राहिले नव्हते. टिळक परत आल्यावर कांही दिवसानी अण्णासाहेब नेने यांनी टिळकांसंबंधीच्या खासगी व सार्वजनिक पैशांचे सर्व हिशेब तयार केले, व १९२० च्या मे महिन्याच्या २२ व्या तारखेला जाहीर रीतीने पर्सफंड टिळकाना समर्पण करण्यात आला. अशा रीतीनें पैशाची निरवानिरव झाली. केसरीचें उत्पन्न वाढत होतें इतर सर्व कामे जोरात चालू होती. अर्थात् टिळक विलायतेस निघाले असतां मृत्युपत्र करण्याची जी जरुरी पूर्वी दोन प्रसंगी वाटली, ती आता टिळक खुद्द पुण्यात असल्यावर, व ते आपली कामे नेहमीप्रमाणे करू लागल्यावर, फारशी उरली नाही. कोणी त्यांच्याकडे मृत्युपत्र करण्यासंबंधाची गोष्ट काढणे उघडच अप्रयोजकपणाचे झाले असते.

इकडे टिळकहि जुने मृत्युपत्र शिल्लकच आहे, व नवे करण्याची जरुरी किंवा घाई नाही, असे समजून चालढकल करीत होते. माझी समजूत अशी की, जुन्या मृत्युपत्रानेहि सर्व निर्वाह होण्यासारखा आहे अशीच बहुधा त्यांची समजूत होती. त्यांतूनहि ते एखाद्या विशेष रोगाने महिना दोन महिने अंथरुणावर खितपत पडते तर त्याना नव्या मृत्युपत्राची कल्पना सुचली असती, व पडल्या पडल्या कदाचित् त्यानी ते केलेंहि असते. पण मुंबईस अभावितपणे ते आजारी पडले, व दोन दिवसांतच इतके क्षीण झाले की, शुद्धि असली तरी सर्व मजकूर जुळवून सांगून लांबलचक मृत्युपत्र लिहविण्याइतकी शक्ति त्याच्यामध्ये राहिली नाही.

आणि कोलंबो येथे मृत्युपत्र लिहिले गेले ते तरी किती घाईत! इतकें की, कोणाला सांगितले तरी खरेंहि वाटणार नाही. वास्तविक कोलंबो येथें टिळकांचा मुक्काम पांच-सहा दिवस पडला होता. जवळ धोंडोपंत व मी होतो. दिवसांतून अगदींच केव्हां स्वस्थपणा मिळत नव्हता असेंहि नाही. तथापि कोणतेंहि काम अगदीं आयत्या वेळी शेवटच्या घटकेला करण्याची एक प्रकारची संवय टिळकांना

जन्मभर होती. तिचा कित्येक वेळी अगदी अतिरेक होई, त्यांतलेच त्यांच्या मृत्युपत्राचे हे एक उदाहरण होय. मृत्युपत्रासारखा कागद त्यांनी, पुण्याहून प्रथम विलायतेस प्रयाण करण्यापूर्वीच, स्वस्थपणाने लिहून, सह्या साक्षी घालून, पाकीट-बद करून, वर आपले सील करून, बदोबस्ताने धोंडोपतांकडे देऊन ठेवावयाचा किंवा रजिस्टर कचेरीत दाखल करून ठेवावयाचा. कारण तो कागद अत्यत महत्त्वाचा ठरणार हे उघड होते. परतु कोलंबोस जाऊन पांच-सहा दिवस झाले, मुक्काम संपला, बोटीच्या धक्क्यावर जाण्याकरितां सामान भरून गाड्याच्या येरझारा सुरू झाल्या, अशा वेळी एका खोलीत बसून, बहुधा दारहि न लावून घेता, धोंडो-पतांना एक मसुदा त्यानी तोडाने सांगितला. जसा काही तो वर्तमानपत्रांत घालण्याचा मजकूरच होता ! त्यांत कांही शोध घालावे लागले तेहि त्याच कागदावर घातले. वेगळी स्वच्छ प्रत करण्यासहि त्याना अवसर सांपडला नाही ! फक्त मला हांक मारून ते इतकेच म्हणाले की, "अहो, हे पहा मी मृत्युपत्र लिहून ठेवले. यावर साक्ष घाला." त्याप्रमाणे मी साक्ष घातली; व तो कागद धोंडोपतांच्या हाती सही करून देतांच टिळक आंगरखा पागोटे घालण्याच्या तयारीला लागले. केसरीचे व आमचेहि सुदैव हेच की, अशा घाईत तरी हे मृत्युपत्र लिहून सही साक्ष घालून पुरे झाले. कारण कोणत्याहि कारणाने ते न होता टिळक तसेच गाडीत बसले असते, तर काय काय परिणाम घडले असते याची कोणालाहि आज कल्पना करतां येईल !

असो. मृत्युपत्राचा हा इतका विस्तृत इतिहास सागण्याचे कारण इतकेच की, ते धोंडोपंतांच्या हाती राहिले म्हणून, टिळकांचे क्रियाकर्मांतर संपल्यानंतर, पुढे काय करावयाचे अशी गोष्ट तरी टिळकांच्या जावयांना काढून मुलाशी बोलणे चालू करतां आले. नाही तर बोलण्याला मुद्दाच कांही नव्हता; आणि जांवई व मुली आपापल्या घरी गेल्यानंतर दुसरेच दिवशी धोंडोपंताना धोतर झाडून राहत्या घरांतूनच काय पण केसरी ऑफिसांतूनहि बाहेर पडावे लागले असते. मला कदाचित् तो प्रसंग त्याच दिवशी आला नसता. पण तो पुढे फार दिवस टळला नसता. पण मृत्युपत्र होते म्हणून, धोंडोपंतांना राहते घर सोडावे लागले तरी, तेच मृत्यु-पत्राचा अंमल करणारे एक्झिक्युटर असल्यामुळे केसरी ऑफिस सोडावे लागलें नाहीं ! आणि त्याच कारणाने टिळकांच्या हयातीत मी जे केसरीचें डिक्लेरेशन करून वर्तमानपत्र ताब्यांत घेतलें ते पुढे माझ्याच ताब्यांत राहिलें.

क्रिया संपल्यानंतर पुढील व्यवस्थेला प्रारंभ करावयाचा तर कायमची अर्श काय तजवीज करावी हा प्रश्न निघाला. त्यावेळी मुलांची दृष्टि इतकीच होती की पत्रें, छापखाना, कारखाना ही कोणाच्याहि हाती जावोत. किंबहुना त्यांचा उपद्रव आपणाला नकोच. फक्त मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणे कोणती किती मिळकत केव्हा व कशी आपल्या ताब्यात येईल ? हे दोन तऱ्हांनी घडून घेण्यासारखे होते. ( १ ) एक तऱ्हा अशी की मृत्युपत्रात लिहिल्याप्रमाणे 'एक्झिक्युटर धोंडोपंत यांनी मुलांना निम्मा गायकवाडवाडा, निम्म्या वाड्याचे भाडे, सिंहगडचा बंगला, टिळकांचे सर्व ग्रंथ व त्याच्या प्रति, पुढील उत्पन्न, विम्याचे पैसे, डाग-दागिने, लातूरची गिरणी, व दर महिना दोनशे रुपये पेन्शन—इतके द्यावे म्हणजे मुलांचा हक्क संपला. बाकीच्या सर्व मिळकतीची व्यवस्था, व्यवस्थापक या नात्याने, धोंडोपंतांनी करावी. ( २ ) याचाच दुसरा प्रकार असा की, बाकी सर्व मिळकत मुलांना द्यावयाची ती वर लिहिल्याप्रमाणेच द्यावी, पण दोनशे रुपये पेन्शनच्या पोटी जगन्नाथ महाराज याजकडे येणे निघत असलेली टिळकांची सर्व रक्कम मुलांना द्यावी, म्हणजे मग पेन्शनचा संबंध उरला नाही.

पहिल्या प्रकाराने मुलांनी आपला हक्क बजावला असता तर त्यांच्या हाती एकदम एक गट अशी रक्कम थोडी आली असती, व दरमहा वाड्याचे भाडे व दोनशें रुपये असे घेऊन निर्वाह करावा लागला असता. ही रक्कम, विम्याचे पैसे, गीतारहस्याचे पैसे, व प्रत्येकी रोख मिळणारे पंधरा हजार या सर्वांवरील व्याज, आणि शिवाय राहण्याला बिनखर्ची वाडा, एवढ्यावर, पण येवढ्यावरच, त्यांना निर्वाह करावा लागला असता. आणि एवढ्यांत निर्वाह उत्तम रीतीने झालाहि असता. कारण घरी कुटुंब अवघ्या तीन–चार माणसांचे. अजून मुलांचा परिवार नाहीं. फुकट पोसण्याचे लोकहि पदरी कोणी नाहीत. अशा स्थितीत आपापला शिक्षणाचा क्रम पुरा करून, ज्याला लिहिण्याची हौस तो केसरी-मराठा पत्राच्या संपादकीय खात्याकडे, व ज्याला ते अनुकूल नाही त्याने छापखान्याच्या कारखान्यांकडे, स्वतःला जोडून घेतले असते तर केसरी ट्रस्टकडूनहि दरमहा वेगळे शे-दोनशे रुपये तरी पगार मिळण्यास कांहीच हरकत नव्हती. वर्तमान-पत्रांचे कारखान्याचे काम ते करू म्हणते तर आम्ही त्यांना किती तरी हौसेने सामील करून घेतले असते ! व यानंतर क्रमाक्रमाने ते सार्वजनिक कार्यात पडले असते, तर त्यांना वडिलांच्या कीर्तीची बैठक एवढी मोठी लाभली होती की,

त्यांनी मूठभर कार्य केले तर पुरुषभर लौकिक त्यांचा झाला असता. पण त्यांना मनांतूनच केसरी-मराठा पत्रांशी, छापखान्याशी, संबंध ठेवावयाचा नव्हता. अखेरच्या दिवसात केव्हां केव्हां टिळक त्यांना म्हणत की, "तुम्हाला वर्तमानपत्राच्या कामांत पडावयाचे असेल तर आतापासून तिकडे लक्ष ठेवा. सत्तेची एवढी लौकिकवान वर्तमानपत्रे व द्रव्यसपन्न कारखाना कोणाला सहसा मिळत नाही." पण मुलांनी त्यांना उत्तर द्यावे कीं, "आम्हाला केसरी नको. आम्हाला त्या छापखान्याच्या भानगडीत पडण्याची इच्छा नाही," आणि क्वचित् थट्टेनेहि म्हणत की, "आम्हाला तुमच्यासारखे लोकमान्य व्हावयाचे नाही!" या बोलण्यांत थोडीशी खोचहि होती. कारण धाकटा मुलगा श्रीधर बापू याची मते सर्वस्वी अत्यंत पुढारलेल्या सुधारकासारखी होती, व थोरल्याची मजल तर कोणाहि विद्यमान सुधारकाला गांठतां आली नसती. म्हणून दोघांच्याहि म्हणण्याचा अर्थ असा होता की "पुराणमतवादी सामाजिक मते प्रतिपादल्यामुळे तुम्हाला लोकमान्यता मिळाली. पण त्या पदवीपेक्षां आम्हाला आमच्या सुधारणावादी उदार मतस्वातत्र्याची किंमत अधिक वाटते." तात्पर्य, उभयतां मुलांचा मार्ग वडिलांहून अनेक दृष्टीनी अगदी भिन्न असल्यामुळे, वर्तमानपत्रे व छापखाना संभाळणे व चालविणे ही एक उपाधि किंवा नसती ब्याद असे त्यांना मनापासून वाटे. आणि ही वर्तमानपत्रे परस्पर केळकर धोंडोपंत हे किंवा इतर कोणी सभाळोत, आपण वडिलांच्या मृत्युपत्राप्रमाणे मिळणारी मिळकत ध्यावी, व मनाप्रमाणे स्वतंत्रपणे वागण्यास मोकळें व्हावें! या मोकळेपणांत चालू शिक्षणक्रम सोडून देण्याचाहि समावेश त्यांच्या मनाने केला होता.

सांगण्याचे तात्पर्य इतकेच कीं, पहिल्या प्रकाराने मृत्युपत्रांतील हक्क बजावून केसरी ट्रस्टचे पेन्शनर होऊन रहाण्यापेक्षां दुसऱ्या प्रकाराने मिळणारी मोठी रक्कम एकदम स्वाधीन करून घ्यावी, हे मुलांना मनांतून अधिक पसंत पडलें. एक्झिक्युटर धोंडोपंत यांना यांतील कोणताहि प्रकार मान्यच होण्यासारखा होता. किंबहुना मुले जी वांटणी उचलतील ती त्यांना देण्याशिवाय गत्यतर नव्हतें. पण त्यांतल्या त्यांत मुलांनी दुसरा प्रकार पसंत करण्यांत धोंडोपंतांची एक विशेष सोय अशी होती की, टिळकांचे मानसपुत्र मानलेल्या जगन्नाथ महाराजांच्या मागें लागून त्यांजकडील रक्कम वसूल करण्याचा जो अत्यत दुःखदायक वाईटपणा

धोंडोपंतांवर यावयाचा, तो आयताच टळत होता ! मुलांनीं जगन्नाथमहाराजांचे कर्ज आपणाकडे लावून घ्यावे व जगन्नाथमहाराजांनी ते त्यांना द्यावे, असे ठरल्यास एक्झिक्युटरच्या जबाबदारीचा एक मोठा व्यवहार परस्पर उलगडून धोंडोपंतांचे काम आयतेच हलके होणार होते.

अशा रीतीने उभयपक्षी एकच योजना मान्य झाल्याने मृत्युपत्रांतील इतर बाबी उलगडणे ओघाने पुढे आले. त्यांतील मुख्य बाब केसरी व मराठा यांचा ट्रस्ट करण्याची. वास्तविक टिळकांनी मृत्युपत्रांत यासंबंधी स्पष्ट उल्लेख केलेला असल्यामुळे स्वतः मृत्युपत्रालाच ट्रस्टडीडचे स्वरूप होते. तो Testamentary Trust असा आपोआपच ठरत होता. वेगळे ट्रस्टडीड न केले तरी चालले असते. पण एक पक्षी असा विचार वाटला की, मुलांनी ट्रस्टडीड करून दिले म्हणजे मृत्युपत्राची अमलबजावणी करण्यात मुले व धोंडोपंत यांच्यामध्ये कांही एक वांधाच उरणार नाही. दुसरे पक्षी, म्हणजे मुलाच्या बाजूने, त्यांनी ट्रस्टडीड करून देणे हे मृत्युपत्रांतील कलमांचाच पुनरुच्चार करण्यासारखे असलें तरी, "आम्ही ट्रस्टडीड करून दिले, आम्ही वडिलांच्या मृत्युपत्रातील आज्ञा मान्य केली व पाळली" असे भूषण त्यांना सहजच वाटण्यासारखे होते. यामुळे उभयतां जावयांनी या ट्रस्टडीडची कल्पना पुढे मांडली. ती त्यांना पसंत पडली तर उत्तमच, नाहीतर धोंडोपतांनी कोर्टात अर्ज करून प्रोबेट आणि लेटर्स ऑफ् ॲडमिनिस्ट्रेशन काढण्याचा मार्ग मोकळाच होता.

ट्रस्टडीडच्या कल्पनेचा विचार मुलांनी एक-दोन दिवस केला. त्याचे मसुदेहि जावई केतकर वकील यांच्या सल्ल्याने झाले. त्यात खोडाखोडी फेरफार झाले. फिरून नवे मसुदे झाले. या गोष्टी परस्पर त्यांच्या त्यांच्यांत म्हणजे मेहुण्या मेहुण्यांत होऊनहि कांही जम बसेना असे जेव्हां पाहिले, तेव्हां मी उघडपणे म्हणालो की, "ट्रस्टडीड होत नसेल तर राहो. आमच्या ताब्यांत मृत्युपत्र आहे ते आम्ही आजच्या आज कोर्टांत नेऊन गुदरतो; आणि एक्झि-क्युटर या नात्याने धोंडोपंतांकडून प्रोबेटचा अर्ज करवितों. यांत येऊन जाऊन खर्च बराचसा लागेल, कांहीं कालावधि होईल, जाहीर नोटिसा लागतील. तात्पर्य, ट्रस्टडीडनें टळण्यासारख्या अनेक अनिष्ट गोष्टी न टळतील. पण मग त्याला काय इलाज ?"

यापूर्वी मुलांनी मृत्युपत्र अनेक वेळां वाचून पाहिले होते. ते खरे व कायदेशीर असल्याची त्यांची मनाने खात्री होती. ते नाकबूल करणे किंवा खोटे म्हणणे हे मुळीच न साधण्यासारखे धाडस होते, हे त्यांचे मनच त्यांना सांगत होते. अशा स्थितीत एक्झिक्युटर यांना कोर्टात प्रोबेट मागण्यास व खर्च करण्यास भाग पाडण्यापासून आपले हित असे कांहीच साधण्यासारखे नाही हेहि त्यांना दिसत होते. म्हणून प्रोबेट घेण्याचा आमचा निश्चय पाहतांच ट्रस्टडीडला संमति देण्याचे त्यांनी अखेर ठरविले. मनातला हेतु हा की, हे करतांनाच "जे कांही अधिकउणे मिळण्यासारखे असेल ते साधून घेऊं;" व त्याप्रमाणे त्यांनी घेतलेहि कारण मृत्युपत्रांत केसरीकडे असलेल्या अर्ध्या वाड्याचे भाडे पाऊणशे घ्यावे असे लिहिले असतां मुलांनी शंभर रुपये भाडे असावे असे सांगितले व आम्हीहि ते मान्य केले. नंतर गोपाळराव पटवर्धन वकील यांचा सल्ला घेतां असे ठरले की, वारस म्हणून दोघे मुलगे व एक्झिक्युटर म्हणून धोंडोपंत विद्वांस या तिघांनी मिळूनच ट्रस्टडीड करून घ्यावे.

यानंतर प्रश्न निघाला तो ट्रस्टी कोण असावे या संबंधाचा. तेव्हां मी व धोंडोपंत यांची नांवे मुलांना ओघानेच सुचण्यासारखी होती. मी पंचवीस वर्षे केसरी-मराठा पत्रांच्या संपादकमंडळावर होतो, टिळकांचा पोलिटिकल सेक्रेटरी होतो, व सर्व तऱ्हेनी त्यांच्या मदतनीसांतील मुख्य होतो ही गोष्ट मुलांना माहीत होती. टिळकांशी माझे व्यक्तिशः संबंध कसे विश्वासाचे व आपलेपणाचे होते हेहि मुलगे रोज पहात. ज्युबिलीफंड, पर्सफंड वगैरे उभारण्यात माझा पुढाकार कसा होता हेहि त्यांना अवगत होते. शिवाय टिळकांच्या मृत्युपत्रावर साक्ष एकट्या माझी; व त्याच मृत्युपत्रात तंटेबखेडे व वाद कोर्टात न नेतां तोडण्यासाठी दोघा जावयांबरोबर, किंबहुना त्यांच्याहूनहि अग्रेसर मान देऊन, टिळकांनी मलाच पंच किंवा आर्बिट्रेटर नेमलेले. अशी स्थिति असतां ट्रस्टी नेमावयाचे तर पहिला ट्रस्टी मला नेमल्याशिवाय दुसरी कोणची गोष्ट मुले करूं शकतील ! किंवा त्यांच्या मनात तरी येईल ! न्यायाच्या दृष्टीने मुलांसंबंधी बोलावयाचे तर मी हेहि प्रांजलपणे सांगतो की, यावेळी म्हणजे ट्रस्टडीड करण्याच्या वेळी, मुलांच्या मनांत माझ्याविषयी पूर्णपणे आदरबुद्धि वसत होती; व टिळकानंतर विश्वास टाकण्याला माझ्यापेक्षां अधिक योग्य असा मनुष्य त्यांना दुसरा कोणी आहे असें वाटत नव्हते.

दुसरे ट्रस्टी धोंडोपंत असावेत हेहि तितकेच क्रमप्राप्त होते. कारण ते एक्झिक्युटर तर होतेच. पण माझ्याप्रमाणे वर्तमानपत्राशीं व छापखान्याशी त्यांचाहि संबध अखड पचवीस वर्षाचा होता. कारखान्यांतील एकहि पान त्यांच्याशिवाय हलत नव्हते, इतकेच नव्हे तर टिळकांनी खासगी व सार्वजनिक कार्यातील पैशा-अडक्याची सर्व जबाबदारी विश्वासाने धोंडोपंतांवरच जन्मभर टाकलेली होती. दोघांबरोबर हा तिसरा मुलगा मानून, देणगीदाखल धोंडोपंतांना एका रकमेने दहा हजार रुपये द्यावेत असे मृत्युपत्रात लिहिले होते, व पुढील व्यवस्थेत ती रक्कम पंधरा हजार केली होती. याहूनहि निर्णायक गोष्ट म्हटली म्हणजे धोंडोपंतांकडे केसरीच्या व्यवस्थापकाचा कारभार त्याच्या जन्मभर ठेवावा व त्यांना एडिटर-इतका पगार द्यावा अशी स्पष्ट कलमे मृत्युपत्रांत होतीं. तात्पर्य, संपादकीय शाखेकडे काम करणारा एक व मुख्य ट्रस्टी मी, आणि छापखान्याकडील व खालच्या कचेरीतील सर्व व्यवस्था पहाणारा दुसरा ट्रस्टी धोंडोपंत, या नेमणुका अगदी क्रमप्राप्त असून उभयता मुलगे, उभयता जावई व टिळकांच्या तिघीहि जाणत्या मुली या सर्वांना एकमताने मान्य होत्या.

नंतर प्रश्न निघाला की, ट्रस्टी दोन असावे की अधिक ? तेव्हां मी होऊन सुचविले की, रा. कृष्णाजीपंत खाडिलकर यांनीहि केसरीची सेवा पुष्कळ दिवस केलेली आहे. तेव्हां आमच्या जोडीला त्यांनाहि तिसरे ट्रस्टी नेमा. परंतु कारण काय असेल ते असो, खाडिलकर हे तिसरे ट्रस्टी नसावेत असे मुलांचे आग्रहाचे म्हणणे पडले. दोघा जावयांपैकी एकाचे मत तसेंच होते, व दुसरा त्याविषयी उदासीन होता. म्हणून या गोष्टीचा निर्णय करण्याचे काम जावई डॉ. साने यांज-कडे सोपविण्यात आले. याप्रमाणे त्यांनी खाडिलकर यांच्याकडे जाऊन तिसरे ट्रस्टी होण्याला तुम्ही कबूल आहां काय ? असे विचारलेहि. परंतु योग असाच होता की, मुलांनी एका कारणाकरितां तर खाडिलकरांनीं दुसऱ्या कारणाकरितां नकार दिला; व ही पडत्या फळाची आज्ञा घेऊन मुलांनी व जावयांनीं दोनच ट्रस्टी असावेत, आणि ते मी व धोंडोपंत असावे, असे निश्चित केले. आणि त्याप्रमाणे अखेर आम्हा उभयतांच्या नांवे ट्रस्टडीड करण्यांत आलें.

हे ट्रस्टडीड व इतर एक–दोन कागद व्हावयाचे होते, ते तयार करण्यांत आम्ही बाहेरच्या कोणा वकिलाची मदत घेतली नाहीं. केतकर व मी यांनी, आम्हाला

कायद्याचे ज्ञान असल्यामुळे, मुलांच्या संमतीने व त्यांच्या सर्व सूचना समाविष्ट करून, सर्वसंमत असे पक्के मसुदे तयार केले; व आम्ही जो हा कामाचा उरक दाखविला तो आमचा आम्हाला उपयोगी पडला. कारण डॉ. साने व केतकर वकील यांना पुण्यास अधिक दिवस रहातां येत नव्हते; व ही संधि जर कां गेली असती तर मुले, मुली, जावई, इतकी सर्व मडळी पुन्हा एकत्र जमून सर्वसंमत रीतीने टिळकांच्या उत्तरकालीन व्यवहाराची व्यवस्था समाधानकारक लागणें कठिण झाले असते. आणि या दरम्यान माधवराव बोडसासारखे कोणी सल्लागार त्याना मिळाले असते तर ट्रस्टसबंधीं जो वाद पुढे पांच सहा वर्षांनी अखेर निघाला, पण पूर्वीच्या कागदाचा पक्केपणा होता म्हणून आम्हाला बाधला नाही, तो वाद प्रारभीच निघावयाचा, व कदाचित कागदच न व्हावयाचे !

असो; हे सर्व कागद तयार झाल्यावर दुसरे दिवशीं आम्ही सर्वजण मिळून राजिस्टर कचेरीत गेलो. तेथे प्रथम मृत्युपत्र नोदविण्यांत आले. ते मुलांनींच हजर केलें. "हेंच शेवटचे मृत्युपत्र असून आम्ही ते नोदविण्याकरितां हजर करितो" असे लिहून दिले. मृत्युपत्रावरील साक्षीदार या नात्याने माझी, टिळकांचे हस्ताक्षर ओळखण्यासंबधाने अनंतराव फडणीसांची, व आणखी एका दोघांच्या अशा जबान्या घेतल्यावर मृत्युपत्र नोदण्यांत आले. त्यानंतर ट्रस्ट-डीडचा कागद नोदण्यांत आला. आणि अशा रीतीने हा महत्त्वाचा पण भानगडीचा प्रश्न सुटला !

पुढे लवकरच जगन्नाथमहाराज यांच्याकडून येणे असलेले कर्ज मुलांनी एकरकमेने वसूल केले. विम्याचे पैसे त्यांचे त्यांना देण्यांत आले. घरांतील सर्व चीजवस्तु घरांतच होती; व उत्तरकार्यानंतर पांच चार दिवसांतच धोंडोपंत विद्वांस हे, स्वतःकरितां कांहीं एक सामान न घेतां, कुटुब व मुले यांसह बाहेर पडले व त्यांनी वेगळे बिऱ्हाड केले. यामुळे सर्व वाड्याची वहिवाट मुलांना स्वतंत्र-पणाने हवीतशी करतां येऊं लागली. मृत्युपत्रांत लिहिलेल्या कलमांची अंमल-बजावणी, माझ्या सल्ल्याने, धोडोपंतांनी एक्झिक्युटर या नात्याने हळुहळू सर्व केली. गीतारहस्य वगैरे ग्रंथांची पुस्तके मुलांच्या स्वाधीन करून हिशोबाचे सर्व पैसे चुकते केले. जुनीं देणी सर्व देऊन टाकली. त्यांची तोशीस मुलांना कांहीं ठेवली नाही. टिळकांच्या और्ध्वदेहिकाचा व प्रयागास अस्थि नेऊन गंगेंत टाकण्या-

पर्यंतचा सर्व खर्च एक्झिक्युटर यानी केला. पुढे एक वर्षाने, वाडा-रिपेरी वगैरे कामाकरितां म्हणन व इतर कांही कलमे दाखवून, मुलांनी मृत्युपत्रांतील पचांकडे फिर्याद करून वेगळे पांच सहा हजार रुपये मागून घेतले; व एवढी रक्कम देण्याचे कारण नाही असे माझे स्वतःचे मत होते तरी "पचांचा लवाद-निवाडा एकमताने व्हावा व मुलांचाहि सतोष व्हावा " म्हणून मी त्यास समति दिली. बुडीत कर्जे काही होती ती एक्झिक्युटर यांनी सोसली, व तरती कुळे होती ती मुलांनी आपल्याकडे लावून घेतली. पुढे छापखान्याकडील जाग्याच्या भाडेचिठ्ठीचे कागद-हि झाले. तात्पर्य अशा रीतीने पैशाअडक्याबाबदचे हितसबध मुलांचे व केसरी ट्रस्टचे जितके सोडवून वेगळे करता आले तितके आम्ही केले. मुलांकडून कुल बेदावे पत्र रजिस्टर करून घेतले. आणि प्रथम काही दिवस तरी टिळकांचे मुलगे व ट्रस्टी याचे सबध अगदी सलोख्याचे नसले तरी शाततेचे होते.

पण पुढे हळुहळू मुलाची दृष्टि फिरली. केसरी ही उत्पन्नाची मोठी बाब असतां ट्रस्टडीड करून दिल्याने आपल्या हातून ती गेली असे त्यांना वाटूं लागले. वास्तविक त्यांनी ट्रस्टडीड न केले असते तरी परिणाम तोच झाला असता. कारण केसरीसह सर्व मिळकत ही टिळकाची स्वसंपादित होती म्हणून तिची वाटेल तशी व्यवस्था मृत्युपत्राने करण्याचा त्यांना अधिकार होता; व मृत्यूपत्रांत एक्झिक्यु-टर म्हणून काम करण्याचा पहिला मान धोंडोपत याना टिळकांनी लिहून दिला असल्यामुळे ते स्वयंभूच ट्रस्टी होते. येऊन जाऊन मी ट्रस्टी झालो नसतो इतकेच काय ते. परंतु लवादनाम्याकरितां मुख्य पंच म्हणून मृत्युपत्राने मला अधिकार दिला होता. आणि केसरीचा सपादक मी पूर्वीपासून होतो तो तसाच पुढेहि सहजच राहिलो असतो. धोंडोपंत, एक्झिक्युटर या नात्याने, मला काढून दुसऱ्या कोणाला संपादक नेमतील हे सर्वस्वी असंभाव्य होते. माझ्यावर त्यांचा पहिल्या-पासून विश्वास. १९०९ साली मी केसरीचा संपादक नव्हतो तेव्हां त्यांनींच मला संस्थेतून जाऊं दिले नाही. आग्रहाने धरून ठेवले. आणि टिळकांच्या गैरहजेरीत ते सर्वस्वी माझाच सल्ला घेऊन आपले काम करीत. मी होतो म्हणून केसरी टिकला ही त्याची तरी बालंबाल खात्री व दृढभावना ! ते स्वतः जरी लेखक नसले तरी, वाचक या नात्याने व बाहेर लोक बोलत त्यावरून, माझ्या हातून केसरी जाणें व दुसऱ्या कोणाच्या हाती देणे यासारखी दुसरी आपत्ति केसरीवर नाही असें त्यांच्या मनाने घेतलेले. आम्ही दोघेहि ट्रस्टडीडमुळे सारख्या अधिकाराचे ट्रस्टी असलों

तरी हिशेबाचे खाते, वसुलीचे खाते, जाहिरातीचे खाते, व केसरी छापून त्याचा बटवडा करण्याचे खाते, ही कामे जरी व्यवस्थापक ट्रस्टी या नात्याने त्यांच्या जबाबदारीने चालत तरी महत्त्वाच्या अशा कोणत्याहि कामात ते माझा सल्ला घेत. इतकेच नव्हे तर मी करीन ते प्रमाण अशा बुद्धीने वागत.

तात्पर्य, मुलानी ट्रस्टडीड केल्यानेच ट्रस्टी म्हणून कायदेशीर अधिष्ठान मला मिळाले असे जरी दिसत असले तथापि, ते झाले नसते तरी सपादक व मुख्य सल्लागार या नात्याने, कारखान्याची वर्तमानपत्राची सर्व व्यवस्था मजकडेच व्यवहाराच्या दृष्टीने राहिली असती. ट्रस्टडीड होऊन ट्रस्टी या नात्याने काम करण्यात मला कायदेशीर आधार व प्रतिष्ठा मिळाली यात शका नाही. पण मुलानी मला ट्रस्टी नेमला तो नेमण्याशिवाय त्यांनाहि गत्यतर नव्हते. कसेहि असले तरी माझा काय किंवा धोडोपताचा काय खरा आधार म्हणजे मृत्युपत्र हाच होता. म्हणून जर का हे कोलबोचे मृत्युपत्र, दुसरे करावयाचे म्हणून, टिळकानी फाडून टाकले असते, किंवा पूर्वी सागितल्याप्रमाणे ते धोडोपंताजवळ न रहातां मुलांच्या हातात परस्पर गेले असते, किंवा मृत्युपत्र आमच्या ताब्यांत असून किंवा रजिस्टर होऊनहि, धोडोपत हयात न राहिल्याने, एक्झिक्युटरचे काम मृत्युपत्रात लिहिल्याप्रमाणे रामभाऊ टिळक याच्या हाती गेले असते तर माव मला बहुधा पहिल्या वर्षातच केसरी सोडून जावे लागले असते. इतकेच नव्हे तर, पुढ अनुभव आला त्यावरून पहाता, केसरीहि आहे त्या स्थितीत उरला नसता. कदाचित् अच्युतराव कोल्हटकरांसारखा एकादा डोळे दिपविणारा लेखक, किंवा एखादा ब्राह्मणद्वेष्टा ब्राह्मणेतर, किंवा एकांतिक मते प्रतिपादन करणारा सुधारक, किंवा अस्पृश्योद्धारक, किंवा समाजद्वेष्टा लेखक सपादक झाला असता. केसरीची लोकप्रियता सर्व नाहीशी झाली असती. वर्गणीचे व जाहिरातीचे उत्पन्न सपुष्टांत आले असते. तात्पर्य, आजचा केसरी, त्याचा परिवार, प्रतिष्ठेचे त्याचे स्थान, ही सर्व नष्ट होऊन आम्ही मागे केसरीची जी ज्युबिली केली तशी करण्याची पाळी आली नसती. एक तरी मृत्युपत्र, शिल्लक व आमच्या हाती राहिल्याने, आणि धोडोपतांना आज टिळकानंतर इतकी वर्षे आयुष्य लाभल्याने, ज्या गोष्टी घडल्या आहेत व तदभावी ज्या काय गोष्टी घडल्या असत्या असे सहज अनुमान करता येते त्यांतील जमीन-अस्मानाची तफावत पाहिली म्हणजे, मनुष्याला दैववादी झाल्याशिवाय खरोखर गत्यंतर रहात नाही.

प्रत्यक्ष व्यवहारांत मी उद्योगवादी असलो तरी स्वतः माझ्याच आयुष्यांत अशा कांही गोष्टी अकल्पित रीतीने घडलेल्या आहेत की, मी आज आहे तो माझ्या उद्योगवादामुळे नसून माझ्या सुदैवामुळे आहे अशी स्पष्ट कबुली देण्याला मला कांहीच सकोच किंवा कमीपणा वाटत नाही. १८९६ साली मी पुण्यास येणे, पुढे इतक्या दंगलीत व बिकट परिस्थितीत केसरीचा व माझा संबध टिकून रहाणे, स्वतः केसरीच अनेक गंडातरांतून जगणे-वांचणे, १९१० साली तो माझ्या हाती घेण्याचा माझा आग्रह खाडिलकरांनी पड खाल्ल्याने तडीस जाणे, कोलंबोच्या धांदलीत टिळकांच्या हातून मृत्युपत्र लिहून होणे व ते आमच्या ताब्यांत शाबूत राहिल्यामुळे त्याच्या जोरावर मुलांकडून ट्रस्टडीड करविणे, हे इतके निरनिराळे सांधे किंवा खटके होते की, कोणाहि जबरदस्त उद्योगवादी मनुष्याने "या गोष्टी मला आपल्या उद्योगाने स्वाधीन करितां आल्या असत्या व गाडी या रुळावरची त्या रुळावर जाऊ देण्याचे हटकून टाळतां आले असते" असे म्हणणे ही धाडसाची कमालच होईल. निदान तसले धाडस मी तरी करूं शकत नाहीं.

एका दृष्टीने पाहिले असतां टिळकांनीं सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन मृत्युपत्रापर्यंत वाट न पहातां, स्वतः होऊनच त्यांना हवे तसे व्यवस्थित ट्रस्टडीड करून ठेवावयास पाहिजे होते. केसरीचा ट्रस्ट करण्याची कल्पना त्यांची फार पूर्वीपासूनची होती. आणि ट्रस्टडीड करून ठेवून, त्यांत स्वतःला आपल्या मृत्यूपर्यंत सर्वाधिकारी एकटा एक ट्रस्टी नेमून घेऊन, त्यांतच आपल्या मागे ट्रस्टची व्यवस्था कशी व्हावी हे त्यांनीं लिहून ठेवले असते तर कांहीच भानगड उरत नव्हती. संपादकीय खात्याकडे मी व खाडिलकर दोघेहि किंवा खाडिलकर न राहिल्यास मी हाच मुख्य सपादक रहाणार, व धोंडोपत हेच तहाहयात व्यवस्थापक रहाणार, हीच गोष्ट टिळकांना इष्ट व अपेक्षित होती. पण आपल्या मृत्यूनंतर मृत्युपत्र किंवा ट्रस्टडीड नसेल तर मुलगे वारस होणार, केसरी-मराठा पत्रे व छापखाना ही त्यांच्या खासगी मालकीची होणार, आणि ती त्यांच्या हाती गेली म्हणजे केळकर, खाडिलकर, धोंडोपंत यांपैकी कोणीहि जागेवर रहाणार नाहीं—फार काय पण केसरीहि कदाचित् जाग्यावर रहाणार नाही—ही गोष्ट त्यांना सहज समजण्यासारखी नव्हती असे कोण म्हणेल ! असे असतां टिळकानीं स्वतः ट्रस्टडीड तर करून ठेवलेच नाही, पण मृत्युपत्राचीहि चालढकल अगदीं अखेरपर्यंत कशी केली हे पूर्वी सांगितलेच आहे.

मला असे आठवते की, रावबहादूर माधवराव रानडे यांनी आपले मृत्युपत्र केले त्यांत दत्तक घेण्याची परवानगी कुटुंबाला दिली. पुढे त्यांच्या मरणोत्तर त्यांचे कुटुंब कै. रमाबाई रानडे यांनी आपला पुतण्या दत्तक घेतल्यावर मायमुलांत बेबनाव झाला, व सर्व प्रकरण हायकोर्टापर्यंत गेले. या गोष्टीला अनुलक्षून टिळक रानड्यांना हसत. दत्तकाची कल्पना टिळकांना पसत नव्हती, व रानडे एवढे सुधारक असतां एखाद्या जुन्या चालीच्या हिंदूप्रमाणे त्यांनी मृत्युपत्र करून व दत्तक मुलाविषयी इच्छा प्रगट करून, शेवटी कुटुंबाला सकटात घातले याला अनुलक्षून ते म्हणत की, "रानड्याचे मृत्युपत्र हे अस्सल हिंदूचे मृत्युपत्र होय." पण पुढे टिळकाच्या मृत्यूनतर त्यांच्या मुलानी जे वाद केले ते वाद, स्वतः टिळकांनीच जिवतपणी ट्रस्टडीड करून ठेवले असते तर, टळले असते. ही गोष्ट लक्षांत घेऊन त्यांनाहि 'हिंदु' म्हणून कोणी नावे ठेवली असती तर त्याला, परिणामावरून पहाता, थोडाबहुत आधार सांपडता! ट्रस्टडीड नाही तर नाही पण निदान मृत्युपत्र तरी याहून अधिक व्यवस्थित करून, म्हणजे "मी केसरीचा पब्लिक ट्रस्ट केला आहे" एवढेच न लिहिता "ट्रस्टीची नावे, त्याची परपरा रहाण्याचा कायदेशीर मार्ग, व एकदरीने ट्रस्टच्या व्यवस्थेची योजना" ही त्यांनी सविस्तर लिहून ठेवली असती तर फार चागले झाले असते. कारण धोंडोपतांच्या मागे या पब्लिक ट्रस्टचा ट्रस्टी आपल्या वारसापैकीच कोणी तरी होणार ही अनिष्ट गोष्ट ढळढळीत दिसत असल्यामुळे तिचा कायदेशीर परिहार त्यांनी अगाऊ करून ठेवला असता. मी काय, खाडिलकर काय, किवा इतर कोणी काय, केसरीचा संपादक नेमावयाचा तो व्यवस्थापक धोंडोपंत किंवा वारस मुलगे यांनी नेमावयाचा! त्यांनीच त्यांचा पगार वगैरे ठरवून बहाली बडतर्फी करावयाची! ही गोष्ट अगदीच अप्रयोजकपणाची होणार हे टिळकांच्यापुढे कोणी मांडले असते तर त्यानी ते केव्हांच कबूलहि केले असते. पण अशा कामांत तिऱ्हाइताने बोलणे उघडच अशक्य. यामुळे पुढची सर्व कल्पना स्वतः करून त्याची तजवीज स्वतः त्यांनीच करावयास पाहिजे होती. आणि हे तरी म्हणण्याचे कारण इतकेच की, आपली मुले कोणत्या मताची आहेत हे त्यांना पुरते माहीत होते. शिवाय मुलांना कांही तरी मर्यादित उत्पन्न येण्याइतकीच रक्कम द्यावी, आणि केसरी मराठा पत्रे व छापखाना ही सार्वजनिक अशी समजून-त्यावर आपल्या वारसांचा या ठराविक रकमेपलीकडे कोणताहि हक्क राहूं नये, असा त्यांचा निष्ठापूर्वक निश्चय होता हे माझ्याप्रमाणें इतर

पुष्कळांना माहीत होते. आणि म्हणूनच ही चालढकल त्यांच्या हातून झाली ती मनात नसता झाली, केवळ हयगयीने झाली, आणि कोणचेहि काम अखेरपर्यंत पुढे ढकलण्याच्या संवयीने झाली, असे म्हणावे लागते. याहून स्वार्थीपणाचा किंवा केसरी बुडवून मुलाना द्रव्यसपन्न करण्याचा त्यांचा कधीहि इरादा नव्हता ! हे आम्हा सर्वांना पक्के माहीत असल्यामुळे, वरील दोष एका दृष्टीने लहान, तरी दुसऱ्या दृष्टीने तोच मोठा ठरतो असे मला वाटते.

पण टिळकांच्या बाजूनेहि एक असे म्हणण्यासारखे होते की स्वतःची मिळकत काय, केसरी काय, सर्वच गोष्टी त्यांच्या सबधाच्या चचल स्वरूपाच्या आहेत असे त्यांना नेहमी वाटे त्यांचे सगळे आयुष्य, एखाद्या वादळाच्या झपाट्यात समुद्रामध्ये नाव चालण्यासारखे, मार्ग काढीत होते शिवाय जरा स्वस्थता लाभली की कांही तरी एखादा मोठा उपक्रम असा ते करून ठेवीत की, पुढे कांही दिवस त्यातच त्यांचे सर्व लक्ष व हाताशी असलेला सर्व पैसाहि गुतून जावा. एखादे वेळी त्यांच्या मनात, धावत्या ढगासारखी, अशीहि कल्पना येऊन जावी की आपल्या पश्चात् चार दोन वर्षे तरी केसरी सस्था टिकते की नाही ! होतो त्यांतल्या त्यात मी, धोंडोपत, खाडिलकर यांच्यावरच त्यांचा विश्वास होता. या सस्थेच्या कामांत दुसरे कोणी बाहेरचे लोक आणून घालण्याचे त्यांच्या मनांत १९०९।१० नतर केव्हाहि आले नाही, हे मी निश्चयाने सागतो. स्वतःच्या मुलासबधाने तर त्यांनी आधीच पुरी परीक्षा करून ठेवली होती की, याच्यापैकी कोणी केसरी सस्थेला, निदान प्रथमच व ताबडतोब, उपयोगी पडण्याचे नशीबांत नाही. त्यांचे वय लहान व अनुभवहि नाही. तथापि न जाणो वेळ कशी काय येईल हे कोणी सांगावे ! खाडिलकराच्या लिहिण्यात एक गुण तर एक अवगुण. केळकराच्या लिहिण्यांत एक गुण तर एक अवगुण. धोंडोपंत उद्योगी व प्रामाणिक. तथापि मुलाचे त्यांचे बरे नाही. व्यवस्थेच्या कामातहि ठरीव पद्धतीपलीकडे धोंडोपंतांची दृष्टि जाणारी नाही. आणि त्यांच्यामागून त्यांच्याइतका प्रामाणिक व्यवस्थापक मिळण्याची शंकाच. शिवाय राजकीय वातावरणांत होणारे वादळ दर्शविणारे ढग हळुहळू क्षितिजावर त्यांना दिसून येत होते. आणि शेवटी अशीहि गोष्ट एकंदरीने खरी की, "आपणामागे जग बुडणार" अशी जी एक सामान्य माणसाची, मनाने मानण्याची प्रवृत्ति असते ती टिळकांचीहि असण्याचे कारण असें कीं, त्यांनीं जन्मभर केलेले उद्योग उलाढाली फार मोठ्या होत्या आणि त्या ते होते म्हणूनच

निभावल्या. त्यांच्या डोळ्यादेखत इतरांची परीक्षा त्यांना पहावयास सांपडली नाही. कारण या इतरांनी आपापल्या परीनी कांही पराक्रम म्हणण्यासारख्या लहान सहान गोष्टी त्यांच्या लहानशा योग्यतेनुरूप केल्या असल्या तरी, त्यांच्या उभ्या छत्राच्या सावलीखालीच त्या सर्व झालेल्या होत्या यात शका नाही. या सर्व कारणां-मुळे केसरी संस्थेसबंधाने टिळक काहीसे दैववादी बनले होते ! केसरीचा पब्लिक ट्रस्ट करून, म्हणजे मुलावारसाना द्यावयाचे ते देऊन टाकून उरल्या सर्वांवरील स्वत्वनिवृत्ति टिळकानी केली यांत "माझ्या हातून व्हावयाचे ते झाले. आतां पुढे ती संस्था आहे, ती ज्याच्या स्वाधीन होणार ते लोक आहेत, व त्या उभयतांचे दैव आहे, अर्थात् जे घडेल ते खरे," इतके मनाशी म्हणून त्यानी कित्येक वेळा स्वतःचे समाधान केले असेल.

"आपल्या इकडील इतर कोणत्याहि पत्रापेक्षा केसरीची स्थिति व त्यात पडलेली माणसे ही अधिक चागली आहेत," असा जरी त्याना पुष्कळ वेळा अभिमान वाटे, व तोडाने केव्हा केव्हा तो ते बोलूनहि दाखवीत, तरी आज त्याच्या मरणोत्तर इतक्या वर्षानी केसरी सस्थेची जी स्थिति आहे ती भविष्यरूपाने त्यानी वर्तविली असती की नाही, याची शंकाच वाटते. अधारांत जशा नसत्या आकृति डोळ्याला दिसतात, त्याप्रमाणे आपल्या पश्चात् काय काय गोष्टी होतील याच्या अशाच कांही कल्पना प्रत्येक मनुष्याच्या डोळ्यापुढे येत असतात. विशेषतः आपल्या मागे उरणारी मडळी आपल्या इतक्या श्रेष्ठ योग्यतेची नाहीत असे ज्याला वाटते त्याच्या डोळ्यापुढे तर वर सांगितल्याप्रमाणे कल्पनांच्या आकृति उभ्या राहिल्यास नवल नाही

आणि याबद्दल टिळकांना तरी दोष कसा द्यावा ! कारण ते गेल्याबरोबर आम्हीहि सर्व इतके दिङ्मूढ बनलो की सस्थेचे व आमचे पुढे काय होणार याची आम्हालाहि बरोबर कल्पना नव्हती. १८९७ साली टिळकांना शिक्षा झाली तेव्हां ते, दीड वर्षानी कां होईना, परत येऊन सर्व कांही आपल्या हाती घेऊन पूर्ववत् सभाळतील या खात्रीने हे दीड वर्ष आपण कसेहि निभावून काढूं असा आत्म-विश्वास वाटे. फिरून १९०८ साली त्यांना शिक्षा झाली तेव्हां ते परत येतील अशी खात्री पूर्वीइतकी उरली नव्हती; पण मंडाल्याहून दर महिन्याला त्यांचे पत्र स्वदस्तुरचे येई व वर्षातून एखादे वेळी धोंडोपंतहि त्यांना समक्ष भेटून हकीकती सांगून व ऐकून येत. यामुळे तेथपर्यंत तरी आधाराचा विश्वास वाटे. पण १९२०

साली टिळक प्रत्यक्ष मृत्यूच पावल्यावर आम्हाला आधार कशाचा मिळणार ! तेव्हां मात्र अगदी खरोखर आमचे आम्हीच उरलो असे वाटले. टिळक वारले त्या दिवशी खरोखरच मला एका जुन्या प्रसगाची आठवण झाली प्रसग तो या ग्रथांत पूर्वी २१० पृष्ठावर दिला आहे. त्याचप्रमाणे टिळकांच्या मृत्युनेहि फिरून एक वेळ 'आभाळ फाटले' असेच आम्हांला वाटले.

उलट, जबाबदारीने कोणचेहि काम अंगावर पडणे याची भावना काही वेगळीच असते. एक पक्षी आपणहि आपल्यात काय गुण किंवा दम आहे तो दाखवू असे वाटून एक प्रकारचा अपरिचित असा उल्हास मनुष्याला वाटतो हे खरे. तरी पण जबाबदारी खरीच मोठी असेल तर तो उल्हास दबूनच जातो. मनांत पहिली भीति ही की, टिळक तुरुगांत असले किंवा बाहेर असले तरी त्याच्यावर दृष्टि देऊनच वाचक व वर्गणीदार केसरीला उदार आश्रय देतात. वास्तविक केसरीतील लेखांपुरते पाहिले तर आम्हाला टिळक हे तुरुगातून विद्युत्संदेश पाठवीत होते असे थोडेच आहे ! यामुळे त्याच्या अभावी केसरीत येणारे लेख जर लोकाना पसंत पडत असतील तर त्यांचे श्रेय वास्तविक वाचकांनी आमचे आम्हास द्यावे; व आम्हीहि तो व्यक्तिशः आमचा गुण आहे असा आत्मविश्वास धरावा. परतु तेव्हां या आत्मविश्वासापेक्षां टिळकाची पुण्याईच प्रभावी आहे व तिचाच आधार आम्हाला आमच्या यशांत आहे असे मनाला वाटे. आणि लोकाचा तर खरोखरच एक डोळा केसरीतील मजकुराकडे असला तर दुसरा डोळा अदृश्य टिळकांकडे असे. पण आतां टिळक मृत्यु पावल्यावर "टिळकांची पुण्याई सपली व त्याबरोबर त्यांचे वर्तमानपत्राहि संपले" अशीच भावना लोकांची न होईल कशावरून, असे आम्हाला वाटे. पुढे पुढे केसरीचे उत्पन्न वाढले होते ते आतां कसचे टिकून रहाते ? ते हातोहात तुटत जाईल, अशीहि एक प्रकारची भीति मनाला भासे. जणूं कांही केसरीतील जाहिरातदार हे टिळक आहेत म्हणूनच आपल्या जाहिराती केसरीत देत होते ! वास्तविक ही भीति अगदीच निराधार होती. परंतु प्रारंभी ती मनाला वाटत होती एवढे मात्र खरें.

महायुद्ध, होमरूल लीगच्या चळवळी, विलायतेची डेप्युटेशने, इत्यादि गोष्टीमुळे १९१९-२०च्या सुमारास, किवा त्या आधीहि दोन तीन वर्षें, केसरीचा खप इतका वाढला होता की मागणी इतका पुरवठाच एखादे वेळी करितां येत नसे. आणि या

वाजून पहातां हा खप टिकणार नाही अशी जी भीति आम्हाला वाटू लागली ती मात्र कांही अंशी साधार होती. त्यांतूनहि टिळकांच्या मुलांची व आमची भांडणे कोर्टात जातात की काय, अशीहि भीति पुढे लवकरच मनांत येऊ लागली. नवे ट्रस्टडीड होईल अशी साधारणतः प्रथम कल्पनाच नव्हती. आणि मृत्युपत्र कोर्टात जाऊन शाबीत होऊन त्याचे प्रोबेट बिनतक्रार पदरात पडावयाचे म्हणजे ते एक दिव्यच वाटे. मृत्युपत्रांत लिहिलेल्या ट्रस्टचे स्वरूप 'पब्लिक ट्रस्ट' या शब्दांनी सार्वजनिक म्हणजे काय ठरावयाचे हा प्रश्न कायद्याच्या दृष्टीने वादग्रस्त असा होता. तथापि ट्रस्ट केला असला काय किंवा न केला असला काय, आम्ही ती मिळकत, टिळकांच्या मुलांचीहि, खासगी स्वरूपाची मानणे शक्यच नव्हते. ट्रस्टडीड न होते तर एक्झिक्युटर स. विद्वांस यांनी नेमलेला केसरीचा मी पगारी संपादक म्हणजे नोकर हे नाते रहावयाचे, त्या ऐवजी ट्रस्ट झाल्यामुळे ट्रस्टी व संपादक असे नाते अर्थात अधिक प्रतिष्ठित राहिले. तथापि ट्रस्टीच्या ताब्यातील मिळकत ही देखील खाजगी मालकीची नव्हे, व मी ट्रस्टी असलो तरी पगारी संपादकच होतो.

ट्रस्टडीडमध्ये आम्ही ट्रस्टी या नात्याने पगार घ्यावा असे लिहिलेले नव्हते हे खरे. आणि ट्रस्टीला केवळ ट्रस्टच्या कामाकरिता पगार घेता येत नाही हेहि खरे. पण प्रस्तुतच्या विषयी वर्तमानपत्रे व छापखाना चालविण्याखेरीज ट्रस्टचे असे इतर कांही एक कामच नव्हते. काम होते म्हटले तर मिळकत सभाळणे इतकेच होते. अर्थात् ट्रस्ट विरहीत इतर सर्व काम संपादकाचे, व वर्तमानपत्रासबधी सर्व प्रकारची व्यवस्था ठेवण्याचे, त्याकरितां पगार घेतल्याशिवाय रहाणे शक्यच नाही. शिवाय मृत्युपत्र व ट्रस्टडीड या दोहोंतहि पगार घेण्याला अनुकूल अशी गमके आहेत. कारण मृत्युपत्रांत धोंडोपत विद्वांस यांना एक्झिक्युटर नेमले असतां म्हणजे त्यांना टेस्टेमेंटरी ट्रस्टी नेमले असतां त्यांनाच जन्मभर छापखान्याचे मॅनेजर ठेवावे व त्यांना एडिटर इतका पगार द्यावा असे टिळकांनीच लिहून ठेविले होते. ट्रस्टी हा एक्झिक्युटर असला तरी सामान्यपणे त्याला पगार घेता येत नाही. परंतु मृत्युपत्र करणाराने, म्हणजे टेस्टेमेन्टरी ट्रस्टी नेमणाराने च, त्याला पगार द्यावा असे लिहून ठेवले होते; व जो कोणी संपादक असेल त्यालाहि पगार द्यावा हे धोंडोपंत यांच्या पगाराच्या उल्लेखांतूनच निघणारे होते. शिवाय मुलांनी ट्रस्टडीड केले त्यांतच असे लिहिले आहे की, "मृत्युपत्र करणाराचे सर्व हेतु पूर्ण करण्याकरितांच ट्रस्टडीड करून ठेवीत आहो;...........पूर्वी चालल्याप्रमाणे

चालून मुले! आम्ही प्रौढ व अनुभविक! तेव्हां हरप्रयत्नाने त्याची समजूत काढणे हे आमचेच काम! आम्ही काय बोलन चालून परके बाहेरचे! संपादक किंवा ट्रस्टी झालो म्हणून काय झाले? मुलगे किती झाले तरी टिळकांचे वारस! टिळकांनीं ट्रस्ट करतांना लोकहितबुद्धि मनात ठेवली असली तरी आपणाला हवें तितकें बापानें ठेवलें नाही अशी तक्रार त्याच्या मुलांना सुचणे स्वाभाविक आहे तात्पर्य, आम्ही कोर्टांत दावा मांडणारे वाईट, व टिळकाचे मुलगे म्हणून ते मात्र चांगले किंवा निदान सहानुभूतीला पात्र," अशी लोकांची भावना उघड उघड दिसून येई. फार काय पण चांगल्या समजस लोकांनाहि सकृद्दर्शनी असे वाटे. ज्यांना आमच्याविषयी सहानुभूति वाटे असे लोक सुरुवातीला तरी फारच थोडे होते. कारण मुलींचा खरा स्वभाव परक्या माणसाला कसा कळणार? यामुळे ताईमहाराज केसमध्ये टिळक हे एका स्त्रीशी वाद घालीत आहेत या एका गोष्टीमुळे त्यांना नावें ठेवणारे जसे अनेक लोक सुज्ञ समाजांतहि निघाले, त्याचप्रमाणे आम्ही ट्रस्टींनी दावा मांडला तो टिळकांच्या मुलांविरुद्ध, केवळ एवढ्याच भावनेनें आम्हाला नांवे ठेवणारे लोक तसेच निघाले. पण ती वेळ अशी होती कीं, आम्हीच काय तें सर्व प्रकारचे गैरसमज, आक्षेप, अपवाद सोसावें, लोकांत मान खाली घालावी व न्यायकोर्टात उघड चर्चा झाली म्हणजे मग लोकमताचे पारडे फिरेल या दूरच्या आशेवर समाधान मानून दिवस कठावे व दैवप्राप्त कर्तव्य करीत राहावे, अशी पाळी आमच्यावर आली.

हे संकट खरोखरच बिनतोड होते. कारण मुलांच्या तक्रारीचा पारा दिवसे दिवस वर वाढत चालल्यामुळे केवळ त्याना काही पैसा देऊन हे भांडण मिटेल अशी स्थिति उरली नव्हती. ट्रस्ट रद्द करावा किंबहुना मृत्युपत्र खोटे म्हणावे, आणि केसरी-मराठा पत्रांची मालकी व व्यवस्था, अर्थात् त्या कारखानदारीत होणारा नफा, हा सर्व आपलासा करावा असेच मुलांच्या मनाने घेतले. इकडे आम्ही आमच्या प्रामाणिक समजुतीप्रमाणें ट्रस्ट पत्करून ट्रस्टी होऊन बसलो होतो, आपल्या समजुतीप्रमाणे मुलांचे सर्व देणे योग्य ते आम्ही देऊन टाकले होते. केसरी-मराठापत्रांविषयी, स्वतः आमच्याविषयी, आणि उलट मुलाविषयी खुद्द टिळकांच्या इच्छा काय होत्या हे आम्हाला पूर्णपणें माहीत होते; व डोळ्यापुढें हे विशेषतः दिसत होते की, आम्ही आपला अधिकार सोडून केसरी-मराठा मुलांच्या हाती दिल्यास त्यांची दुर्दशा ठेवलेली! लोकांना प्रिय वाटणाऱ्या व चाळीस

पंचेचाळीस वर्षे उत्तम स्थितीत चाललेल्या एका सार्वजनिक संस्थेचा नाश ठेवलेला! अर्थात् दंडेली, कपट, शठशाठ्यनीति ही तर राहोतच पण दिवाणी कोर्टात जाऊन निर्णय करून घेण्याचा साधा व सीधा मार्ग तोहि सोडून देऊन दुबळ्या-प्रमाणे ट्रस्ट सोडून बाजूला व्हावे ही गोष्ट आम्हांला कशी शोभली असती ?

असो. फिर्यादीचे काम सुरू झाल्यावर अपेक्षेप्रमाणे मुलांच्या कैफियती दाखल झाल्या. त्यांत आमच्यावर जे जे कांही आक्षेप म्हणून घेणे शक्य होते ते ते सर्व त्यांनी घेतले होते. पण पुढे त्यांचे त्यानाच हळुहळू असे दिसून येऊं लागले की, आक्षेप घेणे सोपे आहे पण पुराव्याने ते सिद्ध करणे हे कर्म महा-कठीण आहे !

अशा विवंचनेत ते असतां धाकटा मुलगा श्रीधर बापू याने असा एक अकल्पित प्रकार केला की, त्यामुळे आमच्या संकटांत अधिकच भर पडली. त्यावेळीं मी गोवे प्रांती हिंदुमहासभेच्या व मसूरच्या ब्रम्हचाऱ्यांनी केलेल्या शुद्धीच्या कार्यासंबंधाने गेलो होतो. तेथे एके दिवशी सध्याकाळी माझ्या हाती अवचित अशी तार आली की, "बापू टिळक याचे प्रेत भाँयुर्डा स्टेशनच्या बाजूला रेल्वेनजिक सांपडले." त्यावरून मला प्रथम कांहीच कल्पना होईना. एक वेळ वाटे की त्याचा स्वभाव तापट म्हणून किंवा त्याच्याजवळ खिशांत बरीच रक्कम असेल म्हणून कोणी त्याचा खून करून वहीम लपवण्या-करितां आगगाडीच्या रूळावर ठेवला असेल. त्याचे प्रेत रात्रीं सांपडले यावरून ही कल्पना झाली. तथापि दुसरे दिवशी सर्व खरी हकीकत कळली त्यावरून ती आत्महत्या होती यांत सशय राहिला नाही. परतु आत्महत्या तरी कशाकरितां या विषयी कल्पना चालेना. पहिली तार आल्यापासून मी गोवे येथील उरलेले सर्व कामकाज टाकून देऊन स्तंभित होऊन बसलो; व सवड होतांच परत निघून आलो. आत्महत्येच्या ऐवजी तो खून ठरता तर संशयाचे धागेदोरे इतर रीतीनें पसरावयाचे. परतु आत्महत्या असे निर्विवाद ठरल्याने आमच्यावरचे एक संकट टळले आणि एक आले. पण अपघाताची मीमांसा करितांना आम्ही उपस्थित केलेल्या दाव्याचे कारण जोडून आम्हाला लोक जो काय दोष देतील तेवढाच उरेल असे पाहून त्यांतल्या त्यांत समाधान वाटले.

"मरावयाचे तर फुकट कां मरा? प्रतिपक्षावर शितोडा उडवून मरावे" अशी मात्र श्रीधरबापूला वासना झाली असली पाहिजे. एरवी त्याने आत्महत्येपूर्वी

पुणे कलेक्टरला जे पत्र लिहिले ते लिहिले नसते. आतां या पत्रात त्याने आम्हा कोणाची नांवे घेतली नाहीत. वकील, कायद्याचे सल्लागार, न्याय देण्याविषयीं अविश्वास वाटणारी न्यायकोर्टे, इत्यादिकावर त्याने आपल्या मरणाची जबाबदारी ढकलली आहे. आम्ही केलेला दावा व त्याला आधारभूत असलेले कागद-पत्र हे त्याला खोटे म्हणता आले नाहीत, तरी आपण कोर्ट कचेरीच्या या कामांत जिकिरीला आलो असे या पत्रांत त्याने दर्शविले आहे. परंतु तीहि उपपत्ति सर्वस्वी बरोबर बसत नाही. कारण आमचा दावा कोर्टात दाखल होऊन सुमारे दीड वर्ष झाले होते. दोन्ही बाजूचे कागदपत्र दाखल करावयाचे ते करून झाले होते; व आतां फक्त तोंडी पुराव्याला सुरुवात व्हावयाची होती. हा पुरावा त्यांना न देतां आल्यामुळें दावा आम्हाला बहाल झाला असता तरी वास्तविक जीव देण्याइतके मुलाचे नुकसान त्यांत कांही नव्हते. कारण टिळकांच्या मृत्युपत्राप्रमाणे जितकी मिळकत जास्तीत जास्त त्यांना मिळावयाची ती सर्व आगाऊ मिळून चुकली होती, व ही मिळकत स्थावर जगम मिळून निदान दोन लक्ष रुपयाची होती. अर्थात् त्यांचा दावा बुडाला तरी त्याच्या एका पैशालाहि धक्का नव्हता. बरे, वर्तमानपत्रे हाती घेऊन ती चालवून त्यांत लौकिक मिळवूं अशीहि महत्वाकांक्षा त्यांनी कधी बाळगली नव्हती. अशा स्थितीत वकिलाला पैसे भरून झाल्यावर, दावा नुसता खेळवून आमच्यावर चार शितोंडे उडवावयाचे ते उडविण्याचे सुख घेऊन, शेवटी आमचें कांहीच नुकसान झाले नाही असे म्हणत व हसत त्यांना कोर्टबाहेर पडतां आले असते. बरे, मुलाच्या आग्रही व नापट स्वभावाप्रमाणेहि त्यांनी वास्तविक वाटेल ते झाले तरी दावा अखेरपर्यंत लढविण्यास दड थोपटून उभे राहावयास पाहिजे होते. पण बापूने तसा प्रकार केला व रामभाऊनी त्या प्रकाराचे नुसते कागदी निमित्त करून, बापूच्या मरणानतर अनेक महिन्यांनी, पुराव्यांत आपली धडगत लागत नाही असे पाहून यापुढे आपण काम चालवीत नाही, दाव्याचा निकाल एकतर्फी व्हावा, असे लिहून दिले.

तात्पर्य, दोघाहि बंधूनी आपापल्या परीने कांगावाच केला. पण बापूच्या मरणोत्तर त्याच्या घरी जे प्रकार घडले व ज्या प्रकारांचे पर्यवसान शेवटी श्रीधर-बापूच्या विधवेने मुलांना घेऊन घरांतून निघून जाण्यांत व वांटणीकरितां मुलां-च्यातर्फे कोर्टामध्ये दावा आणण्यात झाले, व या दाव्यांत रामभाऊची जी पत्रें दाखल झाली, त्यावरून श्रीधरबापूच्या आत्महत्त्येचे खरे कारण काय असावे याची

कल्पना लोकांना हळुहळू परस्पर येऊ लागली. बापूची आत्महत्या झाल्याबरोबर आमच्या प्रतिपक्षीयानी वर्तमानपत्रांत आमच्यावर हल्ले चढवून, त्या मुलाची ती आत्महत्या नसून आम्ही ट्रस्टीनी केलेला तो नैतिक खून होता असे म्हणण्यास कमी केले नाही! परतु आपल्यावरील आक्षेपाचे निरसन दमाने घेतले असतां आपोआप हळुहळू परस्पर होत असते असा माझा अनुभव व विश्वास असल्यामुळे आम्ही एका शब्दानेहि त्या टीकेला उत्तर दिले नाही. असो. शेवटी पुणे फर्स्ट क्लास कोर्टात दाव्याचा निकाल सर्वस्वी आमच्या तर्फे लागला. मृत्युपत्र ट्रस्टडीड वगैरे सर्व कागद शपथ पुराव्याने शाबीत झाले. आम्ही मागितल्या त्या बहुतेक ताकिदी देण्यांत आल्या. आमचा खर्चहि कोर्टाने देवविला. यावर पुढे मुलानी मुबई हायकोर्टाकडे अपील केले, पण त्यातहि आम्हालाच यश येऊन न्यायमूर्ति पाटकर व न्या. ब्रमफील्ड यांनी प्रत्येक कागदपत्राची छाननी करून ते शाबीत ठरविले. ते कागद आम्ही कपटाने करून घेतले अशा अर्थाचे आक्षेप निर्मूल ठरविले. आणि न्या. ब्रूमफील्ड यांनी तर असे स्पष्ट लिहिले की "ट्रस्टीनी मुलाना त्रास दिला किवा छळ केला हा आक्षेप खोटा असून उलट मुलानीच ट्रस्टीना पद्धतशीर रीतीने व मनांत एक प्रकारचे धोरण ठेवून चिमटे काढकाढून ट्रस्टीचाच छळ केला."

न्या.मू.च्या या एका वाक्याने आठनऊ वर्षे भोगलेल्या आमच्या दुःखाचा परिहार झाला असे वाटले. कारण कोर्टाचा अखेर निकाल होईपर्यंत कोणाच्या टीकेला उत्तर म्हणून द्यावयाचे नाही असा निश्चय करून आम्ही ओठ दाबून व लेखणी आखडून बसलो होतो. परतु सुदैवाने केसरीचा ज्युबिली अंक काढण्याचे आधी कांही दिवस हायकोर्टाचा निकाल झाल्यामुळे त्या अकात आम्ही ट्रस्टसबधी सर्व कागदपत्र व पैशाच्या व्यवहारासबंधी सर्व हकीकती सविस्तर छापून लोकांच्या हाती देऊन मोकळे झालो. ते वाचून, उशीरा का होईना, पण आमच्या टीकाकाराना मान खाली घालावी लागली. आणि तसे बाहेर बोलण्याइतका प्रामाणिकपणा त्यांच्या अंगी नव्हता तरी त्यांना मनांतून खजिल व्हावे लागले. परंतु एक प्रकारच्या अज्ञातवासांत, म्हणजे आपल्याच हाताने आपले तोंड दाबून बसण्यांत, जे आमचे दिवस गेले ते फार कष्टाचे गेले. कारण अपवाद खोटा ठरेपर्यंत होता तो फारच मोठा होता! आमची बाजू पुढे माडावी तर कोर्टात खटले चालू आहेत. अखेर निकाल झाला नाही या कारणाने आमचे वकीलच आम्हाला कोणतीहि हकीकत केसरीतून छापून प्रासिद्ध करू देईनात. आक्षेपक व निदक यांच्यावर मात्र ही जबाबदारी कांहीच नसल्यामुळे

त्यांचे तोंड नेहमी उघडे राही. आणि आम्ही उत्तर देत नाही या गोष्टीचा आधार घेऊन ते जित जित असे म्हणून कोलाहल करील !

केसरी ट्रस्टसबंधीं झालेल्या उलटसुलट दाव्यांच्या कामीं आम्ही ट्रस्टींनीं आमचे मित्र रा. लक्ष्मणराव भोपटकर यांना वकीलपत्र दिले होतें. त्यांनीं 'केसरी प्रबोध' नामक ग्रंथांत या सर्व प्रकरणाची छाननी व फोड फार सूक्ष्म रीतीने केली आहे ती वाचकांनी अवश्य पहावी. येथे त्यांच्या लेखांतील अगदीं मुद्याचे असे दोन तीन परिच्छेद या खाली देत आहे त्यांवरून आमच्यावरील तेव्हांच्या संकटाची कल्पना वाचकांना येईल. रा. भोपटकर लिहितातः—

"लोकमान्यांच्या पश्चात् टिळकबंधूंना सुमारें अडीच तीन लाखांची मिळकत मिळाली. तिचा तपशील ज्युबिली-अंकांत दिलेला आहे. लोकमान्यांच्या अनुयायांनी त्यांना सुमारें तीन लाखांचा जो 'पर्स-फंड' अर्पण केला तो केला नसता, तर चिरंजीवांना मिळकत मिळाली असती शून्य! लोकमान्यांच्या पश्चात् लवकरच दोघां बंधूनी शिक्षणक्रम आंखडता घेतला. दोन्ही भावांचा स्वभाव फारच खर्चीक असल्याकारणानें त्यांना मिळालेल्या मिळकतीला ओहोटी सुरू झाली. जवळचा बराचसा रोकड पैसा घरावर खर्च केला; याशिवाय खर्चास अनेक तोंडे पडली होती ती निराळीच ! साहजिकपणे पैशाची अडचण भासू लागल्यावर त्यांची दृष्टि केसरी ट्रस्टकडे वळली, व त्यांना वाटू लागले असावे की, हे बरें घबाड आहे. येथें जर युक्तिप्रयुक्तीने आपला शिरकाव करून घेतां आला, तर आपली उत्तम सोय होईल; आणि त्या दिवसापासून त्यांनी ट्रस्टीवर हत्यार उपसलें ! व वेळेला सुचतील तसले सुसगत विसंगत आरोप ट्रस्टीवर बिनदिक्कत करण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नाही ! एवढेच नव्हे तर ट्रस्टीबरोबर आपल्या मेव्हण्यांनाहि भरडून काढण्यास कमी केले नाही ! आपण लोकमान्याचे चिरंजीव असल्यामुळे व एका दृष्टीने त्यांच्या थोरपणावर आरूढ झाल्याकारणाने ते स्वतःस फारच मोठे समजू लागले. त्यांतच केसरीविरुद्ध असलेल्याची त्यांना भर मिळाली. मग काय विचारतां ? बोलण्या चालण्यांत, लिहिण्यांत तर त्यांनी जवळजवळ 'हुतात्म्या' चेच अवसान आणले ! ट्रस्टीनी व त्यांच्या प्रत्यक्ष मेव्हण्यांनी त्यांना फसवून ट्रस्ट-डीड वगैरे कागदपत्र त्यांच्याकडून करून घेतले ही गोष्ट जर खरी होती, तर ते रद्द ठरवून घेण्यासाठी त्यांनी ट्रस्टीवर व मेव्हण्यांवर दावे का केले नाहीत ? अजागळा-

पारखे अगदीच स्वस्थ कां बसले ? दाव्याच्या खर्चास त्यांच्याजवळ पैसे होते. व बरावाईट सल्ला देण्यास सल्लागारहि काही थोडेथोडके नव्हते. त्याना कोर्ट-दरबारचा अनुभवहि कांही कमी नव्हता. बरे, हेहि जाऊ द्या. ट्रस्टींनी लाविलेल्या फिर्यादीत हे कागदपत्र रद्दबातल ठरवून घेण्याची संधि त्यांना अनायासें प्राप्त झालेली होती. मग तिचा फायदा घेऊन ट्रस्टींची व मेव्हण्यांची लबाडी कोर्टा-कडून शाबीत करून घेण्याऐवजी ऐनवेळी माघार ती काय म्हणून घेतली ? यांतले इंगित असे की, कागदपत्रासंबंधीची तक्रारहि त्यांना वास्तविक करावया-चीच नव्हती, तर त्या तक्रारीच्या पांघरुणाखाली ट्रस्टच्या क्षेत्रांत जर आपला हात घुसविता आला तर तो त्यांना पाहिजे होता !

“ केसरी-मराठा सस्थेसबंधाने पुण्याच्या दिवाणी कोर्टांतून मु. न. १२६४/१९२७, मु. न. १८८७/१९२७ व मु. न. २०२/१९२८, असे एकदर तीन दावे चाललेले होते. यांपैकी पहिला दावा वरील सस्थेचे ट्रस्टी केळकर व विद्वांस यांनी लोकमान्यांचे चिरजीव रामभाऊ टिळक व कै बापूराव टिळक यांच्यावर लावलेला होता, तर बाकीचे दोन टिळकबधूंनी ट्रस्टीवर लाविलेले होते. हे दोन्ही दावे रामभाऊ यांनी पुढें काढून घेतले ! ट्रस्टींच्या दाव्याचा निकाल सन १९२९ च्या मार्च महिन्यांत पुणे कोर्टांत ट्रस्टींच्या वतीने झाला. त्यावर रामभाऊ यांनी स्वतःतर्फे व कै.बापूराव यांच्या अज्ञान मुलांतर्फे नामदार हायकोर्टात न. १९०/१९२९ चे अपील केले होतें. याचाहिं निकाल ट्रस्टींच्या तर्फेने झालेला आहे.

“ ट्रस्टींनी आपला दावा ता. १६ ऑगस्ट १९२७ रोजी दाखल केला, व त्याचा निकाल ता. ७ मार्च १९२९ रोजी झाला; या दरम्यानच्या काळांत व नंतरहि या दाव्याकडे महाराष्ट्राच्या जनतेचे लक्ष अनेक दृष्टींनी वेधून गेलेले होते, यांत कांही संशय नाही. लोकमान्य, त्यांची परपरा व त्यांनी निर्माण केलेला ट्रस्ट, यांच्याबद्दल भक्ति व अभिमान बाळगणाऱ्या लोकांना, ट्रस्टींना ट्रस्टच्या बाबतीत दावा करण्याचा व तोहि लोकमान्यांच्या चिरंजीवांवर करण्याचा प्रसंग यावा, याबद्दल मनांतून वाईट वाटणे अगदी साहजिक होते. ट्रस्टींना तर मरणप्राय दुःख वाटत होते ! परंतु करतात काय बिचारे ! एक तर दावा करून ट्रस्टचे जतन तरी करावे, नाहीतर स्वस्थ बसून डोळ्यांदेखत ट्रस्टचा नाश खुशाल होऊ द्यावा, अशा अत्यंत बिकट पेचांत ट्रस्टी सांपडलेले होते. परंतु

अखेर स्वकर्तव्याला जागून त्यांनी योग्य त्या मार्गाचाच अवलंब केला, याबद्दल टिळकभक्त त्यांना केव्हाहि दुवा दिल्याशिवाय खचित रहाणार नाहीत. आपण हा दावा केल्यानतर, लोकमान्याचे, त्यांच्या परपरेचे व ट्रस्टींचे प्रकट वा प्रछन्न शत्रु या गोष्टीचा पूर्णपणे गैरफायदा घेऊन, लोकमान्य, ट्रस्टी, किंबहुना महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्ष, यांच्यावर एकच काहूर उसळून देण्यास चुकणार नाहीत, याची जाणीव ट्रस्टींना नव्हती असे नाही. दुसऱ्या एखाद्या कच्चया दिलाच्या ट्रस्टींनी हा मार्ग पत्करण्यास बहुधा अळमटळमच केली असती ! परतु सुदैवाने ट्रस्टींच्या ठिकाणी तात्यासाहेब केळकर व बाबासाहेब विद्वांस यांच्यासारखे खबीर मनाचे गृहस्थ असल्याकारणाने, त्यानी योग्य व आवश्यक अशा मार्गाचाच अंगिकार केला; व त्यांनी दाखविलेल्या या मनोधैर्याबद्दल कोणीहि निःपक्षपाती मनुष्य केव्हांहि त्यांचे कौतुकच करीत राहील !

" एकीकडे वरीलप्रमाणे वस्तुस्थिति होती, तर दुसरीकडे कित्येक विघ्न-संतोषी लोकांना पूर्वोक्त दावे दाखल झाल्यानंतर आनदाच्या उकळ्या फुटू लागल्या. पूर्वीच्या वैराचा सूड उगविण्यास, नाही तर केसरी सस्थेवर धोपाट्या घालण्यास ही उत्तम सधि आहे असे पाहून पुणेमुंबईच्या लेखकानी व पत्रकारानी दोन तीन वर्षेपर्यंत ट्रस्टीवर जे तोंडसुख घेतले, त्याला तर सीमाच नव्हती ! हा धांगड-धिंगा घालण्यांत निरनिराळ्या लेखकांचे निरनिराळे हेतू होते. कोणास ट्रस्टींच्या नांवाखाली लोकमान्याच्या स्मृतीवर तडाखे लगवावयाचे होते, तर कोणास ट्रस्टी ब्राह्मण म्हणून त्यांची बदनामी करावयाची होती; कोणास ट्रस्टी सारस्वतव्यतिरिक्त ब्राह्मण-विशेषतः कोकणस्थ ब्राह्मण—म्हणून त्यांना निंदावयाचे होते, तर कोणास केसरी प्रतिसहकारित्वाचा पुरस्कर्ता म्हणून त्यावर घाव घालावयाचे होते; कोणास तात्यासाहेबांचा बोलबाला सहन होत नव्हता म्हणून त्यांचा पाणउतारा करावयाचा होता, तर कोणास या सधीतून जमल्यास स्वतःचा लग्गा साधून घ्यावयाचा होता म्हणून तो धूमधडाक्यात सामील झालेला होता ! साराश, प्रत्येक लेखक कांही तरी विशिष्ट हेतूने प्रेरित होऊन त्याने दोनतीन वर्षांच्या अवधीत मनःपूत असे लिखाण केले ! या सर्व लिखाणांत अर्थात् सभ्यपणास फांटा देण्यांत येऊन बाष्कळपणास जसा काय ऊत आलेला होता ! असे करण्यांत या लेखकांना टिळ-कांच्या चिरंजीवांबद्दल प्रेमाचा मोठा पान्हा फुटत होता असे नव्हे ! सगळ्यांची मनोवृत्ति एकच की, तिकडे ते ट्रस्टी मरोत, नाहीतर चिरंजीव मरोत, कैक

दिवस पोटांत ढवळत असलेले विष बाहेर ओकून टाकण्याची जी संधि प्राप्त झाली आहे, ती व्या घालवा का ? त्यातच मधून मधून श्री. रामभाऊ व के. बापूराव हे आपल्या स्वतःच्या लेखांची व मुलाखतींची भर घालण्यास चुकत नसत ! परतु ट्रस्टी हे माझे पक्षकार व मी त्यांचा वकील असल्यामुळे हायकोर्टांत दाव्याचा निकाल होईपर्यंत कोणत्याहि टीकेला कसलेहि उत्तर द्यावयाचे नाही अशी मी ट्रस्टींना मनाई केलेली होती, व मला लिहिण्यास आनंद वाटतो की, ती त्यांनी अक्षरशः अमलांत आणिली. चौफेर टीकेचा भडका उडालेला असतांना ट्रस्टींनी त्याबद्दल कोठेहि अवाक्षर काढले नाही किंवा लिहिलें नाही, याचे कारण ही माझी मनाईच होय ! हायकोर्टाचा निकाल लागेपर्यंत या बाबतींत ट्रस्टींना मूकवृत्ती धारण करण्यास लावण्यांत जर कदाचित् कोणाचा दोष असलाच, तर तो सर्वस्वी माझाच आहे ! माझ्या या मनाईमुळे ट्रस्टींना दोन तीन वर्षेपर्यंत अनंत मानसिक यातना सहन कराव्या लागल्या याची मला पूर्ण जाणीव होती व आहे. तथापि, कोर्टांत दावा चालू असेतोपर्यंत वर्तमानपत्रांतून या वादाचा खल करणे व दाव्यांतील पुराव्याची विरी घालवून टाकणे चांगले नव्हे असे वाटून मी केलेली मनाईच इष्ट होती, असे अद्याप मला वाटते."

असो. १९१० साली मी केसरीचा कायम संपादक झाल्याने माझ्या अधिकारयोगाचा पूर्वार्ध झाला असे म्हणता येते. तसेच १९२० साली मी केसरी-संस्थेचा ट्रस्टी झाल्याने त्या अधिकारयोगाचा उत्तरार्ध पुरा झाला असें म्हणण्यास हरकत नाही. तथापि ट्रस्ट प्रकरण कोर्टांत जाऊन अखेर १९३० साली ते कायमचे संपले यामुळे हा उत्तरार्ध १९३० सालीच खरा संपला असेंहि म्हणतां येईल. या दृष्टीने ट्रस्टच्या दाव्याच्या निकालापर्यंतची हकीकत याच प्रकरणांत दिली आहे. १९३० पासून पुढे १९३७ च्या आगष्ट महिन्यापर्यंत मी ट्रस्टींचा अधिकार सर्वस्वी निर्विवाद अशा मनस्थितीत भोगला. आणि त्यानंतर तो अधिकार केवळ स्वेच्छेने सोडून, आतां शुद्ध निरुपाधिक प्रेम व ममत्व या दृष्टीनें केसरी संस्थेकडे दुरून किंवा जवळून पहाण्याचा आनंद मी भोगीत असतो. म्हणून मला स्वतःला यापुढे फार दिवस आयुष्य लाभले नाहीं तरी ते केसरी संस्थेला लाभावें अशी प्रार्थना आहे.

# सिंहावलोकन (२)

## १९२० ते १९३८

### (१) असहकारिता पर्व

सन १८९६ पासून १९२० पर्यंत केसरीचा, किंवा मराठ्याचा, किंवा दोहोंचा संपादक म्हणून मधून मधून असल्याने, मी एकप्रकारे राजकारणांतच होतो. १९१४ साली टिळक मंडालेहून परत आल्यापासून संपादकापेक्षाहि टिळकांचा राजकारणांतील मदतनीस, चिटणीस, किंवा मुखत्यार अशा निरनिराळ्या नात्यांनी मला राजकारणांत प्रत्यक्ष भाग घ्यावा लागला. तथापि १९२० पर्यंत मी जो भाग घेतला त्याला 'स्वतंत्र' असे विशेषण केव्हांहि लावतां येण्यासारखे नव्हते हे उघड आहे. स्वतःचे वेगळे कांही सुचवावे, चर्चा करावी, किंवा वेळी थोडाबहुत मतभेदहि दर्शवावा इतके करण्याला मला वाव होता. तसा वाव मी आपण होऊन घेत असे व टिळकहि उदारपणे तो देत असत. परंतु शेवटी मी जे कांही लिहावयाचे, बोलावयाचे, करावयाचे ते टिळकांच्या मुख्य धोरणाला अनुसरून असले पाहिजे हे क्रमप्राप्तच होते.

विलायतेहून परत आल्यावर १९२० साली सोलापूर येथील प्रांतिक परिषदेचा अध्यक्ष या नात्याचा अधिकार चार दिवस मला आला तेवढ्यापुरता मी स्वतंत्र आहे असे मला म्हणतां आले. आणि मतभेदाच्या वादविवादांत ही माझ्या मनाची भूमिका परिषदेतील लोकांच्या प्रत्ययाला आल्याशिवाय राहिली नाही. तथापि माझे स्वातंत्र्य गाजविण्याकरिता परिषदेत वावगे असे मी कांही केले नाही. चार वेगळ्या मताचे लोक परिषदेसारख्या ठिकाणी एकत्र आले असतां, तिचा अध्यक्ष हा कोणत्याहि एका पक्षांतून निवडला असला तरी, कायदे कौन्सिलच्या अध्यक्षाप्रमाणे त्यालाहि म्हणावे लागते की "या वेळेपुरता मी माझ्या पक्षाचा नाही. सर्वांचाच आहे." आणि हे असे नुसते वरकरणी बोलून भागत नाही, तर न्यायबुद्धीला अनुसरून थोडेबहुत करावेंच लागते. सोलापुरास मी तसे केलेहि. पण या परिषदेनंतर अवघ्या तीन महिन्यांतच टिळक निवर्तले, आणि तेथपासून राजकारणांतील स्वतंत्र अशा माझ्या कार्याचा प्रारंभ झाला.

वास्तविक राष्ट्रीय राजकारणात स्वतंत्र असा कोणीच नसतो. कारण राजकारण हे संघटित असते. आणि प्रत्येकाच्या स्वातंत्र्याला, तशाच स्वातंत्र्याचा हक्क

असणाऱ्या, इतरांच्या स्वातंत्र्याची मर्यादा पडते. पण मी वर जे स्वतंत्र राजकारण म्हटले ते थोडेसे केवळ महाराष्ट्र डोळ्यापुढे ठेवून. टिळकानंतर महाराष्ट्रांतील राजकारणाचे पुढारीपण ओघानेच मजकडे आले. या वेळी मला तुल्यबल असा प्रतिपक्षी किंवा प्रतिस्पर्धी दुसरा कोणी नव्हता. टिळकांनी विलायतेला मलाच सहाय्यक म्हणून नेले. होमरूल लीगचा चिटणीस मीच होतो. केसरीचे संपादकत्व मजकडेच होते. प्रांतिक परिषदेचा अध्यक्ष मलाच निवडले. त्यापूर्वी कॉंग्रेसचा एक चिटणीस म्हणून माझीच निवडणूक १९१८ साली झाली. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाचा व्यवस्थापकहि मलाच नेमण्यांत आले. आणि १९२५ साली कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाकरितां माझे एकच नांव कित्येक प्रांतांकडून सुचविण्यांतहि आले होते. या सर्व गोष्टीवरून त्यावेळी महाराष्ट्राचे पुढारीपण मजकडे होते हे दिसून येतच होते. इतकेच नव्हे तर पुढे असहकारितेचे धोरण कॉंग्रेसने स्वीकारल्यावरहि, कॉंग्रेस वर्किंग कमिटीत महाराष्ट्रातर्फे मीच एक सभासद निवडला गेलो. आणि राष्ट्रीय सभेची नवीन अशी पहिली घटना तयार करण्याचे काम विठ्ठलभाई पटेल यांच्याबरोबर गांधींनी मजकडे सोपविले, यावरून देखील महाराष्ट्राचे राजकीय पुढारीपण त्यावेळीं मजकडे होते ही गोष्ट दिसून आल्याशिवाय रहात नाही.

पण स्वतंत्र राजकारण करण्याच्या पहिल्याच प्रसंगी एकदम माझ्या वाटेत असहकारितेचा डोंगर उभा राहिला. आणि तो आतां कसा चढून उतरून जावयाचा याच्या निर्णयाने माझ्या स्वतत्वबुद्धीच्या परिक्षेची वेळ झाली. यापुढील सतरा वर्षांत मी स्वतंत्रपणे काय केले हे सांगण्याबरोबर इतर अनेकांशी मिळून काय केले हे सांगणेहि तितकेच यथार्थ होईल. त्या सर्वांचा संकलित वृत्तांत पूर्वी दोन निरनिराळ्या रीतीने दोन निरनिराळ्या ग्रंथात मी प्रसिद्ध केला आहे. पहिला ग्रंथ "गेली पांच वर्षे" या नावाचा असून, त्यात १९२६ पर्यंतचा विषय आला आहे. आणि दुसरा ग्रंथ म्हणजे "समग्र केळकर वाङमय" या १२ खंडाच्या ग्रंथांतील पांचवा म्हणजे "असहकारिता खंड". हा सुमारे १२५० पानांचा असून, त्यात १३ ऑगस्ट १९३७ पर्यंतची याच विषयावरची हकीकत दिली आहे. या विषयावर इतके लिखाण माझ्या हातून आधीच लिहून झाल्यामुळें येथें पुनः निराळें म्हणून कांहीं लिहिण्याला मन व बुद्धि दोन्ही सहजच बोथट झाली आहेत. नवें असे कांही लिहिण्याला नाही, व पुनरुक्तिचा कंटाळा येतो. तथापि त्या ग्रंथांतील लिखाण एका दृष्टीनें, म्हणजे

व्यक्तिविषयक टिपणाच्या दृष्टीनें, अपुरे आहे. त्यातील पुष्कळसे लेख केसरीतील लेख असल्यामुळे त्यातून व्यक्तिविषयक भाग माझा किंवा इतराचाहि सहजच गाळून टाकावा लागला. शिवाय आत्मचरित्ररूप गतगोष्टींचा ग्रंथ म्हटला म्हणजे त्यांत हा विषय यथाप्रमाण येणारच. म्हणून आवश्यकता व सोय ही दोन्ही डोळ्यापुढे ठेवून प्रस्तुत एकाच प्रकरणांत हा सर्व विषय त्रोटक पण नव्या रूपाने मांडणार आहे.

अत्यंत महत्त्वाच्या अशा सतरा वर्षांतील अत्यत महत्त्वाचा असा हा वृतांत असतांहि, त्याला मी देत आहे याहून अधिक वाव देता येत नाही. यावरूनच माझी खरी अडचण वाचक लक्षात घेतील अशी मला आशा आहे.

असहकारितेशी महाराष्ट्राचा झगडा १९२० साली सुरू झाला तो १९३६ सालापर्यंत टिकला. महाराष्ट्राचा या झगड्यांत जितका संबध आला तितकाच सूत्ररूपाने या खाली देतो. मात्र महाराष्ट्राचा म्हणून जो संबध सांगितला तो या झगड्यापुरता व्यक्तिशः माझाहि आहे असे म्हणतां येईल.

महाराष्ट्रांत माझे पुढारीपण इतर कोणत्या दृष्टीने कोणी मानो वा न मानो परंतु हा झगडा इतकी वर्षे चालविल्याबद्दल ज्या अर्थी गांधींचे अनुयायी मलाच दोष देतात त्या अर्थी ह्या झगड्यांत शेवटी मिळालेले यश माझ्या पदरांत टाकावे हें ओघानेच प्राप्त होते. हा झगडा चालविणे ही जर काहींच्या मते माझी चूक होती, तर असहकारितेचा विरोधी पुढारी मीच ठरतो. आणि हे पुढारीपण मी सोळा वर्षें चालवून गांधी-विरोधाचे निशाण माझ्या हाती ठेवले हे कांहींच्या मते मला भूषणास्पद झाले आहे. सोळा वर्षांच्या अंती असहकारिता मागे पडून प्रतिसहकारितेचे तत्त्व उदयास आले याचे श्रेय गांधीभक्त मला न कां देईनात, परंतु त्या तत्त्वाचा त्यांनी आतां अंगीकार केला यांतच मला समाधान वाटते." आपण चुकी करीत होतो व दुसरा बरोबर होता " हे कोणत्या राजकीय पक्षाने आपल्या प्रतिपक्षाविषयी जगांत आजवर कबूल केले आहे ? म्हणून तो वाद सोडून देऊन महाराष्ट्रापुरता असहकारितेचा षोडशवर्षात्मक वृत्तांत तेवढा सूत्ररूपाने खाली देतो. तो असा :—

मोहनदास गांधी यानी दक्षिण आफ्रिकेत सत्याग्रहाच्या तत्त्वाचा प्रथम उपयोग केला, तो प्रयोग जगाच्या डोळ्यांत भरण्यासारखा झाला. परतु त्यांतून फारशी फलश्रुति पदरांत पडली नाही. इतकेच नव्हे, तर त्या चळवळीच्या अखेर

तीत सामील झालेल्या लोकांमध्ये दुमत झाले, आणि प्रतिपक्षाच्या हातून गांधीना प्रत्यक्ष मार खावा लागला. शिवाय एखादी चळवळ सुरू करावयाची आणि ती अनपेक्षित रीतीने लहरीपणाने मागे घ्यावयाची हा गांधीच्या स्वभावांतील दोष या सत्याग्रहाच्या चळवळीत दिसून आला. त्या चळवळीचे बीज मनात ठेऊन गांधी इकडे आले. परतु पुढे पांच सहा वर्षेपर्यंत साम्राज्यविरोधी चळवळ अशी त्यानी कांही केली नाही. उलट पूर्वी बोअर युद्धाप्रमाणे गेल्या महायुद्धांतहि त्यांनी साम्राज्याला मनोभावाने मदत केली. हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनी बिहार प्रांतांत चंपारण्यामध्ये प्रथम राजकीय चळवळ केली, ती साम्राज्य विरोधी नव्हती. परतु सरकारी आज्ञाभंगाचे तत्त्व या चळवळीत त्यानी अनुसरल्यामुळे तिला तीव्र राजकीय स्वरूप आले. सरकारनेहि यांत भर घातली ती अशी की, गांधीच्या हालचालीना ठिकठिकाणी विनाकारण प्रतिबंध केला. आणि तो प्रतिबध न जुमानण्याचा क्रम गांधीनी ठेवल्यामुळे घर्षण उत्पन्न झाले. लोक मोठमोठ्या समुदायांनी सभा भरवूं लागले, सरकारचा निषेध करू लागले, त्याला प्रतिबध होऊं लागला, त्याचे निवारण करण्यांत कांही अत्याचार झाले, त्यांना सरकारने सहेतुक रीतीने विकृत स्वरूप देऊन बेसुमार दडपशाही केली व उलट अत्याचार केले. तथापि गांधीच्या चळवळीला अद्यापि असहकारितेचे रूप आलेले नव्हते.

ही स्थिति १९१९ मध्ये अमृतसर येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेपर्यंत टिकली. परंतु पुढे गांधीना काय लहर आली कोणास ठाऊक, त्यांनी सत्याग्रहाचे रूपांतर सार्वत्रिक असहकारितेत केले. लो. टिळकांना असहकारितेचे तत्त्व मुळीच मान्य नव्हते. व हे त्यांचे मत त्यांनी आपल्या मृत्यूपर्यंत एकसारखे प्रगट करण्याचे चालूं ठेवले होते. पण कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेत असहकारितेचा ठराव अनपेक्षित रीतीने मंजूर झाला. खिडीत गांठल्याप्रमाणे गांधींनी कॉंग्रेसनिष्ठेचे हत्यार तिच्या भक्तांवर चालवून, त्यांच्यावर असहकारिता लादली. वास्तविक ते स्वतः राष्ट्रीय सभेशी कधी निष्ठावत नव्हते व नाहीत. आपलें म्हणणे कॉंग्रेसला पटविण्यापूर्वींच त्यांनी व्यक्तिशः अधिकारावर असहकारितेचा फैलाव सुरू केला होता, व जादा राष्ट्रीय सभेने ती गांधीपासून दत्तक घेतली.

गांधींपेक्षांहि महाराष्ट्राची कॉंग्रेसनिष्ठा अधिक प्रबल, म्हणून कलकत्त्याच्या सभेचा ठराव महाराष्ट्राने मान्य केला. पण तसे करतांना आपण तो ठराव निष्ठेच्या

जुलमाने मान्य करीत आहो अशी घोषणाहि केली. आणि त्याप्रमाणे अवघ्या १।–१॥ वर्षातच महाराष्ट्राने असहकारितेविरुद्ध आपला मतप्रचार सुरू केला. वसई, पेण, येथे भरलेल्या परिषदातून महाराष्ट्राच्या विरोधाने प्रथम थोडेसे डोके वर काढले. पण पुढे लवकरच अकोला परिषदेत असहकारितेविरुद्ध आपले निशाण उभारले. स्वतः गांधीचे स्वभावदोषहि या विरोधी चळवळीला उपकारकच ठरले. असहकारितेने एक वर्षात स्वराज्य मिळविण्याची त्याची घोषणा निष्फळ ठरून त्या घोषणेची थट्टा जनतेला उघडपणे करतां येऊ लागली. लॉर्ड रीडिंग यांनी सामोपचाराची तयारी दर्शविली असता ती आपल्याच तोंड्यात झिडकारून आपल्याजवळ मुत्सद्देगिरी नाही हे जसे गांधीनीं प्रगट केले, तसेच बार्डोलीचा बार विनाकारण भरून तो फुसका ठरवून, भलते कारण भलत्याला लावून, पूर्वी सांगितल्याप्रमाणे "चळवळ करण्याला उशीर नाही व ती मागे घेण्यालाहि उशीर नाही" हा जो आपला स्वभावदोष तो गांधीनी पुनः एकवार जगाच्या प्रत्ययाला आणला. अवघ्या दीड वर्षात सरकाराने गांधीचे पाणी ओळखले व त्यांच्या अंगावर हात टाकला. म्हणजे त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरून सहा वर्षाची शिक्षा दिली. यामुळे जगात गांधींचे नाव झाले. पण असहकारितेचे तत्त्व यशस्वी झाले असे मात्र जगाने मानले नाही.

पण जगानेच कशाला? खुद्द गांधीच्या अनुयायातहि ही चळवळ आहे तशीच चालविण्याविषयी मतभेद दिसून आला. कायदेभंग थांबवावा अशा सूचना पुढे येऊन त्याचा विचार करण्याकरिता कमिटी नेमण्यांत आली. तिने सर्व देशभर दौरा काढला. कमिटीच्या सभासदात अखेरचा निर्णय करताना मतभेद झाला. निम्या लोकांनी कायदेकौंसिलावरील बहिष्कार उठवावा अशी शिफारस करून असहकारितेच्या तत्त्वाचे कबरडे मोडले. पण स्वतः गांधी कांही केल्या आपला हट्ट सोडीनात आणि त्यांना गुरुबोवा मानणारे काही अंधभक्त मिळाल्यामुळे, नाफेर-वाल्यांचा म्हणून एक वेगळा कपू तयार झाला. नामांकित व महत्त्वाचे असे पुढारी, गांधीचे अनुयायी म्हणविणारापैकीहि, फेरवाल्या पक्षात समाविष्ट झाले. गांधींना विधायक कार्यक्रमाशिवाय दुसरे कांही राजकारण उरले नाही; व ते तेव-ढेच घेऊन एका बाजूस उदास व रजीस असे होऊन बसले. तथापि खुद्द राष्ट्रीय सभेकडून कौंसिलप्रवेशाला आज्ञा मिळविण्याची वेळ अद्यापि आली नव्हती. म्हणून नाफेरवाल्या गांधीभक्तानी उपेक्षावृत्ति दाखवावी, आणि फेरवाल्या गांधीभक्तांनी

भक्त नसलेल्या अशा इतर पक्षांशी मिळून कौसिलप्रवेश करावा, मात्र नाफेर-वाल्याना त्यात ओढूं नये, असा एकप्रकारचा तह उभयतांमध्ये ठरला. (१९२४)

फेरवाल्या कौसिलवादी लोकांनाहि स्वतःला कॉंग्रेसवाले म्हणवून घेण्याचा हक्क होता. तो नाफेरवाल्यांना नाकबूल करता येत नव्हता. म्हणून इकडे गांधी कौसिलप्रवेशाला मनाने प्रतिकूल असतां त्यांनी फेरवाल्यांकडे कानाडोळा करावा, आणि फेरवाल्यांनी गांधीच्या विधायक कार्यक्रमाला समतीचा करभार देऊन कौसिलप्रवेशाचे आपले कार्य साधावे अशी तडजोड ठरली. या तडजोडीतून स्वराज्य पक्ष निर्माण झाला. त्याने देशभर निवडणुकी जिकून प्रातिक व वरिष्ठ कायदे-मंडळात आपले प्रस्थ बसविले. पुढे कौसिलातील कार्य करतांना सहजच त्याच्या अनुभवाला असे आले की, "सरकाराला अडथळा करण्याची इच्छा खरीच व राष्ट्रीय बुद्धीने सरकाराला विरोध करकरूनच पाऊल पुढे पडावयाचे; पण या विरोधी साहचर्यात साधेल तेथे देशहित पदरांत पाडून घेताना सरकाराशी सहकारिताहि करावी लागल्यास तेवढ्यापुरती ती सदोष मानू नये." याचा अर्थ कॉंग्रेस स्वराज्य पक्षाच्या निशाणाच्या एका बाजूला " अडथळा व विरोध " अशी अक्षरे लिहिली असली तरी त्याचेच प्रतिशब्द म्हणून दुसऱ्या बाजूला " प्रतिसहकारिता " ही अक्षरे लिहिलेली होती.

सरकारने नेमलेल्या मडळातून, कमिट्यातून, कार्यसाधूपणाने प्रवेश कर-ण्याला स्वराज्यपक्षाने हळुहळू सुरुवात केली. (१९२५) यानतर सरकारने एखादी मोठी अधिकाराची जागा लोकपक्षांतील पुढाऱ्याना दिली असता तिचाहि उपयोग याच कार्यसाधू दृष्टीने करावा की नाही असा एक वेगळा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हा महाराष्ट्राने प्रतिसहकारतत्त्वाचा अवलंब केला पण स्वराज्यपक्षाला हे तेव्हां न आवडल्यामुळे महाराष्ट्राला त्यांतून फुटून निघावे लागले. (१९२५) कौन्सिल-प्रवेशाचे तत्त्व प्रयत्नाने पदरात पाडून घेतल्यावर अधिकारग्रहणाचे तत्त्व ओघानेच त्यातून निघणारे होते. या मुद्द्यावर महाराष्ट्रांतील पुढाऱ्यानी उघडपणे प्रतिसह-कारपक्ष म्हणून स्वतत्र पक्षच स्थापला. आणि कौन्सिलप्रवेशाची चळवळ या बिस्तृत स्वरूपांत पुढे चालू ठेविली. पूर्वी नाफेरवाल्यापेक्षा फेरवाल्याना लोकमत अधिक अनुकूल आहे असे स्वराज्यपक्ष-स्थापनेच्या वेळी दिसून आले, तसेच यापुढे स्वराज्य पक्षांतील नाफेरवाल्यापेक्षां त्या पक्षांतील फेरवाल्यांना लोकमत अधिक अनुकूल

आहे असेच कौन्सिल निवडणुकीच्या द्वारे दिसून आले. (१९२६) हे पाहून मूळच्या नाफेरवाल्यांनी मूळच्या फेरवाल्याशी अधिकाधिक जुळते घेण्याचे आरंभिले. जणुं काही कौन्सिलप्रवेशाचा वाद शिल्लक उरला नाही, असे भासण्याइतक्या उघड रीतीने, नाफेरवाला पक्ष कौन्सिलातील स्वकीयाच्या द्वारे आपल्या विधायक व इतर कार्यक्रमाला मिळेल तो फायदा मिळवून घेऊं लागला. आणि एकटे गांधी आणि त्यांच्याभोवती घेर धरून बसणारे पाच-चार कट्टर नाफेरवाले इतकीच मंडळी एक लहानसा गट करून कौन्सिलविरोधाचा बहाणा चालविणारी उरली. (१९२७)

गांधींनी जवळ जवळ कॉंग्रेस सोडून दिली व असे भासविले की, " तुमचे तुम्ही करा, माझे मी करीन. दोघेहि बरोबर आहो. म्हणून आपापल्या कार्यांचा आनंद दोघांनीहि भोगावा." अशा रीतीने कौन्सिलप्रवेश निर्वेध झाल्याने स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यानी साम्राज्यांतर्गतच स्वराज्य मागण्यापर्यंत असहकारितेची तार ढिली करून सर्वपक्षीय म्हणून एक स्वराज्यघटना तयार केली. (१९२८) परंतु बापाच्या मुळावर मुलगा यावा त्याप्रमाणे ही घटना राष्ट्रीय सभेने नामंजूर करून प्रत्यक्ष स्वातंत्र्याची घोषणा केली. (१९२९) स्वातंत्र्यबुद्धीचा पुरावा म्हणून गोलमेज परिषदेचे निमंत्रण धिक्कारून कौन्सिलप्रवेश रद्द केला आणि कायदेभंग सुरू केला. (१९३०)

१९३० साली पहिली कायदेभंगाची मोहीम झाली. पण स्वातंत्र्याचा ठराव बदलला नव्हता तरी गांधींनी लॉर्ड आयर्विन यांशी स्वतंत्र तह करून गोलमेज परिषदेचे निमंत्रण स्वीकारले. आणि या लहरीपणाच्या भरीला गोलमेज परिषदेत (१९३१) अत्यंत बिनमुत्सद्दीगिरीचे वर्तन ठेवले. १९३२ साली कांही योग्य कारण नवे घडले नसतां, किंबहुना गांधींच्या मनांत नसता दुसऱ्या कोणाच्या चिथावणीने, गांधींनी कायदेभंगाची दुसरी मोहीम सुरू केली. या दोन्ही मोहिमांत हजारो लोक सामील झाले. त्यांतच प्रतिसहकारवादी कांही महाराष्ट्रीय पुढारीहि ध्येयभावनेने सामील झाले. तथापि त्यांनी आपला कौन्सिलप्रवेशाचा हक्क मात्र सोडला नव्हता. या दोन मोहिमांत गांधींना जनता वश आहे असे दिसून आले तरी स्वतः गांधींना हे दिसून आले की, ही जनता हे एक बाजारबुणगे किंवा पेंढार आहे. आपल्या तीक्ष्ण ध्येयाच्या कसोटीला म्हणजे सत्य काय किंवा अहिंसा काय यांच्या कसोटी-ला उतरणारे नाही. यामुळे " कायदेभंगाची चळवळ थांबवून पूर्वीच्या अमृतसर येथील राष्ट्रीय सभेच्या धोरणाचा म्हणजे शुद्ध प्रतिसहकारितेचा अवलंब करून

लोकांना विधायक राजकारणाच्या मार्गावर घालावे " असे गांधीचा 'आतला आवाज' म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराचा आवाज त्याना सागूं लागला! (१९३३-३४) त्यांचा कट्टर नाफेरवाला परिवाराहि मनांतून या गोष्टीला नुसता अनुकूलच नव्हे तर आतूरहि झाला होता. गाधीनी भासविलें की, " माझे अनुयायी बोलूनचालून मूर्ख म्हणजे कौन्सिलप्रवेशाच्या मोहातून न सुटणारे, म्हणून त्याच्या छदानुरोधानेच मी हे परिवर्तन घडवन आणीत आहे." (१९३५) गाधीच्या अनुयायांनाहि ही पडत्या फळाची आज्ञा इष्टच होती. यामुळे त्यानी कायदेमडळाची झाडे हलवून नावाने 'पडलेली' फळे खाण्याची हौस पोटभर पुरवून घेतली. (१९३६) आणि जनताहि कौन्सिलप्रवेशाला आतूर झालेली असल्यामुळे तिने गाधीभक्ताना सर्वत्र आश्रय व पाठिबा देऊन बहुतेक सर्व प्राातातून प्रचड बहुमतान निवडून दिले, आणि त्यामुळे प्रधानमडळे कॉंग्रेसला स्थापन करतां आली. (१९३७)

हे घडून येत असता स्वातत्र्यप्रेम, साम्राज्यविरोध, स्वयनिर्णय, घटनाभग इत्यादि मोठमोठ्या तत्त्वांची आठवण राष्ट्रीय सभेला क्षणभर बाजूला ठेवावी लागली. दक्षिणेचा सूर्य उत्तरेला जावा त्याप्रमाणे घडून राजकीय धोरणाचे ऋतुमान बदलले. पूर्वी ज्याना कौन्सिल हा नरक वाटत होता त्यानाच तो आता मोक्ष किवा निदान स्वर्गलोक तरी वाटूं लागला ! ज्यांना कौन्सिले ही मायागृहे वाटत होती त्यानाच ती आता त्रिवार सत्यसृष्टि वाटूं लागली ! कौन्सिलांचे स्मशान-चितेचे स्वरूप जाऊन त्याला मगलदायक होमकुडाचे स्वरूप आले ! सर्व प्रकारचा अविधि हा विधि ठरला ! असूक्त सूक्त ठरले ! अधोगति ही उन्नति वाटू लागली ! आणि सन्याशाचा कर्मयोगी बनला ! असहकारितेच्या सुरवंटांतून फुलपाखरूं बाहेर पडले, त्याला नाचण्या बागडण्याला जग अपुरे भासू लागले ! तात्पर्य, यक्षिणीने काडी फिरवावी त्याप्रमाणे गांधी व त्याचे अनुयायी याची लोककल्याणाची दृष्टि दक्षिणध्रुवावरून निघून उत्तरध्रुवावर येऊन बसली.

या सोळा-सतरा वर्षांच्या अवधीत महाराष्ट्राने मात्र एखाद्या होकायंत्रांतील कांट्याप्रमाणे आपली दृष्टि या उत्तरध्रुवाकडेच रोखून ठेविली होती. आणि तिला धक्के देऊन चंचलत्व आणण्यासारख्या अनेक गोष्टी घडल्या तरी, त्याने आपला दृष्टि-कोन केव्हां कलेअर्धकलेने दुसरीकडे फिरविला तरी फिरून आपला स्थिति-स्थापकत्वाचा गुण अबाधितच ठेवला. असो. हाच विषय आतां थोडासा खुलासे-वार रीतीनें मांडतो.

या प्रकरणाला प्रारभ करणे तो म. गांधी यांनी लो. टिळकाना लिहिलेल्या एका 'हिंदी' पत्रानेच केलेला बरा. कारण या पत्रांत गांधी यानी कॉंग्रेस व तिच्यांतील मवाळ व जहालपक्ष याच्या संबंधाचे आपले धोरण प्रथमच प्रगट केले असें वाटते. मॉटेग्यू चेल्म्सफर्ड सुधारणाचा स्वीकार करावा, पण त्या पूर्णपणे पदरात पडण्यास जरूर तर सत्याग्रह करावा, असे गाधीचे धोरण या पत्रांत प्रगट झालेले दिसते. हे पत्र असेः—

अहमदाबाद श्रावण कृष्ण २

**लोकमान्य टिळक महाराज**

"आपका खत मिला है. आपकी दिल मोझींसे मे अनुगृहीत हुआ हुं. मेरे स्वास्थ्यके लिये आप क्यौ चिंतित न होगे ? ईश्वर कृपासे मेरी तबिअत अब ठीक हैं. बिछाना तो मै थोडे रोजतक नहि छोड सकुंगा. बडा दर्द रहा था वह अभी शात हुआ.

"कॉंग्रेसमे मेरा आनेका बिलकुल इरादा है नाहि. नरम दलकी समेलनमेभी जानेका इरादा है नाहि. मे देखता हू मेरा अभिप्राय दोनोंसे विचित्र. आपको मैने बतला दिया है मेरा मतव्य है इस समय युद्ध की भरती मे हम अब जानेसे, लाखोको लेजानेसे, हिंदुस्थान की बडी भारी सेवा कर सकते है, और हमारा साध्य—जो स्वराज्य है—उसकी प्राप्ती हम एकदम कर सकते है. मेरी इसराय मे आप और मिसीस बेझट समिलित नहि है. मै जानता हू नरम दलवाले भी इस कार्य मे तीव्रतासे मषगुल नहि होगे. यह तो एक बात रहि. मेरी दुसरी राय है मॉटेग्यू चेम्सफर्ड योजना का तत्व का ग्रहण करना और उस मे जो कुछ सुधारा हम चाहते है वह सुधारा साफ बतादेना. और जो सुधारा हम बतालावेगे उसका स्वीकार करने के लिये मरणपर्यत लढना. इस सूत्र का नरम दल स्वीकार नहि करेंगे यह तो स्पष्ट है. यदि आप और मिसीस बेझट स्वीकार करेंगे तोभि जिस तरहसे मै लढना चाहता हू वैसा तो आप नहि लढोगे. मिसीस बेझटने कहदिया है की वह सत्याग्रही नहि है. आपने एक दुर्बलो का हथियार सत्याग्रह का स्वीस्कार किया है. इस भ्रमणमे मै पडना नहि चाहता हू. और आप दोनोसे विमुख होकर कॉंग्रेस मे आंदोलन करना नहि चाहता हूं. मेरे सूत्रपर मेरा आत्यंतिक विश्वास है, और मेरा यहभी मतव्य है की यदि मेरी तपश्चर्या संपूर्ण होगी तो आप और मिसीस बेझंट भी मेरा सूत्र का स्वीकार करेंगे. मै धैर्य रखसकता हूं.

"नरम और गरम दल उस की थोडी बातो को छोडकर समिलित होजाने की चेष्टा करे यह मुझ को बिलकूल पसंद नहि है. देश मे दो पक्ष है. दोनो पक्षो की राय साफ साफ प्रजा को और राजा को बताने मे कुछभी हानी होगी अैसा मैं मानता नहि हू. गरम-दल और नरम दलको मिलने की चेष्टा करना मुझ को बिलकूल पसंत नहि है. दोनो पक्ष दृढतासे उसकी राय राजा प्रजा की समक्ष रखेंगे तो बडा फायदा पोहुचेगा."

"आपके कार्य मे प्रभु आपको साह्याय्य हो."

**मोहनदास गांधी**

सन१९१९सालच्या डिसेंबरांत अमृतसर येथे झालेल्या राष्ट्रीय सभेत मॉंटेग्यू पुरस्कृत सुधारणाचे बिल 'अपुरे, असमाधानकारक, आणि आशेची निराशा करणारे' आहे इतकेच म्हटले होते. टिळकाच्या आग्रहावरून हा शेवटचा शब्द घातला होता; तथापि त्या सौम्य शब्दालाहि नेमस्तच काय पण महात्मा गांधीहि नाराज होते. त्यांना तोहि शब्द जहाल वाटला. शिवाय 'या कायद्यावर बहिष्कार घाला' असे शब्द नसून 'दिलेल्या हक्काचा उपयोग करा' असेच म्हटले होते. या पूर्वी गांधी हे सत्याग्रहाचे तत्त्व आफ्रिकेत कसाला लावून घेऊन इकडे आले होते. आणि टिळक विलायतेस जाण्यापूर्वी मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीत या तत्त्वाची कसून चर्चा झाली होती. या विषयावर मुंबईचे श्री. नारायणराव समर्थ व मी या दोघांनी एक एक निबंध लिहून प्रांतिक कॉंग्रेस कमिटीपुढे माडला होता. त्यांत सत्याग्रहाचे तात्त्विक विवेचन होते. १९०७ साली ना. गोखल्यांनी प्रजेच्या हक्काची मर्यादा वाटल्यास कर न देण्यापर्यंतहि जाऊं शकते असे म्हटले होते ते समर्थ यांनी मान्य केले होते. पण हिंदुस्थान ही आफ्रिका नव्हे असे दर्शवून समर्थांनी सत्याग्रहाला अव्यवहार्य ठरविले. माझा निबंध सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकात छापला आहे. त्यांत मी असे प्रतिपादन केले आहे की, कोणताहि एखादा सरकारी हुकूम अन्याया-चा असेल तर, त्यापुरता तो शांततेने मोडून त्याला विरोध करणे याचे नाव सत्याग्रह. पण हा सत्याग्रह केव्हांहि निश्चित अशा एका मुद्यापुरता करावा, त्याला संकीर्ण स्वरूप असूं नये, यावर मी आपणाकडून विशेष भर दिला होता. आणि तसें असल्यास मग कोणी, कोठे, केव्हां, व काय हे प्रश्न उद्भवत नाहीत असें मी प्रतिपादिले होते. याचा अर्थ असा की, गांधी सारख्यांनी किंवा इतर कोणी

सत्याग्रहाचा नक्की एकच मुद्दा हाती घेतला तर, आणि त्यातील अन्याय सर्वांना अमान्य असेल तर, सत्याग्रह करणे योग्य होईल व तो करणाराला इतरांनी सहाय्य करावे. पण त्यावेळी कायदे कौंसिल वरील बहिष्कार अशा सत्याग्रहात येतो अशी कल्पना गांधीच्याहि मनात नव्हती मग आमच्या मनात ती कोठून असणार? कायदे कौंसिलच्या निवडणुकी करण्याचा जाहीरनामा निघाला तर तो सक्तिचा अन्यायाचा हुकूम होत नाही, म्हणून कौंसिल बहिष्कार हा सत्याग्रह होत नाही, हे कोणीहि कबूल करतील. पण जे गांधी अमृतसरच्या राष्ट्रीय सभेत 'निराशाजनक' या शब्दाला तो जहाल म्हणून बिचकले, यांनी अवघ्या सात महिन्यात दुसऱ्या टोकाला धांव घेतली. आणि सामुदायिक, सार्वत्रिक, सर्वकष, सर्वसंग्राहक, अशा असहकारितेवर आपले ठाणे नेऊन बसविले.

१९२० च्या जून-जुलैत, टिळक वारण्यापूर्वी, सत्याग्रहाचे प्रयोग मुंबईस गांधीचे कांही अनुयायी करू लागले. ते एखाद्या विवक्षित मुद्यापुरते होते. पण गांधीच्या मनात अधिक व्यापक प्रेरणा कशी झाली न कळे. 'सत्याग्रह' हा शब्द सुटून 'असहकारिता' हा शब्द पुढे आला. त्याची कल्पना टिळकांना अमान्य होती. यामुळे मुंबईस शेवटच्या दुखण्यात, आथरुणाला खिळले असता शुद्धीतील बोलण्यात व बरळण्यातहि, गांधीच्या नव्या धोरणाच्या निषेध टिळकांच्या तोंडून निघत असे. गांधी टिळकांना भेटण्याकरिता आले तेव्हा टिळक बेशुद्ध व आसन्नमरण होते. अर्थात् उभयताचे बोलणे कसे होणार? टिळक मध्यरात्री वारले. दुसरे दिवशी सकाळी असहकारितेचा जन्म झाला. दरम्यान या मधल्या सहा तासांत टिळकाचे शव पाघरूण घालून ठेवल्यावर, अजून रात्र आहे म्हणून, सरदार गृहात टिळकाचे प्रमुख अनुयायी एका खोलीत दारे लावून चर्चा करीत बसले. त्यांत असे ठरले की, केळकराना केसरीचे सर्वाधिकारी व महाराष्ट्राचे पुढारी म्हणून मानावे; परंतु राजकारणातील जे धोरण म्हणून या पुढे ठरवावयाचे ते कर्नाटक, पुणे महाराष्ट्र, वऱ्हाड महाराष्ट्र, व नागपूर महाराष्ट्र या सर्वांचे एकच राहील असे असावे. या करिता पांच चार प्रमुख गृहस्थाचे एक मंडळ नेमण्यात यावे, व या मंडळाच्या धोरणाप्रमाणे सर्वांनी वागावे.

या पूर्वी बिपिन पाल बाबूंनी कोलांटी खाऊन आमच्या राष्ट्रीय पक्षावर टीकास्त्र धरले होते. ते म्हणत, "शक्य तर सहकारिता व अशक्य तर असहकारिता या म्हणण्यांत अर्थ नाही. प्रतिसहकारी धोरण हे शरणागतीचेच धोरण होय." म्हणून

मी ता. २९ जून, १३ जुलै, व २७ जुलै १९२० च्या केसरीच्या तीन अंकात राष्ट्रीय पक्षाच्या धोरणाची सूक्ष्म चर्चा केली ती सर्वांना पसत पडली होती. आणि टिळकांचे 'प्रतिसहकारी' राष्ट्रीय धोरण हेच पुढे चालवावे असे सरदारगृहांत नेमलेल्या मडळानेहि निश्चित केले.

टिळकांच्या मृत्यूच्या दिवशी केसरीसबधाने जसे आम्हाला आभाळ फाटल्यासारखे वाटले तसेच राजकारणातहि वाटले. टिळक असत तोपर्यंत महाराष्ट्रांतलेच काय पण इतर कांही प्रांतातलेहि राजकारण त्याच्या तत्राने चाले. पण ते निवर्तल्यावर महाराष्ट्रातच काय पण इतर प्रातातहि दुफळ्या माजतील अशी भीति वाटत होती. आणि खरोखर दुफळी पडण्यासारखेच राजकारणाचे एक नवे धोरण टिळकांच्या मृत्यूच्या दिवशीच महात्मा गांधी यानी जाहीर केले. व्यक्ति या नात्याने गांधीविषयी टिळकांना आदर होता. तथापि राजकारणांतील धोरणासबधाने गांधीच्यावर टिळकांचा विश्वास नव्हता. याचा अर्थ गाधी हे अप्रामाणिक असे टिळकांना वाटत होते हा नव्हे. तर याच्या उलट गाधी हे फारच फार प्रामाणिक असे टिळकाना वाटत होते ! मग प्रामाणिकपणा हा दोष मानावयाचा की काय ? तर तसे नाही प्रामाणिकपणा हा गुण खरा, पण गांधीचा प्रामाणिकपणा स्थिरबुद्धीवर अधिष्ठित नसल्यामुळे, त्यांच्या प्रामाणिकपणाला इतके चचलपणाचे स्वरूप येऊ शकेल की अखिल जनतेला ते पटणार किंवा पचणार नाही. टिळकाना वाटे की गाधी हे एखादेवेळी सरकाराशी इतक्या साळसूदपणाने, इतक्या सढळपणाने, किवा इतक्या सौम्यपणाने वागतील की, लोकांना तो फार मवाळपणा वाटेल. उलट एखादेवेळी ते इतका तीव्रपणा स्वतः स्वीकारून लोकाच्याहि मागे तो लावतील की त्याना त्याचे सोगहि पार पाडता पाडता कठिण जाईल, व कांहीच्या मनांत त्या तीव्रपणाच्या भीतीनेच विद्वेष उत्पन्न होईल. टिळकाचे सर्वसाधारण धोरण असे की, लोकांच्यापुढे फार तर चार पावले उभे राहून त्यांच्याकडे मागे वळून पहावे व मजबरोबर चला असे त्याना म्हणावे. म्हणजे लोक तेवढी चार पावले चालून आपणाबरोबर येतील. उलट गाधीच्यासारखे सत्याग्रहाचे अतिम धोरण स्वीकारले, व त्यातहि सत्य या शब्दाच्या अर्थाची अतिशयोक्ति केली, तर लोकांच्या हातून ते व्रत चांगले पाळले जाणार नाही; व लोकांचा दुर्बळपणा निष्कारण सरकाराच्या नजरेस पडेल. गांधीप्रमाणे टिळकांच्या राजकारणाला सद्गुणसंवर्धनाचे स्वरूप नव्हते. कामकरी माणसाच्या मागे त्याच्या व्यक्तिनिष्ठ गुणांची चिकित्सा किंवा

प्रतिज्ञापालनाचे शुष्ककाष्ठ लावावे असे धोरण नव्हते. तात्पर्य, गांधीच्या राजकारणांत जो चंचलपणा, अनिश्चितपणा, व विशेषतः तऱ्हेवाईकपणा दिसे तो टिळकांना कसासाच वाटे. यामुळे गांधी हे जरी एखाद्या पंथाचे पुढारी होऊन आपलें व्यक्तित्व राजकारणांतहि चांगले पटवितील, तरी पण अखिल जनतेचे ते पुढारी होतील की नाही याविषयी टिळकांना शंका वाटे. त्यांतूनहि गांधी हे कै. गोखल्यांचे शिष्य म्हणवीत;.व तोंडाने जहाल राजकारण बोलत असतांहि मवाळ पक्षांतील पुढाऱ्यांशींच अधिक घसट व मैत्री असल्याचे दाखवीत. यामुळे गांधी हे आपले की परके असा प्रश्न मनापुढे उत्पन्न झाला असतां, 'ते आपले नव्हत' असेच टिळकाना वाटे. दक्षिण आफ्रिकेत सत्याग्रह प्रवर्तविणारे गांधी अमृतसरच्या राष्ट्रीयसभेत सुधारणांच्या कायद्याला नुसते निराशाजनक असेहि विशेषण लावू नका असे म्हणतात, या दोन गोष्टीचा मेळ कसा घालावा ? निदान लहरीपणा हे कारण धरल्याशिवाय तो मेळ कसा घालावा याचे टिळकांना मोठे गूढ पडले होते. तसेच टिळकाचे धोरण अत्याचारांना फार अनुकूल आहे असे गांधी समजत असल्याची वदंता टिळकांच्या कानावर होती. आणि अहिंसावादी या नावाचा पक्ष प्रचलित राष्ट्रीय-पक्षाला नामोहरम करून, किंवा त्याची एकप्रकारे बेअब्रू करून, किंवा ते करण्याकरितांच, 'सत्यमिश्रित अहिंसा' या तत्त्वाचा पक्ष गांधी हे काढण्याच्या विचारांत आहेत पण यामुळे दुफळी झाल्याशिवाय राहाणार नाही, अशीहि भीति टिळकाना वाटत असे.

अशा प्रकारची ही दोन मोठी माणसे आणि अशा प्रकारचीं ही त्यांची दोन मतें ! अशी अनिष्ट स्थिति असतांहि टिळक स्वतः जिवंत असते तर गोष्ट वेगळी होती. गांधीच्या बरोबरीने आपला पक्ष लढविण्याकरितां, इतर प्रांतांतील पुढाऱ्यांच्याकडून जे बळ मिळावयास पाहिजे ते मिळविण्याइतका, टिळकांचा दाब निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांवर होता. पण ते गेल्याने आतां सर्व भार दुय्यम पुढाऱ्यांवरच पडला. म्हणून या अडचणीतून एकमुखाने मार्ग कसा निघेल याविषयी आम्हा मंडळीना सहजच चिंता वाटू लागली. दासबाबू हे टिळकांचे ऐकण्यासारखे. पण ते आमचे ऐकतील कशावरून ? कारण टिळकांमागे उरलेल्या कोणत्याहि राष्ट्रीय पक्षांतील पुढाऱ्याच्या मानाने वडीलकीचा मान त्यांच्याचकडे जात होता. दुसऱ्या बाजूस गांधी व मोतीलाल नेहरू. यांची मैत्री अनेक कारणांनी बळावत गेली होती. पंजाबांतील अत्याचार प्रकरणामुळे लोकांचे लक्ष इतर प्रांतांतून निघून पंजाबाकडे सहजच वळले होते आणि वातावरणांत मोठी क्रान्ति

व्हावयाची असतां कोठे तरी एके ठिकाणी त्या क्रान्तीचा मध्यबिन्दू बनून राहातो, व आसपासची हवा तो आपल्याकडे ओढून घेतो, त्याप्रमाणे नेहरू व गांधी या जोडीने इतर प्रान्तांतले वातावरण आपणाकडे ओढून घेण्यास प्रारंभ केला होता.

या सर्व गोष्टी तपशीलवार सांगण्याचे कारण इतकेच की टिळकांची गांधी-संबधाची मते, खुद्द टिळकांच्याच तोंडून विशद होऊन, आम्हाला नित्य ऐकावयास मिळत होती. आणि टिळकांचा मृत्यु व गांधीच्या सत्याग्रहाच्या मोहिमेचा प्रारंभ या दोन गोष्टीचा योग एकाच तारखेला म्हणजे ता. १ ऑगस्ट १९२० ला पडल्या-मुळे, पुढे कसे होईल ही विवंचना आम्हाला पडली. टिळकांच्या मृत्यूनंतर सुमारें दोन तासांनी सरदारगृहांत जमलेली टिळकपक्षाची मंडळी एका बाजूला जाऊन बसली आणि त्या सभेत त्यांत त्यानी आपणांपैकी पांचसहा मंडळीचे सल्लागार मंडळ म्हणून नेमले हे मागे सांगितलेच आहे. नागपुरापासून कर्नाटकापर्यंत कोठे कांही करावयाचे तर या सल्लागार मंडळाचा विचार घेऊनच करावे असेहि ठरले. पण ही योजना पुढे फार काळ अमलात राहिली नाही. आम्हां सर्वांत दादासाहेब खापर्डे हे वडील. पण टिळकांच्या विषयी त्यांची निष्ठा जरी निखालस व अलौकिक होती तरी, पुढारी या नात्याने, टिळकांच्या अंगी जे गुण होते, किंवा कोणत्याहि सर्वमान्य होण्यासारख्या पुढाऱ्याच्या अंगी असावे लागतात, ते दादासाहेब खापर्डे यांच्या अंगी असावे तितके नव्हते. त्यांचे वक्तृत्व, त्यांची बुद्धिमत्ता, वजनदारी, इत्यादि गोष्टी अगदी उघड होत्या. टिळकपक्षांत त्यांचे जे वजन होतं ते टिळकांचे एकनिष्ठ भक्त म्हणून, त्यांचे सहाय्यकर्ते म्हणून. पण स्वतंत्र विचाराचे पुढारी म्हणून नव्हे. टिळक जिवंत असतां टिळकांच्या बुद्धिमत्तेचे व राजकीय धोरणाचे वर्णन करणाऱ्या दादासाहेबांना जे तेज होते ते टिळक दिवंगत झाल्यावर राहिले नाही. एका पक्षाचे पुढारी या नात्याने दुसऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यांना टिळक कसून विरोध करीत. पण या दुसऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यांसंबंधाने खापर्डे यांची जिव्हा असे अद्वातद्वा बोले की, त्या पक्षाला शत्रू मानणाऱ्या अशाहि लोकांना, दाक्षिण्यबुद्धीमुळे, खापर्डे यांचे बोलणे ऐकवत नसे. टिळकांच्या तोंडून प्रतिपक्षातील व्यक्तीविषयी अनुदारपणाचे शब्द निघोत, पण व्यक्तिशः अभद्र अपशब्द कधीहि निघत नसत. यामुळे कोणत्याहि वादांत खापर्डे यांनी चारचौघांत बोलणें म्हणजे ते उपकारक न होतां उलट अपायकारच होईल अशी राष्ट्रीय पक्षांतील लोकांना भीति वाटे. राष्ट्रीय सभेसारख्या

प्रसगी आपल्या अनुयायांचे मेळे जुळवितील, हजर ठेवून काम करून घेतील, त्याकरितां लागेल तो खर्च व पडतील ते श्रमसायास करतील, अशी त्याच्याविषयी लोकाची खात्री किंवा भावनाहि नव्हती. म्हणून राष्ट्रीय पक्ष पुढे चालवावयाचा तर खापर्डे याना प्रत्यक्ष पुढारी करून तो चालणे कठिण असे आमच्या पक्षाने ठरविले. पण वऱ्हाड नागपुरकडे मुजे व अणे, इकडे मी व चितामणराव वैद्य, खाडिलकर व शिवरामपत परांजपे, आणि खाली कर्नाटकाकडे बेळवी, देशपाडे व कौजलगी इतकी माणसे टिळकाच्या मृत्यूच्या वेळी एकविचाराची होती. थोड्याशा फरकाने ती सर्व जवळ जवळ एकाच दर्जाची असून आपापल्या प्रातांत त्याना सारखाच मान होता. या लोकाच्या मनात परस्पराविषयी तेव्हा आदरभावहि चागला होता. म्हणून ते एकजुटीने जे करतील ते इतर प्राताना, टिळकांइतके नसले तरी त्याच्या खालोखाल, लक्षात घ्यावे लागेल अशी स्थिति होती. आणि टिळकाच्या मृत्यूनतर काही दिवसपर्यंत ती स्थिति टिकली. किंबहुना या भावनेच्या आधारावरच टिळकांच्या मृत्यूमुळे उपस्थित होणारे सकट बरेचसे निभावतां येईल असे आम्हाला वाटत होते. आणि त्याचा अनुभव टिळकाच्या मृत्युनंतर कलकत्ता येथे भरलेल्या जादा राष्ट्रीय सभेत आम्हाला आलाहि. कारण या सभेत असहकारितेचा जो ठराव पास झाला तो वरील सर्व मडळीना मान्य नसल्याकारणाने त्या सर्वांनी त्या ठरावाविरुद्ध मते दिली.

मी गगाधरराव देशपाडे वगैरे मडळी कलकत्त्यास एकेच ठिकाणी उतरलो होतो. इतर प्रातात चलबिचल होती. मद्रासचे कस्तुरीरग अय्यंगार यानी असहकारितेचे तत्त्व मान्य आहे पण तपशील मान्य नाही असे मत दिले होते. बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीने असा ठराव केला होता की, एकदर कारणाकरिता असहकारितेचे तत्त्व मान्य करावे, परतु ते प्रचारात कसे आणावे हे प्रत्येक प्राताने आपापल्या परिस्थितीप्रमाणे ठरवावे. पंजाब कमिटीने असा ठराव केला होता की, असहकारितेचे तत्त्व मान्य आहे, परंतु त्या तत्त्वाच्या नावावर कोणकोणत्या साधनाचा उपयोग करावा हे, स्पेशल कॉंग्रेसचा ठराव झाल्यावर, त्यातील तपशील काय आहे हे पाहून मग ठरवावे! मुबई प्रांतिक कमिटीने तत्त्व मान्य करून तपशील आखण्याकरिता स्वतः कॉंग्रेसनेच एक कमिटी नेमावी असा ठराव केला होता. तात्पर्य, तत्त्व सर्वांना मान्य पण तपशील पहावा तर तो मात्र कोणाचा आपल्या मनाशी निश्चितपणे ठरलेला नव्हता. आणि गांधीनी सुचविलेला तपशीलहि कोणाला मान्य

नव्हता. परतु उगीच आधी विरोध कशाला करा ? खुद्द स्पेशल कॉंग्रेसमध्ये तरी तो मजूर होईलच कशावरून ? यामुळे त्यानी आपली मते चाचपडत दिली होती. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, लवाद कोर्टाची स्थापना वगैरे गोष्टी सर्वानाच मान्य होत्या. उलट शिक्षणसस्था, न्यायकोर्टे व कायदेकौन्सिले यावर बहिष्कार घालण्याची तयारी लोकाच्या मनांतून नव्हती; व तो कार्यक्रम त्यांना तत्त्वतःहि पसंत नव्हता. तथापि प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेने हाहि कार्यक्रम मजर केला तर खरी परीक्षेची वेळ येणार होती. आणि स्पेशल कॉंग्रेस होईपर्यंत लोक संदिग्ध बोलत याचे कारण, राष्ट्रीय सभेने हा तपशील मजूर केला तर तो शिस्तीखातर पाळावा असे काहीना वाटत होते, पण कॉंग्रेसने तो मान्य केला तरी तो पाळू नये असें इतर काहीना वाटत होत. परतु दोघेहि वरून एकच मोघम भाषा बोलत होते.

ता. २४ ऑगस्ट १९२० रोजी कलकत्त्यास राष्ट्रीय सभेची स्पेशल बैठक भरली. ती सहा दिवस चालू होती अध्यक्ष लाला लजपतराय हे होते. टिळकांचे प्रमुख अनुयायी एकत्रच उतरले होते. त्यानी या सभेत कौन्सिल-बहिष्काराविरुद्ध भाषणे केली व अखेर मतेहि नकारार्थीच नोदविली. त्यात खापर्डे, अणे, गगाधरराव देशपांडे, कृष्णाजीपत खाडिलकर, मी इत्यादि होतो. पण आम्हीचसे काय, इतर अनेक प्रातातील टिळकानुयायी म्हणविणारांनी अशीच प्रतिकूल मते नोदविली. लजपतराय यानी, सुरतप्रमाणेच येथेहि, उभयस्पर्शी दुहेरी धोरण ठेविले होते ! असहकारितेच्या व्यापक ठरावांतील कांही गोष्टी त्याना मान्य व काही अमान्य होत्या. त्याचे पहिले आणि शेवटचे भाषण यांतहि किंचित् विसंगती दिसून आली. पण गांधी व त्यांचे अनुयायी हे कलकत्त्यास असहकारितेचा ठराव मजूर करून घेण्याच्याच निश्चयाने आले होते. असहकारितेत जात्याच अद्भुत वाटण्यासारखा, म्हणजे भोळ्या विकारी भावनाशील मनावर पाश टाकण्यासारखा, कांही भाग उघडच होता. "गाधी हे प्रथमच उदयाला येऊन आपणाला एक जबरदस्त पुढारी मिळाला, आणि फिरून तोहि गुजराथी मिळाला," या आनदाने गुजराथी लोक हुरळून गेले होते. आणि गाधींचे धोरण यशस्वी करण्याकरिता त्यानी तन, मन, धन अर्पण करण्याचे ठरविले होते. याचा प्रत्यय कलकत्त्याच्या या सभेत कोठल्या प्रांतांतले किती प्रतिनिधि आले यावरून कळला. या वेळी कॉंग्रेसची जुनी घटना अमलात असल्यामुळे, वाटेल त्याला प्रतिनिधित्वाचे सर्टिफिकीट सहज मिळवून सभेला येऊन

मत देतां येत होते. याचा फायदा घेऊन जमनालाल बजाजप्रभृतीनी वाटेल तितका पैसा खर्च करून आपल्या मताचे प्रतिनिधि आणून भरले.

सभेचा निर्णय अपेक्षेबाहेर झाला यामुळे आम्ही सर्वजण डोक्यावर मोठा आघात व्हावा त्याप्रमाणे सुद व स्तंभित झालो. गंगाधरराव देशपांडे खाडिलकर अशा लोकांनी, मी किंवा खापर्डे याच्याहिपेक्षा, अधिक नापसती प्रगट केली. कारण भावनावश माणसाचा जसा लोभ तसाच राग. दोन्ही बिनहिशेबी असावयाची. पूर्व आफ्रिकेतील चळवळीनंतर गोपाळराव गोखले यांनी, गांधींना सहाय्य देण्याकरितां, हिंदुस्थानांत फंड जमविला त्याला केसरीतून मतप्रसार करून मी ५००० रुपये देवविले. त्या वेळी शिवरामपंत परांजपे खाडिलकर यांनी मला तर मूर्खात काढलेच, पण गोखल्यांचा हस्तक म्हणून गांधींनाहि वाटेल ती दूषणे लावली. त्याचप्रमाणे या लोकांना गांधींना नावे ठेवण्याचा हा दुसरा प्रसंग कलकत्त्यास आला. परंतु देशपांडे परांजपे खाडिलकर यांना भवितव्यता मनांत हसून म्हणत होती की, “ जरा थांबा ! तुमच्या मनावर भुरळ घालणारा जादूगार जन्माला आला आहे. तो तुमच्या वांग्यांचे लवकरच भूत बनवील ! किंवा तुम्हाला खाली डोके वर पाय करावयास लावील !” आणि तेच अखेर खरे ठरले. देशपांडे यांनी लवकरच अहिंसेची जपमाळ येवढी मोठी हातांत घेतली, आणि तो जप ते येवढ्या मोठ्याने करूं लागले की, जणु कांही हिंसेच्या तत्त्वाची व यांची उभ्या जन्मांत कधी ओळखच नव्हती ! परांजपे याच्यावर भवितव्यतेने असा सूड घेतला की, त्यांचा डौलदार श्रीमंती थाटाचा पोशाख—म्हणजे ते पोपटी जाकीट, ते रेशीमकाठी उपरणे, ते झोकदार पागोटे—ही सर्व जाऊन त्या जागी बाळ संतोषासारखे खादीचे डगले, आणि डोकीवर बेढब त्रिनआकाराची अर्धवट पांढरी खादीची टोपी आली. दोन वर्षांपूर्वीचे परांजपे दोन वर्षांनंतर कोणाला ओळखेनासे झाले. “ हे परांजपे नसून परांजप्यांचे शापग्रस्त भूत आहे” असे त्यांच्या मिजाशी पोशाखाकडे पाहून पूर्वी डुलणारे लोक मनांत म्हणूं लागले. आणि हिंसेच्या प्रतिपादनाकरितां ज्यांचे सर्व वाङ्मय सरकारजमा झाले, तेच परांजपे जाहीर सभांतून अहिंसात्मक शांततापूर्ण अशा असहकारितेच्या विशेषणावर जोर दिल्यानें वक्तृत्त्वांत फिके आणि जाणत्या लोकांत हास्यास्पद होऊन राहिले. जुने भावनावशतेचे सर्व भांडवल गांधीच्या चरणी अर्पण केल्यामुळें, त्यांनी स्वतःचे म्हणून वर्तमानपत्र काढले तरी ते तोडमिळवणी करीना. आणि मनाविरुद्ध लिहिण्याचा कंटाळा येऊन पुढे त्यांनीं

तो मार्गच सोडून दिला. अवतारसमाप्तीनतरचा कृष्ण तशी शिवरामपत परांजप्यांची स्थिति झाली. त्याचे कर्तृत्व पूर्वी केवळ माझ्यासारख्या प्रतिपक्षांची नालस्ती करण्यांत दिसून येवो; पण त्याबरोबर स्वराज्याची तळमळ प्रगट करण्याविषयी खऱ्या मनाने लिहितांना त्यांचे व्याजोक्ति व्यग्योक्ति यांनी परिपूर्ण असलेलें काव्यमय वक्तृत्व लेखणीने व जिभेने प्रभावी होण्याला पुष्कळच वाव होता. आतां मात्र त्या सद्गुणांचा सर्व आधार त्यांचा त्यानीच आपल्या हाताने काढून घेतल्यामुळे अहिसात्मक असहकारितेच्या पिजऱ्यात ठेवलेल्या चिरउपोषित सर्पाप्रमाणे ते निरुपद्रवी बनून गेले. त्यानी पुढेहि मजवर तोड टाकण्यास कमी केले नाही. परतु सरकारला बाधणारे असे त्याचे जहाल विष गाधीनी पराजप्यांच्या दातातून पिळून टाकल्याने, या सापाचे दात आणि एकाद्या पाढऱ्या हस्तिदती कगव्याचे दात दोन्ही सारखेच वाटू लागले होते !

कृष्णाजीपत खाडिलकर हे मात्र अधिक दैववान. कारण नवा गुरू भेटला की त्याला सदेह आत्मसमर्पण करण्याची शक्ति त्याच्यामध्ये जबर होती. देशाच्या दृष्टीनेच काय, पण स्वतःच्या व्यवसायाच्या दृष्टीनेहि, ज्या वेळी जो डाव रगेल तो रगवावा अशी वृत्ती त्यांना प्रकट करता आली. आज टिळक काय उद्या गांधी काय—दोघेहि स्वराज्य मिळविण्याचे काम परस्पर करीत आहेत ना ? करू देत ! आपल्याला तोशिस न पोचली म्हणजे झाले. आपले काम केवळ रणवाद्य फुंकण्याचे ! आणि तेहि रणावरच फुकले पाहिजे असे शास्त्र कोठे आहे ? एक तुरुंगांत गेला तर दहानी जावे म्हणावे ! दहाचे नुकसान झाले तर एकाचे झाले असें म्हणावे ! विचार, दूरदर्शीपणा यांचा विवेक करावयाचा तर तो आपणापुरता करावा, व प्रसग पडला तर वर्तमानपत्रांतून बेधडकपणे काळ्याला पांढरे व पाढऱ्याला काळे म्हणावे येवढी विद्या मात्र त्यानी शिल्लक ठेविली. बाकी टिळकांकडून मिळविलेली इतर विद्या, आणि केसरीतून प्रगट केलेले जहालपण, हे त्यांनी सर्व गांधीच्या चरणी वाहिले. हिंसेची तोडाने उघड निदा करणारे, व प्रायश्चित्त म्हणून या निदेची शिक्षा भोगणारे हे तीन तापसी राष्ट्रीय व्याघ्र गांधीनी निर्माण केलेल्या अहिंसेचे लेबल लावलेल्या पिंजऱ्यात पडलेले पाहून, १९०८–१९०९ सालची आठवण असलेले ब्रिटिश सरकार मनांत काय म्हणत असेल याची कल्पना कोणालाहि करतां येईल !

असो. पूर्वी इंग्राजांच्या कवायती कंपूने असंघटित अशा हिंदी सैन्याची व बाजारबुणग्यांची अनेक वेळा दाणादाण कशी केली हे इतिहास सांगतो. तीच गोष्ट

कलकत्त्यास या राष्ट्रीय सभेत घडली. एका बाजूला गांधी व नेहरू येवढेच प्रमुख सेनानायक असे होते. आणि उलट दुसऱ्या बाजूला त्यांच्या बरोबरीचे दहा-पांच तरी पुढारी होते. परतु गांधीच्या काही हस्तकानी, खर्चाकडे न पाहता, असहकारितेच्या ठरावाला मत देण्यास स्वतःला बांधून घेतलेले असे शेकडो प्रतिनिधि आयत्या वेळी आणून भरले यामुळे प्रत्यक्ष मत-मोजणीत या दुसऱ्या पक्षाचा पराभव झाला. पहिला विजय पदरी पडताच आक्रमण केलेल्या भूमीची बळकटी-बंदस्ती करणे हे कोणताहि कुशल सेनापति आपले पहिले कर्तव्य समजतो त्याप्रमाणे गांधीनी केले. उलट पराभव पावलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या अनेक पुढाऱ्यांनी एकत्र जमून, सहविचार करून, परत हल्ला चढविण्याचा प्रसंग पुढे तरी उत्पन्न करतां येईल की काय हे पाहावयास पाहिजे होते पण ते त्यांच्या हातून झाले नाही. सभा संपतांच गांधी हे आपला पक्ष बळकट करण्याच्या तयारीला लागले, आणि राष्ट्रीय पक्षाची मात्र वाताहत झाली. कलकत्त्याच्या सभेत स्वतः टिळक असते तर अशी गोष्ट झाली नसती असे कित्येकांचे अनुमान आहे. वास्तविक एकटे गांधी किंवा एकटे टिळक हे एकेकटेच घेतले तर ते कलकत्त्यास तुल्यबळ ठरले असते. परंतु गांधीच्या सहाय्याला जी दुसरी गोष्ट उपयोगी पडली ती अगदी अनपेक्षित व नवी असून, तिने कदाचित् टिळकांच्याहि विरुद्ध पारडे फिरविले असते. ही गोष्ट म्हणजे असहकारितेच्या तत्त्वाचा चित्ताकर्षकपणा !

टिळकांच्या प्रतिसहकारितेत असहकारितेचे स्वरूप अंतर्भूत होतेच. तथापि सहकारितेशी संलग्न असल्यामुळे त्या असहकारितेचे स्वरूप मिश्र किंवा शबल ठरत होते. उलट गांधींच्या असहकारितेचे स्वरूप अमिश्र व शुध्द होतं. सरकारशी केवळ सहकारिता करू पहाणाऱ्या नेमस्तांचे पाय आता जमिनीवर राहिले नव्हते; अमृतसरच्या राष्ट्रीय सभेतच त्यांनी कॉंग्रेसला रामराम ठोकला ! पण टिळकांच्या प्रतिसहकारितेलाहि आतां वाव उरला नाही अशी जनतेची समजूत झाली होती. त्याना नवीन अद्भुत व चित्ताकर्षक असे राजकीय चळवळीचे एखादे साधन मिळाले तर हवे होतें, आणि नक्की तेच गांधीनी या वेळी जनतेपुढे ठेविले. हे नवे साधन झाले तरी स्वराज्य मिळेपर्यंत सतत टिकेल व कार्यक्षम होईल अशी जनतेची खात्री होती असे नाही. पण अग्निमांद्याची बाधा झालेला मनुष्य कांही तरी तिखट खाण्याची इच्छा करितो, व त्याने क्षुद्बोध झाला तर पहावा म्हणतो,

त्याप्रमाणें या नव्या उपायाला एक संधि तर देऊन पहावी असें सामान्य जनतेला वाटूं लागलें होतें हें मात्र निर्विवाद होय.

आमच्या राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्याना दुसरी एक अडचण व ताहि प्रथमच नवी अशी उत्पन्न झाली. ती म्हणजे, राष्ट्रीय सभेंत रीतसर निर्णित झालेलें बहुमत अवमानावयाचें कसें ? राष्ट्रीय सभेच्या ठरावाला मान्यता देऊन देऊनच आपण तिची प्रतिष्ठा आजवर वाढविली. तिला अग्रगण्यता प्राप्त झाली. सरकारविरुद्ध उगारण्याचें आपलें हेंच मुख्य शस्त्र असें आपण भासवीत आलो. मग ठरावाचा डाव आपल्या विरुद्ध जाताच आपण तो न मानण्याची घोषणा केली तर, हिंदुस्थानांतील विद्यमान राजकीय चळवळीच्या पायाखालचा सर्वच आधार आपण आपल्या हातानें काढून घेतला असें होणार नाहीं काय ? अशी शंका राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्याना आली. आणि ती शंका थोडीशी बरोबर होती. झालेले ठराव बदलून घ्यावयाचें मनांत असलें तरी, पुढच्या वर्षीचें कॉंग्रेसचें अधिवेशन होईपर्यंत त्याना मान्यता दिलीच पाहिजे, म्हणजे त्याप्रमाणें आचरण केलेंच पाहिजे, हा सद्विचार ओघानेंच प्राप्त होणारा होता. आतां त्यामुळें या पुढाऱ्यांनी सभा संपल्यानंतर एकत्र बसून पुढें काय करावयाचें याचा विचार करण्यास हरकत आली नसती. त्याला कोणी फार तर कट म्हटलें असतें. तें प्रत्यक्ष बंड ठरलें नसतें. पण ही साधी गोष्ट देखील घडली नाहीं हें खरें. या कामीं पुढारीपण घेण्यास देशबंधु दास हेच सर्वांत अधिक योग्य. परंतु त्यांनी तत्काल कांहींच हालचाल केली नाहीं. खापर्ड्यांना ही गोष्ट सुचली होती म्हणतात, पण ती त्याच्या हातून पार पडणें शक्य नव्हतें.

तात्पर्य, सभेनंतर कोणी कोणास न भेटतां निरनिराळ्या प्रांताचे प्रमुख प्रतिनिधि आपापल्या गांवीं निघून गेले. त्याप्रमाणें मीहि पुण्याकडे परतलों. वाटेंत माझा पहिला मुक्काम जळगावास बंधूकडे पडला. जाहीर सभा क्रमप्राप्तच होती. यामुळें तेथपर्यंत मनाचा कांहींतरी निश्चय करून तो प्रसिद्ध करणें याशिवाय मला गत्यंतर नव्हतें. नुसती जाहीर सभाच असती तर तो प्रसंग मी कसातरी टाळला असता. परंतु माझ्या विशेष परिस्थितीची अडचण मला या वेळीं विशेष भासली. ती म्हणजे या महत्त्वाच्या विषयावर केसरींत अग्रलेख लिहिणें. ज्यांना ही अडचण नसते त्यांना विचार करण्याला अधिक वेळ मिळतो. इतक्या तडकाफडकी निर्णय करावा लागत नाहीं. खाजगी बोलण्यांत निरनिराळ्या ठिकाणीं क्वचित् उलट-

सुलट मतप्रतिपादन घडले तरी ते उघडकीस येत नाही. पण वर्तमानपत्रांत लिहिणे म्हणजे तो जगजाहीर वज्रलेपच. तात्पर्य, कलकत्त्याहून जळगांवास येतांना वाटेतच मी असे ठरविले की, कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचा निर्णय तूर्त तरी मानावयाचा. पण त्याबरोबर हेहि निश्चितपणे ठरविले की, तत्त्वतः तो आपणाला मान्य नाही, आणि तो बदलून घेण्याची खटपट आपण करूच करू असेहि प्रगट करावयाचे, म्हणून जळगांवच्या सभेत मी असे जाहीर केले की, " लौकरच होणाऱ्या कायदेकौन्सिलच्या निवडणुकीला पुणे शहरातर्फे मी उमेदवार म्हणून उभा राहिलो होतो, पण असहकारितेचे धोरण 'तात्पुरते' मान्य करावयाचे असल्यामुळे मी आपली उमेदवारी परत घेतली आहे." मग पुण्यास येताच पहिला प्रसंग मराठ्यांत या विषयावर लिहिण्याचा आला म्हणून त्यातील अग्रलेख लिहितांना मी दोन्ही गोष्टी लिहील्या. त्या अशा की, " तूर्त असहकारितेचे धोरण मान्य केले आहे. पण ते मला कायमचे मान्य नाही. कलकत्त्याचा ठराव बदलून घेण्याची पहिली संधि येईल तीहि आपण घेऊ. आणि असहकारितेचे धोरण सोडून देऊ. " इतर लोकांनाहि आपले मत निश्चित करणे प्राप्तच होते, म्हणून लवकरच मुबईस राष्ट्रीय पक्षाच्या इकडील पुढाऱ्याची सभा बोलवण्यात आली. तिनेहि माझेच धोरण स्वीकारण्याचा ठराव केला. आणि जे कोणी निवडणुकीला उमेदवार म्हणून उभे होते त्या सर्वांनी आपआपल्या उमेदवाऱ्या परत घेतल्या.

केसरीत मी, २१ सप्टेंबर १९२०च्या अकात असे लिहिले की, " आम्ही गांधींची समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण तो सिद्धीस गेला नाही. स्वतःच्या मताविरुद्ध इतक्या पुढाऱ्याचे मत आहे हे पाहून गाधींनी हार खावयास पाहिजे होती ती त्यांनी खाल्ली नाही एवढ्यापुरता दोष त्याना आम्ही देतो. तथापि त्याकरितां आम्ही गांधींचा द्वेष करीत नाही. असहकारिता यशस्वी करण्याला राष्ट्र जितके तयार आहे असे गांधींना वाटते तितके ते तयार आहे असे आम्हांला वाटत नाही. त्यांत व्यावहारिक अडचणी पुष्कळच आहेत. कायदेकौन्सिलावरील बहिष्कार ही तर सर्वांत मोठी मतभेदाची बाब. जरी गांधींच्या मताप्रमाणे ठराव झाला आणि अनेकानी आपल्या उमेदवाऱ्या परत घेतल्या, तरी ही बाब उलगडली असे म्हणतां येत नाही. आम्ही या बाबतीत आपल्या मताचा आग्रह सोडला नाही. ठरावां-तील इतर तपशीलहि बराच वादग्रस्त आहे. ठरावाचा आदर करणे ही गोष्ट

शिष्टाचाराची असली तरी, पुढेमागे तो ठराव दुरुस्त करण्याचा आग्रह सोडण्याची सक्ति किंवा नैतिक बंधनहि आमच्यावर नाही."

मला वाटते केसरीतील हे माझे लिहिणे अगदी स्पष्ट होतें. परंतु त्यावर आमच्याआमच्यांत मतभेद झाला आणि पुढेहि तो वाढतच गेला. असहकारितेच्या या ठरावाने राष्ट्रीय पक्षाची फळी दुभंगली. टिळकांच्या वेळीहि या पक्षांत डावी व उजवी अशा दोन बाजू होत्याच. डावी म्हणजे एकांतिक जहाल मतवाल्यांची. आणि उजवी म्हणजे सारासार विचार करून, व्यवहार लक्षांत घेऊन, राष्ट्रीयच पण मध्यक्रमिक मतवाल्यांची. साध्याच्या दृष्टीने दोघे सारखेच. पण साधनांच्या दृष्टीने थोडथोडे वेगळे. याविषयी कांही उदाहरणेच देतो म्हणजे लक्षांत येईल. डाव्या बाजूचे टोक म्हणजे चित्रशाळेचे वासुकाका जोशी, आणि उजव्या बाजूचे टोक म्हणजे दादासाहेब खापर्डे. शिवरामपंत परांजपे हे डाव्या बाजूंत नेहमीच मोडावयाचे. गांधींच्या आधीपासूनच कायदे कौन्सिलाविषयी त्यांचा बहिष्कार मनाने सिद्ध झाला होता. याकरतां, आणि त्यांतल्या त्यांत निवडणुकीला खर्च लागतो म्हणून, ते कोणत्याहि जागेकरतां उमेदवार म्हणून उभे राहिले नव्हते. म्हणून असहकारितेतील कौंसिल-बहिष्कार त्यांना पूर्ण संमत झाला. इतर कांहीं कलमासंबंधाने मात्र त्यांचा गांधींशी मतभेद होता. पण त्यांचा स्वभाव विधायक टीका करण्याचा कधीच नसल्यामुळे, त्यांना अमुक हवे अमुक नको हे नक्की कधीच कोणास कळले नाही. राष्ट्रीय भावनेनें एखादा मुद्दा घ्यावयाचा, आणि तो तेवढा रंगविण्यांत ते आपली सर्व प्रतिभा खर्चावयाचे. टिळकांच्या वेळीहि जोशी व परांजपे हे टिळकांची कांही कांही मते अमान्य करणाऱ्यापैकीच होते. आणि आतां तर हुल्लडीची एक नवी संधि आली. ते ती कशी सोडणार ?। खाडिलकर डाव्याच पक्षात मोडणारे, परंतु टिळक असेपर्यंत ते टिळकांची कोणचीहि मते सर्वस्वी उचलून धरीत. नव्या निवडणुकीकरतां पुणे शहरांत टिळकांनी मला उभे केले, तसेंच बाहेरच्या एका जागेकरतां त्यांजकडून खाडिलकरांना उभे करण्यांत आले होते. म्हणजे कौंसिल-बहिष्कार त्यांना कृतीने अमान्य नव्हता. पण टिळक गेल्याबरोबर त्यांनी कौंसिल-बहिष्कारासुद्धां असहकारितेची कांस धरली. आणि निवडणुकीतून आपले आंग काढून घेतले. त्यांचा स्वभावहि खटपटी करण्याला व उद्योग करण्याला प्रतिकूल होता.

ते खरे स्वास्थ्याचे भोक्ते होते. त्याना स्वार्थत्यागाची लज्जत होती, परंतु उद्योगाचे वावडे होते. स्वस्थ बसून चार गोष्टी सागाव्या, चार लिहाव्या, येवढेच त्यांच्या प्रकृतीला मानवणारे असे. म्हणून निष्क्रियता हा ज्या असहकारितेचा गाभा असे त्यांना वाटले ती असहकारिता सहजच त्याच्या पथ्यावर पडली. मी कौन्सिल-वादी म्हणून पूर्वी प्रसिद्ध होतो व आजहि तसाच आहे. तथापि कलकत्त्याचा ठराव 'तूर्त' मानावयाचा असे मी ठरविल्यामुळे आपली उमेदवारी परत घेण्याला मला मुळीच वाईट वाटले नाही. हा ठराव झाला नसता तर मी निवडणूक लढविली असती आणि निवडूनहि आलो असतो या विषयी मला मुळीच शंका नव्हती. केसरी ऑफिसातील मत माझ्याप्रमाणेच होते. वऱ्हाडचे पुढारी बापूजी अणे यांना तर कौन्सिल-बहिष्कार मुळीच मान्य नव्हता. मुंबईत आमच्या मडळीची सभा झाली तीत उमेदवाऱ्या परत घेण्याविरुद्ध त्यांनी आपले मत दिले. ते स्वतः निवडणुकीला उभे राहिले नाहीत, पण आपले मित्र रा. अण्णासाहेब जतकर यांना उभे करून, व निवडून आणून, त्यानी राष्ट्रीय सभेच्या धोरणाचा उघड निषेध आणि तिच्या शिस्तीची उघड अमान्यता प्रगट केली.

असो. कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेनतर गांधीजी व महाराष्ट्र यांच्या दरम्यान एकप्रकारे रस्सीखेचीचा खेळ चालू होता. शिस्तीकरिता आणि राष्ट्रीय सभेच्या इभ्रतीकरितां, म्हणजे औपचारिकरीत्या, असहकारितेचा ठराव महाराष्ट्राने मान्य केला होता हे गांधी जाणून होते. पण त्याने त्यांचे समाधान होत नव्हते. या उपचाराचे परिवर्तन खऱ्या खुऱ्या श्रद्धेत झाले तर ते त्यांना पाहिजे होते. आणि गंगाधरराव देशपाडे, कृष्णाजीपत खाडिलकर, शिवरामपंत परांजपे हे दाखवीत असलेल्या झोकावरून, अतर्यामीची श्रद्धा असली किंवा नसली तरी, महाराष्ट्रांतले पुढारी शेवटी आपल्या गोटांत कायमचे येऊन तळ देतील अशी आशा गांधीना वाटूं लागली होती त्यांना खात्री किंवा आशा नव्हती ती मी जयकर, मुंजे आणि अणे इत्यादिकांची. म्हणून गांधीजीनी धूर्तपणाने या आम्हा मडळीशी प्रथम कांही दिवस सामोपचाराचे, किंबहुना 'खुशामतीचे' असेहि मी म्हणेन, धोरण ठेवलें होते. पाण्यांत गळ टाकून बसलेला धीवर तोडाने इकडच्या तिकडच्या शिळोप्याच्या गोष्टी बोलत असतो. पण त्याचे सारे लक्ष गळाच्या दोरीला ओढ कितपत बसते याकडे असतें. गांधींचेहि आम्हासंबंधानें असे झाले होतें. 'मनावर घेईल तर वाघ मारील' हा एका सुप्रसिद्ध हिंदी म्हणीतला पहिला अर्ध

गांधी प्रथम एक दीड वर्ष महाराष्ट्राला लावीत. पण पुढे निराशा झाल्यावर 'मरेल पण मनावर घेणार नाही' हा दुसरा अर्ध ते घोकू लागले. आपल्या कार्यसाधना-पुरते गांधी म्हणत " वः महाराष्ट्र, म्हणजे काय गोष्ट आहे ? सगळ्या हिंदुस्थानचा पुढारी तो. उगीच का टिळकांनी इतकी तपश्चर्या केली आणि पुण्याई संपादिली ? महाराष्ट्र माझ्या बाजूला येण्याचाच अवकाश की मी असहकारितेची चळवळ यशस्वी केली म्हणून समजा " उलट आम्हीहि प्रथम प्रथम गांधीजीवर उघड टीका न करतां त्यांना चुचकारून घेत होतो. त्यांना मोठेपणा देत होतो. "त्यांनी राजकीय चळव-ळीचे एक अकल्पित व नवे साधन उपयोगात आणले त्याला संधि दिली पाहिजे; न जाणो तेंहि आमचे स्वराज्याचे काम करणार नाही कशावरून ?" असे म्हणत होतो. यामुळे मला पहिल्याच कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा सभासद नेमण्यांत आले, आणि कॉंग्रेसची नवी घटना करण्याचे काम स्वतः गांधी व विठ्ठलभाई पटेल यांच्याबरोबर मजकडे देण्यात आले. सन १९२२ अखेर हा ऋणानुबंध टिकला, तोपर्यंत गांधी व मी याजमध्ये पत्रव्यवहारहि होत असे. अशा पत्रव्यवहारापैकी उपलब्ध असलेली कांही पत्रे या खाली देतो.

( १ )

" आम्ही आपल्या ध्येयाचा मार्ग फार जलद काढीत आहो असे मला वाटते. आपली ध्येयमूर्ति अगदी एक वर्षातच आपल्या डोळ्यापुढे उभी राहील असे वाटत नाही. तथापि त्या अवधीत बरीच मजल गाठू असे वाटते. तुम्ही व तुमच्या पक्षांतील लोक यांच्या मनातील खऱ्या खऱ्या इच्छा काय आहेत त्या कळाव्या असे वाटते. हल्लीच्या युद्धांत तुम्ही व त्यांनी अतःकरणपूर्वक उडी घ्यावी असे मला फार फार वाटते. तुम्ही येथे ता. २२ रोजी आला तर बरे होईल. म्हणजे आपण २३ तारखेस निघू शकू. " ( मो. गांधी )

( २ )

" मला अनेकांकडून अभिनंदनाचे संदेश पोचले. परतु तुमच्या संदेशाला मी सर्वांत अधिक किंमत देतो. कारण तुम्ही पूर्ण अंतःकरणपूर्वक सहकारिता कराल तर तिची मला फार गरज आहे. मात्र ही मदत तुम्ही स्वतःची खात्री पटवूनच दिलेली असली पाहिजे. कॉ. वर्किंग कमिटीसंबंधाने तुमचें पत्र मिळाले. या पुढे तुम्हाला जसे योग्य वाटेल, जशी स्फूर्ति होईल तसेच

तुम्ही करावे. माझ्यामते आतां वर्किंग कमिटी ही प्रबल झाली आहे. तिने भराभर कामे हाती घेऊन भराभर उरकली पाहिजेत, व त्याकरितां तीत एक-मताची माणसे पाहिजेत. राष्ट्रीय सभेची आजची घटना पूर्णपणे अमलांत आणली तर तिने आम्हाला पाहिजे ते मिळविता येईल. अर्थात् मला आपली मते सर्व हिंदुस्थानला कशी पटवून देता येणार ? मी म्हणतो त्याप्रमाणें जर यंदा आपल्याला स्वातंत्र्य लाभले तर माझ्या म्हणण्याची खात्री लोकाना पटेल." ( मो. गांधी )

( ३ )

"जमनालालजी यांनी मला काल केसरीतील तुमचे लेख वाचून दाखविले. ते वर्किंग कमिटीच्या ठरावावर होते. ते ऐकून मला फार दुःख झाले. वर्किंग कमिटीत झालेल्या गोष्टीचा असा जाहीर उल्लेख व्हावा हे बरे काय ? कमिटीच्या ठरावाला तुम्ही जर तेथेच तीक्ष्ण विरोध केला असता तर मी ते ठराव करून घेण्याचा आग्रह धरला नसता. मला वाटले कीं तुम्ही फक्त आपला मतभेत बोलून दाखवीत आहा. बहुमत चूक आहे असे तुम्हाला वाटले तर सकाळीच तुम्ही त्याला हरकत घेतली असती तर बरे झाले असते." (मो. गांधी)

( ४ )

"अहमदाबादेस कोण येतील कोण येणार नाहींत हे आज सांगता येणार नाही. म्हणून मी केलेल्या ठरावाचा मसुदा तुमच्या विचाराकरितां पाठवीत आहे. तो तुम्ही आपल्या स्नेह्यांना दाखवावा म्हणजे अशा रीतीने ता. २३ च्या सभेपुढे संघटित असा अभिप्राय मांडला जाईल. तूर्त हा ठराव खाजगी समजण्याचा आहे." ( मो. गांधी )

( ५ )

"सोबतचे कागद टिळकांच्या मुलाकडून मजकडे आलेले दिसतात. पण त्यावर त्यांची सही नाही. अर्थात् सही असती तरी मीं इतकेच केले असते व आतांहि करतो की, ते सर्व कागद तुम्हाकडे परत पाठवितो. कारण मला अशी खात्री वाटते की, तुम्ही काही तरी आपसात तडजोड व तीहि न्यायाची अशी खचित करून घ्याल. मी व्हाइसरॉयला पत्र लिहिले त्याविषयी तुमचा अभिप्राय काय तो कळवावा." ( मो. गांधी )

( ६ )

" येथील परिस्थिति फारच गंभीर आहे. तरी तुम्ही शक्य असेल तेथवर लवकर यावे. मुंबईस वर्किंग कमिटीची सभा भरवली पाहिजे. सुरतेस सभा भरवून उपयोग नाही, असे तुम्हाला वाटत नाही काय ? ते कांही असो. उद्यां रविवारीं तुम्ही शक्य तर निघून यावे म्हणजे मला बरे वाटेल." ( मो. गांधी )

( ७ )

" तुमचे पत्र पोचले. लोक महाराष्ट्र पक्षासंबधाने कांही म्हणोत. त्यावर भित्रेपणाचा आरोप कोणालाहि करता येणार नाही. दुःख सोसण्यांत त्या पक्षापुढे दुसरा कोणी मजल मारील असे मला वाटत नाही. तुम्ही तुमचा मुलगा वगैरे जर तुरुंगांत जाल, तर तुम्ही गैरहजर म्हणून तुमच्यातर्फे तुमचे म्हणणे कॉंग्रेसपुढे मांडण्याची मी खातरजमा करतो तुमच्याविषयी मला इतकी पूर्ण माहिती आहे, व माझे तुमच्याबद्दल इतके प्रेमहि आहे की, तुमच्या मताचा विपर्यास करून मी मांडणे हे केव्हांहि शक्य नाही." ( मो. गांधी )

( ८ )

येत्या राष्ट्रीय सभेमध्ये हिंदी भाषेतून भाषणे व्हावी या सूचनेला तुम्ही पाठिंबा दिला हे ऐकून मला फार आनंद झाला. तुमची या कामी मदत असेल तर पुष्कळच कार्य होईल या विषयी मला शंका नाही. तुम्ही केसरीत एक कॉलम हिंदीत देत असता असेहि ऐकले आहे मला केसरीची एक प्रत नियमित पाठवीत जावी. 'इंडियन केस फॉर होमरूल' या तुमच्या पुस्तकाची प्रत मिळाली. त्याबद्दल आभारी आहे. ते केव्हां वाचीन हे सांगता येत नाही. पण निदान हिंदुस्थानांतील पहिली होमरूल पार्लमेंट जेव्हा मला एखाद्या गुन्ह्याकरितां कैदेत घालील तेव्हां ते मी खास वाचीन ! आज चालू राजकारणासंबधाने माझी जर कोणी परीक्षा घेतली तर मी त्यांत नापास होईन, असे मला वाटते." ( मो. गांधी )

( ९ )

" बेझवाड्याचा कार्यक्रम एकदाचा कसा काय तडीला जाईल याबद्दल मी अस्वस्थ झालो आहे. ३० जूनपर्यंत टिळक–स्वराज्य–फंड तुमच्याकडून किती जमेल त्याच्या नक्की आकड्याची मला ताबडतोब तार करा. यापूर्वी तुमचे जम-

लेले पैसे तुम्ही ऑल इ. कॉ. कमिटीकडे पाठविले असतीलच. भडोच अहमदाबाद ही ठिकाणे झाल्यावर बहुधा सर्व जून महिना टिळक–स्वराज्य–फंडाकरिता मी मुंबईतच .काढणार आहे. माझ्या कार्यक्रमासबंधी तुम्हाला काही सूचना करावयाच्या असल्यास तारेने जरूर कळवावे." ( मो. गाधी )

( १० )

"तुमचे पत्र पावले. गगाधरराव देशपाडे व कौजलगी यांना प्रत्येकी एक हजार रुपये दिले. अद्याप त्याचा तपशील आला नाही पण त्यानीहि माझ्याप्रमाणेच वकिली सोडणाऱ्या वकिलांना दरमहा ५० रु. प्रमाणे पैसे दिले असतील. तुमची इच्छा असल्यास रकमेच्या तपशीलाबद्दल मी त्यांना लिहितो. काही वकिलांनी पैसे घेण्याचे नाकारले. त्याना त्याची गरज नव्हती असे नाही, पण कदाचित् त्यांची अपेक्षा थोडीशी जास्त असावी. स्वतः तुम्ही व शेट जमनलालजी यांनी कांही काही लोकाना जी मदत केली त्यावरून मला वाटते की, वकिली सोडणाऱ्या वकिलाला ५० रु. देऊ करणे ही गोष्ट फारशी बरी नाही. आपल्याला एकच वर्षाकरता हा प्रयोग करून पहावयाचा तर ७५ किंवा १०० रुपयांपर्यंत देणे वाजवी होईल. पण ते सर्व आपल्या हाती किती पैसे आहेत त्यावर अवलबून रहाणार. मजजवळ असलेल्या ३००० रुपयांतून सुमारे २० वकिलांची सोय मला करावयाची असल्याने ५० रु. पेक्षां जास्त कोणासच देता आले नाही. पण इतर प्रातात वकिलांना सुमारे १०० रुपये देण्यांत आल्याकारणानें महाराष्ट्र व कर्नाटक इकडेहि याच प्रमाणांत पैसे देण्यास हरकत नसावी. बहुधा जे सुखवस्तु वकील लोक आहेत ते हा पगार घेत नाहीत. इतरांत सर्वच सारख्या पात्रतेचे नसतात. पण असा भेदाभेद करणे चूक होईल. वकिली सोडलेल्या कोणाहि वकिलाने कमिटीकडे अर्ज केला की, त्याला सहाय्याची गरज आहे असे घेऊन चालावे असे मी म्हणतो. वकिलांना सांपत्तिक सहाय्याची अडचण राहू न देण्याचे शेठ जमनलालनी आश्वासन दिले आहे म्हणून आमच्या कमिटीने मागितलेली रक्कम त्यांना पाठवून देण्यास सागावे." ( मो. गांधी )

( ११ )

"अलीबधूना पकडल्या कारणाने आपण एकत्र भेटणे अवश्य झाले आहे. ता. ६ ऑक्टोबरला अहमदाबादेस वर्किंग कमिटीची बैठक आहे परंतु तारीख ४

लाच आपण सर्वांनी मुंबईस भेटणे बरे होईल. महाराष्ट्रांतून मी फक्त तुम्हालाच बोलाविले आहे. परंतु चर्चेकरतां आणखी कोणालाहि घेऊन या." ( मो. गांधी )

( १२ )

" गांधीजीच्या भयकर आजाराबद्दल आपण ऐकलेच असेल. आजार उलटल्या कारणाने गेले चार दिवस आम्ही मोठ्या चिंतेत काढले. दर घटकेला प्रकृती खालावत आहे व अन्नपाणी वगैरे कशाचाच काही उपयोग होत नाही. सर्वांत शोचनीय गोष्ट म्हणजे आपला मरणकाल जवळ आला, व आयुष्यांतील आपले इतिकर्तव्य सपले, असे गांधीजीच्या मनाने घेतले आहे पांचसहा वेळ आम्हाला बोलवून त्यानी गीता वाचून घेतली, व 'एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वाऽस्यामन्त कालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ या गंभीर श्लोकाचे त्यांनी वारवार चिंतन चालविले आहे. आम्हाला ही मोठी दुर्दशेची वेळ आलेली आहे. माझी व आपली ओळख नाही पण व्हावीसे वाटते. हे पत्र तुम्ही इतर स्नेह्याना दाखविलेत तरी हरकत नाही." (हे पत्र महादेवभाई देसाई याजकडून आलेले आहे.)

( १३ )

" कायदेभग करण्याला मी उद्युक्त व्हावे व माझ्या मनाला कोठून तरी जबरदस्त धक्का बसावा असा हा तिसरा प्रसग. पहिला धक्का एप्रिल १९१९ मेमध्ये व दुसरा गेल्या नोव्हेबरांत बसला. आणि आतां तर गोरखपूर जिल्ह्यांत झालेल्या प्रकाराने माझे मन फार प्रक्षुब्ध झाले आहे. बरेली व सहारणपूर येथे स्वयंसेवक लोकांनी केलेल्या गोष्टीमुळे त्यांत भरच पडली. गुन्ह्याच्या स्वरूपाचा कायदेभंग व सविनय कायदेभग हे दोन्हीहि एकाच उद्देशाने व एकाच वेळी होण्यात फारसा अर्थ नाही. सविनय कायदेभंगाचे सर्व स्वारस्य तो अनत्याचारी असला तरच होईल. हिंदुस्थानाएवढ्या प्रचड व विस्तीर्ण प्रदेशांत सर्वत्र असे अनत्याचारी वातावरण राहीलच असे समजण्यांत मला मनुष्यस्वभावच कळत नाही असे वाटल्यास म्हणा. आतां यामुळे परिस्थिति अजमावण्याची माझ्यांत बुद्धि नाही असे फार तर ठरेल. पण त्यामुळे पुढे हटकून अयशस्वी होणारी चळवळ कशी व कां चालवावयाची ! अर्धवट अत्याचारी व अर्ध्या अनत्याचारी मार्गाने प्रत्यक्ष स्वराज्य मिळाले तरी देखील मला ते नको, कारण माझ्या कल्पनेप्रमाणे असलेले ते

स्वराज्य नव्हेच ! म्हणून तूर्त कायदेभगाची चळवळ थांबविण्याचा विचार ठर-विण्याकरितां, व अनत्याचारी वातावरण पूर्णपणे उत्पन्न होइपर्यंत ही चळवळ अनि-यमित मुदतीने शक्य तितकी पुढे ढकलावी म्हणून, बार्डोलीस ता. ११ रोजी सभा भरविली आहे. तुम्हास येतां आले अगर नाही तरी तुमचे मत मला कळवा." ( मो. गांधी )

( १४ )

"तुमच्याशी व राजकारणांत थोर असलेल्या महाराष्ट्र पक्षाशी मीहि संभाषण व विचार-विनिमय करण्यास फार चहातो. पण या पक्षाकडून मला अर्धवट पाठिंबा मिळतो ही गोष्ट मला मुळीच पसंत नाही. अर्धवट पाठिंबा ( Luke-warm ) असे म्हणण्यांत कोणाचेहि मन दुखवावे असा माझा हेतु नाही. पण यापेक्षां चांगले अर्थसूचक विशेषण सांपडले तर ते मलाहि पाहिजे आहे. बौद्धिक खात्री पटून, महाराष्ट्र मला मनःपूर्वक पाठिंबा देऊन माझे बाजूस येईल, तर तो मला हवा आहे. कॉंग्रेसची आज्ञा ती मॅडेट मानली गेल्यामुळे तुम्ही औपचारिक रीतिने तिचे ठराव अमलांत आणण्यास तयार होता. पण हे मला नको आहे. महाराष्ट्र पक्षाची जर मला बौद्धिक खात्री पटवून देता येत नसेल तर तुमचे व माझे प्रतिपक्षी या नात्याने उघड उघड दोन हात झालेले चांगले ! महाराष्ट्र पक्षाच्या उत्कट देशाभिमानाबद्दल मला पूर्ण खात्री आहे. पण मी अंगिकारलेल्या मार्गाच्या सत्यतेविषयी माझेहि मत अगदी निःशंक असल्यामुळे महाराष्ट्र पक्षाला काबीज करून मी काया-वाचा-मनेकरून आपलासा करीन अशी मला आशा वाटते. तुम्ही व तुमची मित्रमंडळी यांना अहमदाबादेस येण्याचे गैरसोयीचे होत असल्यास मीच याकरिता मुंबईस येऊ शकेन. बुधवारपर्यंत मी अमदाबादेस आहे. गुरुवारी बार्डोलीस जाईन." ( मो. गांधी )

( १५ )

"मी लवकरच पकडला जाणार अशा फार दाट बातम्या उठत आहेत हे तुम्हाला माहीत आहे. तथापि पकडला गेलो नाही तर तुम्ही मला कळवता-क्षणीच मी तुम्हाला मुंबईस येऊन भेटेन. मलाहि विश्रांतीची फार जरूर आहे. व सरकारनेच आपण होऊन मला ती दिली तर शक्य तितके करून ही चळवळ पुढे ढकलण्याची तजवीज तुम्ही करालच. 'मी पकडलो गेलो तर' या यंग इंडियां-

तील लेखांत बहुतेक सर्व खुलासा मी केलेलाच आहे. खिलाफत प्रश्नासबधी काय करावयाचे ते शेट छोटानी हे तुम्हाला सागतीलच.'' ( मो. गांधी )

( १६ )

" अहमदाबादेस भरलेल्या मागील वर्किंग कमिटीने खालील ठराव पास केला आहे. 'डॉ. अन्सारी व केळकर यांची सबकमिटी नेमण्यात यावी. कमिटीच्या सभासदानी काय काय कामे करावयाची या सबंधीचे नियम केळकर यांनी तयार करावे.'' ( एम्. एस्. गोडबोले, गांधीजीकरिता. )

गांधी यांजकडून मला आलेली पत्रे वर दिली. मजकडून गांधीना गेलेल्या पत्रांच्या नकला मजजवळ नाहीत म्हटले तरी चालेल. पण एक सांपडली ती देतो. म्हणजे या पत्रावरून माझे मनोगत कळून येईल.

" तुमचे पत्र अगदी योग्य वेळी आले. कारण दडपशाहीचा हात आतां पुण्यावर पडला आहे. आणि पुण्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यानी पिकेटिंग बेकायदेशीर ठरवून त्याला मनाई केल्यामुळे काल रात्री मडळीच्या विचारे हा हुकूम मोडण्याचे आम्ही ठरविले. आणि त्याप्रमाणे आज सकाळी मॅजिस्ट्रेटला कळविलेहि.

" मी व माझा मुलगा, तसेच भोपटकर, परांजपे, गोखले वगैरे १६ मंडळी कायदेभगाच्या पहिल्या टोळीत होतो. आमच्या मागील मडळी हा क्रम असाच पुढे खावीने चालू ठेवतील. पुण्यावर पाळी आली आहे. तेव्हां ते आपले कर्तव्य कसे काय पार पाडून दाखवितात हे पहावयाचे आहे.

" महाराष्ट्र पक्षाला खरोखर मनांतून काय वाटते असे तुम्ही मला विचारतां. पण कायदेभगाबद्दल तुमच्या आमच्यांत यत्किंचितहि मतभेद नाही हे मी तुम्हाला प्रथमच सांगून टाकतो. फक्त कार्यक्रमाच्या इतर बाबतीत आम्हाला कांहीं फेरफार हवे आहेत. 'सर्व रस्ते रोमकडे जातात' त्याप्रमाणे आज देशाची स्थितीच अशी झाली आहे की, कौन्सिलांतल्या किंवा कौन्सिलाबाहेरच्या माणसासहि कायदेभग केल्याशिवाय गत्यतर नाही. पण शाळा कोर्टे यांजवरील बहिष्कार घालण्यांत फारसे शहाणपण आहे असे मला वाटत नाही. आणि जोपर्यंत प्रतिस्पर्धी राज्यसंस्था (Parallel Government) स्थापन करून यशस्वी रीतीने चालण्याची वेळ आली नाही तोपर्यंत कायदा मोडून तुरुंगांत जाणे हे इतराप्रमाणे स्वार्थ-

त्यागाचे एक लक्षण होय इतकेंच मानलें पाहिजे. स्वभावभेदामुळें हें लक्षण कोणत्या रीतीनें व प्रकारानें व्यक्त करण्यांत यावें याला पूर्ण वाव दिला पाहिजे. शिस्तीच्या नावाखाली हेंहि स्वातंत्र्य लोकांना न राहील तर ती शिस्त नसून शिस्तीचा अतिरेक होय !

" पण हे विचार मी येथेंच थांबवितो कायदेभंग करून माझ्या अल्प शक्ती-प्रमाणें या राष्ट्रयज्ञांत माझ्याहि स्वार्थत्यागाची मी लहानशी आहुती टाकण्यास प्रवृत्त झालों आहे. आणि जर ही अपेक्षा पूर्ण झाली तर येत्या राष्ट्रीय सभेस मला हजर राहता येणार नाही. निदान काही महिने तरी कारागृहांत काढावे लागतील. कारागृहाच्या दारांत पाऊल ठेवीत असताना राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमात फेरफार मागण्याचे माझे विचार मी बोलून दाखवितो, याचे खरे कारण तुम्ही मला माझ्या मनांतले विचार मोकळेपणानें जाणण्याची उत्सुकता दाखवितां हेंच होय. माझे इतर दोष काहीहि असोत, पण तुमच्याशी मी अतिशय मनमोकळेपणानें वागत आलों आहे, व या बाबतीत माझ्या खऱ्या मनोभावना काय आहेत त्या तुम्हास माहीत आहेत. पत्र पुरें करण्यापूर्वी एवढेंच सांगतो की, माझ्यावर व अकोला परिषदेवर जो निष्कारण कडक आरोप करण्यांत आला आहे त्याचा मी मनःपूर्वक निषेध करतो. स्वतः मी तेथें फार तर सभानियामक अगर प्रेक्षक यापेक्षा जास्त काहीच केलें नाही. तेथें पास अगर नापास झालेल्या कोणत्याहि ठरावांना मी आपलें मत अगर पसती दिलेली नाही. ठरावाच्या शब्दासंबंधानें तडजोडीची एक शब्दयोजना मी सुचवली पण ती अखेर नापास झाली. शिवाय या कॉन्फरन्ससबंधानें तुमचें माझें कांहीहि मत असलें तरी, गेल्या जुलै ऑगस्टपासूनच कॉन्फरन्स भरविण्याचें ठरत होतें, व त्याप्रमाणें सहज योगानेंच ही परिषद आता भरली इतकेंच आपण समजावें. पण यापेक्षां पुढे जाऊन, दडपशाहीमुळें लोकपक्षाची बाजू सरकारनें कमी करीत आणली असता आम्ही बंड करण्याची ही संधि साधली, अगर दडपशाहीतून सुटण्यासाठी कातडी बचावण्याचा प्रयत्न केला, असा कोणी आरोप करणें हा केवळ दुष्टपणा होय.

"पण आतां मी खरोखरच थोड्या गडबडीत असल्यानें हें पत्र पुरें करतो. तुरुंगात जाण्यापूर्वी तुम्हास लिहावें म्हणूनच चार ओळी लिहिल्या आहेत.

" ता. क.—इतर कोणत्याहि प्रांतापेक्षा वऱ्हाड व मध्यप्रांत यांमध्यें कौन्सिल प्रवेशाचा वाद अगदी बिनतोड आहे. या प्रांतामध्यें अतिशय चिकाटीचे

खबीर व शूरातले शूर असे राष्ट्रीय लोक आहेत. निदान यांच्याकडे पाहून तरी कौन्सिल-वादीपक्षाच्या हेतूचा विपर्यास होऊं नये.

"ता. क.—अकोला परिषदेतील एक गमतीची गोष्ट सागण्यासारखी आहे. जमनादास मेहता अकोल्यास म्हणाले 'The Working Committee be hanged till it dies' आता वर्किंग कमिटीतील पुढारी सरकार फाशी देत नाही हे खरे. पण लजपतराय, दास, मौलाना, मोतीलाल नेहरू वगैरेना उचलून तुरुंगांत ठेवून सरकारने राष्ट्रीय सभेच्या शरीराचा एक एक भाग कापून काढला आहे. आता यापुढे कोणावर पाळी येणार ? मला वाटतं एकटे तुम्हीच शिल्लक राहिला आहा !" ( न. चि. केळकर )

गांधी यांनी लॉर्ड रेडिंग याची मुलाखत घेतली तीत साहेबमजकुरांनी गांधींना असे सागितले की "तुमच्या पक्षांतील असेच आणखी कोणी पुढारी आपल्या भेटीस येतील तर आपण त्याच्याशीहि बोलू." या आश्वासनाचा फायदा घेण्याकरिता गाधीनी इतर काही लोकाप्रमाणे मलाहि कळविले. पण अशा भेटी-पासून काही निष्पन्न होण्यासारखे नाही असे वाटून मी लॉर्ड रेडिंग यांची भेट घेण्यास गेलो नाही. मुजे जाणार होते असे वाटते. ते मला लिहितातः—

"ना. व्हाइसरॉय हे कांही असहकारितावादी पुढाऱ्यांची भेट घेण्यास तयार असल्यामुळे, तुम्ही व्हाइसरॉय यांना पत्र लिहून मुलाखतीची वेळ ठरवा असे महात्मा गांधीचे पत्र मला आले आहे. तुम्हालाहि त्यांचे असेच पत्र आले असेल. तुमचा विचार मला ताबडतोब कळवा. कारण जे काय करावयाचे ते आपण महाराष्ट्रांतले लोक एकमताने व शिस्तीने करू. व्हाइसरॉयांच्या मुला-खतीत काय बोलावयाचे याबद्दल आपण सर्वांनी एक दिशा ठरविली पाहिजे. गाधीनी व्हाइसरॉयाची मुलाखत सहा वेळां घेतली, पण त्यात दोघाचे बोलणे काय झाले याचा सुगावा त्यांनी वर्किंग कमिटीतल्या लोकानाहि लागू दिला नाही. ते काय बोलले असतील ते कोणास ठाऊक ! ते सर्व बोलणे खाजगी अस-ल्याने कोणासच कळण्याची आशा नाही. पण ते कांहीहि असले तरी व्हाइस-रॉयांच्या मुलाखतीला जाण्याचे तुम्ही ठरवीत असल्यास आपण सर्वांनी आधी एकमेकांस भेटून काय बोलावयाचे ते निश्चित ठरविले पाहिजे."

महाराष्ट्राने असहकारितेला एक वर्षभर मान्यता दिली, तथापि ही मुदत संपतांच पुढे काय करावयाचे हे ठरविण्याकरितां महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूर या तीन प्रांतांनी सहविचार करावा अशी सर्वांची इच्छा होती. यासंबंधी बापूजी अणे मला लिहितातः—

"महाराष्ट्राची संयुक्त परिषद भरविण्यासबंधाने व कार्यक्रम आखण्यासंबधाने माझे विचार तुम्हास पसत आहेत हे पाहून आनंद झाला. डॉ. बाबासाहेब परांजपे यांच्या खटल्याचा निकाल ता. २९ ला आहे. त्यांच्या विरुद्ध सरकारी पुरावा मुळीच टिकला नाही. तथापि त्यांना शिक्षा होणार हे ठरलेलेच आहे. स्वदेशी व बहिष्कार या बाबतीत आम्ही आटोकाट प्रयत्न करीत आहो, पण त्या मानाने आतापर्यंत आलेले यश हे फारसे उत्साहजनक नाही."

याच विषयी डॉ. मुजे यांचे पत्र, ता. ३ जून १९२१ चे, खालील प्रमाणे आहे:—

"सर्व महाराष्ट्राची म्हणून एक परिषद भरविण्याची तुमची कल्पना मला फार पसंत आहे. या संबधानं दादासाहेब खापर्डे यांना मी लिहितो. पण सध्या ते डॉ. बाबासाहेब परांजपे यांच्या खटल्यात गुंतले आहेत. पण मला वाटते आतां पेक्षाहि ऑक्टोबरमध्ये हे कॉन्फरन्स भरविल्यास जास्त सोयीचे होईल. गेल्या केसरीत, मुसलमान लोक व अलीबंधू हे केमाल पाशा व अफगाणिस्थान याची बडेजावी करीत असतात याबद्दल, फार मार्मिक व नामीरीतीने तुम्ही आपले मत व्यक्त केले आहे. अलीबंधूंचे खरे सोंग बाहेर पडलेच आहे. पण त्यांचा जाहीर निषेध इतक्यातच आपण करूं लागलो तर तिकडे सरकारचे मात्र फावावयाचे. तुम्ही बाण अगदी अचूक मारला आहे. महात्मा गांधीच्या लक्षांत हे केव्हां येईल तेव्हां येईल ! अनत्याचारीपणापासून अलीबंधू अद्याप ढळले नाहीत असे गांधी 'यंग इंडियां'त सांगोत, पण त्यांची ही भूमिका व्हाइसरॉयच्या मुलाखतीत टिकलेली दिसत नाही. न बोलावता हे मुलाखतीला गेले ही पहिली चूक. आणि तेथे गेल्यावर अली बंधूंची त्यांनी पाठ राखली नाही ही दुसरी चूक अलीबंधूना माफी मागण्याची पाळी यावी, आणि यामुळे त्यांच्या सार्वजनिक कीर्तीवर बोळा फिरविण्याचा प्रसंग यावा, याची मला कीव वाटते. त्यांची त्याच्यावरच गोष्ट सोपविली असती तर अशा वेळी अलीबंधूंनी कधीच माफी मागितली नसती. असहकारितेची लढाई हे शांतिमय युद्ध आहे असे महात्मा गांधी समजात. पण

राजकारणांत इंग्रज लोकाशी दोन हात यशस्वी रीतीने करणे फार कठिण आहे. ज्यानी जर्मन लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकली त्यांना गांधींसारख्या महात्म्याला फसविणे म्हणजे कांहीच अवघड नाही. ते पोरखेळाइतके सोपे आहे. अशी उदाहरणे पाहिली म्हणजे गेल्या शतकात नाना फडणविसानंतर राजकारणांत धुरधर असा मुत्सद्दी एक लोकमान्यांच्या खेरीज झालाच नाही हे मनाला पटूं लागते. त्यानी या इंग्रज लोकाशी फार धूर्तपणाने डाव चालविले. आपल्या अनुयायांना तर त्यानी असे तोंडघशी कधीच पाडले नसते! मवाळांना हाताशी घेऊन सरकार 'अफगाण बोगी'चे महत्त्व नसते वाढवीत आहे. पण या जाळ्यांत न सांपडता, गांधीच्या सल्ल्याने महंमदअल्लीनी भडोचच्या कॉन्फरन्समध्ये या आक्षेपाचे निराकरण केले असते म्हणजे बस्स होते. माफीचीच इतकी जरूरी नव्हती. हा व्हाइसरॉय व्यावहारिक शहाणपणांत पक्का मुरलेला मनुष्य आहे. त्याने अल्लीबंधूची माफी मात्र खिशांत घातली, व त्यांना निमूटपणाने खड्ड्यांत घातले. ॲंग्लो इंडियन लोकाचे मात्र आता चागले फावणार. महात्माजीचा चुकीचा सल्ला ऐकून अल्लीबधूनी माफी मागितली याबद्दल पुढल्या केसरीत त्याच्यावर सडकून टीका करा. राजकारण हे राजकारणाच्याच रीतीने केले पाहिजे. कानात तुळशीपत्र घालून कांही राजकारण करीत नसतात! मला सुचले ते मोकळेपणाने लिहिले आहे पण तुमच्या विवेचक बुद्धीवरच माझा जास्त विश्वास आहे. अल्लीबधूवर खटला भरण्याच्या विचारांत सरकार आहे असे व्हाइसरॉयांच्या भाषणांत आले आहे. खरे काय होते ते लवकरच कळेल."

१९२१ मध्ये असहकारितेला अनुसरून जी मद्यपान-प्रतिबधाची, म्हणजे पिकेटिंगची, चळवळ झाली ती पुणे धारवाड ठाणे इत्यादि जिल्ह्यांतून झाली. धारवाडकडील चळवळीशी माझा कांही सबध नव्हता. पण ती चळवळ कर्नाटकच्या लोकांनी तीव्र स्वरूपाला नेली व शेवटी गोळीबार व हत्या झाली हे प्रसिद्धच आहे. पुण्यातील चळवळीत आमच्या पक्षाच्या पुष्कळ लोकांवर खटले झाले, आणि दंड इतके भरावे लागले की, पैशाचा हा अपव्यय म्हणून चळवळ थाबवावी लागली. ठाणे जिल्ह्यात जमनादास मेथा प्रभृति लोकांनी ती चळवळ केली. ती करण्यापूर्वी जमनादास यांनी ता. ८ सप्टेंबर रोजी मला खालील पत्र पाठविले:—

"ठाणे जिल्ह्यांत सरकारी हुकमाची पायमल्ली करून पिकेटिंग करण्याबद्दल निरनिराळ्या तालुक्यांतून मी सुमारे शंभर प्रमुख लोक जमा केले आहेत. सरका-

रच्या आव्हानाला आम्ही तोंड देणार आहो. आता पुढे कसे पाऊल टाकावे याबद्दल तुमचे मत कळवा. शक्य तर आपण समक्ष भेटून या संबधी निश्चित ठरवूं."

जमनादास यांच्या चळवळीने काय परिणाम झाला हे खालील त्यांच्याच एका पत्रावरून दिसून येईलः—

"ठाण्यामध्ये पिकेटिंगविरुद्ध निघालेला सरकारी हुकूम रद्द झाला. याबद्दल तुम्ही जे माझे अभिनंदन केले त्याकरतां तुमचे आभार मानतो. महाराष्ट्राच्या सर्वमान्य पुढाऱ्याकडून हे अभिनदनाचे बक्षीस मिळाले त्यामुळे त्याची किंमत विशेष वाटते. पण या बहुमानांत दुसरेहि वाटेकरी आहेत. या सत्याग्रहाची स्फूर्ति मला तुमच्याकडून मिळाली, व सर्व ठाणे जिल्ह्याने माझे प्रयत्न यशस्वी करण्यास मदत केली. पटेल व तुम्ही मिळून एकमेकास लिहिलेली पत्रे मी पाहिली. पटेल यांनी शेवटचे वाक्य तुम्हास लिहावयास नको होते. पण त्याला तुम्हीहि उलट टोला चागलाच दिला आहे. त्याने पटेल साहेबाचे नाक थोडे झणझणले असेल. पटेल यांना वाटते की, आपण सर्वच गंमत करतो म्हणून त्याबद्दल लोकांनी रागावूं नये. पण कुचेष्टेलाहि मर्यादा आहेच की नाही ! आपण सर्व आतां आकोल्याला भेटूच. बल्लारीप्रांताच्या विभागणीबद्दल असलेल्या लंढ्यांत कॉंग्रेसने तुम्हाला न्यायाधीश निवडले आहे व ते काम तुम्ही यशस्वीरीतीने करालच." (ता. ३० सप्टेंबर १९२१ ).

बॅरिस्टर जयकर व आम्ही राष्ट्रीय पक्षातील महाराष्ट्रीय लोक यांची मनोवृत्ति असहकारितेविषयी जवळजवळ एकाच प्रकारची होती. म्हणजे असहकारिता हा योग्य मार्ग नव्हे, पण राष्ट्रीय सभेच्या इभ्रतीकरितां तो मार्ग कांही काळ अवलंबावा असे त्यांचेहि मत होते. त्यानी वकिली सोडली, व टिळकांच्या नांवाने निघालेल्या स्वराज्य फंडाला पंचवीस हजार रुपये एका रकमेने दिले. असहकारितेपूर्वी जयकर व मी यांचा विशेष सबध येत नसे. पण नंतर टिळकांच्या पश्चात्, मी महाराष्ट्राचा पुढारी असे मला मानून, ते माझ्याशी स्नेहसंबंध ठेवून सहविचार करूं लागले. मुंबईस त्यांना फार प्रमुखस्थान असतां 'केळकर पुढारीपण घेतील तर मी त्यांचा अनुयायी म्हणवून घेऊन काम करीन' असे ते परवां परवां पर्यंत स्नेहीमंडळीजवळ म्हणत. उलट पहिल्या प्रतिसहकारपक्षाचे अध्यक्ष त्याना करून मी त्यांच्या हाताखालीं काम केले. आणि १९२३ साली ते विलाय-

तेस असतांना इकडे हल्लीचा लोकशाही पक्ष स्थापला गेला तेव्हा ते येथे असते तर त्यांनाच अध्यक्ष करून मी त्याच्या हाताखाली आनंदाने काम केले असते. असो. जयकर व मी याच्यामध्ये खालील पत्राने पत्रव्यवहाराला प्रारंभ झाला असे मला स्मरते.

"मी वकिलीची प्रॅक्टिस सोडल्यापासून आपली दोघांची गांठ पडली नाही. तथापि जमनादास मेहता मला सांगतात की, मी तुम्हास भेटून एकदा चर्चा केल्यास बराच फायदा होईल. माझ्या मनाला सध्या अशी अडचण आली आहे की, गाधी व त्याचे देशकार्य याच्याविषयी माझ्या मनात फार निष्ठा आहे पण अनेक मुद्यांवर त्यांच्याहून माझे विचार वेगळे आहेत. आणि म्हणून मतभेद उपस्थित करण्यापेक्षा तूर्त गप्प बसावे असे वाटते. अर्थात् याहि गोष्टीचा अतिरेक होऊन उपयोग नाही. तथापि कार्यक्रमात कितीहि दोष असले तरी एकी राखण्याकरिता कोणताच मतभेद सध्या तरी दर्शवूं नये असे वाटते. यामुळे कोठें कोठे थोडा गैरसमजहि उत्पन्न झाला असेल. पण मला वाटते की, आपण दोघे एकत्र बसल्यास कार्यक्रमातील दोष टाळून तो जास्त व्यावहारिक कसा करतां येईल याबद्दल आपण कांही उपाय सुचवू शकू." ( २० सप्टेंबर १९२१ ).

असहकारिता पटत नसताहि प्रथम केवळ कॉंग्रेसच्या इभ्रतीकरितां कांही लोकांनी तिला पाठिंबा दिल्याचे आणखी एक उदाहरण खालील पत्रावरून दिसून येईलः—

"सरकारच्या दडपशाहीमुळे कलकत्त्यातील परिस्थिति मोठी चिंताजनक झाली आहे. खुद्द कॉंग्रेसचेच अस्तित्व राहते की नाही याची भीति वाटते. आपले मतभेद कांहीहि असले तरी या वेळी कॉंग्रेसचा बचाव करणे आपले काम आहे. स्वतः मी असहकारितावादी नाही व महात्माजीचा कार्यक्रमहि मला सर्वस्वी मान्य नाही. तथापि सहिष्णुतेने मतभेद सोसण्यास आपण तयार झाले पाहिजे. बॅ. जयकर यांना शक्य तर मुंबईस एखादी कॉन्फरन्स बोलाविण्याची मी तारेने विनंति केली आहे तिला तुम्हीहि जरूर या. (आशुतोष चौधरी, कलकत्ता, ता. १५ डिसेंबर १९२१)

बार्डोलीची चळवळ करून ती मागे घेतली ही गांधींच्या चंचल स्वभावाची खूण ठरली. यासंबंधी बापूजी अणे यवतमाळहून मला लिहितातः—

" तुमचे पत्र पोहोचले व त्याबरोबरच तुमचा केसरीतील बार्डोलीसंबंधानें अग्रलेख वाचला. कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीत तीव्र बुद्धिमत्ता व राजकारणांतील व्यावहारिक धोरण जाणणारी माणसे तुमच्याखेरीज कोणी नाहीत. निदान तुम्ही तरी तेथे असल्याने ही उणीव भरून निघाली आहे, हे महाराष्ट्रात व बाहेर हिंदुस्थानात आता सर्वांना माहीत आहे. अनेक प्रसंगी जर वर्किंग कमिटीत तुम्ही नसता, तर सुधारलेल्या सर्व जगाकडून छी:थू होऊन कॉंग्रेस खात्रीने हास्यास्पद झाली असती. तुम्ही बऱ्याच कुशलतेने व यशस्वीरीतीने आपला मार्ग काढला. पण अलीकडे कॉंग्रेसची कार्यकारी मंडळी वहावत चालली; व ती जबाबदारी आपण घेऊ नये म्हणून कमिटीशी आपला संबंध तोडून टाकावा असे तुम्हास वाटू लागल्याचे दिसते. वर्किंग कमिटीचे विचार म्हणजे एकट्या गांधीचे विचार असेच सध्या झाले आहे, व त्यांच्या धोरणात गेल्या बारा महिन्यात जे जे प्रचंड चढ-उतार झाले ते पाहिले म्हणजे शर्थ व कींव वाटते. वादळ उठल्याची त्यांना मौज वाटते, पण वादळामागून येणाऱ्या देवताचा कोप होऊ नये म्हणून ते शांतिपाठ गाऊ लागतात. आपल्याच कृत्याने उत्पन्न झालेल्या परिणामांना तोंड देण्याइतके खंबीर पोलादी अन्तःकरण या गृहस्थाजवळ नसावे याचा खेद वाटतो. देशांतील चळवळ या वेळी इतक्या परमोच्च कोटीला पोचली असतांना तिला नीट सावरून नेता येऊ नये, व अत्यंत अयोग्य वेळी गांधीच्या मनावर मृदुतेचा पगडा बसावा हे देशाचे दुर्दैव होय ! " ( ता. १७ फेब्रुवारी १९२२ )

त्याच विषयावर आणखी एक, सुरतेचे गोठोसकर यांचे, ता. १८ फेब्रुवारीचे खालीलप्रमाणे पत्र मला आलेः—

" बार्डोलीचा बार फुकट गेला " हा अग्रलेख वाचून आपण एकदर महाराष्ट्राचे हृद्गत सर्वांना स्पष्टपणे समजावून दिले आहे अशी आमची तर पूर्ण खात्री झालीच आहे. परंतु येथील आमचे गुर्जर बंधू यानाहि त्या लेखाने इतके थक्क करून टाकले की, तो लेख वाचण्यास केसरीची सारखी मागणी होत जाहे. येथील बहुतेक विचारी व पुढारी गुर्जर बंधू आपल्याच धोरणाचे असून आता पुढे महाराष्ट्र काय करतो इकडे डोळे लावून राहिले आहेत. येथील लोकवार्ता अशी आहे की, लोकमान्य आज हयात असते तर ही वेळ आली नसती; व आपण दिग्दर्शित केलेल्या विचारावरून आपण जे कार्य कराल त्यांत येथील जनतेची पूर्ण मदत व

सहानुभूति आहे ही खात्री आपण बाळगावी. आम्हा सर्व मंडळीस लोकमान्यांची नेहमी आठवण होत असून आपण त्यांच्या मागे त्यांचे कार्य योग्य दिशेने चालू ठेविले आहे याचीहि पूर्ण जाणीव आम्हास आहे. ''

बारडोलीच्या अयशस्वी चळवळीचे धोरण प्रमुख कॉंग्रेसभक्तांनाहि अप्रिय होते. आणि त्या नंतर दिल्लीच्या ऑ. इं. कॉ. कमिटीत गांधीच्या निषेधाचा ठराव येण्यापर्यंत मजल जाणार होती ती टळली इतकेच. पण गांधीहि मनांतून टरकले. आणि यापुढे कांही दिवस त्यानी राजकारणातून लक्ष कमी करून ' विधायक ' नांवाच्या कार्यक्रमावर लावून आपले वैशिष्ट्य उरवावे असे योजिले. पण या कार्यक्रमांत कॉंग्रेसलाहि ओढण्याचा गांधीचा विचार दिसून आला. रा. बापूजी अणे यांच्या लक्षांत ही गोष्ट येऊन ते मला यवतमाळहून ता. ४ मार्च १९२२ च्या पत्रांत लिहितात :—

'' बंगाल व पजाबमधील प्रतिनिधि मनामध्ये बरेच नाराज आहेत असें दिल्लीच्या सभेत दिसून आले. बहुतेक सर्वांच्याच मनात असंतोष होता. पण कांही महत्त्वाचे फेरफार करावेत असा शब्द मात्र कोणाच्याच तोंडून बाहेर येईना. कारण महात्माजी सिंहासनावरून उतरून राजसंन्यास करतील ही त्याच्या मनात भीति! महात्माजींचे मुख्यपद कायम राहून इतर गोष्टी घडून याव्या असे त्यांना वाटते. पण आता पुढे मागे लवकरच कॉंग्रेस ही एक 'सोशल सर्व्हिस'ची संस्था होणार, व आपणाला या अधिकारी मंडळींशी तंटे करावे लागणार, हे मला निश्चित दिसत आहे. आपण राष्ट्रापुढे एक जोरदार व लोकास चकित करून सोडील असा कार्यक्रम ठेवणार आहो असे गांधी म्हणतात. पण असल्या भाषेचा आतां मला वीट आला आहे. कॉंग्रेसच्या सभासदांनी म्हणे अमूक अटी पाळाव्यात! असा कार्यक्रम अवनतिकारक आहे इतकेच नव्हे तर देशांतील कार्यकर्त्या लोकाची त्याने पागापांग झाल्याशिवाय राहाणार नाही. समाजातील खालचे व वरचे वर्ग यांच्यामध्ये कृत्रिम भावना उत्पन्न होऊन तंटे लागतील. ही आपत्ती मला बिनतोड व दुस्तर दिसते; व आपल्या सारख्या वरिष्ठ मंडळींनी यावेळी काळजीपूर्वक विचार करून व धैर्याने पुढे होऊन या लोकांना थोपवून धरले पाहिजे. राष्ट्राचे संरक्षण करण्याला या खेरीज दुसरा मार्ग नाहीं. मुंजे यानी, भोपटकर वगैरे मंडळीसह तुम्ही इकडे येण्याबद्दल, तुम्हाला लिहिलेच आहे. आपण सर्व एकत्र होऊं आणि आपला वेगळा कार्यक्रम पुढे मांडून तो अमलात आणू असे निश्चयाने सांगूं. मग

ऑ. इं. काँ. कमिटी त्याचा अंगिकार करो अगर न करो. बंगाल पंजाब व मद्रास येथील लोक आपल्याला खास मिळतील. तुमच्याच निर्णयावर आम्ही ही सर्व गोष्ट सोपविली आहे."

पण लवकरच गांधीच्यावर खटला होऊन काँग्रेसचे लक्ष वेगळ्या विषयाकडे वळले. याविषयी बापूजी अणे मला लिहितातः—( ता. २१ मार्च १९२२ )

"नुकतेच गांधी व बॅंकर यांना झालेल्या शिक्षेचे वर्तमान कानी आले. गांधीना सहा वर्षांची शिक्षा ठोठावली जाईल अशी मला कल्पनाहि नव्हती. टिळक व गांधी याच्या काल्पनिक साम्याची जज्जाला भुरळ पडली. गांधीजीच्या तुरुंगवासामुळे आपल्या नव्या कार्यक्रमाची कल्पना थोडी पुढे ढकलावी असे मला वाटूं लागले होते. पण मध्यतरी कलकत्त्याहून परत येताना मि. बमनजी भेटले. त्यांनी एक चिठ्ठी दासबाबूकडून आणली आहे असे ते म्हणाले. डॉ. मुंजे यांनीं ती उतरून घेतली आहे. तिचा सारांश असा की, "प्रॉव्हिंशियल ऑटॉनमी मागावी. नवीन निवडणुकी करतां उभे रहावे. संप वगैरे करून करबंदीपर्यंत चळवळ भिडवावी. वर्किंग कमिटीची पुनर्घटना करावी. मवाळ लोकांना थोपवून धरावे, व महात्माजीच्याबद्दल फारसे कांहीच न बोलता हा नवा कार्यक्रम पुढें आणावा. दासबाबूंची ही चिठ्ठी खरी असल्यास बगालप्रांताला हाताशी धरून पुढे कांहीतरी करण्याची आशा आहे. दासबाबूंच्या पत्राबद्दल तुम्हाला काय वाटते? तुम्ही ते पत्र पाहिलेच असेल.

"मुळशी पेठ्यांतील चळवळ सपशेल तोंडघशी पडली हे ऐकून वाईट वाटलें. पण मुळशीच्या मावळ्यांनीच आपला नैतिक पाठिंबा दिल्याशिवाय स्वतः पुढे होऊन लोकांनी ही चळवळ करण्यांत फारसे तथ्य आहे असे मला वाटत नाही. किंबहुना ते तयार नसताना इतरांना ही चळवळ करण्याला अधिकारच नाहीं. या बाबतीत सर्व हिंदुस्थानला केलेल्या जाहीर विनतीचा कांहीहि उपयोग होणार नाहीं असे आपल्या मित्रांना माझे मत मी कळविलें आहे. मावळ्यांना जमीन विकावयाचीच नसली तर गोष्ट निराळी. पण तसे नसल्यास त्यांच्या नांवावर इतरास लुडबुड करण्याचा हक्कच रहात नाही."

यानंतर सर्व महाराष्ट्रीय पक्ष मिळवून स्वतंत्र धोरण ठरविण्याचा आमचा निश्चय कायम झाला. पण त्याला प्रारंभ म्हणून पेण येथें महाराष्ट्राची परिषद आम्ही

भरविली. तीत या प्रश्नाला उघड तोंड फुटले. परिषदेचे अध्यक्षपद खाडिलकरांना दिले होते. तथापि त्यांचे विचार वेगळे परिषदेचे वेगळे हे दिसून आले. परिषदेच्या ठरावांचे निर्णय अगदी 'पोल' घेऊन मते मोजून करण्यांत आले, ते फेरवाल्यांच्या बाजूचेच झाले. पण परिषदेची हकीकत वाचून डॉ. मुंजे मला लिहितातः—

“ महाराष्ट्र पक्षाच्या तत्त्वाकरितां पण कॉन्फरन्समध्ये चांगलीच खडाजंगी उडाली असे वर्तमानपत्रावरून दिसते. खाडिलकर अध्यक्ष असताना आपल्या मित्रमंडळीनी मोठाच जय मिळवून लढाई मारली त्याबद्दल फार समाधान वाटते. आपल्या टिळक–पक्षात असलेले सख्य मोडून लोकमान्याच्या मृत्यूनंतर अवघ्या दीड वर्षात त्याची वाताहत झाली, व हाच तो पूर्वीचा टिळकांचा महत्तम व बलिष्ठ पक्ष काय अशी भ्रात पडून शका येऊ लागली. पण याहिपेक्षां काळजाला घरे पाडणारी गोष्ट म्हणजे, सद्‌बुद्धीने व मित्रभावाने महात्माजीच्या चुका वेळोवेळी महात्माजीना दाखवून व पटवून दिल्या तरी, आपलेच कांही मित्र व खांद्याला खांदा लावून काम करणारे कार्यकर्ते यानी उठून आपणांविरुद्ध गैरसमज पसरविण्याचे व्रत अनुसरावे ही होय. राष्ट्रीय सभेचा कार्यक्रम आम्ही शक्य तितका कसून अमलांत आणला, व वेळोवेळी निर्भयपणे व प्रामाणिकपणे पुढ असणाऱ्या धोक्याची सूचना महात्माजीना सावधगिरीने दिली. म्हणून गांधीचे अस्सल खरे मित्र असे आपणास मानले जाण्याऐवजी, आपण जणु काय गांधीचे शत्रु असून त्यांचे पाय पाठीमागे खेचले अशी बदनामी करण्यात येत आहे ! इमानीपणाचे हे बक्षीस ! टीकेचा हा मोह खाडिलकरानाहि आवरला नाही. पण आपले दिल साफ आहे, आणि आपल्यापैकी कोणासबंधानेहि त्याला बार्डोलीचा कार्यक्रम नापसंत आहे, असे महात्मा गांधीच्या एखाद्या जवळच्या अंधभक्तालाहि म्हणतां यावयाचे नाही. तुरुगात जाण्यापूर्वी या कार्यक्रमाखेरीज गाधी इतर कांही सांगून गेलेच नाहीत, व स्वराज्य प्राप्तीकरितां हा कार्यक्रम पुरा नाही. गांधी सहा वर्षांनी येईपर्यंत त्यांच्याकरता देशातील चळवळ थांबविण्यास आपण तयार नाही. म्हणून व्यावहारिक रीतीने राजकारण करण्याकरितां कॉ. कमिटीने देशांतील परिस्थितीचा व कार्यक्रमाचा फेरविचार केला पाहिजे. यांत खरोखर मतभेद होण्यासारखे काय आहे ! पण अशारीतीने आपल्याला यादवी व युद्ध करण्यास भाग पाडावयाचे असेल तर आम्हीहि मोठ्या निकराने लढूं हे त्यांनीं लक्षांत ठेवावें मग त्यांत वाटेल तो जगो किंवा मरो ! दुर्दैवाने या लोकांशी आज

यादवीचा प्रसंग असला तरी आपण नेहमी सरकारला एकजुटीने तोंड देऊं व भांडू.

" महात्माजीचा कार्यक्रम आपणास कितपत पसत आहे व नाही ? तसेच लोकांनी जे खोटेनाटे आरोप व गैरसमज पसरविले आहेत त्याबद्दल इनकार करणारा एक जाहिर 'मॅनिफेस्टो' आपण काढावा व धैर्याने या परिस्थितीला तोंड द्यावे असे मला वाटते." ( ता. २३ एप्रिल १९२२ )

या सुमारास महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी आमच्या पक्षाच्या हाती असून मी तिचा अध्यक्षच होतो. परतु कॉंग्रेसच्या घटनेतील अधिकाराच्या अशा या जागी राहिल्याने, मला स्वतत्र मताचा प्रसार केसरीतून व जाहीर सभातून करणे अडचणीचे वाटू लागले. कॉंग्रेसचे ठराव सामान्य सभासदांवर बंधनकारक नाहीत ही तात्त्विक भूमिका मी लढवीत होतोच पण प्रातिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षाला तितके स्वातंत्र्य रहात नाही असे माझे मत असल्यामुळे, या अध्यक्षपदाचा मी राजीनामा खुषीने दिला व तो स्वीकारला जावा असा आग्रहहि धरला. या संबंधांत दोन पत्रे देतोः—

रा. पी. जी. जोशी हे एरंडोलहून लिहितातः—( ता. ६ मे १९२२ )

" तुम्ही म. प्रां. कॉ. कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला हे वाचून मनाला फार वाईट वाटले. जर तो तुम्ही परत घेतला नाही तर महाराष्ट्रावर मोठे संकट आले आहे असे आम्हाला वाटते. तुमच्यावर किती अगणित टीका केली जात आहे हे मला माहीत आहे. पण तुम्ही तेथे आहात म्हणूनच या टीकाकारांच्या जिव्हेला काही तरी आळा आहे. म्हणून तुम्ही आपला राजीनामा परत घ्यावा असे मला वाटते. पण तुमच्या मनात कदाचित लोकांचा आपल्यावर विश्वास किती आहे हे अजमावण्याचे असेल ! तथापि चौकशी कमिटी निवडण्याच्या वेळी याविषयी शहानिशा आपोआप होईलच. २१ तारखेच्या सभेत आपले बहुमत करूं व तुमच्याबद्दल विश्वास निदर्शक ठराव पास करू. आणि तुम्हाला आपला राजीनामा परत घ्यावयास लावूं. "

याचविषयी बापूजी अणे याचे पत्र खालीलप्रमाणे आलेः—" तुम्ही सध्या कोणत्या मनःस्थितीत आहात त्याची मला बरोबर कल्पना आहे व

त्यासंबंधी मला आश्चर्य वाटत नाही. महात्मा गांधींनी उत्पन्न केलेल्या भ्रमिष्टपणाच्या कल्पना टाकून पुनः राजकारणाच्या वळणावर यावे, अशा हेतूने कंबर बांधून मोहिमेस सुरुवात करण्याकरितां म्हणून जर तुम्ही आपला राजीनामा दिला असेल तर महाराष्ट्राने आपले कार्य बरोबर ओळखले असेच मी म्हणेन. इतकी वर्षे सार्वजनिक कामांत पडलेल्या तुमच्यासारख्या अनुभविक वर्तमान-पत्रकर्त्यांनें देशाला हाक मारली तर, सामान्य जनतेचेंच काय परंतु निढावलेल्या नाफेरवाल्याचेहि अन्तःकरण जागे झाल्याशिवाय राहणार नाही. ही गोष्ट ताबड-तोब तुम्ही हाती घेण्यास तुमच्या मार्गांत बऱ्याच अडचणी असतील हे मला समजते. पण हे केल्याखेरीज मात्र उपयोगी पडणार नाही हे निश्चित समजा. तात्यासाहेब, तुम्हांला खरे सांगतो की, हाताशी चरखा घेऊन कॉंग्रेसच्या सध्या मानमान्यतेच्या वरिष्ठ अधिकारी मंडळाच्या जागेमध्ये नाचण्यापेक्षा मला त्या-पासून चार हात दूर फटकून राहण्यातच आनंद वाटतो. आपल्या नेमस्त मित्रांच्या कारवाईमुळे जसे त्यांनी कॉन्स्टिटयूशनचे कुंपण आपणाभोवती उभे केले व आपण बाहेर राहिलो, त्याप्रमाणे चरक्याच्या आग्रहामुळे गांधींनी कॉंग्रेसमधील अधिकार हा निव्वळ तुरुंग बनविला आहे. या घटनेखाली इतर जागाच काय पण ऑ. इं. कॉ. कमिटीची माझी जागाहि मी साफ सोडून द्यावयास तयार झालो असतो. पण हे करतांना ज्या लोकमान्यांच्या हाताखाली २५ वर्षे राजकारणात आपण वाढलों त्याच तत्त्वावर पुनः काम करावे एवढीच इच्छा आहे. साबरमतीच्या तीरावरील आश्र-मांतून एक एक नवीन हुकूम सुटावेत, व आम्ही भ्रमिष्टपणाने त्यांचा जप करीत बसावे हे बस्स झाले. आपण सर्वच कॉंग्रेसच्या अधिकारांच्या जागांचे राजीनामे देऊन टाकू व धीटपणाने आपली मते पुढे मांडू. ही गोष्ट आपण केली तर महा-त्माजी खडबडून जागे होतील; व कार्यक्रमात एकतर आपणास इष्ट असलेला बदल घडवून आणता येईल किंवा कॉ. घटनेच्या बंधनांतून कायमचे मुक्त होऊन आपणास पाहिजे ते करण्यास अवसर सांपडेल. तुम्ही राजीनामा देणार ही गोष्ट मला पसंत आहे. पण या गोष्टी व पुढील दिशा आपण एकमताने ठरवू. या सर्व गोष्टींचे माझ्या मनावर इतके जड ओझे असल्यासारखे झाले होते म्हणून तुम्हास सविस्तर लिहिले.''

आम्हा महाराष्ट्रीयांची ही विचारसरणी या सुमारास मोतीलाल नेहरू, गांधींचे नवे पट्टशिष्य व हस्तक, यांनाहि पटू लागली होती. ता. २९ व ३०

ऑक्टोबरच्या सुमारास पंडित मोतीलाल यांनी डेहराडून येथे प्रांतिक परिषद भरविली. तिचे अध्यक्षपद त्यानी मला देण्याचे ठरविले व त्याप्रमाणे ते स्वीकारण्याची विनंति तारेने केली. पण मी ते त्या वेळी स्वीकारू शकलो नाही. अणेप्रभृति काही लोकांनाहि डेहराडून येथे निमत्रण करण्यात आले होते. या प्रातिक परिषदेस नेहरूनी आम्हास कां बोलावले असेल याची मीमासा बापूजी अणे यांनी मला ता. २५ ऑक्टोबर रोजी लिहिलेल्या पत्रात खालीलप्रमाणे केली आहे:—

"डेहराडून परिषदेकरितां हजर रहाण्याची प. मोतीलाल नेहरू यांच्याकडून मला तार आली आहे. मला दुखण्यामुळे जाता येत नाही. तथापि अशी एक शका मनांत आली की, प. नेहरूना कौन्सिल-बहिष्कारासबधाने इकडच्या काही लोकांशी चर्चा करावयाची असेल. कौन्सिल-बहिष्कारापासून उलट खाऊन पंडितजी कौन्सिल-प्रवेशाच्या धोरणाकडे वळू लागलेले दिसतात. त्यांना विरोध करणाऱ्या लोकांची समजूत त्याना घालावयाची असेल म्हणून त्यानी तुम्हाला व डॉ. मुंजे यांना डेहराडूनला येण्याविषयी तार केली असेल. तुम्ही जाणार आहात किंवा काय ?"

पडित नेहरू याचे कौसिल-प्रवेशविषयक धोरण पक्के ठरून ते पुढील डिसेबरांत गयेस प्रगट झालेच.

गंगाधरराव देशपाडे हे १९२१ मध्ये तुरुगांत गेले ते १९२२ च्या मेच्या सुमारास परत आले. ते अद्यापि स्वतःस पूर्ण नाफेरवाले म्हणत नव्हते. किंबहुना महाराष्ट्रातल्या दोनहि विवादी पक्षात आपले स्नेहि असल्यामुळे, आपण मध्यस्थी करून कांही तडजोड करू अशी त्याना आशा वाटत होती. म्हणून त्यांनी केसरीमध्ये ता. ३० मे १९२२ रोजी खालील पत्र प्रसिद्ध केलेः—

"वि. वि. आज सहा महिनेपर्यंत मी सार्वजनिक आयुष्यक्रमांतूनच बाजूला होतों. आतां तुरुंगांतून बाहेर आल्यावर महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड, नागपूर वगैरे प्रांतांतील निरनिराळ्या मित्रमंडळीशी माझी भाषणे झाली त्या सर्वांत एकच गोष्ट मला प्रमुखपणे दिसून आली ती ही की, हल्ली राष्ट्रीय पक्षामध्ये बरेच मतभेद झालेले असून, त्याचे पर्यवसान राष्ट्रकार्य साधण्याच्या दृष्टीने इष्ट होणार नाहीं असें वाटते. पण त्या गोष्टीबरोबर दुसरीहि एक कल्पना तितक्याच ठळकपणाने नजरेस आली ती ही की, राष्ट्रीय पक्षांतील निरनिराळ्या मतांच्या

प्रमुख गृहस्थांनी एकत्र बसून, संयुक्त असे धोरण निश्चयात्मक ठरविण्याचे मनांत आणले तर ते एकंदर राष्ट्रीय पक्षाने मान्य करणे अशक्य नाही. स्वतः माझे मत तसेच असून वरील कल्पना सिद्ध करण्याविषयी जितकी खटपट करता येईल तितकी करावी अशी माझी इच्छा आहे. तथापि अशा कामास सर्वांची संमति असल्याशिवाय कोणतीच गोष्ट करतां येत नाही. सर्वांची समाति असल्यास सर्वांतर्फे एक कमिटी नेमून तिचा निकाल सर्वमान्य होण्याचा पुष्कळ संभव आहे. माझ्या मते खालील गृहस्थांची कमिटी नेमल्यास तिचा निकाल राष्ट्रीय पक्षास पूर्ण मान्य होईल. ते गृहस्थ म्हणजे—चि. वि. वैद्य ( अध्यक्ष ), अभ्यंकर, डॉ. मुजे, अणे, कौजलगी, खाडिलकर, केळकर व मी स्वतः. मी त्या कमिटीचे पडेल ते कार्य करण्यास तयार आहे. या कार्यास मदत करण्याकरितां भाषणांतून व लेखांतून हल्ली एकमेकांत चालविलेले वाद तूर्त तहकूब ठेवावे अशी माझी सर्वांस आग्रहाची विनंति आहे.'' पण या योजनेतून कांहीच निष्पन्न झाले नाही.

१९२२ च्या मे जून पासून महाराष्ट्रातील नाफेरपक्षाने बरीच उचल केली. महाराष्ट्र प्रा. कॉ. कमिटी आम्हा फेरवाल्या पक्षाच्या हाती होती याचे त्याला वैषम्य वाटू लागून, पुणे शहर व जिल्हा काँग्रेस कमिट्या आपल्या हाती आणण्याची खटपट त्याने सुरू केली. या खटपटीत त्याजकडून दगल दाडगाई यांचाहि उपयोग होऊं लागला. १९२२ च्या ऑक्टोबरात पुणे शहरांत झालेल्या निवडणुकी उधळून लावल्या गेल्या आणि पुंडाई वाढूं लागली. म्हणून आम्ही मडळीनी एक जाहीर पत्रक काढून उमेदवारीतून आपली नावे परत घेतली व जिल्हा कॉंग्रेस कमिटीवरील जागांचे राजीनामे दिले. हे पत्रक खालीलप्रमाणे :—

" रा. रा. चिटणीस, जिल्हा कॉंग्रेस कमिटी, पुणे यांस :— वि. वि. पुणे जिल्हा कॉं. क. ने अधिकार दिलेल्या कार्यकारी मंडळाने ठरविल्याप्रमाणे निवडणुकीचें काम योग्य रीतिने तीन तास चालू असतां कांहीं ' नाफेरवाल्या ' मंडळींनीं बेकायदेशीर तक्रारी करण्यास सुरुवात केली.

" ज्या कोणत्या तक्रारी असतील त्यांचा निर्णय मागाहून रीतिप्रमाणे लावितां येईल, पण निवडणुकीस हरकत करूं नका, असे जि. कॉं. कमिटीचे अध्यक्ष श्री. ज. स. करंदीकर यांनी सांगितले असतां, आम्ही ' सत्याग्रह ' करणार असे म्हणून, ' नाफेरवाल्या ' मंडळीनी गडबड गोंधळ करून निवडणुकीचे

काम बळजबरीने थांबविले. पोलिंग ऑफिसर यांना काम चालवूं दिले नाही. यास्तव ' नाफेरवाल्या ' मंडळीची नियमाप्रमाणे वागण्याची इच्छा दिसत नाही. हीच स्थिति पुढील निवडणुकींतहि घडून येण्याचा संभव दिसतो. याकरिता आम्हांपैकी उमेदवार म्हणून ज्याची नांवे जाहीर झाली आहेत त्यांनी आपआपलीं नांवे परत घेतली आहेत. तसेंच वरील कारणाकरितां आम्ही खाली सह्या करणारे जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अधिकारी व कार्यकारी मंडळाचे सभासद आज रोजी आपआपल्या जागाचे राजीनामे देत आहोत. ते जि. कॉ. कमिटीच्या साधारण सभेपुढे ठेवावेत,'अशी विनंति आहे. कळावे. तारीख २५ ऑक्टोबर सन १९२२."

न. चि. केळकर, वामन मोरेश्वर पोतदार, अनंत वासुदेव फडणीस, वि. गं. केतकर, गणेश विनायक देवधर, रामकृष्ण गोपाळ भिडे, ना. पु. कर्वे, गंगाधर विश्वनाथ गोखले, विश्वास बळवंत डावरे, भालचंद्र गणेश ठकार, बाळुभाई किकाभाई, रंगनाथ ग्यानोबा लडकत, रघुनाथशास्त्री पटवर्धन, गोपाळ हरी धारप, दा. वि. गोखले, न. वि. गाडगीळ, गमनाजी पिताजी, कृ. गो. लोहोकरे, बाबूराव भाऊराव फुले, दत्तात्रय नारायण गोडसे, शंकर गणेश लवाटे, गोपाळ सदाशिव पळसुले.

यांत रा. न. वि. गाडगीळ हे एक आहेत हे वाचकानी ध्यानांत घ्यावे.

असहकारितेच्या वादांत आम्ही फेरवाले लो. टिळकाचे नांव ओढीत नव्हतो. पण नाफेरवाले ही गोष्ट आग्रहाने करीत. म्हणून टिळकांचे नाव वादांत ओढण्याचा एक मासला देण्यासारखा आहे तो असा. कै. विसूभाऊ राजवाडे हे चालू राजकारणांत कधीहि भाग घेत नसत. शिवाय त्या विषयातील त्यांच्या मताला कोणी फारसा मान देत नसत. कारण ते कोणत्या क्षणाला उलट सुलट काय बोलतील याचा नेम नसे. पुण्यांतील अग्रेसर नाफेरवाले वासुकाका जोशी. त्यांनी राजवाडे यांना खुषीत आणून असहकारितेच्या समर्थनार्थ एक लेख 'चित्रमय-जगतां'त लिहिवून प्रसिद्ध केला. त्याला 'संबध-द्रावलन' असे कौतुकास्पद नांव दिले होते. राजवाडे यांच्या राजकीय मतांची आम्हाला पर्वा नव्हती. परंतु त्यांच्या इतिहास संशोधकत्वाची पुण्याई या वादांत असत्पक्षाच्या बाजूने खर्ची पडणार होती, म्हणून मला त्यांच्या लेखावर टीका करणे भाग पडले. त्या संबंधानें ता. ५ सप्टेंबर १९२२ च्या केसरीतला उतारा खालीं देत आहे:—

" जुन्या इतिहासाचे संशोधन करणाराना प्रचलित राजकारणासंबंधाने आपली मते व्यक्त करण्याचा अधिकार इतर कोणाहि इतका पोचतो ही गोष्ट आम्हास मान्य आहे. तथापि लोकांना प्रत्यक्ष दिसणाऱ्या ऐकू येणाऱ्या गोष्टीसंबंधाने अशा संशोधकांनी भ्रामक विधाने केली किंवा अपसिद्धांत प्रतिपादले, तर त्यांच्या संशोधनावरील लोकांचा विश्वास कमी होणे स्वाभाविक आहे. ही विद्यावर्धनावर एक प्रकारची आपत्ति होय. सर वॉल्टर रॅले हा तुरुंगांत बसून जगाचा इतिहास लिहीत असतां, आपल्या शेजारी घडणाऱ्या गोष्टीसबधाने आपली समजूत खोटी कशी ठरली हे त्याला दिसून येतांच, त्याने तोपर्यंत लिहिलेल्या जगाच्या इतिहासाचे आपले बाड निराधार म्हणन जाळून टाकले असे म्हणतात ! आमचे एक विद्वान मित्र व इतिहाससशोधक हे प्रचलित राजकारणावर लिहिण्याच्या भानगडीत आजपर्यंत फारसे पडले नाहीत ही त्याची देशावर कृपा होय. कारण एका मासिक पुस्तकांत प्रचलित राजकारणावर त्यानी जो एक लेख नुकताच लिहिला आहे तसे लेख वरचेवर लिहिण्याचा प्रसंग त्यांचे स्नेही त्याच्यावर दुर्दैवाने आणतील तर, त्याच्या इतिहासविषयक सिद्धातांच्या प्रमाणावर अविश्वासाची आपत्ति अधिक ओढवत जाईल अशी भीति आम्हास वाटते. ' असहकारिते'ला ' सबंधत्वालन' हे जे नवीन नांव त्यानी शोधून काढले त्याच्या योगाने 'असहकारिता' शब्दाची व्याख्या न झाल्यामुळे, त्या शब्दाचा आधीच असलेला गूढार्थ अधिक गूढ—अतएव अधिक पवित्र—होण्यास पुष्कळच मदत होईल यांत शका नाही ! तथापि "गाधीनी कॉंग्रेसचे बहुमत काबीज केल्यास आपल्या अनुयायांसह गांधीना एकनिष्ठ साहाय्य करण्याचे टिळकानी वचन दिले होते " असे जे एक विधान त्यानी या लेखाच्या शेवटी केले आहे ते मात्र अत्यंत ' चित्य ' व 'भोळे' आहे असे कष्टाने म्हणावे लागते.

" लो. टिळक व सदर सशोधक यांची गांठ टिळकाच्या मृत्यूपूर्वी किती वर्षे पडली नव्हती हा भावी सशोधकाना एक विषयच होऊन राहण्यासारखा आहे. ज्या अस्सल प्राथमिक पुराव्याविषयी ते नेहमी इतका योग्य आग्रह धरतात त्या सदराखाली हे विधान मुळीच पडण्यासारखे नसून, निवळ 'बखरवजा' आहे असे आम्हास तरी वाटते. अंतःपुराव्याच्या दृष्टीने तर हे विधान विशेषच 'चिंत्य' होय. गांधीनी आधी स्वतः कॉंग्रेसचे बहुमत काबीज करावे व मग मदत करण्याचे वचन टिळकांनी द्यावे ही गोष्ट, टिळकांचा स्वावलंबी व कर्तेपणाचा स्वभाव

ज्यांना पुरा माहीत होता त्यांना कधीहि खरी वाटणार नाही. दुसऱ्यांनी आधीं तरवार चालवून लढाई जिकल्यानंतर मग रणांगणावर जाऊन लूट गोळा करण्यास मदत करणे हे टिळकाच्या स्वभावांतच जर नव्हते, तर असले स्वाभिमान-विरोधी वचन त्यानी दिले असेल हे सभवतच नाही. शिवाय गांधीनीं स्वपराक्रमाने कॉग्रेसचे बहुमत जिकल्यावर मग त्यांना टिळकांच्या मदतीची परवा असण्याचे तरी कारण काय उरते! तात्पर्य, अतर्बाह्य दोनहि प्रकारच्या पुराव्याकरून सदर संशोधकांनी दिलेली माहिती खरी नाही असे आमच्या लहानशा सशोधक बुद्धीस वाटते. असहकारितेचा सर्व कार्यक्रम, त्यातील कारणमीमासेसह, मला आपला सर्वस्वी पटतो! असे नुमतेच हे सशोधक म्हणते तर शब्दप्रामाण्यप्रिय अशा त्याच्या असहकारिता-वादी मित्रांना बहुमोल मदत झाली असती. पण वर दर्शविलेल्या त्याच्या 'भोळ्या' बखरीने विनाकारण घात केला असेच म्हणावे लागते! आनदाची गोष्ट त्यातल्या त्यात इतकीच की, सुरतेच्या बखेड्यासबधाने यानी असाच एक विस्तृत लेख लिहिला होता. त्यानतर पधरा वर्षांनी लिहिलेला त्यांचा हा दुसराच असला लेख असावा. हेच प्रमाण पुढे राहिल्यास असली सदोष माहिती प्रसिद्ध करण्याची चूक फिरून त्याच्या हातून पधरा वर्षे होणार नाही. दरम्यान राजकारणाचा इतका खच पडेल की, भावी इतिहाससशोधकांना ती एक मेजवानीच होऊन राहील."

गया कॉग्रेस नतर लवकरच १९२३ मध्ये स्वराज्यपक्षाची स्थापना झाली तिचा जाहीरनामा खाली देत आहे:—

"गयेस भरलेल्या राष्ट्रीय सभेनें जो कार्यक्रम आंखला आहे त्यानें स्वराज्याची प्राप्ति लवकर होईल असे वाटत नसल्यामुळे, व ज्या विषयांचा सदर कार्यक्रमांत अतर्भाव होणे जरूर होते त्यांचा अतर्भाव झाला नसल्यामुळे, आम्ही राष्ट्रीय सभेच्या छत्राखालीच एका नव्या पक्षाची स्थापना करीत आहो. शांततेच्या व हक्कदारांच्या सर्व मार्गांनी स्वराज्य प्राप्त करून घ्यावयाचे हे राष्ट्रीय सभेचे ब्रीद व अनत्याचारी असहकारितेचे तत्त्व आम्हास मान्य आहे. ह्या पक्षाचे अध्वर्युत्व देशबंधु चित्तरंजन दास यांस आम्ही देत असून पं. मोतीलाल नेहरू, श्रीयुत बी. एन्. ससमल, विठ्ठलभाई पटेल व चौधरी खलिकुझमा यांस चिटणीस नेमीत आहो. या पक्षाची संघटना जानेवारी महिन्यांत व्हावयाची आहे. अध्यक्ष व चिटणीस यांनीं कार्यक्रम व कायदेकानू ठरवून ते चिटणीस

ठरवितील त्या वेळी व त्या ठिकाणी सभासदांपुढे विचाराकरितां मांडावे. ऑ. इ. कॉंग्रेस कमिटीच्या व राष्ट्रीय सभेच्या मिळून ११० सभासदांनी आणि प्रतिनिधींनी यावर सह्या केल्या आहेत. त्यांतील काही प्रमुख गृहस्थाची नावे पुढील-प्रमाणे—चित्तरजन दास, हकीम अजमलखान, प. मोतीलाल नेहरू, विठ्ठलभाई पटेल, न. चि. केळकर, मुकुंदराव जयकर, सी. एस्. रगाअय्यर, व्ही. अभ्यंकर, बी. एस्. मुंजे, म. श्री. अणे, ल. ब. भोपटकर, दा. वि. गोखले, बी. एन्. ससमल, टी. आर्. फूकन, जम्नादास मेहता, सुलेमान कादर, फिरोजुद्दिन, ए रंगास्वामी अय्यगार, व्यकट रगम् नायडु, लाला दुनीचंद ( अंबाला ), एस्. ई. स्टोक्स, राघवेंद्रराव, श्यामसुंदर भार्गव, जयदेव नाकवीय पांडे, हरकर्णनाथ मिश्र, श्रीप्रकाश, सपूर्णानद, रुचिराम सहानी, कुमारी सोज्वली, स्वामी रामानद, अबदुल कादर, टी. ए. शेरवानी, मौ. मसूदअली, खलिकुझमा खोजा.''

स्वराज्यपक्षाची स्थापना झाली आणि यापुढे गांधींचे व माझे जुळणार नाही ही गोष्ट स्पष्ट झाली. तथापि गाधींच्या सबंधाने माझ्या मनांत असलेली आदरबुद्धि इतर कारणाकरिता शिल्लक होती हे महादेवभाई देसाई जाणून होते. त्याचे प्रत्यतर एका प्रसगाने अकस्मात आले. ता. १८ मार्च ( १९२३ ) हा महात्मा गाधींच्या तुरुंगवासाचा प्रथम वार्षिक दिवस असल्यामुळे 'यग-इडिया' पत्राचे स्थानिक सपादक महादेवभाई देसाई यांनी सदर पत्राचा एक मोठा खास अक काढण्याचे योजिले होते, व त्याकरितां लेख पाठविण्याविषयी अनेक लेखकांना विनतिपत्रे धाडली. विशेषतः महात्माजीच्या खटल्याच्या दिवशी कोर्टात हजर असणाऱ्या गृहस्थांना त्या प्रसंगाच्या आपल्या आठवणी लिहून पाठविण्यास त्यांनी विनति केली होती. पण या कामी त्यांची इतकी निराशा झाली की, ही निराशा म्हणजे 'मी केलेल्या नसल्या उपद्व्यापाचे प्रायश्चितच की काय' असे त्यांना 'यंग-इंडियां'त उघड लिहावे लागलें! नाही म्हणावयाला सरोजिनीदेवींनी मोजक्या आठ ओळी लिहून पाठविल्या! पण देसाईभाई यांची अपेक्षा फक्त एके ठिकाणीच सफळ झाली व ती मजकडून. 'यंग-इंडियां'त घालण्याकरितां खटल्याच्या आठवणीचा सुमारे तीन कॉलमायेवढा लेख मी महादेवभाईना पाठविला. त्यासंबंधाने माझे आभार

मानतांना देसाई लिहितात " माझी विनंति ताबडतोब व मित्रभावाने मान्य केली अशी एकट्या केळकरांनीच."

याशिवाय ते आपल्या पत्रांत लिहितात " मी पुष्कळांना लेख मागितले पण कोणाकडून लेख आला नाही. हे तर झालेच पण त्यांजकडून लेख आले असते तरी तुमच्याइतके चटकदार व डोळ्यापुढे खरे चित्र उभे करविणारे वर्णन दुसऱ्या कोणासहि लिहिता आले नसते असे मी म्हटले, तर त्यात मी तुमची तोंडदेखली स्तुति करतो असे खचित होणार नाही." माझ्या उत्तमांतल्या इंग्रजी लेखांपैकी तो एक आहे असे मीहि अभिमानाने म्हणू शकतो. ही हकीकत येथे देण्याचे कारण इतकेच की, केळकर हे म. गाधीचा द्वेष करतात व त्यांना शिव्य देतात असा एक खोटा आरोप नाफेरवाले आपमतलबीपणाने लोकात पसरवीत होते. व्यक्तिशः महात्माजीविषयी माझा कोणताहि लेख पाहिला तरी त्यांत त्यांच्या खऱ्या गुणांची स्तुतिच आढळली असती. या विषयावरील माझी व्याख्याने ऐकणारांसहि हाच अनुभव आला असेल. उलट कित्येक नाफेरवाल्यांनी पूर्वी संभाषणांत महात्माजीना ठेवलेली नांवे आज उच्चारली तर काय प्रकार दृष्टीस पडेल हे मी सागूं इच्छित नाही.

स्वराज्यपक्ष स्थापल्यावर मोतीलाल नेहरू यानी विलायतेतील चळवळी कडेहि थोडेसे लक्ष दिले. असहकारितेचा उदय झाल्याबरोबर ही चळवळ माव ळली होती. लंडनमधील 'इंडिया' वर्तमानपत्र बद पडले. इतकेच नव्हे तर आम्ही विलायतेतील लोकांकडून सहानुभूति घेणे हे अपमानास्पद आहे असे गांधी म्हणू लागले. पण नेहरूप्रमाणे विठ्ठलभाई पटेल यांचा परराष्ट्रीय राजकारणावर विश्वास होता ही गोष्ट अखेरपर्यंत दिसून आली. स्वराज्यपक्ष स्थापन झाला याचा अर्थ अयुक्तिक अशी असहकारिता थाबली. तेव्हां विलायतेतील उदारमतवादी पक्ष, मजूरपक्ष, हिंदुस्थानच्या पुढाऱ्याशी बोलणे चालणे करण्याचा सभव आहे असे वाटू लागले. आणि येथपासून पुढें सर्वपक्षीय पुढाऱ्यांची परिषद भरवून स्वयंनिर्णयात्मक हिंदी राजकीय घटना बनवीपर्यंत नेहरूंना अशी आशा वाटत होती की, या घटनेची चर्चा होण्याकरितां सरकार एखादी गोलमेज परिषद भरवील. टिळकपक्षाच्या कार्यक्रमांत परदेशी राजकारण ही एक ठराविक बाब म्हणून असे हे प्रसिद्धच आहे. टिळकांनी विलायतेस डेप्यूटेशनें पाठविण्याचा आग्रह धरला. स्वतः विलायतेस

हाती घेतली. १९२० साली विठ्ठलभाई पटेल यांना फिरून विलायतेस जाण्याला पैशाची मदत केली. तेच धोरण आम्हीहि पुढे चालू ठेवले. १९२४-२५ साली आमच्यापैकी विलायतेस जाण्यासारखे कोणी रिकामे नव्हते. पण सत्यमूर्ति हे जाण्यास तयार झाले व गेलेहि. त्याना मी केसरीकडून पांचशे रुपयाची मदत केली. १९२९ साली सायमन कमिशनचा रिपोर्ट बाजूला पडल्यानंतर, नव्या गोलमेज परिषदेची तयारी दिसू लागल्यावर, असहकारिता थाबवावी, परराष्ट्रीय राजकारण करावे, विलायतेचे निमत्रण आल्यास ते स्वीकारावे, असे आमच्या महाराष्ट्रपक्षाचे मत होते. या गोष्टीवर प्रकाश पाडणारी खालील दोन-तीन पत्रे देत आहे.—

( १ )

( ता. २० मार्च, १९२४ )—असेब्लीने बजेट फेटाळून लावले, तसेच नागपुरास मुजे याच्या पक्षाने दिवाणांचा पगार नामंजूर केला, या गोष्टीनी इकडे फार मोठा परिणाम झाला. लॉर्ड रेडिंग नरमाईला येऊन त्यानी कांही सूचना केल्या पण इडिया ऑफिसात ऑलिव्हियर यांनी त्या फेटाळून लाविल्या. हे समजताच मजूरपक्षांत फार मोठा गवगवा झाला. तथापि मॅक्डोनाल्ड यांची आपल्याला सहानुभूति आहे; व आयर्लडशी समेट करण्याकरिता डी व्हॅलेरा वगैरेना जसे इग्लडने गोलमेज परिषदेला बोलाविले त्याप्रमाणे हिंदी पुढाऱ्यांना परिषदेला बोलावून चर्चा करावी असे मॅक्डोनाल्ड यांना वाटते. मीहि त्याना देशबंधु दास, मोतीलाल नेहरू, तुम्ही केळकर, जिना, अन्सारी, रगाचारियर, मुंजे, इब्राहिम रहीमतुल्ला इतक्यांची नावे सुचविली आहेत. मुख्य प्रधानांची व माझी पुनः उद्यां भेट होईल. ( एम्. आर. बमनजी, लडन. )

( २ )

( ता. १७ एप्रिल, १९२४ )—ता. २४।२५ च्या सभाना तुम्ही येत आहा हे पाहून आनद वाटतो. सध्यां स्वराज्य—पक्षाची घटना केवळ नांवाची आहे. म्हणून जनरल कौन्सिलची सभा न बोलाविता कार्यकारी मंडळाचीच सभा बोलवावी असे पटेल यांनी व मी ठरविले. येत्या सभेत पक्षाची घटना व नियम नीट रीतीनें ठरवू. हाऊस ऑफ कॉमन्स सभेत हिंदी राजकीय परिस्थितीचा प्रश्न निघून मजूरपक्षाच्या मदतीची आशा फोल ठरली. तेव्हां आपणच आतां कंबर बांधून आपली मागणी रोखठोक व धैर्याने पुढे मांडली पाहिजे. ( मोतीलाल नेहरू, जुहू. )

( ३ )

( ६ मार्च, १९२५ )—माझ्या विलायतच्या प्रवासाकरितां तुम्ही रु. ५०० पाठविण्याचे कबूल केले याबद्दल आभारी आहे. बजेट सेशनपर्यंत रहावे असा मित्रांनी आग्रह केल्यामुळे एप्रिलमध्ये मी निघावयाचे ठरविले आहे. ( सत्यमूर्ति, मद्रास. )

( ता. २ जुलै, १९२४ )—"अहमदाबादच्या वाटाघाटीत आपणाला यश बऱ्यापैकी मिळाले असे तुम्हीहि म्हणाल. हे काम मोठ्या श्रमाचे व दमछाकीचे होते. अद्यापिहि आपण विश्रांति घेण्याची सोय नाही ! जो जो प्रसंग सांपडेल त्याचा उपयोग करून घेत पुढे गेले पाहिजे. नाहींतर बार्डोली-प्रमाणे कायमची माघार घेऊन नामशेष व्हावे लागेल अशी मोठी आणी-बाणीची वेळ आली आहे ! मी पुन्हा अहमदाबादेस जाऊन म. गांधींची भेट घेणार आहे. गेल्या आठवड्यांत घडलेल्या गोष्टींवर त्यांनी पूर्ण विचार केलाच असेल, म्हणून त्यांच्याशी एकदां अखेरचें बोलणार आहे. तसेंच स्वराज्यपक्षाची संघटना करणे व पक्षास आर्थिक सहाय्य मिळवून देणें हींहि कामे आहेतच. मुंबई अगर अहमदाबाद यांच्याइतके पुणे श्रीमंत नाहीं हे खरे. पण पुण्याने मला रिक्तहस्ते परत पाठवून चालणार नाही. ही मी एक-प्रकारें तुम्हाला आगाऊ नोटिसच देऊन ठेवतो असे म्हणाना. ( मोतीलाल नेहरू, राजकोट )

( ता. ९ जुलै, १९२४ )—पुणे म्युनिसिपालिटीने लो. टिळकांच्या पुतळ्याचा अनावरण समारभ माझ्याहस्ते करावयाचे ठरविले त्याबद्दल मान्यतेची तार काल मी तुम्हाला पाठविलीच आहे. एकदर सर्व परिस्थितीचा विचार केला असतां असे वाटते कीं, म. गांधींनी जे अव्यवहार्य धोरण राजकारणांत ठेवले आहे त्यावर या प्रसंगाने फार मोठा परिणाम होईल. अर्थात् अलाहाबादेहून त्याकरिता पुष्कळच हेलपाटे मारावे लागतील. पण त्याला इलाज नाही. तुम्ही पाठविलेली सर्व बिले पोहोचली. अहमदाबादला घडलेल्या गोष्टी पाहून आपणाहि आपल्या पक्षाची संघटना मोठी बळकट व सुयंत्रित केली पाहिजे असे मला वाटूं लागले आहे. हल्ली त्याचाच मी येथें बसून सगळा विचार करीत आहे. मंबईला जो आमचा सत्कार झाला व पक्षाला मान्यता

मिळाली त्या वरून मुंबईतून स्वराज्य पक्षाला कांही आर्थिक सहाय्य होईल असे वाटते. सध्या सभांतून मी फारशी भाषणे करीत नाही. विठ्ठलभाई पटेल हे पक्षावर रागावले असून स्वतःचा पक्ष काढण्याच्या विचारांत आहेत असे कळले. समजलें कां ! त्यांची माझी गांठ पडली नाही. तथापि जमनादास मेहता यांना मी भेटावयास बोलाविले आहे. त्यांची भेट झाल्यावर विठ्ठलभाईबद्दल काय करावयाचे ते ठरवूं. पक्षाचे हेतु उद्देश वगैरे इतक्यातच मी जाहिर करीत नाही. ते काम पुण्यास करूं. मुंबईत सभा भरविली तर विठ्ठलभाई पटेल हे विपर्यास करतील असे जयकरांचें म्हणणें आहे. पुतळ्याच्या अनावरण समारंभाच्या दिवशी राजकीय मतभेद बोलता येत नाहीत, म्हणून जयकरांचे म्हणणे असे आहे की त्याकरितां वेगळी सभा करावी. तथापि ही गोष्ट मी सर्वस्वी तुमच्याकडे सोपवितो.

अहमदाबादला मी दुसऱ्यांदा खेप घालून म. गांधीना भेटलों. पण त्याचा कांही उपयोग झाला नाही त्यावरून माझे असे निश्चित मत झाले आहे की, महात्माजी हे त्यांच्या भोवती असणाऱ्या बेछूट ( Unscrupulous ) लोकांच्या हातीं सांपडले असून स्वतःचे मत काय हेच त्यांचे त्यांना नीटसे कळेनासें झाले आहे. ( मोतीलाल नेहरू, मुंबई. )

( ता. २० ऑक्टोबर, १९२४ )—म. गांधीचा कार्यक्रम, मिसेस बेझंट यांचे बेत, व कॉंग्रेस मधील समेट याबद्दल महाराष्ट्रांत कसे काय लोकमत आहे हें कळण्याची इच्छा आहे. मराठ्यांतील तुमचे तेजस्वी लेख वाचून तुम्ही काय करणार याची कल्पना करतां येते. महाराष्ट्रांतले पुष्कळसे डेलिगेट यंदा बेळगांवला येतील तर त्यांचा आम्हांला फार उपयोग होईल. 'स्वदेशामित्रम् 'ला एकादा छोटा लेख पाठवितां आल्यास पहा. ( रंगास्वामी अय्यंगार, मद्रास. )

( ता. ६ डिसेबर, १९२४ )—तुम्ही इतक्या मोठ्या बहुमताने ऑ. इं. कॉं. कमिटीवर निवडून आला याबद्दल तुमचे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो. पुढच्या वर्षी म. गांधी कॉंग्रेसचे अध्यक्ष होणार, तोपर्यंत महंमदअली हेच अधिकार गाजविणार. डेलिगेटांची यादी तुम्ही पाठविलीत, बरे केलेत. तुम्ही तीनशें नांवें पाठविलीं असतीत तरीहि आम्ही त्यांना निवडून आणले असते. ( पं. मोतीलाल नेहरू, अलाहाबाद. )

कौन्सिलवादी स्वराज्यपक्षाची स्थापना झाली ही गोष्ट गांधींना मनापासून आवडली नाही. पण ते काय करणार? त्यांच्या अगदी जवळच्या हस्तकांपेक्षां मोठे महत्त्वाचे असे दास-नेहरू-प्रभृति पुढारी स्वराज्य पक्षाला लाभल्यामुळे त्यांना नमते घ्यावे लागले. आणि अखेर उभयपक्षांत एक करार ठरला. त्याचा मुख्यार्थ असा होता की 'कोणी कोणाच्या वाटेस जाऊ नये व परस्पराविषयी बंधुभाव मनांत बाळगावा.' स्वतः गांधी हा करार पाळीत, पण त्यांचे नाफेरवाले अनुयायी तो पाळीत नसत. म्हणून याविषयी तक्रारी होत. १९२४ च्या डिसेंबरात बेळगांवच्या राष्ट्रीय सभेच्या वेळी हा वाद वाढला तेव्हा गांधींनी आपले धोरण स्पष्ट शब्दांनी व्यक्त केले. त्यासंबंधी त्यावेळी एका वर्तमानपत्राच्या बातमीदाराने हकीकत प्रसिद्ध केली तिचा उतारा देतो.—

"श्री. केळकर यांनी या सुमारास महात्माजींस सांगितले की, तुम्ही आम्हां स्वराजिस्टांना जसा उपदेश चालविला आहे, तसाच नाफेरवाल्यानाहि थोडासा उपदेश स्वराजिस्टांना मदत करण्याविषयीचा करा. महात्माजींनी ताबडतोब ते मान्य करून खालील उद्गार काढले.

"माझी विनंति केवळ स्वराज्य पक्षाला उद्देशून केलेली नाही. नाफेरवाल्यांमध्ये सुद्धां चरख्यावर विश्वास नसलेले लोक आहेत असे मी ऐकले आहे. म्हणून नाफेरवाल्यांना माझे असे सांगणे आहे की, या कराराकडे त्यांनी तत्त्वदृष्टीने पाहून त्याप्रमाणे वर्तन केले पाहिजे. स्वराज्य पक्षाच्या लोकांनी त्यांच्या कार्यात मदत करण्याचा माझा विचार आहे. मी मुद्दामच विचारपूर्वक "त्यांचे कार्य" असे म्हणतो. त्यांचे कार्य हे केवळ त्यांचे अगर कॉंग्रेसचे नसून ते सबंध राष्ट्राचे आहे. चरखा हे काय नुसते खेळणे आहे असे म्हणण्याचा त्यांना अधिकार आहे. तसेंच कौन्सिल हे काय नुसते बुजगावणे आहे असे त्यांना विचारण्याचा मलाहि अधिकार आहे. कौन्सिल हे नोकरशाहीशी खेळावयाच्या युद्धातील एक महत्त्वाचे हत्यार आहे असे स्वराज्यपक्षीय म्हणतात. पण मला ते तितके पटत नाही. परंतु स्वराजिस्टांना मदत करणे व कॉंग्रेसची त्यांना मंजुरी मिळवून देणे ही गोष्ट मला करतां येईल असे करून घेणे हा त्यांचा हक्क आहे. ही कांही कॉंग्रेस त्यांच्यावर मेहरबानी करीत नाही. हे कळावयास मला थोडा वेळ लागला खरा; पण ते कळल्यावर मनांत सुद्धां त्यांना मी विरोध करतां कामा नये. उलट ते जे काय करीत आहेत ते बरोबर आहे असेंच समजण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. पण याचा अर्थ जर असा

होईल की, मी सरकारी बिलावर जाहीर व्याख्याने द्यावी व जाहीर सभा भरवाव्या तर ते मला शक्य नाही. स्वराज्यपक्षाशी करार करतांना मी हे कबूल केलेले नाही. मी या गोष्टी करावयास नाखुष नाही, परंतु या गोष्टी केल्या पाहिजेत याबद्दल माझी खात्री झाली पाहिजे. जर तशी खात्री झाली तर मी शभर नबरी स्वराज्य-पक्षीयच होऊन जाईन. आज मला त्याना द्यावा तसा पूर्ण सहकारितेचा पाठिंबा देता येत नाही; तरी पण मी त्यांना त्याच्या कामात, करारांत समाविष्ट केलेल्या बाबीपुरता, पूर्ण पाठिंबा देईन. उदाहरणार्थ, सरकार जर त्या पक्षाचा नाश करण्याचा प्रयत्न करू लागले तर मी त्याच्या खाद्याला खादा लावून उभा आहे असे आढळून येईल. कौन्सिलच्या कामाच्या बाबतीत मी त्यांना जी मदत करीन तिच्या स्वरूपाशी, त्याच्या चरख्याच्या बाबतीत मला होणाऱ्या मदतीचे स्वरूप सर्वस्वी जुळणारे नाही; व हे करारात स्पष्टच घातले आहे. स्वराज्यपक्ष हा तर हिंदुस्थानचा शत्रु नव्हेच; पण शिवाय त्या बिचाऱ्या अराजकाना सुद्धां मी हिंदु-स्थानचे शत्रु समजत नाही. मात्र येथे अशा तुलनेला जागाच नाही. नाफेरवाल्यांना मी असे स्पष्ट सागतो की, चरख्यावर तुमचा विश्वास नसेल तर अखेर तुम्हाला असे आढळून येईल की, तुम्हास अत्याचाराशिवाय दुसरा उपाय राहाणार नाही. चरख्यावर विश्वास नसेल तर तुम्हास कौन्सिलातच जावे लागेल; कारण तेथे जाऊन निदान तुम्हास कांही कैदी तरी सोडविता येतील. अदमानांतील अगर येरवड्यांतील कैदी सोडवावे या हेतूने स्वराज्य-पक्षाचे लोक कौन्सिलांत गेलेले नाहीत. त्यांनी जे ध्येय ठेऊन कौन्सिलप्रवेश केला, त्या ध्येयाला ते बरोबर जागले आहेत. चरख्याला तोड म्हणून फक्त कौन्सिलेच रहातात; व म्हणूनच इतके लोक आज कौन्सिलाकडे वळले. कौन्सिलांत गेलेले लोक राष्ट्राच्या बुद्धीचे निवडक नमुनेच आहेत असे अखेर म्हणावेच लागते. ते कसलेले योद्धे आहेत. पडित मालवीय व नेहरू, तसेच दास व केळकर, याचा स्वार्थत्याग स्वयप्रकाशी आहे हे कोण नाकबूल करील ? मतभेद हे जगाच्या अखेरीपर्यंत चालतच रहातील. स्वराज्यपक्षाच्या लोकाना चरख्याच्या बाजूस वळवतां आले म्हणजेच नाफेरवाल्याचा खरा जय झाला असे म्हणतां येईल. लोक चरख्याच्या पक्षास मिळत नसतील तर त्याचे कारण इत-केच की, लोकांना त्याची उपयुक्तता पटलेली नाही. ती देखील दाखविली पाहिजे. श्रद्धेची फार मोठी वाण आहे. प्रत्येक नाफेरवाल्याला माझे असे म्हणणे आहे की, तुम्ही आपल्या तत्त्वांना, अनुसरण्यास योग्य असाल, व खरोखर तुमची वृत्ति

अहिंसावादी असेल तर तुम्ही स्वराज्यपक्षीयांशी हस्तांदोलन करून 'आम्ही केले ते सर्व विसरून आम्हाला क्षमा करा' असे तुम्ही म्हणाल. कोणाच्याहि विरुद्ध मनांत वाईट बुद्धि ठेवण्याचा तुम्हास अधिकार नाही. इतकेच नव्हे तर त्याच्याविरुद्ध ब्रहि काढण्याचे तुमचे काम नव्हे. याहून जास्त चागले मला तुम्हाला कांहींच सांगता येणार नाही. वर्षअंखेर सर्व प्रकार ठीक होतील."

स्वराज्य-पक्षाची स्थापना होऊन दोन वर्षे होतात न होतात तोंच त्यांत तट पडण्याचा प्रसग आला तो ना. ताबे यांनी नागपूर गव्हर्नरच्या कार्यकारी मंडळावरील जागा स्वीकारल्याने. तांबे स्वराज्य-पक्षांतर्फे कौन्सिलांत निवडून आले होते व त्या पक्षाच्या बळावर कौन्सिलचे अध्यक्ष झाले होते. त्यांना कार्यकारी मंडळांत स्थान द्यावे असे गव्हर्नर साहेबांना सहजच वाटले. कारण या मंडळात बिनसरकारी मनुष्याकरिता एक जागा राखून ठेवण्याची प्रथा पडली होती. यापूर्वी ती नेमस्त लिबरल पक्षातील एखाद्या पुढाऱ्याला द्यावी म्हणून सर मोरोपंत जोशी यांना देण्यात आली होती. पण आता त्या पक्षाला मागे टाकून राष्ट्रीय-स्वराज्यपक्ष पुढे सरसावला होता. तेव्हा ती त्याजकडेच जाणे प्राप्त. आणि कायदेमंडळाच्या प्रत्यक्ष अध्यक्षाला ती देऊ करणे याहून उचित गोष्ट कोणती ? पण प्रश्न होता तो हा की, स्वराज्य-पक्षांतील सभासदाने ती घ्यावी यांत औचित्य आहे किंवा नाही ? स्वराज्य-पक्षाने त्या वेळी अधिकाराच्या जागा स्वीकारू नये असे धोरण ठरविले होते ही गोष्ट खरी. आणि स्वराज्य-पक्षाच्या अधिकारी मंडळापुढे हा प्रश्न आला असता तर ती जागा घेऊ नये असा निर्णय झाला असता. ती जागा ताबे यांनी कोणास न विचारतां घेतली हे गैर झाले. ती घ्यावयाची तर स्वराज्य-पक्षाच्या सभासदत्वाचा राजीनामा त्यांनी आधी द्यावयास पाहिजे होता. तोहि रीतसर दिला नव्हता. मागाहून दिला. नागपूर स्वराज्यपक्ष शाखेच्या कांही लोकांना तांब्यांनी देऊं केलेल्या जागेची वार्ता अगदीच माहीत नसेल असे म्हणवत नाही. तथापि या पक्षांतील महाराष्ट्रीय लोक टिळकांच्या परंपरेत वाढलेले. यामुळे मिळेल ती जागा घ्यावी, राबवावी, ताबडावी असे त्यांचे खरे खासगी -मत होते. यामुळे त्यांनी तांब्यांना अप्रत्यक्ष संमति दिली असण्याच्या सभव होता. कसेहि असो. तांबे यांनीं ती जागा स्वीकारल्याचे प्रसिद्ध होताच खासगी स्नेही या नात्याने मी त्यांना, वैयक्तिक अभिनदनाची तार पाठविली. पण ती प्रसिद्ध होतांच वादळ उठले.

केवळ पहिला आवेग मनांत आल्याबरोबर ज्या गोष्टी कित्येक वेळां होतात त्यातलीच एक माझी ही तार देखील होती. तांबे यांची माझी जुनी ओळख होती. विशेषतः टिळकांच्या वकिलीचे काम त्यांनी औरंगाबादेस वकील असता स्नेहबुद्धीने फुकट केलें, आणि त्यांचे वकीलपत्र ताईमहाराज प्रकरणी माझ्या जोडीने दाखल होते. ही गोष्ट माझ्या मनांत वर उसळून आली. आणि व्यक्तिशः त्याचा उदय झाला याच्या अभिनंदनार्थच ती तार होती. तीत स्वराज्य पक्षाला उद्देशून एकहि शब्द नव्हता. तो विचार मनांत खराच असता तर मी तोहि काही का लिहिले नसते ? जो विचार मनातच नव्हता तो तारेत कोठून येईल ! पण त्या बरोबर आता मला असेहि वाटते की, मी ती तार पाठविण्यात थोडी घाई व चूकच केली. माझ्यासारख्या पुढाऱ्याने, या तारेचा कांही विपरित अर्थ व परिणाम होईल की काय, या गोष्टीचाहि विचार करावयास पाहिजे होता. कारण केवळ शिस्तीच्या अभिमानाकरितां, १९२३ साली, माझे वडील बंधू म. चि. केळकर हे खानदेशाकरितां स्वतंत्र उमेदवार म्हणून कौन्सिल निवडणुकीला उभे असतां, माझ्या स्वराज्यपक्षाच्या उमदेवाराना यश मिळावे यासाठी मी बधूंना मते देऊ नये असे सभांतून सांगितले. त्यापेक्षां तांब्याना अभिनदन न पाठविणे ही कांही अवघड अशी गोष्ट नव्हती. पण चूक झाली खरी. तांबे याच्या कृत्याबद्दल अणे यांना काय वाटले हा एक वादाचा प्रश्न पुढे निघाला. त्या संबधी तपस्वी बाबा परांजपे यानी खालील उद्गार काढल्याचे केसरीत प्रसिद्ध झालेले आहे. ते म्हणाले, "श्री. बापट यांचे पत्र मी वाचले. सरकारच्या ताब्यांतील जागांवर सरसकट बहिष्कार घालण्याच्या स्वराज्य पक्षाच्या धोरणाला वऱ्हाडांतलि आम्ही बहुतेक कार्यकर्ते ( यात बापूजीहि येतात ) त्या वेळी अगदीं कंटाळलो होतो. अशा परिस्थितीत श्री. तांबे यांनी गृहमंत्रिपदाची जागा स्वीकारली. त्यांत शिस्तीचा भंग झाला एवढीच तक्रार वऱ्हाडच्या मडळीत मुख्यतः होती. माझी स्वतःची तर श्री. तांबे यांच्या या कृत्याला पूर्ण संमति होतीच; पण बापूजीचीहि या कृत्याला 'मूकसंमति' होती, अशी माझी समजूत आहे. त्यानंतर या प्रश्नावर जो वाद झाला, त्यांत एकंदरीत त्यांची भूमिका तटस्थाची होती."

पण अणे यांचा हा तटस्थपणा पुढे राहिला नाही. जयकर व मी यांच्याबरोबर तेहि स्वराज्यपक्षांतून निघून प्रतिसहकारपक्ष काढण्यास तयार झाले.

वर माझी चूक मी कबूल केलीच आहे. आणि स्वराज्यपक्षाचे अध्यक्ष पं. मोतीलाल नेहरू यांनी खासगी रीतीने या प्रश्नाची चर्चा केली असती तर उलट सुलट कांही खुलासे होऊन हा प्रश्न तडीला लागला असता व स्वराज्यपक्ष मोडलाहि नसता. पण या निमित्ताने पंडितजींचे आम्हा महाराष्ट्रीयांविषयीचे कलुषित मन ढवळून बाहेर पडले. त्यांनी एकदम जाहीर मुलाखत देऊन 'महाराष्ट्रीयपक्ष हा स्वराज्य-पक्षरूपी शरीराचा कुजलेला भाग आहे. तो कापूनच काढला पाहिजे' अशी घोषणा केली. माझा जसा अविचार तसाच पंडितजींचा हा प्रत्यविचार. आणि मग वादाला जे तोंड लागले ते केव्हाहि आवरलेच नाही. अणे यांची तांब्यांना पूर्व समति नव्हती हे खास. पण प्रतिसहकारपक्षाला मिळाल्याने त्यांची पश्चात् मूक संमति मिळाली हे सहजच ठरले. नागपूर व वऱ्हाड प्रांतांत तांबे यांच्या निषेधाची एकहि सभा झाली नाही. किंवा एकाहि वर्तमानपत्राने त्यांना दोष दिला नाही. सर्वांची भूमिका एकच. ती अशी की, तांबे यांनी आधी पक्षाचा राजीनामा देऊन मगच प्रधानपद स्वीकारले असेल असे वाटले. पण तो जरा मागाहून दिला. म्हणजे चूक झाली ती जागा पत्करली या मुख्य गोष्टीत नव्हे, तर राजीनामा योग्य वेळी पटविला नाही या गौण उपांगभूत गोष्टीत.

तांबे प्रकरणी वाद नेटाला लागायला दुसरीहि कारणे होती. आपल्या पायाखाली काय जळते आहे याचा पंडितजींनी कधी विचार केला नाही. म्हणजे उदाहरणार्थ, तांब्यांच्या नेमणुकीला नावे ठेवणारे पंडितजी स्वतः स्कीन लष्करी कमिटीचे सभासद झाले, व सर्व लोकांनी त्याचा निषेध केल्यावर मग त्यांनी तिचा राजीनामा दिला. स्कीन कमिटीच्या सभासदत्वाला भत्ता होता ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती जागा सरकारनियुक्त 'बेजबाबदार' होती. प्रथम जागा पत्करली, काम केले, व मग राजीनामा दिला यात पंडितजींनी काय साधले ? 'बुंदसे गयी तो हौदसे आती नही' हीच म्हण सार्थ झाली. तसेच त्या वेळच्या वर्किंग कमिटीचे सभासद बॅ. सेनगुप्त यांनी अशीच मौज केली. याच सुमारास बॅ. एस्. आर. दास यांना गव्हर्नर जनरलचे लॉ मेंबर नेमले. त्यांच्या मेजवानीला सेनगुप्त हे गेले ! मग ही गोष्ट वर्किंग कमिटीवर असतां सेनगुप्त यांनी कशी केली ? ती संमति नव्हे काय ? पण पंडितजींनी सेनगुप्त यांच्यावर शिस्त धरली नाही. असेंब्लींत सरकारी मंत्र्यांना 'तुमचें तोंडहि पाहूं

नये ' असे टाकून बोलणारे पंडितजी सध्याकाळी त्याच मंत्र्याबरोबर बसून ख्याली-खुशाली करीत व मद्याचे पेले झोकीत. ते तरी कोणाला मानवत होते ?

प्र. स. पक्षाची रीतसर स्थापना १९२५ च्या नोव्हेंबर महिन्यांत झाली तरी त्याआधी मे महिन्यापासून त्या पक्षाच्या तत्त्वाने आपले डोके वर काढले होते. या गोष्टीचा खुलासा मी ता. १७ नोव्हेंबरच्या केसरीत स्पष्टपण केला होता. त्याचाच उतारा या खाली देतो. म्हणजे वेळोवेळी प. नेहरूना मी युक्तिवादाच्या आधारावर जी उत्तरे देत होतो त्याचा पुनरुच्चार करण्याचे कारण उरणार नाही. तो उतारा असा—

" प्रतियोगी सहकारितेचा वाद गेल्या तीन आठवड्यात अवचित पुढे आला ही गोष्ट निराळी. पण शात मनाने विचार करणारास असे दिसून येईल की, निदान गेल्या मे महिन्यापासून तरी हा वाद त्याच्यापुढे आहेच. त्या महिन्यात सातारा येथे महाराष्ट्र प्रातिक परिषद भरली होती, तीत जो एक महत्त्वाचा ठराव सर्वसमत झाला त्याची आठवण आज वाचकांना विस्ताराने करून देणे अवश्य झाले आहे. वस्तु प्रत्यक्ष डोळ्यापुढे असली तरी मन विशेष कारणाने ओढले गेले नसले तर तिचे सविकल्पक ज्ञान होत नाही; असाच कांहीसा प्रकार या ठरावासबधाने झालेला दिसतो. तर प्रथम हा ठराव काय होता ते सांगून नंतर त्यावरून हल्लीच्या वादावर त्यामुळे काय प्रकाश पडतो ते पाहू.

"सातारा प्रातिक परिषदेतील ठराव क्रमाक ९ हा खाली दिल्याप्रमाणे होता—

"देशाच्या राजकारणात मदाई उत्पन्न झाल्याबद्दल परिषदेला वाईट वाटत आहे. परिषदेचे असे स्पष्ट मत आहे की, ही मदाई उत्पन्न होण्यास सर्वस्वी नसले तरी बव्हशी कारण म्हणजे कॉंग्रेसला स्वतःचा असा राजकीय कार्यक्रम नाही हे होय. कॉंग्रेसने आपले सर्व लक्ष राजकारणाशी सबध नसलेल्या विधायक कार्य-क्रमाकडे लावले आहे; व देशातील अनेक राजकीय पक्षात एकी नाही म्हणून ही परिषद ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीला अशी शिफारस करते की, देशांतील राजकीय जीवनांत चैतन्य उत्पन्न होण्यासाठी कॉंग्रेसने राजकीय कार्यक्रम हाती घ्यावा. अमृतसर कॉंग्रेसप्रमाणे कॉंग्रेसमध्ये इतर पक्ष सामील होण्यासाठी अवश्य तर सर्वांस इष्ट अशा दुरुस्त्या स्वराज्य-पक्षाच्या कार्यक्रमांत कराव्या, व अशा रीतीने प्रस्तुतच्या राजकीय झगड्यात कौन्सिलातून व बाहेरून सरकाराशी तोड देण्यास अनुकूल अशी परिस्थिति निर्माण करावी "

" वरील ठरावांत मुख्यतः खालील गोष्टी येतात. ( १ ) राष्ट्रीय सभेने स्वतःचे असे राजकीय धोरण स्वीकारावे. ( २ ) मूळाधार स्वराज्य पक्षाचा कार्यक्रम हाच आपला कार्यक्रम असे तिने मानावे. ( २ ) तथापि वरील दोहो-पेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट ही की, राष्ट्रीय सभा जी हल्ली एकपक्षीय होऊन एकांगी अशी बनली आहे ते तिचे स्वरूप जाऊन ती पूर्वीप्रमाणे सर्वपक्षीय व्हावी. ( ४ ) पण राष्ट्रीय सभा सर्वपक्षीय व्हावयाची तर माझाच कार्यक्रम आहे तसाच राष्ट्रीय सभेने घेतला पाहिजे असा आग्रह स्वराज्य पक्षाला धरतां याव-याचा नाही. याकरिता त्या कार्यक्रमांत तिला अवश्य तो फेरबदल करता आला पाहिजे. आणि ( ५ ) असहकारितेच्या युगाचा आरंभ होण्यापूर्वी अमृत-सर येथे झालेल्या राष्ट्रीय सभेच्या प्रसंगी जो कार्यक्रम मान्य झाला, त्याचा पुन-रुद्धार केल्यास तोच आजहि सर्वसमत कार्यक्रम असा मानला जाईल, आणि राष्ट्रांत पुनः ऐक्य नादूं लागेल. वरील ठराव विठ्ठलभाई पटेल व केळकर यांच्या सम-तीनें रचला गेला, व जरी केळकर यानीच तो पुढे माडला तरी विठ्ठलभाई यांची त्याला संमति होती. सुताची वर्गणी राष्ट्रीय सभेतून काढून टाकण्याविषयीचा दुसरा ठराव असून तो पुढे माडण्याचे काम पटेल यानी स्वतः स्वीकारले. तात्पर्य, पटेल व केळकर यांच्या संमतीने व सहाविचाराने नाफेरपक्षास अप्रिय व बंडखोरीचे वाटण्यासारखे हे दोन ठराव सातारा परिषदेने मान्य केले.

" त्यानतर ध्यानांत घेण्याची गोष्ट ही की, सातारा प्रांतिक परिषदेला पुष्कळ लोक आले, तरी आले नव्हते असेहि पुष्कळच होते. म्हणून अशांची संमति या ठरावाना आहे की नाही हे निश्चित करण्याचा प्रयत्न परिषदेनंतर करण्यांत आला. पाटणा येथें ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटी लवकरच भरावयाची होती, आणि तिज-मध्ये राष्ट्रीय सभेचे धोरण आगाऊ ठरवावयाचे होते. याकरिता वरील ठरावावर आणि हातसुताची वर्गणी काढून टाकण्यांत यावी या ठरावावरहि महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचें मत अजमावण्याकरितां मतपत्रिका बाहेर पाठविण्यांत आल्या. तेव्हां जून व जुलै या दोन महिन्यांत तीन हजारांवर मतें या दोनहि ठरावांस अनुकूल अशी लिहून आली व आणखीहि पुढे येणार होती. परंतु मध्यंतरीं पाटणा येथील सभेच्या आधीच महात्मा गांधी यांनी वरील ठरावांतील तत्त्वें जवळ जवळ मान्य केल्याचें 'यंग इंडिया' पत्रांत प्रसिद्ध केले, यामुळें पुढे मतपत्रिका मागविण्याचे बंद करण्यांत आलें. जे कार्य व्हावयाचें ते

परस्पर झाले, आणि मग महाराष्ट्राचे मत अमुक म्हणून ऑ. इं. कॉ. कमिटीपुढे मांडण्याचे कारणच पडले नाही. दीड-दोन महिन्यांत हाती आलेल्या सह्यांची जिल्हावार वांटणी खालीलप्रमाणे आहे —

| जिल्ह्याचे नांव | सह्याची सख्या |
|---|---|
| १ रत्नागिरी | ८४१ |
| २ ठाणे | ३९६ |
| ३ कुलाबा | ३५६ |
| ४ प. खानदेश | ३४६ |
| ५ पुणे | ३४१ |
| ६ सातारा | २४८ |
| ७ मुंबई | १९८ |
| ८ नाशिक | १०१ |
| ९ पूर्वखानदेश | ९१ |
| १० अहमदनगर | ४७ |
| ११ सोलापूर | ४३ |
| एकूण | ३००८ |

"असो. महाराष्ट्रास संमत असलेल्या या ठरावात अमृतसर येथील राष्ट्रीय सभेचा जो उल्लेख करण्यात आला आहे त्याचे मर्म काय हे आतां पाहूं. ही सभा १९१९ सालच्या डिसेबरांत भरली होती. त्यापूर्वी पार्लमेंटमध्ये नवा गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्ट मंजूर झाला होता. हिंदुस्थानांतून विलायतेस गेलेली अनेक शिष्टमंडळे परत आली होती. महात्मा गांधी पूर्णपणे उदयोन्मुख झाले होते. पंजाबांत लष्करी कायद्याने अटकेत पडलेले कित्येक पुढारी, तसेच उभयतां अलीबंधू, हे कैदेंतून नुकतेच सुटून परत आले होते. टिळक व दास दोघेहि जोरांत होते. अशा परिस्थितीत भरलेल्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्षस्थान पंडित मोतीलाल नेहरू यांचेकडे होते. अर्थात् या सभेत झालेली भाषणे, ठराव आणि त्यांत स्पष्ट दिसून आलेली विचारसरणी हिला तेव्हां तर महत्त्व होतेंच, पण आज कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेपासून राष्ट्रानें हातीं घेतलेला असहकारितेचा प्रयोग, ९९ हिश्शांनीं व त्या प्रयोगाच्या मूळ पुरस्कर्त्यांच्या संमतीनेंच, समाप्त झाल्यावर

अमृतसरच्या या ठरावांना, भाषणांना व धोरणांना पुनः एक वेळ पहिला दिवस असल्यासारखे ताजे महत्त्व येत आहे. नित्य व नैमित्तिक या गोष्टीचा विवेक कोणासहि सुटलेला नाही. राष्ट्रालाहि तो सुटत नाही. असहकारितेचा प्रयोग नैमित्तिक होता, व प्रायः या ज्ञानामुळेच एक वर्ष या मुदतीला महात्मा गांधी यांनी लेखांत व भाषणांत वारवार घोळविले. कोणतीहि नैमित्तिक गोष्ट ही कालाच्या दृष्टीने मर्यादित अवधीची असते हा जनतेचा अनुभव असल्यामुळे एक वर्ष हा शब्द त्याच्या तोडांतच नव्हे तर मनातहि बसला होता. या एक वर्षाची पुढे दोन, तीन, चार वर्षे झाली. अखेर गतवर्षी असहकारितेचे पचप्राण म्हणजे जे पंचबहिष्कार ते राष्ट्रीयसभेच्या कार्यक्रमातून पुसून टाकले जाऊन, विधायक कार्यक्रमापैकी खादीकार्याच्या एका प्राणावर या राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाची धुगधुगी शिल्लक उरली ! शरीरात जीव आहे की नाही हे ओळखण्याला नाकाशी सूत धरणे हा एक उपाय आहे. पण या दृष्टीने पाहताहि सूतसघ एक तर वेगळा काढण्यात आला, आणि त्यात दुसऱ्यातिसऱ्या कोणाचा हात नसतां त्याचेहि कार्य मोठ्या धडाडीने चालले आहे असे फारसे ऐकू येत नाही. आणि म. गांधी हे राष्ट्रीय सभेच्या सर्वाधिकाराचे जागी स्वराज्यपक्षाची नेमणूक करण्यास तयार झाले आहेत, व स्वराज्य पक्षाचा कार्यक्रम राजकारणाच्या स्वरूपाचाच रहावयाचा ठरला आहे. अशा परिस्थितीत जुन्या अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाची आठवण लोकाना झाली तर त्यात काय नवल ? पहिला बाण कोठे पडला याचे विस्मरण होऊन तो हरवतोसे वाटले तर दुसरा बाण त्याच दिशेने फेकला असता दुसरा पडतो त्याच्या आसपास पहिला सापडतो असा तिरंदाज लोकांचा अनुभव आहे. राजकारणांतला धागादोरा तुटून त्याचे टोक डोळ्याआड झाले. पण फिरून तोच दोरा वळवून पुढे चालवावयाचा असल्यास वरील तिरदाजी युक्तिसारखीच युक्ति करावयास पाहिजे. आणि अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाच्या आसपास धुंडाळल्यास राजकारणाच्या तुटलेल्या धाग्यादोऱ्याची टोके पुनः हाती लागतील असा विचार करूनच समयज्ञ अशा सातारा प्रांतिक परिषदेने त्या ठरावाची लोकांना आठवण करून दिली.

"या ठरावांत असे स्पष्ट म्हटले आहे की, सुधारणा निराशाजनक व अपुऱ्या आहेत हे खरे; तरी त्यांना भरपूर राबवून घेऊन त्यांचा होईल तितका उपयोग पदरांत पाडावा. आणि उरलेल्या अधिकाराचे भांडण पूर्वीसारखेच चालू ठेवावे. हा

ठराव महात्मा गांधी, लो. टिळक व देशबंधु दास या तीन व्यक्तींच्या एकीकृत विचारांचा परिणाम होय. आणि जेव्हां एकट्या लोकमान्यांचे, किंवा एकट्या महात्माजींचे, किंवा एकट्या देशबंधूंचे मत एकेकटे घेतले असतां लोकांस पटत नाहीसे दिसते, तेव्हां या त्रिमूर्तींच्या एकवाक्यतेने बनलेल्या ठरावाहून अधिक स्थान राष्ट्राला दुसरे कोणते मिळणार ? गेल्या अकातील अग्रलेखामध्ये एक हात ते गच्च पकडण्याला गुंतवून, दुसरा हात उरले ते मिळवावयाला मोकळा ठेवावा व चालवावाहि, अशी जी दोन हातांच्या कामाची वांटणी श्रेयस्कर म्हणून दर्शविली, तीच मूर्तिमत अमृतसरच्या ठरावांत दिसून येते. मिळालेल्या सुधारणा हातांत पुऱ्या पकडून त्यांचा पूर्ण उपयोग करण्याच्या कामीं चार बोटांचा हल्ली स्वराज्य-पक्ष उपयोग करीत आहे; त्याऐवजी त्याने मन मोकळे करून पाचहि बोटांचा उपयोग करावा; पण तो आजपासून नव्हे तर १९२७ सालापासून करावा, येव-ढेच आम्ही म्हणत आहो. आणि आमच्या म्हणण्याला प. मोतीलाल नेहरू यांचा आजचा नसला तरी पाच वर्षापूर्वीचा आधार आहे हे आम्ही सुदैव समजतो.

"१९१९ सालच्या अमृतसरच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्षस्थान पंडित मोती-लाल नेहरू यानी मंडित केले होते. त्या वेळी अध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणांत खालील मजकूर आहे " सुधारणांचा स्वीकार केलाच पाहिजे अशा प्रकारचे राष्ट्रीय सभेचे कर्तव्य ठरत नाही, किंवा उलटपक्षी पार्लमेंटाने ज्या सुधारणा देऊं केल्या त्या नाकारून निरुपयोगी करण्याचीहि शक्ति किंवा अधिकार राष्ट्रीय सभेला नाही. राजकीय सुधारणा मागण्याच्या कामी राष्ट्रीय सभेने अधिकार चालविला, व तो देण्याच्या कामी पार्लमेंटाने आपला अधिकार चालविला. कित्येक बाबतीत राष्ट्रीय सभेच्या मताला पार्लमेंटने मान दिला, कित्येक बाबतीत आपलेच म्हणणे चालविले. पार्लमेंटच्या मनातील युक्तिवाद आम्हास काही पटतो व कांही पटत नाही. सुधारणांचा कायदा हिंदी जनतेच्या इच्छेप्रमाणे रचला गेलेला नाही, आणि राष्ट्रीय सभेने केलेल्या कमीत कमी मागणीपेक्षाहि काही देणग्या अपुऱ्या पडतात. तथापि या कायद्यामुळे जे हित होणार आहे किंवा पाऊल पुढे पडणार आहे त्याचें महत्त्व आपण मुद्दाम होऊन कमी करणे किंवा भासविणे हे योग्य नाही. आपण हे लक्षांत ठेवले पाहिजे की, या कायद्याने आम्हाला कांही सत्ता किंवा अधिकार दिला जात आहे; व आजपर्यंत ज्या देशसेवेची द्वारे पूर्णपणे आमच्या मार्गात बंद करून ठेव-

ण्यांत आली होती ती उघडली जाऊन नवे मार्ग दिसूं लागले आहेत. या स्थितीत आपणाला जे अधिकार मिळाले त्यांचा जास्तीत जास्त उपयोग करून घेणे व जे आपणास मिळाले पाहिजे पण अजून मिळाले नाही त्याकरितां सरकारच्या मागे मागणीचा तगादा करणे हे आमचे स्पष्ट कर्तव्य ठरते."

"शेवटी एकच गोष्ट सांगावयाची उरते ती ही की, पंडितजीच्या वरील उद्गारांत प्रधानमंडळे बनवून कायदेकौन्सिलांचा उपयोग करून घेणे ही गोष्ट सहजच येते. अर्थात् मी तेव्हां जे बोललो ते चुकीचे होते असे वाटले तर त्यांनी म्हणावे, तसे म्हटल्यास त्याला आमची दोन उत्तरे आहेत. पहिले असे कीं, आमचीहि आज चूक असली तर तिजमुळे केवळ चुकीखेरीज इतर कोणतेहि आरोप पंडितजींना करण्याचे कारण रहात नाही. आणि दुसरे असे की, १९१९ व १९२५ या दोन सालांतील त्यांची धोरणे परस्पर विरोधी हे निश्चित. अर्थात त्यांचे पूर्वीचे मत चुकीचे असण्याइतकाच आजचेहि मत चुकीचे असण्याचा सभव आहे. राजकारणांत मते ही प्रगमनशील असतात याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा की, ती बदलू शकतात. परंतु नव्या जुन्या मतापैकी कित्येक वेळा नव्यापेक्षां जुनी मतेच अधिक सयुक्तिक ठरण्याचा संभव असतो, आणि यामुळेच स्वराज्य पक्षांतील एकाद्या सभासदानें आजच्यापेक्षां पंडितजीच्या जुन्या मतांवर अधिक भर दिला तर हा त्याचा गुन्हा त्याला स्वराज्य पक्षांतून घालवून देण्याइतका तरी खचित भयंकर ठरत नाहीं."

प्रतियोगी-सहकार पक्षाची स्थापना १९२५ च्या नोव्हेंबरांत झाली. तेव्हां निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून त्या पक्षाविषयी कोणच्या प्रकारचे लोकमत प्रगट झाले याचे कांही नमुने देतोः—

**लाहोर, सन्डे टाइम्स**—केळकर-जयकरांना पक्षांतून काढून लाव-ण्याची धमकी देण्यांत पंडित नेहरू यांनी अविचारीपणा केला. प्रतिसहकारितेवर श्रद्धा ठेवणारे आणखी कितीतरी सभासद आहेत याची पंडितजीना माहिती नाहीं असे दिसते.

**लाहोर, ट्रायब्यून**—स्वराज्यपक्षांत यादवी माजली तिला पं. नेहरूंचा अविचारच कारणीभूत आहे. जयकर यांनीं पंडितजींना रोखठोक असाच जबाब दिला आहे. परिस्थितीप्रमाणें सहकारिता किंवा अडवणूक हीच प्रतिसहकाराची

व्याख्या ठीक होय. स्वराज्यपक्ष तरी याहून वेगळे काय करीत आहे ? ( शीखांचे वर्तमानपत्र )

**कलकत्ता, बंगाली**—केळकर-जयकर यांच्या राष्ट्रीय भावनांतील सच्चेपणा व शुद्ध हेतु, त्याप्रमाणे त्यांची सूक्ष्म व अचूक राष्ट्रीय दृष्टि, आणि त्यांच्या विचारांतील व्यवहार्यता व तर्कशुद्धता याविषयी कोणासच संशय वाटणार नाहीं. जयकर-केळकरांची प्रतिसहकारितेची मोहीम आजकालच्या राजकारणांत क्रांतिकारक ठरेल, व त्याना या मोहीमेत लोकांचा आधार मिळेल. ( बंगाल राष्ट्रीय पक्षाचे वर्तमानपत्र )

**मद्रास, न्यू इंडिया**—असेब्लींत मोतीलाल नेहरूनी आपली मागणी मांडल्यापासून स्कीनकमिटीवरील जागा स्वीकारीपर्यंत प्रतिसहकारिताच केली नाही तर काय ! या वादांत आमची सहानुभूति महाराष्ट्रीयाकडे आहे. त्यांच्या मार्गानेच तरणोपाय लवकर सांपडणार आहे. पंडितजीचा मार्ग वांकडा तिकडा वरखाली चक्राकार जातो, व त्याचा शेवट काय होणार हे कळत नाही. ( बेझंटबाईचे वर्तमानपत्र )

**दिल्ली, हिंदुस्थान टाईम्स**—प्रतिसहकार म्हणजे शक्य तेथे अडथळा करावा, नसेल तेथे तटस्थ रहावे, आणि मिळेल तेथे सत्ता बळकावून आक्रमण करीत जावे हाच उत्तम मार्ग होय. ( पं. मदनमोहन मालवीय यांचे वर्तमानपत्र )

**लाहोर, पीपल**—मुंबईच्या स्वराजिष्ट आमदारांनी दिवाणगिऱ्या पत्करण्याच्या धोरणाचा पुरस्कार केला हे योग्यच केले. या कामी प्रत्येक प्रांताला परिस्थितीप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य देणेच श्रेयस्कर होय. केवळ अडवणूक हेच जर स्वराज्यप्रक्षाचे धोरण म्हणावयाचें तर, पटेल याना असेब्लीचे अध्यक्षपद कां दिले ! निःपक्षपाती अध्यक्षापेक्षा सत्ताधीश दिवाण किंवा कारभारी यांना लोकहित साधण्याची संधि अधिक मिळते. ( लाला लजपतराय यांचे वर्तमानपत्र )

**कराची, सिंध ऑब्झर्व्हर**—स्वराज्यपक्षांतील कारभारी मंडळाचा जुलूम असह्य झाला म्हणूनच प्रतिसहकार पक्ष निघाला !

**मुंबई, कैसर-इ-हिंद**—नवा पक्ष काढण्यांत केळकर-जयकर यांना कोणताच स्वार्थ साधावयाचा नव्हता. हल्लीच्या राजकारणांत माजलेले ढोंग त्यांना

आवडत नाही इतकेच. ते सचेपणाने सरळ चालणारे पुढारी आहेत. केळकर-जयकर राजीनामे देऊन स्वस्थ बसले असते तर त्याना नीतिधैर्य नाही असेच लोकानी म्हटले असते. स्वराज्यपक्षाचे अडवणुकीचे ढोग पुरे करा असे कोणीतरी सागावयास पाहिजे होते ते काम या दोघांनी केले. त्याचे चारित्र्य निष्कलक आहे म्हणून या वादाने स्वराज्यपक्षाचे धोरण स्पष्ट व सुसगत झाल्यास राष्ट्राला तो एक मोठा लाभच होईल.

**लखनौ, वेल्थ ॲण्ड वेल्फेअर**—स्वराज्यपक्ष जर एकजात अडवणुकीचीच भाषा सदोदित अविवेकाने बोलत राहील तर राष्ट्रहित साधण्याला तो निरुपयोगी ठरेल. कानपूरच्या राष्ट्रीय सभेने प्रतिसहकार पक्षाचे धोरण पसत करावे.

**मच्छलिपट्टण, जन्मभूमि**—केळकर-जयकर कपूशी पं. नेहरूंचा जो वाद चालला त्यात महाराष्ट्रपक्षानच विजय मिळविला. हे दोघे दिवाणगिऱ्यांच्या गुळखोबऱ्याला भुलणारे कुकुबाळ नाहीत, व पडितजीच्या धमकीला भीक घालण्याइतके ते भित्रेहि नाहीत. ( हे पट्टाभिसीतारामय्या यांचे मत आहे ! )

**मुंबई, इंडिअन सोशल रिफार्मर**—पडित नेहरू याचे आव्हान महाराष्ट्राने स्वीकारले आहे. तीन वर्षाच्या अनुभवाने शहाणे होऊन कानपूरच्या राष्ट्रीय सभेने प्रतिसहकारितेच्या धोरणाला पाठिबा द्यावा हेच योग्य.

बाबु अरविद घोष हे ध्येयवादी क्रातिकारक व स्वातत्र्यभक्त असे मानतात. तथापि विशेष परिस्थितीत प्रतिसहकारिता करणे हे त्यानाहि समत होते याविषयी ता. २ मार्च १९२६ च्या केसरीतील एक उतारा याप्रसंगी यासंबधांत देण्यासारखा आहे म्हणून तो खाली देतो.

**अरविंदबाबूंचा संदेश**—सुधारणा प्रात होण्यापूर्वी जुन्या राष्ट्रीयपक्षाने जी चळवळ केली त्यांत महाराष्ट्राप्रमाणे बंगाल प्रात हा प्रमुख होता. महाराष्ट्रांत राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्याचे अखेरचे राजकीय बुद्धि "प्रतियोगी सहकारिता" किंवा "मिळालेले पदरांत घ्या व बाकीचे मिळविण्याचा उद्योग करा" हे होते. बंगालच्या राष्ट्रीय पक्षाचे तेजस्वी पुढारी बाबू अरविंद घोष यानी, पांदेचरीस जाण्यापूर्वी, आपला अखेरचा निरोप म्हणून १९१० साली जे उघड पत्र आपल्या देशबाधवांना लिहिले ते त्यांचे राजकीय 'व्यवस्थापत्र' समजण्यांत येते.

या पत्रांत अरविंदांनी "अर्धवट स्वराज्यहि स्वीकारून त्याचा पूर्ण स्वराज्य मिळविण्याच्या कामी उपयोग करा" अशा स्पष्ट शब्दांत प्रतियोगी सहकारितेचाच उपदेश केलेला आहे. हे पत्र "कर्मयोगिन्' मध्ये प्रसिद्ध झाले होते. त्यांतला प्रतियोगी सहकारितेसंबंधाचा उतारा महत्त्वाचा असल्यामुळे पुढे देत आहों—

"स्वराज्याचे पूर्ण दान पदरात पडेपर्यंत सहकारिता करण्याचे, सतत व आग्रहाने नाकारणे याच एका धोरणाला राष्ट्रीय पक्ष बांधलेला आहे असे सामान्यतः समजण्यात येते. राष्ट्रीय पक्षाच्या पत्रकारानी ही चुकीची समजूत खोडून काढण्याची खबरदारी पूर्वी घेतली नाही, कारण त्या वेळी तो एक व्यावहारिक प्रश्न नव्हता. असल्या प्रश्नाची चर्चा करण्यापेक्षां निःशस्त्र प्रतिकार व पूर्ण स्वावलंबन याचे ध्येय लोकाना मान्य कसे होईल याचीच राष्ट्रीय पक्षाला मुख्य काळजी त्या वेळी होती. पण हे उघड आहे की, वरच्यासारखा सिद्धान्त पुढे मांडणारा पक्ष हा व्यावहारिक विचारी कार्यकर्त्यांचा न ठरता आग्रही तत्त्ववादी व ध्येयमग्न लोकांचा ठरेल. जो-पर्यंत ताबा नाही तोपर्यंत सहकारिताहि नाही हे राष्ट्रीय पक्षाचे तत्त्व होय. ज्या अर्थी आम्हाला कोणत्याहि प्रकारचा ताबा दिला जात नाही त्याअर्थी तो मिळे-पर्यंत सहकारिता नाकारणे ही गोष्ट शक्य तितक्या पूर्णपणे राष्ट्रीय पक्ष उपदेशीत आहे. पण समजा, लोकांनी निवडलेल्या लोकसभेला संरक्षक जकाती बसविण्याचा अधिकार देण्यात आला तर, या हक्काचा उपयोग न करतां पूर्वीचा व्यापार-विषयक बहिष्कार चालू ठेवावा असे कोणताहि समंजस पक्ष म्हणणार नाही हे उघड आहे. किंवा समजा, लॉर्ड रे यांनी एके वेळी बेत केला होता त्याप्रमाणे शिक्षणावरील सरकारी ताबा काढून तो लोकसभेच्या हाती दिला, तर त्या शिक्षणावर बहिष्कार घाला असे कोणताहि समंजस राजकीय चळवळ्या मनुष्य सांगणार नाही. किंवा समजा, कोर्टात हिंदी न्यायाधीश नेमले, व ते अंमलबजावणी खात्याला जबाबदार न रहातां लोकांना प्रतिनिधि असलेल्या मिनिस्टराला जबाबदार राहिले, तर राष्ट्रीय पंचायती या मुख्य कोर्टांना पोषक व पुरवणी स्वरूपाच्याच राहतील. त्याचप्रमाणे ज्या कारभारांत लोकांचा ताबा बिलकुल नाही त्याच्याशी सहकारिता करण्याचे नाकारणे या धोरणामध्ये, लोक हे ज्या राज्यकारभाराचा परिणामकारक असा अवयव आहेत त्यांतहि सहकारिता करण्याचे नाकारणे ही गोष्ट येत नाही. अरेरावी देणग्या नाकारणे म्हणजे लोकांना कायमच्या मिळालेल्या हक्कांचा

उपयोग करण्याचे नाकारणे मात्र नव्हे. स्वावलंबन व निःशस्त्रप्रतिकार यांची चळवळ सुरू करण्याचा हेतु हा होता की, स्वराज्याचे निरनिराळे अंश देण्यास शांततेच्या व नैतिक दाबांच्या जोरावर सरकारास भाग पाडावे, व हे अंश न मिळाल्यास नोकरशाहीच्या संस्था नाहीशा करण्यासाठी आपल्या स्वतंत्र संस्था उभाराव्या. दिलेले हक्क लोकांनी स्वीकारल्याने पूर्ण स्वराज्याचा हक्क, किंवा पुढेमागें लोकाच्या हक्कात अरेरावीने ढवळाढवळ केल्यास निःशस्त्रप्रतिकाराचा उपयोग, या दोनहि गोष्टी कायमच्या सोडल्या असे मुळीच होत नाही. हे हक्क स्वीकारण्याचा अर्थ इतकाच की पूर्ण स्वराज्य मिळविण्याची पायरी व साधन म्हणून अर्धवट स्वराज्याचाहि उपयोग करावा."

याशिवाय महाराष्ट्र, मुंबई, वऱ्हाड, नागपूर या प्रांतांतील मराठी वर्तमान-पत्रांनीं आपले पाठबळ दिले होतेच. प्रतिसहकार पक्षाची स्थापना केल्यामुळे मी बंडखोर ठरलो असे कांही लोकांनी म्हटले तरी, त्यामुळे मी अगदी टाकाऊ ठरलो नव्हतो याचे प्रत्यंतर हेच की, या सालच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीत, नेहरू प्रभृतींनी किंवा गांधीच्या अनुयायांनी मिसेस नायडू यांच्याकरितां विशेष खटपट केल्यामुळे त्यांना पहिल्या नंबरची पण मला दुसऱ्या नंबरची मते मिळाली. कानपूरच्या राष्ट्रीय सभेच्या एका आवारांत एका चौकाला 'केळकर चौक' असें नांव देण्यांत आले होते. आणि कानपूर म्युनिसिपालिटीने ज्या चार पुढाऱ्यांना मानपत्र दिले त्यांतला मी एक होतो. १९२६ सालीं प्रतिसहकार पक्षाला कायदेमंडळांच्या निवडणु-कीत सर्वत्र यश आलें हें तर प्रतिसहकारपक्षाच्या लोकप्रियतेला आलेले मोठेच प्रत्यंतर होय.

१९२५ सालीं मुंबई क्रॉनिकल पत्रांत माझे एक टीकाकार एल्. जी. के., (लक्ष्मण गणेश खरे) क्रॉनिकलचे एक दुय्यम संपादक यांनी मजविषयी एक स्वतंत्र लेख लिहिला. त्यांत मला अनुकूल व प्रतिकूल अशी दोन्ही मते प्रकट केलेली अस-ल्यामुळे ती टीका या खाली देतो. गुण व दोष या दोन्हींकडे विवेचक दृष्टीने पाह-णारांचे म्हणणे आपणाला सर्वस्वी मान्य नसले तरी एक ग्राह्य पुरावा म्हणून तो जमेस धरावा लागतो. रा. खरे म्हणतात—"मी डेक्कन कॉलेजांत असतांना प्रि. बेन यांनी केळकरांचा उल्लेख एकदां तिरस्काराने केलेला आठवतो. पण तेच केळकर

तेव्हा टिळकाचे नमुनेदार चिटणीस म्हणून परिणति पावत होते. सतत परिश्रम करण्याची केळकरांची शक्ति ही विस्मयकारक आहे. टिळकांना एक उची दर्जाचा आणि कर्तृत्ववान मदतनीस मिळणार अशी स्वतः टिळकांची व इतरांची अपेक्षा बनत चालली होती व ती प्रत्ययालाहि आली. गेल्या वीस वर्षात त्यांनी राजकारणाचे व वाङ्मयाचे काम अत्यंत हौसेने केले. भाषा स्पष्ट समर्पक व संभावित, तथापि विषयासबधी व माहितीत अत्यत काटेकोरपणा हे गुण त्याच्या सर्व प्रकार-च्या वाङ्मय लेखनात पूर्णपणे दिसून येतात. पण एक गोष्ट गौण झाली ती ही कीं पुष्कळ काळपर्यंत टिळकाच्या छायेत दुय्यम स्थान घेऊन कार्य करण्याची जी सवय केळकरांना एकदा लागली ती टिळकाच्या मरणानंतरहि गेली नाही. एका शब्दांत सागावयाचे तर केळकराचा विनय हाच त्याचा मुख्य दोष होऊन बसला आहे ! शिवाय ते आपल्या भाषणात शुद्ध विषय प्रतिपादन कितीहि उत्तम व विनोदपूर्ण रीतीने करीत असले तरी, प्रचड लोकसभाना भावनावश करून गदगदा हलविण्यासारखे किवा उत्साहाने उठावणी देण्यासारखे मैदानी वक्तृत्व त्याना करतां येत नाही. सरकारी न्यायखात्यात ते न्यायाधीश झाले असते तर ज्यूरीला निःपक्षपातपणे खटल्यांतील मर्म समजावून देण्याच्या कामी त्यांचा हात धरणारा कोणी भेटला नसता. त्यांना मोठेपणाचे जे स्थान मिळाले त्याचीच केव्हां केव्हां अडचण झाल्याची ते भासवितात ! उडी घालण्यापूर्वी पाण्याची खोली किती असेल हे ते अजमावून पाहिल्याशिवाय राहावयाचे नाहीत. ध्येय हस्तगत करण्याची साधने ठरवितांना सुचवितांना ते आधी निर्दोष मनुष्य-स्वभावाला काय पचेल व रुचेल हे पहातात. गेल्या पांच वर्षात (१९२०-२५) त्यांनी सुशिक्षित राजकारणी महाराष्ट्रीयांची मनोभूमिका बिनचूक विशद केली आहे. ज्याला कारस्थानी खटपट म्हणतात ती त्यांना आवडत नाही; व त्यांतून ते मुक्त राहिले तर ते ऐक्य व शांतता नादवू शकतील. त्याचा राजकारणांतील प्रामाणिकपणा सर्वा-नाच केव्हांहि मान्य आहे. आपल्याला नापसत असणाऱ्या कोणत्याहि मताचा पोषाख ते आपल्या मनावर कधीहि चढविणार नाहीत. अलीकडे मेळ्यांच्या पदांतून त्याच्यावर ग्राम्य टीका होते. मुळशी–प्रकरणीं त्यांच्यावर टीकेचा भडिमार झाला. असहकारतेच्या चळवळीला धार्मिक आचरणाचें तीव्र पण विकृत स्वरूप आले ते न पटल्यामुळे ते मागे पडले. तथापि त्यांनी आपला बुद्धिभ्रंश होऊ दिला नाहीं. डोकें ठिकाणावर ठेविले आणि 'प्रतिसहकारिते'चे निशाण गंभीरपणे हाती

धरले. 'मिळेल ते घ्यावे व बाकीच्याकरतां झगडावे' या सनातनी राजकारणी धोरणाला ते चिकटून राहिले. त्यांना दगाधोपा गडबड आवडत नाही. चरखा मागे पडेल आणि असहकारतावादी सरकारशी व्यापारी पद्धतीनं लवकरच तडजोंड करूं लागतील असे भविष्यहि त्यांनी वर्तविले. तसेच देवघेव करण्यात अप्रामाणिकपणा नाही असे ते उघड प्रतिपादितात. त्यांच्याविषयी आदर असणारे ब्राह्मणेतरहि पुष्कळ आहेत. मुसलमानांना देखील ते अगदी बिन हिशेबी जहाल आहेत असे वाटत नाही. स्वतः राजपद भोगण्यापेक्षा दुसऱ्याला राजा करून त्याजकडून सूत्रे चालवावी हे त्यांना अधिक सोयीचे वाटते हे सर्व खरे, पण प्रश्न विचारावासा वाटतो की, असेब्लीमध्ये दुय्यम दर्जाचे पुढारीपण घेऊनच ते बसणार आणि आपले अनुभव दवडणार, किंवा त्याच्या गुरुप्रमाणे प्रचंड लोकसमाजाला आपल्यामागे घालून पुढारीपणाने महत्कार्य करणार? आजची स्थिति अशी आहे की ते मनात आणतील त्या उच्चस्थानाला पोचतील. ते कॉंग्रेसचे अध्यक्षहि होऊं शकतील. पण ते घेऊन टिकवितील किंवा सात्त्विक सच्चे साहित्यिक म्हणूनच त्या आवडीचे काम पुन्हा करू लागतील?" (ता. ७ ऑगस्ट १९२५)

टीकाकाराचे म्हणणे सयुक्तिक आहे. पण साहित्याची मला त्यातल्यात्यात अधिक आवड आहे हे जरी खरे असले तरी, अप्रामाणिक मताचा पोषाख मनावर आणि खादीची झूल अगावर चढविण्यास मी कबल झालो नाही यामुळेच मला राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षाचे स्थान न मिळतां कानपुरास ते श्री. सरोजिनी नायडू यांना मिळाले हे कोणीहि सांगेल. मी या मानाकरितां, मनांत इच्छा बाळगून आकांक्षा ठेवून, माझ्या मतांना व आचरणाला ढोंगीपणाने किंचित् मुरड घातली असती, व महात्मा गांधीचा खरा अनुयायी आहे असे भासविण्याचा झोक ठेविला असता, तर ते पद मला सहज मिळाले असते. पण ते मिळाल्यावर मी काय केले असते केले नसते याविषयी वरील टीकाकाराने उपस्थित केलेली शकाहि अगदीच अस्थानी आहे असे म्हणवत नाही.

गौहत्ती येथील राष्ट्रीय सभेस (१९२६) मी गेलो नाही. तत्पूर्वी आमच्या प्र. सहकारपक्षाने कौन्सिल-निवडणुकी जिकल्या होत्या आणि एका अर्थाने पंडित नेहरूंचा पाडाव केला होता. या राष्ट्रीय सभेच्या आधी एका जाहीर सभेत माझ्या धोरणाचा मी खुलासा केला व थोडासा बोधप्रद असा पूर्वेतिहासाहि सांगितला तो या खाली देतोः—

" थोडक्यांत सांगावयाचे तर असे सांगतां येईल कीं, राज्यकारभारांतली सर्व खाती जर चालू रहाणार तर त्या सर्वांचें मूळ जे कौन्सिल ते कसे बंद पाडतां येईल ! मात्र ते चालू ठेवावयाचें यापेक्षां कौन्सिलांना जास्त महत्त्व द्यावयाचे नाही. कौन्सिलात शेकडा ९० काम सरकारी व १० सभासदांच्या उपक्रमाचें असते. तेथल्या कामकाजाचा सर्व कार्यक्रम गव्हर्नर ठरवितात. अशा स्थितीत खाजगी सभासदास विशेष काम करता येणार नाहीं हें काळ्यांचे म्हणणे खरें आहे. ज्याला आपल्या जबाबदारीची जाणीव आहे तो असेच म्हणणार. तेव्हां कौन्सिल हे सर्व खात्यांचे उगमस्थान असल्यामुळे ते चालू ठेवून त्यांत सरकार जसा उपक्रम ( initiative ) घेईल त्याप्रमाणे त्याला उत्तर द्यावयाचे. उपक्रम करणारे सरकार अनुयोगी, त्याला उत्तर देणारे लोक प्रतियोगी प्रतिनिधि, हीच प्रतियोगी सहकारिता. हे तत्त्व पूर्वीचेच आणि इतके साधे व सोपे असताहि ते पुनः पटण्यासाठी पाच वर्षे व्यर्थ गेली, तरी अजून कॉंग्रेसचा त्याला विरोध आहेच !

" आतां कॉंग्रेसबद्दल म्हणावयाचे तर गौहत्तीस तिजकडून या बाबतीत काय धोरण स्वीकारले जाईल ते कोणासच सागता येत नाही. आम्ही या वर्षी कॉंग्रेसला कां जात नाही असा प्रश्न आम्हाला विचारण्यांत येतो. त्यांची कारणे दोन आहेत. पहिले असे की, निवडणुकी नुकत्याच संपल्या असून नेहरू पक्षाचा त्यांत पाडाव झाला व आम्ही निवडून आलो, त्यामुळें नेहरू चिडलेले असणार. एका पक्षात आम्ही यापूर्वी होतो तेव्हाच त्यांच्या आमच्यांत खूप भांडणें होत होती. आताच्या आमच्या जाण्याने ती किती वाढतील, व एकमेकांचे कसें वाभाडे निघतील हे सागावयास नकोच. तेव्हा ही भांडणे वाढूं नयेत हा यंदा गौहत्तीस न जाण्यांत आमचा हेतु आहे. दुसरा हेतु जरा मुत्सद्देगिरीचा (Tactical) आहे. तो असा की, स्वराज्य पक्षात झाले तरी नेहरू पक्ष, व श्रीनिवास अय्यंगार पक्ष असे दोन उपपक्ष आहेतच. यापैकी अय्यगार पक्ष मनांतून आमच्या बाजूचा आहे. समजा, आम्ही गौहत्तीस गेलो तर आमचा पाडाव करण्यासाठीं हे दोन पक्ष एक होणार; पण आम्ही न गेलो तर मात्र त्या दोघांतच भांडण लागेल आणि प्रतिसहकार-तत्त्वाच्या विजयाच्या दृष्टीनें तेच अधिक इष्ट आहे. श्रीनिवास अय्यंगार मनांतून आमच्या बाजूचे आहेत हे ऐकून तुम्हास आश्चर्य वाटेल. पण ती खरीच गोष्ट आहे. अहमदाबाद कॉंग्रेसच्या वेळी श्रीनिवास अय्यंगार, रगस्वामी अय्यंगार, पटेल, सत्यमूर्ति मी इत्यादि मडळी एकाच मताची होतो. आम्ही पहिल्या-

पासून असहकारितेच्या विरुद्ध असतां त्या चळवळीला कां मिळालो असे पुष्कळजण विचारतात. असहकारितेचे तत्त्व नापसंत असतां त्याला तात्पुरतेंहि मिळणें ही आमची तात्त्विक चूक होती हे खरें, पण व्यावहारिक दृष्ट्या तसे करणेंच जरूर होते. त्या वेळची परिस्थिती, केसरी ट्रस्टची जबाबदारी, इत्यादि गोष्टींचा विचार करून आम्हास तसें करणेंच अधिक युक्त होते. असो. प्र. स. पक्षाची स्थापना झाल्यावर जयकरांच्या घरीं अय्यंगारांची व माझी गांठ पडली त्या वेळेला त्यांनीं आमचे करणे पसंत केले, व आमच्या मनास जुळेल असा कॉंग्रेसच्या धोरणाचा फॉर्म्यूला तयार करण्याचें त्यांनीं आपण होऊन कबूल केले. अय्यंगार हे मनांतून आमच्याच मताचे आहेत याचें आणखी एक प्रत्यंतर, त्यांनी मद्रास प्रांतातील दिवाणगिऱ्यास आपला नैतिक पाठिंबा दिला आहे हें होय. तेथेंहि असेच झाले. स्वराजिस्टांचे बहुमत झाल्यानंतर त्यांनी दिवाणगिऱ्या स्वीकारणे युक्त. पण कॉंग्रेसची आज्ञा आड येते. ती डिसेंबरपर्यंत बदलून घेतां येत नाहीं. अडवणुकीचा कार्यक्रम नापसंत व विफल ठरलेला. मग स्वतंत्रांना दिवाणगिऱ्या घेऊ देऊन त्यांना पाठिंबा देणे हाच काय तो मार्ग मद्रासी स्वराजिस्टांपुडे होता व तो त्यानी पत्करला. प्रतिसहकाराच्या तत्त्वाची खरी किंमत कौन्सिलांत बहुमते मिळाल्यावर त्यांना पटली. म्हणून कॉंग्रेसचे आजच धोरण बदलून घेण त्यांना भागच आहे. तेव्हां त्याकरितां अय्यंगार व सौ. सरोजिनी नायडू या एका बाजूस, आणि नेहरू व बंगाली स्वराजिस्ट दुसऱ्या बाजूस, असा हा सामना गौहत्तीस होईल. अशा रीतीने परस्परच काम भागत असता आम्ही तेथे जाऊन आमच्या विरुद्ध त्या दोघांना एक होण्यास संधि कशाला द्या ! आम्ही आपले येथूनच मौज पाहू म्हणजे झाले.

"कौन्सिलचे मतदार व कॉंग्रेस मतदार याजमधील मतभेद अशा रीतीनें जितक्या लवकर जाईल तितके जरूर आहे. हे दोन्ही मतदार समव्याप्त होतील तेव्हांच कॉंग्रेसमध्ये एकी होईल. माझ्या मते कॉंग्रेसची अधिकारविभागणी होणे आतां जरूर झाले आहे. तसे झालें तरच मतदारसंघ आणि कॉंग्रेस यांजमधील विरोध नाहीसा होईल. प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळांत ज्या बाबीवर मतदारांची सत्ता चालते, त्या बाबीत कॉंग्रेसनें आपला पुनः अधिकार चालविण्याचे काय प्रयोजन आहे ? त्या गोष्टी आपल्या परिस्थितीप्रमाणें व मताप्रमाणे करण्याची मुभा कॉंग्रेसनें लोकांस दिली पाहिजे. सरकारनें अधिकारविभागणी न केल्यास तें जसें दोषास पात्र होते त्याप्रमाणें कॉंग्रेसनें न केल्यास तिलाहि दोष द्यावा लागेल. अशा

बाबी सोडून दिल्या तरी, ज्यांवर कायदेमंडळाची सत्ता नाहीं, अशा दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टी आहेत तेवढ्याच कॉंग्रेसनें आपल्या हातांत घ्याव्या; व त्यांवर लोकमत संघटित करावे. उदाहरणार्थ सिव्हिल सर्व्हिसचा व हिंदी संस्थानांचा प्रश्न. या कशांवरहि कोणत्याहि कायदेमंडळास बोलता येत नाही या बाबींचा वरिष्ठ राजकारणांत समावेश होतो. ते वरिष्ठ राजकारण कॉंग्रेसने आपल्या हातांत ठेवून दुसरे कनिष्ठ राजकारण कायदेमंडळांवर पूर्णपणे सोपवावे. त्या कामांत मतदार जे करतील ते त्यांना खुशाल करू द्यावे. असे केल्यानेच सर्वत्र संतोष होईल व कॉंग्रेसचा श्रेष्ठ दर्जा कायम राहील. ''

असो. माझा असहकारितेशी ऋणानुबंध अवघा दोन वर्षें टिकला. पण माझाचसा काय, दास नेहरू प्रभृतींचाहि. माझा हा ऋणानुबंध मर्यादित कालपर्यंतच राहील असे मी प्रथमच जाहीर केले होते. हा ऋणानुबंध १९२३ साली अर्धवट संपला होता तो १९२५ साली पुरा संपला. तेथपासून पुढेहि कांही काळ मी कॉंग्रेस मध्ये समाविष्ट होतो असे म्हणता येईल. कारण मी प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारी मंडळाचा, आणि तिने निवडून दिलेल्या ऑ. इं. कॉ. कमिटीचा, एक सभासद १९२९ पर्यंत होतो. परतु १९२९ च्या डिसेंबरांत एका मध्यरात्री लाहोरास रावी नदीच्या काठी हिंदुस्थानचे स्वातंत्र्य आकाशातून अवतरले! तेव्हां कायदेमंडळांत राहणारा मी कॉंग्रेसच्या कोणत्याहि अधिकाराच्या जागी राहूं शकत नाही म्हणून "तुम्ही ऑ. इ. कॉंग्रेस कमिटीच्या जागेचा तरी किंवा कायदेमंडळाचा तरी राजीनामा द्या '' असे राष्ट्रसभाध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू यांजकडून मला लिहून आल्यामुळे मी, असहकारिता मान्य नाही म्हणून, ऑ. इं. कॉ. कमिटीचा राजीनामा दिला.

यानंतर १९३० मध्ये कॉंग्रेसने कायदेभंगाची चळवळ केली तीत भाग घ्यावा असे आमच्या लो. स्व. पक्षाने ठरविले. तेव्हां त्याच्याखातर, त्याचे कार्य चालू करून देण्याकरितां, मी दोनतीन प्रकारचा कायदेभंग केला. तथापि असे करण्यांत माझा व 'असहकारिते'चा कांही संबंध आहे असें मी मनानें मानिले नाही. १९३२ सालच्या कायदेभंगाच्या चळवळीत मी तितकाहि भाग घेतला नाही. कारण तो कायदेभंग मला अधिकच नापसंत होता. १९३३ साली तर मी कायदेभंग थांबविण्याकरितां केसरीतून जोराचा मत-प्रचारच केला. तात्पर्य १९२० पासून १९३६

मध्ये कॉंग्रेस ही कौन्सिल निवडणकी लढविण्यास उभी राहीपर्यंत कॉंग्रेसचा व माझा मतभेद चालूच होता. त्यानंतर कॉंग्रेसने स्वतःच प्रतिसहकारवादी बनून अधिकार ग्रहण केल्यापासून तर असहकारिता ही कॉंग्रेसच्या कबुलीनें व कृतीनेंहि संपली! मग माझा तिच्याशी तत्त्वाचा असा मतभेद कांहीच उरला नाही. तथापि मी लोकशाही स्वराज्य पक्षाचा सभासद व पुरस्कर्ता असल्यामुळे कॉंग्रेसचा प्रतिपक्षीसा भासतो, याचें कारण व्यक्तिशः कॉंग्रेस कार्यकर्ते माझा द्वेष करतात. जुन्या विरोधाच्या आठवणी विसरू शकत नाहीत. आणि ज्या गोष्टीला आपण पूर्वी अविचाराने विरोध केला तीच गोष्ट आपण आता उत्साहाने स्वीकारीत आहो या जाणिवेने मनातून त्यांची त्यांनाच लाज वाटते!

असो. प्र. स. पक्षाच्या स्थापनेनतर मी तीन वर्षे वरिष्ठ कायदे कौन्सिलांत होतो. प. नेहरूहि होते. त्यांचा व माझा स्वतःच्या पक्षाच्या दृष्टीने सबध सुटला तरी प्रतिपक्षांतला एक पुढारी म्हणून सबध उरला. कालांतराने जुना वाद विसरून आम्ही थोडेबहुत खेळीमेळीनेंहि वागत असूं. शिवाय शेवटी सर्वपक्षीय परिषद भरवून 'नेहरू रिपोर्टो'त समाविष्ट झालेल्या राज्यघटनेची चर्चा पंडितजींनी सुरू केली तेव्हा त्यांना मला परिषदेस आमंत्रण द्यावे लागलेच. १९२४-१९३० या सालांत मी वरिष्ठ कायदेमंडळांत होतो. त्याची हकीकत पुढे दिलीच आहे. पण १९२५ सालीं प्र. स. पक्षाची कल्पना निघाल्यापासून १९२९ पर्यंतची कांही पत्रे यापुढे देतो—

(ता. २३ ऑगस्ट, १९२५)—तुम्हांला यदा कॉंग्रेसचे अध्यक्ष करावे म्हणून मी लजपतराय यांना व प्रकाशम् यांना पत्रे पाठविली आहेत. युरोपमध्ये मी आणखी कांही दिवस राहणार आहे. तुमच्या पक्षातर्फे परराष्ट्रीय चळवळ करण्यास येथे माझा उपयोग झाला तर आनद होईल (तारकानाथ दास, म्युनिच, जर्मनी)

(ता. ३ ऑक्टोबर, १९२५)— कॉंग्रेसचा स्वराज्यपक्षाशी अगर सूतसघाशी अधिकृत संबंध असूं नये असे तुमचे मत असल्याचे पाहून आनंद झाला. एकतर कॉंग्रेस मोडून तरी टाका, किंवा या नसत्या थोतांडांतून तिची मुक्तता करा. तुम्ही महाराष्ट्रांतले लोकच कॉंग्रेसला तिचे पूर्वीचे माननीय स्थान प्राप्त करून द्याल. कारण आम्हा स्वतंत्र पक्षाच्या लोकांना कोणीच विचारीत

नाही. तात्कालिक राजकीय वावटळीबरोबर वहात आलेल्या मतांना ज्याने मान वाकवली नाही असा पक्ष म्हणजे लो. टिळकांचाच पक्ष होय ! कलकत्त्याच्या वर्किंग कमिटीच्या सभेला तुम्ही हजर रहाल अशी आशा आहे. ( सत्येंद्र बोस, कलकत्ता )

( ता. २२ ऑक्टोबर, १९२५ ) तुम्ही व जयकर यानी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केलेल्या मुलाखती आजच सकाळी वाचल्या. याबद्दल मला काय म्हणावयाचे ते जयकर यांना लिहिले आहे. तेच पत्र सोबत पाठविले आहे. नागपुरच्या सभेला तुम्ही जा; तेथे काही तडजोडीचा मार्ग निघतो की काय हे पाहू. याहून पत्रद्वारे अधिक चर्चा करता येत नाही. ( प. मोतीलाल नेहरू )

( ता. २२ ऑक्टोबर, १९२५ )—सितापूरहून मी परत आल्यावर तुमचे पत्र व तुम्ही आणि जयकर यानी वर्तमानपत्रांना दिलेल्या मुलाखती वाचावयास मिळाल्या. मीहि त्यावर सितापूरला भाषण केले व प्रेसच्या मुलाखतीत माझे मत प्रसिद्ध केले अर्थात् त्यावेळी तुमच्या दोघांच्या मुलाखतीची बातमी साराश रूपानेच कळली होती. पण आतां तुमच्या समग्र मुलाखतीच हाती आल्यामुळे मोठी चिंताजनक परिस्थिति उत्पन्न जाहली आहे असे मला वाटते. मुलाखतीत तुमचे मत तुम्ही स्पष्टपणे माडणार आहात असे तुम्ही पत्रांत लिहिले आहे. पण ज्या गोष्टी तुम्ही मुलाखतीत बोललात त्या बोलणे योग्य होते की काय हाच वादग्रस्त प्रश्न खरा आहे. स्वराज्य पक्षाचा अध्यक्ष म्हणून मला बोलण्यास केव्हांहि बदी नाही म्हणून तुमच्या मुलाखतीबद्दल मलाहि माझे मत लोकांना सांगावे लागेल. तुम्ही, व जयकर यांनीच स्वराज्य पक्षाचा कार्यक्रम हास्यापद आहे असे जाहीरपणे सांगितले तर ते कसे चालेल ! यासबंधी पुढे काय करावयाचे हा प्रश्न आहे. कारण त्याची उपेक्षा करता येत नाही. तुम्ही आम्ही आपले मतभेद मिटवून या पुढे कसे वागावयाचे हे ठरवावे. किंवा तुम्ही पक्षाचा संबंध सोडावा. पहिली गोष्ट तुम्ही स्वीकारलीत तर त्यांत आनंद आहे, नाही तर दुसरी गोष्ट अनिवार्य आहे.

ता. १ नोव्हेंबरला पक्षाच्या कार्यकारी मंडळाची नागपूरला सभा आहे, त्या वेळी तांबे यांचे वर्तन, मध्यप्रांतात दिवाणगिऱ्या घेण्याचा प्रश्न, तसेच मध्यप्रांत वऱ्हाड येथील स्वराजिस्टांचे धोरण इत्यादि अनेक विषयाचा विचार होईल. तुम्ही व जयकर कार्यकारी मंडळाचे सभासद असल्यामुळे तुमच्या वर्तनावर

कार्यकारी मडळापेक्षां पक्षाचे जनरल कौन्सिलच मत प्रदर्शीत करूं शकेल असें मला वाटते. तथापि तुमचे आमचे मतभेद मिटतात की काय याची चर्चा नागपूरच्या सभेत करूं. तरी तुम्ही नागपूरच्या सभेस जरूर यावे. मात्र तोपर्यंत तुम्ही कोणतीहि मुलाखत प्रसिद्ध करू नये. अशा प्रश्नाचा जितका लवकर सोक्षमोक्ष करता येईल तितके बरे ! ( मोतीलाल नेहरू, अलाहाबाद )

(ता. २८ ऑक्टोबर, १९२५)—पं. नेहरू व तुम्ही यांच्यामध्ये गैरसमज वाढत चाललेले पाहून वाईट वाटते. कोर्टाच्या बेअदबीच्या खिलाच्या वेळींच असे कांही तरी बनत असावे असे मला वाटले. तथापि नागपूरला जमून तुम्ही सर्व हे गैरसमज मिटवाल अशी आशा आहे. पण त्यापूर्वी वर्तमानपत्रांतून तुम्ही कोणताहि वाद अगर चर्चा करू नये इतकीच तुम्हास विनंति आहे. ' स्वराज्यां'त जो तुमचा लेख कालच प्रसिद्ध झाला आहे, त्यात तुम्ही पुष्कळच सडेतोडपणे व टाकून लिहिले आहे. यामुळे तुमच्या शत्रुना मात्र हत्यार सापडेल अशी भीति वाटते. ( शिवस्वामी अय्यर, मयलापूर, मद्रास )

( ता. ३० ऑक्टोबर, १९२५ )—बॅ. चक्रवर्ति व त्याची सर्व जुनी अनुयायी मंडळी ही तुमच्या व जयकराच्या हालचालींकडे उत्सुकतेने पहात आहेत. जरूर तेथे दिवाणगिऱ्या स्वीकारून शत्रूशी सामना द्यावा असे ठरले तर आम्ही सर्व तुमच्या बाजूचे आहोत. तुमच्या पक्षाला पाठबळ देण्याकरिता इकडे आम्ही तुम्हाला शक्य ती मदत करू. ( बी. के. लहिरी, कलकत्ता )

( ता. १५ नोव्हेंबर, १९२५ )—आपल्या राजकीय पक्षातून सध्या जो दांभिकपणा माजत चालला आहे तो साफ झाडून टाकण्याचे व्रत तुम्ही व जयकर यांनी मोठ्या धैर्याने आचरिले आहे याबद्दल तुमचे मनःपूर्वक अभिनंदन करितो. येत्या कॉंग्रेसमध्ये आतां काय काय होते इतकीच चिंता वाटते. प्रतिसहकार पक्ष तुम्ही कॉंग्रेसमध्ये रीतसर स्थापन कराल तर मी त्याला ताबडतोब येऊन मिळतो आणि इतरांनाहि येण्यास सांगतो. पण समजा कॉंग्रेसने तुमचे प्रतिसहकाराचे तत्त्व अमान्य केले, तर पुढील वर्षी तुम्ही प्रतिसहकाराच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करणार की जुना कानपूर कॉंग्रेसचाच कार्यक्रम पुढे चालवणार ? हे लवकर कळवावे. ( एम्. राम. शास्त्रलू, एलोर )

( ता. २२ नोव्हेंबर, १९२५ )—मी नुकताच कौन्सिल ऑफ स्टेट मध्ये निवडून आलो. आणि कोणत्या पक्षांत जावे याचा विचार करकरून असे ठरविलें

कीं एक स्वतंत्र राजकीय पक्षच स्थापन करावा. सुधारणा आहेत तशा राबवून त्यांचा होईल तेवढा उपयोग करून घ्यावा. अडवणुकीचा कार्यक्रम मला पसत नाही. यामुळे मी स्वराज्य पक्षांत येत नाही. आणि शक्य तेथें सहकरिता व अपरिहार्य तेथे विरोध हे नेमस्तांचे मतहि मला पटत नाहीं. कौन्सिलांत काम करावयाचें त्यांत सहकारिता कसली आणि असहकारिता कसली ! जरूर तेव्हा दोन्ही गोष्टीं कराव्या लागतील. प्रत्येक प्रातांत वेगवेगळी परिस्थिति असल्यास कोठे काय धोरण पत्करावे हे त्या त्या प्राताने स्वायत्ततेने ठरवावे, मध्यवर्ती सस्थेने त्यांत हात घालूं नये, अशा तत्त्वावर नवा पक्ष काढणे तुम्हास पसंत असेल तर तुम्ही व जयकर याच्याशी मी बोलूं इच्छितो. ( सर शंकरन् नायर, मद्रास )

बापूजी अणे यानी पं. नेहरू यांना खालील पत्र लिहिलेः—

( ता. ७ जानेवारी, १९२६ )—"असेब्लीतील माझ्या जागेचा मी राजिनामा दिला; त्याचप्रमाणे या पत्राने स्वराज्यपक्षाचाहि देत आहे ! येथल्या प्रांतिक शाखेच्या अनेक सभासदानी राजीनामे दिले आहेत ते रीतसर प्रातिक शाखेच्या सभेने स्वीकारले नाहीत. पण त्याची वार्ता तुमच्या कानावर घालणे माझे कर्तव्य आहे. कारण येत्या सभेत त्यांचा विचार व्हावयाचा आहे. 'स्वराज्य पक्षाच्या शरीरांतील कुजलेला अवयव कापून काढावा' असे आपण म्हणाला होता. आम्ही सर्वांनी राजिनामे देऊन आपल्या इच्छेप्रमाणेच घडवून आणले आहे ! यांत आमचा कोणताहि व्यक्तिशः हेतु नाही. हा राजिनामा देताना देशहिताच्या माझ्या कल्पनेप्रमाणे केवळ कर्तव्यबुद्धिला स्मरणे यापेक्षा कांहीं मनांत आणले नाही. आपणासारख्या बाणेदार व त्यागी मनुष्याने अलकृत केलेला पक्ष सोडण्यांत मला दुःख वाटते. पण आपण दूर झालो तरी देशहितबुद्धिने परत एकत्र येऊं अशी आशा आहे.

(ता. ११ जानेवारी, १९२६)—काल वऱ्हाडच्या स्वराज्यपक्षाची सर्व साधारण सभा होती. चारहि जिल्ह्यांतले प्रमुख सभासद हजर होते. पं. नेहरूनी रफी अहमद याना स्वतःचे प्रतिनिधि म्हणून मुद्दाम एका लघुलेखकासह पाठविले होते. तसेच बॅ. अभ्यकर व जमनादास मेहता हेहि नेहरूच्या वतीने सल्ला देण्यास सभेस हजर होते. सभेपुढे राजिनाम्यांचा विचार होऊन सभेत राजिनामे मंजूर झाले. रामराव देशमुख यांनी आपण पक्ष सोडून जाऊं व स्वराजिस्ट म्हणून कोणत्याहि

निवडणुकीस यापुढें उभे रहाणार नाही म्हणून सांगितलें. या प्रमाणे वऱ्हाडांत तरी स्वराज्यपक्ष पूर्णपणें नामशेष झाला आहे असे दिसेल! ( बापूजी अणे, यवतमाळ. )

(ता. १२ जानेवारी, १९२६)—काल रोजी येथील स्वराज्यपक्षाच्या प्रांतिक सभेत बहुतेक सभासदांच्या राजीनाम्याचा विचार होऊन ते बहुमताने मंजूर झाले. स्वतः अणेच अध्यक्ष असून त्यांनीहि राजीनामा दिला असल्यामुळे, पं. नेहरूनी आपला प्रतिनिधि ही सभा पहाण्यास पाठवावा असे अणे यांनी मुद्दाम कळविले होते. त्याप्रमाणें बॅ. अभ्यंकर व जमनादास मेहता हे पंडितजींच्या वतीने सभेस हजर होते. सभासदांनी स्वराज्यपक्षाचे राजीनामे देऊ नये म्हणून मेहता व अभ्यंकर यांनी विनति केली, व 'तात्यासाहेब केळकर यांनी या प्रश्नावर अखेरचे मत देईपर्यंत हा प्रश्न तहकूब करावा' असेंहि म्हणून पाहिले ! पण काही उपयोग झाला नाही. दोघांखेरीज सर्वांनीं राजीनामे दिलेले आहेत. अशी एकंदर इकडली हकीकत आहे. ( बा. ग. खापर्डे, उमरावती )

( ता. २ फेब्रुवारी, १९२६ )—माझ्या मुलाच्या आजारीपणामुळे मी घरी निरुपायाने अडकून पडलो पण मनाने मी कानपूर कॉंग्रेसमध्येच वावरत होतो. तुमच्या प्रमाणेच कानपूर येथे अडचणीना तोड देण्याकरितां मी हजर नव्हतो याबद्दल वाईट वाटते. स्वराज्य पक्षाच्या सभेत, विषय-नियामक कमिटीत, आणि तसेच भर कॉंग्रेसमध्ये मोतीलाल नेहरू यांचे धोरण चवाठ्यावर आले हे चांगले झालें ! डॉ. मुंजे हेहि बंडखोरीत उघडपणे येऊन मिळाले. तुम्ही राजीनामा दिलात, पण ज्या मतांचा तुम्ही गेली ३-४ महिने धैर्याने उघड उघड पुरस्कार केलात त्याला तो सुसंगतच होता. असेंब्लीचा माझा राजीनामा मी कालच पाठविला. जयकरांनी व तुम्ही इतक्यांतच फेर निवडणुकीसाठी वर्तमानपत्रांत स्टेटमेंट करूं नये. ( बापूजी अणे, यवतमाळ )

मिसेस बेझंट यांना माझे पत्रः—

(पुणें ता. १७ मार्च, १९२६)—तुम्ही प्रतिसहकार पक्षाच्या लीगला येऊन मिळाल्याचे कळले. राष्ट्रीय कामांत आपण पुन्हा एकदा समान भूमिकेवर आलो. नॅशनल फेडरेशनचा मी आधींच सभासद असून पार्लमेंटांतील तुमच्या बिलास मी पाठिंबा देण्याचे ठरविले आहे. तुमच्या मॅनिफेस्टोवर सही करून मी सोबत पाठवीत आहे. एकाच हेतूनें पण वेगवेगळ्या संस्थांतून आपण काम करावे ही माझी

कल्पना तुम्हास मान्य झाली हे मला बरे वाटते. प्रत्येक लीगने आपापले निवडणुकीचे मॅनिफेस्टो स्वतंत्र आहेत असे समजावे. त्यांतील गटांना योग्य ते आचारस्वातंत्र्य असावे. प्रतिसहकार पक्षाचे नांव घेऊन कोणीहि उमेदवार उभा राहिला तरी, ज्याला ते तत्त्व मान्य आहे त्या उमेदवाराला हा पक्ष आपली मान्यता देईल. पण उमेदवाराची लायकी नालायकी, तसेच एकाच मतदारसघात यशाच्या दृष्टीने कोणी उभे रहावे व कोणी माघार घ्यावी, प्रतिस्पर्धी उमेदवाराशी कोणत्या अटीवर तडजोड झाल्यास ती करावी, या सर्व तपशीलाच्या बाबी स्थानिक पुढाऱ्यांवरच सोपवाव्या. येत्या निवडणुकीत प्रतिसहकार पक्षाला किती जागा जिकता येतात यावरून त्याचे बळ समजेल. कित्येक ठिकाणी नेमस्त व राष्ट्रीय हे दोघेहि तुल्यबल असतील, व त्यातून कोणाला निवडावे हा एक बिकट प्रश्न पडेल. पण प्रतिसहकाराची मर्यादा इतकी व्यापक आहे की, राष्ट्रीय पक्षाचा मनुष्य पडला व नेमस्तांचा विजय झाला असेहि क्वचित घडले तरी, नॅशनल फेडरेशनच्या मॅनिफेस्टोवर जर त्याने सही केली असेल तर, नेमस्त असूनहि तो मनुष्य प्रतिसहकार पक्षाचा नव्हे असे म्हणता येणार नाही. ते कांहीहि असो. आपले जाळे विस्तृत्व रीतीने टाकल्याशिवाय, आणि तपशीलाच्या बाबतीत लक्ष घालण्याचे कमी केल्याशिवाय, आपणाला यशाची आशा नाही. प्रतिसहकारपक्षाचा सभासद होण्याला कॉंग्रेसचा सभासद असणे ही आवश्यक अट होती, पण मुंबई शहरापुरती ही अट आम्ही काढून टाकली आहे, यावरून व्यापक धोरणाने आम्ही वागावयाचे ठरविले आहे हे तुम्हाला दिसेल.

(ता. ३१ मार्च, १९२६)—जयकर व इतर स्नेही यांच्याशी पुष्कळ चर्चा केली. बगाल संयुक्तप्रात तसेच इतर ठिकाणांहूनहि अनेक पुढारी येत आहेत व परिषदेला बरेच महत्त्व येईल. तरी तुम्ही येणे फार जरूरीचे आहे. रायगडचा उत्सव सपवून ता. ३ एप्रिलच्या सुमारास तुम्ही इकडे येऊ शकाल. ( महमद अली जिना, मुंबई )

(ता. १२ एप्रिल, १९२६)—समेटाचे बोलणे करण्यास येण्याबद्दल पं. नेहरूंचे पत्र तुम्हास पोहोचलेच असेल. आपणाला अकल्पित रीतीने अनेकांकडून मदत झाली याचा नेहरूंच्या मनावर परिणाम झाला असावा असे दिसते. मुंबईतील सभा जर यशस्वी न होती तर मात्र हे घडून न येते. ( मु. रा. जयकर, मुंबई )

( ता. १७ एप्रिल, १९२६ ) 'येथे जरूर या. पण मनुष्य चिंतितो त्याच्या अगदी उलट दैव विचार करीत असते हे विसरू नका ' असे तुमच्या तारेला मी उत्तर पाठविले होते. या अनौपचारिक सभेबद्दल मला काहीच कल्पना नाही. नेहरू यांच्या सागण्यावरून मी तुम्हाल' निमत्रण केले. जयकर यानी अणे व मुंजे यांना तारा करण्यास मला सागितले आहे. आपग सर्वजण काय धोरण पत्करू यावर सभा यशस्वी होईल की नाही हे अवलंबून आहे. या सभेतून काय निष्पन्न करावयाचे, व वाटाघाट कोणत्या मुद्यावर करावयाची, याबद्दल नेहरू यांनी मला काहीच कळविले नाही. ( म. गांधी, साबरमती )

( ता. २ सप्टेंबर, १९२६ )—समेट फसणार हे दिसतच होते. " नव्या पक्षांत येण्यास आमची ना नाहीं. पण आमचा प्रतिसहकार पक्ष आम्ही मोडणार नाही अगर तुमच्या पक्षात पूर्णपणे विलीन केला असे दाखविणार नाही. प्रति-सहकार पक्षाच्या नांवाने व नांवाकरितां उघड प्रचार पुष्कळ केला आहे. तरी यावेळी आम्ही नव्या पक्षांत सामील होणे निवडणुकीच्या दृष्टीने धोक्याचे आहे" असे मी पंडित मालवीय यांना तारेने कळविले आहे. ( बापूजी अणे )

( ता. २६ नोव्हेंबर, १९२६ )—निवडणुकीत यश मिळाल्याबद्दल तुमचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. मद्रासमध्ये स्वराजिस्ट लोक बहुमताने निवडून आल्यामुळे कशी पंचाईत झाली पहा ! ते स्वतः दिवाणगिऱ्या घेत नाहीत व इत-रांना घेऊं देत नाहीत. जस्टिस पक्षाने जे केले त्याचीच पुनरावृत्ती होणार म्हणा-वयाची ! आसाम कॉंग्रेसला पुष्कळ लोक बरोबर नेऊन दिवाणगिऱ्यावरील बहि-ष्कार दूर करण्याबद्दल तुम्ही कॉंग्रेसचे मन वळवा. कौन्सिल बहिष्कार जसा दूर झाला तसाच हाहि होऊ शकेल. तुम्ही त्याबाबत जोराची खटपट कराल अशी आशा आहे. ( शिवस्वामी अय्यर, मद्रास. )

(ता. २ डिसेंबर, १९२६)—तुम्ही असेंब्लीत निवडून आल्याबद्दल तुमचे मीं अभिनंदन करण्याची आवश्यकता नाही. पण हॉर्निमन व त्यांचे हेरल्ड पत्र यांनी तुम्हावर जी शिव्याची लाखोली वाहिली होती ती लक्षांत घेतां मला मुद्दाम अभिनंदन करावेसे वाटते. मला वाटते ज्या मताचा तुम्ही पुरस्कार केला ते गौहत्तीच्या कॉंग्रेसमध्ये स्वीकारले जाईल, आणि तुम्ही देशाला दाखविलेला मार्ग बरोबर होता हे पुनः एकवार सिद्ध होईल. ( मनु सुभेदार, मुंबई )

(ता. २२ एप्रिल, १९२७ )—कॉंग्रेसमधील अनेक पक्षांच्या ऐक्याबाबत श्रीनिवास अय्यंगार यांचे मला इतराप्रमाणेच एक छापील पत्रक आले आहे. त्यांच्या दौऱ्याचा काय फायदा देव जाणे. पण मला ते मुंबईस भेटले तर येथील कार्यकर्त्यांचा व त्याचा सभाषण-प्रसग घडवून आणीन. ऐक्याबद्दल तुम्ही तुमच्या ज्या सूचना त्यांना दिल्या आहेत त्यांना आम्ही चिकटून राहूं यांत प्रश्नच नाही. ही सर्व गोष्ट आम्ही तुम्हावरच सोपविली आहे यत्या ऑ. इडियाच्या सभेस हजर राहून तुम्ही याबाबत पुढाकार घ्यावा. कारण तुमच्यावाचून हे काम करणारा महाराष्ट्रांत दुसरा कोणीच नाही, व तुमचा कोणीहि दुय्यम हे काम करूं शकणार नाही. तरी जरूर यावे. ( एम्. आर. जयकर, मुबई. )

श्री. बापूजी अणे व डॉ. मुजे याना माझे पत्रः—

ऑल इ. कॉ. कमिटीची बैठक ता. १५ रोजी मुबईस आहे हे तुम्हांला माहीतच आहे. काही महत्त्वाच्या गोष्टी मध्यतरी घडल्याने आपल्या पक्षाच्या सर्व मडळीनी मुबईच्या सभेस हजर रहाणे जरूर आहे. श्रीनिवास अय्यगार हे दौऱ्याकरिता इकडे महाराष्ट्रांत आले आहेत. दिल्लीला समेटाविषयी माझ्या निश्चित लेखी सूचना श्रीनिवास अय्यंगार याच्या हाती दिल्या हे तुम्हाला माहीतच आहे. त्यावरून त्यानी इकडे दौऱ्यास येण्याची मला तार केली, व बगालच्या पुढाऱ्याप्रमाणेच महाराष्ट्रातहि येऊन समेटाची चर्चा करावी असा त्यांचा बेत दिसतो. त्याचे म्हणणं मी शब्दशः खरं धरले नाही ! आमच्या म्हणण्यातील कांही मूलभूत तत्त्वे त्यानी मान्य केल्याशिवाय इकडे दौरा करण्याचा काही उपयोग होणार नाही असेहि त्याना मी स्पष्टपणे कळविले. यावर जाहीर सभातून पक्षभेदासबंधी वाद उकरून काढणार नाही असे त्यानीहि तारेने आश्वासन दिले. प्रातिक कॉ. कमिटी आमच्या हाती आणि ते पडले कांग्रेसचे अध्यक्ष ! यामुळे दौऱ्याला येऊं नका असेहि त्यांना मला म्हणता येईना ! अर्थात् ते आले. आणि माझ्याकडे दोन दिवस राहून हल्ली ते अलीबागला गेले आहेत. नतर वाई, सातारा, कऱ्हाड, रत्नागिरी, चिपळूण इत्यादि ठिकाणी आम्हीहि त्याच्याबरोबर जाणार आहो. हा दौरा तारीख १३ ला सपेल.

पुण्यांतील मुक्कामात श्रीनिवास अय्यगार यांना असे आढळले की फेर व नाफेर या दोन्ही पक्षांचा त्यांच्यावर विश्वास नाही. दोन दिवस नाफेर मंडळींनी

शिवरामपंत परांजपे यांच्या घरी त्याना चर्चेला बोलाविले. पण त्यांना नेण्याला कोणी मनुष्य अगर टांगाहि त्यांनी पाठविला नाही ! आमच्या घरी दोन खाजगी सभा झाल्या त्यांत ते पुष्कळ मनमोकळेपणाने बोलले. या सभांना मराठी जिल्ह्यांचे पुष्कळ पुढारी आले होते, आणि मी श्रीनिवास अय्यंगार याना दिलेल्या समेटाच्या लेखी सूचनाचा या सभातून कलमवार विचार झाला. कांही कांही शब्दांत विरोध कमी करावा या दृष्टीने फेरफार झाल्यास माझ्या सूचनातील मुख्य तत्त्व अय्यंगार यांना मान्य झाले आहे असे मला तरी वाटते ! कॉंग्रेसचे अध्यक्ष या दृष्टीने पक्षातील तटस्थपणाचा देखावा ते करोत, पण पंडित नेहरू व स्वराज्यपक्ष यांच्या धोरणाचा त्याना वीट आला असून, ऑ. इ. कॉं. कमेटीच्या सभेत ऐक्याचा काहीं मार्ग काढावा असे त्यांना वाटू लागले आहे ही गोष्ट मात्र काही लपत नाही. किंबहुना सत्यमूर्ति व इतर पुढारी यांच्याशी विचारविनिमय करून बंगाल, तामिळनाडू व महाराष्ट्रांतील पुढारी यांचे पाठबळ मिळाल्यास श्रीनिवास अय्यंगार यांना ते हवे आहे. इतके झाले तरी मुंबईच्या सभेत अखेर काय होईल हे मला सांगतां येत नाहीं. तथापि ते कसेहि असले तरी नागपूर वऱ्हाडपासून अखिल महाराष्ट्रांतील आपल्या पक्षाच्या झाडून सर्व पुढाऱ्यांनी मुंबईच्या सभेला अवश्य आले पाहिजे इतके मात्र खरे. पुण्यास खासगी सभांना श्री. कौजलगी हजर होते. त्यांनी माझ्या समेटाच्या सूचनांना अनुकूलता दर्शविली. आणि गंगाधरराव देशपांडे यांनी विरोधाची बाजू उचलून धरली तर कौजलगी व इतर कर्नाटकीयांचे मत आपल्या बाजूला पडेल असे वाटते. तरी ता. १३ ला निश्चितपणे इकडे यावे म्हणजे जयकर व अय्यंगार यांच्याशी आधी चर्चा करण्याला दोन दिवस भरपूर वेळ मिळेल. मीहि या दौऱ्यानंतर मुद्दाम मुंबईस दोन दिवस आधी येत आहे.

( २१ मे, १९२७ )—मी काल येथे आलो. तुम्ही गेल्यानंतर श्रीनिवास अय्यंगार यांच्याशी माझे बोलणे झाले. हुटगीपर्यंत आम्ही मिळून प्रवास केला. तुमच्या पक्षाला येऊन मिळण्याची त्यांची फार इच्छा आहे. समेट मोडण्याला स्वतः तुम्ही अगर तुमचा पक्ष कारण नसून दुसरेच कोणीतरी आहेत याबद्दल त्याची खात्री झाली आहे, व अडचणीतून कांहीतरी मार्ग तुम्ही काढावा अशी त्यांना अपेक्षा आहे. त्यांचे म्हणणे इतकेच की, तूर्त अधिकारस्वीकाराच्या प्रश्नाचा तुमच्या कार्यक्रमांत समावेश तुम्ही करूं नये. मलाहि तसेच वाटते. तुमचे

मत युक्तिसिद्ध असेल, पण पक्षातील महत्वाकांक्षी सभासदांना अधिकाराची जागा घेऊं दिल्याने पक्षांतील एकी बिघडते. कांही लोक तर केवळ याच हेतूवर लक्ष ठेवून तुमच्या पक्षात आले आहेत.

केवळ व्यक्तिविषयक आरोप करणारे जे तुमचे प्रतिस्पर्धि आहेत त्यांची सद्दी आता सपली आहे. अय्यगार व तुमचे एकमत झाले तर नर्मदेपर्यंत साऱ्या दक्षिण हिंदुस्थानचा तुम्हाला पाठिंबा आहे असे समजा. मद्रासेतील कांही जहाल त्रागा करतील. पण श्रीनिवास अय्यंगार त्यांना पाहून घेतील. श्री. बाबुराव गोखले जर गंगाधररावाशी बोलण्याची खटपट करतील तर त्याचा विरोध मावळून साऱ्या कर्नाटकाचा तुम्हाला पाठिंबा मिळेल.

वर्किंग कमिटीचा कौन्सिलसबंधी ठराव तुम्हांला पसत नसल्याने तुमची उपसूचना मजकडे पाठवावी. म्हणजे मी ती श्रीनिवास अय्यंगार यांच्याकडे पाठवीन. नंदिहिल्समध्ये म. गांधींची गांठ पडल्यावर तुमच्या सूचनेबद्दल त्यांना गांधीजींशीं बोलतां येईल.

तुमचे पत्रोत्तर लवकर यावे. लो. टिळकांच्या मतांचा विजय व्हावा अशी माझी इच्छा आहे. यांत व्यक्तिविषयक बाब पुढे येऊं नये. तुमच्यावर व तुमच्या पक्षावर चीड येण्यासारखे व्यक्तिविषयक हल्ले प्रतिस्पर्ध्यांनी केले. पण तुम्ही रोखठोक प्रत्युत्तर द्यावयाचे म्हटले तर समेट लांबणीवर पडेल! म्हणून निंदेमुळे आलेला कढ मनात तसाच जिरवून मनःसंयमन केलेत तर या वर्षाच्या अखेरीला तरी तुमचा जय होईल असे वाटते, आणि अधिकारस्वीकाराच्या मोहाच्या वर आपण आहो असेहि वेळप्रसगी दाखवून राजकारणाची दिशा आखविण्यांत टिळकांच्या शिष्यांनीच पुढारीपण घेतले आहे हे पाहून मला अधिक आनंद वाटेल. ( श्रीनिवास कौजलगी, विजापूर. )

प्रेसिडेंट विठ्ठलभाई पटेल यांना मी पाठविलेल्या पत्रांतील उतारा—

( पुणे, ता. ११ जून, १९२७ )—अध्यक्ष या नात्याने आपण बजावलेल्या कामगिरीबद्दल जी योग्य अशी सार्वत्रिक स्तुति होत आहे त्यांत मी भर घालावी असे नाही. पण दोन शब्द लिहितोच.

अलीकडे आपण स्वराज्यपक्षाचे सभासद होतां. पुढें अवचित अध्यक्ष-पदावर बसलां. यामुळे 'स्वराज्यपक्षाने आपणाला सलणारा कांटा दूर केला' अशी कित्येकांनी टीका केली. पण त्यांना हे माहीत नाही की, आपल्या अगीं जसा मित्रांच्या बाबतीत कांट्याचा बोचकपणा आहे, तसाच नोकरशाहीच्या मांसाला भोके पाडील असा भाल्याचा भेदकपणाहि आहे. कोणी म्हणाले 'पटेलांचा स्वभाव इंग्रजांना आवडणार नाही.' मी तर म्हणालो की 'फार आवडेल. कारण पटेल यांच्या अंगी इंग्रजांचेच गुण आहेत.'

याबद्दल अशी एक गोष्ट सांगतात की कांही दिवसापूर्वी सरहद्दीच्या एका गांवावर लुटारू दरवडेखोरानी हल्ला करून लूट जमविली. ती परत आणण्याकरितां सरकारने जे सैन्य पाठविले त्यांत एक इंग्लिश, एक स्कॉच, व एक आयरिश अशा तीन तुकड्या होत्या. दरवडेखोरांनी एका बळकट किल्ल्याचा आश्रय केला होता. आयरिश फौज आघाडीला होती. आयरिश माणसाना चढाऊ वीरवृत्तीची मोठी हौस. म्हणून त्यांनीच प्रथम हल्ला केला. पण बिचारे सर्व त्यांत गारद झाले. स्कॉच लोकांची देशभक्तीपेक्षां बडेजावी व बहुमान यांवर दृष्टि जास्त. त्याची फौज मध्ये होती. आयरिश लोकानंतर त्यांनी हल्लाकरून दरवडेखोरांना कैदी करून ताब्यात घेतले. पण इंग्रज सैनिक फार धूर्त. त्याची फौज पिछाडीला होती. दरवडेखोर कैद झालेले पहाताच त्यानी भराभर जाऊन मेलेल्या व जखमी झालेल्या शिपायांचे खिसे तपासले आणि लूट काबीज करून परत आणली!

आपल्या स्वराज्य पक्षाच्या सैन्यांतहि असेच झाले नाही काय! देशबंधु दास यानीच प्रथम कौन्सिलप्रवेशाबद्दल हटातटाने भांडून व त्याला मान्यता मिळ-वून नोकरशाहीच्या अभेद्य तटाला भलमोठे खिंडार पाडले. नंतर पंडित मोतीलाल नेहरूंनी असेंब्लीच्या चतुर वाग्युद्धांत सरकारी सभासदाना कुंठित—बंदिवान् केले. आणि, पटेलसाहेब, सरतेशेवटी आपण मात्र अध्यक्षपदाच्या निमित्ताने सरकारच्या तिजोरीवर हात मारला! दरसाल पन्नास हजार रुपये पगार ही सरकारकडून लूटच आपण मिळविली नाही काय! तेव्हां ठकाला ठक भेटावा त्याप्रमाणे तुमच्या रूपाने इंग्रजांना आपणाला केवळ इंग्रजच भेटला असें वाटेल. यापेक्षां वेगळे वाटणार नाही!

आपण अध्यक्ष झाल्यामुळे स्वराज्य पक्षाला अतरला. तसेंच आपणालाहि ही जागा घेऊं देण्यांत स्वराज्यपक्षालाहि स्वार्थत्याग करावा लागला आहे. विनोद उपहास व्यंजना इत्यादि अनेक वाग्युद्धांतील शस्त्रांनी आपण परिपूर्ण असला तरी यापुढें ओठावर आलेले शब्द गिळून प्रतिपक्षांतील वाद अध्यक्षपदांवरून तटस्थपणानें आपणांस पहावे लागतील. पण तटस्थपणा स्वीकारून दोन्ही पक्षांना न्याय देणे यांतहि उच्च कर्तव्यबुद्धीचे समाधान आहे. वाक्चातुर्य हे रुप्यासारखे शुभ्र आहे. पण मौनाला तर सुवर्णाचीच उपमा देतात. शिवाय मौन हे ' सर्वार्थसाधक' असतें असेंहि म्हणतात ! !

पार्लमेंट सभेचा स्पीकर व असेब्लीचा अध्यक्ष यांत साम्य असले तरी, तुमच्या बाबतींत वैधर्म्य असे की नेहमीची मुंबई सोडून निवडणुकीकरितां तुम्हांला यावेळी गुजराथ पहावी लागली ! पार्लमेंट बरखास्त झाले तरी तोच स्पीकर पुनः त्याच मतदारसंघातर्फे निवडून येतो. अध्यक्षपदावरून निघाल्यावर दरम्यान गोहत्ती-च्या कॉंग्रेससंबंधाने तुमचे मत तुम्ही मोकळेपणाने प्रदर्शित कराल अशी पुष्कळांची अपेक्षा होती. पण मौन स्वीकारण्यांत तुम्ही गांधीच्यावर ताण केली ! पण पुनः अक्षध्यपद मिळविण्याकरितां तुम्ही आंतून काय काय सूत्रे हालवित होता हे धूर्त वयस्थांना मात्र दिसल्याशिवाय राहिले नाही. ते कसेंहि असो अध्यक्षाच्या जागेला तुम्ही लायख आहा आणि ती जागा तुम्हांला शोभतेहि. तुमच्याच वक्रोक्तीच्या पद्धतीने क्षणभर बोलावयाचे तर ' तुमचे स्वराज्य तुमच्या पदरात पडलेच आहे. आता हिंदुस्थानचे स्वराज्य देशाला केव्हाहि सावकाश मिळो !'

( ता. ७ नोव्हेंबर, १९२७ )—कमिशन नेमण्याची तारीख ८ निश्चित झाली आहे. तरी सर्व पक्षाच्या मंडळींनी तांतडीने एक झाले पाहिजे. इतर पुढाऱ्यांनाहि तारा केल्या आहेत. तरी १५ तारखेस मुंबईस जी सभा बोलावीत आहो त्याला अवश्य यावे. ( बॅ. महमदअली जिना, मुंबई )

( ता. ११ नोव्हेंबर, १९२७ )—कमिशनवर बहिष्कार घालावा, पण कायदे-मंडळांवर बहिष्कार घालूं नये असे मला वाटते. तुमचे मत काय आहे ? ( लाला लजपतराय, लाहोर )

( ता. १३ नोव्हेंबर, १९२८ )—गंभीर परिस्थिति उद्‌भवल्यामुळें सर्व राजकीय पक्षांनी एक होऊन कमिशनवर बहिष्कार घालावा असे वाटते. तुमचा

सल्ला काय ? बहिष्कारापुरती सर्व पक्षांची लीग स्थापण्याचे आम्ही ठरविले आहे. ( श्रीनिवास अय्यंगार, मद्रास )

(ता. ३० नोव्हेंबर, १९२७ )—सायमन कमिशन संबंधाचा पार्लमेंटचा अखेरचा निर्णय प्रसिद्ध झाला आहे. हिंदी लोकाना त्यांतून वगळले यामुळे कमिशनची योजना अधिकच आक्षेपार्ह आहे. याचाच अर्थ हिंदुस्थानपुढे एक मोठा आणीबाणीचा प्रसंग आला आहे. यामुळे प्रत्येकाने आपापले धोरण वेगवेगळे न ठेवतां कॉंग्रेस, मुस्लीम लीग, हिंदु महासभा, लिबरल फेडरेशन यांनी यावेळी एकच धोरण ठेवून वागणे इष्ट आहे. व तसे वागले तरच कांही तरी यश येईल असे मला वाटते. ता. १२ ते १५ डिसेंबरच्या दरम्यान कॉंग्रेसचे पुढारी मुबईस येऊ शकतील असे आश्वासन मला कॉंग्रेसच्या अध्यक्षाकडून मिळाले आहे. लिबरल फेडरेशनचे पुढारी येतील असे वाटते. तरी तुम्ही खात्रीने याल अशाविषयीं मला तार करा. तुम्हाला येणे कितीहि गैरसोईचे किंवा त्रासाचे झाले तरी हरकत नाही. पण आल्याशिवाय राहूं नका. कारण सर्वांच्या एकदिलाने धोरण ठरविण्याची ही वेळ आहे. आणि आताच ही गोष्ट न केली तर नाताळांत वेगवेगळ्या परिषदा भरतील व तेथे निरनिराळे सूर निघू लागतील. तरी पुन्हा सांगतो की आम्ही भरवितो त्या परिषदेला पूर्णपणे प्रातिनिधिक स्वरूप यावयास पाहिजे म्हणून तुम्ही आलेच पाहिजे. ( बॅ. महमदअली जिना, मुबई )

( ता. १० जानेवारी ,१९२८ )—बनारस येथे वर्किंग कमिटीची सभा ता. १५ रोजी बोलावली असून, सायमन कमिशन व इतर महत्त्वाच्या विषयांवर तुमचा सल्ला घेण्याची जरूरी आहे. तरी कितीहि थोडा वेळ आलांत तरी इकडे जरूर या. तारीख व वेळ मालवीय यांना तारेने कळवा. ( डॉ. अन्सारी, दिल्ली )

( ता. २६ जून १९२८ )—सर्व पक्षीय परिषदेने जी कमिटी नेमली होती तिच्या बैठका २२ तारखेपर्यंत भरल्या. राज्यघटनेच्या मसुद्यावर सर्वांचे पूर्ण एकमत झाले तरच सर्व पक्षीय परिषदेत तो मान्य होण्याची आशा. ता. ६ व ७ जुलै रोजीं अखेरची सभा आहे. तरी हे पत्र केवळ औपचारिक असे न मानतां गैरसोय सोसूनहि याच. या बिकट परिस्थितीतून मार्ग काढण्याला तुमच्या सल्ल्याचा मला अतिशय उपयोग होईल ( मोतीलाल नेहरू, अलाहाबाद )

( ता. २५ नोव्हेंबर, १९२८ )—कमिशनवर सर्व गोरे आहेत ही हिंदी लोकांना एक होण्याला चागली संधि आहे. सध्यां इकडे दक्षिणेत मी व्याख्या-नांचा दौरा काढला आहे. सभांत आम्ही दोन ठराव करितो. ( १ ) बहिष्कार 'प्रतियोगी' असावा ( २ ) आणि कसे स्वराज्य पाहिजे हे हल्लीची राज्यघटना बदलून दुरुत्या सुचवून कॉंग्रेसने ती आपली मागणी म्हणून माडावी. पुण्यास मी आल्यावर तुम्हाला भेटून तुमच्याशी बोलण्याची इच्छा आहे. (मिसेस ॲनि बेझट, त्रिचनापल्ली )

( ता. ३ ऑगस्ट, १९२९ )—येत्या ऑगस्टमध्ये जी गांधी-जिना परिषद भरणार त्यासबधाने माझ्या प्रमाणेच तुम्हांलाहि डॉ. मुजे यांचे पत्र आले असेल. तडजोडीच्या नावाखाली मागे ज्याप्रमाणे मुसलमानांनी अधिक हक्क मिळविण्याचा कावेबाज प्रयत्न केला त्याप्रमाणेच जिना व सरोजिनी नायडू याना पुढे करून हा दुसरा प्रयत्न चालू आहे. पण या तडजोडीतून हिंदुमहासभेला मात्र वगळलेले आहे ! थोडे स्वस्थ बसून काय होते ते पहावे असे माझे मत मी डॉ मुंजे यांना कळविले आहे; कारण हिंदूचे हक्क म. गांधी असे परस्पर अगदीच बुडविणार नाहीत अशी माझी कल्पना आहे. उलट मुजे यांना असे वाटते की, नेहरू रिपोर्टांत बदल करावा लगेल अशी कोणतीच तडजोड आतां हिंदूंनी पत्करूं नये, व असे त्यांनी जाहीर पत्रक काढून प्रसिद्धच करावे. डाक्का येथे हिं. म. परिषद तुमच्याच अध्यक्षतेखाली भरत आहे. मला वाटते तुमच्या अध्यक्षीय भाषणांत हिंदुसभेचे या तडजोडीबद्दल काय मत आहे ते परिणामकारक रीतीने मुद्देसूद मांडण्याला तुम्हाला फार चागली संधि आहे. राजकारणांतील न्यायबुद्धी-बद्दल हिंदु व मुसलमान दोघानाहि तुमच्याबद्दल फार आदर असल्यामुळे हे काम तुम्हीच फार चांगल्यारीतीने करूं शकाल. डॉ. मुजे यांच्याप्रमाणेच मलाहि वाटते की, अध्यक्षीय भाषणाचा कांही भाग मुद्दाम या विषयाला देऊन ठराव होईल तोहि यथायोग्य व्हावा याची तुम्ही काळजी घ्यावी. आज मुसलमानाना नवे अधिक हक्क देण्याचे कारण नाही. आणि ज्या वेळीं हिंदु मुसलमान व सरकार हे राज्यघटना ठरविण्याला एकत्र बसतील त्या वेळीं मुसलमानांच्या मागण्यांचा विचार करतां येईल. नेहरू रिपोर्टाच्या आधारावर मुसल-मानाशी बोलतां येईल; पण सरकार काय करणार हे अनिश्चित असल्यामुळे त्या बोलण्यांत कांही अर्थ नाही. उलट आम्ही खुशीने त्या मागण्यांना मान्यता

दिली अशी नसती कबुली आमच्यावरच बंधनकारक व्हावयाची ! सदर बाबतीत अखेरीस जो ठराव होईल तो दरेक शब्द पारखून तुम्ही कसोशीने कराल याबद्दल मला खात्री आहे. डॉ. मुंजे यांना तुमचे मत तुम्ही तावडतोब कळवा. ( बॅ. एम्. आर. जयकर, मुंबई )

असो; अशा रीतीने हे 'असहकारिता' प्रकरण सपले. त्याची चौफेर माहिती या प्रकरणांत मधून मधून दिलेल्या पत्रव्यवहारावरून कळून येईलच. तथापि वाचकांच्या लक्षांत ठळकपणे येण्या-राहण्याकरिता अनुसधानात्मक असे दोन कागद या खाली स्वतंत्रपणे देत आहे. त्यांतील नबर १ हे लोकमान्य टिळकांनी म गांधीना लिहिलेले, आणि गाधींच्या ' यंग इंडिया ' वर्तमानपत्राच्या तारीख २८ जानेवारी १९२० च्या अकांत छापलेले, एक पत्र आहे. ते दहा-पांच ओळीचेच असलें तरी त्यावरून लो. टिळक व म. गांधी यांच्या तत्त्वज्ञानांतील भेद आणि ' प्रतिसहकारिते'च्या तत्त्वाचा अर्थ अगदी स्पष्ट होण्याजोगा आहे.

हे पत्र असें:— " राजकारण हा लौकिक अभ्युदय इच्छिणाऱ्या लोकाचा, व जगाच्या रीतीने पदरांत पाडून घेण्याचा, खेळ आहे. तो साधूंच्या लागी नाही. बुद्धाने " अक्रोधेन जयेत् क्रोधं " असा जो उपदेश केला तो केवळ साधू लोकांकरितां आहे. राजकारणी पुरुषांकरितां नाही. म्हणून तो मला मान्य नाही. त्याऐवजी मला भगवद्गीतेचा उपदेशच मान्य वाटतो. तो उपदेश " ये यथा मां प्रपद्यंते तान् तथैव भजाम्यहं " या वाक्यांत आढळतो. या थोड्याशा विवेचनावरून तुमच्या माझ्या तत्त्वज्ञानांतील भेद आणि प्रतियोगीसहकारिता या शब्दाचा अर्थ कळून येईल. तुमचा व माझा हे दोनहि मार्ग प्रामाणिकपणाचे व सात्विक बुद्धीचे असूं शकतात. पण लौकिक जगाच्या दृष्टीने पाहिलें असतां माझाच मार्ग तुमच्यापेक्षा अधिक युक्त व कार्यसाधक आहे. याहून अधिक खुलासा पाहिजे असल्यास तो माझ्या ' गीतारहस्य ' या ग्रंथांत मिळेल. " **बा. गं. टिळक**

नं. २ चा कागद मी लिहिलेला आहे. तो ता. ११ जानेवारी १९२७ च्या केसरीत छापलेला आहे. त्याचा प्रसंग असा.

१९२७ साली एप्रिलांत कॉंग्रेस व प्रतिसहकारपक्ष यांच्यामध्ये अजूनहि कोणत्या अटीवर सलोखा होऊं शकेल याविषयी मी खालील जाहीरपत्रक काढले. पूर्वी सांगितलेली गौहत्तीची राष्ट्रीय सभा होऊन गेली होती. तीत सभेचे कौन्सिल-

प्रवेशाच्या प्रश्नाचा विचार केला होता, त्याला उद्देशून हे माझे पत्रक होते. येथे इतकेच सांगावयाचे की या कामी श्रीनिवास अय्यंगार हे पं. नेहरूपेक्षा माझ्याशी अधिक सहमत होते. माझे पत्रक असे होतेः—

## ' राजकीय पक्षांतील ऐक्य '

दिल्ली येथे गेल्या दोन महिन्यात राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार व प्र. स. पक्षाचे पुढारी श्री. केळकर यांच्या अनेक खाजगी भेटी झाल्या. असेंब्लीच्या कामात कॉंग्रेस पक्ष व प्र स. पक्ष ह्याच्या धोरणात किंवा कार्यक्रमात आता फारसा फरक नाही. फक्त फायनॅन्स बिलापुरताच असला तर असणार. आणि तोहि यंदा उरला नव्हता. येऊन जाऊन प्रान्तिक कायदेकौन्सिलात प्रधानमंडळ बनविण्यापुरताच काय तो फरक उरला आहे. उभयतांच्या मते तोहि काढून टाकण्यासारख्या कांही थोड्या बहुत सुधारणा राष्ट्रीय सभेच्या ठरावात करतां येणे शक्य आहे; व साधल्यास त्या सुधारणा ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या येत्या सभेत घडवून आणाव्या असे उभयतानाहि सारखेच वाटत होते. म्हणून श्रीनिवास अय्यंगार यांच्या विनतीवरून श्री. केळकर यानी त्याना आपल्या सूचना लेखी दिल्या, व त्या श्रीनिवास अय्यंगार यांनी प. नेहरू याना दाखविल्या आहेत. ह्याच सूचना पुणे येथील प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारी मंडळाच्या सभेपुढे परवा ठेवण्यांत येऊन सभेकडून त्या मंजूर करण्यांत आल्या. ह्या सूचनांचा सारांश खाली दिला आहे.

## एकीच्या विधायक सूचना

१ गौहत्ती येथील राष्ट्रीय सभेने कायदे कौन्सिलाविषयी जो ठराव केला त्यांत सहा कलमे आहेत; त्या पैकी 'अ' व 'ब' ही कलमे गाळण्यात यावी. बाकीची सर्व राहावी. त्याना विरोध करील असा कोणताच राजकीय पक्ष नाही म्हटले तरी चालेल.

२ कोणत्याहि एखाद्या प्रान्तात प्रधानमंडळ बनवावे अगर न बनवावे याविषयी राष्ट्रीय सभेने कोणताहि बंधनकारक नियम करूं नये. ज्या त्या प्रान्तांतील कायदे-कौन्सिलामध्ये निवडून आलेल्या सभासदांच्या इच्छेवरच ती गोष्ट सोपवावी.

३ नुकत्याच झालेल्या निवडणुकीवरून हे सिद्ध झाले आहे की, सामान्यतः मतदारसंघाचे मत कौन्सिलात प्रधानमडळ बनविण्याला अनुकल आहे, प्रतिकूल नाही. प्रधानमडळ बनविण्याच्या आधी किंवा बनविल्यानतर, कित्येक प्रान्तातून ही मडळे बनवूं नयेत किवा बनविलेली मोडावी अशा अर्थाचे प्रत्यक्ष ठरावहि सुचविण्यांत आले होते. परंतु त्यापैकी एकहि मान्य झाला नाही. आणि एकाहि प्रान्तात प्रधानमडळ बनल्याशिवाय आता राहिलेल नाहीं.

४ कौन्सिलाचा उपयोग कसा करावयाचा हे मुख्यतः मतदारसघावरच सोपविणे ही गोष्ट सयुक्तिक होय. कारण राष्ट्रीय सभेने १९१९ साली पार्लमेंटरी कमिटीपुढे आपले म्हणणे माडून मतदारसघ सरकाराकडून निर्माण करविले अर्थात् कॉंग्रेसने त्या मतदारसघाना मतस्वातत्र्य न ठेवता आपली हुकमत त्याच्यावर लादावी, आणि त्याच्या इच्छेविरुद्ध कायदेकौन्सिलात काम करवावे, ही गोष्ट योग्य नाही. मतदारसघानी आपल्या पसंतीप्रमाणे प्रतिनिधी निवडून द्यावेत, आणि त्याच्या हातून मतदारसघाच्या इच्छेप्रमाणेच कौन्सिलात काम करवून घेतले जावे, हीच राजकीय सुधारणाची मूळ उपपत्ति आहे.

५ बहुधा असा एकहि प्रान्त नाही की, ज्यांतील कायदेकौन्सिलात कॉंग्रेसच्या नावावर निवडून आलेल्या सभासदाचे 'निर्विवाद' बहुमत आहे किवा होऊ शकेल. बहुमत असेल तेथे ते निरनिराळ्या मताच्या एका किंवा अनेक सभासदाच्या समूहानेच बनलेले आहे. आणि या बहुमतवाल्या अनेक वर्गानीच मिळून प्रधानमंडळ बनविलेले आहे. प्रधानमडळ बनू देऊच नये हे राष्ट्रीय सभेचे मत कोणत्याहि कायदे कौन्सिलात यशस्वी झालेले नाही.

६ कसेहि पाहूं गेले तरी, प्रधानमडळ बनविण्याच्या बाबतीत कॉंग्रेस पक्षाने किंवा कोणीहि सुरुवातीला अडथळे करू नयेत. ताज्या अनुभवावरून असे दिसते कीं, कौन्सिलांतील सभासदाच्या निरनिराळ्या वर्गांचे संख्याबल किती आहे हे पाहून, म्हणजे त्यातल्या त्यात मोठ्या वर्गाच्या पुढाऱ्यानाच बोलावून घेऊन, प्रधानमंडळ बनविण्याच्या बाबतीत गव्हर्नराकडून विनंति करण्यांत येते. निरनिराळ्या गव्हर्नरांनी केलेला हा उपक्रम नवीन सुधारणांच्या मूळ तत्त्वाला धरूनच आहे. आणि राष्ट्रीय सभेच्या पक्षाने आम्ही प्रधानमंडळ बनवीत नाही असें म्हटले तरी ते बनल्याशिवाय रहातहि नाही. इतर वर्ग ते मडळ बनवितातच.

याकरिता यापुढे अशी तजवीज व्हावी की निवडणुकीचा निकाल लागून कौन्सिले सुरू होण्याची वेळ आली म्हणजे, राष्ट्रीय सभेचा म्हणून एक पक्ष बनविण्याची खटपट प्रत्येक प्रान्तांतील पुढाऱ्यानी करावी.

७ या कॉंग्रेस पक्षांत राष्ट्रीय सभेच्या नांवावर निवडून आलेले सभासद तर असावेच; पण इतरहि सभासद त्या पक्षात सामील होण्यास तयार असतील तर त्यांनाहि त्यात घेण्यात यावे. राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने, गौहत्तीच्या ठरावातील पहिली दोन सोडून उरलेली जी इतर चार कलमे आहेत ती मान्य करून, कॉंग्रेस पक्षांत समाविष्ट होण्यास तयार असणारे पुष्कळ सभासद मिळतील असे वाटते. अर्थात् अशा रीतीने राष्ट्रीय हिताचीच दृष्टि बाळगणारा, केवळ जातवार दृष्टि न ठेवणारा, सरकारला जरूर तेथे विरोध करणारा, आणि बिकट स्थितीत होईल तितके लोकोपयोगी काम कौन्सिलाकडून करविणारा, असा एक मोठा वर्ग कायदे कौन्सिलात निर्माण होईल. आणि प्रधानमंडळ बनवावयाचे तर गव्हर्नरांनी प्रथम अशाच वर्गाच्या पुढाऱ्याना बोलावून म्हणावे लागेल की, ' प्रधानमंडळ बनवीत आहो, तुम्ही आपली माणसे कोणती ती द्या. '

८ याचा उपयोग असा होईल की, आज कोठल्यातरी पक्षाला बोलावून त्याजकडून प्रधानमंडळ बनविण्यांत गव्हर्नर मदत घेतात तसे यापुढे न होता, अशा पक्षालाच बोलाविले जाईल की, ज्याने नेमून दिलेले लोक राष्ट्रहितबुद्धि बाळगणारे आणि राष्ट्रीय सभेचा हा ठराव मान्य करणारे असेच असतील. प्रधानमंडळातील जागाकरितां जे गृहस्थ या पक्षाने निवडून किंवा नेमून द्यावयाचे त्यांजकडून वाटेल तर काही करार करवून घेता येतील, आणि ते करार पाळण्याचे बंधन त्यांजवर राहील.

९ अशा रीतीने प्रधानमंडळ बनले म्हणजे कौन्सिलाच्या कामास सुरुवात होईल. पण हे प्रधान आपल्या पक्षाला दिलेली वचने पाळतात किंवा नाही हें कळून येण्याला फारसा उशीर लागणार नाही. प्रधान होणे म्हणजे सरकारचे धोरण थोडेबहुत स्वीकारणे ही गोष्ट उघड आहे. ती नाकबूल करण्यात अर्थ नाही. पण सामान्यतः प्रधानांचा कल लोकपक्षाकडे झुकतो, त्यांची राष्ट्रीय दृष्टि अगदीच ढळलेली नाही, कौन्सिलाच्या इच्छेप्रमाणे होतां होईल तो वागण्याची त्याची तयारी आहे, असे दिसून आल्यास कॉंग्रेस पक्षाने त्यांना

आपले काम रीतसर करू द्यावे. आणि त्यानी आणलेली बिले किंवा ठराव यांची अखेरची व्यवस्था त्यांतील गुणावगुणाकडे दृष्टि ठेवून योग्य तशी करावी. याचा अर्थ हाच की, प्रधानांनी आणलेली बिले किंवा ठराव केव्हां पास होतील, केव्हां नापास होतील, किवा केव्हा मूळच्या सूचनेत दुरुस्त्या होतील. असे झाल्यास प्रधानांना काही नावे ठेवता येणार नाहीत.

१० पण समजा की, याच्या उलट प्रकार घडला आणि एखाद्या प्रधानाने राष्ट्रीय हिताची दृष्टि ठेवली नाही, कौन्सिलच्या इच्छेला अयोग्य प्रकारचा विरोध केला, किंवा कॉंग्रेस पक्षाला दिलेले वचन पाळले नाही, तर 'तुम्ही राजीनामे द्या' असे खासगी रीतीने ह्या पक्षाला त्याला म्हणता येईल. "करार तरी पुरा करा किंवा जागाचे राजीनामे द्या" असे कॉंग्रेस पक्षाने प्रधानाना म्हणणे सरळ आणि रीतीचेच आहे. आणि हे झाल्यावर एखाद्या प्रधानाने आपला करार पुरा केला नाही किवा राजीनामाहि दिला नाही तर, त्याच्याविरुद्ध स्पष्ट निंदात्मक असा ठराव कॉंग्रेस पक्षाने माडून शक्य तर तो मंजूर करून घ्यावा. आणि ह्या निंदेलाहि त्याने दाद दिली नाही तर तो जातो कोठे? पुढच्या बजेटाच्या वेळी त्याचा पगार इतका कमी करावा की तो प्रधान जागेवर राहूच शकणार नाही.

११ कॉंग्रेसपक्षाने नेमून दिले म्हणून सर्वच प्रधान सर्वस्वी सोळा आणे लोकपक्षाचेच काम करतील असे नाही. कारण प्रत्यक्ष काम करताना अनेक प्रकारच्या अडचणी असतात त्या काम करणारालाच कळतात. तथापि केवळ जातवार मतदारसंघाचे किवा केवळ सरकारचे पाठबळ ज्या प्रधानाला आहे, अथवा जो प्रधान कायदे कौन्सिलातील गोंधळाच्या पायावर आपली इमारत बांधून कारभार करू म्हणेल, त्या प्रधानापेक्षा वर सांगितल्याप्रमाणे कॉंग्रेस पक्षाने नेमून दिलेला प्रधानच लोकहिताची दृष्टि अधिक ठेवील यात शंका नाही. दगडापेक्षा वीट मऊ हा नियम कौन्सिलातहि अनुसरल्याशिवाय चालणार नाही.

१२ कौन्सिलांतील पक्षांच्या बलाबलावर गव्हर्नर लोक प्रधानमंडळाकरितां उमेदवार स्वीकारतात ही गोष्ट आता निश्चित झाली असून, तिचा फायदा राष्ट्रीय पक्षाने करून घेण्याचे मनात आणल्यास त्याला घेतां येईल. आणि मतदारसंघाच्या इच्छेप्रमाणे कायदे कौन्सिलांत काम करवून घेण्यास सुरुवात होईल. उलट अशा रीतीने फायदा न घेतला तर प्रधानमंडळ बनल्याशिवाय तर राहावयाचेच नाही,

आणि जे प्रधान नेमिले जातील ते लोकमताची पर्वा न बाळगणारे असेच असतील. अर्थात् अशा प्रधानमंडळापासून जनतेचें हित होणार नाही. अगदी सोळा आणे लोकमताप्रमाणे चालणारे प्रधान न मिळाले तरी निदान १०–१२ आणे तसे चालणारे प्रधान स्वीकारावेत आणि त्यांजकडून काम करवून घ्यावे, हे लोकव्यवहाराला धरूनच आहे.

१३ "लोकमताला न जुमानणारे वाईट सभासद कौन्सिलांत येऊन बसतील आणि सरकारला मदत करतील, याकरिता तसले लोक निवडून येऊं नयेत—त्यांच्याहून चागले लोक निवडून यावेत—म्हणून कॉंग्रेसने कौन्सिलप्रवेश मान्य केला आहे." तेच तत्त्व प्रधानमडळालाहि तंतोतंत लागू पडतें. प्रधानमडळ जर बनणारच तर मग वाइटापेक्षां चांगले प्रधानमंडळ बनवितां आले तर ते इष्टच नव्हे काय ? अर्थात् ज्या कारणाकरितां कौन्सिलांत शिरण्याचा कार्यक्रम कॉंग्रेसने मंजूर केला त्याचकरितां व तीच दृष्टि शक्य तितकी ठेवून, आपल्या प्रतिनिधींकडून प्रधानमडळ बनविण्याचा कार्यक्रम घडवून आणणे योग्य होईल, म्हणून मी ही विधायक सूचना करीत आहे. कौन्सिल बहिष्कार घातल्यानें कौन्सिले भरण्याचे थाबले नाही. त्याप्रमाचे प्रधानमडळे बनवू नये असे म्हटल्याने ती बनण्याचीहि रहात नाहीत. आणि ती जर बनणारच तर ती त्यातल्या त्यात चागल्या लोकांची बनवावी हे उघडच आहे.

१४ राष्ट्रीय सभेने आपल्या कामाची वांटणी करणे आतां जरूर झाले आहे. ही वांटणी अशी करावयाची की, जे काम कौन्सिलांतून करतां येते तें कौन्सिलांवर सोपवावें; त्यांत राष्ट्रीय सभेने ढवळाढवळ करूं नये. पण हल्लीच्या कायद्यामुळे कौन्सिलांतून करतां येत नाही असे बरेंच राष्ट्रीय काम असते. किंबहुना नव्या कमिशनामुळे कायद्याची सुधारणा झाली तरी, कौन्सिलाने करतां येत नाहीं असें बरेच काम शिल्लक राहील. उदाहरणार्थ, देशी सस्थानांचा अंतर्गत कारभार; इग्रज सरकार व देशी सस्थाने ह्यांचे हितसंबंध; हिंदुस्थानसरकारचे परराष्ट्रीय संबंध; सैन्य आरमार वैमानिक दळ यांचे कारभार; वरिष्ठ सिव्हिल सर्व्हिसच्या नोकऱ्या; स्टेटसेक्रेटरी व त्यांचे अधिकार; हिंदुस्थानाचें आर्थिक स्वातंत्र्य; आशिया खंडांतील राष्ट्रांचा संघ इ. इ. राष्ट्रीय सभेला हीं कामे करण्याला काय थोडी आहेत किंवा लहान आहेत ? शिवाय कौन्सिलांतील कामासंबंधानें मतभेद फार होऊं

शकतां. कारण ते काम तपशिलाचे आहे. पण वर दर्शविलेल्या विषयासंबंधाने हिंदी लोकांत फारसा मतभेद होणार नाही.

१५ राजकारणांतील एक विशिष्ट पक्ष ह्या नात्याने तर कॉंग्रेसने आपले काम करूंच नये. आणि स्वराज्य संपादण्याला जणु काय एकच कोठला तरी मार्ग आहे अशा समजुतीनेहि अशा एखाद्या धोरणाला तिने स्वतःला चिकटवून घेऊं नये. देश एकच म्हटला तरी त्यात हितसंबंध अनेक प्रकारचे असतात. आणि राष्ट्रीय सभा ही कोणत्याहि एका हितसंबंधाचे समर्थन करते असा भास लोकांना झाल्यास ते बरे नाही. युरोपांत जशी लीग ऑफ नेशन्स किंवा राष्ट्रसंघ निर्माण झालेला आहे तशीच प्रान्तांसंबंधाने, आणि सर्व हितसंबंधाविषयीचा विचार करणारी, राष्ट्रीय सभा ही समजली जावी. म्हणजे निरनिराळ्या किंवा परस्पर विरोधी हितसंबंधामधील तंटा किंवा लढा मिटवून त्यांचे तोंड मिळते करणे एवढेच अंतर्गत कार्य राष्ट्रीय सभेने करावे. या कामाकरितां राष्ट्रीय सभेने आपल्यातर्फे 'आरबिट्रेशन बोर्डस' किंवा न्याय-मंडळ नेमावीं. हल्लीच्या पक्षभेदातून राष्ट्रीय सभेने डोके वर काढल्याशिवाय राष्ट्रीय सभेविषयी कोणास बहुमान किंवा प्रीति वाटणार नाही !

१६ खादीच्या पोषाखासंबंधाने राष्ट्रीय सभेच्या नियमांत घातलेली अट काढून टाकली तरच राष्ट्रीय सभेला काहीसे प्रातिनिधिक स्वरूप येईल. तसेच स्थानिक कॉंग्रेसकमिट्यानी कॉंग्रेसचे प्रतिनिधि आणि ऑल-इंडिया कॉंग्रेस-कमिटीचे सभासद हल्लींप्रमाणे काही निवडून द्यावेच; पण प्रत्येक प्रांतातील कायदे-कौन्सिल, असेंब्ली, व कौन्सिल ऑफ स्टेट यांच्या लोकनियुक्त सभासदांना राष्ट्रीय सभेमध्ये अवश्य स्थान मिळाले पाहिजे. मतदारसंघांतून निवडून येणे ही देखील राष्ट्रीय सभेचा प्रतिनिधि किंवा ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटीचा सभासद होण्याला स्वयंभू पात्रता समजावी. हे सगळेच सभासद घेतले तर त्याची संख्या फार होईल असे वाटल्यास कोणते किती सभासद कसे घ्यावेत याची योजना ठरविता येईल.

* * *

या माझ्या पत्रकाची शिफारस अशी करतां येईल की या पत्रकांतील सूचना सातारा येथील कट्टर नाफेरवाल्यांनाहि मान्य झाल्या होत्या, आणि त्यांनी मला तसें लिहून कळविलें होतें.

नाफेरवाले व फेरवाले यांच्यांतील मतभेद हा इतका सूक्ष्म होता. तथापि त्यांच्यांतील समेटाचा प्रश्न या दृष्टीने मागे पडून दुसऱ्या एका वेगळ्या दृष्टीने पुढे आला व तो थोडासा सुटला. तो असा की, १९२८ अखेर 'नेहरू रिपोर्ट' तयार झाल्यावर तो फेर-नाफेरवाले या सर्वांना पसत पडून काँग्रेसनेहि त्याला मान्यता दिल्यावर, महाराष्ट्रातील या दोनहि पक्षांनी मिळून महाराष्ट्रांत दौरा काढला होता. परतु १९२९ च्या लाहोर काँग्रेसमध्ये तो रिपोर्ट उलथून पडल्यावर पुन्हा मतभेद डोकावू लागला !

---

## ( २ ) कायदेकौन्सिलांतील कामकाज

माझे प्रथमपासूनच असे निश्चित मत होते की, जोपर्यंत ब्रिटिशसरकारला न जुमानणारे असे प्रतिस्पर्धी सरकार हिंदुस्थानचे लोक निर्माण करू शकत नाहीत, तोंपर्यंत वरिष्ठ किंवा कनिष्ठ कायदेकौन्सिलावर बहिष्कार घालणे सयुक्तिक नाही. १९२० च्या पूर्वी जहाल मवाळ असा भेद राजकीय पक्षांत असला तरी त्यापैकी कोणीहि कायदे कौन्सिलावर बहिष्कार घालण्याची कल्पना मनात आणली नव्हती. सरकारी नोकरी ही लोकसेवेच्या तुलनेने हीन अशी भावना असताहि, सरकारी नोकरींतल्या वरिष्ठ मानाच्या अधिकाराच्या व मिळकतीच्या जागा आपणा हिंदी लोकांना हक्काने मिळाव्या अशी राष्ट्रीय मागणी करण्यांत जे स्वारस्य असते, त्याच प्रकारचें स्वारस्य कायदे कौन्सिलांतील मिळतील त्या जागा लोकपक्षाच्या हाती असाव्या या म्हणण्यात आहे हें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करील. कायदे कौन्सिलाचा इतिहास पहातां, लोकपक्षाला निर्णायक स्वरूपाचा अधिकार १९३५ सालच्या राज्यघटना कायद्यानेच कांही थोडासा मिळाला आहे हें खरे. तथापि प्रथम मनासारखे मिळत नसले तरी मिळेल ते, त्याला नांवे ठेवीत ठेवीत, स्वीकारावयाचे व त्याचा शक्य तो उपयोग करून घ्यावयाचा हे धोरण कोणत्याहि पक्षाने पूर्वीपासून ठेवले होते. इतर देशांची उदाहरणेहि हेच सांगत आली आहेत. १९२० मध्ये असहकारितेची घोषणा करण्यांत आली तरी, आणि मधून मधून कायदेभंगाची चळवळ करण्यांत आली तरी, काँग्रेसच्या हातून प्रतिस्पर्धी सरकार निर्माण करणे झाले नाही. कायदेभंगाच्या विशिष्ट बाबींखेरीज करून इतर सर्व प्रकारचे कायदे असहकारवादीहि मान्य करीत. सरकारचे हुकूम मान्य करीत त्याबरोबरच सरकार-

कडून होणारा लोकहिताचा लाभहि पदरांत पाडून घेण्यास त्यांची तयारी असे. फार काय, कौन्सिलावर बहिष्कार घालणाऱ्या कॉंग्रेसने, याच कौन्सिलांत घडणाऱ्या कायद्यान व नियमांनी बनणारी व चालणारी जी स्थानिक-स्वराज्य संस्था तिजवर केव्हांहि बहिष्कार घातला नव्हता हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. या विपरीत धोरणांत शहाणपणा कसला ? नदीच्या उगमाजवळचे पाणी बहिष्कृत मानून खाली वहात आलेले पाणी शुद्ध मानण्यासारखेच विपरीत असे हे धोरण नव्हते काय ? किंवा दुसरी उपमा द्यावयाची तर लहान परकऱ्या मुलीची रीत अशी असते की, त्याना एखाद्या गोष्टीची लाज वाटली म्हणजे त्या नेसूचा परकर वर उचलून घेऊन त्याने आपले तोंड झाकून घेतात व लाज छपविण्याचा प्रयत्न यशस्वी झाला असे मानतात.

असो. कायदे कौन्सिलासंबंधाने माझे हे मत प्रथमपासून असल्यामुळे, माझ्या राजकीय उमेदवारीच्या प्रगतीत संधि येईल तेव्हा मी कौन्सिल निवडणुकीला उभा रहाणार हे ठरल्यासारखेच होते. १९०७ पर्यंत ही संधि मला येणे शक्य नव्हते. पण १९०९ सालच्या निवडणुकी उपस्थित झाल्या तेव्हा मी मध्यभागातील लोकल-बोर्डातर्फे होणाऱ्या निवडणुकीला उभा राहिलो. माझे प्रतिपक्षी पुण्याचे कादंबरीकार हरि नारायण आपटे आणि धुळ्याचे सि. धो. गरूड वकील हे होते. माझ्या उमेदवारीला चांगलेच पाठबळ होते. आणि अकल्पित रीत्या विघात झाला नसता तर मी बहुधा निवडून आलो असतो असे म्हणतात. परंतु आदल्या वर्षी मला हायकोर्टाच्या बेअदबीच्या गुन्ह्याकरिता तुरुंगवासाची शिक्षा झाली होती हे कारण लावून लॉर्ड सिडनहॅम, गव्हर्नर, यानी माझी उमेदवारी आपल्या खास अधिकारात रद्द केली. माझा 'नॉमिनेशन पेपर' रीतसर स्वीकारला जाऊन निवडणुकीस, म्हणजे प्रत्यक्ष मतपत्रिका कमिशनरकडे दाखल होण्यास, आरंभ झाला होता. परंतु वरील प्रकार घडल्यामुळे उरल्या दोन नावांच्याच मतपत्रिका नोंदल्या जाऊन रा. गरूड हे निवडून आले. अशा रीतीने कौन्सिल-प्रवेशाची माझी पहिली संधि फुकट गेली.

१९२३ च्या अखेरीस कनिष्ठ वरिष्ठ विधिमंडळाच्या नव्या निवडणुकी व्हावयाच्या असे ठरले. त्या आधी कॉंग्रेसची कायदेभंगाची चळवळ थांबविण्यांत आली होती. आणि कायदेभंग चौकशी कमिटीच्या निम्म्या सभासदांनीं कॉंग्रेसने कौन्सिल प्रवेश करावा अशी शिफारस केली होती. 'स्वराज्य पक्षा'ने तर कॉंग्रेसला न जुमानतांच विधिमंडळांत प्रवेश करावयाचे धोरण निश्चित केलें होते. त्याप्रमाणे

दिल्ली येथील विधिमडळाच्या निवडणुकीकरितां मध्यभागाच्या सात जिल्ह्यांतर्फे मी आपली उमेदवारी जाहीर केली. काँग्रेमने स्वतः या निवडणुकीत भाग न घेण्याचे ठरविले असल्याने तिच्यातर्फे कोणीच उमेदवार उभा राहिला नाही. तथापि महाराष्ट्रांतील लिबरल पक्ष आणि ब्राह्मणेतर पक्ष यांनी आपले उमेदवार उभे केले. काँग्रेसनें निवडणुकीत भाग घ्यावयाचे ठरविले असते तरी मला वाटते, तिला मला तुल्यबळ असा प्रतिस्पर्धी उभा करणे त्यावेळी शक्य झाले नसते. एका अर्थाने स्वराज्यपक्ष हा काँग्रेसमधील अतर्गत पक्ष असाच मानला जात होता. पुष्कळ काँग्रेसच्याहि पुढाऱ्याना विधिमंडळ प्रवेश मनातून मान्य होता. पण म. गाधीजीचे अनुयायी या नात्याने त्याच्या गुरुच्या मताविरुद्ध जाण्याचे धाडस त्यांना करवत नव्हते यामुळे स्वराज्यपक्षाविषयी सहानुभूति-मिश्र असा तटस्थपणा त्यांनी स्वीकारला. ब्राह्मणेतर पक्ष अजून काँग्रेसशी फटकून वागत असे, इतकेच नव्हे तिजवर उघड उघड टीका करीत असे यामुळे त्या पक्षाच्या उमेदवाराला पाठिंबा देण्याला काँग्रेस पुढाऱ्याना काही कारण नव्हते आणि उत्साह तर नव्हताच नव्हता. स्वराज्यपक्ष गाधीजींविरुद्ध बंड करण्यास प्रवृत्त झाला असला तरी, हाडाने तो पक्ष पुरा 'राष्ट्रीय' आहे तसा ब्राह्मणेतर पक्ष नाही, ही त्याची खात्री होती. तात्पर्य कट्टर गाधीभक्ताना मी प्रिय नसलो तरी त्यांनी माझ्या निवडणुकीला विरोध केला नाही.

महाराष्ट्राच्या सात जिल्ह्यांकरितां मिळून दोन जागा होत्या. पैकी या दुसऱ्या जागेकरिता पुण्याचे डॉक्टर लोहोकरे हे उभे राहिले. तेहि स्वराज्यपक्षाचे सभासद होते. तेव्हां एकाच पक्षाच्या वतीने दोन उमेदवार नेमावे की नाही हा मोठा बिकट प्रश्न उत्पन्न झाला. लोहोकरे याना स्वराज्यपक्षाने स्वीकृत केले नसते तरी, ते उद्योगी आणि महत्वाकाक्षी असल्यामुळे स्वतत्र म्हणून उभे राहिले असते! तेव्हां एकंदर परिस्थिति पहाता, या पक्षाचे दोन उमेदवार उभे केले तरी ते झेपू शकतील असे वाटल्यावरून, लोहोकरे याच्या उमेदवारीलाहि स्वराज्यपक्षाने संमति दिली. उलट लोहोकरे यानीहि असे कबूल केले की, "केळकरांच्या मार्गात मी मुळीच आड येणार नाही. आधी ते निवडून येण्याची खात्री करून मग उरली मते मी आपणाला घेईन." वास्तविक एकदां चढाओढ सुरू झाली म्हणजे हा सूक्ष्म विवेक फारसा टिकत नाही, आणि जो तो उमेदवार आपल्यापुरती खंबिरी करितो, हें स्वाभाविकच आहे. पण हे ठाऊक असतांहि लोहोकरे यांना जोडीचे उमेदवार म्हणून पत्करण्यास मी तयार झालो, इतका आत्मविश्वास मला होता.

व्यक्तिशः मी निवडून आलोंच पाहिजे, कारण त्यावर नव्या स्वराज्यपक्षाची इभ्रत आणि यश अवलंबून होतं ! याकरिता मी शक्य तितकी आपल्या मताची खात्री करावी हे क्रमप्राप्त झाले. स्वतः लोहोकरे हेहि ही गोष्ट गृहीत घेऊन चालले होतेच. पण महाराष्ट्रातील माझ्या सहाय्यकाना देखील ही गोष्ट उघड दिसत होती. म्हणून, या व्यवस्थेत असणारा धोका पत्करूनहि, मी लोहोकरे याना हाताशी घेऊन निवडणूक लढविण्याचं ठरविले.

या धोक्याचा प्रत्यक्ष अनुभव निवडणुकीत थोडथोडा आलाहि. कारण आम्ही दोघे उमेदवार मिळून एकाच वाहनातून मते मिळविण्याकरिता हिंडत असलो तरी जात्यभिमान हा जेथे तेथे डोके वर काढून बसलेलाच होता. यामुळे असे घडे की, जाहीर सभेत "प्रथम केळकराना हटकून निवडून येण्याला लागतील तितकी मते देऊन मग उरली मते लोहोकऱ्याना द्यावी " असे ठराव होत. परंतु मी चित्पावन कोकणस्थ आणि लोहोकरे यजुर्वेदी देशस्थ हा भेद ध्यानात धरून खासगी कारस्थानांत कांही काही मतदार आपल्या जात्यभिमानाच्या वळणावर थोडे बहुत जात. हा जात्यभिमान उभयपक्षातहि होताच. तथापि देशस्थ यजुर्वेदी लोकात शिक्षण कमी यामुळे त्यांच्यामध्ये तो थोडा अधिक होता इतकेच. माझे पारडे इतर रीतीने आधीच जड यामुळेहि मला जात्यभिमान भरीस घालण्याचे कारण नव्हते. परंतु लोहोकरे यांच्याकरितां झटणारे लोक या जात्यभिमानाचा उपयोग करीत ही गोष्ट नगर नाशिक व खानदेश या जिल्ह्यांत विशेष दृष्टोत्पतीस आली. पण याकडे दुर्लक्ष करणे प्राप्त होत. मी स्वतः मात्र या जात्यभिमानाचा उपयोग कोठेहि केला नाही हे प्रामाणिकपणे सांगू शकतो. हे कारस्थान तोडाने वाच्यता न करतां गुप्त मतदान पद्धतीत सहज साधण्यासारखे होते तरी ते निवडणुकीच्या निकालानंतर सहजच उघडकीस आले. मात्र या कारस्थानाची बाधा विशेष न होतां माझी निवडणूक यशस्वी झाली. आणि दोनाहि जागा स्वराज्य पक्षाच्या पदरांत पडून त्याची इभ्रत एकदम वाढली. लोकमताने निःसंदिग्ध असाच निर्णय दिला.

स्वराज्य पक्षाप्रमाणे लिबरल आणि ब्राह्मणेतर पक्षांनीहि या दोन जागां-करितां दोन दोन उमेदवार उभे केले होते. लिबरल पक्षातर्फे पुण्याचे बा. सी. कामत आणि अहमदनगरचे ह. क. पटवर्धन उभे होते. ब्राह्मणेतर पक्षातर्फे कोल्हापूरचे निंबाळकर आणि पुण्याचे बागडे उभे होते. वस्तुतः या दोन पक्षांनी

आपले ठराव करून त्याना उभे केले नव्हते. परतु निवडणुकीच्या प्रचारांत ते त्या पक्षांचे सभासद म्हणून त्या पक्षांची नांवे सांगत. लिबरल पक्षाची मुख्य कचेरी पुण्यास होती. परंतु कामत व पटवर्धन या पैकी कोणी तरी एकच उभा करून त्यावर सर्व बळ एकवटावे हे इष्ट असतां तिला तसें घडवून आणतां आले नाही. ब्राह्मणेतर पक्षाच्या मुख्य कचेऱ्याच मुळात दोन ठिकाणी. एक पुणे व एक कोल्हापूर येथे. यामुळे त्याच्यात एकवाक्यता होणे शक्यच नव्हते. तात्पर्य अशा रीतीने या तीन पक्षांचे प्रत्येकी दोन याप्रमाणे एकुण सहा उमेदवार या निवडणुकीस उभे होते. रा. कामत हे पूर्वी एकदा १९२० च्या निवडणुकीत उभे राहून निवडून आले असल्यामुळे त्याना आपण फिरून निवडन येऊ अशी आशा होती. निबाळकर याचा पोलीस खात्याशी सबध व त्याना कोल्हापूरच्या महाराजाचा पाठिबा होता. बागडे हे एलएल् बी. वकील त्याच्याइतका सुशिक्षित ब्राह्मणेतर पुढारी त्या वेळी पुण्यात नव्हता. यामुळे आपणास या पक्षाकडून पाठिबा मिळेल अशी त्यांना आशा होती. शिवाय ब्राह्मणाना शिव्या देण्याच्या कामी ब्राह्मणेतर पक्षातील अत्यंत मुखर असे ते एक चागले वक्ते होते येऊन जाऊन हरिभाऊ पटवर्धन यांनाच सर्वात पाठबळ कमी होते. आणि शेवटी ते तसे दिसून आलेच. या निवडणुकीच्या निकालाचा तक्ता खाली दिला आहे.

**मध्यप्रांत (मुंबई ईलाखा) असेंब्ली निवडणूक** (ता. १४ नोव्हेंबर, १९२३)

| अ. नं. | उमेदवाराचे नांव | निवडणुकीत मते पडली ती |
|---|---|---|
| १ | नरसिह चितामण केळकर | ९४४६ |
| २ | कृष्णाजी गो. लोहोकरे | १६३७ |
| ३ | निबाळकर | १५६४ |
| ४ | बागडे वकील | १४४० |
| ५ | बा. सि. कामत | १२८५ |
| ६ | ह. के. पटवर्धन | ११६६ |
| | एकूण | १६५३८ |

वरील तक्त्यातील आकड्यावरून होणारा बोध स्पष्टच आहे. एकदर मते पडली त्यातली निम्म्याहून अधिक मते मला एकट्याला मिळाली. लोहोकरे हे दुसरे निवडून आले; परंतु त्याच्या माझ्यामध्ये जवळ जवळ आठ हजारांइतके अंतर पडल ! दोनहि ब्राम्हणेतर उमेदवाराना मिळन माझ्या एकतृतीयांशाहि मते लाभली नाहीत ! आणि दोनहि लिबरल उमेदवारांना मिळून माझ्या चतुर्थांशा-इतकीच मत पडली !

पण केवळ आकड्यावरून दिसून न येणारी अशी सांगण्यासारखी एक गोष्ट आहे ती अशी. निवडणुकीच्या नियमात एक नियम असा होता की, "प्रत्येक उमेदवाराला प्रारभी पांचशे रुपयाची ठेव सरकारात भरावी लागते. तो निवडून आला तर ती रक्कम त्याला परत देण्यांत येते. मग त्याला कितीहि कमी मते पडोत. पण निवडून न आलेल्या उमेदवाराला जर एकूण नोंदलेल्या मतांपैकी एक अष्टमांशाइतकीहि मते पडली नाहीत तर त्याची ती पांचशे रुपयांची रक्कम सरकारजमा होते." प्रस्तुत निवडणुकीत एकंदर मते १६५३८ इतकी नोंदली गेली. अर्थात् ज्या अयशस्वी उमेदवाराला निदान दोन हजार मते पडली नाहीत त्याची ठेव सरकारजमा होण्याला पात्र ठरावयाची. त्याप्रमाणे निंबाळकर, बागडे, कामत व पटवर्धन या सर्वांचे पाच-पाचशे रुपये बुडून सरकार जमा झाले ! लोहोकरे हेहि एक अष्टमांशाइतकी मते न मिळालेले म्हणून त्यांचीहि ठेव अशीच सरकार जमा व्हावयाची, परतु ते नंबर दोनच्या जागी निवडूनच आले म्हणून त्यांची ती रक्कम वाचली ! अशी रक्कम ठेवून घेण्यांत सरकारचा हेतु हाच असतो की, वाटेल त्या मनुष्याला उमेदवार म्हणून उभे रहातां येते एवढ्या-करताच त्याने उभे रहावे असे नाही. निवडून येण्याची थोडीबहुत तरी आशा असेल त्यानेच उभे रहावे. नाही तर वाटेल तितके उमेदवार भरमसाट उभे रहातात. आणि मग सरकारला तितक्याच्या नावाच्या पेट्या तयार ठेवाव्या लागतात आणि विनाकारण खर्च आणि व्यवस्थेचा त्रास होतो. असो. अशा रीतीने मी बेसुमार मते एकटयाला खाऊन सरकारच्या पदरांत दोन हजार रुपये घालण्याला कारणीभूत झालो. पण मी तरी त्याला काय करणार !

## जिल्हावार मतनोंदणीचा तक्ता.

| क्र. नं. | जिल्हा | केळकर | लोहोकरे | निंबाळकर | बागडे | कामत | पटवर्धन | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पूर्व खानदेश | १३९० | २७१ | ३९४ | ५७५ | ३९ | १५७ | २८२६ |
| २ | नाशिक | १२३९ | २४५ | ४०८ | ५७ | १२९ | ४१ | २११९ |
| ३ | सोलापूर | १३४४ | २२ | १७१ | ९६ | २८५ | ३२ | १९५० |
| ४ | पश्चिम खानदेश | १३१७ | ५८१ | १५६ | १६० | १७२ | ३८ | १४२४ |
| ५ | सातारा | १८३१ | १२५ | २४६ | ४३० | १९५ | ८६ | २९१३ |
| ६ | अहमदनगर | ८८३ | १५२ | ८५ | २९ | ४८ | ६९७ | १७९४ |
| ७ | पुणे | १३९१ | २२१ | ९२ | ८२ | ४१४ | ९५ | २१९५ |
| | शंकित पण कायम धरलेली | ५१ | २० | १२ | ११ | ३ | २० | १४७ |
| | एकूण मते | ९४४६ | १६३७ | १५६४ | १४४० | १२८५ | ११६६ | १६५३८ |

जिल्हावारीने पाहिले तरी प्रत्येक जिल्ह्यांत कोणत्याहि उमेदवाराला माझ्याहून अधिक मते मिळाली नाहीत. एक अहमदनगर सोडल्यास प्रत्येक जिल्ह्यांत मला १२०० पासून १८०० च्या दरम्यान मते मिळालीं. अहमदनगर जिल्ह्यांत मात्र मला ८८३ मते मिळालीं आणि हरिभाऊ पटवर्धन यांना माझ्या खालोखाल ६७७ मते मिळाली, कारण हरिभाऊ हे त्या जिल्ह्यांतील प्रमुख वजनदार पुढारी होते. त्या जिल्ह्यांत पडलेल्या एकदर १७९४ मतांपैकी मी व पटवर्धन यांनी मिळून १५८० मतें घेतली. लोहोकरे यांना पश्चिम खानदेशांत जितकी मते पडली तितकी अहमदनगर सोडल्यास दुसऱ्या कोणत्याहि जिल्ह्यांत कोणाहि उमेदवाराला मिळाली नाहींत. याचें एक कारण त्या जिल्ह्यांत देशस्थ यजुर्वेदी लोकांची वस्ती मोठी आहे. माझ्या सहाय्यकर्त्यांनीं देखील एक मत मला तर एक लोहोकरे यांना अशी टाकण्याची व्यवस्था केली. परंतु सर्व साधारण मतदार संघांत मलाच अधिक मतें पडल्यामुळें लोहोकरे यांच्यापेक्षा माझीं मते खानदेशांतहि साडेसातशेनी अधिक भरली. पूर्व खानदेशांत बागडे यांना लोहोकरे यांचे खालोखाल ५७५ मते पडली.

याचे कारण पूर्व खानदेशांत मतदारांचा भरणा फार मोठा आणि ब्राम्हणेतर मताचे प्राबल्य तथापि त्याहि जिल्ह्यांत बागडे यांच्यापेक्षां मला आठशेहून अधिक मते मिळाली. तात्पर्य, कोणच्याहि दृष्टीने पाहतां मतदानाच्या मापाने मोजतां येणारी माझी लोकप्रियता त्यावेळी इतर कोणत्याहि उमेदवारापेक्षा, आणि स्वराज्यपक्षाची लोकप्रियता इतर कोणत्याहि पक्षापेक्षां, निःसंशय अधिक होती हे या निवडणुकीने ठरविले.

या १९२३ च्या निवडणुकीत व्यक्तिशः मला एक मोठी अप्रिय गोष्ट करावी लागली ती अशी. कनिष्ठ म्हणजे मुंबई विधिमंडळाच्या निवडणुकीत माझे वडील बंधु अप्पासाहेब केळकर हे पूर्व खानदेशतर्फे उभे राहिलेल्या उमेदवारांपैकी एक होते. निवडणुकीपूर्वी काही थोडे दिवस त्यांनी पेन्शन घेतले होते पेन्शन घेतले असले तरी त्यामुळे निवडणुकीला उभे राहण्यास त्यांना बाध नव्हताच. आणि याच जिल्ह्यात मामलेदार व डेप्युटी कलेक्टर या नात्याने काम करून सरकारी शिफा-रसीबरोबर त्यांनी लोकप्रियताहि संपादन केली होती. उमेदवार वकीलापेक्षाहि एका दृष्टीने त्याचा परिचय जिल्ह्यातील जनतेशी पुष्कळच अधिक निकट आलेला होता. आणि प्रत्यक्ष मुलकी खात्यांतच त्यांची नोकरी झाल्यामुळे रयतेची खरी दुःखे त्यांना इतर कोणाहिपेक्षां अधिक परिचित, म्हणून त्यांचा गवगवा विधि-मंडळांत करून ती दूर करवून घेण्याची पात्रताहि त्याच्या अंगी अधिक होती. याकरितां सेवानिवृत्तीनंतर हातून थोडाबहुत लोकोपयोग व्हावा या हेतूने ते निवड-णुकीस उभे राहिले. परंतु या जिल्ह्याच्या तीनाहि जागाकरितां स्वराज्यपक्षाने तीन उमेदवार उभे केल्यामुळे, माझे खाजगी नाते आणि माझे सार्वजनिक कर्तव्य यांमध्ये मोठाच दुस्तर विरोध उत्पन्न झाला ! तथापि या नात्यापेक्षा या कर्तव्यालाच अधिक मान देणे मला प्राप्त असल्यामुळे मतप्रचाराच्या जाहीरसभांतून "माझ्या बंधूना मते देऊं नका, ती स्वराज्यपक्षाच्या उमेदवारालाच द्या" असे मला उघडपणे सांगत जावे लागले ! पण माझी अडचण ध्यानांत येण्याइतके माझे बंधु स्वतः समंजस असल्यामुळे, मजकडून होणाऱ्या विरोधाचा बिलकूल गैरसमज त्यांनी करून घेतला नाही, राग मानला नाही, तर खाजगी रीतीने उलट कौतुकच केले.

या पुढील निवडणूक १९२६ च्या नोव्हेंबरांत झाली. तिलाहि फिरून मी उमेदवार म्हणून उभा राहिलों. पण या पूर्वी एक महत्त्वाचे स्थित्यंतर घडून आले

होतें. १९२५–२६ साली स्वराज्यपक्षांत मतभेद झाला. विधिमंडळांत नुसतें शिरावे इतकेंच नव्हे तर मिळतील त्या अधिकाराच्या जागाहि स्वीकाराव्या असें आम्हा महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचे मत असल्यामुळे, स्वराज्यपक्षाचे अध्यक्ष पं. मोतीलाल नेहरू व त्यांचे सहाय्यक ( दिल्ली विधिमंडळाचे अध्यक्ष ) विठ्ठलभाई यांचा आणि आमचा पुष्कळच बेबनाव झाला. आम्ही स्वराज्यपक्षाच्या तिकिटा-वर निवडून आलेले म्हणून मी, बापूजी अणे इत्यादि पुढाऱ्यांनी असेंब्लीतील आपल्या जागाचे राजीनामे दिले. पण १९२६ च्या अखेरीस नव्या निवडणुकी उपस्थित होतांच आमच्या नव्या, म्हणजे प्रतियोगी सहकारिता पक्षाच समर्थन जनतेपुढे करण्याकरिता आम्हाला निवडणुकी लढविणे प्राप्तच झाले. मजवर पूर्वी, कौन्सिल प्रवेशाची तरफदारी करणारा म्हणून, कॉंग्रेसपक्षांतील कट्टरांचा राग होताच. पण तेव्हां मोतीलाल नेहरू व चि. र. दास या सारख्याचे मला पाठबळ होते. आतां दास दिवंगत झाले आणि नेहरू बिथरले, तेव्हां असहाय्य असे माझे महाराष्ट्रातील पुढारीपण पणाला लागण्याचा प्रसग येऊन ठेपला. पूर्वी कॉंग्रेस-वाले सहानुभूति-मिश्र तटस्थपणा धारण करून राहिले, पण ते आता मजवर उघड उघड रागावले. आणि माझा पाडाव करण्याकरिता मला प्रतिस्पर्धीहि उभा करते, परतु तसे करणे म्हणजे कौन्सिल प्रवेशाला मान्यता देण्यासारखे होईल, म्हणून त्याना ही गोष्ट करता येईना. मात्र पूर्वीचे तटस्थपणाचे धोरण सोडून आतां ते गुप्त कारवाई करून मला आपला विरोध जाणवूं लागले.

तथापि माझी मते व माझे पुढारीपण महाराष्ट्राला मान्य होते, त्यांत फेर-बदल झाला नव्हता, याचा प्रत्यय या नव्या निवडणुकीने आणून दिला. या खेपेस लिबरलपक्ष निवडणुकीच्या भानगडीत मुळी पडलाच नाही. ब्राह्मणेतर ( सत्यशोधक ) पक्ष मात्र अजून जागा धरून राहिला होता. इतकेच नव्हे, तर त्याचे बळ वाढत होते. या खेपेस पक्षातीत म्हणजे स्वतंत्र अशा उमेदवारांची संख्या पुष्कळच होती. त्यांत विशेष पुढे सरसावण्यासारखे दोन होते. एक शिंद्या स्टी. नॅ. कपनीचे साराभाई हाजी, आणि दुसरे जळगांवचे रुपचद मोतीरामशेट. 'हाजी' हें नांव मुसलमानी दिसते, पण साराभाई हे जैनधर्मी गुजराथी वैश्य आहेत. या अपरिचित गृहस्थाचे नांवहि तेव्हां इकडे कोणास माहीत नव्हते. तथापि ते मुंबईच्या एका मोठ्या नॅव्हिगेशन कंपनीचे एक अधिकारी होते. यामुळे दिल्ली येथील विधि-मंडळांत किनाऱ्यावरील वहातुकीचे बिल आणण्याच्या खटपटीकरितां कंपनीने त्यांना

उभे करून, त्याकरितां वाटेल तितका खर्च करण्याचे योजिले होते. शेट रुपचंद मोतीराम हे जळगांव येथील एक धनिक व्यापारी होते. आणि जो उमेदवार खानदेश जिंकील तो सर्व निवडणूक जिंकील असे वाटण्याइतकी मतदारांची भरती त्या दोन जिल्ह्यांत मिळून असल्याने, रुपचद याना यशाची मोठी आशा वाटत होती. इतर जिल्ह्यांतील मारवाडी समाजाची मदतहि त्यांना होण्यासारखी होतीच. उरल्या उमेदवारांत बागडे हे ब्राह्मणेतरातर्फे उभे होते. शिवाय माळेगांवचे राजे शंभुसिंग जाधवराव आणि खर्डेकर ( कोल्हापूर सस्थानापैकीं एक जहागीरदार ), हे स्वतंत्र उमेदवार म्हणून उभे होते, तरी त्यांची भिस्त ब्राह्मणेतर मतदार संघावर बरीच होती.

या स्वतंत्र उमेदवारात सातारा जिल्ह्याचे पुढारी रा. दादासाहेब करदीकर हेहि यावेळी उभे होते. दादासाहेबाची नेहमीची भूमिका 'सर्वपक्षीय' अशी असल्यामुळे ते कोणत्याहि एका पक्षातर्फे उभे राहणे शक्यच नव्हते. तथापि इतर अनेक रीतीने ते व मी हे एकाच गटांतले व ऋणानुबंधी. त्यांचे सातारा जिल्ह्यांत स्वाभाविक वजन होते, तर मी एकदर महाराष्ट्राचा एक पुढारी या नात्याने माझेहि हितचिंतक सातारा जिल्ह्यात पुष्कळ. यामुळे तेथील मतदाराना मोठाच पेच येऊन पडला. दादासाहेबाना त्याच्या कांही मित्रानी असे सुचविलेहि की, " ही निवडणूक एकप्रकारे तत्त्व प्रस्थापनेकरिता होत आहे, केळकर हे वरिष्ठ विधिमडळात असतां त्यांनी प्रतिसहकार तत्त्वाच्या वादात एक वर्ष आधी (१९२६) राजीनामा दिला. आणि तें तत्त्व विजयी करण्याकरितां निवडणुकीस उभे आहेत. म्हणून वडीलकीच्या नात्याने तुम्ही या वेळी मागे सरून त्याचा मार्ग मोकळा करून देणे इष्ट आहे." परतु एकदा दाखल केलेली उमेदवारी परत घेणे हे करदीकरांना जड वाटले. तेव्हां मतदारानींच आपला काय तो विचार करावा असा प्रसंग आला. म्हणून रा. भाऊसाहेब सोमण वकील, जे दादासाहेबांच्या मागून सातारा-जिल्ह्याचे अनभिषिक्त पुढारी ठरले होते, त्यांनी आपल्या सहीवर जाहीर विनति-पत्रक काढून " ही वेळ केळकरानांच मते देण्याची आहे " असे मतदारांना सुचविले. दादासाहेबांना अशा रीतीने विरोध करावा लागणे हे स्वतः मला व माझ्याहिपेक्षां सोमण यांना संकट वाटले. परंतु त्यांनी तसे करण्याचे धैर्य दाखविले. यामुळे दादासाहेबांना पुष्कळ कमी मते पडली आणि माझ्या निवडणुकीस मोठे सहाय्य झाले.

अशाच प्रकारची दुसरी एक अडचण माझ्या मार्गांत येणारी होती परंतु तिचेहि निराकरण एका निराळया रीतीने झाले. पर्वांच्या निवडणुकीत माझ्या सहाय्याने माझ्याबरोबर यशस्वी झालेले डॉ. लोहोकरे याना वरिष्ठ विधिमंडळाच्या निवडणुकीला पुनः उभे राहण्याची इच्छा सहजच होणारी. आणि ते उभे राहते तर मला खचित अडचण तरी झाली असती. लोहोकरे हे केवळ एल्. सी. पी. एस्. डॉक्टर असताहि मोठे तरतरीत, धीट व उद्योगी होतेच. पण या सर्वांपेक्षां महत्वाकांक्षेचा गुण त्यांच्यामध्ये मोठा होता. म्हणून त्यांना आवरणे, माझ्या व त्यांच्याहि मित्राना कठिण गेले असते. परंतु याच वेळी मुंबई प्रांतिक विधिमंडळाच्याहि निवडणुकी व्हावयाच्या होत्या. यामुळे पुण शहरातर्फे आपण उभे रहावे अशी कल्पना त्यांना सुचली. आणि नव्या प्रतिसहकार पक्षाने त्याना उभे रहाण्यास संमति दिली. आपण निवडून आल्यास प्रधानमंडळातलेहि एखादे पद आपणाला लाभू शकेल ही कल्पना त्यांच्या मनात येऊं लागली ! आणि प्रतिसहकार पक्षाच्या पाठबळावर त्यांची ती आकांक्षा सफळ होण्याचा संभव अगदीच नव्हता असे नाही. यामुळे त्यानी वरिष्ठ मंडळाकरिता उभे न राहण्याचे ठरविले. ही गोष्ट मला फार सोईची झाली हे सांगावयास नकोच. आमच्या पक्षाने पुण्यांत त्यांना भरपूर पाठबळ दिले. आम्ही सर्वांनी व्यक्तिशः लोहोकरे यांच्याकरितां खूप चळवळ व खटपट केली तथापि दैवदुर्विलासाचा एक चमत्कार त्यांच्याविषयी घडला तो जातां जातां, थोडे विषयांतर करूनहि, सांगावासा वाटतो.

पुण्यातील या निवडणुकीची मोठी चुरस लागून राहिली होती. कट्टर कॉंग्रेसवाल्यानी शहरचे एक व्यापारी रा. ब. लल्लूभाई शहा याना आतून बाहेरून पूर्ण पाठबळ दिले होते. वास्तविक राष्ट्रीय वृत्तीच्या दृष्टीने लोहोकरे हे लल्लूभाई पेक्षां फारच श्रेष्ठ ही गोष्ट या कट्टरांना माहीत नव्हती असे नाही. परंतु आमच्या प्रतिसहकारपक्षाचा पाडाव करावा हेच धोरण यावेळी कट्टराना अधिक प्रिय असल्याने त्यांचा विवेक सुटला. कॉंग्रेसच्या आणि शहरांतील धनिक व्यापारी वर्गाच्या सहाय्याने लल्लूभाई याना आपण हटकून निवडून आणूं असे त्यांना वाटले. शहरांत मतप्रसाराच्या चळवळीची शर्थ झाली. डॉ. लोहोकरे यांना डॉक्टर लोकांचे पाठबळ होते. शिवाय ते स्वतः इतके जबरदस्त उद्योगी व खटपटी की त्या कामी त्यांचा हात कोणीहि धरूं शकला नसता. निवडणुकीच्या आदल्या रात्री साडे अकरा वाजतां, सर्वव्यवस्था मनासारखी करून, ते आंथरुणावर पडले.

पण त्यांना साधी विश्रांति मिळावयाची त्याऐवजी चिरविश्रांतीच मिळाली! लाहाकरे यांना काळजाच्या रोगाची व्यथा फार दिवसाची होती. आणि आवाक्या-बाहेर केलेल्या परिश्रमामुळे काळजावर अनिष्ट परिणाम होऊन ते झोपेत अस-तांच हृदयक्रिया बद पडून मृत्युवश झाले. पहाटे त्याचे मित्र त्याना उठविण्या-करितां गेले तो हा प्रकार त्याच्या दृष्टीस पडला! ही वार्ता कळण्याच्या अगोदर कित्येक पेठांतून मतदानाला सुरुवातहि झाली. परतु या विशिष्ट परिस्थितीत होणारी निवडणूक अयोग्य आहे असे ठरवून पुणे कलेक्टरानी स्वतः सर्व पेठांतून हिडून निवडणुकीचे काम थांबविले.

अशा अकल्पित रीतीने थाबलेली निवडणक नतर काही दिवसानी झाली. तिला फिरून लल्लूभाई शहा हे उभे राहिले. त्याना प्रतिसहकारपक्षातर्फे म्हणून आम्ही पुण्याचे वकील रा. चद्रचूड याना उभे केले. ही निवडणूकहि तितक्याच चुरशीची झाली. पण या वेळी आमच्या पक्षाला एका निराळ्या रीतीने सहाय्य झाले. कट्टर कॉंग्रेसवाल्यांचा मुख्य आधार व्यापारी वर्ग हा होता. पण रा. चंद्रचूड हे कर्मधर्मसयोगाने स्मॉलकॉज कोर्टातील पुढारी वकील होते, आणि या कोर्टाशीच व्यापारी वर्गाचा नित्य ऋणानुबध. यामुळे चद्रचूड याना व्यापारी वर्गात फूट पाडून स्वतःला बरेच पाठबळ मिळविता आले. चद्रचूड हे बी. ए. एल्एल्. बी. ही गोष्टहि सहाय्यकच ठरली, कारण पूर्वी डॉक्टर मंडळीची मदत लोहोकरे यांना होणार होती तशीच आतां वकील लोकाची मदत चद्रचूड याना मिळाली. कॉंग्रेस-वाल्यांना लल्लूभाईच्या बाजूने सागण्यासारखे कांहीच नव्हते. त्यांचा सर्व भर प्रति-सहकार पक्षाच्या निंदेवर होता. पण एकीकडे कौन्सिल बहिष्काराचे स्तोम माज-वावयाचे, आणि दुसऱ्या बाजूस राष्ट्रीय भावनेविषयी प्रसिद्धी नसलेल्या उमेदवा-रास सहाय्य करून यश मिळवावयाचे ते कौन्सिल प्रवेश करविण्याकरितांच, ही त्यांची तात्त्विक धरसोड लोकांना हास्यास्पद वाटली. प्रतिसहकार पक्षाला त्याच्या तत्त्वनिष्ठेकरितां सहाय्य करणारेहि स्वतंत्र मतदार होतेच. तात्पर्य, पुणे शहरांतील ही दुसरी निवडणूक आम्ही जिकली.

पण प्रतिसहकार पक्षाला मतदारांत मान्यता कितपत आहे याचा निर्णय सर्व महाराष्ट्रांत मिळून व्हावयाचा होता तोहि माझ्या निवडणुकीने झाला. इतर उमेदवारांनी प्रयत्नांत उणे पडू दिले नाहीच. पण साराभाई हाजी यांच्याकरितां

जी खटपट आयत्यावेळी झाली ती इतकी की, तिजमुळे आमच्या कार्यकर्त्यांनाहि पुष्कळसे आश्चर्य व थोडीशी चिंताहि वाटली. मी दोन जागांपैकी एकलि निवडून येईन या विषयी त्याना खात्री होतीच. परतु समजा, हाजी हे पहिल्या नबराला आले व मी दुसऱ्या नबराला आलो तरी ते गौणच असे त्याना वाटत होते. हाजी याची प्रत्यक्ष ओळख राहोच, पण त्याचे नावहि कोणास फारसे ऐकून ठाऊक नव्हते. असे असताहि शेवटी त्याना दुसऱ्यानबरची मते मिळालीच. याचे कारण निवडणुकीच्या दिवशी प्रत्येक पोलिंग स्टेशनावर त्याच्या मोटारीचा गराडा पडला होता. माझ्यासुद्धा इतर सर्व उमेदवार त्यांच्या श्रीमती थाटापुढे असे तसेच दिसू लागले ! हाजी याच्या निवडणुकीप्रीत्यर्थ कमीतकमी पचवीस तीस हजार रुपये खर्च झाले असावे असे अनुमान होते. स्वतः हाजी हे राष्ट्रीय वृत्तीचे होते यात वाद नाही. ते अर्थशास्त्रज्ञहि होते. पण मौज ही की, हे त्याचे गुण ठाऊक आहेत असे म्हणणारे शेकडा तीन मतदारहि नसतील ! त्याची माहिती शून्य असणारे शेकडा ऐंशी तरी असतील. लोकशाहीतील मतदानपद्धतीवर हा आकस्मिक रीतीने असा प्रकाश पडला की त्या राज्यपद्धतीच्या गुणाविषयी विचारी मनुष्याने शंकितच व्हावे. असो. या निवडणुकीचा निर्णय ता. १८ नोव्हेंबर १९२६ रोजी खालीलप्रमाणे प्रसिद्ध झाला.

| अ. नं. | उमेदवाराचे नांव | निवडणुकीत मते पडली ती |
|---|---|---|
| १ | नरसिंह चिंतामण केळकर ( प्रतिसहकार ) | ८९१३ |
| २ | साराभाई हाजी ( स्वतत्र ) | ५४८४ |
| ३ | रा. सा. रूपचंद ( स्वतत्र ) | ४४१५ |
| ४ | बागडे वकील ( सत्यशोधक ) | ३५३१ |
| ५ | राजे शभुसिंग ( स्वतंत्र ) | ९८५ |
| ६ | रघुनाथ पांडुरंग करंदीकर ( स्वतंत्र ) | ८६३ |
| ७ | खर्डेकर ( स्वतंत्र ) | ४०५ |
| | एकूण | २४५९६ |

निवडणुकीतील मते मोजीत असतां खानदेश सोलापूर या जिल्ह्याच्या पेट्या उघडल्या तेव्हां हाजी व शेट रूपचंद यांच्या पेक्षां मला कमी मते पडू लागलेली पाहून प्रथम मी थोडासा गांगरलोच. पण बाकीच्या जिल्ह्यात माझी सरशी दिसून आली. सातारा जिल्ह्याने मला विशेष आधार दिला. आणि पहिल्या निवडणुकीतील आश्चर्यकारक असे यश यावेळी मला न लाभले तरी, माझे पहिले स्थान कायम राहिले आणि पहिल्या दुसऱ्या जागेत साडेतीन हजार मतांचा फरक पडला !

१९२३ व १९२६च्या निवडणुकीत जो दुसरा एक फरक पडला तोहि सांगण्यासारखा आहे. पहिलीत एकंदर मते साडेसोळा हजार नोंदली गेली तर दुसरीत साडेचोवीस हजार मते नोंदली गेली. याचे एक कारण कौन्सिल बहिष्कार शिथिल झाला होता असेब्लीतील स्वराज्य पक्षाने उत्कृष्ट कामगिरी करून दाखवून बहिष्काराचा वेडेपणा लोकनिदर्शनास आणिला होता. पण आणखीहि एक कारण हे की, या मधल्या काळात निवडणुकीचे नवे नियम होऊन त्यामुळे मतदारांची संख्या वाढली होती. याचा मला प्रत्यय आला तो असा की, पहिल्या निवडणुकीच्या वेळी मी मतदाराना विनतिपत्रे म्हणून दोन वेळा छापील पोष्टकार्डे पाठविली. पण दुसऱ्या निवडणुकीच्या वेळी हा खर्च झेपेना म्हणून एकच कार्ड पाठविले. आणि आयत्या वेळी विनतिपत्रे छापून घेऊन ती प्रत्येक तालुक्याच्या गावी माझ्या सहाय्यकर्त्यांच्या हाती वाटण्यास पाठवून दिली. दुसऱ्या खेपेस दर मतदारागणिक पोष्टकार्ड पाठवावयाचे तर निदान साडेतीन हजार रुपये खर्च आला असता. मजप्रमाणे इतर उमेदवारांनीहि केले. मात्र साराभाई हाजी यानी प्रथम पासूनच पोष्टापेक्षां स्वतःच्या खर्चाच्या मोटारींने काम चालविले होते. त्यांचा पोष्टाचा खर्च वांचला असेल. पण हा मोटारींचा खर्च त्याहूनहि अधिक झाला. दुसऱ्या निवडकीच्या वेळी मतदारांची संख्या यादीत तीस हजारापर्यंत गेली होती असे स्मरते. या तीस हजारांपैकी पुष्कळांना माझे नांव माहीत असावे. शिवाय केसरीपत्राचे सहाय्य, प्रसिद्धी मतप्रचार इत्यादि माझ्या कामाना पुष्कळच होण्यासारखे होते. पुण्यासारख्या एका शहरांतल्या शहरांतहि मतप्रचाराला किती खर्च येतो हें गतवर्षी झालेल्या निवडणुकीत कळून आलेच आहे.

मी ज्या मध्यभागातर्फे उमेदवार उभा होतो त्याची लांबी सुमारे चारशें मैल आणि रुंदी सुमारे दीड-पावणे दोनशे मैल होती. नुसत्या जिल्ह्यांची शहरें व

तालुक्यांची गांवे घेतली तरी त्यांची संख्या सुमारे ऐंशी होती आणि पोलिंग स्टेशने ( मतनोंदणीची ठिकाणे ) शेकड्यानी मोजावीं इतकी होती. उमेदवाराने निदान एका पोलिंग स्टेशनाला एक भेट द्यावयाची म्हटले तरी अवघ्या दोन अडीच महिन्यात इतका प्रवास होणे परम दुष्कर. यावेळी माझी स्वतःची मोटार नव्हती आणि असती तरी एका मोटारीने भागले नसते. यामुळे पुष्कळसा प्रवास आगगाडीने, उरला मोटार सर्व्हिसने, व काही बैलगाडीनेहि केला! जावे त्या गांवी व्याख्यान व्हावयाचे. ते न झाले तरी पाहुणचाराचा जुलूम प्रत्येक ठिकाणी होई. आणि पाहुणचार म्हटला की वेळ बराच जावयाचा. खाण्याकरितां नसले तरी वटवट करण्याकरितां तोंड नेहमी उघडे ठेवावेच लागे. खाण्यापिण्यांतहि नियम रहात नसे. प्रत्येक ठिकाणचे पाणी निराळे. आगगाडीशी संबंध असला आणि वेळ वाचविण्याकरतां तिचा उपयोग करावयाचा, म्हणजे त्याबरोबर रात्री-अपरात्री प्रवास व जाग्रणे ही क्रमप्राप्तच होती. तथापि माझी प्रकृति सुदृढ म्हणून हे सर्व झेपले. ईर्षेने मनुष्याला दुप्पट बळ अंगी येते म्हणतात ते कांही खोटे नाही. शिवाय जेथे जावे तेथे स्नेह व सहानुभूति भेटत यामुळे प्रवासाचा शीण मनाने हलका होई. पण एकदरीने निवडणुकीची दगदग इतकी होते की फिरून तिसऱ्या खेपेस मी निवडणुकीला उभा राहिलो नसतो. मग हे श्रम करून अपयश ज्याच्या पदरी पडते त्याच्या मनःस्थितीचा प्रत्यक्ष अनुभव नसला तरी मनाने त्याची कल्पना मला करता येतेच.

खर्चाच्या दृष्टीने हे सांगितले पाहिजे की या बाबतीत केसरी ट्रस्ट संस्थेचा आधार मला नसता तर मी कोणच्याहि निवडणुकीला उभाच राहिलो नसतो. दोन निवडणुकी मिळून सुमारे नऊ हजार रुपये खर्च आला. तो करण्याचें माझ्यामध्ये सामर्थ्य नव्हते पण केसरीच्या सक्रिय राजकारणांत स्वपक्षीयांच्या निवडणुकी लढविणे, लढविण्यास मदत करणे, हे अंग समाविष्ट होते. अशा कामी केसरीसंस्थेचा खर्च करण्याचा परिपाठ कै. लो. टिळकाच्या वळेपासून होता. सुरतेच्या राष्ट्रीय सभेकरितां केसरीने सात आठ हजार रुपये खर्च केल्याचें मला माहीत आहे. स्वपक्षीयांच्या म्युनिसिपल निवडणुकीकरितांहि केसरी थोडा फार खर्च करी. आणि माझी कौन्सिल निवडणूक थाबली त्यानंतरहि, केसरीचे संपादक संचालक नसलेल्या अशाहि पुढाऱ्यांच्या कौन्सिल निवडणुकीना केसरीने हजारो रुपयांचें सहाय्य केले आहे. तात्पर्य, केसरीचे सहाय्य न लाभतें तर, मतदारांनीं

निवडून देण्यासारखी माझी पात्रता असतांहि मला त्या भानगडींत पडतां आले नसते. म्हणून या दृष्टीने सार्वजनिक कार्य करण्याची जी साधि व जे यश मला लाभलें त्याचे सर्व श्रेय केसरीसंस्थेला असून त्याकरिता मला कृतज्ञता वाटते. पण या म्हणण्यात विशेष असे काही नाही. कारण वयाच्या चोवीसाव्या वर्षापासून आजपर्यंत माझी एकदर जीवयात्रा केसरीमुळेच झाली. तेव्हा हा विशेष उल्लेख करण्याचेंहि कारण नाही. मतप्रतिपादन व मतप्रसार याकरिता इतका खर्च ज्याने केला असे वर्तमानपत्र पुण्याबाहेरच्या हिंदीजगात दुसरे कोणचे असेल याची चांगली चौकशीच करावी लागेल.

केसरीच्या आधाराशिवाय मला निवडणुकीचा खर्च करतां आला नसता हे सांगितलेच. पण त्याबरोबर दुसरे हेहि सागितले पाहिजे की माझ्या इतक्या थोडक्या खर्चात इतर कोणाहि उमेदवाराचे काम झाले असेल असे मला वाटत नाही. याचे मुख्य कारण माझ्याविषयी जनतेत असलेली सहानुभूति. निवडणुकीच्या कामीं स्वार्थपरायण लोक उतावळ्या उमेदवाराचा फायदा घेतात. पैसे उकळण्याच्या सुवर्णसंधीचा हवा तसा उपयोग करतात. पण सुदैवाने मला असे कोणी भेटले नाहीत. कट्टर कॉंग्रेसवाल्याच्या दृष्टीने मी महाराष्ट्राचे पाय मागे ओढीत असलो तरी, सामान्य जनता असेच म्हणणारी होती की टिळकांच्या राजकारणी धोरणाला अनुसरून केळकर वागत आहेत. केसरीविषयी जनतेच्या मनात जो आदर व जी कृतज्ञता वागत असे ती प्रगट करण्याची एक संधि असे मानून माझ्या निवडणुकीला ठिकठिकाणचे पुढारी उत्साहाने हातभार लावीत. राजकारणाच्या क्षेत्रातील पात्रतेच्या दृष्टीने माझ्याहून अधिक लायक उमेदवार मध्यभागात उभा नव्हता असे माझ्या प्रतिपक्षांनाहि कबूल करावे लागत होते. परंतु ते कॉंग्रेसच्या अभिमानानें मला पाण्यात पहात. कदाचित दुसरे कोणी असे असतील की व्यक्तिशः मी त्यांना आवडत नसेन. मी सर्वांना सारखाच प्रिय होतो किंवा अप्रिय असा कोणासच नव्हतो असे मी तरी कसे म्हणेन ? परंतु बहुसख्य लोकांच्या मनात माझ्या विषयी सहानुभूति होती. आणि तीच या निवडणुकीच्या प्रसंगाने प्रगट झाली यांत शंका नाहीं. माझ्या कार्यकर्त्यांपैकी पुष्कळानी मजकडून किरकोळ खर्च घेतला नाही. मतदारांना मतदानाच्या जागी नेण्याला मला फारच थोडा खर्च लागला.

आता यानंतर दिल्ली सिमला येथील हकीकती थोडक्यांत सांगतो. (१९२४) प्रथम महाराष्ट्राप्रमाणे हिंदुस्थानभर स्वराज्य पक्षाचे उमेदवार बहुतेक सर्व निवडून

आले. या पक्षांत आम्ही प्रारंभीच सुमारे चाळीस लोक होतो. चि. रं. दासबाबू स्वतः वरिष्ठ असेंब्लीच्या निवडणुकीला उभे राहिले नाहीत. मोतीलाल नेहरू बिनविरोध निवडून आले. त्यांच्याकडे स्वराज्यपक्षाच्या अध्यक्षत्वाचा मान सहजच गेला. विठ्ठलभाई पटेल हे उपाध्यक्ष झाले. हिंदुपत्राचे संपादक ए. रंगास्वामी अय्यंगार याना पक्षाचे चिटणीस, आणि मला पार्टीचा व्हिप म्हणजे संचालक नेमण्यांत आले वास्तविक चिटणीशीच काम मला अधिक आवडले असत. कारण व्हिप हा माझ्यापेक्षां चपळ तिडतिडा मनुष्य लागतो. परंतु चिटणीसाच्या अंगी सरकार-पक्षीय पुढाऱ्यांकडे जाऊन भेटणे सवरणे हे गुण लागतात ते मजमध्ये कमी. म्हणून मी दोहोंतली व्हिपची जागा स्वीकारली. सभेत पक्षातर्फे भाषणे करणे, उत्तरे प्रत्युत्तरे देणे, या गोष्टी अध्यक्ष उपाध्यक्ष करीत. दोघेहि या कामाला अनुभवी आणि लायक. कायदेमंडळाच्या कामाचा हा पहिलाच प्रसंग होता. नेहरू हे यापूर्वी अलाहाबादच्या विधिमंडळांत पुष्कळ वर्षे होते. पटेल हेहि दिल्ली येथील जुन्या असेंब्लीत व मुंबई कौन्सिलात काही वर्षे होते. माझे व्हिपचे काम, पार्टीच्या सभांना हजर राहून सभेत होणाऱ्या कामाविषयीचे ठराव पार्टीच्या सभासदाना आगाऊ कळवून ठेवणे आणि आयत्यावेळी सभासदांना हजर ठेवून मतनोंदणीत ते यथायोग्य भाग घेतील अशी तजवीज करणे, हे होते. मी लेखी काम सर्व करी. पण हेलपाट्यांचे आणि मेंढरे वळवून आणून गोठ्यांत घालण्याचे काम माझ्या दुय्यम व्हिपवर सोपवी.

पहिल्या वर्षी " विधिमंडळांत आपण झालो तरी विधायक कार्य कांहीं करावयाचे नाही शक्य तितका उपद्रवच सरकारला द्यावयाचा " असे स्वराज्य पक्षाचे शाब्दिक धोरण होते आणि अशी उनाडकी करण्याला पोषाखाचा जो स्वैरपणा शोभतो तोच आम्ही स्वीकारला होता. आमच्या पोषाखावरून आम्हांला जुन्या जमान्याच 'जंटलमेन' असे कोणीच म्हटले नसते. अंगांत उघडा शॉर्ट कोट, नेसूची तोकडी धोतरे, अंगावर उपवस्त्र आहे आहे नाही नाही, आणि डोक्याला टोपी, असा हा पोषाख असे. मी एक वर्ष खादीचा शॉर्ट कोट आणि खादीची किंवा लोकरी टोपी घालीत असें. त्या वेळच्या फोटोवरून मी एक वेळ गांधी टोपी घालीत असे असा कित्येक मजवर आरोप करीत. पण माझी टोपी पांढरी कधीच नव्हती! ती काळी किंवा भगवी असे! पांढऱ्या खादीची टोपी ही गांधीच्या दास्यत्वाची खूण असे म्हणणारा मी ती कशी घालीन ! असो. विधायक कार्य याचा अर्थ विधि-

मंडळाने नेमलेल्या उपमंडळावर काम करणे, म्हणजे वाकडे असेल ते चर्चेने सरळ मुनी करणे. याच्या उलट विध्वंसक काम म्हणजे सरकारी बिल ठराव, कोणताहि असो, तो हाणून पाडण्याचा प्रयत्न करणे; खरोखर अगदी लोकोपयोगी व सद्धेतु प्रेरित असेहि बिल किंवा ठराव असला तरी तो हाणून पाडणे, किंवा निदान त्याला समति न देतां तटस्थ बसणे; सरकारतर्फेचे लोक जिकडचे मत देतील तिकडे मत न देणे; त्यांच्याबरोबर लॉबींत न जाणे; आणि सरळ असेल ते शक्य तितके वाकडे आणि सरकाराला अडचणीचे करून ठेवणे—असे स्वराज्य-पक्षाचे जाहीर धोरण होते. त्याला 'Obstruction' ही संज्ञा होती. पण पहिल्या सहा महिन्यांतच हे धोरण ढिले पडले. विधायक चर्चेत आमचा पक्ष भाग घेऊ लागला आणि मौन सोडून भाषणे करूं लागला.

अध्यक्ष पंडित मोतीलाल नेहरू यांचे आणि उपाध्यक्ष विठ्ठलभाई पटेल यांचे कधीच बनत नसे. याची दोन कारणे होती. नेहरू हे असेंब्लीत स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष म्हणून जोरदार भाषणे करीत, तथापि त्याचा आणि सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्यांचा खासगी स्नेह चागलाच असे. पंडितजी हे खाण्यापिण्याच्या बाबतीत मोठे रसज्ञ असत. यामुळे युरोपियन अधिकारी निरनिराळे प्रसग उत्पन्न करून ख्यालीखुशालीत समरस होण्याकरिता त्यांना लोभवून नेत, आणि पंडितजी हे त्या सामाजिक सगतीचे भोक्ते असल्यामुळे जात. पंडितजी खासगी बोलण्या-चालण्यांत मोठे चतुर. जेवणाखाणाच्या टेबलाशी जी नर्म संभाषणे, कोट्या प्रति-कोट्या, हास्यविनोद चालतो त्यात युरोपियन लोकाबरोबरीने भाग घेणारे, किंबहुना त्यांच्यावर चढ करणारे असे होते. उलट विठ्ठलभाई हे खाण्यापिण्यांत कमी करणारे नसले तरी, ते युरोपियन लोकांशी फटकून वागत त्यांच्या सभाषणांत गोडवेपणा कधीहि नसावयाचा. विनोद असे, पण तो केव्हाहि कोणाला तरी लागण्यासारखा बोचण्यासारखा असावयाचा. भांडखोर प्रतिपक्षी हे आपले नाते खासगी सभाषण प्रसगीहि विसरण्यास ते तयार नसत. उलट येईल तो प्रसंग आपला आंबट-तिखट-तुरटपणा प्रगट करण्याकरितां साधीत. यामुळे युरोपियन अधिकारी त्याना कधी जवळ करीत नसत. पटेल म्हणजे ती एक खाज कुयली किंवा हेजहॉग (तीक्ष्ण पिसाची साळू) असे मानून ते पटेलाना टाळीत. पंडितजीच्या व युरोपियन अधिकाऱ्यांच्या स्नेहाबद्दल पटेल तक्रार करीत. आणि खासगी मित्र-

मंडळीत ते पंडितजीवर एकसारखे टीकास्त्र चालवीत. पक्षाचे अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्यातला हा बेबनाव आम्हाला मोठा घोटाळ्याचा होत असे.

पटेल याचा दुसरा एक स्वभावगुण असा की, जो कोणी काही जहाल-पणाचे म्हणून बोलेल किंवा करील त्याच्यापुढे आणखी चार पावले आपण आहो असे भासविण्याचा ते प्रयत्न करीत. त्यांच्या दृष्टीने सर्वच मवाळ. पंडित नेहरूहि. आणि पंडित नेहरू हे दुटप्पी वागणारे म्हणून त्यांच्यावर पटेलाचा मोठा राग. पटेल यांच्या इतर गुणामुळे पंडितजीना ते अनिर्वाह्य वाटत. पण 'तुझे माझे पटेना आणि तुझ्यावाचून गमेना' अशी स्थिति पंडितजीची पटेल यांच्यासंबंधी झाली होती. याचा वचपा असेंब्लीच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीच्या वेळी पंडितजीनी थोडा बहुत काढला. "पटेल हे अध्यक्ष हवे, पण पटेल नसतील तर बरे" असे त्यांचे मन द्विधा झाले. पटेल यांच्याविषयी जिना याच्या पक्षांतहि अप्रीति होती ती पटेल याच्या द्वाड जिभेमुळे, मानभंग करण्याच्या व खोडसाळ वागणुकीमुळे. या दोन अप्रीतिचा मेळ पडून अध्यक्ष निवडण्याच्या बाबतीत जेव्हा खासगी सभा झाली, तेव्हा पटेल याच्या उमेदवारीला एकदम संमति देण्याला जिना व पंडितजी दोघांनीहि खळखळ केली. तेव्हा इतर नावे सुचवावी असा बूट निघाला तेव्हां जिनापक्षातील दि. ब. रामचंद्रराव आणि स्वराज्यपक्षातील मी अशी नांवे सुचविण्यातहि आली. तथापि, अखेर निर्णयाच्या वेळी पटेल यानाच बहुमत मिळाले, आणि तेच दि. ब. रंगाचारियर यांना पराभूत करून निवडून आले. पटेल अध्यक्ष झाल्यावरहि त्याचा व नेहरू याचा बेबनाव धुमसतच होता. पण पटेल हे स्वराज्यपक्षाचे साधे सभासद नाहीसे झाल्याने अस्तनीतला निखारा किंवा विंचू निघून गेल्याचे सुख पंडितजीना लाभले.

अध्यक्षपदाच्या उमेदवारीच्या संभवनीय नांव-निशीत माझे नांव आले याचा अर्थ इतकाच होता की, स्वराज्यपक्षांत नेहरू व पटेल यांच्या खालोखाल पात्रता व आदरबुद्धि या बाबतीत माझाच नंबर लागे. माझे नाव या यादीतच आले तेव्हां मी अध्यक्ष निवडला जाण्याचा संभव माझ्या मनांत एक क्षणभर, पण एक क्षणभरच, चमकून गेला असेल खरा. तथापि, अध्यक्षाच्या जागेला माझ्यापेक्षा पटेल हेच अधिक योग्य आहेत असे मला तेव्हां वाटत होते, आणि आजहि तसेच वाटत आहे. अध्यक्षाच्या मानाला मी विद्वत्तेच्या दृष्टीने अयोग्य

किंवा हा बहुमान देण्याला आदरबुद्धीच्या दृष्टीने अपात्र, असे पंडितजी किंवा जिना यांचेहि म्हणणे नव्हते. किंबहुना मी निवडलो गेलो असतो तर स्वराज्य-पक्षाला ते भूषणच वाटले असते. कायदेकानू पाहून तपासून वादांतील निर्णय देण्याचे कामहि मी चांगले करू शकलो असतो असे मला वाटते. तथापि माझी न्यायबुद्धि हाच माझा मोठा अवगुण होता. अध्यक्ष या नात्यानेहि पटेल यांनी स्वराज्यपक्षाचे जितके हित साधून दिले तितके माझ्या हातून बहुधा झाले नसते. माझी घातक सद्बुद्धि मला आड आली असती. पण पक्षपाताचा विवाक्षित अवगुण सोडून इतर बाबतीत तर पटेल हेच माझ्यापेक्षा ते काम करण्याला अधिक लायक होते यांत शंका नाही. पटेल हे मजपेक्षां अधिक बुद्धिवान नसले तरी कायदे कौन्सिलच्या कामांत अधिक सराईत, अधिक रुळलेले, अधिक हजर-जबाबी, अधिक कदरदान, अधिक खंबीर, अधिक कठोर, अधिक कारस्थानी, अधिक साधनयोजक, आणि अधिक धीट होते. त्यांनी आपले अध्यक्षपद सजविले गाजविले आणि यशस्वी केले यांत मुळीच शंका नाही.

विठ्ठलभाई पटेल हे असेब्लीचे अध्यक्ष निवडले गेले तेव्हा त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागेवर स्वराज्यपक्षाचा उपाध्यक्ष म्हणून माझी निवडणूक झाली. आणि माझ्या व्हिपच्या जागी षण्मुख चेट्टी ( हल्लीचे कोचीन संस्थानचे दिवाण ) यांची निवडणूक झाली. चिटणीशीचे काम पूर्वीप्रमाणेच ए. रंगस्वामी अय्यंगार यांच्याकडे राहिले. माझी निवडणूक उपाध्यक्षाच्या जागी झाली हे यांचेच प्रत्यंतर की नेहरू व पटेल यांच्या खालोखाल मला स्वराज्यपक्षांत मान्यता होती. तथापि पटेल अध्यक्ष झाल्यावर त्यांच्या जागी असेब्लीत पुढाकार घेऊन बोलण्या चालण्याचे काम रंगस्वामी अय्यंगार हे करीत. त्यांना बोलण्याची कला माझ्यापेक्षा अधिक अवगत होती. तीच गोष्ट सभाधीटपणाची. आधी-पासून भाषण करण्याचे पार्टीच्या सभेत ठरले तर ते मोजके काम मला सांग-ण्यांत येत असे. कारण कोणच्याहि विषयावर भाषण करावयाचे तर त्या विष-याचा आधी अभ्यास करून सविस्तर व समर्पक भाषण मी करीन असा पार्टीच्या सभासदांचा विश्वास असे. पण आयत्यावेळी उठणाऱ्या वादळाला तोंड देण्यांत मी तितकासा पटाईत नव्हतो शिवाय पुष्कळ लोकांच्या मानाने माझे कर्णेंद्रिय कमी तिखट असे. माझी गणना अगदी बहिऱ्यांतच नव्हती, पण युरोपियन लोक हलक्या आवाजाने अस्पष्ट उच्चाराने बोलतात ते मला चांगलेसें उमजत नसे.

दूर अंतरावर होणाऱ्या हिंदी सभासदांच्या भाषणाचीहि तीच गत. शिवाय खासगी रीतीनें स्वस्थपणे बसून वादविवाद करण्यांत मी फारसा कोणाला हार जाणारा नव्हतो तरी सभेतल्या दंगलीत मी गोंधळून जात असे.

माझ्या अंगी वक्तृत्वाचा गुण प्रथमपासूनच कमी होता. त्यातूनहि इंग्रजी भाषण करण्याचा. याला दोन तीन मोठी कारणे होती. पहिले असे की, आवाज मऊ सफाईदार नाही. थोडासा घोगरा आहे. आणि आपले बोलणे सर्व समाजाला ऐकू जावे अशी मनातून नेहमी इच्छा असल्यामुळे मी बोलतो त आवाज मुद्दाम मोठा काढून जोराने बोलतो. यांतच माझा घसा खोकलेवाईक असल्यामुळे बोलण्याला मधून मधून प्रतिबंध होतो. पुष्कळ वेळां घसा बसतोहि. तसे झाले म्हणजे दमणूक होते व बोलण्यांतील स्वारस्य जाते. माझी स्मरणशक्ति सराईत नाही. ती आयत्या वेळी दगा देते. यामुळे मी नेहमी कागदावर मुद्दे टिपून घेऊन त्याकडे मधून मधून पाहून बोलतो. अर्थात् बोलण्याचा प्रवाह अस्खलित चालत नाहीं. मला सरळ युक्तिवादाचे बोलणे तेवढे येते. खऱ्या वक्तयाला कोठूनहि प्रारंभ करून वाटेत वाटतील ती वळणे घेऊन आपल्या कल्पनाशक्तीच्या बळावर वेळ मारून नेतां येते. पण विषय प्रतिपादन हाच माझ्या कोणत्याहि भाषणाचा हेतु असतो. मुख्य विषयाला लागू ( Relevant ) काय याची माझी समजूत तीक्ष्ण असल्यामुळे मला फारसे फाटे फोडतां येत नाहीत. आणि फाटे फोडण्यात गैर-लागू असें विचार प्रगट होताच माझे मनच माझा निषेध करू लागते. त्या आत्म-निषेधाने मी खजिल होतो, आणि बोलण्यांत विरस होतो. जन्मभर आठवीत आठवीत जुळवीत जुळवीत लिहिण्याची संवय लागल्यामुळें विचार प्रगटीकर-णाची माझी गति मंद आणि कुंठित असते. आणि गति जितकी अधिक तितकी उद्गारांत तीव्रता आणि सुरेलपणा येतो हे फोनोग्राफवर चांगलेच कळून येत नाही काय ?

सार्वजनिक आयुष्यांतल्या पहिल्या पंचवीस वर्षेपर्यंत मला मराठी बोलणेहि चांगले साधत नसे. पण पुढे सरावच पुष्कळ झाल्याने मला सभाधीटपणा आला, व त्याबरोबर बोलणे कसे तरी रेटून नेता येऊं लागले. मराठी ही माझी जन्म-भाषा. व्याकरणाची आठवण करावी लागत नाही म्हणून शुद्धाशुद्धाकडे लक्ष द्यावे लागत नाही. आणि वाचनाने बहुश्रुतपणा आल्याने विचाराची किंवा

योग्य शब्दांची फारशी वाण पडत नाही. यामुळे मला कोणत्याहि विषयावर मराठी बोलणे अवघड वाटेनासे झाले. तरी अजून मला असे वाटते की, माझे मराठीहि भाषण मला न कळत कोणी फोनोग्राफवर जशाचे तसे उतरून घेऊन मला परत वाजवून दाखविले तर अपूर्ण राहिलेली वाक्ये, अशुद्ध पडलेले व्याकरण-प्रयोग, क्वचित् अनुचित शब्द, आणि देशी विदेशी शब्दाचे मिश्रण इत्यादि पाहून माझे मलाच हसूं येईल. माझी भाषणे अलीकडे लोकाना आवडूं लागली यात मात्र शंका नाही. पण त्याचे खरे कारण माझी वक्तृत्वकला हे नाही. तर माझ्या भाषणांत विषयप्रतिपादन समर्पक, युक्तिवाद नीटस श्रोत्याना पटण्यासारखा, उपमा दृष्टांतांचा भरपूर उपयोग, वाङ्मयाची मधून मधून फोडणी, बहुश्रुतपणाचा ठसा इत्यादि गुण प्रकट होऊ लागले हे होय ! पण याहून आणखी मोठे माझे दोन गुण म्हणजे मी भाषणात बहुधा नवीन असे काही तरी सागतो,—जुन्याहि विचाराची नवी मांडणी करतो—हे एक, आणि बोलणे विनोदशील असते हे दुसरे. यामुळे हसूं येऊन श्रोत्यांचा श्रमपरिहार होण्याला सहाय्य होते. मी सभा जिकली तर वक्तृत्वाने नव्हे तर विवेचनाने व विनोदाने जिकतो.

पण इग्रजी बोलण्याची अडचण याहून मोठी. शब्द-वाक्यरचना व्याकरण ही सर्वच परकी. टेबलाशी बसून इंग्रजी भाषा विचारपूर्वक सजवून लिहिण्याची संवय. उचित-अनुचिताचे ज्ञान घासून पुसून तीक्ष्ण झालेले. आणि इंग्रजी भाषण करण्याच्या वेळी श्रोत्यांमध्ये इंग्रज दिसला म्हणजे परीक्षकापुढे विद्यार्थी उभा राहिला असता तो जसा गांगरून जातो तसाच मीहि. लिहून वाचलेल्या इग्रजी भाषणांनी मी इग्रजाकडूनहि शाबासकी मिळवू शकेन असा आत्मविश्वास वाटे. परंतु बोलण्याची वेळ आली म्हणजे सभाधीटपणा पळून जाई. आणि सर्कशीच्या रिंगणांत सोडलेल्या पशुपक्षाप्रमाणे मी प्रायः गांगरून जाई. शिवाय सागण्याला वाईट वाटते की अलीकडील इतक्या वर्षांच्या संवयीनेहि मी खरा सभाधीटपणा शिकूं शकलो नाही. इग्रजी भाषण करण्याचा प्रसंग आला की अजूनहि मोठे संकट वाटते. ही गोष्ट माझीच काय शिवरामपंत परांजपे यासारख्या नामांकित महाराष्ट्रीय वक्त्यांचीहि होती. मला पक्के आठवते की एकदा दासबाबू वगैरे बंगाली पाहुणे पुण्यास आल्यावेळी सार्वजनिक सभेत त्यांच्यापुढे इंग्रजी भाषण करण्याचा प्रसंग शिवरामपंतांवर आला. तेव्हां ते कसे तरी पांच मिनिटे अडखळत थांबत एकदाचें बोलले झाले ! पण शाळेंतील नवशिका विद्यार्थी बोलावा तसें

त्याचे भाषण झाले. त्याची त्यांना व आम्हांलाहि लाज वाटली ! आणि "महा-राष्ट्रातील हा पहिल्या प्रतीचा नामांकित सभा हलवून सोडणारा वक्ता" असे या पाहुण्याना कोणी सांगितले असते तर ते म्हणते "वः आमची काय थट्टा करिता होय !"

असो. कसेंहि असले तरी असेंब्लीत गेल्यावर उठल्या बसल्या इंग्रजीमध्ये भाषण करण्याचाच प्रसंग. म्हणून त्या दृष्टीने मी स्वतःला पावता आणून घेऊ लागलो. ती पावता म्हणजे जो विषय चर्चेला निघणार त्याची माहिती करून घेणे, आणि बोलण्याचा प्रसंग येईल तो साधणे. यामुळे देखील माझे वक्तृत्व पुष्कळ सुधारले असे नाही, पण पुण्यास मला जी मुळीच संवय नसे ती होऊ लागली. मी मुख्यतः भाषणे केली ती माझ्या (Pleasures and Privileges) या पुस्तकांत दिली आहेत ती "वाचून पाहूनच" ज्याला माझ्या वक्तृत्वाची कल्पना करावी लागेल तो कदाचित म्हणेल की मी बऱ्यापैकी एक वक्ता होतो. पण प्रत्यक्ष ती ऐकणाऱ्या लोकांना त्या कलेबद्दल मला तितके चांगले सर्टिफिकीट-प्रशंसापत्र देता आले नसते. पण दुसरी मला अनुकूल अशी एक गोष्ट सांगितली पाहिजे की, पुष्कळ इतर सभासदांपेक्षां विद्वत्ता व वाङ्मय याचा जिव्हाळा आणि प्रत्यक्ष उपयोग हा माझ्या भाषणांतच अधिक सांपडेल. उलट एक उदाहरण बॅ. जिना यांचे देण्यासारखे आहे. ते फार परिणामकारक भाषणे करीत. पण ती केवळ त्याक्षणी ती ऐकणारा पुरती. ते विवाद कुशल, वकीली पद्धतीने फड मारून नेणारे. ते उत्कृष्ट नट असत. आवाजाचा चढ उतार, ठेकेबाजपणा, अंगविक्षेप या साधनांनी ते उत्कृष्ट परिणाम करीत. पण त्यांचे कोणतेंहि भाषण काढून मागाहून वाचले तर त्यांची भाषा सामान्य कॉलेज विद्यार्थ्यापेक्षा अधिक चांगली वाटणार नाही. भाषा सोपी व्यावहारिक पण अगदी रुक्ष निरस ! या माणसाला वाङ्मय म्हणजे काय पदार्थ असतो याची कल्पनाहि नसेल असेंच वाचकाला वाटेल. माझी भाषणे निबंधाच्या पद्धतीची. जिना यांची अस्सल वक्त्याच्या थाटाची !

वक्तृत्व कला सोडून इंग्रजी भाषेच्या दृष्टीने पाहिले तर माझ्या भाषणां-विषयी जाणत्या सभासदांचे मत काय होतें याचे उदाहरण द्यावयाचे ते सर डेनिस ब्रे यांचें. सगळ्या सरकारी युरोपियन सभासदांत ते वाङ्मयप्रवीण व साहित्यिक म्हणून ख्याति होती. शेक्सपियर संबंधी त्यांनी नव्या विचारांचे पुस्तक

लिहिले आहे. त्यांनीं असेंब्लीच्या एका सभेत भाषण करतांना माझा उल्लेख खालीलप्रमाणे केला. " केळकर बोलावयास उठले म्हणजे मी लक्ष लावून सरसावून त्यांचें भाषण ऐकावयास बसतो. आणि ते ऐकतांना अर्धातास आनंदांत जातो. कारण त्यांच्या भाषणाची शैली सभ्य सुसंस्कृत असून त्यांत वाङ्मयाची लजत असते. तसेच विनोदी चुटके मोठे गमतीचे असतात. आज मात्र त्याच्या मनांत नाही ते बोलण्याचा प्रसंग त्याच्यावर दिसतो, म्हणून त्यांत कृत्रिमपणा आला आहे." ( हा प्रसग पब्लिक सेफ्टी बिलाचा होतासा वाटते. )

असेंब्लीचे प्रेस-रिपोर्टर स्नेही मला सागत की "तुमच्यात वक्तृत्वाचा ओघ नाही. तुम्ही सावकाश आणि सगतवार बोलतां हे आमच्या पथ्यावरच पडते. तसेच तुमचे भाषण उतरून घेताना एकप्रकारें आनंद वाटतो. कारण त्यांत विद्वत्ता आणि विनोद असतो. तुमच्याकडून प्रुफ वाचन परत आली म्हणजे त्यांत खोडाखोडीहि थोडी असते, कारण तुम्ही बोलतां तेच जपून सरळवाक्यानी बोलतां." ही स्तुति तोंडदेखली नसून प्राजलपणाचीच होती असे मी कसे म्हणूं ! पण असेंब्लीतली माझी दहा पांच भाषणे तरी अशी काढून दाखवितां येतील की त्यांचे भूषण मला यथार्थ रीतीने मानतां येतील. तथापि असेंब्लीतील वक्तयांमध्ये कोणी माझी गणना करू शकला नसता.

वरिष्ठ विधिमंडळाचा सभासद या नात्याने दिल्ली व सिमला येथे १९२४ पासून १९३० पर्यंत मधून मधून माझा मुक्काम पडत असे. १९२६ साली स्वराज्य पक्षांतून मी बाहेर पडल्यामुळे विधिमडळाचा राजीनामा दिला. आणि फिरून १९२७ पासून त्या मंडळांत प्रविष्ट झालो. पण १९३० सालच्या पहिल्या बैठकी नंतर पुन्हा राजीनामा दिला. सात वर्षात पांच सात मुक्काम दिल्लीस झाले आणि पांच सात सिमल्यास झाले. हे मुक्काम कामकाजामुळे गर्दीचे पण इतर रीतीने सुखाचे गेले. दिल्लीस विधिमंडळाच्या बैठकी बहुधा थंड हवेच्या दिवसांत आणि सिमल्यास उन्हाळ्याच्या दिवसांत होतात. यामुळे प्रकृतीला ते मुक्काम मानवत. दिल्लीस जानेवारीपासून एप्रिलच्या प्रारंभापर्यंत रहावे लागे. यामुळे प्रथम भर थंडीचा कडाका, नंतर फेब्रुआरीत समशीतोष्ण सुखकर अशी हवा, आणि मार्च अखेर उन्हाळा अशा तीन प्रकारची हवा एकाच मुक्कामांत अनुभवावयास मिळे. जानेवारींत खोलीची दारें बंद करून शेगडी पेटवून बसावें लागे तर मार्चअखेर

पंखे चालू करून वारा घ्यावा लागे. मात्र मध्यंतरी वसंत पंचमीस अशी सुंदर हवा कांही दिवस भोगावयास मिळे की जन्मभर तशी असेल तर बरे असे वाटे. दिल्लीचे पाणीहि गोड व आरोग्यकारक. नवी दिल्ली सुदर बांधलेली. पटांगणे उद्याने भरपूर. रस्तेहि उत्तम. गर्दी अगदी कमी. यामुळे चालण्याचे श्रम किंवा करमणूक करण्यास ते स्थान फार रम्य व सुखदायक वाटे आणि भूक चांगली लागून शरीराचे वजनहि थोडे वाढे.

सिमला सात हजार फूट उंच. यामुळे तेथील हवा उन्हाळ्यांत चांगली सुखाची खरी. तथापि तेथे हवेमध्ये एका दिवसात तीन तीन प्रकार होत. यामुळे निश्चित धोरणाने वागणे कठिण होत असे. केव्हां धुक्याने दिशा धुद व्हाव्या तर केव्हा पाऊसच धो धो पडू लागावा. यामुळे बाहेर पडताना हवा एक प्रकारची तर परत येतांना दुसऱ्या प्रकारची इतके त्वरित परिवर्तन घडे. ऊबदार कपडे नेहमी अंगावर घालावे लागत, आणि निघतांना स्वच्छ ऊन पडले असले तरी पावसाळी ओव्हरकोट हाताशी सज्ज ठेवावा लागे. कारण केव्हा हवेतील ऊब नाहीशी होऊन पावसाने भिजावे लागेल आणि थंडी बाधेल याचा नियम नसतो. तसेच सिमल्याचे पाणी थंडगार पण रुचीला दिल्लीसारखे गोड नसून फारच जड. यामुळें हवे तितके प्यावे तरी पचाईत आणि न प्यावे तरी पचाईत. पाणी जड म्हणून चालण्याचे श्रम करावे लागत, आणि सिमल्यास चालण्याचा व्यायाम करण्याला बाहेर पडावे तर चढउतार फार. व्यायाम कमी पडला तर अन्न बाधावयाचे, आणि थोडे खाल्ले तर भूक बाधावयाची. हवा स्वच्छ असेल तेव्हां प्रसन्नता वाटे पण कुंद झाली म्हणजे मन उदास होऊन जाई. चालत जावे तर श्रम होतात. आणि मनुष्य वाहन ( रिक्शा ) वापरावे तर माणुसकीच्या दृष्टीने अप्रशस्त वाटते. सिमल्याचे ठिकाण केवळ साहेब लोकांच्या सोईचे. आणि तेथल्या मुक्कामाचा आनंद तेच खरे भोगीत. सिमल्याच्या बैठकीला मी मनातून कंटाळे. आणि तो मुक्काम केव्हां संपवून खाली जातो असे मला होई.

दिल्ली सिमला येथे सरकारी वसतिगृहाची सोय आहे. नव्या दिल्लीतले बंगले सोईचे असून विधिमंडळाच्या गृहापासून फार लांब नाहीत. तथापि जेवण केल्याबरोबर चालत जाणे जिवावर येई. म्हणून जातांना मोटारीतून जावे आणि येतांना पायाने चालत यावें असा माझा साधारणपणे क्रम असे. सिमला येथील कार्ट रोडवरील बंगल्यांत मी रहात असे ती जागा रस्त्यापासून सुमारें चार-पांचशे

फूट खाली. यामुळे जेवल्यावर पुस्तकें कागदपत्र व पावसाळी ओव्हरकोट इतकें ओझें घेऊन चढून जाणें कठिण म्हणून मी बहुधा जातांना रिक्शा करूनच जाई. आणि परत येताना चालत येई. सुटीच्या दिवशी किंवा फावल्या वेळी दूरवर हिंडण्यासाहि जाई. पण हा ठरीव मार्ग फार रुक्ष व धुळीनें भरलेला असे. सिमल्यास हिंडण्या-फिरण्याचें खरे सुख भोगावयाचे तर मुख्य मार्ग सोडून आजूबाजूस भटकले पाहिजे. मात्र सर्वत्र उंच वृक्षाची झाडी असल्यामुळें सिमल्यास आड-मार्गानें भटकणाराला उन्हाचा त्रास होत नाही. कोठेंहि गेले तरी खाली खोलवर नजर पोचून निरनिराळे रम्य देखावे दिसतात. पाण्याचे प्रवाह मात्र फारसे आढळत नाहीत. सिमला हा हिमालयाचाच भाग असला तरी खरा हिमालय याहून अधिक उंच जावें तेव्हांच पहावयास सांपडतो. सिमल्यास दाट जंगल असे कमी. वृक्ष अतिशय उंच पण तुरळक. यामुळे खालच्या बाजूला हिंडण्या-फिरण्याला अडचण पडत नाहीं. अडचण खरी काय ती उच्चनीच भूमिभागाची.

दिल्ली सिमला येथील मुक्कामात आम्ही दक्षिणी मंडळी क्लब बनवून एकत्र जेवणखाण करीत असू. त्याकरितां पुण्याहून दोन आचारी आणि एक गडी नेत असूं. शिवाय तेथील एखादा नोकरहि असे. या क्लबाची सर्व व्यवस्था रा. अनंत-राव फडणीस हे ठेवीत. ते केसरी कचेरीचे नोकर असून सरबराई खाते सर्वस्वी त्यांच्याकडे सोपविलेले असें. १९१६ पासून १९२० पर्यंत ते टिळकांच्या दौऱ्यांमध्ये प्रवासांतील सर्व व्यवस्था त्यांच्याबरोबर हिंडून ठेवीत. तसेच टिळकांकडे येणारे पाहुणे, त्यांच्यासंबंधी होणाऱ्या सभा-समारंभ, आणि केसरी कचेरी-चीच पण घरगुती निमस्वरूपाची सर्व कामे त्यांजकडेच सोपविलेलीं असत. टिळकांच्या पश्चात त्यांची नेमणूक मजकडे झाली. तीतहि पूर्वीचेच काम त्यांच्याकडे दिलें गेलें. लेखक या नात्याचा दुसरा एक सेक्रेटरी किंवा शॉर्टहँड टाइपिस्ट मी केसरी कचेरींतलाच घेई. शिवाय कचेरीतला एखादा दुय्यम संपादक मज-बरोबर विधिमंडळाचे काम पाहण्यास येई तोहि लिहिण्याच्या कामी उपयोगी पडे. तथापि क्लब संभाळण्या चालविण्याचें काम सर्वस्वी फडणीसांकडेच असे. बंगल्याचे केर काढविणें, पैशाभराची भाजी आणविणें, येथपासून खाजगी सभा समेलनें मेजवान्या सार्वजनिक लोकांच्या गांठी भेटी आणि गुप्तमसलतीची कामें, येथ-पर्यंत सर्व काम फडणीस करीत. आणि तें इतके आस्थेवाईकपणें आणि बिन-बोभाट करीत कीं याची सर दुसऱ्या कोणालाहि आली नसती.

क्लबच्या व्यवस्थेला फडणीसासारखा मनुष्य लाभला म्हणून आम्हा ऋणानुबंधी लोकांना एकत्र राहतां आले आणि खर्चहि बेताचा पडला. १९२४ साली मी, लोहोकरे, मुतालीक, करंदीकर, बेळवी, अणे, अभ्यंकर असे एकत्र बंगल्यांत राहत होतो. सोईच्या दृष्टीने ( किंवा कांही अंशी स्वभावाच्या दृष्टीनेहि म्हणण्यास हरकत नाही ) आम्ही एकेका खोलीत राहण्याकरिता खालील जोड्या लावल्या होत्या. १ मी व बेळवी, २ करंदीकर व मुतालीक, ३ अणे व अभ्यंकर. डॉ. लोहोकरे यांची एकट्याची निराळी व्यवस्था केली होती. लोहोकरे हे सदा आजारी असत. त्याना ऊष्ण उपचार फार लागत. इतके की त्यांच्या विजेच्या शेगडीला एकदा एका महिन्यांत पन्नास रुपये खर्च आला. त्यांचा स्वभावहि तापट आणि कोणाशी फारसा जुळण्यासारखा नव्हता. मुतालीक व करंदीकर हे दोघेहि एकाच सातारा गांवचे स्नेही. दोघेहि स्नानसंध्याशील. सोवळे ओवळे मानणारे. अणे व अभ्यंकर यांची जोडी ते केवळ वऱ्हाड-नागपूरचे म्हणून लावण्यांत आली होती. अणे हे कर्मठ स्नानसंध्या करणारे तर अभ्यंकर यांची मजल मांसाहारापर्यंत जाणारी. दोघांचे स्वभावहि निरनिराळे. अणे मिळते घेणारे सहनशील, तर अभ्यंकर हे उग्र स्वभावाचे उद्दाम व आपलाच हेका चालविणारे. परंतु अभ्यंकर हे अण्यांना वडीलकीचा मान देत व अणे त्याना अरे जारे म्हणणारे. यामुळे सर्वांत त्यांचीच जोडी अधिक जमण्यासारखी होती. मी व बेळवी यांचा स्वभाव फार जुळे. आणि पांच वर्षे आम्ही एकत्र राहिलो होतो तरी त्यांचें माझें जुळले नाही असा एकहि प्रसंग मला आठवत नाही.

अभ्यंकराचा स्वभाव थट्टेखोर. पण त्यांच्या थट्टेचे पर्यवसान कोणा इतराच्या निंदेत हटकून व्हावयाचे. त्यांच्या भाषणांत लावून बोलण्याचा प्रकार इतका असे की तो त्यांच्या थट्टेखोरपणानेंहि नीटसा झांकून जात नसे. डॉ. लोहोकरे यांना आपली थट्टा केलेली कळत नसे. आणि कोणी आपली व्याजस्तुति केली तरी ते ती खरी मानीत. क्लबासारख्या मेळ्यांत, कोणी एक असा मिळाला म्हणजे मग ज्यानें उठावे त्यानें त्याची टिंगल करीत सुटावे असे होते. लोहोकरे हे जात्या बुद्धिमान खरे. पण त्यांचे शिक्षण एकांगी आणि बेतापुरते होते. त्यांना असें वाटे कीं, आपण अर्थशास्त्रीय विषयांत मोठे निष्णात आहो. पण त्यांचे त्यांना नुसते वाटत असते तरी ठीक होते. पण ते आपल्या आवाक्यापलीकडे जाऊन विधिमंडळांत बोलण्याचें धाडस करीत. यामुळें त्यांचे हसूं होई. या त्यांच्या स्वभावदोषाला

अनुलक्षून अभ्यकर यांनी एकदां एक नाटकच केले. विधिमंडळाचें काम संपून क्लबाचे आम्ही सभासद घरोघर जाण्याला निघण्याच्या वेळी लोहोकरे यांना क्लबांत औपचारिक रीत्या 'मानपत्र' द्यावयाचा कट अभ्यकरानी केला. मानपत्र लिहून काढले. फुलांची माळ आणविली. आणि चहाच्या निमित्ताने सर्वांना, म्हणजे पांचसात असामीना, एकत्र करून त्यातल्याच एकाला अध्यक्ष नेमून ओतप्रोत स्तुतीने भरलेले मानपत्र अभ्यकरांनी मोठ्या गभीरपणाने वाचून दाखविले आणि मग गळ्यांत माळ घातली. ही थट्टा न उमगून सर्व प्रकार प्राजलपणाचा असे समजून लोहोकरे यांनी मोठे थाटदार उत्तरहि दिले. आणि हा सर्व वेळ आम्हा इतराना आपली विनोदबुद्धि इतकी आवरून धरावी लागली की जसे काही गुदमरल्या-सारखे होऊन गेले.

अभ्यंकर हे माझी थट्टा करण्याच्या भानगडीत फारसे पडत नसत. आणि त्यांना मनांतून मी आवडत नसून ते माझा थोडासा द्वेषहि करीत. त्याना वाटे की, केळकरांनाच या क्लबाचे आणि पर्यायाने महाराष्ट्र वऱ्हाड व नागपूर या प्रांतांतील सभासदांचे पुढारी मानतात ते काय म्हणून ? पण नेहरूप्रभृति तसे मानीत खरे. स्वराज्य पक्षाच्या व्हिपचे काम माझ्याकडे होतेंच. पण कार्यकारी मडळात तरी नागपूरचा प्रतिनिधि म्हणून आपणाला घ्यावे असे अभ्यंकरांना मनातून वाटे. उलट या मडळात जागा ठरीव व थोड्या. यामुळे पं. नेहरू खऱ्या भावाने म्हणत की, "एक केळकर आहेत ते तुम्हां महाराष्ट्रीय सभासदांचे प्रतिनिधि आहेतच." पण मला अशी पंचाईत पडे की, अभ्यकराना घ्या म्हणावे तर आमच्या आम-च्यांत फूट आहे असे जाहीर केल्यासारखे होते, आणि घेऊ नका म्हणण्याचे तर कांहीच कारण नव्हते. पण पुढे अभ्यंकर मला नकळत या गोष्टीचा आपापसांत गवगवा व तक्रार करूं लागले. शेवटी एक दिवस त्यांनी माझ्यावर उघडपणे असा आरोप केला की मी इतर प्रांतांचे हित पहात नाही. याचा मलाहि राग आला. आम्हां दोघांचे कडाक्याचे भांडण झाले. तेव्हां मी पुढील निवडणुकी-च्या वेळी 'कार्यकारी मंडळांत नागपूर प्रांताला वेगळा सभासद द्या' असा आग्रह धरला व खरा प्रकार उघडकीस आणून तो आग्रह सिद्धीस नेला. अभ्यंकरांचा व माझा स्वभाव कधी जुळण्यासारखे नव्हतेंच. शिवाय त्यांनी वैरी मानलेल्या डॉ. मुंजे यांचा पक्षपाती मी असा त्यांचा समज होता. यामुळे ते मनांतून जळत.

आणि ही बेबनावाची स्थिति पुढे कधी सुधारली नाही इतकेच नव्हे तर अखेर अखेर तिचा कडेलोट झाला.

अशा प्रकारचा थोडासा गुप्त बेबनाव आमच्यांत असला तरी तो बाहेर पडत नसल्याने, कर्नाटकी बेळवीसकट आम्ही महाराष्ट्र मडळी म्हणजे सहजीवित्वाचा मित्रत्वाचा व एकजुटीचा नमुनाच असे विधिमडळातील इतर बहुतेक मानीत. महाराष्ट्र व कर्नाटक यांच्यांतील आतांचा भेद तेव्हां डोके वर काढून प्रगट झाला नव्हता. आणि बेळवी हे सज्जन असून हे दोन प्रांत वेगळे असे त्याना कधीच मनांतूनहि वाटत नसे. इतर सभासदातहि कांही काही गट असेच असत. पण ते ख्यालीखुशाली व खेळ यांच्याकरिता विशेष प्रसिद्ध असत. आमच्या क्लबांत फार तर गप्पा मारण्यात वेळ जाई. पण आम्हापैकी कोणीहि पत्ते खेळण्यात वेळ दवडला नाही. जो तो आपापल्या कामात गर्क असे. अभ्यकराचा तडाखा पाण-चट इंग्रजी कादबऱ्या वाचण्यावर असावयाचा. आणि अश्लील बोलण्यांत ते फार घटाईत असत. ते चालू विषयाचा अभ्यास असा क्वचितच करीत. वर्षातून एकदां एखाद्या राजकीय विषयावर ते बोलावयास उठावयाचे. आणि मग आपल्या धिप्पाड शरीरास शोभण्यासारख्या राक्षसी आवाजाने सरकारची हजेरी घेतांना वर्षभर साठविलेली कुचकी नासकी विशेषणे सरकारपक्षाला अर्धा तासभर समर्पण करावयाचे. बेळवी फावल्यावेळी आपले आवडते इंग्रजी ग्रथकार व कवी वाचीत असावयाचे. अणे प्रचलित विषयाचे कागदपत्र आस्थेने व बारीक नजरेने वाचीत. तेहि एखादेच वेळी भाषण करीत तेव्हां त्यांचा आवेश फार प्रकट होई. त्यामुळे बोलतांना त्यांचे पाय पायांत अडखळत. पण त्याची इग्रजी भाषा व मुद्दे चांगले असत.

करंदीकर व मुतालीक दोघांचेहि बरेचसे काम दिल्ली सिमला येथील मोठ-मोठ्या लोकांच्या गाठी भेटी घेण्याचे असे. करदीकर हे बुद्धिवान असून सभाषणां-त मोठी गोडी उत्पन्न करणारे असत. आणि बाहेर कोण काय बोलतो, कोठे काय चालले आहे, याची माहिती ते एखाद्या मधुमक्षिकेप्रमाणे गोळा करून आणीत. तथापि अशा औपचारिक सभाषणात गोरा अधिकारी आपल्या मनचे खरे कोणास कांहीच सांगत नसतो, म्हणून तुमचे ओळखी करण्याचे श्रम व्यर्थ आहेत, असे म्हणून आम्ही विनोदाने त्यांची थट्टा करावयाचे. बालसंगोपनासारख्या विषयाचें नेमित्त करून, युरोपियन अधिकाऱ्यांच्या स्त्रियांच्या भेटी घेण्यापर्यंत त्यांची मजल

जाई ! मुतालीक हे सरदार इनामदार वर्गाचे प्रतिनिधि म्हणून निवडून आलेले असल्यामुळे अधिकारी लोक त्याना विशेष मान देत, आणि सरकारतर्फे एखाद्या उपमंडळावर सभासद नेमण्याचा प्रसंग असतां त्यांची नेमणूक करीत. मुतालीक हे बुद्धिवान असूनहि त्यांचे चर्चेचे विषय मोजके ठराविक, आणि विशेषतः इनामदार जमीनदार सरदार वर्गाच्या हित संरक्षणाचे असत. आणि हे हित ते चांगले संभाळीत. वास्तविक त्यांचा ऋणानुबंध लोकपक्षापेक्षां सरकारपक्षाशी अधिक. असे असतांहि मत देण्याची वेळ आली म्हणजे ते सरकारची निराशा हटकून करीत. आणि ते लोकपक्षांत उघडपणे सामील नसले तरी, मतनोंदणीच्या अदमासांत त्यांचें मत सरकार विरोधी पक्षाकडेच पडावयाचे असे आम्ही सर्रास धेऊन चालत असू.

आम्हापैकी करंदीकर व बेळवी हे नियमाने हिंडण्या फिरण्याला जात. अणे यांना आवेशयुक्त वादविवादाच्या हौसेमुळे बसल्या बसल्याच व्यायाम घडे ! मला हिंडावयास जाण्याचा कंटाळा तसाच वादविवादाचा. शिवाय मला लिहिण्या वाचण्याचे काम असें, आणि या कामाचे निमित्त करून मला बैठेपणाची सवय किंवा व्यसन भागवितां येई. मी उरला सुरला सर्व वेळ एकलकोंडेपणाने आपल्या खोलींतच बसून लिहिण्या वाचण्यांतच घालवी. तोंडाने मजकूर सांगून लिहविण्याचे एक मोठे साधन म्हणजे लघुलेखक हाताशी असल्यामुळे मला माझे व्यसन भाळवितां येई. माझ्या टेबलावर उत्तर न देतां पडून राहिलेले पत्र कधी सांपडावयाचे नाही. केसरीला नित्य नवा मजकूर, बातमीपत्रे किंवा स्वतंत्र लेख यांच्या रूपाने, पाठविण्याची नड ही मला आयती निमित्तादाखल उपयोगी पडे. दिल्ली सिमल्यास असलो तरी अभिप्रायाकरितां पुस्तके येऊन माझी पाठ शिवीत. आणि तेहि एक मोठें कामच होऊन बसें. परंतु स्वतःच्या स्फूर्तीनेहि मी लघुकथा लिहिणें, कविता ( केव्हां इंग्रजी विनोदी ) करणे ही कामें करी. विधिमंडळाच्या ग्रंथालयांतून रोज एखादे नवें पुस्तक मी आणीत असे, ते वाचण्यांत वेळ जाई. आणि एकेरी पक्षाच्या सभा, दुहेरी तिहेरी पक्षाच्या सभा, या भरीला असतच. तात्पर्य हिंडाफिरायला न जाण्याला निमित्त हुडकणारा मी भला, आणि तें निमित्त पुरविणारे दिल्ली सिमल्याचें सार्वजनिक जीवनहि भले, असा मेळ बसे. इतर कसल्याहि भानगडींत न पडणारे बेळवी या विषयीं माझी थट्टा नेहमी करीत. आणि लघु-

लेखक हाताशी पुढे घेऊन बसलेला मला त्यांनी पाहिले म्हणजे ते म्हणत "हे पहा लट्ट उदराचे गणपति. आपले मूषकवाहन आपल्यापुढे घेऊन बसले आहेत."

जी गोष्ट दिल्ली सिमल्याच्या मुक्कामात बाहेर पडून हिंडण्याफिरण्याची तीच आसपासचे प्रांत पहाण्याची. विधिमंडळाच्या बैठकी चालू असतां लगतच्या प्रांतात हिंडून प्रवास करून प्रेक्षणीय स्थळे पहाण्याला पुष्कळ सवड असते. आणि आमच्यातले अनेक लोक हिंडून फिरून येतहि. पण मी तसे हिंडण्याफिरण्याचा कंटाळा करी. येऊन जाऊन सरहद्दप्रांतात दौरा काढण्याची व्यवस्था सरकारकडून झाली, सर्व प्रवास बिनखर्ची व सुखाचा व्हावयाचा होता, म्हणूनच मी दौऱ्यांत सामील झालो. परंतु ऋषीकेश डेहराडून वगैरे अनेक प्रेक्षणीय स्थळें आसपास असता मी जाण्याचा कंटाळा केला. काश्मिर पहावे असे मनांत फार येई. पण तेहि घडले नाही. सिमल्याच्या बैठकीकरिता गेलो म्हणजे काश्मिरला जाण्याचे माझे व बेळवी याचे बेत सुरू व्हावयाचे. परंतु बैठक सपण्याची वेळ आली म्हणजे बेळवीना बेळगावास परत जाऊन वकिली चालू करण्याचा तगादा मनांतून सुरू होई, आणि तहकूबी मिळविलेल्या दाव्यांच्या तारखा पाहण्याकरितां ते आपली रोजनिशी चाळू लागावयाचे. त्याप्रमाणे मी पुण्यांत किंवा बाहेरगांवी आमंत्रणे पतकरून कामे मागे लावून घेतलेली असत, त्यांच्या तारखांची आठवण जागी करण्याकरिता मीहि रोजनिशीची पाने चाळू लागे. तात्पर्य, कौन्सिलची बैठक सपतांच कोणती गाडी परतीच्या प्रवासाला पकडतां येईल याचे बेत सुरू होऊन, काश्मिरचा प्रवास अपूर्ण मनोरथाच्या यादीत लिहून, आम्ही आपलें सामान बांधण्याची तयारी करीत असूं.

विधिमंडळाच्या निवडणुकीना खर्च येई तरी पुढे दिल्ली सिमला येथील मुक्कामांचा खर्च सरकाराकडून मिळणाऱ्या रोजी वीस रुपयांच्या पगारांतून भागे. आम्ही क्लब केल्यामुळे राहण्या-जेवण्याचा खर्च थोडाथोडा वांटून जाई. शिवाय आमच्या क्लब श्रीमंतीचा आव आणून कोणाला मेजवान्या जाफती देण्याच्या भानगडीत पडत नसे. आपणाला परत भेटीच्या पाहुणचाराकरितां लोकांना बोलवितां येत नाही मग आपण तरी लोकांचा पाहुणचार कां घ्या ? अशा विचारानें मी कित्येक मेजवान्यांची आमंत्रणे कांही तरी निमित्त सांगून टाळीत असे. जेवणाखाण्याला जाणे ही आहाराच्या दृष्टीनेहि मला उपाधी अशीच वाटे. आम्ही दक्षिणी माणसे श्रीमंत नाही, गरीब असतो, अशी दिल्ली सिमला येथलि लोकांची समजूत परस्पर

झालेली असे. आणि ती खरी असून आमच्या पथ्यावर पडे. पण इतर रीतीने आमच्या क्लबाविषयी सर्व साधारणपणे आदरबुद्धि असे. आम्ही लोक ख्याली-खुशाली न करणारे, खेळाचे अड्डे न मांडणारे, नुसती कारस्थाने न रचणारे, बडे-जावी वाढविण्याकरितां श्रीमत लोक किंवा अधिकारी लोक यांच्या गाठीभेटी न घेणारे, असे असल्याबद्दल आमचा लौकिक असे. उलट आम्ही मताचे खंबीर, स्वातंत्र्यप्रिय, राष्ट्रीय वृत्तीचे, अभ्यासू असाहि लौकिक असे. वरचे कांही लब्ध-प्रतिष्ठित सोडले तर सल्ला मसलतीला आम्ही उपयोगी पडणारे असे इतर लोक आम्हाला मानीत, आणि आमच्याकडे येऊन चर्चा विचारविनिमय करीत.

१९२७ साली फिरून आम्ही विधिमंडळांत गेलो त्या वेळी हा क्लब टिकून राहिला तरी पहिला संच माडला. डॉ. लोहोकरे निवर्तले. करदीकर व मुतालीक यांची मुदत संपली व ते पुन्हां निवडून आले नाहीत. अभ्यंकर निवडणुकीला उभे राहिले, पण डॉ. मुजे यांनी त्यांना पराभूत केल्यामुळे ते गळले. डॉ. मुंजे आमच्यांतलेच पण ते नव्या दिल्लीत स्वतंत्रपणे राहत. त्यांना आमच्या क्लबां-तले शाकाहारी मिळमिळीत जेवण आवडत नसे. तथापि ते दिवसांतून क्लबाकडे एक वेळ फेरी मारून गप्पागोष्टी करून जात. शेवटी क्लबांत मी बेळवी आणि बापूजी अणे असे तिघेच उरलो. त्यांचा समावेश एकाच बगल्यांत होऊ शकला. अभ्यं-कर व लोहोकरे नसल्याने या पुढच्या तीन वर्षात भांडणाचे प्रसंग क्लबांत मुळीच आले नाहीत. पूर्वीप्रमाणे आताहि आमच्या क्लबानें लब्ध प्रतिष्ठितपणाचा खेळ केला नाही. हा खेळ मेजवान्या पार्ट्या देण्याचा. तो खेळ फार खर्चाचा असतो आणि त्यांतून लभ्यांशहि फार नसतो. आमच्या क्लबाप्रमाणे राजकीय 'राष्ट्रीय' पक्षाचा बनावहि नवाच होता. आमच्याच क्लबांतले बेळवी हे जुन्या स्वराज्यपक्षांत राहिले. त्यांनी प्रतिसहकारपक्ष स्वीकारला नाही. अणे आणि मी हे नव्या पक्षाचे सभासद होतों, व या नव्या पक्षाच्या तिकिटावरच निवडून आलो होतो. तथापि विधिमंडळांतल्या नव्या पक्षाची सघटना, प्रतिसहकार पक्ष न स्थापलेल्या पण त्याला सहानुभूति असलेल्या प्रांतांतून आलेल्या सभासदांची संयुक्त स्वरूपाची असल्यामुळें, त्याला 'प्रतिसहकार' पक्ष हे नांव न देतां ' नॅशनॅलिस्ट ' असें नवेंच नांव देण्यांत आलें होते. एका स्वराज्यपक्षाला दोन फाटे फुटले. मात्र माणसें पुष्कळची तींच होतीं.

१९२७ साली विधिमंडळाच्या पहिल्या बैठकीला दिल्लीस गेलो तेव्हां मज-वर एक गंडांतर आले. यापूर्वी निवडणुकीत पुष्कळ हिंडावे लागले त्यांत मोटा-रीच्या प्रवासांत उजव्या कानावर वाऱ्याचा मार बसून आतल्या बाजूस दुखापत झाली. कानाच्या वरच्या बाजूला थोडथोडे दुखत असतांच दिल्लीच्या वाटेवर मी धुळ्यास गेलो. तेथे कानाच्या पाळीवरच्या अगास डोक्याला सूज आली म्हणून डॉ. साठे यांचा सल्ला घेतला. त्यांनी औषध दिले परंतु असे बजाविले की " सूज न उतरली तर आंतल्या बाजूस गळू होईल. आणि ते कापून घेण्याची हयगय केल्यास गळू खाली चरत जाऊन हाडाला भिडण्याचा संभव आहे. तसे झाल्यास हाडच छिनून काढावे लागते. त्याला मॅस्टॉईड असे नांव आहे. तरी सावधगिरी ठेवा. " पण गळू वरच्या बाजूस उमटून पोटिस लावून पिकविल्यास कदाचित् बाहेरच्या अगाला फुटेल या आशेने मी पुढील प्रवास सुरू केला. भुसावळेस गेलो तो गळू ठणकू लागले. तरी ऊन पाणी मिळवून शेकून तसाच पुढे दिल्लीस गेलो. पुढे इजा कमी न होतां वाढली. तापहि येऊं लागला. एक दिवस गांवात जाऊन डॉक्टरी इलाज केला. परंतु बरे वाटेना. दुसरे दिवशी सध्याकाळी डॉ. मुंजे भेटीस आले. त्यानी सांगितले की "शस्त्रक्रिया केल्याशिवाय हे गळू बरे होणार नाही. आणि एकेक दिवसाचा विलंब होईल तर हाडाला इजा पोचेल. तरी तुम्ही उद्यांच्या उद्यां सकाळी येथून मुंबईस चालते व्हा. मी एक दिवसहि तुम्हास येथे राहू देणार नाही. "

दिल्ली येथील इस्पितळांत गेलो असतां तेथे शस्त्रक्रिया झाली नसती असे नाही. परतु ते परके ठिकाण. इस्पितळांत किती दिवस पडून रहावे लागते याचा नेम नाही. या विचाराने फडणीसांना बरोबर घेऊन तडक मुंबईला आलो. डॉ. गोपाळराव देशमुख यांचा शोध केला. पण त्यांची गांठ पडली नाही. ते पुण्यास गेले होते. तेव्हां डॉ. दलाल याच्याकडून शस्त्रक्रिया करविण्याचे ठरवून गिरगां वांतील 'कैकिणी व टिळक' याच्या इस्पितळांत मी जाऊन राहिलो. दुसरें दिवशी क्लोरोफॉर्म देऊन ऑपरेशन करण्यांत आलें. जखम अद्यापि भरून येण्याला अव-काश होता, तो इतक्यांत दिल्लीहून पत्र आले की, " तुम्ही विधिमंडळांत प्रविष्ट करण्याकरिता दोन बिले पाठविली होतीं ती निघण्याचा दिवस अभावितपणे लवकर आला आहे. तरी बरे असाल तर एकदम निघून या. " त्यामुळे पेंच असा पडला की दिल्लीस जावयाचे तर न भरलेली जखम अंगावर घेऊन जावें लागते. आणि

जातां येता सोळाशे मैलाचा प्रवास! बरे न जावे तर माझी बिले प्रविष्ट करण्याची ही संधि गमावल्यास ती फिरून केव्हां मिळेल की नाही याची शंकाच. कारण खाजगी बिलाना सबंध वर्षात चार दोन दिवस मिळावयाचे आणि दुसरी बिले आधी प्रविष्ट झाली म्हणजे त्याची वासलात लागेपर्यंत माझी बिले मागे पडून रहावयाची. खाजगी बिलांना यशस्वी होण्याला फारच गंडांतर असतात म्हणून मी आजारी असतां त्याच दिवशी दिल्लीस निघालो. नेमल्या दिवशी, बांधलेल्या जखमेवर रुमाल बांधून कण्हतकुथत, बिले कशी तरी एकदाची प्रविष्ट करून दुसऱ्याच दिवशी परत मुंबईला निघालो आणि इस्पितळात येऊन दाखल झालो. डॉ. दलाल यानी पट्टी सोडून पाहिले तो जखम अद्यापि खोलच होती. इतकेच नव्हे तर फिरून एक ऑपरेशन करावे लागेल असे त्याचे मत पडले! तेव्हा डॉ. देशमुखासह आणखी दोन-तीन प्रसिद्ध शस्त्रवैद्य बोलावून सल्ला घेतला. त्यात "फिरून शस्त्रक्रिया करावयाची झाली तरी इतक्यांतच करू नये, जखम भरण्याला आणखी संधि देऊन पहावी," असे डॉ. देशमुख यानी निर्धाराने सांगितल्यावरून दुसरे, ऑपरेशन रहित झाले. आणि इस्पितळात एकदर दहा दिवसाचा मुक्काम करून मी पुन्हा परत दिल्लीला गेलो.

माझी बिले चर्चेला पुनः निघाली तेव्हांहि जखमेवर पट्टी बांधलेलीच होती. तथापि सभेला जाऊन भाषण करण्याइतका मी बरा झाला होतो. या शस्त्रक्रियेचा एक परिणाम प्रथम असा झाला की उजवा कान जवळ जवळ बधिर झाला. यामुळे एखाद्या बहिरटाप्रमाणे डाव्या कानाला हात लावून विधिमंडळांतील काम काही दिवस करावे लागले. भीति वाटली की मी एका कानाने कायमचाच बहिरा होतो कीं काय! पण सुदैवानें कांही महिन्यांनी उजव्या कानाला फिरून थोडथोडे ऐकूं येऊं लागले. एकंदरीने हे गंडांतर बरे निभावले. कारण हाडाला इजा पोंचती तर ती शस्त्रक्रिया कठिण झाली असती. आणि खालच्या हाडाला जखम भिडली म्हणजे फार यातना होतात व रोग असाध्य होतो असेहि म्हणतात.

या वेळी मी विधिमंडळांत दोन बिले प्रविष्ट केली. त्यांतील एक शेवटी मंजूर झाले, मग दुसरे सिलेक्ट कमिटीपर्यंतहि न जातां फेटाळले गेले. मंजूर झालेले बिल अगदी लहान पण उपयुक्त होते. त्याचा प्रकार असा. पूर्वी अनेक प्रकारच्या खाजगी संस्था सोसायट्या रजिस्टर करतां येत होत्या. उदाहरणार्थ—

शिक्षणसंस्था, परोपकारी संस्था इत्यादि. परंतु राजकीय संस्थांचे स्वरूप तितकेंच परोपकारी व सार्वजनिक स्वरूपाचें असलें तरी अशा संस्था रजिस्ट्रार हा दाखल करून घेत नसे. याचा अर्थ त्यांना व्यवहारोपयोगी अशी कायदेशीर संघटना न लाभल्यानें व्यवहाराला फार अडचणी येतात. संस्था रजिस्टर असली म्हणजे तिचा एखादा अधिकारी एकंदर संस्थेच्या वतीनें सर्व कायदेशीर व्यवहार करूं शकतो. पण संस्था रजिस्टर नसली म्हणजे मालमिळकत कोणी धारण करावी हा प्रश्न पडतो. तसेंच वाद उत्पन्न होऊन प्रकरण न्यायकोर्टात गेल्यावर संस्थेचे सगळे सभासद वादी किंवा प्रतिवादी करावे लागतात. अर्थात् ही गोष्ट फार त्रासाची भानगडीची होऊन बसते. पुणें सार्वजनिक सभेला हा अनुभव येऊन चुकला होता. पुण्याच्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया संस्थेनें घटना नोंदणीकरिता निरनिराळ्या प्रांतांत अर्ज करून पाहिले, परंतु शिक्षणाची संस्था ही परोपकारी या सदराखालीं पडूं शकत नाहीं असें ठरवून अधिकाऱ्यांनी नोंदणी नाकारली. आमच्या होमरूल लीग संस्थेचें ट्रस्टडीडच झालें होतें म्हणून गोष्ट वेगळी. नाहीं तर हाच प्रसंग यावयाचा. हें सर्व लक्षांत घेऊन मी माझ्या बिलानें अशी दुरुस्ती सुचविली होती की 'धर्मार्थ परोपकारी' संस्था यांच्या वर्णनाचे जे शब्द कायद्यांत आहेत त्यांत 'राजकीय शिक्षणाच्या संस्था' असे शब्द प्रत्यक्ष घालून त्या कायद्याची व्याप्ति वाढवावी.

सोसायट्यांच्या रजिस्टरांनी भलताच हट्ट धरला नसता तर, आहे त्या शब्दांतच राजकीय संस्थाहि बसतात असा अर्थ होऊन, माझ्या बिलाचें कारण उरलें नसतें. परंतु त्यांच्या दुराग्रहामुळें, भ्रामक अर्थमीमांसेमुळें, माझें बिल अवश्य ठरत होतें. वास्तविक राजकीय संस्था नोंदविल्या गेल्या तर ती गोष्ट सरकाराला इष्टच वाटावी; कारण संस्था नोंदली म्हणजे तिची घटना, नियम, अधिकाऱ्यांची चालकांची नांवें सर्व कांहीं जगजाहीर असते. अर्थात् अशी संस्था ही गुप्तमंडळीच्या अगदीं दुसऱ्या टोकाची संस्था होय. म्हणून सरकारानें तिच्या नोंदणीला साहाय्यच करावें. पण इतका विचार करतो कोण? असो. माझ्या बिलाला सरकारानें हरकत घेतली नाहीं. कारण माझ्या बिलाचा हेतु मी आपल्या भाषणांत इतका स्पष्ट आणि खात्री पटविण्यासारखा मांडला होता कीं त्यावर आक्षेप घेणें हें समंजस माणसाला अशक्य होतें. शेवटीं किरकोळ एकदोन शब्दांचा फरक करून बिलाचीं तीनहि वाचनें होऊन तें मंजूर झालें. अशा

रीतीने "कायदा बनविण्याचा" हक्क मला पाच वर्षांत एकदा तरी सिद्धीस नेता आला

माझे दुसरे एक बिल फेटाळले म्हणून सांगितले त्याचा हेतु असा होता. सक्तीने खाजगी जमिनी ताब्यांत घेऊन एका मालकाकडून काढून—त्याला किमत देऊन कां होईना पण—त्याचे स्वामित्व नष्ट करून दुसऱ्या कोणाला त्या देण्याचा अधिकार हल्लीच्या कायद्याने सरकाराला आहे पण हा अधिकार बजाविताना चारदोन गोष्टी वाईट होतात. वेळ अतिशय लागतो. मध्यतरी मालकाला धड कांहींच करतां न आल्यामुळे त्याचे नुकसान होते. आणि किमत देण्याचा ठराव मुलकी अधिकारीच करतात यामुळे ती कमी देण्याकडे त्यांचा कल असतो. त्यांच्या निकालावर जिल्हाकोर्टांत दावा करता येतो परतु फिरून तेहि काम वर्षांनुवर्षे चालते. आणि कोर्ट खर्च इतका येतो की तो करण्यापेक्षा मुलकी अधिकाऱ्यांनी दिलेली किंमतच स्वीकारून मोकळे व्हावे आणि त्रास चुकवावा असे वाटण्या इतका जुलूम मालकावर होतो. हे सर्व दोष काढून टाकण्याच्या हेतूने मी विद्यमान कायद्यांत दुरुस्त्या सुचविल्या होत्या. त्यांतील मुख्य अशी होती की, सक्तीने घेतलेल्या जमिनीची किंमत सरकारी अधिकाऱ्यांनी न ठरवितां ती पचायतपद्धतीने ठरविण्यांत यावी पण जुनी पद्धति सर्व बदलून तिच्याजागी नवी बसवावयाची यामुळे, पाच पचवीस कलमात कांही शब्द बदलावे लागले, कांही नवे घालावे लागले, काही कलमे मूळची वगळावी लागली, काही नवी करून घालावी लागली. मी सुचविलेली पचायतपद्धति हल्लीच्या पूर्वी एकवेळ अंमलांत असलेल्या कायद्यांत होती ती पुढे सरकाराने काढून टाकली. म्हणजे सुधारणेची कुधारणा केली. अर्थात् तो जुना दाखला लक्षांत घेऊनच मी फिरून पचायतपद्धति सुरू करणार होतो.

या बिलाची कल्पना मुळशी पेट्यातील धरणाखाली गेलेल्या जमिनीच्या अन्यायावरून मला सुचली. १९२० च्या पूर्वी नगर जिल्ह्यात साखरेच्या कारखान्याकरिता सरकाराने या कायद्याने जमिनी घेऊन दिल्या, त्या पक्षपाताविरुद्ध बरीच तक्रार झाली होती. मुळशीच्या प्रकरणांत तर हा अन्याय अधिक प्रकट होऊन चळवळहि जोराची होणार होती, व हा कायदाच ऐनजिनशी रद्द करावा अशी सार्वजनिक मागणी करण्यापर्यंत मजल गेली होती. पण माझ्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सोलापूर प्रांतिक परिषदेत साधकबाधक चर्चा होऊन असा निर्णय

लागला की "कोणत्याच सार्वजनिक कार्याला सरकारने खाजगी जमीन सक्तीने घेऊन देऊ नये असे म्हणून कधी चालणार नाही. आगगाड्यांचे रस्ते, शिक्षण-संस्था, दवाखाने यांच्या इमारती, कालव्यांची धरणे, इत्यादिकांना खाजगी जमिनी घ्याव्या लागणारच. खाजगी प्रयत्नांनेच त्या घ्याव्या म्हटले तर त्या हव्या तितक्या एकगट मिळू शकत नाहीत. आणि मिळावयाच्या तर खाजगी मालक बेसुमार किंमती मागणार हे ठरलेले. तेव्हा सक्तीने जमिनी घेण्याच्या कायद्याला तत्त्वतः हरकत नसावी. पण नुकसानभरपाई द्यावयाची ती मात्र पंचायत पद्धतीने दिली जावी" असे मत परिषदेत प्रगट झाले. मुळशीच्या चळवळीत तिच्या चालकांनी "जान कि जमीन" असले एकांतिक तत्त्व पुढे आणल्यामुळे नुकसान भरपाईचा प्रश्न सहजच गौण ठरत होता. म्हणजे त्या प्रसंगी पंचायत पद्धतीने जमिनीची किंमत देण्याला सरकार कबूल झाले असते तरी चळवळीच्या पुढाऱ्यांनी ती गोष्ट मान्य केली नसती. पण मुळशीचे प्रकरण हे एकदा एक घडणार. ते बाजला ठेवले तर प्रत्यही शेकडो इतर प्रकरणी किंमतीच्या मोबदल्यात अधिकारी अन्याय करतात त्याचे काय ? तो दूर करावा आणि पंचायत पद्धतीने, जुनेच पण मध्यंतरी लुप्त झालेले, तत्त्व पुनर्जीवित करावे हाच माझ्या ह्या बिलाचा हेतु होता. पण सरकारी सभासदाप्रमाणे काही खाजगी सभासदहि प्रतिकूल झाल्याने माझे बिल नामंजूर झाले.

दिल्ली सिमला येथील माझे कामकाज कसे काय चाले याची माहिती रा. श. न. आगाशे यांनी जवळून पण तिऱ्हाइताच्या दृष्टीनेहि पाहिलेली अशी एका ठिकाणी लिहिली आहे त्या लेखांतला एक उतारा या खाली देतो.

"पं. मोतीलाल नेहरू ह्यांची कामगिरी उत्कृष्ट तर खरीच, पण स्वतंत्र-पक्षाशी सल्लामसलत करण्याचे बाबतीत केळकर व अणे यांना खलबतात घेतल्या खेरीज पं. मोतीलाल नेहरू यांचे पान हालत नसे. ज्या केळकरांची कौन्सिल-बहिष्काराचे प्रश्नावर पं. मोतीलाल नेहरू यांनी खरपूस तपासणी केली, व एकदां तर "महाराष्ट्राचे मत राष्ट्रीयसभा मानणार काय" असेहि ते म्हणाले, त्या केळकरांशी पं. मोतीलाल नेहरू यांचे इतके सख्य पाहून कित्येकांना अचंबा वाटे. स्वतंत्र व स्वराज्य पक्षाला एके ठिकाणी आणावयाचे म्हणजे आंवळ्यांची मोटच बांधावयाची. कारण मोट बांधायला एक टोक जवळ करावे तर दुसरे सुटूं लागावे व

कांही आवळे घसरून पडावे. पण केळकरांनी युक्तीने स्वतंत्र पक्षांतील आवळया-नाहि मोटेत बाधले.

"सप्टेंबर १९२५ मध्ये असेंब्लीचा अध्यक्ष निवडण्याची वेळ आली तेव्हा स्वराज्यपक्षातर्फे सहा व स्वतत्रपक्षातर्फे सहा एकूण १२ सभासदांची एक कमिटी नेमिली. त्या कमिटीने उमेवाराची निवड करावी असे ठरले स्वतत्र पक्षाने दि. ब. रंगाचारीयिर व स्वराज्यपक्षाने पटेल अशी नावे सुचविली. पण एकमत होईना. अखेर स्वराज्यपक्षातर्फे केळकराचे नाव अध्यक्षांचे जागेकरितां सुचविण्यात आले, व प. मोतीलाल नेहरू यानीहि 'तुम्ही खटपट करा' असे केळकरांना सागितले होते. पण अखेर दोन्ही पक्षात एकमत झाले नाही, व स्वराज्यपक्षाचे उमेद-वार म्हणून पटेल याना निवडण्यात आले. पटेलाना ५८ मते व रगाचारियर यांना ५७ मते पडली. ना. पटेल याना एक मत एरवी न मिळणार असे केवळ केळकराच्या मोहबतीखातरच मिळाले होते. ( हे मत सरदार मुतालीक यांचे होते. )

"१९२६ च्या निवडणुकीत केळकर हे प्रतिसहकार पक्षातर्फे निवडून आले व असेंब्लीत दे भ. लाला लजपतराय याच्या पुढारीपणाखाली स्थापन झालेल्या राष्ट्रीय-पक्षाचे ते एक प्रमुख सभासद झाले जयकर, डॉ. मुंजे, अणे व केळकर हे चौघे प्रतिसहकारवादी म्हणून याच पक्षात विलीन झाले होते. केळकर हे १९२७ ते ३० पर्यंत राष्ट्रीय पक्षाच्या कार्यकारी मडळांत होते, व त्याच्या सल्ल्याने कोणी कोणत्या कमिटीवर जावे व पक्षातर्फे कोणता ठराव कोणी माडावा हे ठरत असे. पण केळकरानी स्वतः आपण होऊन कोणत्याहि कमिटीवर जाण्याचा अभिलाष धरला नाही. स्वराज्य-पक्ष व राष्ट्रीय-पक्ष याच्यामध्ये असेंब्लीच्या कामात नामा-भिधानापलीकडे फरक असा काहीच नव्हता. राष्ट्रीय-पक्ष "आम्ही 'प्रतिसहकारिता' करितो" असे स्पष्टपणे सागत असे. स्वराज्य-पक्ष "आम्ही अडवणूक करितो व आमचे पूर्वीचेच धोरण कायम आहे" असे तोडाने उच्चारी. पण आचार मात्र प्रति-सहकार पक्षाचा. प्रथम प्रथम स्वराज्य-पक्षाच्या सभासदांनी सरकारी सभासदांच्या चहापाट्यांना जाऊं नये असे फर्मान पं. नेहरू यांनी काढले; पण त्याचा अधिकार न मानणारेच बरेचसे सभासद निघाले. शिस्तीचा धाकहि त्यांनी घातला. पण तो फारसा चालत नसे. रिझर्व्ह बॅंक बिल, करन्सी बिल, ट्रेड डिस्प्युट्स बिल व इतर अनेक बिलांच्या सिलेक्ट कमिट्यांवर स्वराज्य-पक्षाच्या सभासदांनी कामें

केली. रिझर्व्ह बँक बिल, सिलेक्ट कमिटी, संमतिवयाची कमिटी, यांसारख्या कमिट्यावरहि कामे करून त्यानी भत्त्याचे पैसे घेतले होते. नॅशनॅलिस्ट व स्वराजिस्ट यामध्ये फरक इतकाच की, नॅशनॅलिस्ट पक्षाने आम्ही कमिट्यावर काम करू असे मतदाराना सागितले व स्वराजिस्टानी हे धोरण जाहीर केले नव्हते इतकेच. पण याहि खेपेला केळकराचा असेब्लीतील दर्जा पूर्वीइतकाच उच्च होता. त्याच्या विद्वत्तेची छाप सर्वांवर पडत असे. त्यांची विनोदी व माहितीपूर्ण भाषणे सर्वांना आवडत. त्याच्या निःस्पृहपणामुळे ते नवीन सभासदांना आदर्श झाले होते. ते कोणाचा द्वेष कधीच करीत नसत. असेब्ली-तील कोणत्याहि सभासदाला—मग तो स्वतत्र, स्वराज्य-पक्ष, राष्ट्रीय-पक्ष व काही काही वेळेला युरोपियन पक्ष यापैकी कोणत्याहि पक्षाचा असो—असे वाटे की, केळकराच्या भाषणात तथ्याश आहे. त्याना भावनाप्रधान भाषणे करता येत नव्हती. त्याच्याजवळ लाला लजपतराय याच्यासारखा आवेश अगर वक्तृत्व नव्हते. बॅ. जिना याच्यासारखी ऐट नव्हती. प मदनमोहन मालवीय यांच्या-प्रमाणे त्याचे भाषण अस्खलित नसे. तरी पण त्याच्या भाषणात बुद्धिमत्तेची झाक, अभ्यासाची आवड, विनोदासह गाभीर्य, राष्ट्रप्रेम व मताचा उदारपणा हे गुण प्रामुख्याने दिसत. सहसा कोणत्याहि बिलावर अगर ठरावावर भाषण करण्यापूर्वी त्या विषयावरील पुस्तके, हिंदी व परकी तज्ज्ञ लोकांचे अभिप्राय, इतर राष्ट्रातील कायदे व पद्धती, त्या विषयाचा सपूर्ण अभ्यास करून त्यांनी भाषणाची टिपणे केली नाहीत असे कधी झाले नाही. करन्सी रिझर्व बँक यासारख्या क्लिष्ट विषयाचा अभ्यास त्यानी असेब्लीचे सभासद असतांना दिल्ली-सिमल्यातच केला. बजेटाची पुस्तके घेऊन मागील १०-१५ वर्षांच्या आकड्यांशी तुलना करीत ते फारसे बसत नसत; पण फडणविसाची बजेटवरील भाषणे व त्यावरील स्पष्टीकरणाचे रिपोर्ट त्यानी काळजीपूर्वक वाचले नाहीत असे कधी झाले नाही. आपल्या भाषणाच्या पुष्ट्यर्थ ते जे दाखले देत, ते बहुतांशी इंग्लिश ग्रथकाराच्या ग्रंथांतूनच घेत व प्रतिपक्षाला निरुत्तर करीत. लांबच्या लांब भाषणे करण्याची हौस त्यांना फारशी नसे. नाही म्हणावयाला करन्सी बिलावरील त्यांचे भाषण सुमारे दीड दोन तास चालले होते. केळकर बोलावयास उठले की त्यांचे प्रतिभाशाली व विनोदपूर्ण भाषण ऐकण्याकरितां कांही कांहीं बुद्धिप्रधान लोक आपल्या जागेवर येऊन बसत. सर डेनीस ब्रे हे

परराष्ट्रीय खात्याचे चिटणीस, त्याना असेब्लीत फारसे काम नसे, व ते असेब्लीत फारसे बसतहि नसत. पण तात्यासाहेबाच्या भाषणास ते आवर्जून बसत.

"व्हाइसरॉय साहेबाच्या बंगल्यावरील पेटीत Visiting Card टाकून कित्येक सभासद जेवणाचे आमंत्रण लावीत. त्याच्या या लघळपणाचा तात्यांना अतिशय राग येत असे. सरकारी सभासदाना आपल्या घरी जेवणाखाण्यास अगर चहापाण्याचे आदरातिथ्य करण्यांत त्यानी आपला वेळ कधी फुकट दवडला नाही. आपण होऊन कोणा साहेबाशी बोलावयास गेले व त्याच्या-पाशी हस्तांदोलन केले असे कधी झालेच नाही. असेब्लीचे काम सपले की सुटीचा दिवस ते केसरी-मराठा पत्राकडेच खर्च करीत. दिल्ली-सिमल्याची बातमी-पत्रे लिहीत, नवीन पुस्तकावर अभिप्राय देत, व असेब्लीच्या लायब्ररीतील नवीन पुस्तके आणून केसरीच्या वाचकाना त्यातील माहिती उपलब्ध करून देत. कौटि-लीय अर्थशास्त्र, छदोरचना, व 'शिवचरित्रप्रदीप' यावरील अभिप्राय, 'शारदेची आकाशवाणी' हे लेख, '१६ पेन्स १८ पेन्साचा वाद' वगैरे कित्येक लेख त्यानी सिमला-दिल्लीसच लिहिले. टिळकचरित्रापैकीहि काही काही भाग त्यानी तेथेच लिहिला. त्याचा उद्योगी स्वभाव त्याना बसूच देत नसे म्हटले तरी चालेल; पण इतकेहि करून दिल्ली व सिमला येथील स्थायिक महाराष्ट्रीय मंडळी-च्या हाकेला त्यानी रुकार दिला नाही असे कधी झाले नाही. दरवर्षी सिमल्यास जाताना महाराष्ट्र क्लबात गणपत्युत्सवाच्या निमित्ताने ते व्याख्यान देत व महाराष्ट्र मंडळातील स्नेहीमंडळीची विचारपूस करीत. रामदासनवमीचा उत्सव तर त्याचेच अध्यक्षतेखाली साजरा होई. महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूराकडील मनुष्य दिल्लीस कांही कामानिमित्त आला तर आपली दाद केळकराकडून लावून घेई. "तुमचेच काम करण्यास मी येथे बसलो आहे, मजकडून ते करून घ्या" असे ते मोठ्या उदार मनाने सांगत. रेल्वेच्या मजूर सघाची पुढारी मंडळी सघाचे अगर इतर कामानिमित्त १०—१५ दिवस केळकराकडे राहून गेली नाहीत असे कधी झाले नाही. पोस्ट, टेलिग्राफ व करन्सी खात्याचे नोकरवर्गातील तक्रारीचे वकील-पत्र त्यांनी सतत कायमचेच घेतले होते असे म्हणण्यास हरकत नाही. त्याचे-कडे दर वर्षी १००—१५० प्रश्न विचारण्याकरितां येत. त्यांत कमीजास्त दुरुस्ती करून ते विचारीत व मिळेल ती माहिती गोळा करून त्यांचेकडे पाठवीत. प्रत्यक्ष खात्याचे अधिकाऱ्याला भेटून योग्य असतील त्या अडचणी दूर करण्याची खबरदारी

घेत; पण योग्य कारणाशिवाय सरकारी अधिकाऱ्याची मनधरणी त्यांनी केली नाही. त्यांची भेट घेण्याला वशिले लावावे लागत नसत. अगर भेटण्याची वेळहि आधी पत्र लिहूनच ठरविली पाहिजे असे नसे अमक्यालाच भेटावयाचे तमक्यालाच भेटावयाचे नाही असे कधी झाले नाही. परप्रांतीय लोकानाहि ते महाराष्ट्रीयाप्रमाणेच वागवीत. इतर प्रांतातील पुढारीमंडळीप्रमाणे आपले आप्तेष्ट अगर जातबांधव यांची वर्णी सरकारी खात्यात लावण्याची खटपट त्यांनी कधी केली नाही. पण त्या बरोबरच, कोणाला अन्याय होत असेल, अगर लायक इसम असताना वशिल्याची उंट मध्ये येत असतील, तर त्याची दाद लावून घेण्यास त्यांनी कमी केले नाही. असेंब्लीत त्यांनी कोणत्या ठरावावर व बिलावर भाषणे केली व त्यात कोणत्या विशेष मुद्याचे विवेचन केले हे येथे सविस्तर सांगणे शक्य नाही पण त्यांच्या कारकीर्दीत त्यांनी निदान पांचसहा नवीन बिले आणली व त्यापैकी निदान एक बिल तरी मंजूर करून घेऊन, राजकीय शिक्षण-संस्थांना रजिस्ट्रेशन ॲक्टाखाली नोंदणीचा अधिकार प्राप्त करून दिला असे म्हणता येईल. तसेच हिंदुस्थानच्या भोंवती अफाट समुद्र असताना मिठाच्या बाबतीत लोकांना परावलंबी रहावे लागते ही गोष्ट सरकारास लज्जास्पद आहे अशा अर्थाचा ठराव बजेटमंजुरीचे वेळी काटाच्या रूपाने त्यांनी आणला होता व तो मंजूर झाला.

"असेंब्लीत अमुक वेळी हजर रहावे असा पक्षाध्यक्षाचा हुकूम झाला असताना त्यांनी आपली खाजगी गैरसोय व अडचण पुढे आणली नाही. असेंब्लीच्या बैठकीला सुरुवात झाल्यापासून ती संपेपर्यंत सहसा कांही निकडीच्या कामाखेरीज दिल्ली—सिमला सोडून ते गेलेच नाहीत. भाषणे कितीहि कंटाळवाणी होत असली व तासनतास बसून रहावे लागले तरी असेंब्लीची इमारत सोडून ते कधी गेले नाहीत. पक्षाच्या व्हिपप्रमाणे मत देण्यास ते हजर रहाण्याची विशेष खबरदारी घेत एकदा तर १९२८ साली प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळे त्यांना सिमल्याचे बैठकीस जाता आले नाही एवढा लांबचा त्रासदायक प्रवास करणे व सिमल्याच्या कुंद हवेत रहाणे प्रकृतीला हितावह नव्हते. बैठक संपण्यास अवघा एक आठवडाच अवकाश होता. तरी देखील लाला लजपतराय यांची तार आल्याबरोबर ते कशाची परवा न करता सिमल्यास उठून गेले, व सरकारच्या पब्लिक सेफ्टी बिलावर भाषण करून आपले विरुद्ध मत त्यांनी नोंदून घेतले. यावरून मतदारांच्या हिताकरिता ते किती जागत होते हें दिसून येते.

"याशिवाय असेब्लीच्या दप्तरी दाखल नाही तरी, असेब्लीचे सभासद अस-तांना त्यांनी चारदोन गोष्टीत जी कामगिरी केली तिचा थोडा उल्लेख करितो. त्या गोष्टी अशाः—

१९२३ साली गोरा शिपाई प्रायव्हेट वॉकर याची नेमबाजी वडगांवच्या अर्जुना नावाच्या शेतकऱ्यावर आली व तो प्राणास मुकला! प्रायव्हेट वॉकर याचे-वर खटला होऊन तो निर्दोषी ठरावयाचा तसा ठरला! पण पुढे केळकर असेब्लीत आल्यानंतर त्यानी मिलि सेक्रेटरीकडे या प्रश्नाची दाद मागण्यास सुरुवात केली प्रथम एका सभासदाकडून मुबई कायदे—कौन्सिलात अर्जुनाचे कुटुंबास नुकसानभरपाई देण्यात आली काय व नसेल तर ती देण्यात येईल काय अशी चौकशी केली. पण ठरल्याप्रमाणे मुबईसरकारने वाटाण्याच्या अक्षता लाविल्या व मिलिटरी-खात्याकडे बोट दाखवून बोळवण केली. केळकरानी या प्रश्नाचा छडा असेब्लीत लावला, व अर्जुनाचे कुटुबास नुकसानभरपाई देण्यात का येऊ नये अशी पृच्छा केली. फडणवीस खात्याचे चिटणीस मि. बर्डन यानी नुकसानभरपाई देता येत नाही व लष्करी खात्यात पैशाची टचाईच आहे असे उत्तर दिले! हे उत्तर केळकरानी असेब्लीत ऐकून घेतले. पण घरी आल्यावर बर्डन यांना खरमरीत पत्र लिहून विचारले, "अहो पैसा नाही म्हणता याचा अर्थ काय! निदान मी केसरीत न्यायमूर्तीचे निकालावर टीका केली व कोर्टाची बेअदबी झाली म्हणून माझेकडून ५००० रुपये सरकारने वसूल केले, ते तरी फुकाचे पैसे आहेत ना! मग तेच ५००० रुपये तरी त्या गरीब शेतकऱ्याच्या बायकापोराना द्याल की नाही!" तेव्हा कोठे सरकार जागे झाले व पुढे चौकशी होऊन १५०० रुपये अर्जुनाच्या कुटुबास नुकसानभरपाई मिळाली. हे काम होण्यास केवळ केळकराचाच उपयोग झाला हे सागणे नकोच.

"दुसरी एक बाब मसूर आश्रमातील गोव्यास गेलेल्या प्रचारकाची. गोव्यास शुद्धिकार्याच्या प्रसाराकरितां गेलेल्या प्रचारकानी हिंदु धर्माचा प्रचार केला व खेडीच्या खेडी हिंदु धर्मात परत येण्यास तयार झाली. साह-जिकच तेथील पाद्री लोकांत खळबळ झाली. गोवे सरकारने त्यांना कैद करून मारहाण केली व त्यांना बाहेर घालवून देण्यास सुरुवात केली. तेव्हा येथील हिंदु-धर्मीयांना सोसाव्या लागणाऱ्या छळाची हकीकत केळकरांच्या कानांवर आली. तेव्हा केळकरानी असेब्लीतील सभासदांच्या वतीने एक जाहीर पत्र पोर्तुगीज

गव्हर्नरकडे पाठविले, धर्मस्वातंत्र्याचा डंका बजाविणाऱ्या पोर्तुगीज सरकारने हिंदुधर्मीयांवर जुलूम-जबरदस्ती करणे इष्ट नाही असे निदर्शनास आणले, व झालेल्या अत्याचाराबद्दल निषेध करून दाद मागितली. पण एवढ्यावरच ते स्वस्थ बसले नाहीत. छळाची वार्ता ऐकल्यापासून त्याचे मन अस्थिर झाले होते व एक सारखी त्यांच्या मनाला तळमळ लागली होती त्या रात्री त्याना झोपहि लागली नव्हती म्हटल तरी चालेल. गोवा प्रातातील हिंदूचे मदतीकरितां त्यानी एक जाहीर पत्रक काढले, व दुसरे दिवशी उजाडताच घराबाहेर पडले ते तडक बिर्ला, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, श्रीनिवास आय्यगार, प. मालवीय व इतर सभासदाना भेटून सुमार १००० रुपये वर्गणीचे आंकडे त्यानी मिळविले. हिंदु महासभेच्या कार्यकारी मडळाकडेहि त्यांनी मदत मागितली व एकदर दोन हजार रुपये मिळवून दिले.

"तिसरी एक गोष्ट म्हणजे मिरतच्या कटातील आरोपींच्या बचावाकरिता लागणाऱ्या खर्चाच्या तरतुदीची. कटाचा खटला आज ३–३॥ वर्षे चालूच आहे. खटला भरण्यात आला तेव्हां एक 'डिफेन्स कमिटी' नेमण्यात आली होती. त्या कमिटीचे केळकर हे एक सभासद होते. कमिटीने ७–८ हजार रुपये जमविले व सुमार वर्ष–सहामहिन्याच्या खर्चाची तरतूदहि केली. केळकरानी महाराष्ट्रात जमलेली वर्गणी पूर्वीच पाठविली होती. पण पुढे पैशाची तरतूद कशी करता येईल यासबंधाने कमिटीची सभा झाली. बचाव करण्याकरितां १-२ वकील द्यावयाचे त्याचाच खर्च दरमहा हजारभर रुपये येईल असे ठरले. तेव्हां केळकरांनी सूचना माडली की, प्रत्येक प्राताने ५००० रुपये गोळा करून द्यावे. महाराष्ट्रातर्फे हे काम केळकरांनी आपल्या अगावर घेण्याचे कबूल केले. पण पुढे प. नेहरू, जवाहिरलाल नेहरू, डॉ. अन्सारी वगैरे मंडळी म्हणू लागली की, 'या खटल्याचे मदतीकरिता आमच्या प्रांतांत पैसा जमणार नाही. जमीनदार लोक म्हणजे कम्युनिस्ट लोकाचे शत्रु तेव्हां ते पैसे कसे देणार ?' प. मोतिलाल नेहरू म्हणाले, "अहो केळकर, परवांच कलकत्त्यास माझ्या एका स्नेह्याकडून सार्वजनिक कामाकरितां १००० रुपयाचा चेक घेऊन मी आलो. पण मी घरी पोचतो तोंच मला तार आली की मिरत कटाचे खटल्याकरिता याचा विनियोग करू नका." तेव्हां पैसे जमा होणार नाहीत असे दिसून आले. पं. जवाहिरलाल नेहरू यानी तर आरोपींनी बचाव करूच नये असा सल्ला दिला म्हणतात. डॉ. अन्सारी आधीच अग झाडून

मोकळे झाले होते. तेव्हा कमिटीची सभा भरल्याचा उपयोग फारसा झालाच नाही म्हटले तरी चालेल. पण केळकर असेंब्लीच्या कामाकरिता दिल्लीस गेले असताना, मुद्दाम मिरतेस जाऊन कॉमरेड डांगे, जोगळेकर, निमकर, घाटगे, अधिकारी, ठेंगडी, वगैरे मंडळीची भेट घेऊन त्यांची त्यांनी विचारपूस केली. तथापि बचावाला लागणारा सर्व खर्च करण्याची जबाबदारी आपणा एकट्यावर घेणे त्यांना अशक्यच होते. तेव्हा सर्व आरोपींनी मिळून सरकारकडेच डिफेन्स देण्यास मदत मागावी असा सल्ला केळकरांनी दिला. आणि महाराष्ट्रीय तरुण मंडळींना असे आश्वासन दिले की, तुम्हाला लागणारी इतर काही मदत मी देईन. डांगे वगैरे मंडळींना लागणारे सरकारी रिपोर्ट व इतर पुस्तके ही त्यांनी विकत घेऊन पाठवून दिली. त्यांच्या तक्रारींची दाद असेंब्लीत मागितली, व त्यांना थोडीफार पैशाची मदतहि त्यांनी केली. या तरुण लोकांचा स्वार्थत्याग व हाल पाहून, व त्यांना कम्युनिझमची मते स्वीकारल्याबद्दल होणारी शिक्षा याची कल्पना त्यांच्या मनात येऊन त्यांच्या मुखातून 'याच्या स्वार्थत्यागाची किंमत लोक करीत नाहीत व याची लोक दाद घेत नाहीत !' असे शब्द निघालेले प्रस्तुत लेखकाने अनेकदा ऐकले आहेत.''

---

## ( ३ ) स्थानिक स्वराज्यांतील कामकाज

कायदेकौन्सिलच्या खालोखाल मी स्थानिक स्वराज्य संस्थांच महत्त्व मानतो. कारण स्थानिक समाजाच्या धोरणासंबंधाने या संस्था प्रत्यक्ष कायदेकौन्सिलेच होत. अशा संस्था म्हटल्या म्हणजे ग्रामपंचायती, लोकलबोर्ड व म्युनिसिपालिट्या. मी खेडेगावाचा रहिवासी असतो तर ग्रामपंचायतीचे काम आवडीने केले असते. पुण्यासारख्या मोठ्या शहरात राहिल्यामुळे मला लोकलबोर्डातहि काम करण्याचा प्रसंग फारसा आला नाही. नाही म्हणावयाला मी काही थोडे दिवस हवेली तालुका बोर्डावर व काही दिवस पुणे जिल्हा लोकलबोर्डावर काम केले. तेथे माझी निवडणूक पुणे म्युनिसिपालिटीकडून झाली होती. परंतु तेव्हा तालुका लोकलबोर्डाला काम असे काहीच नसे. आणि जिल्हा लोकलबोर्डाची सूत्रे सर्वस्वी कलेक्टरच्या हाती असत. जिल्हा बोर्डाच्या सभा वर्षांतून फार तर दोनतीन होत. आणि त्यांतहि दहापाच प्रकरणे, कलेक्टरच्या हाताखालच्या एकाद्या

डेप्युटी कलेक्टरान किंवा चिटणिसानें तयार करून व त्याविषयी हवे ते ठरावहि लिहून, सभेत मांडलेली अशी बिनविवाद मंजूर होत. यामुळे मी तिकडे फारसे लक्ष घातले नाही. तालुक्यातून हिंडण्याचा मला सराव नव्हता व साधनहि नव्हते. पण पुणे शहरच्या म्युनिसिपालिटीत काम करण्याची संधि मला सुमारे पंचवीस वर्षे लाभली.

माझे मत असे आहे की, प्रत्येक सुशिक्षित नागरिकानें आपल्या सार्व-जनिक आयुष्यातील काही भाग स्थानिक स्वराज्य संस्थाच्या कामाला अवश्य दिला पाहिजे. हा कारभार हलका मानण्याची खोड काही सुशिक्षित लोकांत आढळून येते! म्युनिसिपल कारभाराला 'केरकचऱ्याचे स्वराज्य' असे म्हणून त्याची टवाळी करण्यात येते पण त्यांना हे कळत नाही की, स्थानिक स्वराज्याचा कारभार हाच कोणत्याहि मोठ्या ... च्या स्वराज्याचा पाया आहे. ग्रामपंचायती ह्या स्वराज्याच्या प्राथमिक शाळा, म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डे ही स्वराज्याची हायस्कूलें, आणि कायदेकौन्सिलें ही स्वराज्याची कॉलेजे किंवा युनिव्हर्सिटी, असा क्रम लावता येईल. खेडेगावातील लोकांना हायस्कूलचें शिक्षण लाभत नाही, तथापि त्यांना प्राथमिक शिक्षण मिळविण्याची संधि असते व ते चांगले मिळविल्यानें त्यांचे काम भागते. त्याचप्रमाणें खेडेगावचे लोक आणि ग्राम-पंचायती यांचा परस्पर संबंध मानावा. ग्रामपंचायती चांगल्या चालविल्या तर त्यातच खेडेगावच्या लोकांचा सुखदुःखपरामर्ष भागण्यासारखा असतो. लहान-सहान शहराचा कारभार म्युनिसिपालिट्यातून चालतो तेथेहि हाच न्याय लागू पडतो. लहानसहान गावातील बुद्धिमान अशाहि लोकांना कायदेकौन्सिलात शिरणे कठिण असते. तथापि त्यांनी आपल्या गावच्या म्युनिसिपालिट्यांचा कार-भार चांगला केला तर त्याचे श्रेय व फलश्रुति कायदेकौन्सिलात काम करण्या-इतकी ठरेल. आणि मोठमोठ्या शहरातील लोकांनी आपले लक्ष कायदेकौन्सिला-कडे लावल्यास ते त्यांना अनुरूपच ठरेल.

तथापि देशात एक फार मोठा वर्ग असा असतो की, त्याला स्वतःच्या निव्वळ स्वार्थी कामकाजापलीकडे काहीच दिसत नाही सार्वजनिक कार्य करणे हे आपले एक कर्तव्य आहे असे या वर्गातील लोक मानीत नाहीत. उलट ते फक्त एकच गोष्ट जाणतात ती म्हणजे सार्वजनिक कार्यात पडणाऱ्या लोकांची टवाळी किंवा नुसता हेवा करणे. ग्रामपंचायती किंवा स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या संबंधाने

खऱ्या आदर बुद्धीचे उद्गार काढणारे असे फारच थोडे समजस मार्मिक लोक मला आढळले. कांही त्यांत शिरले तर केवळ स्वार्थ साधण्याकरिता किंवा प्रतिष्ठेकरिता शिरतील. इतर काही लोक अशा सस्थांकडे ढुंकूनहि पहाणार नाहीत. उरलेले फारच थोडे लोक मला असे आढळले की, ज्यानी अशा सस्थातून काम करणे हे सार्व-जनिक कार्यातील एक अवश्य अग आहे असे मानिले. आपल्या गावची किंवा शहर-ची सुधारणा कशी होईल, नव्या सुखसोई कशा संपादिता येतील, आरोग्य, शिक्षण इत्यादि कशी वाढवितां येतील, याचा परिश्रमपूर्वक विचार व कारभार अशा थोड्या लोकानीच काय तो केला.

जे काम आपणाला करावयाचे नाही ते तुच्छ म्हणावयाचे अशी एक नेहमीची रीत काम न करणाराची असते. आणि चागल्या सुशिक्षित लोकात देखील जेव्हा ही प्रवृत्ति मी पाहतो तेव्हा मला अतिशय वाईट वाटते. "दिल्लीच स्वराज्य मिळत नाही म्हणून, ती सबब सागून, मुबईच स्वराज्य मिळवावयाचे नाही, करावयाचे नाही व नादवावयाचे नाही" अशी जी एक प्रवृत्ति मधल्या असहकारितेच्या काळात काही लोकानी, भ्रामक राष्ट्रभक्तीने किंवा ध्येयवादाने, अनुसरली तीच बहुजन समाज हा स्थानिक स्वराज्याच्या कारभारासबधाने अनुसरतो. मात्र ते कोणच्याहि ध्येयवादित्वामुळे नव्हे, किंवा स्वराज्याच्या तळमळीमुळे नव्हे. तर आळशीपणा निष्क्रियता या अवगुणांचा दोष लपविण्याला सोईची सबब म्हणून. स्थानिक-स्वराज्य सस्थाच्या कारभारातील स्वार्थ किंवा अधिकार याच्या मोहाला बळी पडून त्याना जन्मभर जळूसारखी चिकटून बसणारी माणसे जशी काही आढळतात, तशीच उलट बाजूला पण फार मोठ्या प्रमाणात असे लोक आढळतात की, आपली कामे लोकानी करावी, त्याच्या बुद्धिमत्तेचा फायदा आपण काही मोबदला न देता घ्यावा, आणि वरती त्याची आणि त्यांच्या कामाची अवहेलना कृतघ्नबुद्धीने करावी अशीच सवय त्याना जन्मभर लाग-लेली असते अशा वृत्तीचे लोक हिंदुस्थानात असख्य आहेत म्हणूनच स्वराज्या-च्या चळवळीत आपला देश मागे आहे.

एखादी हुल्लड कोठे निघाली म्हणजे मात्र तीत क्षणभर जाऊन मिसळावे, त्यामुळे येईल तो मोठेपणा मिळवावा, लोकांनी पेटविलेल्या मशालीभोवती आपले चेहेरे आयते ओवाळून ते उजळ करावे, असे करणारेच पुष्कळ भेटतात. पण सात्त्विक बुद्धीने आपल्या गांवचा कारभार आपण करणारे, नव्या सस्था बनवि-

ण्यांत बुद्धि खर्चणारे, आणि सार्वजनिक कामांत बिनमोबदल्याने सोसावी लागणारी झीज सोसणारे, विधायक कार्यकर्ते फार थोडे. पाश्चात्य देशांत स्थानिक संस्थांच्या कारभारांत लक्ष घालणे ही सार्वजनिक जीवनाची पहिली पायरी असे समजतात. तेथे शिक्षण घेऊन, त्या शिक्षणाच्या बळावर व अनुभवावर कायदेकौन्सिले किंवा पार्लमेंटे यात शिरून, प्रधानपदाची मुत्सद्देगिरीची कामे करण्याची ईर्षा व उमेद तिकडील लोक बाळगतात. आमच्याइकडे मात्र मोठे कार्यक्षेत्र मिळत नाही म्हणून धाकटे कार्यक्षेत्र लाथाडणे यातच राष्ट्रभक्ति साठविलेली आहे असे मानणारेच फार.

आता अशा संस्थातून निवडणुकीच्या द्वारे शिरण्याला लागणारा खर्च किंवा श्रम ज्याना करता येत नाहीत असे लोक मागे राहिल्यास, आणि तेच त्यांचे खरे कारण असल्यास, त्याना दोष देतां येत नाही परतु अशाहि लोकाना इतर रीतीने बाहेरून थोडेबहुत काम करता येते आणि आंतल्यांना सहाय्य देता येते. म्युनिसिपालिटीला 'खराट्याचे स्वराज्य' असे कोणी म्हटले म्हणजे माझ्या अगाचा तिळपापड होतो, व मीहि त्याला असे उत्तर देतो की, "बाबा, खराट्याची खरी योग्यता ओळखणारा विरळा. माझे तर मत असे आहे की, म्युनिसिपालिटयाच्या ऐपतीप्रमाणे सोन्यारुप्याची किंवा जडावाचीहि खराटयाची प्रतिमा करून ती प्रत्येक म्युनिसिपालिटीच्या प्रवेशद्वारावर लावावी इतकी योग्यता या खराट्याची आहे. स्वावलबनाच्या तत्त्वाचे उत्कृष्ट प्रतीक खराट्यासारखे दुसरे कोणतेच मिळणार नाही. मनुष्य स्वभावांतील गुणावगुणांची पहिली परीक्षा देण्याची शाळा स्थानिक स्वराज्याचा कारभार हीच होय. मनुष्य स्वभाव हा कोठेहि गेले तरी तोच असणार, यामुळे स्थानिक स्वराज्याचा कारभार यशस्वी होण्याला जे गुण लागतात तेच प्रधान मंडळाचा कारभार करण्याला लागतात. आणि स्थानिक स्वराज्याचा कारभार बिघडण्याला जे दुर्गुण खाली कारणीभूत होतात तेच वर प्रधानमंडळाचा कारभार बिघडण्यालाहि कारणीभूत होतात असे निखालस समजावे."

असो. स्थानिक स्वराज्यासबंधाने माझी मते अशी असल्यामुळे सार्वजनिक जीवनाच्या प्रारभीच मी माझे लक्ष तिकडे घातले. आणि आयुष्यातील सुमारे पचवीस वर्षे या कार्याला दिली. या कार्यात मी काही मोठ्या अलौकिक किंवा लोकोत्तर गोष्टी संपादिल्या, पराक्रम केले, क्रांत्या घडवून आणल्या, असे म्हणूं शकत

नाही. तथापि मी केलें तें सर्व काम निस्वार्थी बुद्धीने केले, व त्याचा मोबदला घेतला असलाच तर तो फक्त त्या कार्यांत मिळणाऱ्या बहुमानाच्या रूपाने घेतला.

प्रथम १८९८ साली मी पुणे म्युनिसिपालिटीत निवडून आलो तो लोकप्रियतेच्या लाटेवर. आणि पुढे ही लोकप्रियता अखड अगदी एकसारखी टिकली नसली, तरी सुमारे पचवीस वर्षांत मी कोणत्याहि निवडणुकीला उभा राहिलो आणि अयशस्वी ठरलो, असे झालेंच नाही. किंवा फार खालच्या नबरला निवडून आलों असेहि नाही. या बाबतींत मात्र मला मिळालेले यश असामान्य होतें असे मी म्हणू शकेन. आणि उलट पुण्याच्या नागरिकाना मीहि त्याचा मोबदला माझ्या वेळातला पुष्कळ वेळ खर्चून व परिश्रम करून दिला असे मला न्यायबुद्धीने म्हणता येईल. मी पुणें म्युनिसिपालिटीचा दोन वेळा अध्यक्ष होतो. या मुदतीत म्युनिसिपल कामावर खर्च झालेल्या माझ्या वेळाची सरासरी काढली तर ती, मी पुण्यात हजर असलेल्या दिवसात, रोज तीन किंवा चार तासहि भरेल.

असो. सहा वर्षांपूर्वी पुणें म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर रा. सदाशिव रामचंद्र भागवत यानी, शहर म्युनिसिपालिटीच्या कागदपत्राच्या आधाराने, म्युनिसिपालिटीतील माझ्या कामासबधाने जी माहिती एकत्र करून 'केळकर' ग्रथात दिली आहे तिचाच उपयोग येथे करावासा मला वाटतो. कारण कागदपत्रावरून केलेल्या टिपणाइतकी विश्वसनीय माहिती मला स्मरणानें देता येणार नाही रा. भागवत याची टिपणे खालीलप्रमाणे आहेतः—"तात्यासाहेब केळकर याची ह्या म्यु. पा. तील कामगिरी म्हणजे गेल्या पावशतकाचा पुणे म्यु. पा. चा विहगम दृष्टीने पाहिलेला कारभारच होय असे म्हणण्यास हरकत नाही. इ. स. १८५६ त स्थापन झालेल्या ह्या संस्थेचे केळकर हे इ. स. १८९८ साली सभासद म्हणून, टिळक किंवा राष्ट्रीय पक्षाच्या पाठिंब्याबरोबरच न. आ. द्रविड इत्यादि भिन्न मताच्याहि लोकाच्या सहानुभूतीनें निवडून आले. येतांच सॅनिटरी कमिटीत त्याची पोटनिवड झाली. नतर मॅनेजिंग कमिटी, प्रॉसिक्यूशन कमिटी, कबरस्थान कमिटी, नियामक कमिटी, जकात व ड्रेनेज कमिटी, इत्यादि कमिट्यांवर तात्यासाहेबाची निवड होत असे. म्हणजे लोकहिताच्या कसोटीस ते सर्वतोपरी उतरत. ह्यात त्याच्या अष्टपैलूपणाची व लोकप्रियतेची साक्ष पटते. ना. गोखले हे दोराबजी पदमजीनतर अध्यक्ष झाले. (इ. स. १९०२) त्या अवधीत केळकरांनी

स्मशान कमिटी, राज्यारोहण व्यवस्था कमिटी वगैरे कामी वेळोवेळी दाखल होऊन कामाचे निकाल लावलेले आहेत. इ. स. १९०३ ते १९०८ सालांत म्युझियम, प. वर्क्स, गव्हर्नराना मानपत्र, लॉ, एस्टॅब्लिशमेंट, नाटकगृह, ऑडिट इतक्या कमिट्या-वरील कामे त्यानी केली आहेत. शिवरामपंत परांपजपे व पंडसे हे सन १९०८ च्या निवडणुकीत यशस्वी झाले. पण त्यानी राजिनामे दिल्यामुळे केळकर व खाडिलकर हे उभे राहून निवडून आले. १९११ साली पुनः त्रैवार्षिक निवडणूक व्हावयाची. पण प्लेग, खानेसुमारीचे काम, ह्यामुळे सहा महिन्याची मुदत वाढून नंतर निवडणूक झाली. त्यात तात्यासाहेब निवडून येऊन उपाध्यक्ष झाले. (१९१२) ह्या वेळी म्यु. पा. च्या घटनेत फरक झाला. म्हणजे लोकनियुक्त २६ व सरकार नेमणुकीचे १३ [illegible]चे म्यु. पल बोर्ड बनले. ह्यांत सभासदाची संख्या वाढली पण प्रमाण [illegible] नाही. तात्यासाहेब उपाध्यक्ष होते तरी अंग मोडून काम करण्याचा त्याचा स्वभाव असल्यामुळे ते स्वतः प्रत्येक गोष्टीत लक्ष घालीत, व त्याचा उपयोग काम चोख व पायाशुद्ध होण्यात होई. ह्या मुदतीत म्यु. पा. ची आर्थिक परिस्थिति सुधारणा कमिटी, पडजागाच्या योजनेबाबत कमिटी, बालक मृत्युसंख्या चौकशी कमिटी, भाबुर्डागाव सुधारणा कमिटी इत्यादि प्रासंगिक व महत्त्वाच्या कमिट्यावर त्यानी कामे केली आहेत. इ. १९१८च्या निवडणुकीत श्री. केळकर हे निवडून आलेच, आणि शिवाय लोकनियुक्त अध्यक्ष होण्याचा पहिला मान मिळवून ही प्रथा पाडण्याचेहि श्रेय त्याजकडेच आले. नगराध्यक्षस्थानी म्हणून सुमारे एक वर्षभर केळकरानी काम केले. पुढे विलायतेस स्वराज्यसंघाचे शिष्टमंडळाबरोबर व कांग्रेस डेप्युटेशनचे सेक्रेटरी म्हणून जावे लागल्या कारणाने केळकरानी अध्यक्ष-पदाचा ( २३-४-१९ ) राजीनामा दिला. विलायतेहून परत आल्यावर म्यु. पा. ने लोकमान्य टिळकाबरोबर अध्यक्ष तात्यासाहेब केळकर यास मानपत्र दिले.

"इ. स. १९२१ च्या ऑक्टोबरात सभासद खा. ब. भुरुप्या जलग्या यांनी ना. प्रिन्स ऑफ वेल्स —यास ते ह्या वेळी हिंदुस्थानात आले होते व पुण्यास यावयाचे होते—मानपत्र देण्याबद्दलचा ठराव मांडला. तेव्हा १९१९ मधील जालियनवाला बागेतील ब्रि. सरकारकृत अमानुष कत्तल लोकांच्या ध्यानात होती व असहकारितेविरुद्ध चाललेली दडपशाही लोक अनुभवीत होते. तेव्हा श्री. तात्यासाहेब केळकरानी हे 'ध्यानात घेऊन मते द्यावीत' असे लोकमताचा वारा ओळखून सभासदांना बजाविले. त्याचा इष्ट तो परिणाम होऊन ठराव नापास झाला. येथे सांग-

ण्यासारखी गोष्ट की, ह्या सभेपूर्वी व नतर झालेल्या बऱ्याच सभांना केळकर हजर नसत. पण ह्या सभेला ते मुद्दाम आले. ह्याप्रमाणेच तात्विक स्वरूपाचे व विशेष गुतागुंतीचे प्रश्न म्यु. पा. पुढे विचारास येत त्या वेळी केळकर समक्ष हजर रहात, व देतां येईल ती योग्य मसलत देऊन लोकमताचा ब्रोज कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत. इ. स. १९२२ साली तात्यासाहेब अध्यक्ष निवडले गेले ते पुढे तीन वर्षे होते. ब्रावीसच्या जानेवारीत म्यु. पा. चे ५१ समासद हे सर्व लोकनियुक्त असावेत असा ठराव तात्यासाहेबानी आणला व त्यावर फारच मुद्देसूद भाषण केले. ह्या तीन वर्षात केळकराना पूर्वीप्रमाणे म्यु पा. कडे लक्ष देण्यास असेब्लीच्या कामामुळे हवा तेवढा वेळ मिळाला नाही. पण एक चिरस्मरणीय व पुण्यनगरीस भूषणभूत अशी थोरवीची गोष्ट ह्या मुदतीतच धैर्याने, धोरणाने व जबाबदारी घेऊन केळकरानी घडवून आणली. ती म्हणजे लोकमान्याचा सगमरवरी पुतळा मार्केटमध्ये उभा करण्याची. या वेळी म्यु. पा. विरूद्ध दोन दावे चाल होते. म्यु. सभासदातहि, पाहू सावकाशीने, दाव्याचा निकाल होऊ द्या, पैसे कोठे आहेत ! इत्यादि बोलणारे होते. ब्राह्मणब्राह्मणेतर पक्षवादित्वहि ह्यात अतर्भत होते. पण सरकार विरुद्ध लोकपक्ष अशा तात्त्विक झगड्यातील कसोटीचा हा निकाल होता. एका राष्ट्रवद्य विभूतीच्या चिरस्थायी स्मारकाचा हा एक प्रश्न होता. तेव्हां सरकारी फिर्यादीच्या बागुलबोवाला भिऊन पुतळा उभारण्याचे रहित करावे असे केळकरांना वाटेना. म्हणून तो प्रश्न सभेपुढे येतांच त्यानी १० हजार रुपये म्यु.च्या हवाली केले व ठराव पास करून घेतला. पुढे हे पैसे त्यास, म्हणजे केसरी-मराठ्याचे ट्रस्टी श्री. केळकर यांस, परत दिले गेले. पण ह्या प्रसगावरून केळकराची दूरदर्शीबुद्धि व तडफहि चांगली प्रतिबिंबित होते तात्यासाहेबांनी इ. १९२५ साली असेब्लीच्या कामामुळे वेळ मिळत नाही, असे म्हणून, व कामाच्या सोयीच्या दृष्टीने, म्यु. सभासद रहा रहा म्हणत असताहि राजिनामा दिला; व जवळ जवळ २५।२६ वर्षेपर्यत म्यु. कारभाराची जी सूत्रे केळकरानी चालविली होती ती सोडिली. म्यु. पा. तील केळकरांच्या कामासबधाने दोनतीन गोष्टी मुख्य आहेत. एक असेब्लीचा काल सोडला असतां, त्याची सभामधील हजेरी 'सर्व सभांस हजर' असे अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्टात नमूद केलेले आहे. दुसरे, म्यु. पा. तील एकहि बारिक मोठे अग असे सापडणार नाही की ज्यात केळकराचे तज्ज्ञत्व दिसून येत नाही. आणि तिसरे म्यु. पा. विषयीचा अभिमान. पुण म्यु. पा. ने, ते अधिकारनिवृत्त

झाले तेव्हां, केळकराचा यथोचित गौरव केला. म्हणजे आम्ही प्रारभी म्हटल्या-प्रमाणे, म्यु. पा. ने आपल्या गेल्या पाव शतकातील प्रत्यक्ष इतिहासकाराचाच सन्मान केला."

सन १९१९ साली मी विलायतेहून परत आलो तेव्हा पुणे शहर म्युनिसि-पालिटीने लो. टिळकाच्याबरोबर मलाहि मानपत्र दिले. तसेच तिने १९३२ साली माझ्या ६१ व्या वाढदिवसाला उद्देशून सत्कारपूर्वक माझे अभिनंदन केले. त्या-प्रसगी मी खालीलप्रमाण भाषण उत्तरादाखल केलेः—

"मी प्रथम सन १८९८ साली या म्यु. टीत निवडून आलो व तेव्हां-पासून मध्यंतरी २५ वर्षे माझा म्यु.शी संबंध होता. मी या म्युनिसिपालिटीचा अभिमानी आहे. आपल्या ताब्यात थोडी पण अनेकविध सत्ता आली आहे. पण सत्तेबरोबरच जबाबदारीहि आली आहे. एकमुखी सत्ता असली तर चुकीकरिता एकट्या व्यक्तीलाच नावे ठेवता येतात. परतु सर्व नागरिकाच्या हातात सत्ता आली म्हणजे मग नावे तरी कोणास ठेवाल? त्यामुळे आपण आपलीच निदा करतो हे लक्षात ठेवून निदा करा म्हणजे झाले असे मी लोकाना म्हणतो. मात्र आत्म-निंदेसारखे स्वतःच्या सुधारणेला दुसरे साधन नाही याच दृष्टीने म्यु. कडे पाहून मनुष्य वागेल तर त्याचा फायदाच होईल. रोज सकाळी उठल्यावर आपण आपली निदा करावी म्हणजे आपली सुधारणा होईल. मी म्यु. त सारासार विचाराने लोकहिताचे काम केले. आपण माझी आठवण ठेविली तशीच मीहि आपली ठेविली आहे. म्यु. कारभारात कुणी आमच्याजवळ जास्त हक्क मागतात म्हणून मला केव्हाच वाईट वाटत नाही. मी मि बेग याना असे सागतो की, पुणे शहरातल्याप्रमाणेच जर सर्व ठिकाणचे मुसलमान असतील तर भाडणे होणारच नाहीत. आम्हाला चीड का येते तर आमच्या देवावर व बायकावर हात टाकला जातो व कपटाने लोकाचे धर्मांतर केले जाते. याचे आम्हास वाईट वाटते. हे थांबेल तेव्हा तुम्ही आम्ही भाऊभाऊच आहो. तसेच ब्राह्मण-ब्राह्मणेतराबद्दल होय. राजकारणाबद्दल मला एवढेच सागावयाचे की, आपण अगणात विजेचा दिवा लावला तरी घरातला नदादीप कोणी मालवीत नाही. विवेकबुद्धीचा दीप हा कोणी मालवू नये. या दृष्टीने मी राजकारणात सदा सिद्ध आहे. मला ते नावडते नाही व वावडेहि नाही. परतु आजच्या स्थितीत माझ्यापेक्षा चागले लोक आहेत ते राजकारण करीत आहेत. माझ्याप्रमाणे लोक जेव्हा उघड उघड बोलू लागतील

तेव्हा पुनः माझे राजकारण मी चालू करीनच म्युनिसिपालिटी म्हणजे तो स्वय-पाक आहे. चांगला झाला तर आपणच खाऊ, बरे वाईट झाला तर नांवे कोणाला ठेवणार ? मी जबाबदारीचे भाषांतर स्वयंपाक असे करतो. सर्वांनी सामुदायिक काम करावे, व्यक्तिद्वेष टाळावा, अशी माझी सर्वांना विनंति आहे ”

लोकनियुक्त स्थानिक स्वराज्य संस्था हा समाजाच्या घमेंडखोरपणावर उत्तम उतारा असतो. म्युनिसिपालिटीचा कारभार सर्वस्वी लोकतंत्री असल्यावर त्या कारभाराची जी निंदा ती मतदार सर्वांची, अर्थात् त्या समाजाचीच निंदा नव्हे काय ? म्हणून म्यु कारभाराला कोणी नावे ठेवून हसू लागला म्हणजे मी त्याला म्हणतो, “ काय हो तुम्ही तुमचे तुम्हालाच हसता आहात, हे तुमच्या लक्षात येत नाहीसे दिसते. तुम्ही केले ते तुम्हीच भोगले पाहिजे. यात दुसऱ्या कोणाला नांव ठेवणार ? आरशात आपलेच प्रतिबिंब पडत आहे हे लक्षात न येतां, समोर दिसणारी आकृति कुरूप म्हणून तिला कोणी हसू लागला तर ती मूर्खपणाची कमालच नव्हे काय ! कसोटीवर घासलेले सोनं हिणकस ठरले तर त्याने सोनाराला दोष देण्यात काय अर्थ ? म्युनिसिपालिटी अपात्र तर समाज अपात्र. जशी खाण तशी माती ” मोठ्या स्वराज्याच्या गोष्टी बोलताना सरकार वरिष्ठ अधिकार आपणाला देत नाही अशी तक्रार आपण करितो ते एका अर्थाने बरोबर असले तरी, त्याने देऊन टाकलेल्या अधिकाराचे चीज सुराज्यरूपाने आपण कितपत करितो हे मधून मधून तरी पहावयास नको काय ?

दुसरे असे की, मोठे ध्येय डोळ्यापुढे ठेवल्याने तन्मयता पावलेल्या काही थोड्या व्यक्तींना, व्यवहारास आवश्यक असणाऱ्या लहानसहान दुय्यम गोष्टींकडे स्वतः लक्ष देण्यास फावत नसले तरी म्हणजे त्याना स्वतः त्यात पडावयाचे नसले तरी, परहस्ते त्यानी त्याची योग्य व्यवस्था लावून दिलीच पाहिजे. व्यव-हारात जातीने पडण्याची त्याना स्वतःला माफी असली तरी, व्यवहार चांगला न चालला तर त्याच्या दूषणाचे खापर त्यांच्याच डोक्यावर फुटणार हे उघड आहे. अर्थात् स्वतः स्थानिक स्वराज्याच्या खटाटोपात त्यास पडावयाचे नसले तरी त्यांना आपल्याला जबाबदार अशा दुय्यम लोकांचा त्यामध्ये प्रवेश करवून दिला पाहिजे व त्यांच्या कामावर देखरेख ठेवली पाहिजे. पण असे होण्याचे झाले तरी, स्थानिक स्वराज्याविषयी त्यानी यथाप्रमाण आदरबुद्धि दाखविली

पाहिजे. पहिल्या प्रतीचे काम करण्याची ज्याची योग्यता त्याने पहिल्या प्रतीचेच काम करावे; कारण तो स्वतः त्याच कामास अधिक लायक आहे. पण दुय्यम प्रतीचे काम अगर ते काम करणारा मनुष्य यासबधाने तुच्छताबुद्धि दर्शविणे हे गैरमुत्सद्दीपणाचे लक्षण होय. " मी मोठा, मी मोठे काम करीन. तूं धाकटा किंवा हलका, सबब तू धाकटे किंवा हलके काम कर " असे म्हणणाराचा किंवा दर्शविणाराचाहि मोठेपणा खोटा आहे असे बेलाशक समजावे मनुष्याचा दर्जा व कामाचे महत्त्व हे तिऱ्हाईतपणे पहाणाऱ्या जगाने ठरवावयाचे असते, व जग ते ठरविलहि. पण लोकनायक—मग तो कितीहि मोठा असो—त्याने नेहमी असेच म्हटले पाहिजे व वर्तनाने दर्शविले पाहिजे की सार्वजनिक काम करणारे हे सर्वच बधु असून, शिवाय त्यात लहानमोठा हा भेदभाव नाही. ते सर्व जुळे भाऊ आहेत. कामाची वाटणी झाली पाहिजे खरी, पण ती कार्यकर्त्यांच्या लहान-मोठेपणावर नाही, तर युक्तायुक्तता व औचित्य-अनौचित्य याच तत्त्वावर व्हावयाची असते. ज्याला जे काम उत्तम करता येईल ते त्याकडे द्यावयाचे हाच नियम प्रत्येक सार्वजनिक काम महत्त्वाचे आहे, व ते काम जो उत्तम करील तोच मनुष्य उत्तम. मग काम लहान असो वा मोठे असो त्याच्याशी आपल्यास काही करावयाचे नाही स्थानिक स्वराज्याला ' उकिरडा ' असे एकदा म्हटल्यावर मग त्या कामात तुम्ही पडा असे कोणास म्हणणे म्हणजे ती त्याची स्तुति नसून तू हलका व तुझ्याच लायकीचे ते काम अशी निंदा करण्यासारखेच आहे. अर्थात् एखाद्या पुढाऱ्यास स्थानिक स्वराज्याचे काम स्वतःस करावयाचे नसले तरी, त्याने त्या कामाबद्दल आपणास तिरस्कार वाटतो असे न दर्शविता उलट " काम महत्त्वाचे खरे, व त्यात पडण्याची माझी देखील फार इच्छा आहे पण दुसरे काम आगाऊच हाती असल्यामुळे या कामात पडण्यास मला वेळ मिळत नाही याबद्दल दिलगिरी वाटते " अशीच खरी भावना दर्शविली पाहिजे; व ती भावना खरी आहे असे त्याच्या वर्तनावरून दिसलेहि पाहिजे. तरच त्याचे अनुयायी स्वाभिमानबुद्धीने त्या कामात पडतील, एरवी पडणार नाहीत.

---

## ( ४ ) केसरीची ज्युबिली

ता. १ ऑगस्ट १९३० रोजी टिळकांच्या मृत्यूला दहा वर्षे झाली. या दहा वर्षांत केसरी ट्रस्टची व्यवस्था व केसरीचे संपादकत्व मजकडे होते. त्या दोनहि

कामाचे तेथपर्यंतचे इतिवृत्त एखाद्या निमित्ताने महाराष्ट्रापुढे ठेवणे हे त्या समयाला उचित ठरत होते. आणि ते करण्याचा मी एक असा मार्ग काढला की, त्यामुळे ही दोनहि कामे मी कशी काय केली याची कल्पना लोकाना एकदमच यावी. ही कल्पना अशी की, केसरीच्या शिल्की पैशांतून तीन लक्ष रुपये बाजूला काढून ठेऊन त्या रकमेचा सार्वजनिक राष्ट्रीय कामाना अखंड उपयोग व्हावा अशा योजनेचा एक ट्रस्ट करावा. या एका योजनेने ज्या अनेक गोष्टी आपोआपच सिद्ध होणार होत्या त्या अशा —१ टिळकांच्या मृत्युनतर, प्राणातिक संकटे असतांहि, मी केसरीसस्था दहा वर्षे टिकवू शकलो. २ ती मी नुसती कशी तरी जीव धरून जगविली असे नव्हे तर चागली दणदणीत रीतीने चालविली. ३ हा दणदणीतपणा केवळ मतप्रसारातच नव्हे तर आर्थिक सुस्थितीतहि होता. ४ दहा वर्षात मी केसरीची पूर्वीची सर्व देणी देऊन टाकून, केसरीविषयी योग्य त्या नव्या योजना व गरजा भागविण्याला अवश्य ते द्रव्य शिल्लक ठेऊन, शिवाय हातावेगळी करिता येईल अशी तीन लक्ष रुपयाची रक्कम केसरीच्या उत्पन्नांतून उरवू शकलो. ४ केसरीला कार्यक्षम ठेवताना त्यातच मितव्ययाचीहि दृष्टि मी सभाळली होती. ५ केसरीजवळच्या द्रव्यसाधनाचा उपयोग त्याला किंवा त्याच्या आश्रिताना श्रीमत करण्याचा नसून लोककार्याला राष्ट्र-कार्यालाच व्हावा हा टिळकाचा हेतु मी विसरलो नव्हतो. ६ आणि सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे, चिरोल केसच्यापायी टिळकाना झालेले कर्ज फेडण्याला जनतेने योग्य वेळी तीन लक्ष रुपये देऊन केसरी सस्था वाचविली त्या ऋणाची फेड करणे हे ‘ पितृकार्य ’ होय असे मी सदोदित मनात स्मरत होतो.

१९३१ च्या प्रारभी होणारी केसरीची ज्युबिली केवळ एखादा जादा अंक काढूनच साजरी न करता, त्या आधी एखादे भरीव सत्कार्य सिद्धीला नेऊनच करणे अधिक योग्य असे मनाशी ठरविल्यावर, या तीन लक्ष रुपयांचा ट्रस्ट-विनियोग कसा करावा याच्या विचारात मी अनेक दिवस घालविले, अनेक मित्राचा सल्ला घेतला, आणि शेवटी त्याचे जे स्वरूप ठरविले त्याची कल्पना येण्याकरिता त्या ट्रस्टडीडपैकी खालील उतारा देत आहेः—“ पर्स-फंडाची रक्कम परस्पर व अभा-वितपणे सार्वजनिक वर्गणीने जमा झाली नसती तर, न जाणो, कदाचित् आज-मितीलाहि केसरी-मराठा संस्थेला न फिटण्याइतक्या कर्जात रहावे लागले असते. आणि व्याजमुद्दलाच्या फेडीत दरसाल बहुतेक उत्पन्न घालवावे लागल्याने, केसरी-मराठा संस्थेची सांपत्तिक उपयुक्तता अगदीच कमी होऊन, सांपत्तिकदृष्ट्या ती

जगते किंवा मरते अशी स्थिति आली असती. टिळकांच्या डोळ्यापुढे ही स्थिति ढळढळीत दिसत असल्याने, १९२० मे महिन्यात 'पर्स-फंड' त्याना नजर करण्यांत आला त्या वेळी त्याना गहिवर आला; व त्याच्या तोंडून असे शब्द निघाले—( उतारा ) "या खटल्याच्या निमित्ताने माझ्या खिशात तीन लाख रुपये पडले अशी आपली समजूत करून घेऊन Mr. Tilak will chuckle over the three lacs असे एकाने (टाईम्सने) म्हटले आहे. पण Chuckle over करण्या-सारखी ही आनंदाची गोष्ट नाही. दुसऱ्या जवळून पैसे घेणे ही खरोखर दुःखाची गोष्ट आहे. या खटल्यात मी बुडालो तर माझ्या आयुष्यातली जी काय दोनचार वर्षे राहिली असतील त्यांत थोडी जास्त खटपट करून मी पैसे फेडीन अशा हिमतीने हा खटला केला होता. पण खर्चाचे पैसे मला देऊन ती वेळ, ते काम, व ती हिम्मत आपण विकत घेतली आहे. आता हे सारे आयुष्य मला तुमच्या-कडे लावले पाहिजे. त्यात मला 'चकल' होण्यासारखे काहीच नाही. तुम्हाला आयते गिऱ्हाईक सापडले आणि मीहि मला विकून घेतले. हा व्यवहार माझ्या स्मरणातून जाणे शक्य नाही. चिरोल केसमध्ये जय मिळून जरी माझा खर्च मला मिळाला असता तरीहि ते पैसे मी तुम्हालाच दिले असते." याचा अर्थ आम्ही ट्रस्टी असा समजतो, व लोकहि तेव्हा असाच समजले की, टिळ-कानी पर्स-फंडाची रक्कम स्वतःला व केसरीलाहि कर्जासारखी मानली. ते कर्ज फेडण्याची इच्छा त्यांच्या मनात होती, व ते हयात असते तर त्यांनी हरप्रयत्नाने ते फेडलेहि असते. परतु पुढे दोन सव्वादोन महिन्यातच त्याना मृत्यु आला व ती त्यांची इच्छा तशीच राहून गेली. म्हणून त्याची ती इच्छा शक्य तर आपण पूर्ण करावी हा हेतु, आम्हा उभयताकडे केसरी-मराठा सस्थेच्या ट्रस्टीचे काम आले तेव्हापासून, आम्ही नेहमी उराशी बाळगून ठेवला होता. रक्कम लहान नव्हती. आम्ही सस्थेच्या जबाबदारीला नवीन होतो. आणि देशातील परिस्थिति दिवसे-दिवस अधिकाधिक बिकट होत चालली होती. यामुळे आम्हाला या गोष्टीचा आजपर्यंत उघडपणे उच्चार करतां आला नाही. पण ती मनात दृढ ठेवून, सस्थेचा खर्च होईल तितका कमी ठेवून, काटकसर करून आम्ही पर्स-फडाची ही रक्कम हळूहळू जुळवून सग्रही ठेवण्याचा प्रयत्न चालविला होता. आणि या दहा वर्षांच्या अखेर आज तो हेतु सिद्धीस नेण्यासारखी स्थिति ईश्वरकृपेने व लो. टिळकांच्या आशीर्वादाने आम्हास प्राप्त झाली याबद्दल आनद वाटतो. लोकमान्य

टिळकांच्या आशीर्वादानेच केसरी-मराठा ही संस्था अनेक संकटे आली असता आजपर्यंत जिवंत राहून तिची आर्थिक स्थिति बरी टिकली. आणि येत्या जानेवारीत केसरी व मराठा या पत्राना पन्नास वर्षे पुरी होऊन त्याची 'ज्युबिली' करण्याचा प्रसंग येत आहे, अशा वेळेपूर्वी लो. टिळकाना वर सांगितल्याप्रमाणे आम्हास ऋणमुक्त करता आले तर त्यांच्या आत्म्याला बरे वाटेल, अशी आमची प्रामाणिक समजूत असल्याने तसे करणे हे आम्ही ट्रस्टी या नात्याने आमचे पवित्र कर्तव्य समजतो.

"या रकमेसंबंधाने लो. टिळकाना ऋणमुक्त करणे म्हणजे पर्सफंडाकरिता ज्या ज्या लोकानी वर्गणी दिली त्याच सर्वांना किंवा त्यांच्या वारसाना व्यक्तिशः ती परत देणे असा मात्र अर्थ आम्ही समजत नाही. कारण ज्यानी ती वर्गणी दिली त्यानी ती सार्वजनिक हितबुद्धि मनात ठेवूनच दिली. स्वतःला परत घेण्याच्या आशेने दिली नाही. शिवाय परत द्यावयाची म्हटली आणि ती देणाराची नांवनिशीवार यादी काही मिळाली, तरी पुष्कळ लोकानी आपले नाव प्रगट न करता गुप्त रूपानेच वर्गणी देऊन पावती-तिकिटे घेतली आहेत अर्थात् ही रकम परत देणे म्हणजे ती बाजूला काढून ठेवून तिचा सर्वस्वी सार्वजनिक हित-बुद्धीने उपयोग करणे हेच होय. आणि या रकमेचा अशा रीतीने कायमचा निश्चितपणे उपयोग आम्ही केला असे जाहीर झाल्यास, पर्सफंडाच्या सर्व वर्गणीदाराना लो. टिळक हे आपल्या ऋणातून मुक्त झाले असेच वाटेल यात शंका नाही. पर्सफंडाची वर्गणी जमली इतकी मोठी जमली नसती, तर केसरी-मराठा संस्था आजपावेतो सावकारी ऋणात बुडून राहिली असती ज्युबिली फंड सर्व खर्चून गेला असता. आज त्याच्या व्याजातून जो लोकोपयोग होतो तो झाला नसता. आणि लोकमान्यांच्या चिरंजीवाना जी खाजगी म्हणून मिळकत राहिली तीहि मुळीच राहिली नसती. अशा रीतीने तीन मार्गांनी तिच्यावर येणारी संकटे पर्सफंडाच्या द्वारे लोकानी उदारपणाने वाचविली. यामुळे आम्ही योजल्याप्रमाणे, लो. टिळकाना ऋणमुक्त करून तसेच पर्सफंडाची रकम सर्व आज ट्रस्ट करून वेगळी लोकोपयोगाकरिता काढून ठेवल्यास, व तिच्या व्याजातून लो. टिळकांच्या इच्छेनुरूप किंवा धोरणानुसार आणि मूळच्या ट्रस्ट-डीडमध्येंहि सांगितल्याप्रमाणे सालोमाल सत्कारणी व सार्वजनिक कार्यात तिचा खर्च करीत गेल्यास, ते लोकमान्य टिळकाचे एक मोठे कायमचे स्मारक होईल.

आणि ज्यांनी पर्सफंडाची वर्गणी दिली ते व इतर लोकहि अत्यंत संतुष्ट होतील असा आम्हास दृढ भरवसा वाटतो. मूळ ट्रस्टडीडमध्ये कलम (१) यांत खालील शब्द आहेत. " कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यानी केसरी व मराठा वर्तमानपत्रे हातांत घेतल्यापासून त्या पत्रांचे द्वारे राजकीय शिक्षणाचा प्रसार करून, लोकांत राजकीय हक्कांची जाणीव उत्पन्न करणे व राष्ट्रीय ध्येयास पोषक अशा इतर अनेक अंगांच्या सार्वजनिक चळवळी करणे, वगैरे सर्व कामे ज्या हेतूने केली तोच त्यांचा हेतु त्यांचे पश्चात निरंतर अबाधित अमलांत येण्याचे साधन म्हणून हे ट्रस्टडीड करण्यांत आले आहे." ही गोष्ट लक्षांत घेऊन वरील कलमांतील उद्देश तडीस नेण्याकरिता प्रस्तुतच्या या ट्रस्टडीडमधील योजना आम्ही केली आहे. आणि एवढ्याचकरितां ही सर्व विस्तृत हकीकत सांगून आमचा या ट्रस्टचा हेतुनिर्देश मुद्दाम केला आहे.

"वरील हेतुप्रमाणे आम्ही आज रोजी केसरी-मराठा संस्थेच्या शिलकेतून इष्टांकी रक्कम रुपये तीन लक्ष ( पर्स-फंडाच्या रकमेइतकी रक्कम व त्यांत संस्थेच्या पदरचे १३६४२८८८१० रुपये घालून निर्देश होण्याकरितां सोयीची म्हणजे तीन लक्ष करून ) वेगळी काढून त्या रकमेचा ट्रस्ट निर्माण करीत आहो व ती रक्कम स्वतंत्र अशी ठेवीत आहो. म्हणजे मूळच्या ट्रस्ट मिळकतीपैकी काहींची Appointment of property या ट्रस्टने करीत आहो.

"सदरहु रक्कम, या ट्रस्टडीडच्या पोटी, ट्रस्ट-फंड व कायमनिधी या स्वरूपानेच रहावयाची असून, त्यांतील मुद्दल न खर्चता फक्त व्याजांतून खाली लिहिल्याप्रमाणे वेळोवेळी खर्च होण्याचा आहे.

"या ट्रस्ट-फंडाची रक्कम रहाणे ती केसरी-मराठा संस्थेचे जे विद्यमान ट्रस्टी वेळोवेळी असतील त्या सर्वांनी मिळून संयुक्त रीतीने ती धारणा करून आपल्या ताब्यात ठेवावी. तिजवरील व्याज वगैरे वसूल करणे ते त्यांपैकी कोणाहि एकास अधिकारपत्र देऊन वसूल करण्यास हरकत नाही. परंतु ऐनजिनसी नोटांची देव-घेव, विक्री, अगर इतर कोणताहि व्यवहार विद्यमान सर्व ट्रस्टींच्या मिळून सह्यांनिशीच झाला पाहिजे.

"सदरहू टस्ट्र-फंडाचे पहिले ट्रस्टी केसरी-मराठा संस्थेचे विद्यमान ट्रस्टी म्हणून आम्ही खाली सही करणार हेच राहतील. आमच्या मागून आमच्या या

जागी मूळ ट्रस्टडीडमधील नियमानुसार, वेळोवेळी जे दुसरे कोणी ट्रस्टी येतील, किंवा त्यांचे जागी फिरून जे कोणी येतील ते आपोआप, म्हणजे नवीन मुद्दाम नेमणूक न करताहि ( Ex-officio ) या, ट्रस्ट मिळकतीचे ट्रस्टी नेमले गेले असे समजण्यात येईल.

"या ट्रस्ट–फंडाच्या मुद्दलावर सर सालांत जे व्याज प्रत्यक्ष वसूल होईल त्यांतील शेकडा पांच इतकी रक्कम त्या खात्यांतील कामगिरी ( कचेरी ) खर्चाकरितां बाजूस ठेवून कामगिरीखाती जमा करावी व कामगिरीसंबंधानें नेमण्यांत येणाऱ्या ऑफिस एस्टॅब्लिशमेंटवर व कामगिरीसंबंधानें जरूर त्या इतर साधनांवर खर्च करावी. आणि उरलेली पंचाण्णव टक्के रक्कम ही कार्योपयोगी समजून तीतून खर्च करावा.

"लो. टिळकांना पर्सफंडाची जी रक्कम अर्पण करण्यांत आली, तीत निरनिराळ्या प्रांतातील अनेक लोकांच्या देणग्या समाविष्ट होत्या. म्हणून हल्ली ती रक्कम जर ऋणविमोचनाकरिता सार्वजनिक खर्चासाठी परत द्यावयाची तर त्या त्या कोणाहि व्यक्तीला नव्हे पण जनतेला, या परत दिलेल्या रकमाचा काही तरी सामुदायिक रीतीने व राष्ट्रीय कार्याकरिता उपयोग होईल अशी व्यवस्था होणे इष्ट आहे. पूर्वीच्या हिशेबावरून पहाता पर्सफंडाच्या वर्गणीच्या रकमेपैकी उत्तर महाराष्ट्र, म्हणजे वऱ्हाड व नागपूर प्रांत, यांनी मिळून सुमारे नव्वद हजार रुपये वर्गणी दिली. अर्थात् पर्स-फंडाच्या परत फेडीचा जो उपयोग व्हावयाचा तो या प्रांतांना त्यांच्या मूळच्या देणगीच्या रकमेच्या प्रमाणाने करून देणे योग्य होय. म्हणून आम्ही असे ठरविले आहे की, परत कर्जफेडीच्या रकमेवरील वार्षिक व्याजांतून सुमारे एक लक्षावरील व्याज म्हणजे हल्लीच्या दराने रु. पांच हजार इतकी रक्कम नागपूर–वऱ्हाड प्रांतांच्या उपयोगाकरितां दरसाल मिळावी. तसेच कर्नाटक प्रांताच्या उपयोगाकरितां सुमारे पंचवीस हजारावरील व्याज म्हणजे दरसाल साडेबाराशे रुपयांची रक्कम दिली जावी. या रकमा आम्हा ट्रस्टीकडून घेऊन त्या आपल्या प्रांतात योग्य कामी खर्च करण्याकरितां नागपूर–वऱ्हाडकरिता एक व कर्नाटक प्रांताकरिता एक अशी कायमची अधिकारी मंडळे स्थापण्यांत आली पाहिजेत; मग ती ट्रस्टडीडने निर्माण होवोत किंवा रजिस्ट्रेशन ऑफ सोसायटीजच्या कायद्याच्या आधारे निर्माण होवोत."

ही योजना ता. १ ऑगस्ट १९३० रोजी टिळकस्मारक-मंदिराच्या पटांगणांत एका मोठ्या सभेत ज्या दिवशी जाहीर केली त्या दिवसाची आठवण मला पक्की आहे. ती अशी की, तीन लक्ष रुपयाच्या सार्वजनिक ट्रस्टची कल्पना जमलेल्या लोकाना विस्मयकारक वाटली. पण तिचे योग्य प्रकारे गुणग्रहण करण्यासारखी त्यांची मनःस्थिति नव्हती. १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळीच्या ऐन मध्यान्हीं हा प्रसंग घडला यामुळे, सभा लो. टिळकांच्या वार्षिक पुण्यस्मरणाची होती तरी प्रौढ विचारी समंजस असे फार थोडे लोक सभेला आले होते. कारण या सभेत कायदेभंगाचीच काही तरी उठावणी कदाचित् होईल अशी भीति त्याना वाटत असावी—पण जे आले ते बहुशः तरुण विद्यार्थी होते त्यांच्या डोळ्यांत कायदेभंगाची चळवळ भरलेली होती. ते स्वतः तुरुंगाबाहेर होते तरी तुरुंगात जाणे हाच मोठा पराक्रम, असे त्या वेळी त्याना वाटत होते! म्हणून ३ लाखाच्या ट्रस्टची जाहीर घोषणा ऐकली न ऐकली असे त्यानी केले. मात्र आता या ट्रस्टच्या पैशाच्या उपयोग करून घेण्याकरिता कोण कसे अर्ज करितो हे पाहिले म्हणजे त्या वेळच्या लोकांच्या उदासीनतेचे मला हसू येते!

असो; स. १९३१ च्या जानेवारी महिन्याच्या पहिल्या अंकाला केसरीच्या एकावन्नाव्या वाढदिवसाचे टिपण येत होते. तो अंक ज्युबिली अंक म्हणून काढण्याचे मी ठरविले आणि त्याप्रमाणे ता. ३ चा अंक नेहमीहून वेगळ्या आकाराचा सुमारे १०८ पानाचा काढला. तो सचित्र तर होताच. पण माहितीचे लेख, वर्णनात्मक लेख, चर्चात्मक लेख इत्यादि अंगानी मी तो इतका समृद्ध व चित्ताकर्षक केला की, सर्व हिंदुस्थानात अशा ज्युबिलीच्या निमित्ताने निघालेल्या कोणाहि वर्तमानपत्राच्या अंकाची तो बरोबरी करू शकता. त्याचा खपहि तसाच झाला. म्हणजे पसतीस हजार प्रती काढल्या तरी अपुऱ्या पडल्या, आणि कित्येक लोकाना (याविषयी एकदोन मौजेची उदाहरणे म्हणूनहि सांगतां येण्यासारखी आहेत) त्या अंकाची प्रत प्रयासाने किंवा वशिला लावून मिळवावी लागली असे घोडोपत सांगतात! या अंकाचा अभिमान मला वाटण्यासारखी एक विशेष गोष्ट अशी आहे की, हा सर्व अंकच्या अंक बहुशः माझ्या एकट्याच्या हातचा आहे. आणि त्यातले काही चर्चात्मक लेख तर अगदी माझ्या मनासारखे उतरले आहेत. या अंकात केसरी-मराठा संस्थेसंबंधी काहीहि माहिती किंवा बातमी देण्याचे मी शिल्लक ठेवले नाही. याचे कारण एक तर ही संस्था सार्व-

जनिक स्वरूपाची अशी एकदा मानल्यावर तिच्या संबंधी खासगी असे काहीच उरत नाहीं. दुसरे कारण असे की, टिळकाच्या या सस्थेसबंधी अनेकांगी बारीक सारीकहि माहिती कळावी, समजून घ्यावी अशी ऋणानुबंधी लोकाची इच्छा असते ती पुरी करावी असे मला वाटले. आणखीहि विशेष असे एक कारण हे की, या सस्थेचा वाद हायकोर्टापर्यंत जाऊन नुकताच निकालात निघून तिचे कायदेशीर अधिष्ठान पक्के झाले होते. आणि यापूर्वीच्या दहा वर्षांत मी व माझे सहकारी ट्रस्टी यांनी संस्थेचे सगोपन सवर्धन कशाप्रकारे केले हे जगापुढे खुलासेवार मांडण्याची ती एक आयती सधि आम्हाला मिळाली होती. ती घेऊन, १९०९ साली टिळकानी केलेल्या पहिल्या मृत्युपत्रापासून १९३० साली मुबई हायकोर्टाने दिलेल्या अखेर निकालापर्यंतचे, सर्व अस्सल कागदपत्र मी या अकात छापले. यामुळे टिळकाचे मुलगे व आम्ही ट्रस्टी याच्यातील वादावर लख्ख प्रकाश पडून सर्व शंकेखोराचे डोळे उघडले आणि प्रतिपक्षीयाची तोंडेहि बद पडली. या अकाचा व्याप विस्तार व महत्व लक्षात येण्याकरिता त्यातील विषयाची अनुक्रमणिकाच या खाली उतरून देतो म्हणजे झाले:—

१ केसरीचा एकावन्नावा वाढदिवस, २ केसरी-मराठा याची उत्पत्ति व वाढ, ३ केसरीचे पहिले प्रसिद्धीपत्रक, ४ केसरीतील मजकुराची माडणी, ५ केसरी-मराठ्यावरील आपत्तीचे प्रसग, ६ मराठा पत्राची हकीकत, ७ केसरी टाईप फाउण्डरी, ८ टिळक टाईपाच्या वर्णमालेचे नमुने, ९ केसरी ट्रस्टसबंधी काही कागदपत्र, १० लो. टिळकाचे पहिले मृत्युपत्र (१९०९), ११ लो. टिळकांचे दुसरे व अखेरचे मृत्युपत्र (१९१८), १२ केसरी-मराठा सस्थेचे ट्रस्टडीड, १३ लवादनामा न. १, १४ रिलीज डीड किंवा बेदावापत्र, १५ भाडेचिठी नं. १ व २, १६ पावती नं. १, २, ३, ४, १७ लवादनामा नं. २, १८ रामभाऊ टिळकाचा कोर्टास अर्ज (दाव्याचे काम न चालविण्याबाबत), १९ पुणे कोर्टाचा हुकूमनामा, २० केसरी ट्रस्टच्या दाव्यातील 'जजमेंट' (निकालाची कारणे), २१ केसरीची तीन लक्ष रुपयांची देणगी, २२ केसरीसंस्थेची सांपत्तिक स्थिति, २३ मतप्रसार, धर्मादाय, देणगी वगैरेची यादी, २४ लो. टिळकांच्या वारसांची सांपत्तिक स्थिति, २५ केसरी-मराठा सस्थेचा निर्लोभीपणा, २६ केसरी—मराठा सस्थेचे नियम, २७ एजन्सी खाते, २८ केसरी संस्थेचे अवांतर उद्योग, २९ गुजराथी केसरी, ३० केसरीची मालकी व संपा-

दकीय धोरण, ३१ केसरीचा व तुरुंगाचा ऋणानुबंध, ३२ संपादकीय शिक्षण, ३३ वर्तमानपत्र मीमांसा, ३४ विलायती वर्तमानपत्राचा इतिहास, ३५ हिंदी वर्तमानपत्राचा इतिहास, ३६ हिंदी अखबाराचे नमुने, ३७ हिंदुस्थानातील छापखाने व वर्तमानपत्रे, ३८ महाराष्ट्रातील वृत्तपत्रे, ३९ जुना ज्ञानप्रकाश, ४० बंगाल्यातील वर्तमानपत्रे, ४१ मद्रासचे पुढारी पत्र, ४२ वर्तमानपत्रे व देशी-विदेशी भाषा, ४३ इकडील वर्तमानपत्रे, ४४ प्रेस ॲक्टाची कामगिरी, ४५ हिंदी वर्तमानपत्रे व टपालखाते, ४६ चित्रमाला परिचय, ४७ केसरीसंबंधी काही आठवणी, ४८ उपसंहार व आभारप्रदर्शन.

ट्रस्टच्या दाव्याचा निकाल लागेपर्यंत आम्ही ट्रस्टींनी बाहेर काही बोलावयाचे नाही लिहावयाचे नाही अशी सक्त ताकीद आमच्या वकीलांनी आम्हाला दिल्याचे, व त्यामुळे आम्ही गुदमरून जाऊन जीव कंठीत राहिल्याचे, पूर्वी सांगितलेच आहे. पण सुदैवाने ज्युबिली अंक काढण्याच्या आधी हायकोर्टाचा निकाल लागल्याने आमच्या तोंडावरचे मुसके निघाले, आणि आमच्या तर्फेची सर्व हकीकत आणि तीहि प्रत्यक्ष कागदपत्राच्या द्वारे आम्हाला मुक्तकंठाने सांगतां आली. ट्रस्ट केला तेव्हां टिळकांच्या मुलांची सांपत्तिक स्थिति किती चांगली होती हे वाचून शेकडो लोकांना विस्मय वाटला. " ट्रस्टींनी या मुलांना छळण्याऐवजी खरोखर मुलांनीच या ट्रस्टींना छळले " या न्या. ब्रमफील्डच्या एका वाक्याने पूर्वीचे सर्व विपरीत समज उलथे पालथे झाले ! आणि आम्ही संस्थेची सर्व अंगे व्यवस्थित व सुसंघटित करून वरती तीन लक्ष रुपये शिल्लक टाकून टिळकांना निष्कर्जी केले हे वाचून आमच्या प्रतिपक्षीयांनाहि आमची कार्यक्षमता व कर्तव्यतत्परता मान्य करावी लागली.

असो. हा ज्युबिली अंक काढण्याचा एक हेतु केसरी-मराठा संस्थेला पन्नास वर्षांत लाभलेल्या मित्रऋणाचा कृतज्ञतापूर्वक उच्चार करावयाचाहि होता. तो उच्चार मी त्या ज्युबिली अंकात खालीलप्रमाणे केला आहे:—

"दुसरीहि एक गोष्ट आहे ती सांगण्याला संकोच करण्याचे कारण नाही. ती ही. कोणत्याहि संस्थेचा ज्युबिली समारंभ होण्याचा सुप्रसंग येण्याला, म्हणजे तिचे कार्य पन्नास वर्षे अखंड चालू राहण्याला किंवा त्याची सर्वांगीण प्रगति होण्याला, अनेक व्यक्तींची सेवा श्रम बुद्धि चातुर्य इत्यादि अनेक उपजत किंवा कर्मार्जित गुण

उपयोगी पडलेले असतात. तथापि अशा प्रसगी अशा व्यक्तीपैकी मृतांचा व तोहि त्यांच्या गुणाचाच उल्लेख कृतज्ञतापूर्वक करणे हे अधिक उचित ठरते. जित्याचा उल्लेख होऊच नये असे नाही ! पण त्याची वेळ येण्याला स्वाभाविक अवधि असते. निदान असे खरे की, त्यानाहि आपण सस्थेला उपयोगी पडलो असे थोडेबहुत वाट-ण्याला, किंबहुना थोडाबहुत तसा अभिमान बाळगण्यालाहि, योग्य कारण असले तरी त्यानी स्वतःविषयी एक शब्द उच्चारणेहि अनुचित आणि हास्यास्पद ठरेल. त्यांनी खरोखरच जर सस्थेची कांही सेवा केली असेल व लोकाना ती पटली असेल तर पुढची पिढी त्याची आठवण का न ठेवील ? किवा यथाप्रसग त्याच्या-सबधी योग्य ते दोन शब्द का न लिहील किवा का न बोलेल ! बुद्धीचा अमा मक्ता कोणीहि आपणा एकट्याकडेच आहे असे मानू नये. ती सर्व पिढ्याना सारखीच वाटलेली असते. तसेच एक पिढी जाऊन दुसरी तिच्या जागी आली म्हणजेच, डोळे दिपविणारा, सकुचित करणारा, किवा दृष्टिभ्रम उत्पन्न करणारा, फालतुक आडव्या तिडव्या ज्ञानकिरणाचा व विकारी किरणाचा दोषी प्रकाश लुप्त होतो, दुर्बिणीतून तेजोमय तारा किंवा शबलरूप ढग पहावा व त्याचे यथार्थ वर्णन बिनचुक करता यावे, त्याप्रमाणे पुढच्या पिढीच्या विवेचक बुद्धीना व न्यायी मनांना गत पिढीतील मृत व्यक्तीच्या गुणदोषाची चर्चा बिनचूक निदान निर्भयतेने करता येते. आम्ही तर असेच समजतो की, हा ज्युबिलीचा अक म्हणजे केसरीच्या हल्लीच्या सेवकांनी कृतज्ञताबुद्धीच्या खाद्यावरून पूर्वीच्या सेवकाना वहाण्याची पालखी आहे. अर्थात् पालखी वहावयाची ती वहाताना पालखी वहाणारा स्वतःच पालखीत बसू शकत नाही हे अगदी उघड आहे.

"ही दृष्टि चालवून आम्ही या अकात स्मृति-शेषभत झालेल्या अशाच केसरी कार्यकर्त्यांचे विशेष उल्लेख केले आहेत. यामुळे वाचकानी, हे उल्लेख अपूर्ण वाटल्यास, त्याबद्दल सहृदयतेने क्षमा करावी. विद्यमान सेवकाच्या, यथार्थ असेल अशाहि, स्तुतीला जर ही मर्यादा तर पूर्वी त्याच्याबरोबर केसरीची सेवा केलेल्या पण पुढे त्याच्याशी मतभेद झालेल्या, किंवा फुटून निघालेल्या, किंवा त्याचे प्रति-पक्षी होऊन त्याच्याशी झगडणाऱ्या इतर गृहस्थाची निंदात्मक किवा दोषात्मक चर्चा करून वाद उकरून काढण्याचे तर ज्युबिली अक हे स्थळ नव्हेच नव्हे. तात्पर्य, हा विशेष आनंदाचा प्रसग समजून, त्या आनदाच्या दुधांत मिठाचा खडा पडेल असले कोणतेहि उल्लेख किंवा विधाने करणे योग्य नव्हे अशा बुद्धीने,

आम्ही त्यापासून अलिप्त रहाण्याचा प्रयत्न केला आहे. केसरीसारख्या संस्थेचे चालकत्व टिळकांच्या पसंतीने त्यांच्याच हयातीत आमच्या हाती येणे, व ते त्यांच्यानंतर दहा वर्षे टिकविणे, या एका गोष्टीनेच आमच्या टीकाकारांच्या सर्व टीकांचा सहज परिहार होणारा आहे. मग जीभ व्यर्थ विटाळण्याचे काय कारण?

" सन १९२० सालापर्यंत, म्हणजे लो. टिळक हयात असेपर्यंत, त्यांचे मदतनीस किंवा सहकारी म्हणून ज्या इतर व्यक्तींनी केसरी–मराठा संस्थेचे कांही कार्य केले त्यांना त्याबद्दल स्वतंत्र श्रेय अर्थातच नाही. त्यांची स्फूर्ति स्वतंत्र नव्हती. पण त्यांच्या मृत्युनंतर दहा वर्षांनी, अजूनहि लो. टिळकांचीच स्मृति लोकांच्या मनांत असल्यामुळे, या दहा वर्षांतील चालकांकडून केसरीचे जे काही कार्य झाले असेल त्याबद्दलहि चालकांना फारसे श्रेय देतां येत नाही. सूर्य अस्ताला गेला व क्षितिजावर दिसतनासा झाला तरी जो संध्याप्रकाश उरतो, व ज्यांत माणसांना तोंडास तोंड दिसते, तो परिवर्तित असला तरी प्रकाश सूर्याचाच! त्याप्रमाणे लोकांना टिळकांच्या केसरीची अद्यापि तोंडओळख उरली असली तरी ती टिळकांच्या स्मरणाने परिवर्तित केलेल्या त्याच तेजामुळे होय. ही गोष्ट निश्चित असल्यामुळे गेल्या दहा वर्षांतील केसरी संबधाने स्वतः आम्ही जसे कांही बोलू शकत नाही, त्याप्रमाणेच इतरांनी त्याविषयी कांही बोलण्यालाहि ती एक मर्यादाच आहे."

यानंतर पांच महिन्यांनी 'केसरी प्रबोध' नांवाचा ग्रंथ भोपटकर, माटे, जोशी, प्रभृति मंडळींनी प्रसिद्ध केला. त्याच्याशी आम्हा ट्रस्टींचा काही संबंध नव्हता. तथापि या त्यांच्या मित्र-कार्याने आम्हाला सहाय्यच झाले. ते असे कीं, केसरी संस्थेचे मित्रमंडळ केवढे मोठे आहे हे त्यावरून दिसून आले.

या ग्रंथाची निर्मिति करण्यांत शंभराहून अधिक लेखकांनी आनंदाने भाग घेतला. पन्नास वर्षांतील केसरीचे अंक वाचून त्यांनी सुमारे वीस हजार इतकी टिपणे प्रकरणवारीने केली. आणि त्यांच्या आधाराने अनेक विषयावर केसरीने वेळोवेळी कोणते मत कसे प्रगट केले याची माहिती या लेखकांनी थोडक्यांत पण सुबोध अशी वाचकांस करून दिली. अशा रीतीने केसरीचे पन्नास वर्षांचे समालोचन झाले. या ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढावी लागली त्याचा फायदा घेऊन तो थोडा वाढविण्यांत आला. ग्रंथ मोठ्या आकाराच्या सुमारे नऊशे पानांचा आहे यावरून त्याची कल्पना होईल!

केसरीने वाचकांकरितां पन्नास वर्षात जे केले त्याची परत भेट देण्या-करितां हा ग्रथ तयार केला गेला. आणि तो त्या वर्षाच्या पाडव्याच्या दिवशी केसरी प्रबोध मडळाने टिळकस्मारक मंदिरात मोठा समारभ करून आम्हा ट्रस्टीना मौल्यवान अहेरासह अर्पण केला. ग्रथाचा स्वीकार करितांना मी खालील आशयाचे लहानसे भाषण केले:—

" आजचा समारभ अनेक दृष्टीनी अपूर्व व केसरी सस्थेला अभिमानास्पद असा आहे. सभा अभिनदन व सत्कार या तिहीत ' केसरी–प्रबोध ' नावाचा ग्रथ आम्हाला अर्पण केला तोच खरा अपूर्व आहे; व त्याच्या योगाने ह्या सत्काराचे औचित्य विशेष आहे

"केसरी सस्थेने १-१-१९३१ रोजी ज्युबिली अक प्रसिद्ध केला. त्याच वेळी केसरीच्या ५० वर्षाच्या समग्र लिखाणाचे आम्हीच पर्यालोचन करावे असे कित्ये-कानी सुचविले. पण ती सूचना आम्हाला अमलात आणता आली नाही. तथापि केसरीविषयी आजवरचा आमचा अनुभव असा आहे की, केसरीचे कोणतेहि न्यून पडले की ते केसरीचे स्नेही, ऋणानुबधी, हितचितक भरून काढतात. अशा समयोचित सहाय्याच्या अनुभवापैकीच आजचा आनददायक अनुभव आम्ही अनुभवीत आहो यात आश्चर्य काय ? त्यातूनहि आजच्या उचिततेचा विशेष हा की, ग्रथ वाचकातर्फे प्रसिद्ध होऊन सस्थेला परत भेट येत आहे !

"विद्यादानाप्रमाणे वाङ्मयदान हेहि सर्वश्रेष्ठ व श्रेयस्कर होय. आणि अशा दानाला शारदावरद श्रीमत् शकराचार्याचा हस्तस्पर्श झाल्याने त्याला विशेषच महत्त्व प्राप्त झाले आहे. आपण दिलेल्या ग्रथातील बोधानद उपभोगण्याला अर्था-तच अवधि आहे. वास्तविक कोणत्याहि वर्तमानपत्राच्या पन्नास वर्षातील लिखा-णाचा आढावा काढून कोण किती काढणार ? कितीहि वाचले, व त्यावरून कितीहि लिहिले, तरी ते थोडेच वाटावयाचे ! अशा ह्या अवीट कामाला देखील स्वाभा-विक मर्यादा पडतात. तथापि, आपल्या ग्रथानेहि समाधान न होता केसरी-सेवनाची भूक शिल्लक उरेल हे खरेच आहे. ग्रथात लेखकांनी आपली स्वतत्र मते सांगण्यापेक्षां केसरीची मते सागण्याचे बधन पाळल्यामुळे त्याचा उपयोग, स्वतःचे तेज पाडणाऱ्या सूर्यापेक्षां सूर्याचे तेज जगाला देणाऱ्या चंद्रासारखा सुखावह झाला. यांतच केसरीला थोरपणा देऊन स्वतःकडे लहानपणा घेतला हे लेखकांच्या विनयशीलतेला शोभण्यासारखेच आहे.

"केसरीचेच काय पण त्याच्या दर्जाच्या कोणत्याहि वर्तमानपत्राचे सपादक स्वतःला ' आम्ही ' म्हणून संबोधितात. ते एका दृष्टीने अहकारार्थी व इतर दृष्टीनी सत्यवचनार्थीच असते. कारण ह्यातील लेखन हे स्वरूपतःच परसापेक्ष असते. असो. To see the wood for the trees या म्हणीप्रमाणे कोणाहि व्यक्तीच्या नांवापेक्षा व्यक्तिनिरपेक्ष केसरी हे नावच लोकांना अधिक प्रिय आहे. मीहि हा सत्कार संस्थेकरितांच स्वीकारीत आहे. वाटेल तर सपादकवर्गाच्या अविभक्त कुटुबातर्फे म्हणून मी आजच्या ह्या सत्काराचा स्वीकार करतो. व केसरीकडन अशीच सेवा घडावी व असा मानाचा विडा मिळावा अशी परमेश्वराची प्रार्थना करतो."

ज्युबिली अक काढण्यापलीकडे आम्ही केसरी ज्युबिलीचा 'समारभ' असा स्वतः सस्थेमार्फत काही केला नाही. पुण्यातल्या आमच्या हितचिंतकानीहि त्याना करण्याचा होता तो जाहीर अभिनदनाचा समारभ पाडव्यापर्यंत पुढे ढकलला कारण लवकरच त्या मुहूर्ताला 'केसरी-प्रबोध' ग्रथाचे प्रकाशन व समर्पण व्हावयाचे ठरले होते आणि लागोपाठ दोन समारभ नकोत म्हणून १९३१च्या प्रारभी पुण्याच्या नागरिकातर्फे असा कोणनाच जाहीर समारभ झाला नाही. तथापि मुंबईकर मित्रमडळीना तशी काही सबब नव्हती. म्हणून त्यानी ता. ४ रोजी ब्लॅव्हॅटस्की लॉजमध्ये प्रचड समारभ केला. त्यात मुबई शहरातील दहा पांच संस्था सामील झाल्या होत्या. अध्यक्षस्थानी डॉ गोपाळराव देशमुख याची योजना करण्यात आली होती. समारभ कसा थाटदार झाला असेल याची कल्पना वाचकाना करता येईलच. तथापि सभेत झालेल्या मुख्य भाषणापैकी कांही कांही वाक्ये उद्धृत करितो त्यावरून केसरी-मराठ्याविषयी लोकमत काय होते हे लक्षांत येईल. उदाहरणार्थ, डॉ. देशमूख म्हणाले—"या पत्राचे सस्थापक भांडवलवाले नव्हते. सहा महाराष्ट्रीय गरीब तरुणानी आपल्या देशबांधवामध्ये कर्तव्यजागृति करून त्याची स्थिति सुधारण्याच्या उद्देशाने केसरी व मराठा वृत्तपत्रे काढली. दाक्षिणात्य लोक फक्त आरभशूर असतात अशी एक म्हण आहे. परंतु केसरी–मराठा पत्राना पन्नास वर्षे पुरी झाली असल्यामुळे या सस्थेने स्वतः पुरता तरी तो आरोप धुवून काढला आहे. दारिद्र्य व सरकारची कायमची गैरमर्जी असतांहि सस्थेने आपले सामर्थ्य वाढविले. लोकमान्य टिळक तीनदां कारागृहात गेले असता त्यांच्या गैरहजेरीत श्रीयुत केळकर व खाडिलकर यांनी केसरी पत्र सुदर चालविले ही गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे.

"केसरी हे विशेषतः राजकीय वृत्तपत्र आहे. हिंदुस्थानला स्वराज्य मिळविण्यास सिद्ध करणे हे त्या पत्राचे ध्येय आहे. आज हजारो लोक अहमहमिकेने तुरुगांत जातांना दिसतात. परंतु या नवस्फूर्तींचा उगम पन्नास वर्षांपूर्वी झाला हे विसरून चालणार नाही. ज्या वेळी तुरुगात जाणे हे मुष्किलीचे काम होते व कारावास खडतर होता त्या वेळी लोकमान्यांनी तुरुगवास पत्करून इतरांना तो धडा घालून दिला. केसरी निव्वळ राजकीय विषयाची चर्चा करतो व समाज सुधारणेच्या विरुद्ध आहे, असा आक्षेप काही लोक काढतात. परंतु तो खोटा आहे. ज्यानी समाजसुधारणा विषयक बिले आणली त्यापैकी बहुतेक लोक स्वराज्य सत्राचे सभासद व लोकमान्य टिळकाचे शिष्य व अनुयायी आहेत ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. जे लोक केसरी समाज-सुधारणेचा विरोधक आहे असे म्हणतात ते एक तर पूर्वग्रहदूषित तरी असले पाहिजेत, अगर त्याना केसरीची माहिती तरी नसावी. राजकारण व समाजसुधारणा या खेरीज अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, ज्योतिषशास्त्र यानाहि केसरीने चालना दिली आहे."

बॅ. जमनादास मेथा म्हणाले—

"गेल्या ५० वर्षांत जनतेमध्ये राष्ट्रीय भावना उद्दीपित करून स्वार्थत्याग व स्वावलंबन या गुणाचे स्वराज्याच्या चळवळीला पोषक असे राष्ट्रीय शिक्षण सतत देण्याची जी अपूर्व कामगिरी केसरी—मराठा संस्थेने केली तीबद्दल या सभेला आनंद होत आहे. तसेच केसरी—मराठा संस्थेने सर्व प्रकारच्या अडचणींच्या प्रसंगातून मार्ग काढून राष्ट्राचे नियोजित ध्येय जवळ आणण्याच्या दृष्टीने अखंड प्रचारकार्य केसरीने केले आहे. वाङ्मय संशोधन, सामाजिक सुधारणा व इतर राष्ट्रीय अंगे या बाबतीतहि संस्थेने जी प्रगति केली आहे तीबद्दल या सभेला अभिमान वाटत आहे, व त्याबद्दल ही सभा त्या संस्थेचे अभिनंदन करीत आहे. संस्थेचे ट्रस्टी न. चि. केळकर व धो. वा. विद्वांस यांनी संस्थापकाचे कार्य उत्कृष्टपणे चालविले व संस्थेचा अधिकच उत्कर्ष केला याबद्दल ही सभा त्यांचे अभिनंदन करते."

मि. बी. जी. हॉर्निमन म्हणाले—"देशीभाषांत निघणारी वृत्तपत्रे इंग्रजी वृत्तपत्रांपेक्षां कोणत्याहि दृष्टीने कमी योग्यतेची नाहीत. नीतिमत्तेच्या बाबतींत तर तीं इतरांपेक्षा खात्रीनेच अधिक उच्च दर्जाची आहेत. केसरी हा उच्च

दर्जाच्या वृत्तपत्राचा मासला आहे. केसरीबद्दल मला विशेष आदर वाटत आला आहे. मी सव्वीस वर्षापूर्वी हिंदुस्थानांत आलो. त्या वेळेपासून मधून मधून केसरीतील लेखाची भाषांतरे करवून घेऊन मी वाचीत असे. १९१३ साली मुंबईला 'क्रॉनिकल' पत्राचे संपादकत्व घेण्याकरिता आल्यावर तर मी इकडचे राजकारण समजाऊन घेण्याकरिता नियमाने केसरीचे भाषांतर करवून घेऊं लागलो. पश्चिम हिंदुस्थानातील राजकारणाची माहिती मला केसरीवरूनच झाली."

नामदार के. एम्. मुनशी, हल्लींचे मुंबई सरकारचे गृहमंत्रि, म्हणाले—

"केसरी व मराठा पत्राच्या द्वारे लोकमान्य टिळकानी हिंदुस्थानातील लोकांच्या विचारांना नवी दिशा लागली. आजच्या सर्व चळवळीचे श्रेय लोकमान्य टिळकाच्या व केसरी मराठा संस्थेच्या कार्याला आहे. स्वराज्य मिळवावयाचे असेल तर तेल्यातांबोळ्याना विश्वासांत घ्या हा महामंत्र केसरीने शिकविला त्याचा उपयोग आज आपण करीत आहोत लोकमान्यांनी जनतेच्या संघटनेकरिता गणेशोत्सव सुरू केला आज तो दक्षिणी लोकाइतकाच गुजराथ्यानाहि आपलासा वाटतो. केसरीच्या कार्याचे वैशिष्ट्य सामुदायिक संघटनेत आहे."

शेट जमनादास द्वारकादास म्हणाले—

"केसरीचे कार्य यशस्वी झाले याचे कारण केसरी जनतेची नाडी-परीक्षा उत्तम करीत आला. जनतेच्या आकांक्षाना कधीहि मागे खेचावयाचे नाही असे लोकमान्याचे धोरण होते. ब्रिटिश साम्राज्यात हिंदुस्थान राहील असे तुम्ही करा असा आग्रह पंधरा वर्षापूर्वी लोकमान्याजवळ महात्माजींनी धरला असता लोकमान्यांनी स्पष्टपणे सांगितले की, लोकानी अमुकच गोष्टीवर संतुष्ट राहावे असे मी कसे सांगणार ?"

प्रो. पां. वा. काणे, लो. टिळकाविषयीच्या कांही जुन्या गोष्टी सांगून म्हणाले, "आजपर्यंत केसरीने पुढील गोष्टी केलेल्या आहेत. (१) केसरीने राजकारणात अगर इतर कोणत्याही विषयाची चर्चा करतांना आपले अभय-ब्रीद कायम ठेवले. (२) सर्व हिंदुस्थान आपला आहे ही गोष्ट ध्यानात धरून आपले धोरण सर्वव्यापक ठेवले. (३) केसरी लोकांचा असल्यामुळे केसरीने लोकांचे म्हणणे पुढे मांडले. ह्या धोरणामुळेच केसरीला आजचे महत्त्व

प्राप्त झाले. हेच धोरण निरंतर चालवले जाऊन केसरीची निरंतर भरभराट व्हावी असे मी इच्छितो."

सॉलिसिटर खेर, सध्याचे मुंबईचे प्रधानमंत्रि, म्हणाले "आज जी राष्ट्रीयत्वाची लाट सर्वत्र उसळलेली दिसत आहे तिचा उगम केसरीने उत्पन्न केलेल्या नवचैतन्यात आहे. आज अक्रोडाची फळे खाताना त्या झाडाची आठवण झाल्याशिवाय कशी राहील? ज्या वृक्षावर ही फळे धरली तो वृक्ष उत्तरोत्तर अधिकाधिक वाढावा असे मी इच्छितो."

---

## (५) माझी ६१ व्या वर्षाची 'ज्युबिली'

ता. १ जानेवारी १९३१ रोजी केसरी मराठ्याला ५१ वे वर्ष लागले. त्याच्याच पुढच्या वर्षी आगस्टच्या २४ व्या तारखेला मला ६१ वे वर्ष लागले. हा प्रसंग साहजिकपणेच माझ्या अभिनंदनाचा होता. परंतु यावेळी महाराष्ट्राची परिस्थिति माझ्या मनाला स्वस्थता वाटण्यासारखी आणि अभिनंदन समारंभ मानवण्यासारखी नव्हती. कारण कांग्रेसने सुरू केलेली कायदेभंगाची दुसरी मोहीम सुरू असून शेकडो हजारो लोक तुरुंगात गेले होते. दंडपशाही सुरू होती. म्हणून या वाढदिवसाच्या समारंभाच्या योजनेची कल्पना उडतपणे माझ्या कानावर आली तेव्हा मी तिला निकराने मोडता घातला. शेवटी सांगितलेहि की "तुम्ही आपला हट्ट सोडला नाही व माझा हट्ट चालू दिला नाही तर मी ता. २४ च्या सुमारास बाहेर कोठे तरी न सांगता निघून जाईन मग तुम्ही काय कराल?" तेव्हां समारंभाचे चालक म्हणाले, "तुमच्या अभावी तुमची तसबीर मांडून, तिच्या रूपाने तुम्हीच उपस्थित आहा असे समजून, समारंभ पार पाडू. मग तुम्ही काय कराल?"

उभयतांचा उलट सुलट युक्तिवाद दोघांनाहि चांगला कळत नव्हता असे नाही. पण शेवटी एका गोष्टीला मी निरुत्तर झालो. समारंभाचे चालक मुख्यतः अण्णासाहेब भोपटकर व प्रो. माटे हे होते. ते प्रांजलपणाने म्हणाले "तुम्हांला एकसष्ठावे वर्ष यंदाच लागते हा योग कोणालाच टाळता येण्यासारखा नाही. बरे, कायदेभंगाची चळवळ ओसरल्यावर मग समारंभ करावा म्हटले तर फिरून तुमचे निंदक

म्हणणार " पण अजून असहकारितेची चळवळ कोठे संपली आहे ?" तात्पर्य, तुम्हाला जोपर्यंत प्रतिपक्षी आणि निंदक आहेत तोपर्यंत यापुढे केव्हांहि तुमच्या कोणत्याहि समारंभाला मुहूर्त लाभणारच नाही. मग आजचा समारंभ विनाकारण लांबवावा तरी किती ? व तो पुढे केव्हा केल्याने औचित्य साधत नाही त्याचे काय करावयाचे ? केवळ तुमच्या विनयबुद्धीचा प्रश्न असता तर आम्ही आमचा हट्ट सोडून दिला असता. पण तुम्हाला आमचे खरे हृद्गत सांगावयाचे तर ते हे की, तुमचे शत्रु व तुमचे मित्र यांच्यातल्या सामन्याचा व कसोटीचाच हा मोठा समर प्रसंग आहे. तो परस्पर व्हावयाचा आहे. तुमचा त्यांत प्रत्यक्ष संबंध कांही नाही. तुम्ही निमित्तमात्र आहां. तुम्हांला शत्रु किती कोण कसे आहेत हे जगाला या असहकारितेच्या चळवळीत दिसून आलेच आहे. पण तुमचे मित्र चहाते व हितचिंतक किती कोण कसे आहेत हे दिसून येण्याला प्रसंग नव्हता. तो आयता या एकसष्टाव्या वाढदिवसाच्या निमित्ताने येत आहे. तो आम्ही साधणारच. त्याच्या आड तुम्ही आल्यास आमचा फारच असंतोष व उत्साहभंग होईल. म्हणून असे करू नका. विनय हा चांगला खरा पण सार्वजनिक व्यक्तीने त्याचा अतिरेक करणे हेहि बरे नाही. आमच्या कल्पनेप्रमाणे अपेक्षेप्रमाणे हा समारंभ झाला म्हणजे मग तुम्हाला कळून येईल की, जसे शत्रु पुष्कळ आहेत तसे मित्रहि आहेत. अशा प्रसंगाला उचित असे तुमचे मनोगत, मानपत्राला उत्तर देतांना हवे त्या शब्दानी तुम्हाला प्रकट करतां येईल. त्यात तुम्ही आम्हाला नांवे ठेवली तरी चालेल. पण तुमचे प्रतिपक्षी हे आम्ही आमचेहि प्रतिपक्षी मानीत असल्याने त्यांच्याशी दोन हात करण्याची ही संधि काय वाटेल ते झाले तरी आम्ही साधणारच. या कामी व्यक्तीच्या गौरवापेक्षांहि तत्वाचा गौरव अधिक आहे हीच गोष्ट खरी आहे. आणि ती तुम्हाला पटावी."

माझ्या मित्राचे व शत्रूचे दोन हात व्हावयाचे याचा अर्थ भांडण मारामारी असा नव्हे. कारण हा प्रसंग, म्हणजे त्या निमित्त होणारा समारंभ, माझ्या शत्रूंना न आवडणारा असला तरी ते समारंभाच्या ठिकाणी प्रत्यक्ष येऊन तो उधळतील बिघडवितील बेरंग करतील अशी मला भीति नव्हती. दोन हात होणें याचा अर्थ या शत्रूची कोणत्याहि प्रकारची मदत न घेतां मागतां, खासगी रीतीनें अनुभवास येणाऱ्या त्याच्या विरोधालाहि न जुमानता समारंभ यशस्वी करणे. आणि त्याची छाप जनतेच्या डोळ्यांवर पाडून विरोधी मताला चूप बसायला

लावणे असा होता. आणि या अर्थाने पाहिले तर माझ्या मित्रांनी हा समारंभ त्याच्या स्वतःच्या, माझ्या, आणि माझ्या शत्रूंच्या अपेक्षेबाहेर यशस्वी व परिणाम-कारक करून दाखविला यांत मुळीच शंका नाही. माझ्या शत्रूंना विरोधाची आपली हौस अगदी खासगी कुजबुजणाऱ्या निंदेने भागवून घ्यावी लागली. किंबहुना त्यांतले कांहीजण तरी, एरवी वाईट दिसेल म्हणून, या समारंभात औपचारिक-रीत्या सामीलहि झाले इतर कांहींना मात्र, सार्वजनिक कारणे लावून, व्यक्ती या नात्याने ते करीत असलेल्या माझ्या द्वेषाची पडदपोशी करता आली.

असो. या समारंभाची हकीकत वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाली ती तशीच्या तशीच या खाली देतोः—

"साहित्यसम्राट श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांच्या ६१ व्या वाढदिव-साप्रीत्यर्थ त्यास 'केळकर' ग्रंथ समर्पण करण्याचा समारंभ, या समारंभासाठीच स्थापन झालेल्या केळकर-वाढदिवस-मंडळातर्फे ता. २४ रोजी पुणे टिळक स्मारक मंदिराच्या विस्तीर्ण पटांगणावर, वऱ्हाडचे पुढारी लोकनायक माधव रावजी अणे यांच्या अध्यक्षतेखाली, अपूर्व उत्साहाने व थाटाने साजरा करण्यात आला.

पुण्यात हा मुख्य समारंभ होण्यापूर्वी ता. २२ रोजी बृहन्महाराष्ट्रात अनेक ठिकाणी अनेक संस्थामार्फत श्री. केळकर यांचा जाहीर सत्कार करण्यात आला व त्यास ठिकठिकाणी मानपत्रे व अहेरहि अर्पण करण्यात आले होते. अशा रीतीने ठिकठिकाणी महाराष्ट्रांत केळकरांच्या आदराचे व प्रेमाचे अनेक प्रवाह उत्पन्न झाले त्या सर्वांचा मधुर संगम पुण्यास या समारंभाच्या निमित्ताने होऊन लोकगंगेला विलक्षण पूर आला.

बृहन्महाराष्ट्रातील, म्हणजे बेळगावपासून नागपूरपर्यंतच्या, सर्व भागांतून अनेक संस्थांचे प्रतिनिधि उपस्थित होते. महाराष्ट्रातील सर्व पक्षांच्या व जातींच्या सुसंस्कृत व निवडक अशा लोकांचे या निमित्ताने एक अपूर्व असे संमेलनच भरले होते असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. एकंदर या समारंभास पांच हजार स्त्रीपुरुषांचा समुदाय उपस्थित होता. समारंभास बरोबर सहा वाजता सुरुवात झाली.

संगीतनिपुण प्रो. विनायकराव पटवर्धन यांनी आपल्या मधुर स्वागतपर

गायनाने सभामंडपांत शांतता प्रस्थापित केल्यावर समारभाचे स्वागताध्यक्ष श्री. अण्णासाहेब भोपटकर याचे भाषण झाले. ते म्हणाले—

" दे. भ. तात्यासाहेब केळकर, लोकनायक बापूजी अणे व बंधुभगिनींनो,

केळकर-वाडदिवस-मडळाच्या निमत्रणाचा स्वीकार करून आपण सर्वजण या समारंभास उपस्थित झाला आहात, याबद्दल सदरहु मंडळाच्या तर्फेने मी आपले अत:करणपूर्वक स्वागत करतो व आपले आभार मानतो.

गेल्या शंभर वर्षांत बृहन्महाराष्ट्रात जे दहा-पाच थोर पुरुष निर्माण झाले, त्यामध्ये तात्यासाहेबाची गणना कोणालाहि करावी लागेल इतकी सरस व बहु-मोल सेवा त्यानी आपल्या राष्ट्राची, समाजाची, धर्माची व वाङ्मयाची केलेली आहे. त्या सेवेचे यथार्थ स्वरूप जाणण्याची ज्याची इच्छा असेल त्यानी आमचा ग्रंथ लक्षपूर्वक वाचल्यावाचून राहूं नये.

सध्याची देशस्थिति उत्सव-समारंभाला अनुकूल नाही, ती अनुकूल असती तर तात्यासाहेबाच्या योग्यतेस साजेल असा भरीव अहेर अर्पण करण्याची व इतर तऱ्हेने समारभ मोठ्या प्रमाणावर करून आपली कृतज्ञता व्यक्त करण्याची आमची फार इच्छा होती. पण समारभास अजिबात फाटा देण्याची तात्यासाहेबाची सूचना मात्र आम्हास मान्य होईना आणि त्याचे कारण हे की, परिस्थिति सर्वस्वी अनुकूल नसली तरी नित्य—नैमित्तिक लक्षात घेऊन तो तो प्रसग त्या त्या वेळी कांही प्रमाणात तरी साजरा करावाच लागतो व आपण करीतहि असतो.

"ह्याच न्यायाने तात्यासाहेबाच्या ६१ व्या वाढदिवसाचा हा प्रसग अगदीच सुना जाऊ देणे आम्हास प्रशस्त वाटेना. प्रसग काही कोणाकरिता थाबून रहात नाही, आणि ६१ व्या वाढदिवसासारखा प्रसग उपस्थित झाला असता, तात्या-साहेबाना आयुरारोग्य चिंतणे व त्याच्या अनेकविध कामगिरीबद्दल महाराष्ट्राला त्याच्याविषयी वाटणारा पूज्यभाव व्यक्त करणे, हे महाराष्ट्राचे केवळ कर्तव्य होय. कोणत्याहि सबबीवर ते टाळणे कृतघ्नपणाचे झाले असते. आणि म्हणूनच परिस्थिति कांहीशी अनुकूल नाही ही तात्यासाहेबांची नाजूक भावना दुखवूनहि काही आग्रह, काही भीड, व काही राग या उपायानी आम्ही त्यांची समति शेवटी मिळविलीच. आणि परिस्थिति ठीक असती तर तात्यासाहेबांच्या योग्यतेस

साजेल अशा जेवढ्या मोठ्या प्रमाणावर हा समारंभ केला असता, तेवढा नसला तरी, कांही प्रमाणात तरी तो करण्याचे आम्ही निश्चित केले."

यानंतर 'केळकर' ग्रंथाची रूपरेषा थोडक्यात सांगून ते पुढे म्हणाले—

"वाढदिवस-मंडळाने योजिल्याप्रमाणे हा ग्रंथ तयार करण्याच्या कामी अनेकांनी अनेक प्रकारचे सहाय्य मंडळास वेळोवेळी केले. त्याबद्दल मंडळातर्फे मी सर्वांचे साकल्याने मनःपूर्वक आभार मानतो.

"ग्रंथाची पहिली आवृत्ति तो प्रसिद्ध होण्यापूर्वीच म्हणजे ता. १४ ऑगस्टला खलास झाली. ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्याची पहिली आवृत्ति खलास व्हावी, व वाढती मागणी भागविण्यासाठी दुसरी आवृत्ति झपाट्याने काढण्याची गरज भासावी असा सुयोग, मला वाटते, मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रांत फारच थोड्या ग्रंथांच्या नशिबी आलेला असेल. किंबहुना, कोणत्याहि ग्रंथाच्या नशिबी आलेला नसेलहि. यावरून आमच्या ग्रंथाची योग्यता व दे. भ. तात्यासाहेब यांची लोकप्रियता कोणाच्याहि निदर्शनास आल्यावाचून रहाणार नाही.

"आमच्या मंडळाने ग्रंथाची योजना केली, कवींनी कविता रचिल्या, लेखकांनी लेख लिहिले, छापखानेवाल्यांनी छापण्याची सिद्धता केली, व ग्रंथ समारंभाने अर्पण करण्याचे बेत झाले; परंतु "सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः" या न्यायाने सर्व गोष्टी पार पाडण्यास पैशाची जरूरी होतीच. परंतु तात्यासाहेबांच्या भक्तांनी व अनुयायांनी मंडळास या बाबतीत अत्यंत उल्हासाने ताबडतोब निश्चित केले, हे कळविण्यास मला अतिशय आनंद वाटतो, व याबद्दल मी मंडळातर्फे त्या सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतो.

"अशा प्रकारे सर्व सिद्धता झाल्यावर या समारंभाच्या अध्यक्षस्थानी कोणाची योजना करावी, याबद्दल मंडळ विवचनेत असता लोकनायक बापूजी अणे यांची तुरुंगांतून सुटका झाल्याबद्दलची सुखवार्ता आम्ही वर्तमानपत्रांतून वाचली. त्याबरोबर आम्ही त्यांना या समारंभाचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति केली व ती त्यांनी लगेच मान्य केली. लोकमान्यांच्या एका पट्टशिष्याच्या ६१ व्या वाढदिवसाचा समारंभ त्यांच्या दुसऱ्या एका पट्टशिष्याच्या अध्यक्षतेखाली साजरा करणे, यापेक्षां दुसरा कोणता शुभ व उचित योगायोग असूं शकेल? तेव्हां जास्त

पाल्हाळ न करता मी अशी सूचना करतो की, या समारभाचे अध्यक्षस्थान माझे मित्र लोकनायक बापूजी अणे यानी स्वीकारावे, व समारभाचा कार्यक्रम पार पाडावा. ''

स्वागताध्यक्षांचे भाषण झाल्यानतर अध्यक्षाच्या सूचनेला नगरशेट रा. ब. हणमतराम रामनाथ यानी अनुमोदन दिले. त्याचप्रमाणे डॉ. वेलकर याचे अनुमोदनात्मक भाषण झाल्यावर श्री. बापूजी अणे यानी अध्यक्षस्थान स्वीकारले. त्यास पुष्पाहार समर्पण केल्यावर मडळाचे एक चिटणीस प्रो. रानडे यानी समारभास सहानुभूति दाखविण्यासाठी आलेले काही सदेश वाचून दाखविले.

एकदर सदेश सुमारे ५०० च्यावर व हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यांतूनहि आले होते. त्यात राजेरजवाडे, सरदार, जहागिरदार, वृत्तपत्रकार, अनेक वाङ्मय सस्था, राजकारणी सस्था व व्यक्तिशः अनेक गृहस्थ याचा समावेश झाला होता. सदेश निवेदनानतर श्री. अणे याचे भाषण झाले. ते म्हणाले—

'' सार्वजनिकरीत्या ज्याचा असा ६१ वा वाढदिवस साजरा झाला असे लोक फार थोडे आहेत. लो. टिळकाच्या नतर असा हा मोठा समारंभ हाच असावा असे मला वाटते. गुरु आणि शिष्य यांची ही जोडी खरोखरीच अनुरूप आहे. लोकमान्यांनी श्री. केळकर याची जी निवड केली ती खरोखरीच अनाठायी नव्हती ही गोष्ट लोकमान्य कारागृहात गेले त्यावेळी लोकाच्या ध्यानांत आपोआप आलीच. लोकमान्य मंडालेच्या तुरुंगातून सुटून आल्यावर श्री. केळकर याना हुरूप येऊन पुढची कामगिरी जोराने करतां आली. पण पुढे म्हणजे लोकमान्यानंतर सर्व बाजूनी आपत्ति आली असता श्री. केळकर यांनी जी कामगिरी केली ती स्वतःच्या कर्तबगारीवरच केली ही गोष्ट विसरून चालावयाचे नाही. त्यानी ' केसरी 'ची इभ्रत व इज्जत वाढवून लो. टिळकाचे वैशिष्टय राखले असे म्हणण्यास काहीच प्रत्यवाय नाही.

''लो. टिळकाचे पुष्कळ शिष्य आहेत. पण त्याच्या कार्याची जाणीव बाळगून त्याप्रमाणे कार्य करणारा एखादाच सापडतो. ही जाणीव केळकर याना उत्तम असल्याने त्यांनी लोकमान्यास अनृणी करून सोडले. त्यांनी त्यांचे सर्व लेख छापून प्रसिद्ध केले. तात्यासाहेबाच्या परिश्रमाचे दुसरे पूर्ण फल म्हणजे टिळकमंदिर होय. श्री. केळकर यानी आपले अनेक व्याप सभाळून या गोष्टी केल्या हे

लक्षांत ठेवण्यासारखे आहे. श्री. केळकर हे असेंब्लीत असताना त्यांची काम करण्याची पद्धति पहाण्याचा मला योग आला होता. त्यांची असेंब्लीमधील भाषणे वाचावीत म्हणजे आपली खात्री होईल की, ती कोणत्याहि कसलेल्या तज्ज्ञापेक्षां निःसशय भारदस्त व नवीन माहितीने पूर्ण अशीच आहेत. त्याच्या बुद्धीची ग्राहकता खरोखरीच विशाल आहे. असेंब्लीचे काम साभाळून त्याना आपल्या पत्राकरिता बातमीपत्रे व लेख लिहावे लागत ते निराळेच. यावरून वर जे विधान केले ते बरोबरच असल्याबद्दल आपली खात्री होईल.

"वाङ्मयात मोकळे मैदान सापडल्याने त्यानी दाखविलेली बुद्धिमत्ता खरोखरीच वाखाणण्यासारखी आहे. वाङ्मयाची सेवा करून त्यानी आपल्या मायभाषेची फारच मोठी सेवा केली. असा पुरुष खरोखरीच विरळा. कारण त्यांच्या तोडीचा एखादा तरी सापडेल काय, असा मी शोध घेऊ लागलो तेव्हा बगालमधील कै. रमेशचद्र दत्त याचे नाव माझ्या डोळ्यासमोर उभे राहिले. त्यानीहि श्री. केळकर याच्याप्रमाणे आपल्या भाषेची अनुपम सेवा केली. राजकारणात त्याचा दर्जा खरोखरीच श्रेष्ठ आहे. राजकारणात धक्केचपेटे सोसून वाङ्मयनिर्मिती करणे खरोखरीच दुर्घट काम आहे, व ते करण्याची जी कुशलता श्री. तात्यासाहेब यांनी दाखविली त्याबद्दल त्याना साहित्याचार्य असे म्हटल्यास वावगे होणार नाही. श्री. केळकर यानी आपल्या वाङ्मयाच्या द्वारे लोकांना नवीन वळण लावले यात शंका नाही.

"असो. एवंगुणविशिष्ट श्री. केळकर यांना राष्ट्रपुरोहित म्हटल्यास वावगे होणार नाही. जो स्वतः तीन वेदाचे अध्ययन करून त्याप्रमाणे आचरण ठेवतो तोच खरा राष्ट्रपुरोहित होय. अशा तऱ्हेचे पुरोहित ज्या राष्ट्रात निर्माण होतात त्यांतील सर्व समाजाचे बळ आपोआपच वृद्धिगत होते. पूर्वभूमिका न सोडता प्रगति करण्याची त्यांची शिकवण असते. जी गोष्ट श्री. केळकर याना पटली ती सर्व समाजाला पटेलच असा सर्व वर्गातील लोकाचा विश्वास आहे. राजकारणांत जरी कांही मतभेद असले तरी १९२० ते ३२ सालापर्यंतच्या इतिहासलेखकाला श्री. केळकर यांच्या नांवाचा प्रामुख्याने उल्लेख करावाच लागेल ही गोष्ट निर्विवाद आहे. श्री. केळकर यांना परमेश्वराने देशाची सेवा करण्यास उदंड आयुरारोग्य द्यावे अशी मी प्रार्थना करतो."

यानंतर उत्तरा दाखल मी भाषण केले ते असेः—

"वाढदिवस मंडळाचे अध्यक्ष, चालक, सभासद व या ठिकाणी उपस्थित झालेले सर्व सज्जन स्त्री-पुरुष !

"आज या ठिकाणी असा व एवढा मोठा समारंभ करून, आपण सर्वांनी माझ्या ६१व्या वर्षाचा वाढदिवस साजरा केला, याबद्दल मी आपणा सर्वांचा अत्यंत ऋणी आहे. त्यातूनहि प्रथमतः व मुख्यतः या मंडळाचेच आभार मला मानले पाहिजेत. कारण या समारंभाची मूळ कल्पना त्यांचीच असून ती सिद्धीस नेण्याला त्यांना किती श्रम पडले असतील, व किती खर्च आला असेल, याची कल्पना मला आहे, व ती आपणा सर्वांनाहि सहजच करता येईल. वास्तविक मजसंबंधी असला कोणताहि समारंभ होऊ नये असा प्रथमपासून माझा आग्रह होता. कोणाला हे मान्य म्हणणे विश्वसनीय वाटो वा न वाटो; परंतु आहे ती खरी गोष्ट मला जाहीर रीतीने सांगितलीच पाहिजे. मी सामान्यतः अगदी रुक्षच नसलो तरी फारसा भावनायुक्त असा मनुष्य नाही. आदर, स्नेह, प्रेम याची भावना व जाणीव ही असली तरी ती मनोमन साक्ष असावी, त्याचे दृश्य बाह्यस्वरूपात भडक रंगात दाखविलेच पाहिजे असे नाही, या मताचा मी आहे. आणि माझी खरी माहिती असणारे लोक सांगू शकतील की, माझ्या स्वभावाचा हा तऱ्हेवाईक-पणा किंवा विशेष, मी खाजगी व सार्वजनिक अशा दोनहि खात्यामध्ये शक्य तितका सारखाच अमलात आणण्याचा प्रयत्न यथाशक्ति करीत असतो. यामुळे या समारंभाची कल्पना गेल्या नोव्हेंबरात, म्हणजे देशांत पूर्ण शांतता नांदत असताहि, प्रथम निघाली तेव्हाहि तिला मी जोराचा विरोध केला; व गेल्या जानेवारीत कायदेभंगाची चळवळ सुरू झाली तेव्हां तर ती कल्पना रहित करविण्यात मला प्रथम प्रत्यक्ष यशहि आले असे वाटले. पण फिरून गेल्या एप्रिलपासून या कल्पनेचे पुनरुज्जीवन झाले; व शेवटी मित्रप्रेमाची सरशी होऊन, हे नाही ते नको असे मी म्हणत असताहि त्या कल्पनेला आजच्या या समारंभाचे स्वरूप आले. त्यांत अकृत्रिम मित्रप्रेमाचा विजय आहे, व भिडस्त स्वभावाचा पराजय आहे. पण हल्ली समाजाची स्थिति सर्वच बाजूंनी विपन्न अस-ल्यामुळे, असल्या समारंभाचा आनंद सेवन करतां येण्यासारखी आपली किंवा माझी कोणाचीहि मनःस्थिति नाही. म्हणून आज जरी हा समारंभ घडून येत आहे तरी आपणा सर्वांप्रमाणे माझेहि अंतःकरण या प्रसंगी थोडेबहुत उदासीन व व्यग्रच आहे !

"आता झालेली भाषणे आपण ऐकिलीच. त्यांत माझा इतका गुणगौरव केलेला आहे की, तो सर्व माझ्या हक्काचा माल असे मला मानतां किंवा स्वीकारता येत नाही तर त्यात मित्रप्रेमाचा काही पक्षपात व काही अतिशयोक्ति आहे असेच मला म्हणावे लागते उपचाराची भाषाच ठरून गेल्यासारखी असते, म्हणूनहि कदाचित् मानपत्रे लिहिणाराचा नाइलाज होत असेल. तथापि सुदैवाने मला लोकनिंदा व दूषणे ही स्तुतिबरोबर, निराळ्या रीतीने, इतकी ऐकावयास मिळतात की, आज येथे होणाऱ्या, किंबहुना या चार सहा दिवसात महाराष्ट्रात अनेक ठिकाणी होणाऱ्या, गुणगौरवाने मला मानसिक अजीर्ण होण्याचा संभव नाही. जेथे रोग तेथेच औषध, किंवा जेथे विष तेथेच त्याचा उतारा, निर्माण करण्याची सृष्टीची रीतच आहे. म्हणून ज्या कानानी स्तुति त्याच कानानी निंदा ऐकण्याचा सराव मला पडला आहे. आणि गणित हा जरी माझा अद्यापि कच्चा राहिलेला असा एक शिक्षणविषय आहे, तरी मनाच्या रेषेच्या वरच्या बाजूला स्तुतीच्या निरनिराळ्या रकमा, आणि तिच्या खाली निंदेच्या निरनिराळ्या रकमा, अशा मांडल्या गेल्या असता, अंशाचा छेदाशी जाईल तितका संक्षेप देऊन, व्यवहारी अपूर्णांकाचे हे उदाहरण मी बरोबर सोडवू शकतो, याविषयी अनेक तज्ज्ञ लोक साक्ष देऊ शकतील असा भरवसा मला वाटतो. पण अशा उदाहरणाच्या सर्वच उत्तरात, सगळाच संक्षेप न जाता, कांही थोडी बाकीहि केव्हां केव्हां उरू शकते, व प्रस्तुत उदाहरणांत ती मला अनुकूल अशी उरते असे मला वाटते. म्हणूनच आजच्या सारखे समारंभ, अप्रिय असले तरी ते केवळ दुःसह असे वाटत नाहीत. ते तसे दुःसह वाटण्याइतका खरोखरच मी नादान आहे असे माझे मन मला सांगते, तर मी या ठिकाणी आलोच नसतो. कित्येक वेळा निंदेविरुद्ध मनांत प्रतिक्रियाहि आपोआप घडते. आणि असेहि प्रसंग मनुष्यावर येऊ शकतात की, शेवटी विनयाला मर्यादा घालून, आत्मविश्वासाने आत्मसमर्थन करणे ही गोष्ट स्वतःसंबधानेहि अहंकाराची न ठरता केवळ न्यायाच्या आग्रहाची वाटावी, व ती त्याने करावी.

"कोणताहि मनुष्य घेतला तरी, मी वर दर्शविल्याप्रमाणे ते एक स्तुति व निंदा असे व्यवहारी अपूर्णांकाचे उदाहरणच असते. ईश्वराशिवाय पूर्ण गुण असे कोण असूं शकेल? म्हणून कोणीहि मनुष्य अपूर्णच पण सर्व साधारणरीत्या एकदरीने कसा काय आहे, हे ठरवूनच निर्वाह करून घ्यावा लागतो. आत्मनिरीक्षण करण्याची मला

नुसती पात्रताच नव्हे तर सवयहि आहे. म्हणून माझ्या स्वभावातले व माझ्या कामातले गुणदोष माझे मलाहि कळतात. तथापि इतक्या उतारवयात अंगी असलेले दोष हटकन टाळणे व नसलेले गुण हटकन अंगी आणणे, ही गोष्ट मला इतराप्रमाणेच दुःसाध्य वाटते. कसेहि असो, आपण माझा जो गौरव करीत आहा त्यामुळे मला धन्यता वाटते ही गोष्ट मी नाकबूल करीन तर मी ढोंगी ठरेन. म्हणून मी ती करीत नाही. माझ्या अगऱ्या ज्या गोष्टींना विशेष अनुलक्षून आपण माझा गौरव केला त्या तरी आपल्या या उत्तेजनाने वाढोत इतकीच माझी प्रार्थना आहे.

"असो. 'वाढदिवस' या शब्दाला प्रेमाच्या पण मनुष्यजातीच्या बाळपणाच्या आठवणी चिकटून रहात असल्यान, "६१ वा वाढदिवस" हा शब्दच मनाला मोठा मौजेचा वाटतो. मनुष्यसृष्टीच्या रंगभूमीला एकच दार आहे, आणि ते बाळपण हेच होय त्यातूनच त्या रंगभूमीवर अवतरणाऱ्या पात्रांनी प्रवेश व निर्गम करावे अशी ईश्वरी योजना दिसते. उतार वय हे दुसरे बाळपणच होय. "Age is second childhood" हे व्यर्थ शेक्सपीयर याचे वचन सुप्रसिद्ध आहे व ते खरेहि आहे. क्षुधा हटलेला, दात पडलेला, टक्कल पडलेला, पोक आलेला, काठीच्या आधाराशिवाय चालताना लटपटणारा, स्मृतिभ्रंश झालेला, चिरचिरा बनलेला वृद्ध मनुष्य, व एतद्गुण लहान मूल यात किती तरी साम्य आहे! व ही गोष्ट मनाला पटल्यामुळेच बहुधा बाळपणाप्रमाणे ६१ व्या वर्षापासून वाढदिवसाचे समारंभ पुन्हा करण्याची आठवण होत असावी. पण इतर रीतीने समारंभ साजरा झाला तरी, मुलाला घुसळखांबावर म्हणजे पाळण्यावर चढवितात तसा साठ वर्षांच्या मुलाला चढविता येत नाही म्हणून त्या प्रसंगी त्याची स्तुति करून त्याला लक्षणेने हरभऱ्याचे झाडावर चढविण्याची कल्पना सुचली असावी! पण नेणते मूल घुसळखांबावर चढताना खळखळ करते तसे म्हातारे होऊ घातलेले मूलहि हरभऱ्याच्या झाडावर चढण्याला खळखळ करते हा अनुभव या ठिकाणी आताच आपणाला आला आहे!

"नेणते बाळपण व जाणते बाळपण यातील अधिक चांगले कोणते हे ठरविणे कठिण आहे. लहान मूल हे या जगातल्या अनुभवासंबंधी नेणते असेल, पण त्याला तेव्हा पूर्वजन्माची आठवण असते म्हणतात. त्याच्या अकारण हास्य-

रुदनाची मीमासा तत्त्ववेत्ते वरील मोहक कल्पनेनेच करतात. माझ्या गतजन्माची आठवण मलाहि केव्हा असली तरी ती लहानपणीच नष्ट झाली. आता पुढच्या जन्माचीच "तयारी" करावयाला लागले पाहिजे. पण त्या जन्माविषयी झाले तरी अज्ञानच ! रेल्वेहून दूर असणाऱ्या गांवी जाण्याकरिता रेल्वेच्या प्रवासाला निघावे, आणि रेल्वे—गाइडच घरी विसरावे तशी या मधल्या जन्मात मनुष्यजीवाची स्थिति होते.

वर्डस्वर्थ मनुष्याच्या जीवयात्रेसबधाने म्हणतोः—

"Not in entire forgetfulness
Not in utter nakedness,
But trailing clouds of glory do we come
From God, Who is our home"

"एखाद्या अपघाताने स्मरणशक्ति नष्ट झालेला मनुष्य घरून निघतो, व फिरून त्याला घरीच परत जावयाचे असते, तथापि मार्ग सापडत नाही. तसाच हा प्रकार होय. मनुष्याच्या अगावरचे बाळलेणे, वर्डस्वर्थने म्हटल्याप्रमाणे, ईश्वराघरचेच घातलेले आहे. पण रस्त्यात चुकलेल्या मुलाच्या अगावरील केवळ दागिन्यांवरून त्याचे घर नक्की सांपडणे जसे हुशार पोलिसालाहि कठिण जाते, त्याप्रमाणे पुढच्या जन्मघराची ओळख या जन्मीच्या कृत्यावरून आपली आपणांसहि जेथे लागत नाही तेथे ती इतरांना कशी लागणार ? अर्थात् भूत व भविष्य दोहोंचा नाद सोडून विद्यमान स्थितीकडे पहावे यातच समाधान आहे.

"या दृष्टीने पहातां माझ्या आयुष्यात माझ्या हातून जेवढे कांही मला करतां आले त्याबद्दल मला समाधान वाटते. आत्मतुष्टि हा अहकाराचा एक प्रकार होऊं शकेल. पण माथावी कांगावखोर असतुष्टता दर्शविणे हा त्याच अहकाराचा एक अधिक मोठा व दोषास्पद प्रकार होऊ शकतो हे विसरतां येत नाही. "केले यापेक्षां अधिक करतां आले असते व अधिक करावयास पाहिजे होते" या शेऱ्यांतून कोणीहि सुटणार नाही. तसाच मीहि. तथापि आपण मजविषयीं काढलेल्या उद्गारांत योग्य नागपुरी आंकडा बाद घातला असता, "मी यथाशक्ति थोडेंबहुत

समाजसेवेचे काम केले" असली आत्मतुष्टतेची भावना त्या उद्‌गारावरून समर्थ-नीय ठरेल असे मला वाटते.

"यापुढे काय हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. त्यासबधानें मी इतकेच सागतो की आजवर चालल्याप्रमाणे पुढेहि होईल ते करीत रहावे अशी मनांतून इच्छा आहे. तथापि प्रकृतीला कमकुवतपणा आताच भासूं लागला आहे ही गोष्ट खोटी नाही. आपण मला आयुरारोग्य लाभावे अशी प्रार्थना मानपत्रांत केली ती ठीकच आहे. पण अशी प्रार्थना करण्याची वेळ आली हेच हा वाढदिवसाचा समारंभ सुचवीत नाही काय ? आजच्या समारंभाला टाइपरायटरवर वाजणाऱ्या घंटेची उपमा द्यावीशी वाटते. या घंटेचा नाद गोड असतो. घंटा वाजल्यावरहि चार दोन अक्षरे लिहिता येतील इतकी जागा असते. यामुळे आरंभिलेला शब्द तरी पुरा करू, सोडून द्यावा लागणार नाही, अशी खात्री असते. पण मात्र तो तेवढाच शब्द हो ! यामुळे मजुळ घटानादाला धोक्याचे—निदान सावधगिरीच्या सुचनेचे—स्वरूप येत. आजच्या ६१ व्या वाढदिवसाच्या समारंभातील भाषणे टाइपरायटरच्या घंटेसारखी नादमधुर होती. पण त्या भाषणांना माझ्या हातून झालेल्या पूर्व कामगिरीच्या समारोपाचे स्वरूप आहे, नूतन उपक्रमाच्या सूचनेचे स्वरूप नाही, असे मी समजतो. अर्थात् जो थोडा काळ यापुढे उरला त्याचा उपयोग कसा करावयाचा हा प्रश्न मनांत आल्यावर मन असे सागते की, आजवरची कामाची मामुली पद्धति, म्हणजे अनेक कार्ये एकाच वेळी करीत राहण्याची पद्धति सोडून द्यावी, व कोणते तरी एखादेच काम हाती घेऊन, मिळेल तो सर्व सवडीचा वेळ त्यावर खर्चून, तेच करावे म्हणजे ते कदाचित् मनासारखे होईल, आणि त्याला काही स्वरूपहि येईल. आजवर माझ्या मुख्य व्यवसायाशिवाय, लोकांच्या शिफारशी करणे, चिठ्याचपाट्या लिहून देणे, हस्तालिखिते वाचणे, अभिप्राय देणे, प्रस्तावना लिहिणे इत्यादि गोष्टी मी इतक्या केल्या, व निरनिराळ्या सस्थांच्या कार्यकारी मंडळांवरहि इतके काम केले की, आतां यापुढे ते मी सर्व सोडून दिले आहे, असे मी म्हटल्यास ते ऐकून निराश होणारे लोकहि मला क्षमाच करतील. केसरीचा संचालक म्हणून शक्य असेल ते राजकारण व लेखन, आणि अद्यापि लिहिण्याचे राहिलेले कांही वाङ्मयप्रकार, या दोन कामांवरच मिळेल तो वेळ व शक्ति यापुढे खर्च करावी अशी निदान इच्छा आहे. काय घडेल ते खरे !

"वाङ्मयप्रेम ही एक प्रकारची खोड आहे. 'जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही,' ही म्हण प्रसिद्धच आहे व ती मलाहि लागू पडणार असे वाटते. वर आत्मसंतुष्टतेचा जो मी उल्लेख केला त्यात मुख्य भाग वाङ्मयसेवेलाच उद्देशून होता. म्हणून शेवटी या समाधानाच्या उद्गाराला केवळ वाचेपेक्षां काही निराळ्या प्रकाराने स्वरूप द्यावे असे वाटते. तरी त्यासबधी दोन शब्द सांगून हे आभारप्रदर्शक भाषण मी पुरे करणार आहे. वाङ्मयसेवेचा आनद मला सर्व जन्मभर पुरला. प्रथम काही वर्षे माझी सेवा कसोटीला लावण्याकरिता की काय, वाङ्मयाने मला काहीच वेतन किंवा मुशाहिरा दिला नाही. या ३६ वर्षातील जवळजवळ निम्मा काळ तसा गेला असे म्हणता येईल. पण नोकराची सेवा पसंत पडल्यास नेहमीच ती निर्वेतन घेण्याचे निष्ठुर काम वाङ्मय झाले तरी का करील ? त्याप्रमाणे पुढील १९–२० वर्षात वाङ्मयाने मला सुमारे ३० हजार रुपयांची प्राप्ति करून दिली. अद्यापि महाराष्ट्रात केवळ वाङ्मयावर उपजीविका करणे अशक्य किंवा निदान फार कठिण आहे, म्हणून अशा स्थितीत झाला या द्रव्यलाभाबद्दल मला कृतज्ञताच वाटली पाहिजे. आता कृतज्ञता या शब्दाचा अर्थ एका विनोदी इंग्रज ग्रंथकाराने " अधिक लाभ होण्याची आकांक्षा " असा केला आहे हे खरे पण थट्टा म्हणून ही सोडून दिली तर, किंवा तो अर्थ अशतः बरोबर म्हणून स्वीकारला तरीहि, कृतज्ञता याचा अर्थ 'उपकाराची फेड' असाच बव्हशी केला पाहिजे. म्हणून वाङ्मयाच्या उपकाराची फेड करण्याची एक योजना मी केली आहे. ती अशी:— महाराष्ट्र युनिव्हर्सिटीची कल्पना अद्यापि असिद्ध आहे व अमूर्तहि आहे. तिला निश्चित रूप व प्रत्यक्ष सिद्धी केव्हां लाभेल ती लाभो. पण ती केव्हा तरी लाभेलच अशी माझी श्रद्धा आहे. दुर्दैवाने ती गोष्ट माझ्या हयातीत होऊ शकत नाही. तथापि ती होईल तेव्हां माझा कांही तरी पै पैसा तिच्याकारणी खर्च पडावा अशी माझी इच्छा आहे. महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन झाले म्हणजे मराठी भाषेचें दैन्य संपले, तिचे पांग फिटले, व सर्व प्रकारच्या उच्च संस्कृतीचा सुलभ लाभ तिच्याद्वारे समाजांतील सर्व वर्गांच्या लोकांना होण्याची कायम व्यवस्था झाली असे मी मानतो. म्हणून त्या भावी कार्याला मदत करण्याकरितां आज मी पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाचे पाच टक्के व्याजाचे आठ हजार रुपयाचे कर्ज-रोखे खरेदी केले; आणि वरील उद्देशाने त्या रकमेवर स्वत्व-निवृत्ति करून ती गोष्ट आज या ठिकाणी जाहीर करीत आहे.

थोडीशी अतिशयोक्ति आहे. पण तीतील यात्रेची मुख्य भूमिका खरी होती. म्हणूनच ती कविता मला सुचली. आणि सामानहि कदाचित् पूर्वी घेतले त्याचा चौथा हिस्साहि यापुढें कधी मी घेणार नाही. पण प्रवासाला निघाले म्हणजे इतरांप्रमाणे आमचे असेंच होते. उदाहरणार्थ १९०५साली आम्ही घरची सर्व मंडळी काशीयात्रेला गेलो तेव्हां इतके सामान घेतले की, जळगावांत वाटेत मुक्काम पडला तेव्हा त्यांतील निम्मे सामान गुड्स् करून पुण्यास परत पाठविल्याचे स्मरते. आणि पुढे एक प्रत्यय असा आला की, विठ्ठलभाई पटेल यांचे सामान बोट निघाल्यावर दहा दिवस पर्यंत कोठे हरवले किंवा गळाटले ते सापडेचना, तेव्हा माझ्यांतील बरेच सामान त्यांच्या उपयोगी पडले. याचा सरळ अर्थ हाच की, मी ते वाजवीहून जास्ती घेतले होते.

मनोरा बोटीत आम्ही फर्स्टक्लासचे तिकीट घेतले होते. पण आमच्या वांटणीला बोटच दुसऱ्या दर्जाची आली. तेव्हां तिचा पहिला क्लास कसा काय असेल याची कल्पना करावी. बोटीचे वजन मुळी चार हजार टन होते. म्हणजे आज विलायतेस जाणाऱ्या टपालबोटी तिच्या निदान चौपट किंवा पाचपट मोठ्या असतात. खोली अगदी लहान व तींत चार माणसे आणि चौघांचे सामान. पण दिवस उकाड्याचे यामुळे बराच वेळ उघड्या डेकवरच घालवावा लागे यामुळे खोलीत गर्दी फारशी वाटेनाशी झाली. सुदैवाने खालची दोन बाके मात्र पटेल व मी यांना मिळाली आणि शास्त्री व कुंझरू याना वरची बाकें मिळाली. ते थट्टेने म्हणत 'आम्ही नेमस्त पण पहा तुम्हा जहालांच्या डोक्यावर चढलो आहों की नाही'? त्यावर आम्ही उत्तर देत असूं की 'वर खाली हा भेद आम्ही मानीतच नाही. फक्त इंग्रजीतील म्हणीप्रमाणे मवाळ जहाल झालो तरी We are in the Same Boat इतकेच मानतो. पण आमच्या खालच्या जागा घ्या व वरच्या द्या असे म्हणाल तर तेवढे मात्र होणार नाही !'' आम्हा चौघांपैकी बोट सर्वांत कमी लागली अशी मला व सर्वांत अधिक लागली अशी कुझरू यांना. त्यामुळे आम्हा सर्वांपेक्षां त्यांना खोलीचा आश्रय अधिक करावा लागे. मी मूळचा बूटपाटलोणवाला नाही. निव्वळ शाकाहारी व टेबलावर कांट्या चमच्यानें जेवण्याची संवय नाही. शिवाय सर्वांत मोठी गोष्ट ही की मी अत्यंत सकोची वृत्तीचा. यामुळे कांही नड आली तर बोटीच्या अधिकाऱ्याला ती सांगणार कसा व दुरुस्त करून घेणार कसा ? अशा संशयामुळे मी मनांत चूर असावयाचा. पण तशी नड फारशी आली नाही.

आगबोटीवर वास्तवीकपणे सर्व खाजगी मामला. आणि प्रवास म्हटला म्हणजे मनुष्य त्यांत अगदी काटेकोरपद्धतीने वागत नसतो. पण आधी साहेब लोकांच्या अंगांत शिस्त मुरलेली. त्यांना दिवसांतून दोनदां हजामत करण्याची, चार वेळ कपडे बदलण्याची, जेवतांखातांहि शिष्टाचार सभाळण्याची संवय झालेली. आणि त्यांतूनहि इंग्रजाच्या हातून चूक झाली तर त्याला हंसणार कोण ? आणि मला तर असे वाटे की माझी चूक होईल तेव्हा कोणी उघड हसणार नाही पण मनातले मनांत मला गावढळ म्हणून आपापसांत माझी चेष्टा करीत असतील. या भयामुळे बोटीच्या डेकवर हिंडताना काय किंवा टेबलावर जेवावयास बसतांना काय मी आपला ठराविक एकच पोशाख म्हणजे लांब कोट व पगडी घालून बावळटासारखा कोठेहि हिंडत व बसत असे ! आणि न जाणो याच गोष्टीची कदाचित् इतर लोक मनातून चेष्टाहि करीत असतील. पोषाखाप्रमाणेच मितभाषण हे आपल्या हातचे, म्हणून डेकवर हिंडतांना इतर हिंदी लोकांप्रमाणे मी कोणाच्या ओळखी करीत नसे; किंवा भाषण प्रसंगांत स्वतःला गुंतवून घेत नसे. ईझीचेअर टाकून तटस्थ वृत्तीने समुद्राकडे पहात बसावे किंवा लायब्ररीच्या खोलीत जाऊन तेथे पुस्तक घेऊन पंख्याखाली वाचीत बसावे. खरी अडचण जेवणाखाण्याची यावयाची. पण सुदैवाने त्याची व्यवस्था बरी झाली. म्हणजे आम्हां पांचसहा हिंदी गृहस्थांपुरती एका बाजूला मोठ्या टेबलाशेजारीच दोन लहान टेबले मांडून व्यवस्था करण्यात आली होती. आम्ही शाकाहारी असे सांगितल्यामुळे तशी सोय झाली. पण आम्हापैकी खरे शाकाहारी मी, कुझरू, व शास्त्री इतकेच ठरलो. विठ्ठलभाई पटेल पूर्वी दोन वर्षे विलायतेत राहून बॅरिस्टर होऊन आले होते, तेव्हांच त्यांचा शाकाहार सपला होता. दिवाण व्ही. पी. माधवराव हे मात्र पक्के शाकाहारी असतील अशी समजूत होती. पण पुढे ते हळुहळू वाढपी लोकांना 'सब चीज लाव' असें म्हणून मांसाहारी पदार्थहि मागून घेऊन खाऊं लागले ! मांसाहारी मनुष्य शेजारी बसून जेवतांना पाहून प्रथम थोडी किळस वाटते. पण टेबलावरील जेवणाखाण्याचे सामान अतिशय स्वच्छ असल्यामुळे, आणि ताज्या मांसाहाराला सहसा घाण येत नाही यामुळे, ती अडचण फारशी वाटली नाही. आणि मी याच आनदांत गर्क होतो की, मुख्य मोठ्या टेबलावर माझें पान धरून ठेवले असते तर डावी किंवा उजवी कोणीकडे तरी बोटीच्या रिवाजा-प्रमाणें एखादा साहेब किंवा मडम बसावयाची, व त्यांच्याशी पोकळ शिष्टाचा-

शाच्या गोष्टी, हवापाण्याच्या गोष्टी बोलतांना माझा जीव टेकीला यावयाचा, तो प्रसंग टळला. या मांसभक्षकांच्या मेळयांत शाकाहारी माणसाचे हाल होत असतील अशी आपली व लोकांची प्रथम कल्पना असते परंतु अनुभवाने ती खोटी ठरली. केवळ शाकाहारी अन्नपदार्थ मागितले तर कांही मिळतातच, परतु फळें मेवा इ० एरवींचेच पदार्थ इतके पुष्कळ असतात की ते पुरून उरतात. पहाटे अंथरुणांत तोंड धुण्याच्या पाण्याबरोबर चहा फिरून बाहेर टेबलावर बसून घेण्याची चहा कॉफी सुमारे एकतासाने. त्या चहाबरोबर वाटोळे पावाचे तुकडे मिळतात. नऊ वाजता छोटी हजेरी. तीत हवे तितके दूध घातलेली खीर, एखाद दुसरी भाजी, रोटी, फळे इतके पदार्थ असतात. दुपारी १ वाजतांचा फराळ व रात्री ७॥ वाजताचे जेवण यांत पदार्थ पुष्कळच असतात. भातहि असतो व एखादे पक्वान्नहि असते. तात्पर्य शाकाहाऱ्याला देखील अधाशीपणाने अजीर्ण होण्याइतकी व्यवस्था असते. यामुळे घराहून जे खाण्याचे पदार्थ मी डब्यांतून भरून घेतले होते ते लंडनला घरी जाऊन स्वस्थ झाल्यावर प्रथम उघडले. प्रवासाच्या पहिल्या दोनतीन दिवसांतच माझे सगळे बस्तान नीट बसले. बोटीवरील पिण्याचे पाणी चांगले असे व लागेल तेव्हां सोडालिंबू जिंजर वगैरे मिळत. आणि बर्फहि हवा तितका मिळे.

आगबोटीवर युरोपियन लोक सर्व प्रकारचे खेळ खेळून आपला जीव फार रमवितात पण आमच्या हिंदी लोकांपैकी फार थोड्यांना त्यांच्या करमणुकीत यथायोग्य रीतीने सामील होता येते. याचे एक कारण त्यांचा समाज स्त्रीपुरुष मिश्रित असाच कोणत्याहि कामांत असतो; आणि आगबोटीवर हिंदी पुरुष पुष्कळ, स्त्रिया फार थोड्या व सकुचित वृत्तीच्या. यामुळे दोन्ही समाज करमणूक करण्याच्या मनोवृत्तीत तुल्यबल नसतात. सभाषणाचा विषय राजकारणाचा असला तर आम्हां हिंदी लोकांतच जहाल व नेमस्त हा भेद जाणवे. मग युरोपियन लोकांशीं या विषयावर आमचे संभाषण कसे व्हावे ? मिळून कितीहि सरमिसळ वागण्याचा आव आणला तरी त्यांचा गट वेगळा आमचा गट वेगळा असेच शेवटी घडे. ते आमच्याकडे पहात आम्ही त्यांच्याकडे पाहू. खांद्याला खांदा लावून हिंडतहि होतों; पण भाषणव्यवहार कमी. इतर कांही साधन हाताशी नसले तर वृद्ध असेहि युरोपियन लगोऱ्या खेळत. आणि त्यांच्या लहान मुली आपल्या आकाराच्या बाहुल्या हातगाडीत घालून त्यांना आजीबाईप्रमाणें उघड्या डेकवर खेळवीत.

ता. १ मे रोजी आम्हां सर्व उतारूना बोट बुड् लागली तर जीव कसा बचावावा याची कवाईत शिकविण्यांत आली. कापडी कॉर्कचे भोपळे होतेच पण शिवाय ताबड-तोब लहान होडगी खाली सोडून त्यात कसे उतरावे हेहि दाखविण्यांत आले. ही कवाइत शिकविण्याचे कारण असे की अजूनहि समुद्रांत कोठे कोठे तुरते सुरुंग फिरत असून आगबोटीना धोका होण्याचा सभव असे. ता. ३ ते ६ मे हे दिवस मोठे कष्टाचे गेले. वारा अगदी पडला, समुद्र एखाद्या डबक्यासारखा शात दिसे, पण उष्मा इतका बेसुमार झाला की अगांतून दहा-वीस शेर पाणी गेले असेल. त्यांतून दोन दिवस मला सडकून ताप आला व यामुळेहि घाम इतका फुटला की पेटी-तील बहुतेक सदरे घामाने भिजवून घ्यावे लागले. व धुवावयास परटाकडे द्यावे लागले. या दोन दिवसांत मी जेवण वर्ज्य केले आणि दूध व बर्फ येवढ्या-वर राहिलो.

जातांना आमच्या बोटीने एडन बंदर घेतले नाही. तांबड्या समुद्रांतून जातांना किनाऱ्या जवळून कोकणच्या बोटी जातात तसा देखावा दिसला. मात्र कोकण किनाऱ्याला झाडी फार आणि अरबस्तान म्हणजे ओसाड अरण्य. ता. ८ मे रोजी जहाजावर एक मुसलमान मुलगा तापाने वारला तेव्हां समुद्रात प्रेत सोडण्याचा विधी उतारूलोकासमक्ष यथाविधि करण्यात आला. सुएझ बंदरांत गेल्याबरोबर सर्वच गोष्टीत फरक पडला. हे बंदर मुंबई बदरापेक्षां लहान वाटले. कांही वेळ थांबून आमच्या बोटीने कालव्यांत प्रवेश केला. त्यांत किनाऱ्यापासून १०।१५ हातांचे अंतराने बोट जात होती यामुळे खाली खोलीत बसून पाहिले तर आगबोट जमिनीवरूनच चालली आहे असा भास होई. कारण पाणीच दिसेना. असा अरुंद कालवा ७५ मैल लांब आहे. दुतर्फा तारायंत्राची डबल लाईन व युद्ध नुकतेच संपलें असल्यामुळे पूर्वी खणलेले खंदक व काटेरी तारांची जाळी एकसारखी दिसत. ता. ११ रोजी पोर्टसय्यद येथे पोहोचलो. येथे बंदर समुद्रातल्या सारखे नसून मोठ्या खाडीतल्यासारखे आहे. सकाळीं आम्ही होडीतून धक्क्यावर गेलो व गांव पाहून परत आलो. गांव गलिच्छ. थाट इंग्रजीपेक्षां फ्रेंच पद्धतीचा. येथील हितसबंधांची गुंतागुंत अशा शब्दांनी वर्णन करतां येईल की अधीं राज्यसत्ता तुर्की सुलतानाची, गादी खेदीवाची, कार-भार इंग्रजांचा, बाजार फ्रेंचांचा, आणि भाषा सर्वांची! रात्रीं भूमध्य समुद्रांत शिरलो. तेव्हा पुस्तकांतून वाचलेले इतिहास आठवून या किर्तिमान व प्रसिद्ध

समुद्राचा प्रत्यक्ष परिचय घडल्याचा आनंद वाटला. तीन खंडांची दारे या समुद्रांत उघडतात. भूमध्य समुद्र लागल्यापासून हवा खूप गार सुटली. सर्व कपडे लोकरीचे चढवावे लागले. ता. १३।१४ रोजी वारा कमी झाला व हवा आपल्या हिवाळ्याइतकीच थंड वाटली. तारीख १५ रोजी माल्टा बेट डावे घालून पुढें गेलो. नंतर माजाला नांवाची फ्रेंच वसाहत आढळली.

ता. १६ रोजी समुद्रावर बरेच मोठे वादळ झाले. डेक सगळे भिजून गेलें. टेबलावर बसून जेवण्याची सोय राहिली नाही. सामानाचीहि आदळ आपट झाली. ता. १७ रोजी उत्तर आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील डोंगर दिसूं लागले. ता. १८ रोजी स्पेनचा किनारा व नेव्हाडा पर्वताची ओळ दिसूं लागली. पर्वत शिखरावर बर्फ पडले होते. ते पाहून वांगीभाताच्या ढिगावर बायकांनी घातलेले किसलेले खोबरें अशी उपमा मला सुचली ती इकडे पत्रांत लिहून कळविली. ती माझ्या मित्रांना इतकी आवडली की ते मला अजून त्या उपमेची आठवण देतात ! ता. १९ रोजीं पहाटे जिब्राल्टरला पोहोचलो. चांदण्यांत किल्ल्याची शोभा फार चांगली दिसली. बंदर बॅकबेहून मोठे वाटले. बंदराचे तोंड मात्र फार लहान. बंदरांत जहाजेंच जहाजे व शेकडो बोटी माशासारख्या पाण्यावर वावरत होत्या. गाडी करून सर्व शहर पाहून आलो. शहरला भुइकोट किल्ल्याच्या पद्धतीची चौफेर तटबंदी आहे. मुख्य किल्ला दिल्लीच्या किल्ल्यासारखा वाटला. शहर डोंगराच्या लवणावर बसलेले आहे. घरावर घर असे १०।१५ मजले दिसतात. डोंगराच्या वरचा भाग दौलताबादच्या किल्ल्यासारखा वाटला. झाडी अगदी तुरळक. उंच जागेवर तोफांचे बुरूज बांधलेले आहेत. त्यांच्या चौफेर माऱ्यांतून जहाज निभावयाचेंच नाही. जिब्राल्टर गांवचा एक भाग स्पॅनिश वस्तीचा आहे. तो पाहून काशीच्या बोळांची व घरांची आठवण झाली. फरसबंदीमुळे धूळ नाही पण एरवी अस्वच्छतेचा कहर.

परत बंदरावर आलो तेव्हां कांही सिंधी व्यापारी भेटले. हे प्रत्येक मोठ्या बंदरांत दुकाने घालून राहातात. आणि अपूर्वाईच्या जिनसा विकून लाखो रुपये मिळवितात. या व्यापाऱ्यांनी आमचें स्वागत करून फराळाला घातले व फुलांचे हार घेऊन ते आम्हांला बोटीत पोचवावयाला आले. ता. २१ मे रोजीं दिवसभर पोर्तुगालच्या किनाऱ्याने वाट चालत होतों. अटलांटिक महासागरांत वादळ नसलें तरी बोटी फार हालतात. लाटा इतक्या उंच उडतात कीं, एका कल्प-

टणीत ४५ अंशावरचे तारे दिसतात तो लागलीच दुसऱ्या कलाटणीस पाण्यांतले मासे दिसतात. ता. २२ रोजी व्हेल मासे दिसले. हे मासे प्रचंड असून तोंडांत पाणी घेऊन कारज्यासारखे उंच उडवितात यावरून त्यांचे स्थान कळते. ता. २३ रोजी इंग्लिश चॅनलमध्ये आम्ही प्रवेश केला त्याबरोबर घर भेटल्यासारखा इंग्रज उतारूंच्या तोंडावर आनंद चमकूं लागला. पण इग्लंड हे आमचे घर नसल्या-मुळे तुलनेने आमची आगबोट हेच आम्हांला घर वाटे. पिंजऱ्यांतल्या उंदरा-प्रमाणे तीन आठवड्यांत आमची स्थिति झाली. कंटाळा आला म्हणजे खोलींतून डेकवर जावें; तेथें कंटाळा आला म्हणजे डेकवरून खोलीत यावें. प्रवास संपत आला असें पाहून इंग्रज उतारूंनी डेकवर रंगभूमि थाटली आणि विजेची रोषनाई करून गाण्याचा मोठा जलसा केला !

सर्वांनी चिनी पोषाख केले होते. एका उतारूने खलाशाचे सोंग आणले व हंशा पिकविला. स्वतः गलबताच्या कॅप्टनने जादूचे प्रयोग करून दाखविले. ता. २४ रोजी धुकें अतिशय दाट पडले. सावधगिरीचे कर्णे एकसारखे वाजत होते. आगबोट मुंगीच्या पावलाने चालत होती. इतर आगबोटी दिसत नव्हत्या, पण त्यांचेहि कर्णे ऐकूं येत. ता. १५ रोजी सकाळी लंडनपासून ५० मैलावर आम्ही कांही वेळ नांगर टाकून विश्रांति घेतली. दुपारी धुके निवळले. संध्याकाळी ५ वाजतां टेम्स नदीच्या आखातांत शिरलो, व ७ वाजतां नदीमुखांत शिरलो. रात्री ८॥ वाजतां टिलबरी बंदरात पोचल्यावर रात्रभर तेथेच मुक्काम केला. येथे पास-पोर्टची तपासणी झाली व सकाळी १० वाजतां किनाऱ्यावर उतरून स्पेशल ट्रेनमध्ये बसलो आणि ३ वाजतां सेंट पॅंकर्स स्टेशनवर-उतरून टिळकांच्या बिऱ्हाडी पोचलो. रा. नामजोशी व कोलियार हे आम्हांला नेण्याकरितां आले होते. ता. २६ पासून हिंदी स्नेही मंडळी भेटूं लागली व गांवांत हिंडून फिरून पहाण्यास सुरुवात केली.

लंडनला पोचण्यापूर्वी मॉंटेग्यू साहेबांनी हिंदुस्थानच्या वार्षिक पत्रकावर भाषण केले होते; नंतर चार दिवसांनी साउथबरो, फीवॅम वगैरे कमिट्यांचे रिपोर्ट प्रसिद्ध झाले. लौकरच तिकिटे मिळवून पार्लमेंटचे कामकाज पहावयास गेलो. याहि दिवशी मॉंटेग्यू साहेबांनी भाषण केले. पण ते ऐकण्याला १०।२० प्रतिनिधीहि क्वचितील नसतील. तथापि भरलेल्या नाटकगृहापुढे भाषण करणाऱ्या नटाप्रमाणें ते आवेशाने भाषण करीत होते. ता. ४ जून रोजी टिळकांबरोबर मी केंब्रिज येथें गेलों.

तेथील ८०।९० विद्यार्थ्यांनी मजलीस बनवली होती. टिळकांचे व्याख्यान झालें. ते म्हणाले 'येथे स्वतंत्रतेच्या हवेत तुम्ही खूप बोलतां, पण परत हिंदुस्थानांत गेल्यावर स्वार्थत्याग व देशकार्य काय करणार याचा विचार केव्हां करतां कां ! ' कांहीं हिंदी विद्यार्थ्यांनी वेडेपणाचे प्रश्न केले व स्वतःचें हंसे करून घेतलें. एक तरतरीत ब्राह्मण मुलगा म्हणाला की, 'मी सिव्हिल सर्व्हिस परीक्षेला बसणार, पासहि होणार; पण नोकरी मात्र करणार नाही हे तुम्ही पहाल.' पण ते पहाण्यास टिळक जगले नाहीत. आणि जगते तर विपरीत दिसले असते ! कारण हा मुलगा परीक्षा पास झाला पण नोकरींतहि शिरला. तो प्रथम असिस्टंट कलेक्टर होऊन १९२२ साली अहमदाबादेस गांधींचा खटला सुरूं असतांना आला. हल्लीं इकडील एका जिल्ह्याचा तो कलेक्टर आहे. त्याने आपले वचन पाळले नाहीं, पण नोकरीत राहून तो होईल तितके लोकांचे बरे करतो हे खचित.

सुधारणा बिलावरील सिलेक्ट कमिटी अजून भरावयाची होती. यामुळें आम्ही इतर उद्योग केले. त्यांतील मुख्य म्हटला म्हणजे लंडन येथील ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी जी नेमस्त लोकांच्या हाती गेली होती ती कॉंग्रेसच्या तर्फेची बनवावयाची, व तिचे मुखपत्र 'इंडिया' हे कॉंग्रेसचे पैसे घेऊन कॉंग्रेसच्या विरुद्ध लिहीत असे तेंहि स्वाधीन करून घ्यावयाचे. कॉंग्रेस कमिटीशिवाय आम्हांला मदत करणारी दुसरी मंडळी म्हणजे मजूर पक्षाची. तथापि या पक्षांत बेझंट बाईचें वर्चस्व होते, व बाई टिळकांना सर्वस्वी एकरूपतेने वागवीत नसत. म्हणून या पक्षाकडून मदत कितपत मिळते याची थोडी शंकाच होती. तथापि कर्नल वेन्सवुड वगैरे जे लोक प्रमुख होते त्यांच्या गांठी आम्ही घेण्याला सुरुवात केली. ब्रिटिश इंडिया कॉंग्रेस कमिटीशी वाद कसे घालावे लागले, इंडियापत्र स्वाधीन करून घेण्याला किती त्रास पडला, या गोष्टींची माहिती मी टिळक चरित्र खंड तीन यांत सविस्तर दिली आहे म्हणून ती येथे देण्याचे कारण नाही. विलायतेंत माझा मुक्काम पडला तरी तो प्रवासखातींच समजून तितक्या पुरतीच माहिती येथे देत आहे.

इंडिया पत्र हस्तगत केल्यावर ब्रिटिश इंडिया कॉंग्रेस कमिटीनें मला त्या पत्राचा सहसंपादक नेमलें व मी परत येईपर्यंत तें काम करीत होतों. किंबहुना संपादकीय काम हेच माझे मुख्य काम होऊन बसल्यामुळें माझा बहुतेक सगळा वेळ त्यांतच जाई. ता. ४ जून रोजीं मॉंटेग्यू साहेबांनी पार्लमेंटच्या

इमारतीत सर्व हिंदी पाहुण्यांना मेजवानी दिली. नेमस्तांपुढे राष्ट्रीय सभा एक मजल व कॉंग्रेसच्या पुढे होमरूल लीग एक मजल अशा क्रमाने राजकीय स्वरूपाच्या मागण्या होत्या. यामुळे त्यांतल्यात्यात अधिक छाप कोणाची पडते असे जो तो पहात होता. पण त्यांतल्यात्यांत राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि पटेल आणि स्वराज्यसंघाचे अध्यक्ष टिळक यांचा सर्वांशी एकविचार असून त्यातल्या एकाने कांही अधिक मागितले तर त्याबद्दल दुसऱ्याला वाईट न वाटता आनंदच होण्यासारखा होता. नेमस्तांची व बेझंटबाईची गोष्ट मात्र तशी नव्हती. यामुळे ते दोन पक्ष एकोप्याने व हे दोन पक्ष एकोप्याने अशी कामे चालत. स्वतः मी स्वराज्य संघाच्या व राष्ट्रीय सभेच्या दोन्ही शिष्टमंडळांचा सभासद होतो, यामुळे इंडिया पत्रांत त्यांतल्यात्यांत अधिक प्रगतिपर असे धोरण संपादक म्हणून मी ठेवले होते. जूनअखेरपर्यंत शिष्टमंडळाचे इतर सभासद हळुहळू विलायतेस येत होते. हे दिवस तिकडील वसंताचे म्हणून काम होईल तितके कमी, आणि हवाखोरी,करमणूक व सहल होईल तितकी अधिक असा विलायतेतील लोकांचा कार्यक्रम असतो. आकाश निरभ्र असून ऊन पडत होते. थर्मामिटर ७० पर्यंत जाई. म्हणजे इकडची ती अर्धवट थंडीच, परंतु तिकडे या हवामानांत उकाडासा वाटे.

जून १० चे सुमारास हिंदी सुधारणा बिलाचे दुसरे वाचन होऊन सिलेक्ट कमिटी नेमली गेली. या प्रसंगी मी पार्लमेंटमध्ये हजर होतो. मॉंटेग्यू साहेबांच्या दीड तासाच्या भाषणांतील एक वाक्य मी चांगलेच लक्षांत ठेवले आहे ते असे. "हिंदुस्थानांत काय किंवा इंग्लंडांत काय सिव्हिल सर्व्हिसच्या हातून कोणतीच सुधारणा आपण होऊन आजवर मिळाली नाही व पुढेहि मिळावयाची नाही. त्यांना नोकराप्रमाणें सांगकामे बनवून राबविले म्हणजेच त्याचा खरा उपयोग होतो. बिनसरकारी लोकांच्या डोक्यांतच राजकीय सुधारणांची गर्भधारणा होते, व तेच लोक सुधारणांचे बाळंतपण करण्यास लायक असतात." या बिलाचे काम रात्रीं १२ वाजतां संपलें. हा रात्रिंचरपणा विलायतेत पाहिला तेव्हां प्रथम आश्चर्य वाटले. पण पुढें असहकारितेच्या काळांत इकडे कॉंग्रेस व तिची उपमंडळे यांच्या सभा रात्रीं अपरात्री कशा चालत, व कित्येक वेळां पहाटे दोनतीन वाजतां मतमोजणी होऊन ठरावांचे निकाल लागत हें मी पाहिले तेव्हां मुत्सद्यांच्या रात्रिंचरपणाचे कौतुक माझें नाहीसें झाले.

यानंतर सिलेक्ट कमिटीच्या बैठकी सुरू झाल्या. दरम्यान स्टेट सेक्रेटरी

यांनी शिष्टमंडळाना भेटीस बोलाविले. या भेटीत झालेल्या संभाषणाची हकीकत टिळकचरित्रात मी सविस्तर दिली आहे. जूनअखेर उन्हाळा वाढला व एक दिवस पारा ८२ पर्यंत गेला तेव्हां 'लंडन शहर होरपळून निघाले' असे त्याचें वर्णन वर्तमानपत्रांनी केले. या आठवड्यात टिळकांच्याबरोबर मी ऑक्सफर्ड येथे गेलो. कांही प्रमुख कॉलेजे वगैरे पाहिली. रात्री आठ वाजता तेथील मजलसीपुढे टिळकांचे व्याख्यान झाले. केंब्रिजपेक्षां वादविवाद अधिक जोराचा झाला. इकडच्या मोकळ्या हवेत हिंदी विद्यार्थी किती जहाल बोलतो हे येथे दिसून आले, व जहालाग्रणी म्हणणाऱ्या टिळकानाच विद्यार्थ्यांना नेमस्तपणाचा उपदेश करावा लागला ! म्हणून साध्य आणि साधने यांच्यासबंधाचे तत्त्वज्ञान टिळकानी त्याना सांगितलें. ऑक्सफर्ड येथे हिंदी विद्यार्थी फार थोडे असतात. मजलसीचे अध्यक्षस्थान मिस् शकुतला नावाच्या एका पजाबी कुमारिकेकडे होते. अशा ठिकाणी विचारस्वातंत्र्य का असते व राजकारणाची स्फूर्ति कशी मिळते हे ऑक्सफर्ड येथील इमारती, लेख, चित्रे, पुतळे वगैरे पाहून लक्षांत येतें.

जूनच्या अखेरीस विलायतेत पाऊस पडून किंचित् शीतळता आली. एक इंच पाऊस पडला त्याने एक एकरी शभर टन पाणी मिळाले, आतां पिके वांचली असे शेरे वर्तमानपत्रांतून येऊ लागले. करमणुकी व खेळ वाढले. लेडी लिटन यांनी पार्टी दिला. लडनाबाहेर ब्रॅडले नांवाच्या सुखवस्तु गृहस्थाच्या घरी हिंदी लोकांनी इग्रजी भाषेतून 'आराकानची राणी' या नांवाच्या नाटकाचा प्रयोग करून दाखविला. उघडया अंगणांत संध्याकाळी हा नाटक-प्रयोग झाला. एका लतामंडपाची ग्रीनरूम केली होती. वेलींच्या ताटव्यांकडे पडद्यांचे काम सोपविले होते. अभिनय बेताचा पण गायन बरे होते. उघडया हवेतील नाटय-प्रयोगाचा हा नमुना इकडे उपयोगांत आणण्यासारखा आहे. जुलै महिन्याच्या प्रारंभी जर्मनीशी पक्का तह झाल्याची बातमी येतांच विजयोत्सव सुरू झाला. त्याचे वर्णन करतां येणे शक्य नाही. तथापि थोडे देतो.

दुकाने कचेऱ्या एकदम बद होऊन लोक रस्त्यावर बाहेर पडले. गाडया व मोटारी यांची वहातुक गर्दीमुळे बंद झाली. तोफांचे प्रचड आवाज व त्यांतच फटाक्यांच बार होऊं लागले. वर आकाशांत विमाने घारीसारखी फिरूं लागलीं. मोठीं निशाणें डोक्यावरील टोप्यांपासून इमारतींवरील शिखरांपर्यंत लटकूं लागलीं.

इतर बाजार बंद पडून एकट्या निशाणांची खरेदी विक्री सुरू झाली. भर रस्त्यावर स्त्री-पुरुष उडया मारून गाऊं नाचूं लागले. खेळ, तमाशे, मद्यपान, भामटेगिरी यांना नुसता ऊत आला. विमानांनी राजवाडयावर लखलखीत प्रकाश पाडला व त्यांतच हजारो लोकांनी राजदर्शन घेतले. पुढील चार सहा दिवसांतच तहाच्या अटीसंबंधाने वाद सुरू झाला. तसेच मजूरपक्षाने साऊथपोर्ट येथे वार्षिक संमेलनांत आपल्या बंडाचे निशाण उभारले. या परिषदेला बेझटबाई गेल्या व तेथे त्यांनी भाषण-हि केले. आमच्या शिष्टमंडळाचे काही सभासद गेले होते. त्याचा खाजगी रीतीने सत्कार करण्यांत आला. येथून पुढे शिष्टमंडळाच्या कामाला बरीच गति मिळाली.

शिष्टमडळांच्या चिटणीसाचे, लेखी टांचणे मसुदे वगैरे करण्याचे, काम चाढले. हळुहळू सुरेंद्रनाथ बॅनर्जीसुद्धा नेमस्तांचे बहुतेक प्रतिनिधि लंडनला आले, आगाखान, अमीरअली हेहि आले. हिंदुमुसलमान यांच्यामध्ये त्यावेळी हल्ली इतका मतभेद नव्हता. तथापि युरोपियन लोकांच्या मदतीने ज्या सभा होत त्यांत नेमस्त पुढाऱ्यांच्या भाषणांचीच योजना असे. टिळकांदिकांवर अर्थात् बहि-ष्कारच होता. सिलेक्ट कमिटीचे काम ता. १६ जुलै रोजी सुरू झाले तिला इंडिया पत्राचा संपादक व रिपोर्टर या नात्याने मी जाऊं लागलो; व दर आठव-ड्यांत जे काम होई त्याची टांचणें घेऊन इंडियाच्या दर अंकांत त्याची सुसंगत हकीकत देऊं लागलो. पोलाक साहेबांनी आजवर आशेने मागे ठेवलेला संपा-दकत्वाचा लेखी राजीनामा कॉंग्रेस कमिटीकडे पाठविला. ब्रिटिश इंडिया कॉंग्रेस कमिटीची पुनर्घटना झाली. सिलेक्ट कामिटीचे काम सोमवार मगळवार व बुधवार तीन दिवस चाले. क्वचित् चौथ्या दिवशी. कामिटीची जागा लहान. प्रेक्ष-कांना दोन-तीन बाकेच होतीं. त्यावर आमच्याबरोबर हिंदुस्थानांतील जुनें प्रांतिक एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर उपगव्हर्नर वगैरेहि बसत. एकादां तर सर क्लॉड हिल हे जागा मिळेना म्हणून आम्हा वर्तमानपत्रकारांच्या बाकावर किंचित् टेकले तर शिपायानेंच त्यांना उठवून लाविले ! सर जॉर्ज क्लार्क हे माझ्या जागे पासून एका यार्डाच्या अंतरावर कामिटीचे सभासद म्हणन बसत. कामिटींत उलट तपासणी करण्याचे काम मुख्यतः मॉंटेग्यू व लॉर्ड सिंह हे करीत.

जुलैच्या शेवटच्या आठवड्यांत डॉ. मायर हे एकदम वारले. त्यांच्याबरोबर टिळकांच्या आजारीपणाची निराधार बातमी स्टेट्स्मन पत्राच्या लंडनच्या बातमी-दाराने हिंदुस्थानांत पाठविली. त्यामुळे इकडे बराच गोंधळ व गडबड झाली. ति चे

निराकरण तारा करून आम्हाला तावडतोब करावे लागलें. सिलेक्ट कमिटीपुढें गोरे काळे, सरकारी बिनसरकारी, तात्विक राजकारणाचा विचार करणारे व अनुभविक कारभारी, स्वार्थी परार्थी, अशा सर्व प्रकारच्या लोकांच्या साक्षी झाल्या. अर्थात् या सर्वांची प्रश्नोत्तरे प्रत्यक्ष ऐकण्याची मोठी मौज होती. बऱ्याचशा साक्षी एकेकट्या व्यक्तींच्या झाल्या पण कित्येक प्रसंगी साक्षीदारांचे गट करून साक्षी घेण्यांत आल्या. तेव्हां एकाने बोलावे व जवळच्यानें त्याला मधून मधून सुचवावे असें चाले. आणि हे सुचविणारा एखादा, तर कांहीच न करतां फक्त जवळ बसणारे चारदोन असत. याचा अर्थ इतकाच की या बिनबोलक्या साक्षीदारांनाहि 'आमची साक्ष झाली' असे म्हणतां यावे.

मी कॉंग्रेस शिष्टमंडळाचा सभासद होतो तरी मंडळातर्फे एकच साक्षीदार सिलेक्ट कमिटीपुढे पाठवावा असे ठरल्यामुळे वल्लभभाई पटेल, शिष्टमंडळाचे सेक्रेटरी, याचीच योजना झाली. तथापि त्यांच्याद्वारे मांडण्याची कैफियत टिळक, पटेल, हॉर्निमन व स्वतः मी अशा चौघांनी विचारविनिमय करून लिहून काढली होती. या कैफियतींतील मागण्याइतक्या पुरोगामी, प्रगतिकारक किंवा जहाल मागण्या इतर कोणत्याहि शिष्टमंडळाच्या कैफियतीत नव्हत्या. आणि यामुळे आमचे कॉंग्रेस शिष्टमंडळ सर्वांत अधिक नावडते होते. बेझंटबाई नेमस्तांचा कैवार घेऊन कॉंग्रेस शिष्टमंडळावर नाराज असत, आणि हे शिष्टमंडळ आपल्या जहाल धोरणाने सर्व कांही बिघडवीत आहे असे त्या इकडे आपल्या वर्तमानपत्रांतून जाहीर करीत. पण नेमस्तादि इतर शिष्टमंडळांतील अनेक लोक विलायतेच्या या कामगिरीबरोबर स्वतःचा कांही स्वार्थहि साधण्याच्या खटपटीत असत. यामुळे त्या मंडळांबद्दलहि, पण दुसऱ्या एका कारणाकरितां, ब्रिटिश मुत्सद्दी खासगी रीतीने चेष्टा करीत. आणि असा कोणी स्वार्थी साक्षीदार समोर येऊन मोठ्या गोष्टी देशाच्या नांवाने बोलू लागला म्हणजे कांही कुत्सित लोक आपआपसांत कुजबुजून बोलत "हं. या राजश्रीना काय पाहिजे आहे ? याला 'मुखलेप' केवढासा मोठा दिला पाहिजे" ? अशा बातम्या खासगी रीतीने ऐकू येत.

होमरूलच्या शिष्टमंडळातर्फे एकट्या टिळकांचीच साक्ष झाली. यासंबंधाने थोडी प्रास्ताविक हकीकत सांगणे जरूर आहे. "स्वराज्यसंघातर्फे साक्षी देण्यास राष्ट्रीय सभेच्या डेप्युटेशनप्रमाणे संघाचेहि सर्व सभासद म्हणजे टिळक, खापर्डे

व केळकर तिघेहि तयार आहेत, तिघांच्याहि साक्षी घेण्यांत याव्या व तिघांच्या नावे कमिटीचे प्रश्न पाठविण्यांत यावे" असे कमिटीच्या चिटणिसांस कळविण्यांत आले होते. पण "दर डेप्युटेशनागणिक होतां होईतो एकच साक्षीदार घ्यावयाचा असे कमिटीने ठरविले आहे, सबब एकाच गृहस्थाचे नांव द्या," असे उलट लिहून आल्यावरून अर्थात् टिळक हेच सघाचे एक साक्षीदार असे चिटणिसांकडून लिहून गेले. तेव्हां टिळकांची साक्ष घ्यावयाची की नाही हा प्रश्न कमिटीपुढे अध्यक्षांनी मांडला. कमिटीतला वादविवाद अर्थात् गुप्त होता; पण अशाहि गुप्त खलबतांचे अनुकरणात्मक ध्वनि भिंतीतून बाहेर पडत असतात, त्यावरून असे समजले की, टिळकांची साक्षच घेऊ नये असे म्हणणारे बहुमत कमिटींत होते. तथापि ती कां घेऊ नये या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मात्र या बहुमतवाल्यांस सुचेना! तेव्हां नाइलाज म्हणून टिळकांची साक्ष घेण्याचे ठरून टिळकांकडे प्रश्नांची यादी पाठविण्यात आली; व त्या प्रश्नांची उत्तरे टिळकांनीं लिहून पाठविली, त्यांवरून टिळकांना साक्षीस बोलाविले. रीतीप्रमाणे अध्यक्षांनी टिळकांना 'प्रश्नोत्तरांखेरीज तुम्हाला आणखी कांही सांगावयाचे असल्यास सांगा,' असे विचारल्यावरून त्यांनीं सुमारे दहा मुख्य मुद्यांवर सुसंगत, सुव्यवस्थितपणे, अक्षरांतर किंवा अधिक-उणा एकहि शब्द न बोलतां, राष्ट्रीय सभेची स्वराज्ययोजना कमिटीस सांगितली. प्रश्नोत्तरांचे टिपण जे त्यांनी प्रथम पाठविले होते त्याला धरून पण त्याची सूत्ररूपाने एकवाक्यता करून टिळकांनी कमिटीपुढे आपला खुलासा मांडला व तो सर्वांस फारच पसत पडला. यानतर मधली सुट्टी झाली व फिरून कमिटी भरल्यावर टिळकाची उलटतपासणी पाहावयास सांपडेल अशी लोक उत्सुकतेने वाट पाहत होते. पण कमिटीच्या पोटांतले पाय या वेळी बाहेर आले. तिने टिळकांस साक्षीस बोलवावयाचे पण एकहि प्रश्न विचारावयाचा नाही असा आपणात निश्चय केलेला असल्यामुळे त्याची साक्ष उलटतपासणीशिवायच संपली. लॉर्ड सिडनहॅमसाहेब तर आधीच उठून गेले होते!

टिळकांना उलटतपासणींत एकहि प्रश्न विचारावयाचा नाही याचा अर्थ त्यांच्यावर कमिटीची इतराजी हाच होय हे उघड होतें. व ही इतराजी कां तर ती टिळकांच्या राजकीय मतांकरितां, किंवा सरकारचा व त्यांचा जो अपूर्व ऋणानुबंध होता त्याकरिता हेहि उघड होते. पण ही गोष्ट घेऊन चालले तरी, त्याना प्रश्न न विचारण्याचा जो पोरकटपणा कमिटीने केला त्याचें

मात्र पुष्कळांना हंसूं आले. कमिटीचा टिळकांवर राग होता तर तिने टिळकाना साक्षीसच बोलवावयाचे नव्हते. तसे करण्यास त्यांना भाग पाडण्यास होमरूल लीगला काय साधन होते? हा केवळ खुषीचा सौदा आहे. "टिळकांना नाकारतां त्या अर्थी आम्ही आमच्या वतीनें दुसरा कोणीच साक्षीदार पाठवीत नाही" असे फार तर लीगने उत्तर दिले असते, व जगाने झाली ही गोष्ट बरी अगर वाईट याचा न्याय आपल्या ठिकाणी केला असता. पण तसे करण्याची कमिटीची छाती झाली नाही. बरे, भलेपणा घेण्याकरितां किंवा सरळ सार्वजनिक बुद्धीने जर कमिटीने त्यांना साक्षीला बोलावले तर रीतिप्रमाणे इतर साक्षीदारांसारखे चार प्रश्न विचारावयास काय हरकत होती? तसे केल्याने कमिटीस बट्टा लागण्याचा संभव नव्हता. पण साक्षीस तर बोलावले, त्याना आपले म्हणणे सर्व मांडूं दिले, पण उलटसाक्षी-पुरता त्यांच्याशी अबोला धरला; यांत कमिटीने कोणते तत्त्व किंवा कार्य साधले हे कमिटीसच माहीत! पण उलट प्रश्न न विचारले तरी होमरूल लीगचें काम झाले. अशा कमिट्या व त्यांपुढील साक्षी यांचा मुख्य उपयोग हाच असतो कीं, ज्याला त्याला आपले म्हणणे जाहीर रीतीने मांडतां यावे; आणि टिळक, पटेल व दिवाण माधवराव यांच्या साक्षी वाचल्या म्हणजे इंग्रज राष्ट्राचे पुढारी, मुत्सद्द्यांतले मुरब्बी, अधिकाऱ्यांतले अग्रगण्य अशांच्या समोर तोंडावर लोकपक्षाचे खरे खरे विचार स्पष्ट निर्भीड भाषेत मांडण्यांत आले यांत सर्व कार्यभाग आला. ज्यांना अधिकाऱ्यांचे स्नेह जोडण्याला किंवा आपापले खासगी कावे साधण्याला येथे जावयाचे होते त्यांची गोष्ट अर्थात् निराळी.

पण आपला पक्षपातीपणा लोकांच्या लक्षांत येऊं नये अशा बुद्धीनेच जणूं काय कमिटीने उलटतपासणी न करण्याचा मान इतर एकादोघांसहि दिला. कारण टिळकानंतर मिसेस् नायडू यांची साक्ष झाली, व त्याच्यानंतर सर फ्रँक स्लाय यांची साक्ष झाली. त्या दोघांनाहि उलट सवाल विचारण्यांत आले नाहीत.

माझी स्वतःची साक्ष सिलेक्ट कमिटीपुढे झाली नाही. परंतु इंडिया पत्र चालविणे हे जोखमीचे काम मजकडे स्वतंत्रपणे तोडून दिले होते ते करण्यांत माझा पुष्कळ वेळ जाई. शिवाय वक्तशीरपणा हा विलायतेतील लोकांच्या अंगीं इतका मुरला आहे की हिंदी पद्धतीत मुरलेल्या मनुष्याला तिकडे कामधामाची टिपणे

अगर इतर तजाविजी वेळेवर पार पाडणे मोठे जड जात असले पाहिजे. पण सुदैवानें मीहि इकडे हिंदुस्थानांतच वक्तशीरपणाचा गुण बराचसा माझ्या अंगी आणलेला होता. यामुळे तिकडे माझ्या कामांत मला खाली पाहण्याची वेळ आली नाहीं. छापखान्याला मजकूर द्यावयाच तो अगदी स्वच्छ लिहून काटेकोर असा दिला पाहिजे. उलट छापखानेवालेहि दिलेला मजकूर थेट अस्सल बरहुकुम छापून देण्यास स्वतःला जबाबदार समजतात. अर्थात् मागाहून जर खोडाखोड केली, शुद्धिपत्रें जोडली तर त्याचा खर्च बिलांत घातला जातो. पांच चार ओळीत एखादा शब्द पांचचार अक्षरे इतके शुद्धीकरण इतकेच क्षम्य मानले जाते. मी या बाबतीत इकडे तितकासा दक्ष नव्हतो. पण विलायतेतील चुणूक कळतांच मी तो गुण लवकरच शिकलो.

ब्रिटिश इंडियन कमिटीच्या पैशांतून हे इंडिया पत्र चालविण्याची सर्व व्यवस्था होई. या कमिटीत डॉ. क्लार्क ( चेअरमन ) पांचसात इंग्रज आणि कांही लंडन रहिवासी हिंदी सभासद होते. मी हिंदुस्थानाकडे परत येण्याला निघालो तेव्हां या कमिटीने इंडिया पत्राच्या कामाबद्दल माझे आभार मानण्याचा ठराव नमूद केला. मला चहापार्टी दिली. आणि चांदीचे पात्र नजर केले. डॉ. क्लार्क हे मूळचे लिबरल पक्षाचे, पण प्रगतिप्रिय असल्यामुळे त्यानी कॉंग्रेसचे धोरण स्वीकारण्यास फारशी खळखळ केली नाही. माझी सहसंपादिका हेलेना नॉरमॅटनबाई. तिजवर त्यांची फार ममता असे. आणि पुढे डॉ. क्लार्क याच्या मुलाशी या बाईचे लग्न झाले. हेलेना नॉरमॅटन ही युनिव्हर्सिटीची पदवीधर असून ग्रंथकर्ती होती. राजकारणांत तिची मते राष्ट्रीय वृत्तीची असत. कारण तिच्या अंगांत आयरिश रक्त होते. तथापि मी असे पाहिले की, राष्ट्रीय वृत्तीच्या स्वातंत्र्यप्रिय अशा ब्रिटिश लोकांच्या डोक्यांत हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र होण्याची कल्पना शिरता शिरत नाही व शिरली तरी ती त्यांना आवडत नाही.

अशा रीतीने कमिटीचे काम आक्टोबरच्या शेवटल्या आठवड्यांत संपलें. मध्यंतरी उन्हाळ्याच्या सुटीमुळे पार्लमेंटचे काम बंद होते. यामुळे शिष्ट-मंडळाच्या लोकांनीं व्याख्यानादिकांचे दौरे काढले. खाजगी भेटीं घेण्याचे काम काढले. तसेच खाजगी भोजने उपहार याचे उलट सुलट उपचार झाले. कॅक्स्टन हॉल, एसेक्स हॉल वगैरे ठिकाणी व्याख्याने झाली. दक्षिण वेल्स, बोर्नमाउथ् साउथॅम्प्टन, एडिंबरो इत्यादि ठिकाणी खापर्डे, टिळक, नायडू वगैरे

मंडळी गेली होती. या सर्वांची छाप निरनिराळ्या रीतीनें पडली. टिळक मुत्सद्दी म्हणून, बेझंटबाई वक्त्या म्हणून, व खापर्डे हे विनोदी व्याख्याते म्हणून. बेझंटबाई यांनींहि तेलंग, वाडिया, जमनादास द्वारकादास वगैरे मंडळीबरोबर घेऊन व्याख्यानांचा दौरा काढला होता; नंतर मी, हॉर्निमन, आयंगार, मिस नॉरमॅटन ( इंडिया पत्राच्या सहकारी संपादक ) अशी मंडळी फुटून फुटून इंग्लडच्या पश्चिम भागांत व्याख्यानास गेलो. मिस् नॉरमॅटनबाई या आयरिश असून त्यानी लंडन युनिव्हर्सिटींत इतिहास या विषयांत ऑनर्स मिळविले होते. त्यांनी बॅरिस्टरीची परीक्षा विद्याभ्यासाच्या दृष्टीने दिली होती. पण या वेळेपर्यंत बायकांना वकिली करण्याची परवानगी मिळालेली नव्हती. त्यामुळे त्यांनी हौस ऑफ लॉर्डस्‌कडे परवानगीचा अर्ज करून आपल्या हक्काचे भाडण चालविले होते, व वजनदार मुत्सद्दी लॉर्ड सेसिल यांनी त्यांचा पुरस्कार चालविला होता. मी बर्मिंगहॅम्, ब्रिस्टल्, ब्रायटन, टॉटन, वेस्टर्न सुपरमेयर इत्यादि ठिकाणी व्याख्याने दिली. हॉर्निमन व रगस्वामी हे कार्डीफकडे व्याख्यानें द्यावयास गेले होते ते कार्डीफ येथे आम्हांला येऊन मिळाले व तेथे आम्हा सर्वांची भाषणे झाली. इकडील व्याख्यानाचा सामान्य अनुभव असा—खटपट झाली असतां कोठेहि सभा होण्यास अडचण पडत नाही. श्रोतृसमाज किती मिळेल हे मात्र सांगतां येणे कठिण असते. कारण सभा कोण भरवतो यांवर ते बरेचसे अवलबून असते. प्रायः प्रत्येक शहरी इंडिपेन्डन्ट लेबरपार्टी, ॲडल्ट स्कूल, चर्च सोसायटी वगैरे दोन तीन सस्था असतातच, व त्यापैकी एखाद्या सस्थेच्या विद्यमाने सभा भरू शकते. शिवाय या संस्थेच्या आठवड्याच्या पधरवड्याच्या ठराविक सभा असतातच. त्यांतलीच एखादी सभा आपणास मिळाली तर श्रोतृसमाज विशेष भरपूर मिळतो. प्रत्येक शहरी स्थानिक वर्तमानपत्र असतेच, व जाहिरात आगाऊ झालेली असल्यास त्या पत्राचा रिपोर्टर येऊन थोडा तरी रिपोर्ट देतो. सभेस येणारे लोक शेकडा नव्वद सहानुभूतिपूर्ण असतात, व व्याख्यानानंतर विचारलेल्या प्रश्नात विरोधापेक्षा जिज्ञासाच अधिक असते. विरोध करणारा एखादा भेटतोहि. परंतु प्रश्न विचारणारापेक्षां उत्तर देणाऱ्याला विषयाचे ज्ञान अधिक असल्यामुळे तो सहसा आपली छाप पाडल्याशिवाय रहात नाही.

विलायतेतील चळवळीत नेमस्त, बेझंटबाई, कॉंग्रेस व होमरूललीग असे चार पक्ष काम करीत होते. मुसलमान व अस्पृश्य या नांवांचे स्वतंत्र पक्ष त्यावेळी नव्हते. वरील चार पक्षांपैकी कॉंग्रेस व होमरूललीग हा पक्ष संयुक्त होता. त्यांत

मतभेद मुळींच नसून दोन्ही पक्षांच्या सूत्रचालकत्वाचे काम टिळकांकडेच होते. नेमस्त पक्षाची खटपट बाहेर लोकात विशेष नसून ती मुख्यतः सरकार दरबारी चाले. बेझंटबाई या उभयान्वयी असून, सहानुभूति नेमस्त पक्षाकडे पण प्रत्यक्ष खटपटीत कॉंग्रेस व होमरूललीग पक्षाशीहि सहकारिता, असे त्यांचे धोरण असे. कारण त्यांना विलायतेत जनतेमध्ये जितकी मान्यता होती तितकी सरकार दरबारी नव्हती. यामुळे नेमस्त व राष्ट्रीयपक्ष यांच्या मिळून सभा विलायतेत कोठे झाल्या नाहीत तरी बेझंटबाई व टिळक आणि हॉर्निमन सकलातवाला सत्यमूर्ति चमनलाल यासुद्धां एकत्र सभा होऊं शकली. ती सुप्रसिद्ध ऑलबर्ट हॉलमध्ये झाली. तेथे एका टोकाला बेझंटबाई व दुसऱ्या टोकाला चमनलाल अशी खेच असून टिळकांनीं दोन्हीकडे हात देऊन दोरी सावरून धरली होती; व शेवटी चमनलालसारख्या तडफदार वक्त्याच्या भाषणावरहि आपल्या मुत्सद्देगिरीची छाप पाडून टिळकांनी ती सभा जिंकली.

अशा रीतीने विलायतेतलें काम संपल्यावर टिळक व वासुदेवराव जोशी यांच्याबरोबर मी विलायतेहून परत आलो. येतांना बोट मिळाली ती 'इजिस' नांवाची, आणि टेम्स नदीपासून मुंबई बंदरापर्यंत एकदम म्हणजे वाटेंत फ्रान्सकडे न वळणारी अशी मिळाली. यामुळे फ्रान्समध्ये मार्सेल्सला उतरून युरोपखंडाकडे प्रवास करतां आला नाहीं. जाताना पक्का तह झाला नव्हता म्हणून मार्सेल्सला उतरूं शकलों नाही. आणि येतांना उतारूंची गर्दी फार; तिकिटे देण्याचे काम आगबोट कंपनीपेक्षां इंडिया ऑफिसच्या अधिकाऱ्यांच्या हातीं. मिळेल ती बोट ताबडतोब न घेतली तर पुढें केव्हां मिळेल याचा नेम नाही. टिळक दीड वर्ष विलायतेत राहून कंटाळलेले, यामुळें कसेहि करून लौकर परत हिंदुस्थानाला जावें अशी त्यांची इच्छा. आणि मी वेगळा फुटून युरोपखंडाचा प्रवास करून येईन म्हटलें तर मजजवळ त्यावेळीं तितकें स्वतंत्र द्रव्यसाधन नाहीं. यामुळे आपण मागें न रहातां टिळकांबरोबरच परत जावें हें उत्तम असें ठरवून मीहि आणखी प्रवासाच्या भानगडीत पडलों नाही. टिळक 'विलायतेला' गेले ते खरोखर विलायतेला गेले नव्हते. कामाकरितां गेले होते! आणि माझीहि स्थिति तीच होती.

टिळक शरीराच्या दृष्टीनें किंचित परावलंबी झालेले असून त्यांना बरोबर मनुष्य घेतल्याशिवाय फिरणें शक्य नव्हते. माझी स्थिति तशी नव्हती. पण मी विलायतला गेलों तो खरोखर 'विलायत' पहाण्याकरितां गेलों नव्हतों. मग युरोप-खंडाचा प्रवास दूरच. यामुळें मलाहि विलायतेंत देखील हिंडतां फिरतां आलें

नाही. दर आठवड्याला इंडिया पत्राचा अंक काढावयाचा, केसरीकरितां एक बातमीपत्र लिहावयाचे, अवांतर पत्रव्यवहार व टिळकांची निरोपेगिरी वगैरे काम करावयाचे. यामुळे मला लंडन सोडून बाहेर सबंध अर्धा आठवडाहि रहाणे शक्य नव्हते. यामुळे लंडनमध्ये राहूनच एखाद्याअर्ध्या दिवसात जे काय पहातां येईल ते पहावे असा क्रम मी ठेविला होता. त्याप्रमाणे वुइन्डसर, रिचमंड व लंडन टॉवर येथील राजवाडे, सुप्रसिद्ध चित्रसंग्रह, एकदोन जत्रा, मध्यवर्ती लायब्ररी व पदार्थ-संग्रहालय, एक-दोन सभागृहे, एक-दोन नाटकगृहे, दोन तीन नाटक-प्रयोग व कांही सार्वजनिक उद्याने याशिवाय अधिक कांही मला पहावयास सांपडले नाही. आणि ऑक्सफर्ड, केंब्रिज, बर्मिंगहॅम, ब्रिस्टल व टॉटन याशिवाय शहरे पहावयास सांपडली नाहीत. पांच महिने इंग्लंडमध्ये राहून इतके थोडे पाहिले म्हणजे कांहीच पाहिले नाही असा अर्थ सहजच होतो. पण विलायतच्या सफरीत माझा हेतु प्रवासाचा आणि स्थलसौंदर्य पहाण्याचा नसल्यामुळे मला त्याचे वाईट वाटले नाही. माझ्या मनांतच युरोपचा प्रवास व स्थलदर्शन नव्हते या अर्थानेच ते दैवात नव्हते असे वाटले तर म्हणावे ! तथापि नाही नाही म्हणतां १९३२ साली विलायतेच्या सफरीचा दुसरा प्रसंग आलाच.

*　　*　　*　　*

**विलायतेची दुसरी सफर**—आतां या दुसऱ्या सफरीची हकीकत थोड-क्यांत सांगतो. १९३२ च्या आक्टोबरांत मद्रासेहून पुण्यास परत येतांना वाटेंत निजाम हैद्राबाद शहरी मी गेल्याची हकीकत मागें सांगितली आहे. येथे प्रथम हे सांगावयाचे की अगदी अभावितरीतीनें हैद्राबादच्या या मुक्कामांतच मला गोलमेज परिषदेचें निमंत्रण मिळालें. त्याचा प्रकार असा—

हैद्राबादेस मला संयुक्त महाराष्ट्रीय मंडळाची पानसुपारी झाली. आणि मी परत पुण्याला निघणार इतक्यांत हैद्राबादच्या रेसिडेंटसाहेबांकडून मला भेटीचे निमं-त्रण आले. त्यांचा हेडक्लार्क मोटार घेऊन मला हुडकीत आला, व त्याने रेसिडेंट साहेबाचे निमंत्रणपत्र हाती दिले. त्यांत 'जरूर येऊन भेटून जा' असे लिहिले होते. मला कांहीच बोध होईना. मी गेल्यावर रेसिडेंट मला स्वतःच्या बसण्याच्या खोलींत घेऊन गेले व पेटीतून एक तार काढून त्यांनी मला वाचून दाखविली. तीत मजकूर असा होता. "केळकर हे हैद्राबादेस गेल्याचे समजतें तरी तुम्ही त्यांना

भेटीस बोलावून विचारा की, तिसऱ्या राऊंड टेबल कॉन्फरन्सला सभासद म्हणून यांना निमत्रण करण्याचा सरकारचा विचार आहे तरी हे निमत्रण ते स्वीकारतील किंवा कसे ?" मी अर्थातच बुचकळ्यांत पडलो. मी म्हणालो, 'इतक्या तातडीने या प्रश्नाचे उत्तर येथेच देणे कठिण वाटते. तरी मी पुण्यास गेल्यावर याचे उत्तर कोणास कळवावे ते सांगा म्हणजे त्याला पाठवीन." सिडेंट म्हणाले "तुमची अडचण मी ओळखतो. मात्र कृपा करून तुम्ही थोडा विचार करण्यास वेळ घेतला तरी चालेल, पण मला निश्चित स्वरूपाचे काही उत्तर देऊन गेलां तर बरे होईल. ही तार पुणे मद्रास असे करीत करीत हैद्राबादेस झाली आहे. त्यावरून सरकारला उत्तर त्वरित हवे असे दिसते." असे म्हणून मला विचार करण्याला वेळ देण्याकरितां दुसरे कागदपत्र काढून ते वाचू लागले. पाच मिनिटानतर मी म्हणालो "ठीक आहे. मी निमत्रण स्वीकारीन असे कळवा" परत आल्यावर जो तो मोठ्या उत्सकतेने विचारू लागला की रेसिडेंटने भेटीला कां बोलावले ! पण भेट केवळ औपचारिक असे सागून मी कोणासहि मुळीच सुगावा लागू दिला नाही.

पुण्यास आल्यावरहि यांतले एक अक्षर मी कोणास कळू दिले नाही. पण नर फ्रे. साईक्स, मुबईचे गव्हर्नर, याजकडून गणेश खिंडीतून भेटीस बोलावल्याचे निमत्रण आले, तेव्हा मग राऊड टेबलच्या निमत्रणाची गोष्ट मला बाहेर फोडावी लागली. हे मधले चार पांच दिवस एका अर्थाने फुकट गेले. कारण प्रत्यक्ष निमत्रणाचे पत्र हाती आल्यापासून आगबोटीत बसण्याला अवघे चार पांच दिवस होते. आणि तयारी तर करावयाची विलायतच्या थंडीच्या दिवसांतल्या प्रवासाची! पण निमंत्रण हाती पडण्यापूर्वी तयारी करावयास लागावयाचे नाही, मग त्यात गैरसोय गोंदल झाली तरी चालेल असा निश्चयच केला होता. शेवटी ठरल्यावेळी मी मुंबईस जाऊन आगबोटीत बसलो. पॅसेज पासपोर्ट यांची व्यवस्था सरकारकडून करण्यात झाली. त्या खटपटीचा माझा वेळ वांचला. तसेच पुण्यातील गोखले शिंपी यांनी ठरल्या मुदतीत सर्व कपडे तयार करून दिले. मुंबईस निरोप देण्याकरितां महाराष्ट्रांतील दहा वीस ठिकाणचे मित्र व जिल्हापुढारी आले होते. अणे यांना मुंबईच्या मित्रांकडून निमंत्रण गेले होते. पण त्यांना मी राऊंड टेबल कॉन्फरन्सला जाणे पसंत नव्हते हें माहीत असल्यामुळे मी त्यांना खुलासेवार तार केली व ते न येण्यानें होणारा गैरसमज दूर केला. या पूर्वीपासूनच कॉंग्रेस विषयक

धोरणांत अणे व मी यांच्यामध्ये मतभेद होऊं लागला होता. म्हणून व्यक्तिशः स्नेह असला तरी मतभेदामुळे " तुम्ही निरोप देण्यास न आला तरी त्यामुळे माझा गैरसमज होणार नाही, इतर अनेकाची माझ्या जाण्याला मान्यता आहे तेवढी मला पुरे आहे" असे मी त्यांना कळविले.

**पुणेंकरांचा निरोप**—ता. २६ आक्टोबर रोजी नगराध्यक्ष डॉ. नायडू यांच्या अध्यक्षतेखाली मला निरोप देण्याचा समारंभ टिळक मंदिरांत झाला. त्याबद्दल वर्तमानपत्रांत हकीकत आली ती अशीः—प्रथम प्रो. पोतदार म्हणाले,

"राजकारणात रुसवारुसवी फार वेळपर्यंत टिकूं शकत नाही. राजकारण हा फक्त कुस्तीचा आखाडा असल्याकारणाने त्या आखाड्यांत उतरून लढत राहणे ही गोष्टच शेवटी कल्याणप्रद होते." या बाबतीत त्यांनी इतिहासातील अनेक दाखले देऊन आपल्या म्हणण्याला पुष्टि दिली. व्यक्तिशः आपले मत सांगताना प्रो. पोतदार म्हणाले " गोलमेज परिषदेला १९३१ साली श्री. केळकर याना आलेले आमंत्रण त्यांनी नाकारले ही गोष्ट बरी केली नाही. तिसऱ्या गोलमेज परिषदेला त्यांना बोलावणे आले व ते तरी त्यांनी पत्करले हे फार चांगले झाले. आपल्यास या बाबतीत जी महाराष्ट्राची नाडी माहीत आहे तीवरून असे म्हणतां येईल की, श्री. केळकर याना महाराष्ट्राचा पाठिंबा आहे. गोलमेज परिषदेतून काय निघेल यासंबधाने कोणालाहि कांही शंका असल्या तरी विलायतेस जाऊन तेथील राजकारणी मुत्सद्याबरोबर चार हात करण्यात पुष्कळ अर्थ आहे. या निरनिराळ्या दृष्टींनी पहाता श्री. केळकर हे तिसऱ्या गोलमेज परिषदेला जात आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. त्याचा सारखा चतुरस्त्र, हजरजबाबी व राजकारणांत मुरलेला असा गृहस्थ विरळा. महाराष्ट्रांत प्रतिनिधींची निवड लोकांनी करण्याची वेळ आली असती, तरी केळकर यानाच सर्वांनी निवडून दिले असते अशी माझी खात्री आहे."

" प्रो. पोतदार यांचे वरील आशयाचे भाषण झाल्यावर प्रो. काळे म्हणाले की, " श्री. केळकर हे महाराष्ट्राचे तर प्रतिनिधि आहेतच, पण त्यांना गोलमेज परिषदेमध्ये कामगिरी करावयाची आहे ती हिंदुमहासभा, संस्थानी प्रजाजन, व सर्वसाधारण हिंदी जनता यांच्यातर्फे करावयाची आहे. श्री. केळकर यांना कोणत्याहि विषयाची मांडणी किती सफाईने व कौशल्यानें करतां येते हें

असेब्लीत उत्तम रीतीने दृष्टोत्पत्तीस आले आहे." श्री. केळकरांच्या अंगांत सर्व विषयांचे आकलन करण्याची शक्ति किती मोठी आहे हे सांगतांना प्रो. काळे यानी आपल्या तीस वर्षांपूर्वीच्या कांही आठवणी सांगितल्या. "चलनपद्धति सबंधाने १८९८-९९ साली फौलर कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला त्या वेळी कै. न्या. मू. रानडे म्हणाले होते की, अशा तऱ्हेच्या शास्त्रीय विषयाचा संपूर्ण अभ्यास करून त्यावर ठाम मत देणारे तरुण आपल्यांत उत्पन्न झाले पाहिजेत, व ते नाहीत म्हणून रानड्याना वाईटाहि वाटले होते. पण त्याच वेळी श्री. केळकर यांनी फौलर कमिटीच्या रिपोर्टाचा पूर्ण अभ्यास करून त्यासबधी लिहिलेला एक निबंध सार्वजनिक सभेत वाचला होता. चलनासंबंधीचा हा निबध पाहून न्या. मू. रानडे यांना आनंद झाला. 'मराठा' पत्राची प्रुफे मी पहात असतांना केळकर हे आपली आर्टिकले कशी लिहीत असत हे मला माहीत आहे. 'मराठ्यांत' लेख लिहिण्यास त्यांनी आपल्याला कसे उत्तेजन दिले हे सांगून प्रो. काळे यांनी श्री. केळकर याना त्यांच्या विलायतेतील कामात यश यावे अशी सदिच्छा प्रकट केली व केळकरांना पुष्पहार घालून त्यांनी आपले भाषण संपविले.

"उत्तरादाखल भाषण करतांना केळकर म्हणाले की, "मी तिसऱ्या गोलमेज परिषदेस जात आहे तो केवळ सध्याच्या आणीबाणीच्या वेळी हिंदुस्थानाकरितां आपल्यास कांही तरी भरीव कामगिरी करतां यावी एवढ्याच सदिच्छेने. म. गांधी तुरुगांत असतांना लोक म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डे यांची कामे चालवितातच व हीं कामें सरकारी कायद्यानेच चालतात. स्थानिक स्वराज्यसस्था चालविण्यास जर या लोकांना हरकत वाटत नाहीं, तर ज्या कायद्याने अखिल हिंदुस्थानचे राज्य-यंत्र बनविले जाणार आहे, तो कायदा व्हावयाच्या प्रसंगीं आपण हजर कां राहू नये व आपल्या म्हणण्याप्रमाणे कायदा करून घेण्याची खटपट कां करू नये हे मला समजत नाही !

"म. गांधी व सरकार यांच्यामध्ये कांहीं तडजोड निघून राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि जर या तिसऱ्या गोलमेज परिषदेला हजर राहिले असते तर फार चांगले झाले असते. आज देशांत राष्ट्रीय सभेएवढा वजनदार व कार्यकर्ता असा दुसरा पक्ष नाही हे खरें, पण अलीकडे घडलेल्या अनेक गोष्टी पाहतां म. गांधींची सुटका होऊन ते गोलमेज परिषदेला जातील असा संभव दिसत नाहीं. ते गेले

असते तर खचित हिंदुस्थानचे कल्याण झाले असते. परंतु ते जात नाहीत म्हणून सगळे रान इंग्रजी साम्राज्यवादी स्वराज्यद्रोह्यांना मोकळे सोडावे ही गोष्ट मला पटत नाही. ठिकठिकाणी आपल्या हातून होईल तितका पायबंद त्यांना घालावा असे माझे मत असल्याकारणाने मी या परिषदेचे निमंत्रण स्वीकारले, व ही गोष्ट मी बरोबर केली असे मला वाटते. तथापि हेहि लक्षांत ठेवा की, येथे तुमच्यासमोर उभे राहून जे मी बोलतो तेच तेथे पाठीमागेहि बोलेन !

"पुष्कळांना असे वाटत आहे की, या गोलमेज परिषदेतून काहीहि निष्पन्न होणार नाही. पण मला त्यांची ही वृत्ति पटत नाही. निराशा ही प्रत्येक बाबतीत पसरलीच आहे. परतंत्र म्हणून राजकारणाच्या दृष्टीने आपण मेलेलेच आहो. पण यांतहि आशा ठेविली तरच आपला तरणोपाय आहे. या वेळीं मला एका इंग्रजी स्मशान–भूमीवर लिहिलेले अर्थपूर्ण वाक्य स्मरते. या वाक्यांत निराशावाद्यांना जसे उत्तर दिलें आहे तसेंच मी कां जातो याचेहि गमक त्यांत आहे. तें इंग्रजी वाक्य असें:—" दि डेड डू नॉट फियर डेथ्, बट दे होप फॉर रिसरेक्शन " म्हणजे " मेल्यानंतर मृतांना मृत्यूची भीति वाटत नाहीं; पण ते आपल्या पुनरुद्धाराची मात्र मोठ्या आशेने वाट पहात असतात !"

"आपल्या या हिंदुस्थानांत सर्वत्र निराशाच भरली असून यापूर्वी निमालेल्या देशभक्तांच्या अतृप्त आकांक्षाच सर्वत्र वावरत असलेल्या आपल्या दृष्टीस पडतात. स्वराज्याच्या हक्कांच्या दृष्टीने हिंदुस्थान हे एक स्मशानच नाही काय ? स्मशानांत श्रीमंताच्या कबरीवर मौल्यवान अशी एकादि छत्री असो किंवा गरिबांच्या मृत देहांवर लहानसा क्रॉस असलेली एखादी काठी असो. पण दोहोंत तत्त्वदृष्ट्या फरक नाहीं. हिंदुस्थानांत मोठमोठे देशभक्त आपापल्या शक्तीप्रमाणे कार्ये करीत असतांना शांत झाले. पण त्यांच्या आकांक्षा तशाच राहिल्या. ज्या दिवशी आपले स्वातंत्र्य गेले त्याच दिवशी आपण राजकीय दृष्टीनें मृत झालो. दादाभाई नौरोजी, रानडे, गोखले, टिळक यांनी प्रयत्न करून स्वराज्य मिळविण्याची खटपट केली. तथापि त्यांच्या इच्छा अतृप्तच राहिल्या. हिंदुस्थानच्या या स्मशानभूमीत त्यांच्या अतृप्त वासनांवरील कोरलेली चिन्हें आजहि स्पष्ट दिसत आहेत. तथापि हे असे असले तरी आशावाद सोडून उद्योग बंद करणें मला पसंत नाहीं. मनुष्याने आशावादी राहून आपला उद्योग

करीत असावे यांतच यश आहे. प्रयत्न केला असतां आपल्याला कधीतरी यश येईल हे माझे ब्रीदवाक्य असल्याने या माझ्या प्रयत्नास सर्वांकडून सहानुभूति व आशीर्वाद मिळावा हेच युक्त असून तसा तो मिळत आहे यांतच मला आनंद वाटतो."

**मुंबईकरांचा निरोप**—( वर्तमानपत्राचा उतारा )—हा निरोप देण्याला दूर नागपूरपासून मडळी आली होती. ब्राह्मणसभेत सुमारे अडीचशे परस्थ लोक जमले होते. अध्यक्ष या नात्याने बॅरिस्टर जमनादास मेहेता म्हणाले—

"श्री. तात्यासाहेब केळकर हे तिसऱ्या गोलमेज परिषदेकरितां जात आहेत. गोलमेज परिषदेला जाऊन स्वराज्याचे भरीव हक्क आपणास मिळतील अशी केळकरांची अपेक्षा नाही. परराष्ट्रीय राजकारण व लष्करी खाते यांवर हिंदी राष्ट्रीय सरकारची हुकमत चालल्याशिवाय हिंदुस्थानला खरे स्वराज्याचे हक्क मिळाले असे होणार नाही. व पहिल्या दोन गोलमेज परिषदांचे अहवाल पाहिल्यास ही दोन खाती हिंदी लोकांच्या ताब्यांत देण्यास ग्रेटब्रिटन तयार होईल असे वाटत नाहीं. श्री. केळकर हे तिसऱ्या गोलमेज परिषदेत हिंदी लोकांच्या आकाक्षा काय आहेत हे स्पष्टपणें मांडतील. श्री. केळकर हे गोलमेज परिषदेला जात आहेत याबद्दल कांही लोक बोटें मोडीत आहेत. परंतु हे टीकाकार म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांत मात्र अहमहमिकेने शिरून तेथे कामे करीत आहेत. म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांमध्ये काम करण्यास जर या लोकांना कांही दिक्कत वाटत नाही, तर या संस्थां-पेक्षा अधिक महत्त्वाचे व राष्ट्रीय स्वरूपाचे प्रश्न ज्या परिषदेपुढे येणार आहेत, व ज्या परिषदेला महात्मा गांधीना जाण्याचा मार्ग सुकर व्हावा अशी लोकांची इच्छा आहे, त्या गोलमेज परिषदेला श्री. केळकर हे हजर राहिले तर त्यांत कोठे बिघडते हे मला समजत नाही. श्री. केळकर हे राष्ट्रीय पक्षाचें म्हणणे तेथे स्पष्टपणे मांडतील. गोलमेज परिषदेला जाणे म्हणजे तेथे जे जे ठरेल त्याला मान्यता देण्या-प्रमाणें आहे असें म्हणणे हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे. ही एकच वेळ अशी आहे कीं ज्यावेळी सरकारने बिनचूक गोष्ट केली. कारण, लोकनियुक्त प्रतिनिधि पाठविण्याचे ठरले असते तरीहि श्री. केळकर यांचीच या भागातर्फे निवडणूक झाली असती !"

"डॉ. मुंजे यांनीं थोडक्यांत भाषण करून श्री. केळकर यांना तिसऱ्या गोलमेज परिषदेकरितां सरकारने निमंत्रण केलें याबद्दल आनंद व्यक्त केला व ते

म्हणाले की, " आज हिंदु समाजाची बाजू गोलमेज परिषदेपुढे राष्ट्रीय दृष्टया समतोल बुद्धीने मांडण्यास जर कोणी लायक गृहस्थ असेल तर ते श्री. केळकर हे होत. " खासदार नारायणराव गुंजाळ यांनी श्री. केळकरांच्या अभिनदनपर भाषण केल्यावर एरडोलचे श्री. पु. गो. जोशी यांनी असे सुचविले की, "गेल्या दहा वर्षातील निवडणुकीचा अनुभव पहातां साक्षरतेचा प्रसार झाल्याविना मतदारांची सख्या वाढविली गेल्यास योग्य उमेदवार निवडून येणे कठिण जाईल, तरी गोलमेज परिषदेच्या निदर्शनास ही गोष्ट तात्यासाहेबांनी आणावी." यवतमाळचे तपस्वी डॉ. बाबासाहेब परांजपे यांनी श्री. केळकरांनी तिसऱ्या गोलमेज परिषदेचे निमत्रण स्वीकारले यावरून महाराष्ट्रांत अजून स्वतत्र बुद्धि कायम आहे असे सांगून, आपले समाधान व्यक्त केले, आणि श्री. केळकरांनी विलायतेत कोणतीं मते माडावी याबद्दल ठिकठिकाणच्या मंडळींनी ज्या सूचना केल्या त्याबद्दल त्यांना असा इषारा दिला की, " श्री. केळकरांसारख्या मुरलेल्या राजकारणी पुरुषाने विलायतेत काय सांगावे याबद्दल त्यांना सूचना करण्याचे कारण नाही."

" यानतर वऱ्हाड-मध्यप्राताचे पूर्वीचे दिवाण बॅ. रामराव देशमुख यांचे विचारपरिप्लुत असें भाषण झाले. ते म्हणाले की, " श्री. केळकराना वऱ्हाडच्या प्रश्नाबद्दल गोलमेज परिषदेपुढे आमची बाजू मांडण्याबद्दल आम्ही सांगितलेच आहे. भावी फेडरेशनबद्दल मला श्री. केळकरांना नम्रतापूर्वक असे सुचवावयाचे आहे की, भावी राज्यघटनेत शेषाधिकार प्रांताकडे न जातां मध्यवर्ती सरकाराकडेच राहतील याबद्दल त्यांनी जरूर खटपट करावी. फेडरेशनला मान्यता देणे याचा अर्थ आमच्यांत एकराष्ट्रीयत्व नाही अशी कबुली देणे हा आहे. पण शेषाधिकार मध्यवर्ती सरकाराकडे राहिल्यास आज ना उद्या एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेची जोपासना तरी होण्याची आशा राहील." प्रांताच्या पुनर्रचनेसंबंधाने ते म्हणाले की, "सांप्रतची अनैसर्गिक प्रांतरचना मोडून ज्या त्या लोकांचा इतिहास व संस्कृति लक्षांत घेऊन भाषावार प्रांतरचना होणे आवश्यक आहे." शेवटीं प्रजासत्ताक राज्यपद्धति सुरळीत चालण्याच्या दृष्टीने प्रांतांनाहि दुहेरी कायदेमंडळे असणे आवश्यक आहे असे मत त्यांनी प्रदर्शित केले. उमरावतीचे आमदार बाबासाहेब खापर्डे यांनी असे सांगितले कीं, दुहेरी कायदेमंडळें अस्तित्वांत आणल्यानें लोकसत्ताक राजपद्धतीच्या मार्गांत नसत्या अडचणी मात्र उत्पन्न होतील,

तेव्हां प्रांतांत तरी दुहेरी कायदेमंडळे अस्तित्वांत येऊं नयेत. धारवाडचे आमद जोग यानी सुचविले की, श्री. केळकरांनी आर्थिक स्वायत्तता हिंदुस्थानाला दि जाण्यावर गोलमेज परिषदेत विशेष जोर द्यावा.

"ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांची भाषणे झाल्यावर अध्यक्षांनी श्री. तात्यासाहेबां भाषण करण्यास विनंति केली. त्याप्रमाणे श्री. केळकरांनी भाषण केले. ते म्हणाले "आपण दूरदूरच्या ठिकाणांहून येथे येऊन माझ्याशी विचारविनिमय करून जो प्रेमाच निरोप देत आहां त्यामुळे मजवरील कार्याची जबाबदारी वाढत आहे. वस्तुतः का आटोपून परत आल्यावर विलायतेत माझ्या हातून जी कांही अल्पस्वल्प कामगिर घडेल ती आपणांस पसंत पडून नंतर जर आपण माझा गौरव केला असतां तर बरे झाले असते. पहिल्या गोलमेज परिषदेला मला व डॉ. मुंजे यांना निमंत्रणे आली. मी निमंत्र स्वीकारले नाही. परंतु डॉ. मुंजे यांना मुद्दाम पुण्यास बोलावून आग्रहाने निमंत्रण स्वीकारण्यास मी सांगितले. या वेळी आलेले निमंत्रण मी विचार करूनच स्वीकारले हिंदु महासभेचा अध्यक्ष असल्यामुळे हिंदु समाजाच्या हिताचे राष्ट्रीय दृष्टय संरक्षण करणे हे माझे कर्तव्य होते. मी गेली दहा वर्षे संस्थानी प्रजाजनांच्य चळवळीत लक्ष घालीत आहे; व भावी राज्यघटना ठरत असतांना गोलमेज परिषदेपुढे त्यांची बाजू मांडण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या कार्यकर्त्यांनी मला तसे सांगितलेहि आहे. वऱ्हाडचा प्रश्न गुंता गुंतीचा. माझे ऋणानुबंधी स्नेही वऱ्हाडांत फार. त्यांचे काम हे माझ्या स्वतःच्य कामापेक्षांहि अधिक महत्त्वाचें असे मी समजतो. याशिवाय एकदर राष्ट्रीय पक्षाच्या मागण्या काय आहेत हे स्पष्टपणे पुढें मांडले जाणे आवश्यक आहे."

"श्री. न. चिं. केळकर हे तिसऱ्या गोलमेज परिषदेला गेले त्या वेळी त्यांच्या कार्यांत त्यांना यश यावे म्हणून ज्यांनीं संदेश पाठविले त्यांचीं नांवे पुढे दिली आहेत—

**वऱ्हाड**—अकोला : श्री. प. चिं. जोगळेकर, गं. बा. बापट, वा. ल. चिपळुणकर, शि. पा. अभ्यंकर, म. के. सोमण, स. बा. केळकर, गो. कृ. चितळे, अ. स. आठल्ये, बुलढाणा, स. अ. कानिटकर, बी. एच्. जतकर यवतमाळ, वीर वामनराव जोशी, ना. स. बामणगांवकर, अमरावती.

**नागपूर**—डॉ. मुंजे.

**पुणें**—श्री. द. ग. काळे, श. रा. दाते, अध्यक्ष हिंदुसभा, ल. र. गोखले, मेंबर, मुंबई कौन्सिल; डॉ. ना. भि. परुळेकर, स. सकाळ, रा. ब. हणमंतराम रामनाथ, अध्यक्ष व्यापारी संघ पुणे, व्ही. बी. नाईक, अध्यक्ष स्नेहसर्वधक मंडळ, अ. वि. पटवर्धन, राजाराम रामदासी, अध्यक्ष हिंदु स्टूडंट्स् लीग, प. रघुनाथशास्त्री, पी. डी. दीक्षित, अहमद हरून जाफर.

**मुंबई**— श्री. दा. ग. विजयकर, सं. प्रभु प्रभात, माधवराव गोडबोले.

**इतर गांवें**—पंत प्रतिनिधि, संस्थानाधिपति औंध, रामचंद्र गोविंदराव ऊर्फ तात्यासाहेब भुइंजकर भुइंज, पु. ल. ओगले, शहापूर, मद्रास, एन्. डी. वरदाचारियर, ना. नटेसन्, श्री. द. वि. कोल्हटकर, जळगांव, बा. वि. शिखरे इस्लामपूर, श्रीमंत सर गंगाधरराव पटवर्धन, अधिपति सं. मिरज, सेक्रेटरी, स्टेट पीपल्स सोसायटी सांगली, आर. बी. खेडकर व ब. गो. कुलकर्णी सांगली, शिवबाळप्पा देशमुख सोलापूर, वा. ना. देशपांडे, सातारा, अ. गो. गानू, कुरुंदवाड, रा. ब. काळे, सातारा, र. पां. करंदीकर, सातारा, ग. ल. पागे, मंगळवेढे, द. प. चिंवाळकर, अमळनेर, रा. कृ. पुराणिक, पनवेल, रा. श. राजवाडे, सोलापूर, वि. कृ. जोशी, सांगली, गा. मो. फणसे, पेण, पा. बो. जोशी हैद्राबाद (दक्षिण), दा. मो. भट, मिरज, डॉ. वैशंपायन, सोलापूर, ए. एस्. भिडे, सेक्रेटरी सहकारी मित्र मंडळ, वाटेगांव, पांडुआण्णा शिराळकर कऱ्हाड, लक्ष्मणराव देशपांडे कऱ्हाड, अध्यक्ष हिंदु-महासभा वाई, गो. कृ. देशपांडे पंढरपूर, डॉ. द. बा. केळकर, धुळे, गोविंदराव बिनिवाले, आठवले व राजवाडे सांगली, गोपाळराव देसाई, देवळाली, वामनराव नाईक, हैद्राबाद, खरे शिरपूर, बंडोपंत जोशी, देवगड, उपळेकर कोल्हापूर, हिवरगांवकर अहमदनगर, आठवले वानिवडे, रा. ल. लघाटे, मालगांव ( मिरज ), डॉ. हिंगोराणी, कराची, शास्त्रलु, मद्रास.

पुणें महाराष्ट्र नागपूर वऱ्हाड या तीनहि प्रांतांतील माझ्या पक्षाच्या मंडळीची मला गोलमेज परिषदेचें निमंत्रण स्वीकारण्यास संमति होती. नाही म्हणावयास बापूजी अणे हे कॉंग्रेसच्या धोरणांत व कार्यक्रमांत विशेष रीतीनें गुरफटले गेले असल्यामुळे त्यांना माझें जाणें पसंत नव्हतें. पण बुलढाण्याचे

वकील रा. कानिटकर यांनी वऱ्हाड समितीतर्फे संमतीच नव्हे तर वकीलपत्रहि दिले होते. यामुळे अणे यांची नापसंती केवळ व्यक्तिशःच ठरली.

ही गोष्ट स्पष्ट करण्याकरितां त्यासबंधी कांही पत्रेच देतोः—

( ता. २६।११।३२ ) गोलमेज परिषदेमध्ये वऱ्हाडच्या लोकांतर्फे स्वतंत्र प्राताची मागणी माडण्याची कामगिरी तुम्ही पत्करली हे वाचून आनंद झाला. आमचा वऱ्हाड प्रात हा स्वतत्र करावा व फेडरेशनमध्ये इतर प्राताप्रमाणे स्वतंत्र प्रात म्हणून त्याची गणना व्हावी अशी आमची इच्छा आहे. या बाबतीत रामराव देशमुख, दादासाहेब खापर्डे इत्यादि लोकानी तुम्हाला लिहिले असेलच. याबद्दल आम्ही एक मेमोरियल म्हणजे अर्ज तयार केला होता. गतवर्षी मी दुसऱ्या गोलमेज परिषदेला गेलो होतो. त्या वेळी लॉर्ड सॅकी यांच्याशी वऱ्हाडसंबधी माझे बोलणे झाले व त्यांना यासंबधी मी एक टिपणहि दिले. वऱ्हाडचा प्रश्न चालू गोलमेज परिषदेपुढे निघेल किंवा नाही पहावे. तुमचे पत्र कानिटकरांना रावळपिंडी बोटीवरून आले. त्याची प्रत त्यांनी मला पाठविली. वऱ्हाडांतील मुसलमानाचा विरोध वऱ्हाड प्रांत स्वतत्र होण्याला नाही. परंतु वऱ्हाड हा निजामाला द्यावा किंवा नाही असा प्रश्न निघाल्यास ते त्या मागणीला विरोध करणार नाहीत. म्हणजे वऱ्हाड निजामाला न दिला तर तो फेडरेशनमध्ये एक स्वतंत्र अवयव व्हावा याला त्यांची ना नाही. तुमच्या पत्रांतून सर अकबर हैदरी यांचे व तुमचे बोलणे होऊन मुद्यांचे टिपण झाले ते मी पाहिले, आणि ते असावे तसेच आहे अशी माझी समजूत झाली. निजाम सरकारला दरसाल २५ लक्ष रुपये देणे, त्यांच्या जन्म दिवशी तोफांची सलामी देणे, इत्यादि सन्मानाच्या खुणा निजाम सरकारला हव्या तितक्या द्याव्या. त्याला आमचीहि हरकत नाही. पण ज्या अर्थी वऱ्हाड निजाम सरकारकडे जात नाही तोपर्यंत तो स्वतंत्र प्रांत समजला जावा; इतकेच आमचे आग्रहाचे म्हणणे आहे. ( एस्. बी. तांबे, पूर्वीचे एक वेळचे गव्हर्नर, नागपूर. )

( ता. २।१२।३२ ) आमच्या वऱ्हाडच्या प्रश्नाचे काय होते ? तुम्हांस आमची मागणी मांडण्यास केव्हां संधि मिळते याकडे आम्ही लक्ष लावून बसलो आहोत. तुम्ही प्रश्न काढलात की, "थांबा, फिरून वऱ्हाड निजामालाच देऊन टाकूं अशा धमक्या सुरूं होतील. किंवा सर अकबर हैदरी आणखी कांही तरी

मेखा मारून ठेवतील हेहि संभवनीय आहे. हिंदुस्थान सरकार काय किंवा निजाम काय दोघांनाहि तूर्त वऱ्हाडचा प्रश्न लोंबकळत ठेवावयाचा आहे. पुढे मागे परस्परांच्या वादांत त्याचा उपयोग करण्याचा त्याचा डाव आहे. आमचे मात्र पहाणे असें की, वऱ्हाडचे जे व्हावयाचे ते आतांच होऊन जाऊ द्या.

"वऱ्हाडच्या प्रश्न तुम्ही हाती घेतला असल्यामुळे वऱ्हाडच्या लोकांची बाजू तुम्ही उत्कृष्ट मांडाल असा आम्हास भरवसा आहे. आम्ही आज गप्प बसलो तर पुढे निजाम आणि हिंदुस्थान सरकारचे अत्यंत लाच खाऊ पोलिटिकल डिपार्टमेंट याच्या तावडीत आम्ही सापडू. दोघेहि डाकूच!" (रामराव देशमुख, अकोला.)

(ता. २।१२।३२) तुमचे मार्सेल्सहून १२ नोव्हेंबरचे पत्र आले ते पोचले. वऱ्हाड इंडियन फेडरेशनमध्ये स्वतंत्र विभाग म्हणून सामील होणार, त्याच्या हक्काच्या आड हैद्राबादच्या शिष्टमंडळाने येऊन हरकत काढू नये अशाविषयी तुम्ही हैद्राबादकराचे मन वळवू शकलात हे वाचून समाधान वाटले. आतां नवीन घटनाकायद्यांत वऱ्हाडाला फेडरेशनमध्ये निजामच्या संमतीखेरीज सामील होता यावे अशी तजवीज तुम्हाला करून घेता येईलसे वाटते. (रामचंद्र अनंत कानिटकर, वकील, बुलढाणा.)

(ता. १२।१।३३) बापूजी अणे दिल्लीकडे निघाले आहेत. त्यांना तुमची गाठ घ्यावयाची होती आणि ती तुम्ही दिल्लीस जाण्यापूर्वी पडली तर हवी होती. आज सकाळी खासगी रीतीने प्रांतातील लोकांची सभा झाली त्या सभेला बापूजी हजर होते. तुम्ही गोलमेज परिषदेपुढे वऱ्हाडसंबंधी भाषण केले त्याची प्रत मला मिळाली. ती मंडळीपुढे ठेवण्यात आली व सर्वांनी ते भाषण पसंत केले. आम्ही जो अर्ज केला आहे त्याला धरूनच ते आहे हे सांगावयास नकोच. रावळपिंडी बोटीवरून तुम्ही पाठविलेल्या संभाषणाच्या टिपणांत एक वाक्य असे होते की, "वऱ्हाडच्या लष्करी संरक्षणाच्या खर्चाच्या ज्या रकमेला निजाम मान्यता देईल, त्याचा बोजा वऱ्हाडच्या उत्पन्नावर राहावा." परंतु अशी गोष्ट काय म्हणून व्हावी ? परंतु सर्वच गोष्टी अजून अनिश्चित आहेत. (एस्. बी. तांबे, नागपूर.)

(ता. १४।१।३३) तुम्ही विलायतेहून परतल्याचे वाचले. फ्री प्रेस पत्राच्या प्रतिनिधीला तुम्ही दिलेली मुलाखत वाचली. तीत तुम्ही म्हटलें आहे.—

"वऱ्हाड हा निजामाला देण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. फक्त वऱ्हाडवर निजामाचा कांही तरी दुरून हक्क पोचतो, इतकेच दर्शविण्याची खूण शिल्लक ठेविली म्हणजे झाले. आणि अशीच योजना गोलमेज परिषद ठरवील." नागपूर कायदेमंडळाचे वऱ्हाडचे सर्व सभासद ता. १९ रोजी येथे जमणार आहेत. तरी त्यांच्यापुढे ठेवण्याकरितां कांही अतस्थ बातमी तुम्हाला पाठवितां आली तर पहा. तुम्ही परत येतांच तुमच्यामागे काम पुष्कळच लागणार. तथापि अशी कांही माहिती लिहून पाठविण्यास तुम्हाला वेळ झाला तर मी तुमचा आभारी होईन.— ( एस्. बी. तांबे, नागपूर. )

तिसऱ्या गोलमेज परिषदेत मी काय काम केलें याचें इतिवृत्त परत आल्यावर छापून वाटले त्यांत दिले आहे. त्याची पुनरुक्ति येथे करीत नाही. लंडन येथे माझा मुक्काम नोव्हेंबर १२ पासून डिसेंबर पंचवीसपर्यंत होता. हॅन्स क्रेसट नामक एका प्रतिष्ठित हॉटेलांत राहिलो होतो. रा. ताम्हनकर बी. ए. यांनीं माझ्या सेक्रेटरीचे व व्यवस्थापकाचें काम पत्करले होतें आणि ते त्यांनी चागलें केले. परिषद व इतर सभा समेलन, भेटी परतभेटी, यांचें काम सर्व दिवसभर पुरत असे. परिषदेचे काम फारसे आशाजनक होण्याचा रंग दिसत नव्हता. पूर्वी म. गांधी गोलमेज परिषदेला गेले त्यावेळी ते इतर पुढाऱ्यांशी सहकारितेने वागले नाहीत, आपल्या लहरी चढेल आणि अहमन्यस्वभावाने त्यांनी कार्य नासलें, अशी तक्रार सप्रू जयकर इत्यादि करीत. गांधीजीच्या या धोरणाने गोल-मेज परिषदेतील प्रतिगामी लोकांना चागलेच फावले असे दिसून येत होते. आम्ही दहा बारा लोक एक विचाराने वागत होतों. तथापि नाताळच्या सुटीच्या निमित्ताने सरकाराने परिषदेच्या कामांत गडबडगुंडा करून काम आवरतें घेतले. नाताळचा पहिला दिवस होतांच मी हिंदुस्थानला परत यावयास निघालो. पूर्वी न मिळालेली अशी यूरोपचा प्रवास करण्याची संधि सहज चालून आली होती. पण हिंवाळ्याचे दिवस अशा प्रवासाला सोईचे नाहीत यामुळे तो बेत रहित केला. परदेशांत आजारी पडण्यापेक्षां यूरोप पहाण्याचा आनंद गमावणे बरे असे मनाशी ठरविले.

१९१९ व १९३२ या दोन साली मला विलायतेंत रहावें लागलें त्यांत मला जो अनुभव आला त्यावरून मला विलायतेत युरोपांत राहणे प्रवास करणे एकंदर मानवण्यासारखें नाहीं असें ठरलें. यामुळेंहि पुन्हा १९३३ सालीं गोलमेज परिषदेचे

निमंत्रण मला आले तें मी नाकारले. माझे शाकाहारित्व मला नडले नाही. इतकेच काय शाकाहार संभाळूनहि मला प्रकृति सुदृढ ठेवतां आली. परंतु तिकडील सर्व कामकाज सकाळी अकरा वाजतां सुरू होते. त्यापूर्वी भूक चांगली लागत नाही. आणि भरपूर आहार केल्यावर चागली सुमारे तासभर तरी विश्रांति हवी अशी इकडे मला संवय झाली आहे ती विश्रांति मिळत नाही. यामुळे बारापासून दीडवाजेपर्यंतचे काम कटाळवाणें होते. झोपेची नड जांभया देऊन भागवावी लागते. सभेच्या कामात भाग घ्यावयाचा ठरले असल्यास त्या ताणामुळे झोपच प्रत्यक्ष येत नाही, पण झोप न आल्याने होणारा शीण टळत नाही. मधल्या दीडाच्या सुटीत फराळ केला तर फिरून झोप येण्याची आपत्ति. न खाल्ले तर रात्री आठ वाजेपर्यंत उपवाशी राहावे लागे. परिषदेचे काम पांच वाजता संपले तर खासगी सभा व चर्चा यांचे काम सुरू होई. दुसरी गोष्ट खासगी मुलाखतींची. टिपण ठरले तर ते संभाळले पाहिजे हा मनाला मोठा धाक व ध्यास राही. ते साधावयाचे तर त्याचा वेध आधी बराच वेळ लागून इतर काम होत नसे. सर्वात मोठी अडचण दिवसभर कोट पाटलोणीसकट सगळे अवजड खोगीर अगावर घालून बसण्याची. आगगाडी बस-सर्व्हिस हा नक्की साधणें ही देखिल अडचण वाटे. मी असावा तितका चपळ नाही इतकाच त्याचा अर्थ.

विलायतच्या या दुसऱ्या मुक्कामांत खासगी कार्य-प्रसगांची निमंत्रणे इतकी येऊन पडत की त्यांतल्या एखाद दुसऱ्यालाच हजर राहतां येई. पण बाकीच्यांना न गेले तरी 'येतां येत नाही याबद्दल वाईट वाटते' अशी औपचारिक पत्रोत्तरे रोज पाठवावी लागत. एखाद्या फराळाला जेवणाला गेलें तर तें तब्बल दीडदोन तासांचें कृत्य होई. इकडे केसरीकडे खासगी पत्रे पाठविण्याचा मनाचा तगादा त्यांतच असे. अधिक खर्चण्याला भरपूर द्रव्य-साधन असते तर लघु-लेखक कारकून शिपाई इत्यादि ठेवून बरेंच काम सुकर करतां आलें असते. निदान मुख्य कामाशिवाय इतर कोणतेहि काम मागें नाही असे असेल तर निभावेल. पण माझी स्थिति सर्वच दृष्टींनीं असमाधानकारक होती. आणखी एक गोष्ट अशी कीं, मला वायफळ औपचारिक गप्पागोष्टी मारण्याचा कंटाळा आहे आणि इंग्रजी पद्धतीनें सफाईदार भाषेने त्या मारतां येत नाहींत. कोठेंहि जेवणाफराळाला जा, एक मिनिटभर तोंडाला विश्रांति मिळावयाची नाही. एकच हवेचा प्रश्न किंवा मुद्दा. तो दिवसांतून दहवेळ निरनिराळ्या तऱ्हांनीं बोलावा लागतो. इंग्रजाला आपल्या हवेची कोणी निंदा केलेली आवडत नाही आणि तिला

चांगली म्हणण्याचा योग क्वचितच येतो. शेजारी एखादी बाई बसली असली म्हणजे तिच्या शिष्टपणाच्या, संभावितपणाच्या, दाक्षिण्याच्या भावना सभाळून बोलणे कठिण होऊन बसते. तात्पर्य, विलायत युरोप हे मानवण्याला माझी शरीर-प्रकृति व मनःप्रकृति दोन्ही पुऱ्या प्रतिकूल असे अनुभवाला आले. पण आतां पुन्हां तिकडे जाण्याचा प्रसगहि नाही म्हणा !

आतां या दुसऱ्या खेपेच्या सफरीची कांही प्रास्ताविक हकीकत सागावयाची. पण लंडनला गेल्यावर प्रथमच वर्तमानपत्राच्या बातमीदाराने मला विचारल्या-वरून त्याला मी जी हकीकत सागितली तीच मुलाखत अनायासे उपलब्ध असल्याने प्रश्नोत्तररूपाने सांगतोः—

प्रश्न—आपली ही विलायतेस येण्याची दुसरी खेप नव्हे काय ?

उत्तर—होय, दुसरी. पण पहिली खेप सपवून परत गेलो तेव्हा पुनः मी विलायतेस येईन अशी कल्पना मला स्वप्नांतहि आली नाही; व मनातून तशी विशेष इच्छाहि पण नव्हती. माल माझे एक गुजराथी स्नेही शेट दीपचद जव्हेरी यांच्या घरी ( न. ६० टॉलबट रोड बेस वॉटर येथे ) लो. टिळक, मी, बासूकाका जोशी, खापर्डे वगैरे मडळी राहत होतो, तेव्हा दीपचद मला नेहमी म्हणत असत की, " केळकर, तुम्ही पुनः विलायतेस येणार खास असे माझे भविष्य आहे. तर केव्हा येणार ते सांगा " तेव्हा मी त्याना म्हणे की, " मी पुनः येणार हे भविष्य जर तुम्ही करता तर केव्हा येईन याचेहि भविष्य तुम्हांला कां करता येऊं नये ? मला तर तूर्त सभव दिसत नाही. " सुमारे २-३ वर्षापूर्वी अहमदाबादेच्या शेतकरी परिषदेचा अध्यक्ष म्हणून काम सपवून मी मी सुरतेस जव्हेरीशेठ यांचा पाहुणा म्हणून गेलो. तेव्हांहि त्यांनी पूर्वीचीच गोष्ट काढली. तेव्हां मी त्यांना म्हणलो, " तुमच्या भविष्याला आता मुदतीचा कायदा लागणार ! तेव्हां ती बात सोडून द्या. " पण कांही लोक कायद्यांतील मुदत होऊन गेली तरी इमानाने ऋण फेडतात. त्याप्रमाणे जव्हेरीशेट यांच्या भविष्याचे झाले आहे. कारण पुऱ्या १३ वर्षानंतर पुनः मी विलायतेला आलो ! आणि मौज ही की पूर्वी एका २९ तारखेला मुबईस आगबोटीत बसलो व बरोबर त्या म्हणजे २९ तारखेसच या खेपेसहि मुंबईस आगबोटीत बसलो.

प्रश्न—सामानसुमानाची तयारी कशी काय झाली ?

उत्तर—पहिल्या खेपेपेक्षां पुष्कळच त्वरित झाली. पण फकीर बैरागी लोक खरे सुखी. कारण हिंदुस्थानाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत केवळ खांद्यावर वाहून नेण्याइतक्या सामानाने त्यांचे काम सहा ऋतु व तीन काळ भागते. पण एखाद्या विरागी माणसालाहि स्वतःच्या नसला तरी दुसऱ्याच्या हव्यासाच्या आग्रहापासून उपद्रव होतो. म. गांधी यांना प्रवासाला किती थोडे सामान लागत असेल याची कल्पना कोणीहि करील. पण मला असे समजतें कीं १९३१ सालीं त्यांच्या प्रेमाखातर इतर मंडळींनी मुंबई बंदरावर बोटीवरील त्यांच्या खोलीत इतके सामान भरून दिले कीं, त्याची वाट कशी लावावी यावर तीन दिवस एक कमिशन बसून, सभासदांचा मतभेद होऊन, महात्मा गांधींना निर्णयाचा सर्वाधिकार आपल्या हातीं घेऊन निम्म्याहून अधिक सामान एडनहून मुंबईस परत पाठवावें लागलें !

प्रश्न—आपला प्रवास एकंदरीने कसा काय झाला ?

उत्तर—एकंदरीने प्रवास फारच सुखकर झाला. फक्त जुन्या प्रवासाची याहि खेपेला बरोबर पुनरावृत्ति व्हावयाची होती म्हणूनच की काय नेमके भूमध्य समुद्रांत प्रवासाच्या शेवटल्या दिवशीं बारा तास वादळ झाले. पण उद्यांपासून समुद्रप्रवास संपला या खुषीत असल्यामुळे त्याचे आम्ही काही मानलें नाहीं. पूर्वीच्या प्रवासात तेव्हा जर्मनीशा पक्का तह न झाल्यामुळे आमची बोट मार्सेल्सला लागली नाही यामुळें अटलांटिक महासागर व इंग्लिश चॅनल यांमधून आणखी ८-९ दिवस समुद्रप्रवास करावा लागला होता. तो मात्र या खेपेस टळणार ही आनंद वाटण्यासारखीच गोष्ट होती.

प्र.—तर मग आपण फ्रान्सची भूमि यंदाच प्रथम पाहिली म्हणावयाची ?

उ.—होय. पण येतांना भूमि पाहिली इतकेंच पाहिले. कारण मार्सेल्सहून संध्याकाळी ४॥ वाजतां आगगाडींत बसलो तो कॅले बंदरावर दुसरे दिवशी दोन प्रहरीं एकाचे सुमारास येऊन पोचलों. वाटेत पॅरिस शहर लागले. खुद्द पॅरिस स्टेशनावर गाडी उभी राहिली. पण पुण्याची पॅसेंजर गाडी भायखळ्यावर थांबते तितका वेळ थांबली. तितक्या अवधींत मीं प्लॅटफॉर्मवर उतरून पॅरिस जितके 'पादाक्रांत' करतां येईल तेवढें केलें. म्हणजे खरा फ्रान्स अजून मला पहावयाचाच आहे. मात्र आदले दिवशी दोन तास व दुसरे दिवशी ६ तास आगगाडींतून फ्रान्सचा प्रदेश

भरपूर पाहावयास सांपडला. तसेच रात्री चांदणे होते यामुळे भिंगाच्या खिडकी-तून कांही वेळ पहात बसलो होतो.

प्र.—हा प्रदेश पाहून आपली काय कल्पना झाली ?

उ.—कल्पना हीच की इकडे हिंदुस्थानसारखे मोठे भूभाग कांहींच दिसत नाहींत. डोंगर नद्या भेटल्या तरी हिंदुस्थानाच्या मानाने लहान. पण सपाटी असो, डोंगराळ असो, सगळ्या भागावरून माणसाचा हात फिरला आहे असे स्पष्ट दिसते. रानवट किंवा इंग्रजींत ज्याला ‘ वाइल्ड ’ असे म्हणतात असे कोठेंच कांही दिसले नाही. हिंदुस्थानप्रमाणे मोठे वृक्ष नाहींत. आहेत ते सुरूच्या झाडासारखे म्हणजे बारीक पानांचे असतात. मात्र सरळ उंच असतात. आणि पाहावे तेथे लागवड करून मुद्दाम लावल्यासारखे हारींच्या हारींने दिसतात. गाई-मेंढ्यांच्या कळपाकरितां राखलेली मोठमोठी कुरणे देखील नव्या दिल्लीतील हरळी-गवताच्या राखीव मैदानाप्रमाणे सपाट दिसतात. बागबगीचे विस्तृत असे कोठेच नाहींत. थोड्या जागेंत पुष्कळ पीक काढण्याची विद्या सफळ झाल्यामुळे लहान लहान तुकडे करून लागवड करतात तसे दिसते. बांधउरोळ्या कोंकणच्या बांधासारख्या. एक गोष्ट विशेष दिसली की फ्रान्समध्यें आगगाड्यांचा फैलाव फार. बहुतेक सर्व वाटभर रेल्वे यार्डांतूनच जातों की काय असे भासत होतें. मधून मधून जंक्शनें व रेल्वेच्या शाखा बऱ्याच आढळत. उलट सुलट जाणाऱ्या गाड्यांचीहि रहदारी बरीच दिसली. असे दोन तीन मैलहि जात नव्हते कीं जेथें एखादें लहानसें खेडे रेल्वेलगत नव्हते, व जें पहावें ते टुमदार व नमुनेदार. विजेची रोषनाई नाहीं असें गांव क्वचितच दिसलें व खेडेगांवांत वीज कशी परवडते याचें आश्चर्य वाटले. खेडीं सांधणारे रस्ते व रानांतील रस्ते अरुंद पण अत्यंत नीटनेटके व वळणदार. रस्ता अरुंद ठेवण्यांत खर्चाची जी बचत होत असेल ती तो रस्ता दुरुस्त ठेवण्यावर खर्च होत असावी.

प्र.— आगबोटीवरील दिवस सहवासाच्या दृष्टीनें कसे गेले ?

उ.—पूर्वीच्या खेपेपेक्षां यंदा बोट मोठी आणि गर्दी कमी होती. कारण विलायतेला जाण्याचा आतां उलटा मोसम होता. तेव्हां सुलटा होता. यामुळे या खेपेस अगदीं जरूरीच्या कामानिमित्त जाणारी तेवढी मंडळीच बोटीवर होती. सुदैवानें मला सर्वांत वरच्या डेकवर खोली व तीहि सिंगल

हणजे एका माणसाची असल्यामुळे मी खालच्या डेकवर क्वचितच आई.
रचे माझे डेक मला पुरून उरण्याइतके होते म्हणून हिंडून फिरून वाचून वेळ
ालवीत होतो. अपरिचिताशी आपण होऊन ओळख करून घ्यावी किंवा नसत्या
ोष्टी उकरून काढून बोलाव्या याचा मला कंटाळा आहे. शिवाय ज्या कामाकरिता
ाघालो त्यासंबधीच वाचावयाचे कितीतरी होते. खाली येणेजाणे जेवणापुरते किंवा
ोबरच्या हिंदी प्रतिनिधीशी बोलण्यापुरते.

प्र.—मग तेथे गोलमेज परिषदेविषयी बरीच चर्चा होत असेल ?

उ.—होत होती. पण याविषयी मनमोकळेपणानें बोलणे होई ते सप्रू,
ायकर, मी, व सर कावसजी जहांगीर यांच्यामध्येच होई. इतरांपैकी सर
कबर हैदरी, डॉ. शफत अहमदखान व वाजायत हुसेन याच्याशी संभाषण
ाई. हैदरी यांच्याशी मी वऱ्हाडासंबधाने बोलत असे; कारण वऱ्हाडची मागणी
शी आहे की आपला प्रांत हिंदी प्रांतापासून अलग व स्वतंत्र व्हावा, पण
ेजामाच्या राज्यात परत जाऊ नये. डॉ. अहमदखान याच्याशी हिंदु-मुसल-
ानांच्या संबंधी कांही भाषण होई, पण अधिकाराने बोलण्याइतके ते जबाबदार
ाहीत असे दिसले. पण इतिहासाचे प्रोफेसर म्हणून त्याच्याशी गप्पा मारीत
ोतो. वाजायत हुसेन हे काश्मिर संस्थानचे प्रतिनिधि व तरुण सिव्हिलियन आहेत.
ी पूर्वी विलायतेला गेलो तेव्हां केंब्रिज येथे त्याची गाठ पडली होती. त्याच्या
ांगण्यात असे आले की, काश्मिरच्या महाराजाचे मुसलमान प्रजेशी वागण्याचे
ोरण खरोखरीच चांगले आहे व दंगेधोपे होतात ते फालतू माणसांकडून होतात.
ेवाय बाहेर गवगवा ऐकू येतो इतका मुळात बखेडा नाही. काश्मिर संस्थान
ेडरेशनमध्ये सामील होऊं इच्छितें असेहि दिसले.

प्र.—सप्रू, जयकर व आपण या त्रिवर्गांच्या संभाषणांत काय निष्पन्न
ाले ?

उ.—सप्रू, जयकर या दोघांनाहि परिषदेच्या फलश्रुतीबद्दल थोडी चिंताच
ाटत होती. पण मध्यवर्ती सरकार जबाबदार करण्याचा प्रश्न न निघेल, किंवा
ेघून काम चालण्याची अपेक्षा लागतील, तर आपण त्यापुढे परिषदेच्या कामांत
ाग घेऊं नये असे माझ्याप्रमाणे त्यांचेहि म्हणणे दिसले. एकंदरीने पुढाकी का

नात्याने सप्रू यांचा रोख बरा दिसला. आपल्यावर इतरापेक्षांहि कांही विशेष जबाबदारी पडत आहे ही जाणीव त्याना असलेली दिसली.

प्र.—लंडनमधील मुक्कामाची सुखसोय आपणांस कशी वाटते ?

उ.— ही सुखसोय पूर्वीपेक्षा या खेपेस मला यंदा विशेष रीतीने करूनच घ्यावी लागली आहे. पूर्वी उन्हाळ्यात आलो. यदा भर हिंवाळ्याशीं गाठ पडली आहे. पर्वो चिटणीस म्हणून आलो, हल्ली यजमान किंवा स्वतःचा प्रतिनिधि या दोनहि कारणामुळे विशेष चांगल्या प्रतीची जागा घेऊन, विशेष चांगल्या पद्धतीने राहावे लागत आहे व त्याप्रमाणे करीतहि आहे. यामुळे सुखसोयीचा प्रश्न फारसा उरलेला नाही. खर्च मात्र किती होईल हे न सांगितलेलेच बरे.

प्र.—पण सरकार भत्त्याच्या रूपानें प्रतिनिधींना कांहीं रक्कम देणार आहेना !

उ.—ते तर उघडच आहे. पण तो सर्व भत्ता सपून बहुतेक प्रतिनिधीना पदरमोड बरीच करावी लागेल.

प्रश्न—येथील मुक्कामाचा अदाज काय आहे ?

उ—सर्वच बाजूंनी नाताळाची मजल दिसते. तशी उचलच आहे. तसें झाले तर मला आनदच वाटेल. कारण माझ्यासारख्या बैठ्या वृत्तीच्या माणसाला कारणाशिवाय एक दिवसहि अधिक या असल्या हवेत राहणे आवडणार नाही. याचा अर्थ कामच लाबले तर हवेला कंटाळून ते टाकून देऊन जाईन असे मात्र नाहीं.

प्रश्न—मग याहि खेपेस युरोपखंड पहाण्याची आपली इच्छा साधणार नाही.

उ.—मी स्वतः प्रवासाचा कटाळा करणारा असल्यामुळे बहुधा एकदमच हिंदुस्थानास परत जाईन. कारण या हिवाळ्यांत युरोप झालें तरी इंग्लडासारखेच. जॉन्सनप्रमाणेच मीहि असे म्हणणारा आहे की, I want to see but I do not want to go to see " पहावेसें वाटते, पण पहाण्यासाठीं उठून जावेसें वाटत नाही." अर्थात् माझ्यासारख्या माणसाला कोण कृपाळू उपकारी देवदूत खाकेत मारून हिंडून जग दाखविणार ? तेव्हा डोळे मिटून कल्पना करून किंवा डोळे उघडून लेखीं वर्णने वाचून भूगोलाचे ज्ञान मिळवावे झाले.

मी लंडनला पोचल्याच्या दुसऱ्याच दिवशी लंडन टाइम्सच्या बातमीदारालाहि माझी मुलाखत घ्यावीशी वाटली. ती मी दिली. तिची हकीकत त्या पत्रांत आली ती तशीच या खाली ( भाषांतर करण्याच्या कंटाळ्यामुळे ) इंग्रजीतच देतो:—

Mr. N. C. Kelkar, who, at the Round Table Conference represents, among other interests, the Hindu Mahasabha, was received and welcomed on arrival in London, along with official representatives and the Press, by his numerous Indian friends.

Mr. Kelkar had visited England in 1919 as a member of the Deputations which gave evidence before the Joint Parliamentary Select Committee on behalf of the Indian National Congress and the Indian Home Rule League. He confessed that in his opinion there was a great difference between the position of Indian politics then and now. One of the principle points of difference was that the Deputations had then come to England, along with other individual witnesses, to suggest alterations, not so much in the principle as textual provisions of the bill, relating to Indian Reforms, which was already introduced in the Parliament. The position in 1932, on the occasion of Mr Kelkar's second visit to England, was obviously materially advanced, as the two Round Table Conferences had already met and the third was now meeting to discuss principles and plans of a very comprehensive scheme of Indian Reforms, possibly going up to the point of an All India Federation, by the far more acceptable method of discussion and agreement as far as possible across the table. Further the coming Joint Select Committee, though relating to a bill, which would be framed as a result of the deliberations of all the three Round Table Conferences, was to be held before the bill itself would be introduced in the Parliament. The two things together evidently meant that full latitude should be available for persuasion, and perhaps even mild political pressure, on either side with

a view to the framing of a bill of reforms calculated to take into consideration both the principle of self–determination and the exigencies of the political situation with regard to Parliamentary Government For all these reasons Mr. Kelkar considers that the final session of the Round Table Conference is a very important one, involving, however, for the same reason, great responsibility not only upon the non-official members but also upon the Indian States' Representatives, and perhaps more especially on the British Delegation to the Conference. Mr. Kelkar said he could not possibly make a guess as to how the situation would develop. But he hoped that the Communal questions had been practically settled, whether agreeably or disagreeably to certain communities. The field is now ready and open for the Indian States' Representatives to come forward with their much valued verdict as to whether they would enter the Federation or not. And in case a reasonably considerable number of the States express their willingness to join the Fedration, the Conference would naturally and necessarily have to give the first place to what should be done about the Federation itself. For responsibility in the Centre appears somehow to be made dependent upon the States coming into the Federation, although there was also, as is well-known, another view of the matter. As for Provincial Autonomy that seems to be already so much a matter of common ground, that neither the Conference nor the outside world feel great or particular interest in it, in relation to a Round Table Conference of this nature, where the chosen representatives of the three realms of the Empire have been invited for common deliberation at such great cost and inconvenience.

As for himself, Mr. Kelkar said, he was called upon to attend the Conference at very short notice, as must have also been the case with a number of other members of the

Conference, who found it impossible for them to attend here on the 15th, which at first was stated to be a peremptory date for the Commencement of the Conference.

ही हकीकत अशी देण्याचे कारण हे की, लंडन टाईम्सारख्या एका अत्यंत वजनदार पत्रांत जबाबदार रीतीने मी गोलमेज परिषदेच्या स्वरूपाविषयी व फलश्रुतीच्या कल्पनेविषयीं जे मत पूर्वीच प्रगट केले ते या प्रकरणी नमूद झालेले असावे.

गोलमेज परिषदेच्या कामाला ता. १७ नोव्हेंबर रोजी सुरुवात होऊन ते ता. २३ डिसेंबर रोजी संपले. अध्यक्षाच्या जागी प्रथम मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड, नंतर लॉर्ड सॅंकी, व सॅंकीच्या अभावीं स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर हे बसत.

परिषदेच्या कार्यक्रमाविषयी मी पहिल्याच दिवशी तक्रार मांडली. कारण गौण विषय प्रथम चर्चेला घेऊन वेळ घालवावयाचा, व पुढे वेळ थोडा म्हणून गडबडगुंडा करून महत्वाच्या विषयांना टाळा द्यावयाचा असा बेत दिसला. तेव्हां रॅम्से मॅक्डोनाल्ड म्हणाले की, तसा कांही आपला हेतू नाही. कार्यक्रमांत कोणाला बदल करावा असे वाटल्यास सभासदांना परवानगी दिली जाईल. त्याप्रमाणे मी वऱ्हाड, ब्रम्हदेश, मूलभूत हक्क इत्यादि विषय पुढे सुचविले आणि त्यांच्या चर्चेला वेळ मिळविला. सर सप्रू व सर मनुभाई मेथा यांनीहि असेच कांही विषय सुचविले. शिवाय ता. १२ डिसेंबर रोजी भरलेल्या आमच्या नॅशनलिस्ट पार्टीच्या सभेत ठराव होऊन कार्यक्रमाच्या अडचणीबद्दल अध्यक्षांना पत्र लिहिण्यांत आले, त्यानें माझ्या मूळच्या तक्रारीला पाठिंबा मिळाला.

या पत्रांत असे सुचविले होतें कीं, किरकोळ गोष्टी मागे टाकून फेडरेशनची घटना, संस्थानांचा त्यांत प्रवेश, लष्करी खातें, आणि मध्यवर्ती सरकाराचे अधिकार व हिंदी प्रतिनिधींना त्यांत मिळणारी सत्ता या गोष्टींना फार महत्व असल्यामुळें त्यांची चर्चा कसून व्हावी आणि त्याला वेळेची सबब सांगितली जाऊं नये.

पण अखेर वेळेचा संकोच झालाच. यामुळें कांहीं कांहीं प्रश्नांच्या विचाराकरितां उपमंडळें नेमण्यांत आली आणि शेवटीं अगदी आयत्या वेळीं त्यांचे रिपोर्ट नुसते दाखल करून घेण्यांत आले. त्यांवर फारशी चर्चा झाली नाहीं.

परिषदेत मी एकंदर सात विषयांवर भाषणे केली आणि मेमोरॅंडम्सच्या रूपानेहि कांही मुद्दे व चर्चा परिषदेच्या कागदपत्रांत दाखल होईल अशी तजवीज आग्रहपूर्वक केली.

मी दिलेल्या लेखी कैफियतीत, (१) मांडलिक संस्थानिक जहागिरदार यांच्या हक्क संरक्षणाची जामीनकी, (२) संस्थानिकांचा फेडरेशनमध्ये लोकनियुक्त प्रतिनिधिद्वारां प्रवेश, आणि (३) कॅम्यूनल अवार्ड (जातिनिर्णय) या विषयावरील माझे म्हणणे मांडले होते. या तिसऱ्या कैफियतीवर बॅ. नानकचंद व सरदार तारासिंग यानी मजबरोबर सह्या केल्या होत्या. माझ्या भाषणाचे विषय खालीलप्रमाणे होते. (१)कार्यक्रमात फेरफार, (२)मतदारांच्या लायकीचे नियम, (३) शेषाधिकारचा प्रश्न, (४) गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांचे राखीव अधिकार, (५) राष्ट्रसंरक्षण आणि सैन्य, (६) जनतेचे मूलभूत हक्क, (७) वऱ्हाडचा प्रश्न.

असो; गोलमेज परिषदेतील माझ्या कामासंबंधाने एक गोष्ट मुद्दाम सांगावीशी वाटते ती ही की माझे अकारण वैरी विविधवृत्तकार यांनी विलायतेंत असतांनाहि माझी पाठ सोडली नव्हती. गोलमेज परिषदेस गेलेल्या एका निनांवी गृहस्थाची साक्ष देऊन त्यांनी माझे गो. मे. परिषदेतले काम वाईट झाले असें लिहिले होते. याला उत्तर असेंब्लींतील माझ्या कामकाजाविषयी लोकमत हे तर होईलच. गो.मे. परिषदेंतील माझ्या सर्व भाषणांचा रिपोर्टच मी छापला आहे ! पण एक स्वतंत्र अभिप्राय परवा सहज कागदपत्र चाळीत असता आढळला तो देतों.

(ता. १५।२।३३) "तिसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्समधील तुमचे काम तुमच्या व माझ्या देशाला उपयुक्त असेच झाले. या देशसेवेबद्दल हिंदी लोक तुमच्याशी कृतज्ञ रहातील यांत शंका नाही. (सर मनुभाई मेथा, दिवाण, बिकानेर).

पण या शिवाय गोलमेज परिषदेत झालेले माझे एक भाषणच देतो. म्हणजे त्यावरूनहि माझे काम कसे काय झाले हे कळून येईल. फेडरेशन झाले तरी शेषाधिकार कोणाकडे रहावें, म्हणजे मध्यवर्ती सरकाराकडे की प्रांतिक सरकाराकडे, या विषयावरील तें भाषण आहे. ते असेः—

गोलमेज परिषदेपुढे जे अनेक महत्त्वाचे प्रश्न आहेत त्यांत संयुक्त सरकाराचे अधिकार किती व कोणते असावे हा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. मुसलमा-

नांच्या ज्या मुख्य चौदा मागण्या आहेत त्यांत प्रातिक सरकाराकडे सर्व शेषाधिकार असावे अशी आग्रहाची मागणी आहे. संस्थानांनाहि हेच पाहिजे. या दोन्ही पक्षाची योजना अशी की सयुक्त सरकाराच्या घटनेमध्ये बिशिष्ट अधिकार नांवनिशीवार देऊन ते मुख्य मध्यवर्ती सरकाराकडे ठेवावयाचे, व बाकी राहिलेले सर्व अधिकार प्रातांनी भोगावयाचे. त्याच्या मते अशी वांटणी झाल्याशिवाय पूर्ण प्रातिक स्वायत्तता मिळाली असे होत नाही. परंतु एकंदरीत राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने पाहतां मध्यवर्ती सरकाराचा लगाम सैल झाला की प्रातिक सरकारे व सस्थाने आपल्या राज्यांत वाटेल तो धुमाकूळ घालतील अशी परिस्थिति येणे बरे नाहीं

हिंदुस्थान सरकार व स्वराज्याचे इतर घटक याच सबध काय असाव, त्यांना कोणकोणते अधिकार असावेत, यासबंधी व विशेषतः शेषाधिकाराच्या प्रश्नासंबंधी मला काही विचार पुढे माडावयाचे आहेत. प्रथमतःच मला एक गोष्ट सागावीशी वाटते ती ही की, या शेषाधिकाराच्या प्रश्नात ज्ञातिविषयक आग्रहाचा विशिष्ट रंग असू नये व नाहीहि. मि. जिना यांनी मुसलमान समाजातर्फे म्हणून जे सुप्रसिद्ध चौदा मुद्दे मांडले त्यांत हा प्रश्न गोवल्याकारणाने याला ज्ञातिविशिष्ट स्वरूप आले आहे. हिंदु सभेने ही मागणी मान्य केली नाही. त्याबरोबरच हेहि लक्षांत ठेवले पाहिजे की, हिदुस्थानाचे काहीं हिंदु प्रांत व कांहीं मुसलमान प्रात असे ज्ञातिनिष्ठतेच्या दृष्टीने झाले तरी, त्यामध्ये हिदु प्रांतांची संख्या अधिक असणार यांत शका नाहीं. आणि म्हणूनच, जर शेषाधिकार मध्यवर्ती सरकाराकडे रहावे, प्रांतांकडे राहूं नयेत, असे मी म्हटले तर मी हिंदूंच्या हिताविरुद्ध बोलतो असे होईल. पण तसे शक्य नाही. म्हणूनच मला अशी विनंति करावयाची आहे की, या प्रश्नाचा विचार तात्त्विक मुद्दयावरच व्हावा. निदान मी तरी या बाबतीत पूर्णपणे निःपक्षपातबुद्धीने बोलतो आहे असे आपण समजावें.

आपणा सर्वांना माहीत आहे कीं, राज्यशास्त्राचा विचार करणारे लोक संयुक्त राज्यपद्धतीचे दोन प्रकार कल्पितात. एक व्यष्टीकडून समष्टीकडे जाणारा प्रकार, व दुसरा समष्टीकडून व्यष्टीकडे येणारा. पहिल्या प्रकारांत मध्यवर्ती सत्ता ही मुख्य धरावयाची व त्या सत्तेचा कांही भाग प्रांतांना तोडून द्यावयाचा. हे प्रांत किंवा घटक पूर्वी स्वायत्त नसतात किंवा स्वतंत्र नसतात. या घटकांस

मुख्य सत्तेशी गट्टी करून संयुक्त राज्यपद्धति अमलांत आणण्याची विनंति केलेली असते. म्हणूनच मुख्य सत्तेचे कांहीं अधिकार या प्रांतांना वांटून द्यावयाचे असतात. दुसऱ्या प्रकारांत प्रांतिक सत्ता किंवा घटक पूर्वीचेच स्वतंत्र असतात. त्यांनीं आपल्या पूर्वीच्या अधिकारांपैकीं कांहीं अधिकार मध्यवर्ती सत्तेला द्यावे अशी विनंति त्यांना करण्यांत येते व अशा रीतीनें संयुक्त राज्यपद्धति बनते. यामुळे ज्या प्रांतांनीं शेषाधिकार, म्हणजे जी सत्ता किंवा जे अधिकार, मध्यवर्ती सत्तेला दिलेले नसतात ते त्यांच्याकडे राहतातच. परंतु आज हिंदुस्थानांत जी पद्धति आपण उत्पन्न करूं पाहतो ती या प्रकारची नाहीं. ती पहिल्या प्रकारची म्हणजे समष्टीपासून व्यष्टीकडे अधिकारदान जीत होतें अशी आहे. आज मध्यवर्ती सत्तेलाच सर्व अधिकार आहेत, व ती सत्ता हे अधिकार प्रांतांना देणार आहे. तेव्हां जे अधिकार मध्यवर्ती सत्तेने वांटून दिल्यानंतर शिल्लक राहतात ते मध्यवर्ती सत्तेकडेच राहिले पाहिजेत हे सहज आहे. जे अधिकार मध्यवर्ती सत्ता प्रांतांच्या स्वाधीन करील त्यांची नांवनिशी दिली पाहिजे. म्हणजे शिल्लक उरणारे अधिकार मध्यवर्ती सत्तेचेच राहतील यांत शंका काय ? आज आपल्यास ही अधिकारवांटणी कशी करावयाची हे ठरवावयाचे आहे. लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीत अधिकारांचे केंद्रीकरण अगदीं पराकोटीला गेलें. आतां उलट प्रकार सुरूं होणे साहजिकच आहे.

१७७४ चा 'रेग्युलेटिंग ॲक्ट' होण्यापूर्वी मुंबई, मद्रास, बंगाल हे प्रांत हिंदुस्थानांतील एका मध्यवर्ती अशा सत्तेखालीं नव्हतेच. ती मध्यवर्ती सत्ता इंग्लंडांत होती. ही पद्धति वरील कायद्यामुळे बदलली. १८५८ मध्ये कंपनीचा कारभार बंद होऊन इंग्रजी साम्राज्यसत्ता तो कारभार पाहूं लागली. या बदलाबदलीत फक्त मुख्य धनि बदलला. परंतु सत्तेचे केंद्र इंग्लंडांतच राहिलें. हीच केंद्रीकरणाची पद्धत सर्व खात्यांतूनहि चालू होती व त्या त्या खात्यांच्या अधिकाऱ्यांच्या हातीं सर्व सत्ता असे. चाळीस पन्नास वर्षांपूर्वी ज्याप्रमाणे वऱ्हाडांत दिवाणी, मुलकी, फौजदारी व न्यायखात्याचे अधिकार पुष्कळ वेळा एकाच अधिकाऱ्याच्या हातीं असत त्याप्रमाणेच पूर्वी स्थिति होती. लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीत तर या केंद्रीकरणाचा कळस झाला.

१९०७ सालापासून मात्र प्रतिक्रियेला सुरुवात झाली. त्या साली मुंबई इलाख्यांत अधिकारविभागणीच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं एक चौकशीमंडळ

नेमण्यांत आले व त्यापुढे लो. टिळक आणि ना. गोखले यांच्या साक्षीहि झाल्या. अधिकारविभागणीचे प्राथमिक स्वरूप असे दिसून आले की, गव्हर्नराने आपले काहीं अधिकार कमिशनरला दिले, कमिशनरने कलेक्टरला दिले, कलेक्टरने डे. कलेक्टरला दिले; व अशा रीतीने ते लोण अगदीं कनिष्ठ अधिकाऱ्यापर्यंत पोहोचविण्यांत आले अर्थात् हे झाले तरी ते खात्यांच्या चौकटीतच. त्याचबरोबर अधिकारविभागणीचा हा ओघ स्थानिक स्वराज्य संस्थापर्यंतहि पोहोचला. १९१२ साली शहरातील म्युनिसिपालिट्यांना व पुढें बोर्डांनाहि लोकनियुक्त अध्यक्ष असण्याचा अधिकार मिळाला. १९११ सालीं प्रथमच आमच्या कानावर 'प्रांतिक स्वायत्तता' हे शब्द पडले. त्यासाली सुप्रसिद्ध दिल्ली दरबार भरला त्या प्रसंगी केलेल्या भाषणांत राजेसाहेबांनी 'प्रांतिक स्वायत्तता' या शब्दांचा उच्चार केला. आपण झालो तरी या परिषदेत पूर्वीपासून चालत आलेल्या अधिकारविभागणीचीच पद्धति पूर्णांशाला नेण्याचा प्रयत्न करीत आहों. प्रत्येक प्रांत स्वयंघटित होऊन विशिष्ट बंधनांनी मध्यवर्ती संयुक्त सत्तेशी तो निगडित झाला, म्हणजे अधिकारविभागणीचे तत्त्व पूर्णपणे सिद्धीस गेले असें होईल. संयुक्त राज्यघटना अस्तित्वात आली आणि अधिकार-विभागणीची पद्धतिहि रूढ लागली, तरी मध्यवर्ती सरकाराची कल्पना शिल्लक राहतेच. आणि मध्यवर्ती सरकार असावयाचे तर ते समर्थ व कार्यक्षम असलें पाहिजे. यास्तव त्यालाच शेषाधिकार असले पाहिजेत.

असे समर्थ सरकार अनेक दृष्टीनी उपयुक्त असते. डॉ. सप्रू व बॅ. जयकर यांनी सांगितल्याप्रमाणे सर्व हिंदुस्थानामध्ये दिवाणी व फौजदारी कायद्यांत एकसूत्रीपणा राहण्यासाठी, इतर देशांशी असलेल्या राजकीय व व्यापार-विषयक संबंधांची पाहणी करण्याकरितां, तसेंच प्रांताप्रांतांमध्यें सीमान्तप्रदेशाबद्दल भांडण उपस्थित झाले असतां त्याचा निवाडा देण्यासाठी जबाबदार मध्यवर्ती सरकाराची अत्यावश्यकता आहे.

दुसऱ्याहि एका दृष्टीने मध्यवर्ती सरकार कार्यक्षम असणे योग्य होय. प्रांताप्रांतामधील आर्थिक बाबी ठरवून द्यावयाच्या वेळी वडीलकीच्या नात्यानें निर्णय करण्यास कोणत्या तरी वरिष्ठ सत्तेची गरज आहेच. हाच मुद्दा एका गोष्टीने अधिक स्पष्ट करून सांगण्यासारखा आहे. एकदा कोणा एका गृहस्थानें

मरताना आपल्या सर्व जिंदगीचे मृत्युपत्र केले व त्यांत तीन मुलांना एकद्वितीयांश, एकचतुर्थांश, व एकपचमांश असे भाग अनुक्रमे मिळावे अशी योजना केली. परतु पुढे असे आढळून आले की, त्या तीन मुलांमध्ये १९ हत्ती वांटावयाचे होते! बरे, बापाच्या इच्छेप्रमाणे प्रत्येक मुलाला यथाप्रमाण वांटा मिळावयाचा तर काही हत्ती कापावयाची आपत्ति ओढवणार! मुलांना हे कोडे जेव्हा उलगडेना तेव्हां ते आपल्या सल्लागाराकडे गेले. त्याने थोडा विचार करून १९ हत्तीत आपला एक मिसळला व वडील मुलाला १०, मधल्या मुलाला ५, धाकट्याला ४ हत्ती देऊन ते कोडे सोडविले. गोष्टीतील तात्पर्य अगदी उघड आहे. सयुक्त घटनेत प्रांत हे वयांत आलेल्या मुलाप्रमाणेच होत. अर्थात् मध्यवर्ती सरकारापासून अडचणीच्या प्रसगी सल्ला घेण्यास प्रांतांना लाज वाटण्याचे काहीच कारण नाही. अधिकारविभागणी ( डीसेंट्रलायझेशन ) व अधिकारसक्रमण ( डेव्होल्यूशन ) ही पूर्णतः यशस्वी व्हावयाची तर मध्यवर्ती सरकार आणि प्रातिक सरकारे यामधील विषयविभागणी कशी करता येईल या गोष्टीचा या परिषदेने कसून विचार केला पाहिजे.

याशिवाय पार्लमेंटच्या इमारतीत एका उदारमतवादी व पार्लमेंटचा सभासद असलेल्या विदुषीने मला, डॉ. सप्रू, ना. जयकर इत्यादि लोकांबरोबर, जेवावयाला बोलाविले. त्या प्रसंगी आयत्या वेळच्या मागणीवरून मी भाषण केले ते इग्रजीतच देत आहे.

[ Speech at a lunch in the House of Commons in honour of the R. T. C. delegates.]

"I join with my friends Dr. Sapru and Mr. Jaykar in expressing our gratitude to the hostess for giving us this lunch and opportunity to meet you all here this evening And as I have been called upon to speak, I shall express my mind also in my own way in a few words. Since coming to London a number of friends have been asking me as to how I feel like, in relation to this Conference. And I shall tell you what I have been telling these friends that I still find myself to be "in the wood", in the sense that I do not see the light beyond it. I only hope that on going back to India I may

not have to tell my people that I was in a wilderness, whose acoustic properties also were so bad that it did not even give back an echo ! ! I was here in 1919, thirteen years ago, in connection with similar work For I had come as secretary and member of the Home Rule League Deputation and a member of the Congress Deputation

During these thirteen years, this wonderful country of yours must have changed enormously owing to the after-effects of the War. But your landmarks, in respect of British Indian politics at any rate, do not seem to have changed. For even to-day, as then, I find the same Conservative Party with its empty blessings, the same Liberal Party, with its cooly calculated caution, and the same Labour Party, with its great gushing good-will to India but with its absolute impotence ! Of course, I take my hat off to that band of fifty Labour Members in Parliament who have kept the flag flying. But they are in a plight which deserves *our* sympathy just we in India deserve *your* sympathy I feel, confident, however, that a day will come when with the assistance of the Labour Party, India will gain what she wants But I must tell and warn you that the landmarks in *Indian* politics have changed For in 1929 the Congress actually passed a resolution in favour of independence, and the President of the Congress actually planted with his own hand the flag of independence. You may ask me what has come out of that. I know we have not got actual independence out of it But that at any rate shows how far India has advanced in point of political feeling.

So far about the general position. Coming back to the Round Table Conference, we are, of course, glad that the Conference is again meeting as a Round Table Conference. But we really yet do not know where we are. For on the one hand, the Prime Minister assures us, and I believe in

his sincerity, that the White Paper, embodying the intentions of Government declared in it, will be carried out to the letter and the comma. But on the other hand, there is Mr. Churchill who said, what you know, only two days ago. He said that the Conference was only for consultation, in fact for talking things over with us Indeed, he at least said that we who have come here are "cultured and estimable gentlemen,"—and I say, 'even for this small mercy, thanks !' But he said that Government was not at liberty to arrive at conclusions or at any rate to make any commitments And that if any commitments were made, he and his "storm troops"—meaning thereby his Conservative followers, were ready to upset the apple cart (A voice—Oh, you take Mr. Churchill too seriously.)

Well, whatever it is, the threat is there. And in the Conference itself, we find something like what he said. As soon as I came here, I raised the question about the agenda of the Conference and I suggested that more important questions should be taken up first for discussion But that was not done. And we are wasting precious time over such matters as the franchise. Of course, we are glad about some decisions that have been taken, e. g the recognition given to Women and Labour in the electorate and special provision made for their representation in the Legislature. But the more important questions such as Responsible Government in the Centre still remain. And the Chairman is reminding us again and again that the Conference would end on 20th December. He almost seems to say, "Beware of the *ides* of December" just as the sooth-sayer, or whoever he was in Shakespear's Julius Caesar, was warning Caesar to "Beware the *ides* of March !" He would almost seem to be making fun of the time-limit whenever a speaker exceeded his allotted length in speech. That, gentlemen, is the plight

in which we find ourselves here. And, therefore, it is for you people—independent people of England—to extend your help and sympathy to enable us to see the matter through

आता गोलमेज परिषदेच्या या सहा आठवड्यांत माझे अवांतर कार्यक्रम काय झाले ते थोडक्यांत सांगतो (पुढील मजकूर केसरीच्या बातमीदारातर्फे म्हणून केसरीत प्रसिद्ध झाला होता.)

"रा. केळकर यांना येथे आल्यास सुमारे दोन आठवडे झाले. या अवधीत त्यांनी अंडर सेक्रेटरी ऑफ स्टेट मि. बटलर, स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर, व मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड इतक्याच्या मुलाखती घेतल्या. त्यानंतर त्यांनीं माजी भारतमंत्रि मि. वेजवुड बेन यांची मुलाखत घेतली. या मुलाखतीसंबंधाने विशेष सांगण्याचे असे की, बेनसाहेब हे हल्ली तर स्टेट सेक्रेटरी नाहीतच, व गोलमेजचे सभासदहि पण नाहीत. गेल्या निवडणुकीत ते निवडूनहि आले नाहीत. तथापि लॉर्ड आयर्विन व वेजवुड बेन यांनी मिळून गोलमेज परिषद भरविण्याचे श्रेय घेतले, व विशेषतः गतवर्षी म. गांधी यांची मुक्तता करून कॉंग्रेसशी तह करविला, ही गोष्ट कोणीहि हिंदी मनुष्य विसरणार नाही. यामुळे रा. केळकर हे त्यांना कर्तव्य म्हणून भेटण्यास गेले. या गोष्टीची जाणीव बेनसाहेबानांहि होती असे दिसले. केळकरांनी त्यांना लिहिलेल्या पत्रांत थोडे कुचेष्टेने असें म्हटलें होते की, "कालचक्राच्या फेऱ्याचा आम्हाला अनुभव आहे; तसा तुम्हाला आला याबद्दल वाईट वाटते." यालाच अनुलक्षून बेनसाहेब केळकरांना म्हणाले की, "मी स्टेट सेक्रेटरी नसतां तुम्ही मला भेटायला आला याचा मला विशेष आनंद होतो." कदाचित् या म्हणण्याचा त्यांचा अर्थ मनांतून असा असावा कीं, "जे हिंदी लोक मी स्टेट सेक्रेटरी असतां मला आवर्जून भेटण्याला आले त्यांनीं मी पदच्युत झालों म्हणून आता माझी गाठ घेण्याचे प्रयोजन ठेवले नसावें." आणि प्रमुख हिंदी गृहस्थ त्यांना या खेपेस भेटण्यास गेले नाहीत हेंहि खरेंच !

"बेनसाहेबांच्या स्वभावाचा परिचय त्यांच्या भाषणावरून वगैरे झाल्यानें त्यांच्या संबंधाने जे मत हिंदुस्थानांत लोकांचे होते तेंच केळकरांना प्रत्यक्ष अनुभवास आलें. म्हणजे मनुष्य अतिशय खुल्या मनाचा उत्साही व दिलदार दिसला. विनोद बुद्धीने व्याज निषेध करून बेनसाहेब केळकरांना म्हणाले की, १९३० साली आम्ही

सर्वांनी मुद्दाम ठरवून तुम्हालाहि निमंत्रण दिले होते. परतु तुम्ही आला नाहींत हा माझा तुम्ही मोठा अपराध केला आहे.” आणि मग मौजेने त्या वेळचा गोलमेज परिषदेचा थाटमाट, भपका, राजे लोकाचे पोषाख, नाताळामधील गमती खेळ वगैरेसंबधाने त्यांनी खूप रंगवून वर्णन केले. या सर्वांना तुम्ही उगीच मुकला असे थट्टेने केळकराना म्हणण्याचा त्यांचा हेतु होता. पण तो जाणून केळकर त्याना इतकेच म्हणाले की, मग अशा डामडौलाच्या गोलमेजाच्या परिषदेच्या वेळी तुम्ही स्टेट सेक्रेटरी होता याचाच तुम्हाला मोठा अभिमान वाटत असावा असे दिसते! या दीड तासाच्या मुलाखतीत बेनसाहेबांनी केळकरांना आतल्या बाहेरच्या अशा पुष्कळ गोष्टी सांगितल्या. बेनसाहेबाचे कुटुंब हेहि आदरातिथ्य करणारेच आहे. त्यानी आम्हाला जाण्यापूर्वी मुद्दाम कॉफी करून दिली.

“दुसरी मुलाखत मि. लॅन्सबरी याची. तीहि गेल्या गुरुवारी सायंकाळी पार्लमेंटच्या सभागृहांत झाली. १९१९ साली केळकर याची मि. लॅन्सबरी यांच्याशी ओळख झालेलीच होती व ती अद्याप तशीच कायम आहे. लॅन्सबरी हे तेव्हा नुकत्याच निघालेल्या ‘डेली हेरल्ड’ पत्राचे सपादक होते; व लो. टिळकानी मजूरपक्षास हस्तगत करण्याकरिता होमरूल लीग फंडातून खूप मोठी रक्कम त्यांना दिली होती. अर्थात होमरूल लीग संबंधाने वगैरे हेरल्ड पत्रात मजकूर लिहिणे व लिहविणे याकरितां, तसेच गांवांतील सभा भेटी वगैरे ठरविण्याच्या कामाकरिता, टिळकांबरोबर केळकरांना लॅन्सबरीसाहेबांना नेहमी भेटावे लागे. तेव्हां मजूर पक्षांत त्यांचा दर्जा दुय्यम होता; पण प्रामाणिकपणाच्या दृष्टीनें त्यांना तेव्हां स्वपक्षांत बराच मान असे. आणि आजहि मजूरपक्षाची उतरंड सगळी ढांसळली असताहि मि. लॅन्सबरी हे मात्र गेल्या क्रातिकारक निवडणुकींत निवडून आले, व आज पार्लमेंटामध्ये ‘अपोझिशनच्या’ म्हणजे विरुद्ध पक्षाच्या पुढारीपणाचा मान त्याच्याकडे आला आहे. माणूस सच्चा पण कर्तृत्व तितकेंसे नाही. यामुळे या त्यांच्या मानाला अनुलक्षून ‘एरंडोऽपि द्रुमायते’ असें त्यांच्याविषयी कांही कुत्सित लोक म्हणतात. पण माळावर इतर झाड उगवूंहि शकत नाही तेथे एरंड हा तरी ताठ उभा राहतो ही त्यांची स्तुति किंचित् निंदागर्भ असली तरी खरीच आहे. निदान माळावर उगवून मेलेल्या रोपट्यांना तरी एरंडाची निंदा करतां येणार नाही. लॅन्सबरीसाहेबांचा हेरल्ड पत्राशी संबंध

आतां राहिलेला नाहीं, आणि ते पत्रहि राजकारणापेक्षां 'चहा चिवडा चिरूट' अशा बेतावेंच झाले आहे.

"गुरुवारी संध्याकाळीं ठरल्याप्रमाणे मि. लॅन्सबरी यानी केळकराची गाठ घेतली. केळकरांचें त्यांनीं उत्साहाने स्वागत केले. टिळकाच्या बद्दल त्यानी फार आदरपूर्वक उद्गार काढले. आणि त्यांच्या बरोबर एक मेयर होते ते कोण असेंहि विचारले ! याचा सबध असा होता की, १९१९ साली केळकर विलायतेला गेले तेव्हां ते पुणें म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष निवडून आले होते. या गोष्टीला अनुलक्षून लॅन्सबरीप्रभृति मडळीत "हे पुण्याचे लॉर्ड मेयर" असा केळकरांचा विनोदाने उल्लेख होत असे. त्यांना लडनच्या मेयरचे वैभव व महत्त्व माहीत. बिचारें पुणे किती गरीब व त्याचा मेयर किती कःपदार्थ हे त्यांना काय माहीत ? पण महत्त्वाचा शब्द मेयर एवढा लक्षांत राहिला होता. त्याची आठवण त्यांनीं दिली. श्री. विठ्ठलभाई पटेल याचीहि त्यांनी आठवण काढली. तेव्हांचे त्यांचे हस्तक बेन स्पूर हे वारल्याचा त्यांनी उल्लेख केला. हेरल्ड पत्रासबधाने त्यांनी जवळ जवळ तिरस्काराचे शब्द काढून "ते पत्र आतां लंडनच्या लक्षाधीशांच्या हातीं गेले असून त्याला लेबरपक्षापेक्षां ताज्या खुनाची माहिती अधिक महत्त्वाची वाटू लागली आहे, कारण भांडवलावर टक्के एरवीं कसे सुटणार ?" असें ते स्पष्ट म्हणाले. तथापि अजूनहि त्याच्या डायरेक्टर बोर्डावर मजूर पक्षाचे कांही लोक आम्ही ठेविले आहेत असे त्यांनी सांगितलें. लेबर पक्षांतल्या ज्या लोकांशी ( मि. मॅक्डोनाल्डसकट ) आतां त्यांचे बिघडले आहे, त्यांच्याविषयीं ते काय बोलले हे न लिहिलेले बरे. तेव्हां केळकर इतकेच म्हणाले की "जगभर राजकारण हे असेच आहे." गोलमेज परिषदेमध्ये आपण मजूर पक्षाचे सभासद पाठविले नाहीत याचे कारण त्यांनी असे सांगितले की "तुमच्या मनासारखें कल्याण करण्याची आज आमच्यांत शक्ति उरलेली नाही. आणि सपर्कानें उगाच वाइटाची जबाबदारी मात्र अगावर यावयाची." काय करावयाचे हे सरकारचे जवळ जवळ ठरल्यासारखेच आहे असे ते म्हणाले. पण असेंहि म्हणाले की, "सरकार तरी काय करणार ? पार्लमेंटात कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचे एवढे प्रचड बहुमत आहे की, यापुढे सर्वांनाच नमावे लागते."

"मजूर पक्षाच्या ऱ्हासाचा उल्लेख करून ते म्हणाले की, "आम्ही पार्लमेंटां आज पन्नासच लोक आहों पण एकजुटीचे आहों. म्हणून त्यांचा पुढारी या नात्या

मी हाती निशाण धरून ठेवले आहे. कितीहि निराशा वाटली तरी जागा सोडता येत नाही. प्रांतिक स्वायत्ततेशिवाय अधिक काही बिलात नसेल तर हिंदुस्थानात तुम्ही कोणी ते पत्करणार नाही याविषयी माझी खात्री आहे. पण फेडरेशन झाले व मग मध्यवर्ती सरकारात सत्ता तुमच्या अपेक्षेपेक्षा थोडी कमी मिळाली तरी तुम्ही ते टाकू नये असे मला वाटत." गांधी येथे आल्याचा उल्लेख केला. पण "त्यानाहि काही निष्पन्न करून घेऊन जाता आले नाही, हे मी पाहिले" असे ते म्हणाले. अशा प्रकारचे सुमारे अर्धा तास संभाषण होऊन लॅन्सबरी परत पार्लमेंटमध्ये जाण्याकरिता निघाले. तथापि 'या आमच्या गुंफेत तुम्हांला वाट सांपडणार नाही, मी दाखवितो" असे म्हणून केळकराचा हात धरून ते हौस ऑफ लॉर्डसपर्यंत पोचविण्यास आले. लॅन्सबरी याचे वय आज ७३ वर्षांचे आहे. पण त्याचे प्रचंड शरीर, जबडा, व भव्य कल्ले पाहून मला तर हिंडेनबुर्ग यांची आठवण झाली.

"ता. २० रोजी लंडन येथील सर्व महाराष्ट्रीयांना रा. केळकर यानी आपल्या हॉटेलात—हॅन केसट—चहापार्टी दिली. सुमारे ३५।४० लोक आले होते. त्यांतील बरेचसे अपरिचित होते. अर्थात् नवीन लोकाचा परिचय या दृष्टीने बराच लाभ झाला, व कार्यक्रमाचा हेतु लक्षात घेऊन ज्याना प्रत्यक्ष आमंत्रणे पोचू शकली नाहीत असेहि ५-४ गृहस्थ आवर्जून स्नेहभावाने आले. त्यांत बहुतेक येथे असलेल्या विद्यार्थ्यांचा भरणा होता व प्रौढ असेहि कांही लोक होते. पाच स्त्रियाहि होत्या. चहापान झाल्यानंतर सर्वजणानी एकत्र बसून गप्पागोष्टी थट्टा-मस्करी व गायन इत्यादि प्रकार अगदी खेळीमेळीने केले. त्यांतल्या त्यांत येथे एखादा महाराष्ट्रसंघ स्थापला जाण्यासंबंधाने चर्चा झाली. एकंदर कार्यक्रम इकडच्या पद्धतीने सुमारे एक प्रहरभर चालला होता."

लंडनच्या या मुक्कामांत लॉर्ड सॅकी, सर सॅम्युअल होअर, लॉर्ड आयर्विन (हॅलिफॅक्स), ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसचे हंफ्रे मिलफर्ड, प्रो. एडवर्ड थॉमसन, प्रोफेसर जिलबर्ट मरे इत्यादि गृहस्थांनी मला फराळाजेवणास बोलाविलें होते. वेळांत वेळ काढून मी ऑक्सफर्ड येथे जाऊन आलो. तात्पर्य अवघ्या सहा आठवड्याच्या मुक्कामात माझा बराच कार्यक्रम झाला.

ता. २५ डिसेंबर रोजी मी पॅरिस शहरी आलो तेथे तीन दिवस राहून सर्व

शहर पाहून घेतले व तेथून मार्सेल्सला येऊन आगबोटीत बसून मुंबईस ता. १२ जानेवारी १९३३ रोजी येऊन दाखल झालो.

यानंतर झालेल्या चौथ्या गोलमेज परिषदेचे निमंत्रण मला आले होते पण ते मी नाकारले.

"गो. परिषदेला मला तीनदा आमंत्रण आले व मी ते दोनदा नाकारले" या दोन वाक्यात मिळून माझ्या एकंदर राजकीय चरित्राचे सार आले असे म्हणतां येईल. पहिल्या वाक्याने सरकाराच्या दृष्टीने व राष्ट्राच्या दृष्टीने माझी योग्यता काय होती हे दिसून येते. आणि दुसऱ्या वाक्याने राजकीय पक्षोपन्यासात मी कोठे बसू शकतो हे दिसून येते. मी कधीहि सरकारदरबारी आपण होऊन न जाणारा, बोलून चालून टिळकाचा शिष्य व त्याचा शेषाधिकारी, व सर्वसामान्यरीत्या सरकाराला विरोधी असणाऱ्या पक्षात प्रमुख, असे असता सरकाराने मला गोलमेज परिषदे-ला एक प्रतिनिधि म्हणून आमंत्रण दिले ते, माझी विद्वत्ता, समाजांतील माझा दर्जा, माझे सार्वजनिक कार्य, व सर्वसामान्यरीत्या एक पुढारी या नात्याची माझी पात्रता, इत्यादि गोष्टी लक्षात घेऊन दिले ही गोष्ट कोणालाहि नाकबूल करता येणार नाही. मी प्रांतिक पुढारी या पदवीला तर पोचलो होतोच, पण अखिल भारतीय पुढाऱ्यांपैकी एक अशीहि माझी गणना होती.

असो, पण या सर्व गोष्टींव्यतिरिक्त मी हिंदुस्थानातला एक प्रमुख वर्त-मानपत्रकर्ता या दृष्टीनेहि सरकाराला माझी योग्यता मान्य करणे प्राप्त होते. आणि ते ती मान्य करीत होते हे मला गोलमेज परिषदेस दिलेल्या निमंत्रणा-वरून उघड झाले. मला सरकाराने निमंत्रण दिले ते वरील अनेकांपैकी नक्की कोणत्या गोष्टीला उद्देशून दिले हे सांगणे कठिण आहे. तथापि मी लोकमताचा एक ठळक पुढारी होतो ही गोष्ट त्याना मान्य करावी लागली यांत शंका नाही. मला निम-त्रणे आली ही गोष्ट आश्चर्यकारक असे कोणीहि म्हटले नाही.

आतां मी हे निमंत्रण दोन वेळां नाकारले याचा अर्थ काय होतो हे पाहूं. पहिली व मुख्य गोष्ट ही की मी गोलमेज परिषदेला जाण्यासाठी इतर कित्येक लोकांप्रमाणे हापापलेला नव्हतो. नाही तर ही सोन्यासारखी मोठेपणा मिळविण्याची व विलायतेची सफर बिनखर्चाने करण्याची संधि मी दोनदा कां गमावली असती! माझी मते नेमस्त आहेत असा आरोप मजवर कायमचाच आहे. पण मी लाहोरास

भर कॉंग्रेसमध्ये स्वातंत्र्य प्रस्थापनेच्या ठरावाला विरोध केला तेव्हां, "केळकरांना गोलमेज परिषदेला जाण्याची हौस आहे म्हणून त्यांचा विरोध स्वार्थी आहे" या अंदेशाची भर त्या नेमस्तपणाच्या आरोपांत पडली. माझे निंदक उघडपणे तसे म्हणूंहि लागले. बरे, पुढे सत्याग्रहाच्या चळवळीत मी एक दोन तीन वेळां कायदेभंग केला पण प्रत्यक्ष तुरुगात घालीपर्यंत कायदेभगाची पाठ पुरविली नाही व खरखरमुडेपणा केला नाही यावरून त्यानी माझ्या कृत्याला अगचोरपणाचे स्वरूप दिले ! व फिरून या अगचोरपणाचे कारण 'गोलमेज परिषदेला जाण्याची इच्छा' असेहि माझे शत्रू म्हणू लागले. किंबहुना गोलमेज परिषदेला मला जाता यावे म्हणूनच सरकारानें मुद्दाम होऊन माझ्यावर खटला भरला नाही, आणि या बाबतीत सरकाराशी माझा एक प्रकारचा कट किंवा सगनमत होतें, असेहि अनुमान काहींनी केले. गोलमेज परिषदेचे आमंत्रण नसणाऱ्या रा. बापूजी अणे याना सहा महिन्याची शिक्षा, व डॉ. मुंजे याना मात्र पहिल्या गुन्ह्याला एक दिवसाची व दुसऱ्याला एक आठवड्याची शिक्षा झाली, यावरूनहि वरील अनुमानाचे समर्थन कित्येकानी केले !

पण ही सर्व अनुमाने खोटी होती. सरकारच्या मनात काय असेल हें कोणी सांगावे ? पण निदान मला तरी निमंत्रण येईल अशी माझी अपेक्षा नव्हती. जे इतर चार लोक बोलावतील त्याच्याइतकी माझी योग्यता व हक्क होता हे मी केव्हाहि म्हणेन. पण या इतर चार लोकांपैकी काहीनी निमत्रण येण्याची खटपट केली तशी मी मुळीच केली नाही. फार काय पण मी इतकेहि शपथेवर सागण्याला तयार आहे कीं, ही निमत्रणे जाण्यांत ज्यांचा थोडासा हात होता अशा अधिकाऱ्यांशींच काय पण, सप्रू जयकर मदन मोहन यांच्यांशीहि गोलमेज परिषदेच्या निमत्रणांच्या विषयावर एक चकार शब्दहि मी कधीं बोललो नाही. आणि याविषयीं मला कोणीहि खोटा पाडू शकणार नाही हे मी प्रतिज्ञेवर सांगू शकतो. माझ्याबद्दल सप्रू जयकर कोणी मला निमत्रण देण्याविषयी सरकारी अधिकाऱ्याकडे परस्पर बोलले असले तर तें त्यांचे त्यांना माहीत. त्यांचा सल्ला लॉर्ड आयर्विन यांनी घेतला असल्यास त्यांनी मला निमंत्रण द्यावे असे अर्थातच सांगितले असेल. पण ते मी सत्याग्रहाच्या चळवळींत जोरानें पडलों नाहीं, किंवा कॉंग्रेसच्या धोरणाला विरोध करणारांपैकीं एक अशा अर्थानें नसेल; तर 'आखिल भारतीय पुढाऱ्यांपैकी महा-

राष्ट्राचा निर्विवाद प्रतिनिधि म्हणूनच असेल. त्यात व्यक्तिशः स्नेह्याच्या शिफारशी-चाहि संबध नसणार.

जयकराचा व माझा स्नेह असला तरी सप्रूंचा व माझा म्हणण्यासारखा स्नेह नाही. पण याहि पलीकडे जाऊन एक गोष्ट मुद्याची म्हणून येथे सागण्यासारखी आहे ती ही. येरवडयास गांधी व लॉर्ड आयर्विन यांच्या दरम्यानचा समेट सप्रू जयकर याच्या मध्यस्थीने सुरू असता, सप्रू हे ना. कामत याच्या घरी उतरले होते. आणि त्यानी व जयकरानी आपण होऊन मला लागोपाठ दोन दिवस बोला-वून येरवडयास झालेल्या चर्चेची हकीकत खासगी रीतीने सागितली. पण या दोन दिवसांच्या त्याच्या माझ्या भेटीत गोलमेज परिषदेचा एक शब्दहि मी त्याच्याशी बोलल्याचे मला आठवत नाही. कर्मधर्मसयोगाने याच दिवसात मुबईच्या गव्हर्नरानी मला भेटीला बोलावून पहिल्या गोलमेज परिषदेचे निमत्रण रीतीप्रमाणे दिले व 'वर काय लिहू' म्हणून विचारले. पण आमच्या पक्षाच्या मित्रमडळीना विचारून उत्तर देण्याकरिता दोन दिवसाची मुदत मी मागून घेतली, व येरवड्याचा समेट होत नाही असे ठरताच मी गव्हर्नर साहेबाना लिहून कळविले की "मला निमत्रण स्वीकारता येत नाही."

पण सागण्याचा मुद्दा हा कीं, या दोन दिवसात सप्रू जयकर याची गांठ रोज पडत असता मला गव्हर्नर साहेबानी बोलावून निमत्रण दिल्याची, मी मुदत मागून घेतल्याची, व अखेर नकार दिल्याची गोष्ट मी चकार शब्दानेहि बोललो नाही. शेवटी जयकर पुण्याहून जाणार त्या दिवशी मी नकार दिल्याची गोष्ट त्याना परस्पर कळली तेव्हा ते मुद्दाम मजकडे आले, आणि मजवर अतिशय रागावून, "तुमच्या मित्रमडळीना बोलवा, मी त्यांची खात्री करून देतो की तुम्ही निमत्रण स्वीकारणे हेच उचित आहे," असे आग्रहाने म्हणाले. "तुम्ही नुसतें होय म्हणा, तुमचा नकार व्हाइसरॉय साहेबापर्यंत जाऊन पोचला असला तरी तो स्वीकारूं नये अशी खटपट मी करतो, व तुमचे पूर्वीचे निमत्रण कायम करवितो," असे त्यांनी मला परोपरीने सांगितले. पण माझा आग्रह मी कायम ठेवल्याने त्यांना फार राग आला, आणि तुम्ही स्वतःचेच काय पण देशाचेहि नुकसान व्यर्थ करीत आहां असे बोलून व बजावून ते निघून गेले. तात्पर्य, पुष्क-ळांच्या मते मी निमंत्रण नाकारणे ही गोष्ट अनपेक्षित व अनिष्ट अशीहि घडली.

पण हे निमत्रण यावेळी नाकारण्याची माझी कारणे तशीच सबळ होती. पहिलें

हे की माझा कॉंग्रेस व गांधी यांना असलेला विरोध निःस्वार्थी आहे ही खरी गोष्ट लोकनिदर्शनाला यावी. कॉंग्रेसचे पुढारी गोलमेज परिषदेला न गेले तर परिषद यशस्वी किंवा निर्णायक होऊं शकत नाही. तेव्हा आज न गेलेलेच काय वाईट? उद्यां समेट झाला व ते लोक जाऊ लागले तर आपल्यालाहि फिरुन बोलावतीलच. कॉंग्रेसचे लोक जात नाहीत तोपर्यंत केसरीत, इतर वर्तमानपत्राप्रमाणेच, गोलमेज परिषदेची उठल्या बसल्या निंदा येणार. अशा स्थितीत मी परिषदेचा सभासद म्हणून तीत भाग घेणे योग्य होणार नाही. आमच्या राष्ट्रीयपक्षांत मी जावे असे म्हणणारे काही लोक होते तरी न जावे असे म्हणणारेहि कांही होते. अर्थात स्वतःच्या पक्षाला नाखूष करून जाणे मला बरे वाटले नाही. अशा स्थितीत गोलमेज परिषदेचे निमंत्रण स्वीकारण्याकरिता केसरीचे संपादकत्व सोडणे मनाला कसेसेच वाटे! पुढील जानेवारीत केसरीचा ज्युबिली समारंभ करावयाचा तो योग्यवेळी स्वतःच्या हाताने करावा, आणि मग केसरी दुसऱ्याच्या नावावर केल्यानंतर कॉंग्रेसच्या लोकांविरहितहि भरणाऱ्या परिषदेला गेल्यास नितकीशी हरकत वाटणार नाही. अशी सर्व माझी कारणे होती.

या कारणाची विशेषशी चर्चा बाहेर झाली नाही. कारण असला विषय सभातून किंवा वर्तमानपत्रांतून बोलण्याचा नसतो. यामुळे उलट सुलट कोणचीहि अनुमाने ज्याने त्यानं आपल्या मनाशी करावी व आपल्या मनाला पटेल असे बोलावे असे सुरू होते. मला पहिल्या गोलमेज परिषदेला निमंत्रण असताहि जातां आले नाही यामुळे मित्र-मंडळी मनात खिन्न होती. जो मान माझा तोच माझ्या राजकीय पक्षाचा व मित्राचा. आणि माझ्या पक्षांतले काही लोक सत्याग्रहाच्या चळवळीत हुल्लडीदाखल सामील झाले होते तरी त्यांना गोलमेज परिषदेचे महत्त्व माहीत होते. म्हणून मी गेलो असतो तर बहुतेकांना फार आनंद झाला असता. उलट माझे प्रतिपक्षी असे घेऊन चालले होते की मला निमंत्रण येणार व ते मी स्वीकारणार. जणुकांही माझ्या कॉंग्रेसविरोधाचा तो स्वाभाविक परिणामच होता. आणि मी गेलो असतो म्हणजे ते हटकून म्हणाले असते की, "पहा! येवढ्याकरितांच सर्व खटपट चालू होती व ती साधलीहि!" मौज ही की, असे म्हणण्याची संधि पुढे एकदां त्यांना लवकरच आली. तेव्हा मनात डाचत होते ते त्यांनी म्हटलेच, पण मग मलाहि त्यांचे तोंड फोडतां आले. येरवडा येथील समेटाचे बोलणे संपले व सप्रू जयकर अपयश पावून निघून गेले, त्यानंतर जो केसरीचा

अंक आला त्यात समेट न केल्याबद्दल, विशेषतः भलत्याच गोष्टीवर मोडल्याबद्दल, मी गांधीना उघड दोष दिला. या माझ्या लेखाने बरीच खळबळ उडाली. आणि मुंबईच्या क्रॉनिकलपत्राने असे उघड लिहिले की, "केसरीने असे करण्याचे कारण गोलमेज परिषदेला निमंत्रण मिळविण्याची केळकरांची खटपट हेच असले पाहिजे !"

माझ्यावर असा हल्ला कोणीतरी करील याची मी मनातून वाटच पहात होतो, कारण तसा हल्ला होणारच अशी माझी खात्री होती. आणि या पहिल्याच हल्ल्याच्या संधीचा फायदा घेऊन मी निमंत्रण येऊनहि ते नाकारल्याची बातमी खासगी स्वरूपाची होती तरी ती बाहेर फोडली. येवढे महत्वाचे निमंत्रण नाकारले व एकप्रकारचा स्वार्थत्याग केला, मग त्याचा फायदा घेतल्याशिवाय मी तरी कां सोडीन ! म्हणून केसरीच्या पुढच्याच अंकात मी क्रॉनिकलला उत्तर दिले त्यात म्हटले की "गांधीनी समेट मोडला त्या पूर्वीच मी गोलमेज परिषदेचे हाती आलेले निमंत्रण नाकारले होते. गांधींच्या या असमंजसपणाच्या कृत्यावर टीका करून पाण्यात गळ टाकून धीवर मासा येण्याची वाट पहात बसतो तसा मी निमंत्रणाची वाट पहात बसलेला नव्हतो. माझी टीका सर्वस्वी निःस्वार्थी होती" या माझ्या उत्तराने क्रॉनिकलकार थोबाडांत बरोबर चपराक बसून थड पडले. कारण जो हातचा अखेरचा बाण म्हणून त्यांनी मजवर सोडला तो माझ्या अंगावरील निस्वार्थी-पणाच्या चिलखतावर टोक मोडून बोथट झाला !

मी निमंत्रण नाकारल्यावर काही दिवसानी गांधी-आयर्विन तह झाला. तुरुंगातले सत्याग्रही कैदी सुटले. नंतर कराचीच्या राष्ट्रीय सभेने या तहाला मान्यता दिली. गांधी हे गोलमेज परिषदेला कॉंग्रेसचे प्रतिनिधि म्हणून निवडले गेले. आणि परिषदेवरचा बहिष्कार उठला. मग फिरून माझ्या जाण्याचा, निमंत्रण येण्याचा, प्रश्न निघाला. तेव्हां आमच्या पक्षातील कित्येकाना मला हे निमंत्रण येईल असे वाटू लागले. सरकार दरबारी जाणाऱ्या येणाऱ्या एका दोघांनी मला तसे सांगितलेहि. पण दुसऱ्या खेपेस मला निमंत्रण आले नाही. याचें कारण मी पहिले निमंत्रण नाकारले याबद्दल राग आल्याचा बहाणा सरकाराने केला. आणि जयकर सप्रू हेहि मजवर याच कारणाकरितां मनांतून रागावलेले असल्याने या खेपेस त्यानी माझे नांव सुचविले नसावे हेहि अगदी साहजिक आहे. शिवाय मीहि माझे तुटकपणाचे धोरण कोणत्याहि बाबतीत सोडले नव्हते. जयकर राउंड टेबल

परिषदेहून आल्यापासून मी होऊन त्याना भेटलो नाही व आतां निमत्रण आल्यास मी जाईन असेहि सुचविले नाही. प. मदनमोहन मालवीय व डॉ. मुंजे यानी माझे नांव लॉर्ड विलिंग्डन यांजजवळ सुचविले होते असा माझा एक तर्क आहे. पण हिंदुसभेचे लोक अधिक न घेतां मुसलमान प्रतिनिधि अधिक घ्यावयाचे असे सरकारचे धोरण या वेळी ठरल्यामुळे मला सरकाराने पुन्हा निमत्रण दिले नाही.

असो, अशा रीतीने गोलमेज परिषदेच्या निमंत्रणाची खरी हकीकत आहे. आणि मी प्रारभी म्हटल्याप्रमाणे त्या दोन गोष्टी एकत्र घेतल्या असतां या ठिकाणी माझ्या राजकीय चरित्राची परीक्षा झाली असेच ठरते. याहून अधिक कोणत्याहि रीतीने माझी सरकारच्या दृष्टीने योग्यता ठरण्याचा सभव नाही. राजकीय चळवळीच्या दृष्टीने मी याहून पुढे जाण्याचा फारसा सभव नव्हता. आणि मी केसरीचे प्रत्यक्ष व कायदेशीर सपादकत्व सोडल्यामुळे माझ्यावर खटला होऊन तुरुगांत जाण्याचाहि संभव फारसा राहिला नाही. कायदे कौन्सिलांच्या निवडणुकी पुनः उभ्या राहिल्या तरी मी यापुढे केव्हांहि निवडणुकीस उभे न राहण्याचा निश्चय केलेला होताच. आणि सघटित संस्था परिषदा यांचा अध्यक्ष नेमून लोकांनीं माझा मान सन्मान करण्यासारखाहि कांहीं उरलेला नव्हता. यामुळे या पुढे माझ्या राजकीय चारित्र्यांत कांहीं वैशिष्टय उत्पन्न होईल असा सभव उरला नाहीं असे तेव्हां दिसू लागले.

असो. आतां या सुमाराचीं कांहीं पत्रे देऊन हे प्रकरण पुरे करतो.

( ता. १५।११।३२ ) आज टेलिफोनवरून कळविल्याप्रमाणे तुम्ही उद्यां बुधवारीं दुपारीं ६॥ वाजतां हाऊस ऑफ कॉमन्समध्ये प्राइम मिनिस्टरना भेटण्यास त्यांच्या खोलीवर यावे. ( एफ्. एफ्. टर्नबुल, व्हाइटहॉल. )

( ता. १६।११।३२ ) तुमच्या पत्रकाला मगळवारच्या अंकांत लडन टाइम्सनें प्रमुख स्थान दिल्याचे तुम्हांला आढळून येईल. सोमवारच्या अकात ते कमी करून छापण्यापेक्षां मंगळवारच्या अंकांत सविस्तरच देणे मला योग्य वाटले. शिवाय त्या अंकांत दुसऱ्या कोणाचीं पत्रके नसल्यामुळेहि लोकांच्या ते अधिक नजरेत भरेल. तुमच्यासारख्या वृद्ध संपादकीय व्यवसायिकाला ई. इंडिया असोसिएशनची चांगली माहिती आहेच. असोसिएशनपुढे वाचलेल्या निबधावर

तुम्ही टीकाहि केली असेल. पण आमच्या वतीने येवढे निश्चित समजा की, आम्ही पक्षाभिनिविष्ट वृत्ति ठेविलेली नाही. चालू हिंदी विषयासंबंधी कोणालाहि येथे आपले विचार निःसंकोचपणे मांडता येतात. तुम्ही असोसिएशनचे सभासद व्हावे अशी विनति आहे. सोबत रिपोर्ट पाठविला आहे. त्यावरून असोसिएशनच्या कामाची कल्पना येईलच. ( एफ्. एच्. ब्राऊन, ऑ. सेक्रेटरी, ईस्ट इंडिया असोसिएशन, लंडन.)

( ता. २३।११।३२ ) तिसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सचे मेंबर म्हणून तुमचे नांव प्रसिद्ध झाल्यापासून तुमच्याकडून काही पत्र येईल अशी मी अपेक्षा करीत होते. राजकारणासंबंधी एकमेकांना केलेले अपकार किंवा उपकार हे जणू काही ते घडलेच नाहीत इतके पुढे विस्मरणीय बनतात हे असले तरी, आपला 'इंडिया' पेपर चालताना तुम्ही मला जी सर्वतोपरी मदत केली तिचा मला कदापि विसर पडणे शक्य नाही.

माझे श्वशुर डॉ. क्लार्क हे १९३० च्या जुलै महिन्यात वारले. त्यांचा उल्लेखहि हिंदी वर्तमानपत्रांनी केला नाही! बाकी १९१९ साली कॉंग्रेस कमिटीने त्यांना ज्या तऱ्हेने वागविले ते पाहता याचे आश्चर्य वाटावयास नको. त्यांचे दोष काही असले तरी त्यांनी आपल्या सर्व हयातीत हिंदी लोकांच्या आकांक्षांचा मनःपूर्वक पाठपुरावाच केला होता. असो. आतां त्या गोष्टी कशाला ? झाले ते संपले. माझ्या पतीना तुम्ही केव्हां भेटण्यास येणार आहांत ? तुमच्याविषयी मी त्यांच्याजवळ इतके वेळा बोलले आहे की तुम्हास त्यांना भेटलेच पाहिजे. ( हेलेना नॉरमॅटन ).

(ता.२०।११।३२) माझी तुमची प्रत्यक्ष ओळख नाही. पण हिंदी राजकारणातील प्रश्नांसंबंधी व विशेषतः हिंदी महिलांच्या प्रश्नांसंबंधी मी फार अगत्य बाळगीत आले आहे. काल लँकेस्टर हौसमध्ये कळले की, तुम्ही इंडियन वुमेन्स असोसिएशन पुढे स्त्रियांच्या मताधिकार चर्चेत व्याख्यान देणार आहात. राउंड टेबल कॉन्फरन्समध्ये स्त्रियांच्या मताधिकाराला काट देण्यात आला म्हणून त्याबाबत तुमचे विचार ऐकावयाचे आहेत. उद्या शुक्रवारी तुम्ही मजकडे फराळास याल काय ? सर सप्रू, जयकर, जोशी वगैरे मंडळी येणार आहेत. ( मिस् रॉथबोन. )

(ता. ३०।११।३२)तुम्ही आम्ही स्वस्थपणे भेटल्यामुळे परस्पराना किती आनंद झाला म्हणून साग ! तुमच्याशी आणखी बराच वेळ बोलायला सांपडले नाही याचेच आम्हा उभयतांना ( पतिपत्नी ) वाईट वाटले. प्रो. एडवर्ड थॉमसन आणि दुसऱ्या बऱ्याच जणाकडून तुमची स्मृति मी यापूर्वी ऐकलीच होती ( प्रो. जिलबर्ट मरे, ऑक्सफर्ड. )

( ता. ३०।११।३२ ) तुमचे पत्र पोचले. येथून पुढील काही दिवस मी अगदी कामाच्या गर्दीत सापडलो आहे. तथापि सोमवार डिसेंबर ५ तारखेस ऑक्सफर्ड अड केंब्रिज क्लबमध्ये मजकडे फराळाला याल तर मला फार आनद होईल. ( लॉर्ड सॅकी )

हाऊस ऑफ कॉमन्समध्ये उद्या बुधवारी साडेसहा वाजतां प्राईम मिनिस्टर याना आपल्या खोलीमध्ये श्री केळकर याना भेटण्याची इच्छा आहे. तरी इडिया ऑफिसमध्ये मला टेलिफोनने कळवावे. ( प्रायव्हेट सेक्रेटरी, लडन. )

( ता. २।१२।३२ ) तुमच्यासारख्या नामांकित साहित्यिकाचा सत्कार करण्यात आम्हालाच भूषण होते. मराठे लोकाशी मला मनापासून मैत्री करावीशी वाटते. त्याची चिकाटी किवा निष्ठा ( Staunchness ) आणि भूत-दया किवा परोपकारी वृत्ति ( Humanity ) या गुणाचा मी फार भोक्ता आहे. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसचे मि. मिलफर्ड हे तुम्हास भेटू इच्छितात. त्याना वेळ कळवावी. ( एडवर्ड थॉमसन, ऑक्सफर्ड. )

( ता. ६।१२।३२ ) सोबत सर फिलिफ् हॉर्टाग याचे मजविषयीचे ओळखपत्र जोडले आहे. आमच्या क्लबाचा हिंदी विद्यार्थ्यांना फार उपयोग होतो. त्यासबधीच तुम्हास माहिती द्यावयाची आहे. लॉर्ड आयर्विननी तुमचें नाव मुद्दाम सुचविल्यामुळे तुम्हास लिहिले आहे. (मेरी ट्रॅव्हिलियन, लडन.)

( ता. ६।१२।३२ ) मिस् मेरी ट्रॅव्हिलियन या स्टुडंट मुव्हमेंट हॉऊसच्या चिटणीस आहेत. जगातल्या सर्व राष्ट्रांच्या विद्यार्थ्यांसाठी हा क्लब आहे. सुमारे दोनशे हिंदी विद्यार्थी या क्लबाचा फायदा घेतात. लॉर्ड आयर्विन, डॉ. लिंड्से, यासारखे हिंदुस्थानविषयी सहानुभूति बाळगणारे लोक क्लबाला मदत करणाऱ्यांत प्रमुख आहेत. ( सर फिलिफ् हॉर्टाग, लंडन. )

( ता. ७।१२।३२ ) एकदोनदा तुमच्या हॉटेलात चौकशी करून गेलो. पण तुम्ही बाहेर गेला होता. सभेची वेळ ठरविण्याविषयी विचारावयाचे होते. असो. या पत्रासोबत येत्या मंगळवारी सर रॉस बार्कर हे जो निबंध वाचणार आहेत त्याची प्रत पाठविली आहे. सभेत पुष्कळ उपवक्ते बोलतील. ६ वाजता सभा संपविण्याचा रिवाज असल्यामुळे अध्यक्षांना वक्त्यावर कालाचे नियंत्रण बहुधा घालावे लागेल. तथापि तुमच्या तोंडून काही ऐकावे अशी आमची फार इच्छा आहे. तर उपवक्त्याच्या यादीत तुमचे नाव घालू काय ? ( एफ. एच्. ब्राऊन, ऑ. सेक्रे. ईस्ट इंडिया असोसिएशन, लंडन. )

(ता. १२।१२।३२) तुमचे ८ तारखेचे पत्र पोचले. आमच्या असोसिएशन पुढे रविवार ता. १८ रोजी तुम्ही व्याख्यान देण्याचे कबूल केले हे वाचून आनंद झाला. तुम्ही लंडनहून केव्हा निघणार ते कळवा म्हणजे तुम्हास उतरून घेण्याची तजवीज करतो. ( आर. एफ्. एबुकर्क, दि इंडियन असोसिएशन, बर्मिंगहॅम. )

( ता. १३।१२।३२ ) स्टूडंट मुव्हमेंट हाऊस बाबत तुम्ही गेल्या शुक्रवारी मजला भेटण्याची कृपा केली याबद्दल फार आभारी आहे. आम्ही विद्यार्थ्यांसाठी लंडनमध्ये जे काम करीत आहो याविषयी आपण सकौतुक प्रोत्साहन देऊन उपकृत केले आहे. केव्हातरी एक दिवस आमच्याकडे चहाला येण्याचे आश्वासन दिले आहे त्याची आठवण ठेवावी. ( मेरी ट्रॅव्हिलियन, लंडन. )

( ता. २०।१२।३२ ) स्टेट सेक्रेटरी साहेबांची इच्छा परिषदेच्या प्रमुख प्रतिनिधींना उद्या सकाळी बोलावून राउंड टेबल परिषदेचा पुढील कार्यक्रम ठरवावा अशी आहे. तरी तुम्ही आल्यास त्यांना आनंद होईल. बैठक इंडिया ऑफिसच्या कौन्सिलरूममध्ये १२। वाजता व्हावयाची आहे. ( डब्ल्यू डी. क्रॉफ्ट.)

( ता. २२-१२-३२ ) आपण २०-१२ रोजी कॉन्फरन्सच्या प्रोसीजर-संबंधी निरनिराळ्या मुद्याची विचारणा लॉर्ड चॅन्सेलरकडे केली. त्यानी निकाला-करता ते पत्र स्टेट सेक्रेटरीकडे पाठविले आहे. स्टेट सेक्रेटरींनी मला आपणांस असे कळविण्यास सांगितले आहे की, काल सकाळी त्यांचे तुमचे जे बोलणे झाले त्यांत तुम्ही चॅन्सेलरला लिहिलेल्या पत्रातील मुद्यांची उत्तरे मिळाली असतील. ( एफ्. एफ्. टर्नबुल, इंडिया ऑफिस, व्हाईटहॉल.)

(ता.५।५।१९३३) वर्तमानपत्रांत मी असे वाचले की, तुमची प्रकृती बरी नाही म्हणून तुम्हाला चालू उन्हाळ्यांत इंग्लंडला ( गोलमेज परिषदेकरिता ) येणे शक्य नाही. हे वाचून मला फार वाईट वाटले, मी खरोखर तुम्हाला सांगतो की तुम्ही आमच्यामध्ये बसून चर्चा करण्यास येऊ शकत नाही हे वाचून निराशा झाली. असो. तुम्ही आपल्या प्रकृतीची काळजी घ्याल व लवकरच बरे व्हाल अशी आशा आहे. ( सर सॅम्युअल होअर. )

येथे इतकेच सांगतो की हे पत्र माझ्या कोणत्याहि पत्राचे उत्तर नाही. मी गोलमेज परिषदेस जाऊं शकत नाही हे फक्त मुंबईच्या गव्हर्नराला कळविले होते. सर सॅम्युअल होअर यास मी पत्र लिहिले नव्हते.

---

## ( ७ ) लोकशाही स्वराज्यपक्षाची स्थापना

राष्ट्रीय सभेने चालविलेल्या असहकारितेचा उल्लेख पूर्वी विस्तृत असा करण्यांत आलाच आहे. तथापि पुनः स्मरणार्थ त्याची आठवण करून देऊन १९३२ नतर असहकारितेचे पर्यवसान कसे काय झाले हे पाहू.

१९२० च्या सप्टेंबरांत राष्ट्रीयसभेने सर्वांगीण असहकारिता व कायदे-कौन्सिलावर बहिष्कार पुकारला. असहकारितेपैकी न्यायकोर्टावरील बहिष्कार सर्वांत अधिक अयशस्वी ठरला. आणि माझी माहिती खरी असेल तर, हा बहिष्कार पुकारला जात असता, स्वतः गांधींनीच अहमदाबाद येथील आश्रमाच्या जागेचा वाद न्यायकोर्टात गेला तेव्हां, ट्रस्टी म्हणून वकील दिला होता. कांही मोठमोठ्या वकीलांनी एखादे वर्ष वकिली बंद केली. ज्यांना कांही काम मिळत नव्हते त्यांना वकिली बंद केल्याचे सांगून वर्षभर महिना पन्नास पाऊणशेची वर्णी मिळविता आली. असा पगार न घेतां ज्यांनीं खरा स्वार्थत्याग केला त्यांपैकी कांहींचा जम पुढे वकिली पुन्हां सुरूं केली तेव्हां पूर्वीसारखा न बसल्याने त्यांना पश्चातापाची पाळी आली.

शिक्षणसंस्थांवरील बहिष्कारांचे असेच झाले. कांहींना या राजकारणाची सबब सांगून उनाडकीची हौस उजळमाथ्याने भागविता आली. स्वतंत्र्य राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा अनेक ठिकाणी निघाल्या. त्यांतून तात्पुरत्या शिक्षणाची सोय

झाली. तिचा फायदा घेऊन कांहीनी आपला अभ्यास चालूं ठेविला. राष्ट्रीय विद्यापीठाच्या पदव्या मिळविल्या. कांही स्वार्थत्यागी होते तथापि या नवीन संस्थांतून मिळणाऱ्या शिक्षणावर त्यांचा विश्वास नसल्याने त्यांनी राष्ट्राची आज्ञा म्हणून घरीं बसून काळ काढला किंवा राष्ट्रीय सभेच्या विधायक कार्यक्रमापैकीं कांही भाग उचलला. पण सरकारी निमसरकारी संस्थांतून बाहेर पडलेल्या पुष्कळशा विद्यार्थ्यांनी फिरून लवकरच त्या पूर्वीच्या संस्थांतून प्रवेश केला, व संस्थांच्या चालकांनीहि त्यांच्यावर करडी नजर न करिता त्यांना पुन्हा प्रविष्ट करून घेतले. यामुळे त्याचे फारसे नुकसान झाले नाही.

चरख्याचा व खादीचा प्रसार पुष्कळ झाला. लक्षावधि रुपये त्यावर खर्च झाले. पण त्या स्वदेशी व्रताच्या स्वाभाविक मर्यादा लवकरच प्रगट होऊन खादी वस्त्र हे गांधीच्या हट्टाची व कॉंग्रेसच्या सुलतानशाहीची खूण म्हणूनच आता काही उरले आहे. कॉंग्रेसच्या सभासदत्वाची अट म्हणून खादीला जे महत्व चिकटून राहिले आहे, ते निघून गेल्यास केवळ शुद्ध स्वदेशीचे जे थोडे भक्त असतील त्यांच्यांतच खादी शिल्लक राहील. हजारो लाखो रुपयांचे चरखे जळण म्हणून शेवटीं चुलीत गेले. किंवा वळचणीखालची अडगळ म्हणूनच उरले. खऱ्या ऐवजी खोट्या खादीची निपज होऊं लागून स्वार्थी व्यापाऱ्यांनी हात साधून घेतला. खादीकार्याच्या नात्याने पैशाचा अपव्यय किती झाला हे ऑ. इ. कॉ. कमिटीच्या हिशेब तपासनिसानीच प्रसिद्ध केलेले आहे. मात्र खादीसंघ ही एक स्वतंत्र संघटना बनून राहिली; व तिच्या पैशांतून कॉंग्रेसचा व गांधी तत्वज्ञानाचा प्रचार करणारे पगारी भाडोत्री नोकर पोसून गांधी सांप्रदायाची परंपरा व संख्याबळ ही राखता आली.

अस्पृश्यता निवारणाला मात्र अकल्पित अशी चालना मिळाली. या सुधारणेचा प्रचार गांधीइतका पूर्वी कोणाहि सुधारकाला करतां आला नाही. अस्पृश्यता निवारणाकरितां व अस्पृश्याना मतदार या नात्याने हिंदू समाजांतून फुटून न जाऊं देण्याकरितां गांधींनी जंगजंग पछाडले. प्राणांतिक उपोषणापर्यंत मजल नेली. कायदे कौन्सिलावरील बहिष्कार इकडे अमलांत असतांच, अस्पृश्यता निवारणाकरितां वरिष्ठ कौन्सिलात कायद्याचे बिल प्रविष्ठ करण्याचा मोह न आवरून गांधींच्या पट्टशिष्यांनी स्वतःस हास्यास्पद करून घेतले. अनेक ठिंकाणी

देवळे व मंदिरे ही अस्पृश्याना खुली झाली. या सुधारणेच्या मार्गातील मंदिर-विश्वस्ताच्या अडचणी निघून जाण्याकरिता कायदे झाले. प्रांतिक व स्थानिक स्वराज्य संस्थानी अस्पृश्याकरिता शिक्षणाच्या सोयी शिष्यवृत्त्या व सरकारी नोकऱ्या शक्य तितक्या राखून ठेवण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला. आणि अस्पृश्यांचे उद्धारक ही पदवी गांधीना इतर कोणाहिपेक्षा अधिक यथार्थतेने लाविता येईल.

तथापि काय असेल ते असो, गांधीचे अस्पृश्यता-निवारणाचे कार्य अस्पृश्याच्या मुख्य पुढाऱ्याना फारसे पटले नाही. नुकताच 'चित्रा' मासिकाने आपला दिवाळी अंक काढला त्यात डॉ अंबेडकरानी गांधीविषयी जे फार कडू उद्गार काढले आहेत ते वाचणाराला माझे वरील विधान पटेल. गांधीना 'महात्मा' हे बहुमानास्पद विशेषण लावणे चूक आहे असे अंबेडकरानी म्हटले आहे त्याचे काही विशेष वाटत नाही. परंतु गांधीच्या अस्पृश्यता-निवारणाच्या कार्यासंबंधाने अंबेडकरानी खालील उद्गार काढलेले आहेत ते विस्मयकारक वाटण्यासारखे होत. ते म्हणतात—"वर्तुळपरिषदेच्या वेळी अल्पसंख्याकाच्या बैठकीत गांधीनी असे कबूल केले होते की, इतर प्रतिनिधीनी दलितवर्गाच्या प्रतिनिधित्वाच्या मागणीला मान्यता दिली तर त्याला आपण कोणत्याहि प्रकारची हरकत घेणार नाही. आणि इतर सर्व प्रतिनिधीनी जेव्हा ही मान्यता दिली तेव्हा त्यानी जे वर्तन केले त्याला मी 'विश्वासघात' हेच नाव देऊ शकतो. ते मुसलमानाकडे जाऊन त्याच्या कानाला लागले, आणि त्याना म्हणाले की तुम्ही जर दलितवर्गाच्या मागण्याना विरोध करण्याचे कबूल कराल तर मी तुमच्या चौदाच्या चौदा मागण्या मान्य करीन. एखाद्या घोटीव बदमाषानेहि असले नीच कपट केले नसते. XXXX सध्याची हिंदु मुसलमानांची तेढ हीहि त्याच्या अशाच कपटाचरणाची औरस संतति आहे. जो इसम दलितवर्गाचा व मुसलमानाचा मित्र म्हणून मिरवितो त्याने, दिलेली वचने पाळण्याच्या जबाबदारीतून निसटून जाण्यासाठी, भुयारी ( गुप्त ) मार्गाचा अवलंब करावा हा विचार खरोखर उद्वेगजनक आहे. 'मुखमे राम बगलमे छुरी' अशा प्रकारच्या माणसाला जर महात्मा म्हणता येत असेल तर मोहनदास हे महात्मा आहेत." दलितवर्गाच्या हिताकरितां गांधीनी प्राणांतिक उपवासाची टूम काढली, आणि जरी शेवटी पुणे-करारावर अंबेडकरांनी सही केली, तथापि 'गांधी मेले तरी हरकत नाही' असे उद्गार अंबेडकरांनी काढले होते असे म्हणतात. कपटाचरण हे गांधीच्या सत्यांत बसू

शकते हे प्रसिद्ध आहेच. मात्र त्याच्या अहकाराच्या हिमालयापुढे कपटाचरण ही पर्वताची टेकडी शोभेल.

पण टिळकाच्या अनुयायाचा खरा तटा गाधीशी होता तो त्याच्या विधायक कार्यासबधाने फारसा नव्हता. तो त्याच्या बहिष्कारात्मक विध्वसक अशा काही कार्यासबधाने होता. या बहिष्कारातहि गाधीनी परदेशी व ब्रिटिश कपड्याच्या बहिष्काराला केव्हाहि मुक्तकठाने समति दिली नाही. पण त्यानी आपले सगळे बळ, आपली सगळी तपश्चर्या, एका कौन्सिल बहिष्कारावर खर्चली उलटपक्षी टिळकानुयायाचे असे मत होते की कायदे कौन्सिले ताब्यात ठेवली असता इतर विधायक व विध्वसक अशा कोणत्याहि कार्याला शक्यात शक्य जास्ती पाठबळ मिळेल. सरकारी पैसा व सत्ता याचा उपयोग विधायक कार्याला कसा करता येतो हे सांगावयास नकोच. आणि नुसता अडथळा व गोधळ करावयाचा म्हटले तरी त्यालाहि कौन्सिलाची भूमिका सर्व बाजूनी अनुकूल होऊ शकते. परतु "कायदेकौन्सिलचे नाव काढले की मला मळमळू लागते, माझ्या कपाळात तिडीक उठते" असा जो घातक बहाणा गाधीनी १९२० साली सुरू केला तो १९३५ पर्यंत म्हणजे अखड पधरा वर्षे टिकविला. यामुळे देशाचे फार नुकसान झाले.

असहकारितेच्या कार्यक्रमापैकी सर्वात अत्यत वादग्रस्त अशी बाब ही कौन्सिल बहिष्काराचीच होती हे असहकारिता सुरू होऊन दोन वर्षे होतात न होतात तोच लोकनिदर्शनास आले. इतर अनेक कार्यक्रम व्यक्तिशः होणारे न होणारे असे होते. पण कायदे कौन्सिलात जहाल राष्ट्रीय वृत्तीचे प्रतिनिधि पाठविणे हे कार्य राष्ट्रीय सभेने सामुदायिक उठावणी केल्यावांचून होणारे नव्हते. लोकमताच्या लाटेच्या जोरावरच घडून येईल अशी ही गोष्ट होती. आणि यामुळे कौन्सिल प्रवेशाला प्रतिकूल असे जे वातावरण कॉंग्रेसने पधरा वर्षे निर्माण करून ठेवले त्याच्या योगाने स्वराज्याच्या चळवळीला आणखी जो जोर चढावयाचा तो चढला नाही. इतर राष्ट्रीय पक्षांनी स्वतः निवडणुकी लढवून या अपकाराचे परिमार्जन थोडेबहुत केले; परंतु ते करतांना पुष्कळशी शक्ति कॉंग्रेस विरोधाच्या दगडावर थडकी देण्यांत विनाकारण खर्च झाली. या थडकीमुळे कॉंग्रेसकृत कौन्सिल बहिष्कार जो निष्प्रभ झाला, सैल पडला, त्यांत जोर घालण्याकरितां १९३० व

१९३२ साली कायदेभंगाच्या चळवळी करण्यांत आल्या. पण त्याचाहि विशेष उपयोग न होतां शेवटी कौन्सिल-प्रवेशाचे तत्व प्रस्थापित झालेच !

या दोनहि कायदेभंगाच्या चळवळी गांधीनी जवाहरलाल यांच्या प्रेमाला बळी पडून सुरू केल्या असे म्हणतां येईल. १९३० ची मोहीम १९२९ साल-अखेर झालेल्या लाहोर कॉंग्रेसमधील स्वातंत्र्याच्या ठरावामुळे प्राप्त झाली. या ठरावाने नेहरू रिपोर्टाला मूठमाती दिली, आणि गोलमेज परिषदेवर बहिष्कार घातला. पण लाहोरचा हा ठराव म्हणजे विसंगत अशा गोष्टींचे ते एक बोचके किंवा कडबोळे होतें स्वातंत्र्य हे अंतिम ध्येय म्हणणे, व ही गोष्ट कॉंग्रेसच्या ब्रीदवाक्यांत घालणे राहू देणे, हे तूर्त वसाहत पद्धतीचे ( डोमिनियन स्टेटस् ) स्वराज्य मागण्याशी विसंगत नव्हते नेहरू रिपोर्टात या डोमिनियन स्टेटस्ची मर्यादित मागणी होती; आणि नेहरू रिपोर्ट शिल्लक उरता तर त्याच्या पायावर राष्ट्रीय सभेला गोलमेज परिषदेत भाग घेता आला असता. बरे स्वातंत्र्य हे नुसते ब्रीदवाक्यातच घालून जवाहरलाल नेहरू थांबले नाहीत. त्यानी ठराव पास झाल्याच्या मध्यरात्री स्वराज्य स्थापनेचीच घोषणा, निशाण उभारून, रावी नदीच्या कांठी केली. ज्या आखिल भारतीय सर्वपक्षीय पुढाऱ्यांना जमवून त्याना राबवन एकमत करून पंडित मोतीलाल यानी नेहरू रिपोर्ट तयार केला, त्याच्याशी त्याच्या पश्चात कॉंग्रेसने शुद्ध बेइमानी केली. मग मुळातच अशी सर्वपक्षीय परिषद भरविलीच नसती तर काय बिघडले असते ? सर्वांचा विचार घ्यावयाचा तर सर्वांचा म्हणून होईल त्या निर्णयाला चिकटून राहणे हीच इमामदारी ठरते.

बरे स्वातंत्र्याची घोषणा केली तर ते पदरात पाडण्याची साधने राष्ट्रीय सभेने कोणती ठरविली व योजली ! वास्तविक स्वातंत्र्याच्या घोषणेच्या दुसऱ्या दिवसांपासून ब्रिटिश सत्तेशी प्रतिस्पर्धी असे सरकार, म्हणजे सत्ता व राज्ययंत्र, सुरू करावयास पाहिजे होते. पण ते तर झाले नाहीच. पण लाहोरच्या ठरावांत फक्त इतकेच म्हटले होते की, ‘ प्रस्तुत परिस्थितीत कॉंग्रेसला गोलमेज परिषदेत भाग घेतां येत नाहीं. ’ पण एकदा रोखठोक स्वातंत्र्यच जाहीर केल्यावर गोल-मेज परिषदेत भाग घेतां येईल अशी कोणती वेगळी परिस्थिति ( स्वातंत्र्यांतर्गत ) निर्माण होऊं शकली असती ! गोलमेज परिषदेत काय स्वतंत्र अशा हिंदी राष्ट्राशीं ब्रिटिश सरकार चर्चा करणार होतें ! डोमिनियन स्टेटस् हा विषयहि अखेरपर्यंत

ज्या गो. मे. परिषदेच्या कार्यक्रमांत सरकाराने घालूं दिला नाही, त्या परिषदेत कॉंग्रेस पुढे केव्हां झाले तरी कसा भाग घेणार ?

तात्पर्य, गोलमेज परिषदेची पहिली संधि कॉंग्रेसने व्यर्थ दवडली. बरें हे बहिष्काराचे धोरण पुढे तरी कायम टिकले काय ? नाही. १९३० ची कायदे-भंगाची एक हुल्लड केल्याबरोबर, लॉर्ड आयार्विन यांनी मोठी मुत्सद्देगिरी लढवून आपल्या दिखाऊ भलेपणाचे मायावी पाश टाकले, त्यांत 'गव्हाची कणिक करून देऊन', सप्रू–जयकर अशांनाहि मानवल्या नाहीत अशा अटी मान्य करून, कॉंग्रेसचे एकमेव पुढारी म्हणून गांधी आपल्या पायांनी गोलमेज परिषदेला गेलेच की नाही ? बरे हे नवे धोरण एकदां स्वीकारल्यावर ते तरी सुसंगत टिकवावे की नाही ? तेहि नाही. गोलमेज परिषदेहून गांधी परत येण्यापूर्वीच फिरून जवाहरलाल नेहरूच्या उतावळ्या स्वभावाने जे हुल्लडीचे जाळे तयार करून ठेवले त्यांत गांधींनी आपली मान अडकवून घेतली ! तात्पर्य—'एक ना धड भाराभर चिंध्या' असे हास्यास्पद कॉंग्रेसचे धोरण झाले. एक पुढारी लहरी आणि अहं-कारी, तर दुसरा अविचारी आणि उतावीळ. पण या दोन पुढाऱ्यांच्या परस्पर मोहबतीचा परिणाम कॉंग्रेसच्या धिडवड्यांत झाला !

स्वातंत्र्य संपादनाची साधने म्हणून लाहोर कॉंग्रेसने ही ठरविलीः—(१) खादी (२) अस्पृश्यता निवारण (३) परदेशी कापडावर बहिष्कार (४) मद्यपान-प्रतिबंध (५) निवडक प्रदेशांत कायदेभंग. या साधनांनी प्रतिस्पर्धी सरकारी सत्ता —स्वातंत्र्याच्या भावनेला साजेशी—कशी निर्माण होणार याचा कांही विचार ? आणि फिरून शांतता, अहिंसा, प्रेम, सत्य, ही गांधींची आवडती बंधने या मवाळ कार्यक्रमाच्याहि मागे आहेतच. जणु कांही गुलाबपाण्याच्या फवाऱ्यांनी सर्व प्रकारचे विषारी जंतु व हिंस्त्रपशु मरणार ! तात्पर्य, प्रत्यक्ष स्वातंत्र्य प्रस्थापनेची घोषणा अकाली झाली हे कोणीहि म्हणेल. लाहोरच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात सुभषबोस हे विरोधी पक्षात होते. त्यांना पूर्ण स्वातंत्र्य मान्य, पण या साधनांनी ते मिळेल अशी त्यांची भावना नव्हती. म्हणून कॉंग्रेसशी भांडून त्यांना विषय-नियामक कमिटीतून स्थानत्याग करून जावे लागले.

असो. १९३० च्या प्रारंभी पुन्हा वेताळ पूर्वस्थानावर आला. चढाईचे धोरण म्हणून कायदेकौन्सिलचा बहिष्कार जोरावला. ऑ. इ. कॉ. कमिटींत ज्यांना

राहावयाचे होते त्यांना कौन्सिलांतल्या जागांचे राजीनामे द्यावे लागले. स्वतः मी ऑ. इ. कॉ. कमिटी सोडली, व कौन्सिलमेंबरशिप ठेवली. कौन्सिल बहिष्काराच्या पाठोपाठ कायदेभंग सुरू झाला.

१९३० च्या कायदेभगाची भाषा सुरू झाली तेव्हां मी दिल्लीस असेंब्लीच्या कामात गुतलो होतो. आणि आमच्या पक्षाने, विशेषतः केसरी मराठा कचेरीने, कोणते धोरण स्वीकारावे हा प्रश्न मला विचाराला घेणे प्राप्तच होते. ही चळवळ यावेळी अयुक्त होती असे माझे मत वर दर्शविलेच आहे. तथापि मला हेहि माहीत होते की आमच्या पक्षाने, नेमस्त किंवा मवाळ किंवा सरकारजमा पक्षाप्रमाणे, अशा चळवळीवर बहिष्कार घातलेला नव्हता. राष्ट्रीय पक्षाच्या वृत्तीत तुरुगांत जाणे किंवा सरकाराशी तीव्र स्वरूपाचा झगडा करणे ही गोष्ट स्वाभाविक होती. म्हणजे क्रमप्राप्त असल्यास ती स्वीकारणे योग्य असे आमच्या पक्षाचे मत होते. लो. टिळकानी हे उदाहरण घालून दिलेच होते. टिळकाच्या हयातीतील १९०८ ची पिकेटिंगची चळवळ ही कायदेभंगाचीच चळवळ होती व टिळक पक्षीयानी दंडाचे शेकडो रुपये भरले होते. राजद्रोहाची शिक्षा झालेल्या लोकाना केसरी कचेरी हे आपले मायपोट असे वाटे. डॉ. भट, पी. एम्. बापट, वा. म. जोशी याना याच दृष्टीने टिळकानी केसरी मराठ्याकडे नोकऱ्या दिल्या होत्या. खाडिलकराची तुरुंगात जाण्याची पाळी अजून आली नव्हती. पण मी त्याच्या आधी तुरुगवास भोगून आलो होतो. १९२१ ची पिकेटिंग चळवळ आम्ही केली होती. १९२२ च्या मुळशी सत्याग्रहांत रा. ज. स. करंदीकर, डॉ. पळसुले इत्यादि आमच्या पक्षाचे लोक तुरुगात जाऊन आले होते. तात्पर्य, कॉंग्रेसच्या विशिष्ट धोरणाशी आमचा मतभेद असला तरी राष्ट्राच्या नांवाने तिने उभ्या केलेल्या कायदेभंगाच्या चळवळीत सामील होण्याकडे आमच्या पक्षाच्या कांही लोकांचा ओढा असणार हें मी जाणून होतो.

स्वतः मला दुसऱ्या दृष्टीने असे वाटत होतें की, या नव्या चळवळीत कोणी शिरल्यास "आपण तुरुंगाला भीत नाही, त्या मार्गाने प्राप्त होणाऱ्या स्वार्थत्यागाला आपली तयारी आहे" हे सिद्ध करण्याची संधि मिळत असली तरी या स्वार्थत्यागाचे श्रेय प्रतिपक्षाला मिळते, याशिवाय त्याबरोबर त्यांत कौन्सिल बहिष्कार दृढ होतो हे मात्र ठीक नाही. सत्याग्रहच करावयाचा, तुरुंगांत जाण्याचाच पराक्रम दाखवावयाचा, तर महाराष्ट्रीय पक्षाने स्वतः अंगिकारलेल्या अशा एखाद्या खास

विशिष्ट तत्वाकरिताच ते कां न करावे ? कारण तसे केल्याने मिळणारे श्रेय तरी आपल्या पक्षाला मिळेल. तुरुगात जाणे हा जर लोकाच्या डोळ्यात भरण्याचा एक मार्ग, तर तो निदान प्रतिपक्षाने उठावणी केलेल्या, त्याला श्रेय मिळणाऱ्या, चळवळीत तरी करू नये तथापि दिल्लीसारख्या दूरच्या ठिकाणाहून तसा सूक्ष्म विवेकाचा युक्तिवाद पत्रोपत्री मी किती करणार ? म्हणन केसरी-मराठा कचेरीच्या लोकाकरिता एक पत्र रा. ग. वि. केतकर यांच्या नावाने मी लिहिले ते असेः—

(नवी दिल्ली, ता १३ मार्च १९३०) " रा. ग. वि. केतकर यास, सा. न. वि. वि. या सोबत माझा प्रा. का. कमिटीच्या सभासदत्वाचा राजीनामा पाठवीत आहे. ए. आय. सी. सी. चा राजीनामाहि कॉंग्रेस कमिटीकडे परस्पर अलाहाबादेस पाठविला आहे. राउड टेबल कॉन्फरन्ससबधाने तूर्त काहीच प्रश्न नाही. तेव्हां त्या बाबतीत केसरीत काहीच लिहिण्याचे कारण नाही. त्या प्रकरणाने पुन्हा उचल खाल्ली म्हणजे काय लिहावयाचे ते लिहू.

" कायदेभगासबधाने नक्की काय लिहावयाचे याचे धोरण येथून लिहून किती लिहिणार ? कायदेभगाची चळवळ ही आपल्या राष्ट्रीय पक्षाच्या धोरणांत समाविष्टच आहे. तेव्हा तिचा पुरस्कार अवश्य केलाच पाहिजे यात संशय नाही. तसेच केसरी ऑफिसमधील ज्या मंडळीना या चळवळीत गुजराथेत जाऊन सामील व्हावयाचे असेल त्यांना तसे करण्याला पूर्ण मोकळीक आहे. एवढेच नव्हे तर ज्याची तशी खरी इच्छा असेल त्यानी अवश्य जावे. तसेच, आपल्या कॉंग्रेस कमिटीमार्फत किवा इतर रीतीने महाराष्ट्रांत सर्वसमत अशी एखादी कायदेभंगाची चळवळ करण्याची असल्यास तीहि अवश्य करावी. मात्र त्यापूर्वी केवळ आपल्या पक्षाच्या अशा पांचपन्नास मडळीची खासगी सभा बोलावून विचार करावा, व मग इतर पक्षांशी बोलून ठरवावे. ही गोष्ट मी पुण्यास परत येण्यापूर्वीच करावी. याचे कारण असे की या गोष्टी स्वयंस्फूर्तीने होण्याच्या असतात. त्यांना व्यक्तिशः माझे प्रोत्साहन नको किंवा प्रतिबधहि नको. शिवाय मी हजर असल्यास, मनांतून ज्यांना कांहीं गोष्ट करावयाची नसते त्यांना उगाच माझे निमित्त बाहेर सांगण्यास सांपडते. तरी या प्रसगी मडळीनीं परस्पर ठरवावे; व वरील आपली मंडळी जें ठरवतील ते मलाहि मान्य आहे असे समजावे. स्वतः मी काय करावे, कोठें काय

करावे किंवा काय न करावे, याचा विचार मी स्वतंत्रपणे करीन. पण आपल्या मंडळींना एक विचाराने जी गोष्ट करावीशी वाटेल ती, मी त्यांत आहे म्हणून त्यांनी केली असे होऊं नये. किंवा मी त्यांत नाही म्हणून केली नाही असेहि होऊ नये. नवी पिढी जी जी चळवळ करील तिचे सर्व श्रेय तिलाच मिळावे अशी माझी खरी इच्छा आहे. परंतु त्या बरोबर अशीहि इच्छा आहे की, स्वतःस कांहीं करावयाचे नसतां माझी सबब सांगितली जाऊ नये. माझा स्वभाव असा आहे की, स्वतःच्या स्फूर्तीने जो स्वार्थ-त्याग करील त्याला मी उघड राजरोम रीतीने भरपूर श्रेय देईन. परंतु कोणाहि व्यक्तीला किंवा वर्गाला अशा कामी भरीला घालणार नाही. म्हणून केसरीत लिहितानाहि कायदेभंगाच्या चळवळींचे सर्वसाधारणपणे समर्थन करावे, परंतु विद्यार्थी किंवा तरुण वर्ग यांना विशेष प्रकारे उद्देशून या चळवळीत सामील होण्याचा उपदेश करू नये ही खबरदारी अवश्य घ्यावी. आपल्या ऑफिसपैकी ज्यांना या चळवळीत शिरावयाचे असेल त्यांनी तसे ठरवून थोडे आगाऊ मला कळवावे. कारण वर्तमानपत्रे चालली पाहिजेत. म्हणून मला आगाऊ कळलेले बरे. निदान मी ३।४ एप्रिलचे सुमारास येत आहे तोपर्यंत कळले तरी बरे. तुम्ही कॉंग्रेस कमिटीचे प्रेसिडेन्ट म्हणून पुष्कळ दिवस बाहेर फिरणार असला तर कामाची व्यवस्था रा. करंदीकर-भावे यांच्या विचारे करावी. मला येथून कांही करतां येणार नाही. तसेच तुमच्या प्रवासाचा खर्च कॉंग्रेस कमिटीतून मिळेल तेथपर्यंत तिकडून घ्यावा व तो मिळण्यासारखा नसेल तेव्हा केसरी ऑफिसकडून घेण्यास हरकत नाही. तात्पर्य, मी परत येईपर्यंत वरीलप्रमाणे करावे, व मी आल्यावर अधिक विचार होईलच. परंतु मी नाही म्हणून कोणी कोणतीहि गोष्ट थांबविण्याचे कारण नाहीं. कळावे.''

—न. चिं. केळकर.

पुढे लवकरच टिळक मंदिरात पुणे शहरातील राष्ट्रीय पक्षाच्या सभासदांची सभा भरून असे ठरले की, हल्ली सुरू असलेल्या कायदेभंगाच्या चळवळीत, महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीशी व इतरांशी सहकारिता ठेवून, पण त्यांतल्या त्यात स्वतंत्रपणे, । महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाने आपला एकादा कार्यक्रम आखून पार पाडावा. हे करण्याकरिता तूर्त खालील गृहस्थांचे एक कार्यकारी मंडळ नेमण्यात आले ते खालीलप्रमाणेः—

( १ ) अध्यक्ष—न. चिं. केळकर, ( २ ) चिटणीस—दि. वा. दिवेकर, ( ३ ) सभासद—१. ल. ब. भोपटकर, २. दा. वि. गोखले, ३. पां. के. शिराळकर, ४. डॉ. गोपाळराव पळसुले.

" या मंडळात आणखी प्रतिनिधी समाविष्ट करून घेण्याचा अधिकार अध्यक्षाना देण्यांत आलेला आहे. विशेषतः महाराष्ट्रांतील इतर जिल्ह्यांतून या कार्याचा प्रचार करण्याचा, किंवा प्रचार होत जाईल त्याप्रमाणे अधिक सभासद नेमून घेण्याचा अधिकार अध्यक्षांना देण्यात आला आहे."

" सामान्यतः या चळवळीचा प्रसार खालील मार्गाने करण्यात यावा:—

( १ ) प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य शहरी जिल्ह्यातील प्रमुख पुढाऱ्याची आणि प्रत्येक तालुक्याच्या गांवीं तालुक्यातील प्रमुख पुढाऱ्याची प्रास्ताविक सभा ताबडतोब बोलावण्यांत येऊन, तेथे जिल्हामंडळे व तालुकामंडळे स्थापण्यांत यावी, व या दोन्ही मंडळामार्फत प्रत्यक्ष कायदेभंग करण्यास तयार होणाऱ्या, किंवा इतर रीतीने या कार्यास मदत करण्यास तयार असणाऱ्या, स्वयंसेवकाची नोंद करण्यात यावी. आणि या दोन्ही प्रकारच्या कार्यकर्त्यांचा उपयोग कोठे, केव्हा व कसा करावयाचा हे उभयपक्षी सहविचाराने ठरविण्यांत यावे.

( २ ) अशा रीतीने मध्यवर्ती कार्यकारी मंडळ नेमण्यात आले असले तरी, सर्व महाराष्ट्रभर या चळवळीचे कार्य व्हावयाचे तर प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य शहरीच काय, पण तालुक्याच्या गांवींहि कार्यप्रेमी पुढाऱ्यानी हे कार्य आपल्या अंगावर स्वयंस्फूर्तीने व आस्थेने घेतले पाहिजे. हे कार्य कसे करावे यासंबंधाच्या सूचना मुख्य कार्यकारी मंडळाकडून वेळोवेळी देण्यांत येतीलच. तथापि, मिठाच्या कायदेभंगाचे प्रत्यक्ष कार्य समुद्रकाठी जाऊनच केले पाहिजे असे नाही, कारण प्रत्यक्ष मीठ तयार करणे हा जसा या कायदेभंगाचा एक प्रकार आहे, तसाच बिगर परवाना तयार झालेल्या मिठाची खरेदी-विक्री व देवघेव करणे या प्रकारांनींहि या मिठाच्या कायद्याचा भंग होतो. शिवाय बिगर परवाना तयार झालेले मीठ महाराष्ट्रांतील दूरदूरच्या भागांतहि अगदी सुलभतेने नेतां येण्यासारखे असल्यामुळे, हा कायदेभंग करण्याची इच्छा असणाऱ्या लोकांना आपले ठिकाण सोडून पर ठिकाणी दूर जाण्याचे श्रम व खर्च

करण्याचे कारण नाही. कायदेभगाचे हे साधन त्यांनी आपल्या जिल्ह्यांतील किंवा तालुक्यांतील कार्यकारी मंडळाकडे मागणी केली असतां सहज पुरविण्यांत येईल. अशा रीतीने वाचलेले प्रवासाचे श्रम व पैसा यांचा उपयोग इतर रीतीने या कार्याच्या प्रचाराकडे केल्यास तो अधिक फलप्रद होईल.

( ३ ) म. प्रां. का. कमिटीचे अध्यक्ष व केसरीचे एक सहसंपादक रा. ग. वि. केतकर, हे राष्ट्रीय सभेच्या आज्ञेने व वर्किंग कमिटीच्या नियमानुसार या कार्याचा प्रसार महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या क्षेत्रांत करीतच आहेत. तरी ज्यांना ज्यांना हे कार्य करण्याची इच्छा असेल त्यांनी रा. केतकर यांच्याकडे समक्ष कळवावे अगर पत्रव्यवहार करावा किंवा पुणे येथील या मुख्य कार्यकारी मंडळाचे चिटणीस रा. दिवेकर ( गायकवाड वाडा, नारायण पेठ ) याजकडे, किंवा यानंतर जिल्हामंडळे किंवा तालुकामंडळे, किंवा यांच्या चिटणिसांची जी नावे प्रसिद्ध होतील त्याजकडे आपली नावे नोंदवून कार्याला लागावे.

( ४ ) या चळवळीसंबंधाने मध्यवर्ती मंडळाकडून प्रसिद्धिपत्रकाच्या द्वारे वेळोवेळी अवश्य तो मजकूर सर्वांना कळविण्यांत येईलच. तसेच महाराष्ट्रातील बहुतेक सर्व वर्तमानपत्रांतून मोठ्या कार्योपक्रमांची आगाऊ सूचना किंवा झालेल्या कामाची हकीकत वेळोवेळी प्रसिद्ध करण्यांत येईलच. तथापि जिल्हामंडळे किंवा तालुकामंडळे यांनी अशा प्रसिद्धिपत्रकांची किंवा वर्तमानपत्रांतून येणाऱ्या मजकुराची वाट न पाहतां, आपणास मार्गदर्शक होणाऱ्या कार्यकारी मंडळाशी समक्ष अगर पत्रव्यवहाराने विचारविनिमय करावा.

( ५ ) या कार्याचा प्रचार ठिकठिकाणी जाहीर सभा भरवून व जाणत्या पुढारी लोकांची भाषणे होऊन जितका होईल तितका इतर रीतीने होणार नाही हे उघड आहे. म्हणून अशा सभा भरविणे हे काम स्थानिक पुढाऱ्यांनीच आपल्या अंगावर घेतले पाहिजे. मध्यवर्ती मंडळाचे अधिकारी किंवा पुढारी यांना सर्व जिल्ह्यांतून किंवा सर्व तालुक्यांतून फिरतीवर जाणे शक्य नाही. किंबहुना कांही पुढारी माणसांना आपापली नित्याची कामे संभाळूनच या चळवळीचे हे विशेष कार्य करावयाचे आहे. करितां असे लोक आपल्या गांवी येतील व मग आपण या चळवळींतील प्रत्यक्ष कायदेभंगाचे किंवा प्रचाराचे काम करूं, अशी अपेक्षा बाळगून हात आखडून बसल्यास व्हावें तितके कार्य

होणार नाही हे अगदी उघड आहे. ही चळवळ यशस्वी व्हावयाची तर ती बाहेरच्या उपदेशापेक्षा स्वतःच्या अतःकरणांतील स्फूर्तीनेच अधिक यशस्वी होईल हे सांगावयास नको. आपापल्या स्थानिक कार्यकारी मंडळांचा उपयोग करून त्यांच्या नेतृत्वाखाली ही चळवळ ठिकठिकाणच्या लोकांनी पार पाडावी. तालुक्याच्या परीने तालुक्यात व जिल्ह्याच्या परीने जिल्ह्यांत लोकांना मान्य व आदरणीय असे जुने पुढारी आजहि आहेत; व कार्य केल्याने नवेहि सहजच निर्माण होतात. आणि कोणत्याहि खऱ्या राष्ट्रीय चळवळीची खूण हीच की तिच्या कार्यात हा लहान हा मोठा हा भेद सहसा उरत नाही, किंवा तो कोणीहि मानू नये. लहान गावापासून राजधानीच्या शहरापर्यंत सर्व तऱ्हेचे पुढारी हे एकाच कार्याला एकाच हेतूने जुपलेले असल्यामुळे, देशाच्या दृष्टीने सर्वच कनिष्ठ पण कार्याच्या दृष्टीने सर्वच श्रेष्ठ अशी भावना ठेवून एकविचारे कार्य घडल्यास फार थोड्या अवधीत मोठे कार्य घडूं शकतें.

( ६ ) राष्ट्रीय पक्षाच्या या कार्यसंघटनेत प्रत्येक जिल्ह्यात कार्य होईलच. परंतु कुलाबा जिल्ह्यात रा. रामचंद्र नारायण मंडलिक व ठाणे जिल्ह्यात रा. जम्नादास मेहेता यांनी पुढारीपण घेऊन हे कार्य चालू करण्याचे ठरविले असून तसे त्यांनी यापूर्वीच मजकडे कळविले आहे. तरी इतर जिल्ह्यांतूनहि अशाच प्रकारची योजना होऊन पुणे येथील मध्यवर्ती कार्यकारी मंडळाकडे कळविल्यास बरे होईल.

( ७ ) हल्ली चाललेली कायदेभंगाची चळवळ ही स्वातंत्र्यप्राप्तीकरितां असो किंवा मिठाचा कायदा रद्द करण्याकरितां असो, तिजपासून राष्ट्रीय जागृतीला मदतच होणारी आहे. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाच्या तत्त्वांत व धोरणांत अशा चळवळीचा अंतर्भाव अवश्य होतो. म्हणून तिला सहानुभूति प्रदर्शित करण्याकरितां आपल्या या पक्षाने तीत योग्य व शक्य तो भाग घ्यावा असें मला वाटते."

पुणें<br>ता. ११।४।१९३० } **न. चिं. केळकर**

**आतां माझी भूमिका सांगतो. आमच्या पक्षाने असे ठरविले की कोणत्याहि काँग्रेस कमिटीच्या आज्ञेत राहून कायदेभंग करावयाचा नाही.** आपल्या पक्षाच्या

पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीच आपण तो करूं. आणि पहिल्या सत्याग्रही तुकडीच्या नांवाची नोंदहि होऊं लागली. तेव्हां मला असे सांगण्यांत आले की, " तुम्ही यांत येऊं नका. मागे कोणी तरी पाठपुरावा करणारा मोकळा असावा लागतो. ते तुम्ही रहा." पण मला माहीत होते की, पोटात पाय असणाऱ्या निंदक-वर्गातील कांही लोकांच्या मनांतला हा अर्थ असण्याचा सभव की " तुरुंगांत जाण्याला भिणारे तुम्ही. तुम्हाला चळवळीत पडणे न पडणे दोन्ही जिवावर येणार. म्हणून त्यानीच होऊन भलेपणाचा देखावा करून तुम्हाला सागितले की तुम्ही मागें रहा." पण या निंदकांच्या आधीच मी एक वेळ तुरुंगांत जाऊन आलो होतों. आणि जबाबदार सपादक म्हणून पीनल कोडाच्या वस्तऱ्याच्या धारेवर पाय ठेवून वर्षानुवर्ष लेख लिहीत होतो. अर्थात् मी तुरुगाला भिणारा नव्हतो. म्हणून कोणचीहि कारणे न देत बसतां मी इतकेच म्हणालो " ठीक आहे. चाळीसांची याद करताच आहा तर त्यात माझे नांव पहिले लिहा पाहूं. मग बाकी एकूणचाळीस कोण ते लिहा." अस्तनीतील निखारे विझविण्यालाहि हे उत्तर समर्पक होतें.

त्याप्रमाणे याद होऊन निरनिराळी माणसे निरनिराळ्या ठिकाणी रवाना झाली. पेण येथे रा. रामभाऊ मंडलिक यानी कायदेभग सुरू करून मला निमत्रण पाठविले. त्याचा ताबडतोब स्वीकार करून मी निघालो. वाटेत लोणावळ्यास माझे वडील बंधु येऊन राहिले होते, त्याना, " पेणला म्हणजे तुरुंगांत जायला निघालो आहे, सहा महिने पुन्हां भेटण्याचा सभव नाही " असे सागूनच मी पुढे गेलो. गेल्या दिवशीच रात्री कायदेभंगाला उत्तेजनकारक व्याख्यान दिले. दुसऱ्या दिवशी झेंडावंदन करून हजारो लोकांसमक्ष मिठाचा सत्याग्रह केला व परत आलो. मला अटक झाली नाही याचे आश्चर्य वाटले. मी आल्यानंतर रा. केतकर, मडलिक वगैरे मडळी पेण तालुक्यांत, दा. वि. गोखले वसई तालुक्यांत, भोपटकर पुण्यास अशी धरपकडीची माळ लागून तुरुंग-वासाच्या शिक्षा झाल्या. पेणला चुकले तर ते पुण्यास साधावे अशा विचाराने शिवाजी मंदिरांत फिरून मिठाचा सत्याग्रह केला. फिरून टिळक मंदिरांत आक्षिप्त वाङ्मय वाचनाचा सत्याग्रह केला. पण हे तीन प्रयत्न फुकट गेल्याचे पाहून मग मी तो नाद सोडला. "तुरुंगांत जाण्याकरितां जंग जंग पछाडीन पण एकदांचा तुरुगांत जाईन" अशी माझी प्रतिज्ञा नव्हती. शिवाय कॉंग्रेसवर मनांतून

मी नाराजच होतो, म्हणून सरकारने मला तुरुगांत न धाडण्याचा निश्चय केलेला पाहून तो मार्ग मीहि सोडून दिला.

१९३२ साली फिरून कॉंग्रेसने कायदेभगाची चळवळ सुरू केली तेव्हां तर मी प्रथमपासूनच मनाने ठरविले की, या चळवळीला दुरून सुद्धां स्पर्श करावयाचा नाही. कारण १९३० सालच्या पेक्षाहि ही १९३२ ची चळवळ अधिक असमर्थनीय होय असे माझे मत होते आमच्या पक्षातील लोकांनाहि असेच वाटू लागले होते. पण या दुसऱ्या चळवळीत लोकांनी कायदा मोडण्याची वाटच सरकाराने पाहिली नाही. त्याने पूर्वपरिचयावरून याद्याच तयार करून ठेवल्या होत्या, आणि चळवळीची घोषणा होताच त्या याद्या बरहुकूम धरपकड करून होय नाही म्हणण्यास कोणाला सवडच ठेवली नाही. यामुळे या चळवळीत काहीं लोक अनिच्छेने सामील झाले होते, म्हणजे सापडले होते. याचे प्रत्यंतर हेच की, काहीना पॅरोलवर सोडले असता त्यानी त्याच्या अटी पाळल्या. त्या मोडून स्वतःला शिक्षेला पात्र करून घेतले नाही. पण मी अगदीच गप्प बसलो नव्हतो. सोलापूर येथील लष्करी कायद्याच्या जुलमावर मी केसरीच्या अकामागून अकात इतकी कडक टीका करीत होतो की, तशी टीका त्या वेळच्या दुसऱ्या एका तरी पत्राने केलेली कोणी मला दाखवून द्यावी असे माझे जाहीर आव्हान आहे. मी कायदेभगाच्या चळवळीत सामील झालो नाही, पण कर्मयोगांत क्रमप्राप्त ठरेल तर त्या तुरुगवासालाहि भ्यालो नाही.

या सुमारास कायदेभगाला बरेच विकृत स्वरूप आले होते. कांही स्वयंसेवक म्हणविणारानी पैसे घेऊन तुरुगवास पत्करला. काही कॉंग्रेसवाले नाइलाजाने नाखुषीने तुरुगात जात होते. काही हिडून जागेचा थारेपालट करून तुरुगवास चुकवीत होते. आणि विशेष हे की तुरुगवासाचे श्रम कष्ट हाल हे सर्वस्वी सपून तुरुंगात मिळणाऱ्या सवलती सुखसोई यांच्यामुळे तुरुगवास हा एक खेळ होऊन बसला होता. १९३२ चा कायदेभंग घटत चालला, आता लोक तुरुगात घालण्यास सरकाराला कष्टसायास करावे लागतात, असे पाहिल्यावर मी केसरीतून कायदेभंगाची चळवळ थांबविण्याचा उघड आग्रह करू लागलो. माझा युक्तिवाद याविषयी असा होता की सरकाराला धाक दाखवावयाचा हेतु असेल तो सफळ झाला. सरकार आपण चळवळ हाणून पाडली असे कांही म्हणू शकत नाही हे खरे. पण त्यामुळे ती थाबवा अशी याचनाहि ते कॉंग्रेसकडे करणार नाहीं हे उघड

होते. बरे भाडण मिटवावयाला प्रायः मध्यस्थ तिऱ्हाईत उपयोगी पडतो पण आता सप्रू जयकरासारखे लोकहि पूर्वानुभवाने विटलेले, हात पोळलेले, म्हणून या कामांत पडणार नाहीत असे अनुमान करता येत होते. इतर पक्षाच्या पुढाऱ्या-विषयी बोलावयासच नको. एतावता स्वतः काग्रेसपक्षीय लोकानीच या कामी पुढारीपण घ्यावे, आणि कारणे सागत न बसता कॉग्रेस ही चळवळ थाबवील असा प्रयत्न त्यानी करावा, असे मी केसरीतून सुचविले. त्याविषयी थोडे उतारे देतो :—

"कायदेभंगाची चळवळ आता थाबविली पाहिजे, व ती थाबविण्याचा अधिकार राष्ट्रीय सभेलाच असल्यामुळे तिनेच या गोष्टीत पुढाकार घेतला पाहिजे, असे आम्ही मागील अकी लिहिलेच आहे ही गोष्ट केवळ आजच प्राप्त झाली, किंवा तिजविषयी आम्ही अशा प्रकारचे मत आजच प्रथम प्रकट करीत आहोत असे मात्र नाही. तर ता. १२ ऑगस्ट १९३२ च्या केसरीच्या अगात "तिरगी सामन्यातून तिरगी समेट निघेल काय ?" असा प्रश्न उपस्थित करून, त्याचे जे उत्तर आम्ही दिले होते त्यात कायदेभगाची चळवळ थाबविण्याची सूचना केली होती. तेव्हा आम्ही असे म्हटले होते की, राजकारणाचा डाव कुजलेला आहे. तो तसाच कुजलेला राहण्यापासून देशाचे अनहित आहे. हा कुजटपणा काढून टाकून राजकारण पुन्हा प्रवाही व खेळते करण्याकरितां युक्तिप्रयुक्ति करणे अवश्य आहे. साध्या खेळात बुद्धिवान् पुढारी गडी जशा युक्त्याप्रयुक्त्या बदलतात, तशा राजकारणातहि बदलणे अवश्य असते. आणि युक्तिप्रयुक्ति बदलल्याने फायदाहि होण्याचा सभव असतो. प्रस्तुत युक्तिप्रयुक्ति म्हटली म्हणजे कायदेभंगाची चळवळ राष्ट्रीय सभेने आपण होऊन थांबविणे ही होय. आणि सात महिन्यां-पूर्वीच जर असे करणे योग्य होते, तर आज त्यानतर आणखी सात महिने गेल्यावर तसे करणे अधिकच योग्य ठरत नाही काय ? म्हणून सात महिन्यांपूर्वी जी सूचना आम्ही उघडपणे केली तीच फिरून एकवार आज करीत आहो.

"राष्ट्रीय सभेने चळवळ थांबवावयाची तरी ती कशी थांबवावयाची ? या प्रश्नाचे आमचे उत्तर असे की, मध्यस्थीने व खटपटीने. पण कोणाच्या ? तर जे राष्ट्रीय सभावाले किंवा चळवळीचे पुरस्कर्ते आज तुरुगाबाहेर आहेत त्यांच्या. कारण जे तुरुगांत आहेत त्यांना ही खटपट करतां येणे शक्य नाही. तुरुगांत

असलेल्या एखाद्याला फार तर कदाचित् शेठ जम्नादास द्वारकादास यांच्याप्रमाणे करता येईल. म्हणजे त्रागा करून, म. गांधींना दूषण देऊन, यापुढे आपण ही चळवळ करणार नाही असे जाहीर करून, व स्वतःची सुटका करून घेऊन ! पण असे उदाहरण एखादेच होणार, व झाले तरी त्याचा परिणाम चळवळीच्या पुढाऱ्यावर चांगलासा होणार नाही. वास्तविक जम्नादास द्वारकादास यांनी दोन-तीन वेळ स्वेच्छेने या चळवळीत तुरुंगवास पत्करिला, यामुळे त्यांच्यावर भ्याड-पणाचा, भित्रेपणाचा आरोप कोणी करू शकणार नाही. शिवाय त्यांच्या सुटकेची स्वाभाविक मुदत यापुढे फक्त एक-दीडच महिना उरलेली असल्यामुळे, त्यांनी केले ते सुटकेच्या उतावळीपेक्षा म. गांधींच्या धोरणासंबंधाने उत्पन्न झालेल्या तीव्र नापसतीने व उद्वेगानेच केले असेच कोणालाहि म्हणावे लागेल. आणि आमची अशी समजूतच काय, पण आम्हाला अशी माहितीहि आहे की, म. गांधींचे कित्येक कट्टर अनुयायीहि म. गांधींच्या चुकीच्या धोरणामुळे त्यांच्यावर मनां-तून खूपच नाखूष झाले आहेत !

"गुरुनिष्ठेमुळे ते आपली नाखुषी बोलून दाखवीत नाहीत, व जम्नादास द्वारकादास यांच्याने ती बोलून दाखविल्याशिवाय राहवले नाही, इतकाच फरक. तथापि प्रत्यक्ष सरकारच्या कारवाईच्या दृष्टीने, जम्नादास द्वारकादास यांचा त्रागा फारसा उपयोगी पडणार नाही. ते चळवळीमध्ये तुरुंगांत गेले तरी राष्ट्रीय सभेच्या अधिकारी वर्गात त्यांची गणना कोणीहि करीत नाही. उलट तीन वेळ तुरुंगात जाऊनहि, अविचारी कट्टर लोकांकडून देशद्रोही म्हणवून घेण्याची त्यांच्यावर पाळी आली आहे असेच समजावें. कारण रागावलेल्या मनुष्याच्या तोंडाला पहिला शब्द शिवीचा येतो, व राज-कारणाच्या भाषेत 'देशद्रोही' ही शिवी आजकाल कोणी कोणाला सहज जातां येता द्यावी अशी सर्वसामान्य होऊन बसली आहे. म्हणून जम्नादास द्वारका-दास यांच्या त्राग्याचा परिणाम इतर लोकांच्या मनावर झाला तरी, राष्ट्रीय सभेचें धोरण ठरविण्याचा अधिकार ज्यांच्या हाती आहे त्यांच्यावर तो होण्याचा फारसा संभव नाही.

"जम्नादास द्वारकादास यांच्याइतकेच म. गांधींना विटलेले, किंवा या चळवळीला कंटाळलेले, किंवा फक्त ती चळवळ आता थांबवावी हे युक्तिप्रयुक्ती-च्या दृष्टीने योग्य आहे असे वाटणारे, असे बरेच लोक आज तुरुंगांत आहेत

यांत शका नाही. पण जम्नादास यांच्या उतूं येण्याच्या पद्धतीने मनाच्या या जाचांतून मुटका करून घ्यावी हे त्यांना पसंत नाही. यामुळे प्रामाणिक मत बोलून दाखविण्याचे धैर्य त्यांच्या अगी असले तरी फुकटच जाणार! म्हणजे त्यांच्या भलेपणामुळे ते निरुपयोगी ठरणार! तुरुंगांत असलेल्या लोकांची चळवळीविषयीची खरी मते घेण्याचा व मोजण्याचा कांही निरपवाद असा मार्ग असता, तर चळवळ थांबविण्याला त्यांचीहि कबुली मिळाली असती. परंतु असा मार्ग मिळणे अशक्य आहे. यामुळे एक तर ते दुसऱ्या कोणी चळवळ थाबवीपर्यंत असेच मनांत कुढत व असंतुष्ट होऊन बसतील; किंवा अगावर ओढून घेतलेली शिक्षा पुरी होईपर्यंत ते सात्विकपणे समाधान मानून आनंदानेहि काळ काढतील. पण हे माहीत असता त्यांची अड-चण दूर न करणे हे मात्र राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना दूरदर्शीपणाचे होणार नाही. तुरुंगात असता मुटकेची रोज नवी आशा उत्पन्न व्हावी व रोज ती नष्ट व्हावी, अशा रीतीने आशानिराशेचे खेळणे बनून दुःखित झालेले किती तरी लोक आज तुरुंगांत असतील. अर्थात त्यांची आशा निखालस नाहीशी करावी, किवा चळवळ बंद करून त्याची सुटका करून द्यावी, हेच चळवळीच्या पुढाऱ्यांचे आज कर्तव्य ठरते.

"नाही म्हणावयाला तुरुंगांत असूनहि चळवळ बद करण्याचा ज्याला आज अप्रत्यक्ष अधिकार आहे असा एकच मनुष्य आम्हांला दिसतो व तो म्हणजे म. गाधी होत. त्याच्या कैदेला मुदत नाही. कारण त्यांच्यावर खटला न होतांच त्याना तुरुगवास प्राप्त झाला आहे. यामुळे त्यांची सुटका होण्याला जसा एक क्षणहि लागणार नाही तशीच त्याचा तुरुंगवास लांबण्यालाहि काही कालमर्यादा नाही. इतर कैद्यांपेक्षां विशेष अर्थाने ते 'सरकारचे पाहुणे' आहेत; व अशा पाहुण्याप्रमाणेच सरकारने त्याची सर्व व्यवस्था ठेवलेली आहे. यामुळे राजकारणासंबंधी वाटाघाट करण्याची, किंवा मत प्रदर्शित कर-ण्याची, जी सवलत इतर कैद्याना मिळण्यासारखी नाही, ती म. गांधीना मिळण्या-सारखी आहे. खुद्द सरकारशी बोलणे चालणे करण्याला तर त्यांना काहीच आडकाठी नाही, आणि कित्येकांच्या मते सरकाराशी त्यांचा पत्रव्यवहार आज चालूंहि आहे. फक्त तो प्रसिद्ध होत नाही इतकेच.

"पूर्वीच्या त्यांच्या प्रायोपवेशनाच्या आधी कित्येक दिवसपर्यंत त्यांचा थेट मुख्य प्रधानाशी पत्रव्यवहार चालू होता, व तोच पुढे आयत्या वेळी प्रसिद्ध झाला, हे सर्वांना ठाऊकच आहे. तथापि हल्ली पत्रव्यवहार चालू आहे किंवा नाही हे आम्हांला निश्चित माहीत नाही; शिवाय तो चालू असला तरी त्यांत 'मी चळवळ थांबवितो' असे सरकारास कळविण्यापर्यंत त्या पत्रव्यवहाराची मजल आली आहे असे आम्हांस वाटत नाही. कारण कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याची जबाबदारी जशी कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीवर तशीच ती थांबविण्याचीहि जबाबदारी त्याच कमिटीने घेतली पाहिजे, असे म. गांधी यांचे मत असण्याचा संभव आहे. आणि तसे असेल तर त्यात वावगे असे फारसे नाही. म. गांधी याच्या मताला अर्थातच इतर कोणाच्याहि मतापेक्षा पुष्कळच अधिक किंमत असणार. पण चळवळ थांबविणे, सुरू करणे, या गोष्टीत माणसाच्या महत्त्वापेक्षा त्याचा अधिकारच अधिक निर्णायक ठरतो.

"अशा रीतीने तुरुंगातून वैतागाने बाहेर पडलेले, किंवा नाखुषीने तुरुंगांत राहून कुढत बसणारे, किंवा सात्विक समाधान वृत्तीने राहणारे, किंवा म. गांधी-सारखे व्यक्तिशः फार महत्त्वाचे हे सर्व लोक चळवळ थांबविण्याला निरुपयोगीच ठरतात. या कामी आमच्या मते तुरुंगात नसलेले पुढारी हेच खरे उपयोगी आहेत. आणि म. गांधीच्या सल्ला-मसलतीचा किंवा वजनाचा उपयोग व्हावयाचा असेल किंवा होईल तर, तो या लोकाच्या अधिकृत खटपटीची केवळ पुरवणी म्हणून! पण तुरुंगात नसलेल्या या लोकांतहि अनेक प्रकार आहेत. कांही लोक एकदां किंवा अनेकदां शिक्षा भोगून आलेले आहेत. ह्यांना फिरून चळवळ करून तुरुंगांत जावे असे वाटत असते तर त्यांनी यापूर्वीच केले असते; पण तसे केले नाही याचा अर्थ काय करावयाचा हे उघडच दिसते. दुसरे कांही स्वतःच्या कोणत्याहि उघड कृत्यामुळे तुरुंगांत गेलेले नसून, केवळ संशयाने सरकारने त्यांना तुरुंगांत घातले होते. आणि मामुली दोन महिन्यांची मुदत संपताच त्याजवर कांही अटी घालून त्याना मोकळे सोडले आहे. अर्थात् यापैकी ज्यांनी अटी पाळल्या त्यांच्या मते ही चळवळ थांबावी असेच असल्याचे अनुमान करतां येते. कारण असे अनुमान न केले तर स्वतःला ही चळवळ चालविण्याची संधि असतां इतरांनी मात्र तुरुंगात जावे व आपण मोकळे राहावे अशी त्यांची इच्छा असल्याचा आरोप त्यांच्यावर करावा लागतो! पण तो करण्यास आम्ही तयार नाही.

तात्पर्य, पक्की कैद भोगून बिनअटीने किंवा कच्ची कैद भोगल्यावर अटी पाळून, जे लोक आज तुरुगाबाहेर आहेत त्यांनी ही चळवळ थांबवावी असे म्हणणे ओघानेच प्राप्त होते.

"पण या शिवाय आणखी एक वर्ग आहे. त्याच्यासबधाने तर हे विधान करण्यास काहीच भीति नाही. हा चमत्कारिक वर्ग म्हटला म्हणजे स्वतः कच्च्या किंवा पक्क्या कोणच्याहि प्रकारच्या कैदेत कधी न जाता चळवळीस मदत केलेल्या किंवा करणाऱ्या लोकांचा. हे लोक मनात म्हणत असतील की, "आम्हीच तुरुगात कशाला जावयास हवं ? आम्ही मोकळे राहून चळवळीचा पाठपुरावा करणे हे प्रत्यक्ष चळवळ करण्यासारखेच होय." पण त्यांनी लक्षात ठेवावे की, त्यांच्या दुर्दैवाने जगाचे मत तसे नाही. "मला चळवळ पसंत नाही असे म्हणून, किंवा मला चळवळ पसत आहे पण तुरुगात जाणे मला अनुकूल नाही" असे म्हणून प्राजलपणे सरळ अपवाद सोसणारा मनुष्य एक वेळ जगाला चालेल. पण जेव्हा पाहावे तेव्हा कायदेभगाच्या चळवळीचा पाठपुरावा करण्याच्या बहाण्यातच मग्न झालेले, इकडे लोकाना नांवे ठेवणारे पण स्वतःच्या कातडीला सोन्याचे मोल मानून, फिरून वरती ती देशहिताकरिता सांभाळून ठेवीत आहे असला कांगावा करणारे लोक कांही थोडे नाहीत ! अर्थात् त्यानी लोकाना परभारे तुरुगांत पाठविण्याची देशसेवा आता पुरी करावी असे त्यांना हात जोडून सांगण्याची वेळ आली आहे ! तोडाने बहिष्काराचा घोष चालू ठेवणारे पण आंतून खुशाल परदेशी मालाचा व्यापार करून पोट भरणारे, तोंडाने कौन्सिलबहिष्काराचा घोष करणारे पण साधेल त्या प्रसगी साधेल त्या रीतीने कायदेकौन्सिलांचा उपयोग काडीइतकाहि होत असेल तरी न सोडणारे, तोंडाने सरकारी कायद्याविषयी अद्वातद्वा बोलणारे पण स्वतः आचरणात सर्व कायदेकानू एखाद्या गुलामाप्रमाणे पाळणारे, आणि शेवटी कायदेभगाच्या चळवळीचा स्तुतिपाठ गाणारे पण अनेक खाजगी किंवा सार्वजनिक पोकळ सबबी सांगून स्वतः तुरुगापासून शेकडो कोस दूर राहणारे—अशा दुटप्पी लोकांच्या वर्तनाने गेली बारा वर्षे या देशांत नुसता गोंधळ घातला आहे ! तो इतका की, कॉंग्रेसचे खरे भक्त व खरे स्वार्थत्यागी पण बिचारे, अशा पुढाऱ्यांचे त्या गोंधळांत कांही एक चालत नाही. भाडोत्री

नोबती आणून कोणी त्या वडविण्याचे काम सुरू ठेवले तर बिचाऱ्या मनुष्याचा आवाज कितीहि मोठा असला तरी कोणाला कसा ऐकू जाईल ?

" पण आता वेळ अशीच आली की, कच्च्या दिलाचे पण सच्चे, भोळे पण भले, स्वार्थत्यागी पण विचारी, अशा लोकांनी जर एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन ही चळवळ थाबावी असे जाहीर रीतीने प्रकट केले, व त्या आपल्या निःस्वार्थी मताचा योग्य तो आग्रह धरला, तर त्याचे म्हणणे तडीला जाऊ शकेल. कारण आजवर झालेली चळवळ ही राष्ट्राला भूषणभूत अशीच झाली हे जसे त्याना म्हणता येईल, तसेच ही चळवळ पुढे चालल्यास भूषण जाऊन त्या ठिकाणी दूषण येईल, अति केले तर माती होईल, चळवळीचें वस्त्र ताणले तर फाटून जाईल, आणि वारा फार भरला तर कातडी चेंडूहि फुटून जातो म्हणून चळवळ थांबवा असेहि त्याना यथार्थतेने प्रतिपादिता येईल. म्हणून जे लोक या चळवळीत स्वेच्छेने जाऊन, तुरुगवास पत्करून, खरा स्वार्थत्याग करून आज हालचाल करण्याला मोकळे आहेत, त्यानीच आता पुढे येऊन ही चळवळ थाबविण्याचा सल्ला राष्ट्रीय सभेला देण्याचे धैर्य दाखविले पाहिजे.

"तो मान व तो अधिकार हा जसा त्याचा, तशीच ती जबाबदारीहि त्यांचीच होय. जे या चळवळीत पडले नाहीत त्याना तो अधिकार अर्थातच नाही. तसेच ज्यांनी त्यात फक्त लुडबुड करण्याइतकाच भाग घेतला, किंवा तितकाहि भाग न घेता फक्त लोकाना नावे ठेविली, त्यांनाहि हा अधिकार नाही. तर जे खऱ्या मनाने चळवळीत पडले, ज्यांनी खऱ्या मनाने स्वार्थत्याग केला, व आतां ज्याना खऱ्या मनानेच ही चळवळ थांबावी असे वाटते त्यांनाच ती थाबविण्याचा अधिकार आहे. आज चौदा महिने चाललेली चळवळ आता थांबवावी असे म्हणण्याला अनेक कारणे आहेत; पण त्या सर्वांचा स्पष्ट उच्चार करण्याचे कारण नाही. त्यांचा उच्चार न झाला तरी लोकांना ती कारणे माहीत आहेत. जे काय पाहिजे आहे ते विधायक स्वरूपाचे धैर्य. हे धैर्य दाखविल्याशिवाय, म्हणजे चळवळ आपण होऊन थांबविल्याशिवाय, ती थांबूं शकणार नाही. आणि ती जोपर्यंत तशी थांबूं शकत नाही, तोपर्यंत इतर कांहीहि होऊं शकत नाही हेहि उघड आहे.

" यावर कोणी म्हणेल कीं लढणारा लढतो, व सोसणारा सोसतो, मग बघणाराला त्याची कीव कां यावी ? त्याला आमचे पहिले उत्तर हे की, चळवळ चालू असतां तिच्या चढत्या काळांत आपलेपणामुळे अभिमान वाटणे हा जसा बघणाराचा सहज मनोधर्म आहे तसा, त्याच आपलेपणामुळे, तिच्या पडत्या काळांत तिची कीव येणे हाहि सहज मनोधर्मच आहे जे युद्धांत शिरतांना आपल्याकडे कोणी पाहात आहे की नाही याची पर्वाहि करीत नसतील, अशा सात्विक वीरांनाच " आमची कीव तुम्ही कां करतां ? " असे विचारून आपल्या अभिमानी लोकाचा अधिक्षेप करण्याचा अधिकार असतो. पण प्रस्तुत चळवळीसारख्या युद्धांत पडणारापैकी तसे खरे किती ? आजूबाजूला न पाहतां, कोणाच्या सहानुभूतीची अपेक्षा न ठेवता, लोकेषणा यत्किंचितहि न बाळगतां, आणि चळवळीत पडण्यापासून होणाऱ्या सभवनीय स्वार्थी अहकारनिष्ठ फलाची अपेक्षा न करतां, जो या चळवळीत पडणारा असेल त्याला लोकाच्या स्तुतीची किमत वाटणार नाही; आणि त्याचप्रमाणे आपली कोणी सहानुभतीने कीव केली तरी तिजमुळे आपला तेजोभग झाला अशी तक्रारहि तो करणार नाही.

" असे केवळ सात्विक व धीर वृत्तीचे काही महात्मे याहि चळवळीत आहेत याविषयी आम्हाला शका नाही. पण वरील वर्णन ज्याना लागू पडत नाही असे किती तरी लोक या चळवळीत पडतात, ही माहिती ज्याना आहे त्यांना अशाची कीव करावीशी वाटली तर त्यानी कां करू नये ? या पक्क्या-कच्च्याची अशी खिचडी होण्याचे कारण हेच की, चळवळ सामुदायिक म्हणून योजली व चालली आहे हे होय. तिजमध्ये पडणारे बरेचसे लोक विवेकनिष्ठ निश्चयाने पडत नाहीत. ते केवळ लोढ्याबरोबर वाहवत जाणारे व भावनावश असे असतात. आणि कांही तर तुरुगांत गेल्यावर आपण कोणत्या तरी प्रसगाने, कोणत्या तरी निमित्ताने, किवा कोणाच्या तरी खटपटीने सुटू अशी अपेक्षा मनांत ठेवून काळ कठतात. अशा लोकाबद्दल सहानुभूति कां वाटू नये ? किंबहुना अशा लोकांचे तुरुंगांतील जीवित अशा सहानुभूतीवरच अवलंबून असते. आणि ते तसे असते म्हणूनच बाहेर इतरांकडून त्यांच्या सुटकेची खटपट जाहीर रीतीने सुरू असते. प्रस्तुत चळवळीच्या पुढाऱ्यांना ती थाबविण्याचा सल्ला हा जर खरोखर आपला तेजोभंग वाटत असेल, तर त्यांनी पहिली गोष्ट ही करावी की, "तुरुं-गांतील राजबंद्यांची सुटका करण्याविषयी लोकांनी सभातून ठराव किवा कायदे-

मंडळांतून खटपट करणे हा चळवळीचा तेजोभंग होतो म्हणून कोणीहि तसली गोष्ट करू नये" असे फर्मानच काढावे. म्हणजे मग लोक त्या भानगडीत कशाला पडतील ? कारण धावत्याचा पाय विनाकारण ओढावा, किंवा प्रकाशमानांच्या प्रकाशाच्या आड येऊन त्याचे तेज लववावे असा कोणाचाच हेतु नसतो. निदान कॉंग्रेसविषयी यथायोग्य अभिमान वाटणाराचा तरी तसा हेतु नसतो हें कोणासहि कबूल करावे लागेल"

केसरीतील या माझ्या लिहिण्यावर कट्टर कॉंग्रेसवाले फार रागावले. त्यांनी निषेधाची पत्रकें काढली. त्याना मी केसरीतून समर्पक उत्तरे दिली. पण ती हकीकत वाढवीत नाही. त्याची वाचकाना आपोआप कल्पना होईल. सांगण्याचे तात्पर्य इतकेच की कॉंग्रेसवाल्यानाच चळवळ थाबविण्याच्या प्रश्नाचा गंभीर व विवेकबुद्धीने विचार करावा असे वाटू लागले. म्हणून त्या वेळचे कॉंग्रेसचे हगामी सर्वाधिकारी बापूजी अणे यानी पुणे येथे एक मोठी परिषद १९३३ च्या जुलै महिन्यात भरविली. सुमारे दीडशे लोक हजर होते. अणे माझ्याच घरी पाहुणे म्हणून उतरलेले याकरितां त्यानी मला निमंत्रण देणे प्राप्तच होते. पण इतर परिस्थितीत मला निमंत्रण येणे शक्य नव्हते. मी चळवळ थाबवा म्हणूनच सल्ला देणारा, ना शास्त्री हेहि त्याच मताचे, पण गाधीनी सल्ला घेण्याकरिता मद्रासेहून ना. शास्त्री यांना तारेने बोलावले मात्र माझी त्यानी आठवणहि केली नाही. पलीकडचा तोच अलीकडच्याहून अधिक जवळ असे म्हणतात तेच खरे.

असो. या सभेत काय निष्पन्न झाले ? हेच की, "सत्याग्रह हा एक नवीन प्रकारचा योग आहे. त्याचा दृष्टान्त आपणालाच झाला अर्थात् त्याचे शास्त्र त्याचे सूत्र, त्याचे तत्व, त्याचा न्यास, त्याची ध्यान-धारणा, त्याचा आसनविधि, आणि त्याचे आवाहन विसर्जन यांची माहिती फक्त आपणाला आहे तशी दुसऱ्या कोणालाहि आज नाही" असा घमेंडखोर महात्माजींचा दृढ-विश्वास आहे. आणि तो विश्वास ते स्वतःच काही विनोदाने पण पुष्कळसे खऱ्या भावनेनेहि बोलून दाखवीत असतात. तेव्हा त्याच्या अनुयायाना ते मान्य करणे प्राप्तच होते ! आणि सामुदायिक कायदेभग थाबवून तो व्यक्तिशः करावा, पण फिरून तोहि गाधीवर सोपवावा असे ठरले.

असो; कायदेभंगाची चळवळ थाबवावयाची तर सरकार बहुमानास्पद असा तह मान्य करील तरच थाबवावयाची हे पर्यायाने मान्य करून, या तहाची

वाटाघाट करण्याची कामगिरी समितीने लोकांनी एकट्या महात्माजींवरच सोपविली. त्याप्रमाणे गांधीजींनी व्हाइसरॉय लॉ. विलिंग्डन यांना मुलाखत देण्याविषयीं तार केली. ते काहीहि असो, कायदेभंगासंबंधाने लोकमत अजमावण्याची एक संधि पुण्याच्या या सभेने दिली, आणि अखेर ठराव काहीहि झाला तरी तो थांबवावा असेच बहुतेक एकदरीने लोकमत असल्याचे सिद्ध झाले, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. विशेषतः चळवळ थांबवावी असे ज्यांनी स्पष्ट बोलून दाखविले त्यातले बहुतेक लोक या गेल्या चळवळीत स्वतः अंग मोडून काम करणारे होते. पण त्यांपैकी कित्येकांनी जर, ठराव मताला घालण्याच्या वेळी, स्वतःच्या मताविरुद्ध मत दिले असले, (आणि यात गंगाधरराव देशपांडे हे एक होते) तर त्याचे कारण एकच, ते हे की, 'एक मी की एक तू!' असा कठोर सवालच गांधींनी अनुयायांना टाकून त्यांच्या काळजाला हात घातला!

"सत्याग्रहाची कायदेभंगाची व पर्यायाने सर्व राजकारणाची धुरा या पुढे एकट्या माझ्या खांद्यावर ठेवून या पुढे कॉंग्रेसच मोडून टाका" असाच जवळ जवळ गांधींनी आपल्या अनुयायांना सल्ला दिला. याचे वर्णन मी केसरीत केले ते असेः—

"कसेहि असो. कॉंग्रेस तर आतां नष्ट झालीच आहे. आणि उद्या गांधीजी तुरुंगांत जाऊन बसले म्हणजे हिंदी राष्ट्रीय राजकारणांतला एक नैमित्तिक प्रलय झाला असेच म्हणावे लागेल! प्रलयकालची वर्णने निरनिराळ्या पुराणांत निरनिराळी केलेली आढळलीं तरी त्यांचे तात्पर्य एकच असते. 'प्रलय झाला तेव्हां सर्व जलमय झाले. एकट्या ईश्वराचा आत्मा तेवढा या जलमय विश्वावर एखाद्या प्रकाशकिरणाच्या कवडाशासारखा चंचलपणाने तरंगत राहिला' असे वर्णन ख्रिस्ती धर्मग्रंथांत आहे. हिंदु पुराणांतहि असे वर्णन आढळते की, "प्रलय होतो तेव्हां सर्व विश्व जलमय होते व एकटा श्रीविष्णु तेवढा पिंपळाच्या एका पानावर आंगठा चोखीत बसतो." राष्ट्रीय राजकारणाचा जलप्रलय करून म. गांधी हे ईश्वराप्रमाणेच अहंकारांत एकाग्र व मग्न होऊन बसणार हे ठरले. पण पुराणांतरीचा ईश्वर आत्यंतिकनाश तरी इच्छित नाही. ख्रिस्तपुराणातल्या ईश्वराने सृष्टि फिरून उत्पन्न करण्याची आपल्या आवडत्या नोहाची इच्छा तृप्त केली. त्या मानसपुत्राने एका मोठ्या नावेत सर्व जीवसृष्टीचे बीजरूप अवशेषांस भरून ठेविले आणि प्रलयजल ओसरल्यावर त्याने त्यांतूनच

नवी सृष्टि निर्माण केली. हिंदु पुराणातला श्रीविष्णुहि असाच प्रवृत्तिपर आहे. तो पिंपळाच्या एका पानावरच बसल्या बसल्या नाभिकमलातून ब्रह्मदेव उत्पन्न करतो; व तो ब्रह्मदेव मग सर्व चराचर सृष्टि पुन्हा उत्पन्न करतो. याप्रमाणे सृष्टीच्या नैमित्तिक प्रलयाबरोबर नैमित्तिक उत्पत्तिचीहि व्यवस्था झालेली असते. पण म. गांधींची लहर ईश्वराइतकीहि प्रवृत्तिप्रवण व लीलाप्रिय दिसत नाही !"

या कायदेभंग तहकुबीसंबंधाने एक गांधींचे व दुसरे सर्वाधिकारी अणे यांचे अशी दोन पत्रके निघाली. या पत्रकाची सटीक छाननी मी खालीलप्रमाणे केसरीत केली—

( १ ) कायदेभंगाची चळवळ बिनशर्त थांबविणे देशाच्या हिताचे नाही. ( २ ) या शर्ती सरकारने समेट करण्याची बुद्धि दाखविण्यावर अवलंबून राहतील. ( ३ ) ही बुद्धि दिसून यावयाची म्हणजे प्रथम व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी म. गांधींची भेट बिनशर्त घ्यावयाची. ( ४ ) या भेटीत म. गांधी यांना आयत्या वेळी ईश्वर बुद्धि देईल ती योजना—स्वराज्यविषयक योजना—ते व्हाइसरॉय याजपुढे मांडतील ! ( ५ ) ती योजना काय हे आज गांधींचे गांधींना नुसते माहीतीहि नाही. तथापि त्यांचा दृढविश्वास मात्र असा आहे की, ती पुढे मांड-ल्यास व्हाइसरॉय म्हणजे सरकार व हिंदी जनता या उभयतांना ती एकदम सारखीच मान्य होईल ! ! ( ६ ) पण व्हाइसरॉय गांधीजींना भेटीस बोलावीत नाही हे व्हाइसरॉय यांचेच दुर्भाग्य व त्यांचाच अपमान ! गांधींचा नव्हे ! व हिंदुस्थानचाहि नव्हे ! ( ७ ) आणि हा लॉर्ड विलिंग्डन यांचा अपमान धुऊन निघण्याकरिता किंवा स्वराज्य मिळविण्याकरिता हिंदी जनतेने कायदेभंगाची चळवळ चालू ठेविली पाहिजे. ( ८ ) पण ती यापुढे सामुदायिक रीतीने चालू ठेवूं नये. कारण त्या रीतीत कार्ययोजना गुप्तपणाने होते; आणि सत्याग्रहाच्या अनेक मोहिमा केल्यानंतर आज प्रथमच गांधीजींना कळले की, गुप्तपणा हा सत्याग्रहाच्या तत्वाविरुद्ध आहे. ( ९ ) ही गुप्तपणाची योजना समजूच नये म्हणून कॉंग्रेस कमिट्या सर्वच्या सर्व मोडून टाकाव्या. मात्र व्यक्तिशः वाटेल त्याने कायदेभंग करावा. पण तो स्वतःच्या जबाबदारीवर. म्हणजे त्याने दुसऱ्या कोणाकडून मदतीची अपेक्षा करूं नये. आणि दुसऱ्या कोणी त्याला ती मदत करूं नये. मदत उघड केली तर ते कृत्य बेकायदा ठरणार; आणि गुप्तपणे केली तर ते सत्याग्रहाच्या तत्वाविरुद्ध म्हणून गांधींच्या

कायद्याप्रमाणे बेकायदा ठरणार ! ! ( १० ) मात्र अशा रीतीने कोणी कायदेभंग केला तर तो कॉंग्रेसच्या नांवावरच करावा. ( ११ ) म्हणजे एतावता कायदेभंगाचे नांव तर राहिले, मग कार्य न झाले तरी चालेल ! किंबहुना कार्य जितके थोडे तितके ते अधिक सगुण होते ! फार काय, एकटे गाधी व त्याच्या हुजरातीचे पथक इतकेच लोक तुरुंगांत गेल्याने सरकारावर जितका परिणाम होईल तितका पूर्वीसारखे जिकडे तिकडे तुरुग भरल्यानेहि होणार नाही. ( १२ ) व्यक्तींनीं कायदेभंग केला म्हणजे तो केवळ स्वयस्फर्तीचाच असतो. व्यक्ति गुप्त कारस्थान करीत नाहीत ! कॉ कमिट्या सामुदायिक म्हणन त्या मात्र गुप्तपणा राखू शकतात ! ! ( १२ ) कॉंग्रेस कमिट्या मोडल्या म्हणजे त्याच्या जागी डिक्टेटर उभा करावा. ( १४ ) सगळ्या हिंदुस्थानाकरितां खुद्द कॉंग्रेसचा प्रतिनिधि म्हणून एक डिक्टेटर जनरल–सर्वाधिकारी–असावा. ( १५ ) ही सर्व भानगड गाधीना व्हाइसरॉय साहेबानी भेटीस बोलावल्याने मिटली असती. ( १६ ) पुणे परिषद ही गुप्त स्वरूपाची होती. म्हणून तिजमध्ये कायदेभंगाला अनुकूल झालेल्या भाषणाचा परामर्श, स्वतःकडे आलेल्या बातम्यावरून, व्हाइसरॉय साहेबानी घेता कामा नये. पण कायदेभगाला प्रतिकूल झालेल्या भाषणाचा परामर्श वाटल्यास घ्यावा ! तथापि त्यातल्या त्यात व्हाइसरॉय साहेबांकडे जाऊन भेट मागण्यास गाधीजीना जी परवानगी व जो अधिकार पुणे परिषदेने दिला त्याचा परामर्ष मात्र, ती परिषद गुप्त असली तरी, व्हाइसरॉय यांनी अवश्य घ्यावयास पाहिजेच होता ! ( १७ ) गुप्त कारवाई वाईट म्हणून ती थाबविण्याकरितांच पुणे परिषदेचे काम गुप्तपणे करण्यांत आले. ( १८ ) सगळ्या वर्तमानपत्रांतून हकीकत एकाच प्रकारची आली म्हणून काय झाले ? ती ‘ अनधिकृत म्हणून खोटीच समजावी.’ ( १९ ) “ तुम्ही आपली परिषदेची हकीकत म्हणून खरी काय असेल ती प्रसिद्ध करामा ” असे आम्हाला कोणी म्हणू नये. व्हाइसरॉय बोलावतील तेव्हा ती सर्व त्यांजपुढे खरी खरी माडूं. मात्र आमच्या जवळ त्या हकीकतीची ‘ टिपणेहि नसेनात का ? ( २० ) ज्याना व्यक्तिशः जबाबदारीवर कायदेभंग करता येईल ते तो करतीलच अशी अपेक्षा आहे. पण ज्यांना तो करता येणार नाही त्यांनीं आपल्या लागी असेल ते विधायक कार्य करीत राहावे. ( २१ ) इतर काय वाटेल ते करावे किंवा काय नको तें न करावें. पण-पण एक गोष्ट मात्र करूं नये ! करूंच नये ! करूं नयेंच नये ! ती

म्हणजे कौन्सिल-प्रवेश ! ! ( २२ ) इतर विधायक कार्यक्रमांनी एकवेळ स्वराज्य मिळेल. पण कायदेकौन्सिलात शिरण्याने ते मिळावयाचे असेल तर मृगजळासारखे ते दूर दूर जात राहील. ( २३ ) म. गांधीनी राजगोपाळाचारियर याना मदिरप्रवेश बिलाकरिता कौन्सिलाकडे जाऊन खटपट करावयास सागितले म्हणून काय झाले ? गांधी व त्याचे शिष्य यानी सहकारिता केली तरी ती असहकारिताच समजावी. फक्त इतरानी असहकारिता केली तरी ती सहकारिताच होते ! ( २४ ) पुणे परिषद भरविली ती फक्त लोकांचे म्हणणे ऐकून घेण्याकरितां. परिषदेने ठराव म्हणून केले तरी ते फुकटच समजावे. ( २५ ) गाधीच्या मताशी लोकाचे मत जुळते असेल तेव्हा, किंवा गाधीच्या मताप्रमाणे मत द्यावयास लोक तयार असतील तेव्हा त्या लोकाचे मत गाधी वेदाक्षराप्रमाणे पवित्र मानतील ! गाधीच्या मताशी न जुळणारे मत हे केव्हाहि लोकमत असूच शकत नाही !

वरील छाननीमध्ये मी पत्रकातील मुद्दे देता देताच त्याची थट्टाहि केली आहे व ती अगदी योग्य होती.

१९३२ सालापासून बापूजी अणे याचा ओढा कॉंग्रेसकडे अधिक झाला त्यामुळे त्याच्या माझ्यात पूर्वी नव्हता तो मतभेद होण्यास प्रारभ झाला. ते राष्ट्रीय सभेचे सर्वाधिकारी झाल्यापासून गाधीविषयीची त्याची विरोधी वृत्ति सौम्य झाली. आणि अणे हे आता गाधीच्या कच्छपी लागले असे आमच्या पक्षातील लोकाना वाटू लागले. पुणे–परिषदेच्या वेळी त्यानी आपली प्रामाणिक मते दडपून ठेवली असा आक्षेप त्याच्यावर घेण्यात आला. कारण परिषदेनंतरच्या त्याच्या पत्रकात किंवा इतर रीतीनेहि त्याना अखडप्रिय असलेल्या कौन्सिलप्रवेशाची सूचना त्यानी केली नाही. त्यांच्याविषयी मी केसरीत लिहिताना म्हटलेः—

“ ओघानेच आले म्हणून म. गाधी व श्री. अणे ( म्हणजे प्रस्तुत राजकारणाच्या इतिहासात एकाच ‘बापूजी’ या लाडक्या नावाने काही काळ लोकाच्या तोंडी झालेल्या ) या दोन व्यक्तीच्या परस्परसबधाविषयी दोन शब्द लिहिणे अपरिहार्य आहे. अणे टिळकांचे शिष्य व अनुयायी. मरणसमयी आपल्या राजकारणविषयक तत्वाचे व उद्योगाचे व्यवस्थापत्र करून त्याची वहिवाट करण्याकरिता टिळकांनी एखादें पंचायतन नेमले असते तर त्यांत अणे याचे स्थान निश्चित

होते. टिळकाच्या पश्चात् अणे यानी "वऱ्हाड प्रांतातील टिळक" असे बहुमानास्पद नामाभिधान आपल्या कर्तृत्वाने स्वतःस जनतेकडून मिळवून घेतले. इ. स. १९१९ पासून इ. स. १९२९ पर्यंत अणे हे इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्याबरोबरच गांधीजीच्या प्रतिपक्षीयांत गणले जात. ज्या महाराष्ट्रीय पुढाऱ्याना म. गांधी हे प्रांजलपणे विरोधी व विनोदाने 'शत्रू' असे म्हणतात त्यापैकीच अणे हे होते.

"सन १९२१ साली सारा देश कौन्सिलबहिष्कार गर्जत असता अणे यानी स्वतःच्या व्यक्तिपुरती कॉंग्रेसची आज्ञा तोंड वाईट करून गिळली. तरी श्री. दादासाहेब खापर्डे व श्री. जतकर वकील याना ती आज्ञा धाब्यावर बसवून निवडणुकीस त्यानी उभे केलेच! नंतर कॉंग्रेसविरुद्ध उघड बंड करून दास व नेहरू याना मिळून ते स्वराज्य पक्षाचे प्रांतिक पुढारी बनले आणि त्यानंतर वेळ आली तेव्हा खुद्द पंडित नेहरूशी भांडून प्रतिसहकार पक्षाच्या स्थापनेस त्यानी फार मोठी मदत केली. कारण ज्या विधिघटनेमुळे श्री. तांबे हे नागपूर सरकारचे कार्यकारी कौन्सिलर व शेवटी गव्हर्नरहि झाले ती वऱ्हाडातच घडून आली; व बापूजी अणे हे तिला मदत करणारेच होते. लाहोर कॉंग्रेसमध्ये अणे यानी म. गांधी याना अनेक गोष्टीत विरोध केला. आणि १९३० साली कॉंग्रेसचे अध्यक्ष जवाहरशहा यानी हुकम काढून "एक कॉंग्रेस तरी सोडा नाही तर कौन्सिल तरी सोडा" असा कोलदांडा घातला तेव्हां अणे यांनी कौन्सिलची जागा सोडली नाही, पण ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीच्या सभासदत्वाचा व वऱ्हाड प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला! १९२१ ते १९२९ या सालातली अणे याची व्याख्याने पाहिली तर ती गांधीभक्तासारखी नसून गांधीविरोधकासारखीच आढळतील.

"पण सन १९३० पासून थोडेसे व १९३२ पासून बरेचसे हे गाडे बदलले. त्याची मीमांसा करण्याचे कारण नाही. तथापि सन १९३० सालच्या का. भ. चळवळीत त्यानी भाग घेतल्यामुळे व त्यांना शिक्षा झाल्यामुळे कॉ. वर्किंग कमिटीत त्याची निवड झाली. आणि १९३२च्या कायदेभंगात ते केवळ इमानदारीमुळे सांपडले. संगतीचा गुण हा नाही म्हटला तरी काही असतोच. त्याप्रमाणे अणे यांचे होऊन असहकारितेचे एक कट्टे विरोधी ही भूमिका त्यांनी हळूहळू सोडली. आणि कौन्सिलप्रवेशाचे सगळ्यांत अधिक कट्टे पुरस्कर्ते अशी आजहि

मनाने त्यांची खरी भूमिका असता, कॉंग्रेसचे हगामी अध्यक्ष या नात्यामुळे त्यांनीं कौन्सिलप्रवेशाबाबत मौनव्रत स्वीकारलें. इतकेंच नव्हे, तर कायदेभगाची चळवळ पुढे चालविण्याला आपल्या खऱ्या मताविरुद्ध समति दिली; व गांधीच्या एखाद्या हस्तकाची भूमिका स्वीकारून एका डिक्टेटरीशिवाय इतर सर्व गोष्टीत गांधीच्या आज्ञेप्रमाणे फर्मान काढले !

“ वास्तविक गाधी हे जसे एका प्रकारचे डिक्टेटर तसेच कॉंग्रेसचे हगामी अध्यक्ष हेहि डिक्टेटरच होत. पण पर्णकुटीच्या रगभूमीत या दोन डिक्टेटरांची जी लढत झाली त्यात अणे हरले व म. गांधी हे विजयी झाले असेच मोठ्या कष्टाने म्हणावे लागते ! स्वतः त्यांच्याच प्रातांत, अणे यांचे स्नेहीसोबती व शिष्य म्हणविणारे लोकच कॉंग्रेस विरुद्ध बड करून आज उठले आहेत; अणे यांच्या मानसिक आशीर्वादाने ते नवा पक्ष स्थापित आहेत; आणि “ तुम्ही जुने असला तरी आमचे पुढारीच आहा. तथापि यापुढे पूजा तुमची आणि प्रसाद आमचा ” अशी वाटणी प्रेमाने भाडून ते त्याच्याशी करून घेत आहेत. हे दृश्य पाहिले म्हणजे म. गाधीचे पाश अणे याच्यावर पडले ते कांही अगदीच फुकट गेले नाहीत असे गाधीच्या अनुयायांना यथार्थ अभिमानाने म्हणतां येईल !

“ असहकारितेमध्ये ( म्हणजे गांधीप्रणीत असहकारिता ) असलेले आनुषगिक गुण केसरीप्रमाणे अणे याना मान्यच आहेत. पण केसरीप्रमाणेच अणे यांनाहि त्या विशिष्ट असहकारितेचे दोष किती जाणवत होते हें सप्रमाण सिद्ध करता येते. ‘ गेली पांच वर्षे ’ या नांवाचे केळकरकृत लेखसग्रहाचे एक पुस्तक प्रसिद्ध झालें. त्याला श्री. अणे यानी प्रस्तावना लिहिली आहे तीत ते म्हणतातः—“ बॅ. बॅप्टिस्टा यांनी, एका महर्षीने करावें त्याप्रमाणे, असहकारितेच्या जन्मकालीच तिचे जातक वर्तवून ठेविले ते एखाद्या भविष्याप्रमाणे पांच वर्षांच्या कटु अनुभवाने खरेच ठरले. असहकारितेतून काही गोष्टी बऱ्या निघाल्या एवढ्या कबुलीवरच सर्वथैव अव्यवहार्य ठरू पाहणारा कार्यक्रम कोणी अट्टाहासाने उचलून धरण्याचा प्रयत्न करील, तर त्यातून कार्यसिद्धि न होता कार्यहानि मात्र होणार आहे, असे महाराष्ट्रीयाना प्रामाणिकपणाने का वाटते याची विस्तृत मीमांसा केळकरांच्या या लेखसग्रहांत वाचकांना पाहावयास मिळेल ! ”

“ पण हे शब्द प्रस्तावनेत राहिले, आणि अव्यवहार्य गांधीप्रणीत विशिष्ट प्रकारच्या असहकारितेचे आज्ञापत्रक त्याच गांधीच्या आज्ञेने लिहून छापून जग-

जाहीर करण्याचे अणे याच्या नशिबी आले हे दैवदुर्विलसिताचेंच एक उदाहरण होय. आणि हे आम्हीच म्हणतो असे नाही; तर त्याचाच एक अनुयायी केसरीच्या गेल्या अकातील बातमीपत्रात लिहितो की—" बापूजीचे पत्रक कसे असेल याची रूपरेषा गाधीजीच्या मुलाखतीत प्रकट झालेली असल्यामुळे या पत्रकाचे लोकांना आश्चर्य असे काहीच वाटले नाही. परतु गया कॉग्रेसच्या वेळी स्वराज्य-पक्षाला जन्म देणाऱ्या मंडळीत प्रमुख असलेले व पुढे स्वराज्यपक्षाच्या वाझोट्या धोरणाविरुद्ध बडाचे निशाण घेऊन उभे राहिलेले बापूजी अणे कोणीकडे, व आज बहुधा स्वतःच्या खऱ्याखुऱ्या मताला बाजूस सारून प्रवाहपतिताप्रमाणे गाधीजीच्या पावलावर पाऊल टाकून वैयक्तिक कायदेभगाचे धोरण जाहीर करणारे बापूजी कोणीकडे, असा प्रश्न त्याच्या अनेक चाहत्याच्या मनात उद्भवला असेल यात सशय नाही !'

" श्री. अणे हे आपल्या अनेक गुणांमुळे महाराष्ट्रीय जनतेला आदरणीय झाले आहेत. तथापि त्या जनतेला खरोखरच असे वाटत आहे की, अणे हे गांधीच्या आहारी जाऊन विनाकारण त्याच्या पचनी पडले. गेल्या मे महिन्यापासून या दोघा मात्रिकाची गाठ पडली; पण एक अभिमत्रित अशा स्वस्थानी असल्यामुळे दुसऱ्यास भारी ठरावा असे अखेर झाले. " नक्रः स्वस्थानमासाद्य गजेद्रमपि कर्षति " हेच खरे. या तीन महिन्यात अणे यानी म. गाधीचा पलंग-पहारा ठराविक वेळी कधींच चुकविला नाही. त्याच्या परिवारात समरस होता येत नव्हते तरी स्वतःचे दाक्षिण्य सभाळिले. मनांत दूर पण जगांत जवळ अशा एखाद्या अतेवासी 'शागीर्दाप्रमाणे' अणे यानी गाधीजींच्या लहरी स्वभावाची खस्त खाल्ली. आणि अखेर टिळक मदिरातील परिषदेत, स्वतःच्या मताचा एकहि शब्द न बोलता, गांधीचे उपाध्येपण सांगसफल करून देऊन, कॉग्रेसची अत्येष्टि त्यांनी आपल्या हाताने केली ! या स्वत्वसन्यासाबद्दल अणे याची स्तुति गांधीजीचे अनुयायी तरी खचित करतील यांत शंका नाही. "

यवतमाळ येथील अणे यांच्या मित्रांना हे माझे लिहिणें आवडलें नाहीं. त्यांनी याविषयी मला लिहिलेले पत्र व मी त्याला दिलेले उत्तर ही दोनहि एका दृष्टीने उल्लेखनीय ठरतात म्हणूनच ती खाली देतो. यवतमाळ हा वऱ्हाडांतील टिळक साप्रदायाचा 'बाले किल्ला'. पण गांधीच्या कारणाने त्यांच्यांत व माझ्यांत

स्वमताभिमानाने या प्रसंगी थोडासा बेबनाव झाला. मात्र सुदैवाने हा कायम टिकणारा नव्हता असे आमच्या परस्पराविषयीच्या वागणुकीने पुढे दिसून आलेच. असो. ही पत्र अशी होतीः—

( ता. १९।८।३३ ) "दुर्दैवाने आपणांस खालील चार ओळी लिहिण्याचा प्रसंग आला याबद्दल अतिशय वाईट वाटते. आम्ही स्वतःस लोकमान्य आणि त्याचा केसरी याच्या पंथाचे समजत आहोत. परंतु सध्याचे केसरीचे धोरण पाहता ते लोकमान्याच्या पंथास कितपत साजेसे आहे याबद्दल जबरदस्त शंका येऊ लागली आहे. देशात चालू असलेल्या तीव्र चळवळीसंबंधी अवहेलना उपहास किंबहुना विरोध दर्शवून, केसरीने गेल्या दीड वर्षात जी शल्यनीति अवलंबिली ती पाहून मन उद्विग्न होते. आणि सर्वांचा कळसच म्हणून की काय लोकमान्याच्या पुण्यस्मरणाच्या निमित्ताने ता. १ ऑगस्ट रोजीच्या अंकात जो अग्रलेख प्रसिद्ध झाला त्यानंतर लोकमान्यपंथीयाच्या मनात 'आता मात्र प्रळयकाळ खराच ओढवला' असून त्यांत लोकमान्यांची भक्ति शिल्लक होती नव्हती ती रसातळास जाणार, अशा विचाराचे काहूर उद्भवलेले आहे.

"ता. १ ऑगस्टच्या अग्रलेखात इतकी आक्षिप्त विधाने आहेत की त्यांचे खंडन करावयाचे झाल्यास त्या लेखाच्या दहा कॉलमास निदान तेवढेच विस्तृत उत्तर द्यावे लागेल. आमचा उद्देश वर्तमानपत्री वादाची धूळ उडविण्याचा नसून केवळ टिळक व केसरी सांप्रदायी लोकांच्या अंतःकरणात केसरीच्या अलीकडील, व विशेषतः १ ऑगस्टच्या अंकात प्रकट झालेल्या विचारसरणीने जी कालवाकालव होत आहे, तीच केसरीच्या स्पष्टपणे निदर्शनास आणावयाची एवढाच आहे. आक्षिप्त विधानाचा एक नमुना म्हणून अग्रलेखाच्या पहिल्या कॉलमाच्या अखेरीस सुरू झालेले पुढील वाक्य पहा.

"ऑर्डिनन्सेसचे राज्य दडपशाही वगैरे आपत्ति ओढवून घेतल्या."

या वाक्याच्या मागे असणारी विचारसरणी आणि त्या वाक्यातून निघणारे ध्वनि पुनः एकदा शांतपणे विचार करून आपणांस कितपत समर्थनीय वाटतात? लोकमान्यांच्या नांवावर चालविलेल्या केसरीत हीं विधाने यावीत याची आम्हांस लाज वाटते. बड्यांतला बडा ब्युरोक्रॅट यापेक्षां जास्त उपहासगर्भ विधाने मुद्दाम करूं शकेल असे वाटत नाही. गेल्या २ वर्षांत नोकरशाहीने मांडलेल्या धुडगुसाचे आणखी निराळे समर्थन या केसरीच्या क़बुलीजबाबानंतर कशास हवे !

"दुसरे—श्रीयुत बापूजी अणे यांच्यासबंधी इतके विस्तृत लिहिले नसते तर खुद्द अणे अथवा त्यांचे चहाते यांच्यावर अनत उपकार झाले असते. "मनात दूर पण जनात जवळ" असे अण्यांचे वर्तन होते असे आपण लिहितां! केसरीच्या निकट सहवासात अणे हे नुकतेच एक महिन्याच्यावर राहिल्यानतरहि केसरीशी आलेला अणे याचा सबधहि जवळ जवळ वर वर्णिलेल्या नमुन्याचाच झाला असे कष्टाने म्हणावे लागते. श्रीयुत अणे याच्यासबधी जवळपास अडीच पावणेतीन कॉलम मजकूर लिहून केसरीने काय साधले? गाधी—अणे वादात अणे हरले व परप्रत्ययनेय बनून गांधीजीच्या चळवळीचे तुणतुणे त्यानी पुन्हा सुरू केले हेच ना! आणि हे अणे यानी सारमार विचार आणि स्वतत्र बुद्धि यांच्याकडे पाठमोहरे होऊन केवळ इमानदारीवर अधिष्ठित असलेल्या शागीर्दी कर्तव्य-कल्पनेस बळी पडून केले असेच ना? आपण लिहिता की, "१९२१ते१९२९ या सालातील अणे याची व्याख्याने पाहिली तर ती गाधीभक्तासारखी नसून गाधी-विरोधकासारखी आढळतील." पण "सन १९३०पासून थोडेसे व १९३२ पासून बरेचसे हे गाडे बदलले." कां? आपण म्हणतां "त्याची मीमासा करण्याचे कारण नाही" आमच्या मते सन १९३० साली अणे यानी जे गाडे बदलले त्याची मीमांसा केल्याशिवाय आजच्या त्याच्या वर्तनाचा अर्थ शोधणे व्यर्थ होय. आपण अणे याची मनोभूमिका समजून न घेता त्याच्या मतासबंधी जी अनेक विधाने केली आहेत त्यामुळे विशेषतः ती विधाने "जनात जवळ मनात दूर" अशा त्याच्या केसरीशी नुकत्याच आलेल्या सबधानतर केल्यामुळे आपण अणे याचेसबधी मोठाच अन्याय केला आहे. सन १९२० च्या कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेसनतर पोळा (वऱ्हाडी सण) फुटल्यावर जसे बैल बेफाम सैरावैरा धावत जातात त्याप्रमाणे सर्व दूर अशी स्थिति झाली असता केवळ एकच एक जो महाराष्ट्रीय गृहस्थ (पुढारी म्हणत नाही) स्थितप्रज्ञ राहून मार्गदर्शक झाला, तो पन्नाशी उलटल्यावर दोनतीन वर्षातच बावचळला, बुद्धिभ्रष्ट, परप्रत्ययनेय बनला, "महात्मा गाधींचे दास्यच अनुसरण्यास" तयार झाला, 'स्वतत्र बुद्धि' व 'सारासारा विवेक' याना पारखा होऊन 'निराळा मार्ग' काढण्यास कचरला असमर्थ ठरला असे केसरीस म्हणावयाचे असल्यास त्याने खुशाल म्हणावे!

"आम्हास जास्त लिहिण्याची जरूरी वाटत नाही. लोकमान्यांच्या प्रेमामुळे आणि केसरीच्या पूर्व परंपरेमुळे जो ऋणानुबंध अनेक वर्षापासून चालू आहे तो पूर्ववत्

चाल रहावा अशी आमची तीव्र इच्छा आहे. केसरीच्या अलीकडे दृष्टोत्पत्तीस येत असलेल्या धोरणामुळे त्या इच्छेस धक्का लागतो की काय अशी आमच्या मनात जबरदस्त शंका उद्भवल्यामुळे, ती गोष्ट वेळीच आपल्या नजरेस आणणे आम्ही आपले पवित्र कर्तव्य समजतो. केसरीने सरकारच्या धोरणाचे पर्यायाने का होईना समर्थन केलेले लोकांस खपणार नाही केसरीने मार्गदर्शन केल्यास हरकत नाही परंतु तेजोवध करू नये अशी लोकांची अपेक्षा असते

" असो थोडक्यात वर लिहिल्याप्रमाणे आम्ही आपले विचार आपणास स्पष्टपणे कळविले आहेत त्याचा नीट विचार होऊन यापुढे केसरीचे धोरण योग्य तेच राहील अशी आशा आहे कळावे, लोभ असावा ही विनति." (भा. ह. जतकर, भा. म. टेंबे, अ. र. साकळे, प्र कृ. द्रवीड, रा. ब जोशी, त्र्य स. बापट, इ.

याला मी उत्तर लिहिले. परतु वाद वाढू नये म्हणून आत्मसंयमन करून मी ते पाठविण्याचे रहित केले. आणि नुसती चार ओळींची पोच दिली. न पाठविलेले पत्र असे आहे:—

( ता. २१।८।३३ ) रा. रा समस्त यवतमाळकर मित्रमडळी यास कृ. सा. न. वि. वि —आपले ता. १४ चे पत्र पावले त्याला उद्देशून खालील चार ओळी लिहितो. ता. १ ऑगस्टच्या केसरीतील लेखाला आपण तितकेच लांब उत्तर देऊं शकाल, आणि तसे आपण दिले तर त्याला प्रत्युत्तर म्हणून मीहि तितकेच पुनः लिहू शकेन. पण शक्य तितके थोडक्यात लिहितो. माझे असें प्रामाणिक मत बनले आहे की, वर्किंग कमिटीच्या इमानदारीला बापूजी अणे यांनीं संभाळले; पण आपल्या खासगी मताचा आपल्याच हाताने कोडमारा करून आपल्या जुन्या पक्षाला भ्रमाच्या गर्तेत लोटले व मार्गदर्शनाहि भलते केले. पुणे परिषदेत त्यांचा पक्ष प्रतिबिंबित व्हावा तितका झाला नव्हता; व जो झाला होता त्याचें खरे मत काय होते हे आपणांस माहीत आहेच. अर्थात् परिषद बोलवणे व वर्किंग कमिटीच्या सभेत स्वतःला बंधनकारक असे ठराव होऊं देणे या गोष्टी घडण्यापूर्वी, त्यांनी आपल्या जुन्या पक्षाची मडळी मध्यवर्ती ठिकाणी एकत्र करून, त्यांच्याशीं सर्व बाजूंनी विचारविनिमय करून मग, इमानदारीकरिता इतके समजा व खरे मत असे आहे असे समजा, असे स्पष्ट केले असते म्हणजे ठीक झाले असते. पण वर्किंग कमिटीत गेल्यामुळे त्यांना जवळ जवळ जुना स्वपक्षच राहिला नाही असे मला

एकंदरीने दिसू लागले. आणि त्यांना जर असा स्वपक्षच उरला नाही तर त्याच्या संबधाने सर्वस्वी कॉंग्रेसनिष्ठ नसणाऱ्या पक्षाने त्याला योग्य वाटले ते लिहिले त्यांत फारशी चूक नाही.

"केसरीप्रमाणेच 'महाराष्ट्र'नेहि लिहिले आहे. शब्द कदाचित् वेगळे असतील. बापूजी अणे यांचे मत, त्याच्या हल्लीच्या वर्तनावरून कोणा अनुमित करील तर, ते असे की, कायदेभंगाची चळवळ सुरू झाली ती "स्वातंत्र्य मिळविण्यासाठी व स्वातंत्र्य मिळेपर्यंत" आणि तीहि मुख्य साधनमार्ग म्हणून! विधायक कार्यक्रमात कायदेकौन्सिलाचे नावहि नाही. हे मत बापूजीचे १९२९ पर्यंत नव्हते असे मी स्पष्ट म्हणू शकतो. त्याचे नवे मत गांधींनी केवळ आपल्या अंकित ठेवलेल्या वर्किंग कमिटीचे मत आहे; व तेहि त्यातील होयबाचे आहे. विवेचकाचे नाही. असे असतां ते मत विस्तृत राष्ट्रीय पक्षावर केवळ वर्किंग कमिटीच्या इमानदारीकरिता लादणे म्हणजे, जे जे कॉंग्रेसच्या हातून गांधीजीच्या हातून घडेल त्याचे त्या पक्षाने समर्थन करावे अशी अपेक्षा करणे हा अन्याय आहे असे मी समजतो. व्हाइसरॉयाने गांधींची भेट न घेतल्याबद्दल केसरीने व मी व्यक्तिशः स्पष्ट शब्दांनी व्हाईसरॉयाचा निषेध प्रगट केला आहे. पण मुळात व्हाइसरॉयाला भेटण्याची विनंति करण्याचा मार्ग हा चुकीचा व हटकून अपयश ओढवणारा असा दिसत असता त्याचा मात्र निषेध करणे हे म्हणे वाईट! का तर त्यामुळे सरकारचे अप्रत्यक्ष समर्थन होते! याचा अर्थ, गांधी लहरीने किंवा मनस्वितेने जे जे करतील त्या सर्वांचे उघडपणे समर्थन करण्याशिवाय गत्यंतर नाही! हा शुद्ध जुलूम व मुस्कटदाबी होय. ती मी, किंवा केसरी माझ्या हाती आहे तोपर्यंत केसरी, कधीहि करून घेणार नाही. मग त्यात आम्ही दोघेहि लोकप्रियतेच्या रसातळाला गेलो किंवा नष्ट झालो तरी मला त्याची पर्वा नाही. आज इतकी वर्षे सरकारी दडपशाहीविरुद्ध केसरीतून सारखा भडिमार होत आहे. असे असतां कुठल्या तरी एका वाक्याचा आधार घेऊन केसरीवर 'सरकारचे समर्थन' करण्याचा आरोप करताना आपण सारासार विचार केला नाहीत असेच म्हणावे लागते.

"असो. मी या वादात मी अधिक पडू इच्छित नाही. आपला राग अद्यापि ओसरला नाही व माझाहि राग अद्यापि ओसरला नाही. अशा स्थितीत अधिक न लिहावे हेच चांगले. आपले जुने १५–१७ वर्षांचे संबंध लक्षात

घेऊन आपण मजविषयी जे सौजन्य आजच्या स्थितीतहि दाखवितां त्याबद्दल मी आपला अत्यत ऋणी आहे. बापूजीना आपल्या मताचा अभिमान असेल व त्याचा अभिमान आपल्याला असेल, तसाच मलाहि माझ्या मताचा अभिमान आहे आणि लोकप्रियता नष्ट होण्याचा धाक सरळ समोर दिसत असता मी ती प्रतिपादित आहे यावरून मजमध्येहि कांही प्रामाणिकपणा असेल असे आपण मानल्यास कृपा होईल. बापूजी यांनी गाधीजीच्या सबधात अलीकडे जे एकदरीने वर्तन केले त्याचा, पूर्वीच्या त्याच्या मताशी विरोध पाहता मला खरोखरच खेद वाटला. गाधी काय पूर्वी नव्हते व आतांच मोठे झाले वाटते! असो. बापूजी करतात ते मजपेक्षा अधिक देशाभिमानाचेहि असेल माझी साठी उलटली म्हणून माझी बुद्धि नाठी झाली असेहि वाटेल तर आपण म्हणावे पण "गाधीजीचे दोष व त्यांच्या चुका दाखविल्या म्हणजे त्यापासून सरकारच अप्रत्यक्ष समर्थन होते" हा सिद्धान्त व कोलदांडा मला मान्य नाही. गाधी अनत्याचारित्वाचे स्तोम माजवितात तेव्हा ते सरकारचे समर्थन व बगाली तरुणाची निदा करितात असे समजावयाचे काय? सरकारचे समर्थन करणे ते स्पष्ट त्याच हेतूने केले तर होत. इतर रीतीने होणारा कोड-मारा मला मान्य नाही! मग मी किवा केसरी सरकारजमा झाला असे आपण म्हटले तरी चालेल! गाधी व त्याचे सहकारी याची सत्यनिष्ठा शभर टक्के असेल, मज गरिबाची दहा टक्के तरी असेल. पण ती काही थोडीतरी आहे असे मात्र मी म्हणतो. पस्तीस वर्षे वर्तमानपत्रातून देशसेवा केल्यानतर सरकारचे समर्थन न होईल असे कसे लिहाव हे लोकानी मला लिहिले तर मलाहि ते खपणार नाही. आणि जर मला अजूनहि ते यवतमाळकरानीहि शिकावयाचेच असेल तर ते मी आता यापुढे केव्हा शिकणार? अशा 'समर्थना'सबधी लोक मला लिहितात तो मी त्याचा शुद्ध कांगावा समजतो.

पुणे परिषदेत जवळ जवळ जाहीरपणे ( तो गुप्तपणा फक्त नावाचा होता ) कायदेभगाच्या चळवळीविरुद्ध अनेक बाजूनी स्पष्ट कडक भाषणे झाली त्यांनाहि मग सरकारचे समर्थन करणारी का म्हणू नयेत? असो. पण आता थांबतोच. लिहिण्याने लिहिणे वाढते. ईश्वराची कृपा असेल व फिरून महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षांत एकोपा व्हावा असा संकेत असेल तर तो होईलहि. ती संधि अजून सर्वस्वी नष्ट झालेली नाही असे मी समजतो. कारण अणे यांचे एक मित्र उमरावतीहून लिहितात की, "आता तुरुगातून परत आल्यावर बापूजी गांधीजीना प्रतिपक्षी

म्हणून विरोध करण्याला उभे राहणार आहेत." ते घडेल तो मी सुदिन मानीन ! पण तोपर्यंत काय किंवा यापुढे आता केव्हाहि काय, मी असेच समजतो की लोकप्रियता संपादण्याच्या वेळी कोणाच्याहि मताची किंवा सत्यनिष्ठेची कसोटी लागते तिजपेक्षा ती नष्ट होण्याच्या वेळीच अधिक लागते. वऱ्हाडकर मित्र-मंडळींनी मला काही वेळ, त्यांनी आदराने व मित्रभावाने गुंफलेल्या माळेतील, एका फुलाचे स्थान दिले होते. पण असे कोणचे फूल आहे की ज्याचा केव्हाहि निर्माल्य होत नाही ? पण निर्माल्याला पुढे देवघरांत किंवा माजघरांत स्थान न मिळाले तरी त्याचे म्हणून काहीतरी वेगळे स्थान असतेच. त्याला अगदीच कोणी उकिरड्यावर टाकून देत नाही. आपल्या मनो-भावनेत किंवा निदान स्मरणात यापुढे मी, वास नष्ट झालेल्या, निर्माल्याइतका राहिलो तरी पुष्कळ समजेन. आपले पत्र मी कोणासहि प्रकट केले नाही. आपणहि माझे पत्र यवतमाळकर मित्रमंडळी पलीकडे जाऊं देऊं नये अशी विनंति आहे.

"माझ्या लेखांना आपण शल्यनीति हे नाव दिले. पण ज्या वीरांचा तेजोभंग मी केला ते असन्मार्गप्रवृत्त, कौरवांचा पक्षपात करणाऱ्या सहोदर वैरी कर्णा-प्रमाणे, ठरतात हेहि आपणाला कबूल करावे लागेल. ते आपणाला कबूल आहे काय ! तसेच हेहि लक्षात ठेवा की, कर्णाचा वध झाला तो शल्याने केलेल्या तेजोभंगामुळे नाही तर पृथ्वीनेच त्याचे रथचक्र गिळल्यामुळे ! म. गांधीचे रथ-चक्र गिळण्याची कारवाई केसरी करीत नसून स्वतः त्यांचा अविवेक व बुद्धिभ्रंशच ती करीत आहे, असे उद्यां जगाच्या प्रत्ययाला येईल !"

पूर्वी एक सामुदायिक कायदेभंगाची तरी चळवळ, नाही तर कौन्सिल-प्रवेश, असा विकल्प सर्व समजस कॉंग्रेसवाले मानीत असत. पुणे परिषदेनंतर सामुदायिक कायदेभंग थांबला. तथापि कौन्सिलप्रवेशाला मात्र मान्यता मिळेना ! या संबंधानें मी केसरीत खालीलप्रमाणे निश्चित व ठासून लिहिले :—

" महात्माजींशी देशाचा बेबनाव असणारी दुसरी गोष्ट म्हणजे कौन्सिल-प्रवेश. " कौन्सिलचे नाव काढले की, माझे डोके चक्राकार भ्रमूं लागून घेरी येते " असे विधान त्यांनी आपल्या एका ताज्या मुलाखतीत केले आहे. पण एकाला जांभई आली म्हणजे ती पाहून दुसऱ्यालाहि येते, त्याप्रमाणे एकाचें

डोकें फिरलेलें पाहून सहानुभवित्वानें दुसऱ्याचेंहि डोकें केव्हा केव्हा फिरतें. कौन्सिलसंबंधांत गांधींचें हें मस्तकभ्रमण पाहून आमचेंहि डोकें फिरतें, म्हणून आम्ही जास्त न बोलण्याची मुद्दाम सावधगिरी घेतों. आम्हाला आश्चर्य इतकेंच वाटतें की, गांधीजींचें डोकें भ्रमून त्याबरोबर कायदे कौन्सिलहि गिरक्या खात असतां, मंदिरप्रवेशाच्या प्रसंगीं मात्र गांधीजींना अचूक आपलें बोट, शकुनवंतीच्या कोष्टकांतील मंगलदर्शक घराप्रमाणें, कौन्सिलवर ठेवतां येतें ! आणि आपल्या चपल शिष्याकडून नेमकी त्या कौन्सिलांत उडी घेवविता येते ! पण कौन्सिलच्या विषयासंबंधीं गांधीजींचा व आम्हां इतरांचा इतका वाद आज दहा वर्षें झाला आहे की, त्यांना उद्देशून त्या विषयावर एक शब्द लिहिणें हा देखील आम्हाला शीण वाटतो. एखाद्याला एखाद्या गोष्टीची शिसारी कांहीं तरी कारणानें येते. कोणाला कोथिंबीर आवडत नाहीं तर कोणाला कलमी आंबा आवडत नाहीं ! किंवा एखाद्याची नेत्ररचनाच अशी असते कीं, त्याला एखादा रंगच अजिबात दिसत नाहीं. तशांतलें हेंहि एक व्यंग गांधीजींना जडलेलें आहे इतकें म्हणून सोडून द्यावें हेंच बरें. "लोक कौन्सिलांत जाणार झालेच तर मी एका व्यक्तीनें त्यांना विरोध करून काय होणार ?" असें गांधींनीं त्याच मुलाखतींत म्हटलें आहे. कदाचित् याचा गांधींच्या मनांतला अर्थ मात्र अगदीं उलटहि असेल. तसे उलट अर्थानें ते कित्येकदां बोलतातहि. म्हणून कदाचित् त्यांना असें म्हणावयाचें असेल की, "मी एक विरुद्ध आहे असें कळल्यावर मग काय बिशाद आहे कौन्सिलप्रवेशाची चळवळ होण्याची !" पण आम्हीहि महात्माजींना स्पष्टच सांगतों की, आतां त्यांनीं सगळीच्या सगळी पुण्याई कौन्सिलप्रवेशाविरुद्ध खर्चिली तरी ती चळवळ यशस्वी झाल्याशिवाय राहात नाहीं !"

पण हें भविष्य खरें ठरण्याला स्वतःहि कांहीं हातभार लावणें अवश्य होतें. अर्थात् कॉंग्रेस यापुढेंहि कौन्सिलप्रवेशाची चळवळ न करील तर त्याचा सक्रिय निषेध, आणि मार्गदर्शन म्हणूनहि, आपण स्वतंत्र पक्ष काढावा असें आमच्या पैकीं ( विशेषतः मंडलिक जम्नादास मेथा इत्यादि ) मंडळींनीं ठरविलें. त्याप्रमाणें १९३३ च्या ऑक्टोबरांत मुंबईस सरदारगृहांत या पक्षाची स्थापना झाली. स्वागताध्यक्ष मेथा हे असून वऱ्हाडचे एक पुढारी रामराव देशमुख हे अध्यक्ष होते. तथापि परिषदेच्या अधिवेशनाचा प्रारंभ करून देण्याचा मान मला देण्यांत

आला होता. या नात्यानें मी जे भाषण केले त्यांतील कांही उतारे या खाली देत आहे :—

"आपण मला परिषद उघडण्याचा बहुमान दिला त्याबद्दल मी आपले कृतज्ञतापूर्वक आभार मानतो. मात्र मला हे आपल्याला प्रथमच सागितले पाहिजे की, एक केवळ 'सन्मान्य पाहुणा' या नात्यानें मी परिषदेचे उद्घाटन करीत नाही. एका इंग्रज सद्गृहस्थानें नुकतेच 'राजकीय परिषदेचा सन्मान्य पाहुणा म्हणजे राजकारणातून लोपत चाललेला मुत्सद्दी' असें वर्णन केले आहे. परंतु मला 'सन्मान्य पाहुणा' आणि 'लोपत चाललेला मुत्सद्दी' ही दोनहि विशेषणें लागू नाहीत. अकस्मात् उदय किंवा अकस्मात् लोप हा माझ्या जीविताचा गुणधर्मच नाही; तर राजकीय क्षेत्रात आपल्या शक्तीप्रमाणें काम करणारा मी एक गृहस्थ आहे. वयोमानाप्रमाणे पूर्वीप्रमाणें सार्वजनिक कार्यें उरकण्यास मजमध्यें तितकीशी धमक राहिली नसल्यास नवल नाही. आणि यामुळे परिषदेमध्ये नव्या पक्षाची स्थापना झाल्यावर प्रत्यक्ष अधिकाराचें असें कोणतेंहि पद न स्वीकारण्याचें मी ठरवले आहे. मात्र त्या पक्षाचा मी सभासद राहीन हे निश्चित. यापुढें राजकीय चळवळीत प्रत्यक्ष भाग घेणे मला शक्य होवो अथवा न होवो, सद्यःस्थितीबद्दल मात्र माझी काही ठाम मतें झाली आहेत. ती मतें मी आपणापुढें मांडीत आहे.

"काहीं महिन्यापूर्वी पुणें येथें कॉंग्रेस कार्यकर्त्यांची एक परिषद भरली आणि विशेष निर्णय न होता ती तशीच समाप्त झाली नंतर सार्वत्रिक कायदेभंग बंद ठेवून वैयक्तिक कायदेभंग सुरू ठेवण्यात आला. परंतु त्याचीहि स्थिति किती शोचनीय झाली आहे हे दिसतच आहे. कायदेभंगाच्या चळवळीत धुगधुगी कायम ठेवण्याचे अट्टाहासपूर्वक खासगी प्रयत्न चालू आहेत. परन्तु देशातील सर्वसामान्य जनता दडपशाहीच्या रूळाखाली भरडली गेल्यामुळे कॉंग्रेसच्या सर्वाधिकाऱ्याकडून त्या चळवळीवर बहुतांशी पडदा पाडण्यांत आला. अशा वेळी सार्वत्रिक चळवळ मागे घेणें हेंच शहाणपणाचे लक्षण होय. असहकारितेचा अर्थ मलाहि कळतो. आणि ती यापुढें खरी परिणामकारक व्हावयाची असेल तर ती मतदारसंघाच्या द्वारेंच होणार आहे. हिंदी राजकारणांत मतदार ही एक जबरदस्त शक्ति निर्माण करण्यात आली आहे. आणि व्यवहारतः ती शक्ति तुम्हीं नाहीशी करूं शकत नाही, म्हणून तिला तुम्ही आपल्या कारणी लावून घेतली पाहिजे. सरकारला असें वाटते की, हिंदुस्थानांतील राजकीय विचार गारद करण्यासाठीच पार्लमेंटने 'मतदार' ही एक

तलवार तयार केली आहे. ठीक आहे. मतदार ही एक तलवार आहे तर तिला आपल्या मताप्रमाणे धार आणि पाणी देणे आपले कर्तव्य आहे. नव्या राज्यघटनेत मतदानाचे क्षेत्र इतके वाढविण्यात येणार आहे की, भावी कालांत देशातील तोच मुख्य घटक ठरणार आहे. अर्थात त्याजवर विसबल्याशिवाय गत्यंतरच नाही. राजकीय चळवळ विधायक स्वरूपाची असो वा विध्वसक स्वरूपाची असो, तुम्हाला मतदाराचाच आश्रय घ्यावा लागेल. असहकारिता आणि कायदेभग या चळवळीच्या वेळी त्याचीच मदत तुम्ही घेतली नाही का ? आणि २० महिने अखड चळवळ चालविल्यावर लोक दडपशाहीने जिगजिगलेले पाहून तुम्हीच सार्वत्रिक कायदेभगाचे शस्त्र म्यान केलेत ना ? अशा रीतीने ही चळवळ बद केल्यावर तिच्या ऐवजी तुम्ही त्याच लोकांना कोणती राजकीय कामगिरी सागणार ? खादी, अस्पृश्यतानिवारण याचे नाव घेता येईल. परतु नित्य राजकीय चळवळीत त्याना फाजील महत्त्व देणे योग्य नाही.

" शिस्त, स्वार्थत्याग आणि ऐहिकभोग–विरक्ति या यौगिक गुणात मुरलेले असे थोडेसे लोक वैयक्तिक कायदेभगाचे व्रत चालविण्यास तयार असणार. परतु बहुजनसमाजाची वाट काय ? त्याच्यापासून तुम्ही कोणते कार्य करून घेणार ! खादी आणि अस्पृश्यता–निवारण एवढ्यावरच भागणार नाही. लोकांना आपल्यावरील कर्जाचे ओझे कमी होण्यासाठी पतपेढ्या पाहिजे आहेत. त्याना औद्योगिक व मोफत आणि सक्तीचे शिक्षण हवे आहे. शेतकरी आणि मजूर याची आर्थिक स्थिति सुधारावयास पाहिजे आहे आतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहार सुरळीतपणे चालावे म्हणून रुपयाचा दर निश्चित व्हावयास पाहिजे आहे. करपद्धति आमूलाग्र सुधारून गरीब व श्रीमंत यांच्यामध्ये योग्य प्रमाणांत कराची वांटणी व्हावयास पाहिजे आहे. लष्करी शिक्षणाची अत्यत जरूरी आहे. अशा एक ना दोन, लोकाच्या नडीच्या हजारो गोष्टी सागता येतील. कायदेमडळावर बहिष्कार घालून व लोकाना नुसते असहकारितेचे पाठ देऊन या गोष्टी मिळविता येतील काय ? कायदेमडळ हे एक यंत्र आहे. त्याच्यावर ताबा ठेवून त्याचे विघातक कार्य तुम्ही होऊन थांबविणार नसाल तर ते तुम्हांला चिरडल्याशिवाय राहणार नाही. काही असा आक्षेप घेतील की, नव्या राज्यघटनेत आपल्याला या यंत्राचा मनाजोगा उपयोग करून घेतां येणारच नाही. परतु मला इतकेच सागावयाचे आहे

की, सबध यत्राचा ताबा तुम्हाला मिळाला नाहीं तरी त्याजकडून होणाऱ्या राष्ट्र-विघातक कार्याला तुम्ही पायबद घालू शकाल.

"कायदेभगाच्या ऐवजी विधायक कार्यक्रमहि एका मोठ्या व्यक्तीकडून सुचविण्यात आला आहे. या विधायक कार्यक्रमातील काही बाबीविषयी मतभेद होण्याचे काहीच कारण नाही. प्रश्न आहे तो हा की, त्या विधायक कार्यक्रमात कायदेमडळ-प्रवेश बसतो की नाही ? आणि याच प्रश्नाने तर सारा गोंधळ उडविला आहे. कॉग्रेसचे कार्यकर्ते आपल्या विधायक कार्यक्रमात कायदेमंडळाना स्थान देतील तर खरोखरच आम्हाला नवा पक्ष काढण्याचीहि गरज राहणार नाही. आणि तसे झाले तर कॉग्रेसच्या निशाणाखाली सर्व जुन्या-नव्या कॉंग्रेसवाल्याना जमविणे मुळीच कठिण नाही. परतु दुर्दैवाची गोष्ट अशी की, कॉग्रेसमधील एका बड्या पुढाऱ्याने निष्कारणपणे आपल्या एका पत्रकात कौन्सिलाचा मुद्दाम निषेध केला आहे ! आणि आश्चर्य असे की, मदिरप्रवेशाची सवलत अस्पृश्याना कायद्याने मिळावी म्हणून तेच पुढारी कौन्सिलचे उंबरठे झिजवीत आहेत आणि सभासदाची मनधरणी करीत आहेत ! अशा स्थितीत कौन्सिलाचा उपयोग खरा कीं त्याजवरील बहिष्काराचे प्रेम खरे ? कौन्सिलाबद्दलचा कॉग्रेसवाल्याचा हा दुराग्रह ज्या दिवशी मावळेल तो सुदिन होय. कौन्सिलबहिष्काराच्या भरात त्याजकडून विसगत कृत्ये होत आहेत. कौन्सिलबहिष्कारामुळे होत असलेली ही विसगत वर्तणूक थाबवावयाची असेल तर त्यानी सद्यःस्थितीचा फेरविचारच करावयास पाहिजे. तसे न करता ते पुनरपि कौन्सिलबहिष्काराचे तुणतुणेच वाजवीत बसतील तर शेतकरी कामकरी आणि युवक त्याला मिथ्याचारच मानतील."

यानतर या पक्षाच्या विधायक कार्यक्रमाविषयी कांही सूचना करून शेवटी मी असे सागितले की कॉग्रेसवरील बदी उठल्यावर या पक्षाच्या प्रत्येक सभासदाने कॉग्रेसचा सभासद असलेच पाहिजे असा नियम करावा. या शेवटच्या मुद्यावर पुढे विषयनियामक मडळात सरदारगृहाच्या गच्चीवर सर्व रात्रभर (अलोचन जाग्रण करून ) चर्चा झाली. पुष्कळाचे मत ही अट काढून टाकावी असे होते. पण शेवटी निर्णायक मताचा मान मला द्यावयाचा म्हणून ती अट ठेवावी असे ठरले. ही पक्षस्थापना होतांना बॅ. जयकर व डॉ. मुंजे हे विलायतेत होते. त्यांना या स्वतंत्र पक्षाची कल्पना मानवली नाही. जुना प्रतिसहकार पक्षच पुढे चालूं ठेवावा असे

त्याचे मत होते. पुढे जयकर हे नव्या पक्षाचे किंवा कॉंग्रेसचेहि सभासद झाले नाहीत. पण मुंजे मात्र एक दोन वर्षांनी या पक्षाचे सभासद झाले.

मुंबईच्या सभेत शेवटी पक्षाचे अध्यक्षपद स्वीकारण्याचा आग्रह जम्नादास मेथा यानी केल्यावरून मी ते स्थान कांही दिवस घेतले. पुढे बापूजी अणे याना ते पद देण्यात आले त्यानी ते काही दिवस स्वीकारले. पण पुढे झालेल्या कौन्सिल निवडणुकीच्या बाबतीत मतभेद झाल्यामुळे त्यानी या पक्षाचा राजीनामा दिला. हा नवा लोकशाही स्वराज्य पक्ष आज स्थिरपद असून, त्यात कायदे कौन्सिलच्या व परवा नुकत्याच झालेल्या म्युनिसिपालिट्याच्या निवडणुकी लढविल्या.

---

## ( ८ ) कौन्सिल-बहिष्काराचा अंत

जगांत कोणत्याहि गोष्टीला शेवट हा असतोच! आणि असहकारितेच्या वेडाचे असेच झाले. पण तो शेवट असा तसा झाला नाही. तर म्हणीतल्याप्रमाणे 'अगदी इकडचे थोबाड तिकडे' फिरविल्याप्रमाणे भवितव्यतेने कॉंग्रेसच्या धोरणात परिवर्तन घडवून आणले. सर्वांना हवे होते तेच. डॉ. अन्सारी यांनी डॉ बिधनराय व भुलाभाई देसाई याना हाताशी घेऊन, व म. गांधीच्या कानाशी लागून, कौन्सिल-प्रवेश घडवून आणण्याला अनुकूल व उपयोगी अशा जुन्या कॉं. स्वराज्यपक्षाचे पुनरुज्जीवन करण्याचे ठरविले. पण असे करताना डॉ. अन्सारी यांनी कम्यूनल अवॉर्डला ( जातीयनिर्णयाला ) सभाळून धरण्याची, न दुखवू देण्याची, कारवाई फारच सफाईने केली. शेवटी सर्व कारवायावर शिक्कामोर्तब गांधींचे व्हावयाचे हे ठरलेलेच! त्याप्रमाणे गांधींनी अन्सारी यांना लिहिलेले पत्र प्रसिद्ध करण्यात आले ते असेः—

" दिल्ली येथे कॉंग्रेसच्या कांही अनुयायांची जी औपचारिक सभा भरली व तीत काही ठराव पसार झाले त्यासंबधी मजबरोबर चर्चा करण्याकरितां आपण तिघेजण पाटण्यास आला होतां हे एकपरी बरे झाले. जुन्या स्वराज्य पक्षाचे पुनरुज्जीवन करण्यासबंधी व असेंब्लीच्या नव्या निवडणुकीमध्ये उभे राहण्यासंबंधीं परिषदेने केलेल्या ठरावाना समति देण्यास मला कांहीच प्रत्यवाय वाटत नाही. सद्यःस्थितीत कायदेमंडळाचा राष्ट्रीय कार्याला कितपत उपयोग होईल या बाबतची

माझी मते सुप्रसिद्ध आहेत. १९२० साली कायदेमडळाच्या उपयुक्ततेबद्दल माझी जी मते होती तीच आजहि कायम आहेत. तथापि मला असे वाटते की, ज्याना कांही निमित्तामुळे कायदेभगात भाग घेतां येत नाही किंवा घेण्याची इच्छा नाही, आणि ज्याचा कायदेमडळावर विश्वास आहे, त्यानी राष्ट्रहितदृष्टया काम करण्यासाठी कायदेमडळात शिरणे हे केवळ योग्यच नव्हे तर, ते त्याचे कर्तव्यच आहे. हे जे विचार मी प्रदर्शित केले आहेत त्याना अविरोधी अशा धोरणाने नव्या पक्षाला जी जी मदत लागेल ती ती देण्याला मी यथाशक्ति मदत करीन."

पाटणा येथे ता. ७ रोजी काढलेल्या जाहीर पत्रकात म. गाधी म्हणतात, "मी जे जाहीरपत्रक काढीत आहे त्यातील प्रत्येक शब्द हा आत्मनिरीक्षण, अतःसवेदना, आणि ईशप्रार्थना या तिन्हीचा उद्रेक आहे. या निर्णयाने अर्थातच कोणाहि एखाद्या व्यक्तीवर शिंतोडा उडविण्याचा माझा मानस नाही. माझ्या मर्यादित सामर्थ्याची ती एक प्राजळ कबुलीच आहे. आश्रमवासीयाबरोबर केलेल्या सभाषणामुळे हे पत्रक काढण्यास मला स्फूर्ति झाली. विशेषतः एका जुन्या व चिरपरिचित सहकाऱ्याशी माझे बोलणे चालू असता त्यात मला विशेष उद्बोधक अशी माहिती मिळाली तुरुगात दिलेले काम करण्यास तो सहकारी कटाळा करी. अर्थात् सत्याग्रहतत्त्वाच्या विरुद्ध ही त्याची वागणूक झाली. माझ्या सहकाऱ्याची समजूत अशी की, आपले दौर्बल्य मला ( गाधीना ) माहीत आहे. परतु खरोखर मला त्याची जाणीवहि नव्हती आणि असला अन्धळेपणा पुढाऱ्याच्या ठायी असणे ही अक्षम्य गोष्ट होय. लगेच मला असे वाटू लागले की, काही काळपर्यंत मी स्वतः एकटाच कायदेभगाचा क्रियावान् प्रतिनिधि म्हणून राहावे. सद्यःस्थितीत कायदेभगाची जबाबदारी माझ्या एकट्याशिवाय दुसऱ्या कोणीहि स्वीकारता कामा नये. मला असे वाटते की, सत्याग्रहाचा वास्तविक सदेश अद्यापहि बहुजनसमाजापर्यंत पोहोचलेला नाही.

"आश्रमवासीयाबरोबर झालेल्या संभाषणावरून व स्वतः केलेल्या आत्मनिरीक्षणावरून मला असा निर्णय देणे भाग पडत आहे की, विशिष्ट तक्रारीशिवाय 'स्वराज्या'साठी चालविलेली सत्याग्रहाची चळवळ कॉंग्रेसच्या अनुयायांनी तहकूब करावी. त्यानी ती चळवळ आता माझ्या एकट्यावरच सोपवावी. माझ्या हयातीत ती चळवळ ज्या कोणाला पुनरुज्जीवित करावयाची असेल त्याला सत्या-

ग्रहशास्त्राची तत्त्वे पूर्णपणे माहीत असली पाहिजेत, व ती चळवळ त्याने माझ्या आदेशाप्रमाणे चालविली पाहिजे. सत्याग्रहाचा प्रणेता व पुरस्कर्ता या नात्यानेच मी हे मत देत आहे. आतापर्यंत स्वराज्यासाठी म्हणून ज्यानी ज्यानी माझ्या परोक्ष-अपरोक्ष सल्ल्यावरून वा उपदेशावरून कायदेभंगाच्या चळवळीत भाग घेतलेला आहे, त्यानी त्या चळवळीपासून आता परावृत्त व्हावे. पुष्कळानी उदासीन स्थितीत केलेल्या सत्याग्रहामुळे क्रांतिकारक किंवा राज्यकर्ते याच्या अंतःकरणात काहीच फरक पडलेला नाही. अशा रीतीने सत्याग्रहातून मुक्त झालेल्या कार्यकर्त्यांनी खादीप्रसार, जातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, मद्यपानप्रतिबंध यासारख्या राष्ट्रपोषक चळवळीत मनोभावे भाग घेतला पाहिजे. ज्याना ही कामे करता येणार नाहीत, त्यानी राष्ट्रीय दृष्टया महत्त्वाच्या अशा लहान लहान उद्योगधंद्यात भाग घेऊन आपला उदरनिर्वाह करावा. हे पत्रक काढल्यामुळे कॉंग्रेसचे अधिकार मी लुबाडले असे अर्थातच होत नाही. सत्याग्रहाच्या बाबतीत माझ्याकडून काही सल्ला मिळावा अशी ज्याची इच्छा आहे त्याना या पत्रकान्वये मी सल्ला देत आहे ”

याला अनुसरून लगेच डॉ अन्सारी यांनी खालील पत्रक प्रसिद्ध केले —

“ पाटणा येथे महात्माजीशी विचारविनिमय केल्यावर जो निर्णय बाहेर पडला आहे त्यामुळे मला फारच समाधान वाटत आहे. म. गांधीनी जुन्या स्वराज्य पक्षाच्या पुनरुज्जीवनास व कायदेमंडळाच्या निवडणुकीत भाग घेण्यास उदार अन्तःकरणाने संमति दिली आहे ! खुद्द त्याची मते कायदेमंडळाच्या उपयुक्ततेबद्दल पूर्वीप्रमाणेच ठाम असली तथापि त्याना असे वाटते की, ज्याना कायदेभंगाच्या चळवळीत कोणत्याहि कारणाने भाग घेता येत नाही, व ज्याचा कायदेमंडळातील कामावर विश्वास आहे, अशा कॉंग्रेसच्या अनुयायानी आपापल्या समजुतीप्रमाणे राष्ट्रहितपोषक विधायक कार्य करणे त्याचे कर्तव्य आहे. इतकेच नव्हे तर, स्वराज्यपक्षाला मदत करण्यासहि महात्माजी तयार आहेत. महात्माजीच्या या अन्तःकरणपूर्वक व आत्मस्फूर्तीने मिळालेल्या पाठिंब्यामुळे कॉंग्रेसमध्ये फूट पडण्याचे टळल ही आनंदाची गोष्ट होय. या निर्णयाने कॉंग्रेसमधील विविध पक्षोपपक्षाचे सहकार्य व संमीलन होण्यास मदत होणार आहे.

“जुन्या स्वराज्य पक्षाचे पुनरुज्जीवन व संघटन झाल्यावर कॉंग्रेसपुढे व राष्ट्रापुढे व्यावहारिक, परिणामकारक, व क्षोभजनक असा विधायक कार्यक्रम ठेवतां येईल. असा

कार्यक्रम मांडता आल्यावर देशभर पसरलेले राजकीय औदासीन्य व शैथिल्य घालवितां येईल, व सरकाराच्या नजरेस ही गोष्ट आणतां येईल की, 'पांढऱ्या खलित्या'तील स्वराज्य-योजना व दडपशाहीचे जुलमी कायदे यांचा निषेध करण्याच्या कामी आमच्या पाठीशी अवघी जनता उभी आहे त्याच वेळी आपल्याला राष्ट्राची स्वराज्याची मागणीहि सरकारपुढे एकमुखाने मांडता येईल. जातीय समेट हा अर्थातच त्या राष्ट्रीय मागणीचा एक महत्त्वाचा घटक समजला जाईल. स्वराज्य-पक्ष हा जातीय ऐक्य साधण्याचा कसोशीचा प्रयत्न करणार आहे. बॅ. जिना यांच्या मागण्यांत फरक करून मुसलमानांतील सर्व उपपंथांना व इतर जातींना त्या मान्य होण्यासारख्या करतां येतील असे मला वाटते. एप्रिल महिन्याच्या अखेरीस किंवा मे महिन्याच्या सुरुवातीस कलकत्ता येथे स्वराज्यपक्षीय व कॉंग्रेस-वाले यांची एक मोठी परिषद बोलावण्याचा माझा विचार आहे. त्या सभेत पक्षाचा कार्यक्रम ठरविणें, त्याचें कार्यकारी मंडळ निवडणे इत्यादि कामें होतील."

कौन्सिलप्रवेशाचें पुन्हा प्रवर्तन घडवितांना कांग्रेसमधील जुन्या स्वराज्य-पक्षाला अग्रेसर करावें, व त्याच्याकडून तें कार्य करवावें, अशी डॉ अन्सारी यांची सूचना होती व ती गांधींनाहि पटली होती पण प्रत्यक्षांत तसें घडलें नाही गांधी-च्या बगलेतल्या थोड्या निवडक पुढाऱ्यांनीच तें सर्व काम आपल्या हातीं घेतलें. याचा प्रमुखपणा डॉ. अन्सारी यांजकडे होता व त्यांना तर जातीयनिर्णयाला धक्का लावावयाचा नव्हता म्हणून त्यांनी अगदी एका बाजूस रांचीसारख्या ठिकाणी खाजगी कट जुळवून हवें तसें धोरण आखलें. ही गोष्ट बापूजी अणे यांना पसंत पडली नाही. विशेषतः महाराष्ट्रांतील जुन्या स्वराज्य पक्षाच्या आम्हां महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना या खासगी सभेला निमंत्रण न द्यावें, व मुद्दाम वगळावें, या गोष्टीचा त्यांना रागहि आला. यासंबंधी अणे यांची कांही पत्रें देतो :—

(ता. २२।४।१९३४) या सोबत मी मुंबईस के. एफ्. नरीमन यांना पाठविलेल्या पत्राची प्रत तुम्हाला अवलोकनार्थ पाठवीत आहे. ते पत्र असे :— कायदेभंगाची चळवळ थांबल्यापासून देशांत जी स्थिति उत्पन्न झाली आहे तिचा विचार करण्याकरितां, आणि स्वराज्यपक्षाच्या पुनर्घटनेचा विचार करण्याकरितां, अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटी लवकरच बोलावण्यांत येईल असें वाटतें. ही सभा रांचीस बोलावणें ठीक होणार नाही. मुंबई किंवा कलकत्ता येथें, विशेषतः कलकत्त्या-

सच अशी महत्त्वाची सभा बोलाविली पाहिजे. रांचीस सभा न बोलाविली तर सल्ला द्यावयाला गांधी हजर राहू शकणार नाहीत या सबबीत अर्थ नाही. इतक्या लोकाकरिता गांधीनीच आपला कार्यक्रम किंचित बदलून घ्यावा. डॉ. अन्सारी, डॉ. महमूद याना मी याप्रमाणे लिहीत आहे. पाटणा येथे गांधींनी जे उद्गार काढले त्याचा अर्थ तुम्ही व सरोजिनी नायडू यांनी केला तो बरोबर आहे. म्हणजे ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीने स्पष्ट शब्दात आता असे ठरविले आहे की कायदे-भंग थांबविला पाहिजे नाहीतर सरकार या मुग्धतेचा फायदा घेईल.

"नव्या निवडणुकी व्हावयाच्या तर ही गोष्ट अवश्य आहे. या निवडणुकी-च्या कामाकरिता कॉंग्रेसने स्वराज्य पक्षाला पूर्ण मुखत्यारी द्यावी, फार तर आपले धोरण दर्शविण्यासारखे कांही नियम घालून द्यावेत. पण कॉंग्रेसने स्वतः असे काही न केले तर मी स्वराज्य पक्षाची संघटना करणार आहे हे तुम्हास उघड सांगतो. याकरता खुद्द कॉंग्रेसचे जादा अधिवेशन भरावे की काय ते मग पाहूं. जुन्या स्वराज्य पक्षाशी, म्हणजे ज्याचे अध्यक्ष पंडित नेहरू होते त्याच्याशी, मी १९२९ सालीच संबंध सोडला. त्याचवेळी जयकर, केळकर, मुंजे यानीहि तो सोडला. त्याच्याबरोबर मीहि प्रतिसहकारी पक्षाच्या तिकिटावर निवडून आलो. लाहोर येथील कॉंग्रेसचा ठराव माझ्यावर बंधनकारक होता असे मी तरी केव्हांहि समजलो नाही. आम्ही सन १९३० साली असेंब्लीचा राजीनामा दिला तो सरकारच्या इतर काही कृत्याचा निषेध करण्याकरिता.

"मी स्वतः कायदेभंगात भाग घेतला याचा अर्थ माझ्या जुन्या प्रतिसहकार पक्षाची तत्त्वे मी सोडून दिली असतील असा नाही. मी वर सुचविलेल्या नावाचे इतर गृहस्थ जर तुम्हाला बोलवावयाचे नसतील तर मलाहि बोलवू नका. त्यांना वगळल्यास तुमच्या परिषदेच्या ठरावांना महाराष्ट्रांत नागपुरांत व वऱ्हाडांत कोणीहि किंमत देणार नाही हे लक्षात ठेवा. तुमच्या परिषदेचा मुख्य विषय कौन्सिलप्रवेश हा आहे म्हणून तर मी हे सांगतो. आणि म्हणतो की, वरील गृहस्थांचा सल्ला तुम्ही अवश्य घ्या. स्वतः महात्मा गांधी यांनी 'स्टेटस्मन' पत्राला जी मुलाखत दिली आहे त्यात ते म्हणतात 'स्वराज्य पार्टीची तत्त्वे ज्या कोणाला मान्य असतील त्या सर्वांनी तीत प्रवेश मिळवावा, मग त्याचे जुने वर्तन कोण-त्याहि बाजूचे झालेले असो.' आता म. गांधी म्हणतात की, मी पूर्वी पंडित मोती-

लाल व देशबंधू दास याना कौन्सिलातील धोरण ठरवून दिले नाही, तसेच या नव्या स्वराज्य-पक्षालाहि ठरवून देऊ शकत नाही. हे गांधींचे म्हणणे त्यांच्या दृष्टीने योग्यच आहे. ( बापूजी अणे, यवतमाळ. )

( ता. २४।४।१९३४ ) माझ्या मागील पत्रांत मी डॉ. अन्सारीना आपणास रांचीच्या सभेस आमत्रण करण्याबद्दल सुचविले असल्याचे लिहिले होते. त्या पत्रास डॉ. अन्सारींनी उत्तर लिहिले आहे की " नवीन स्वराज्य पक्षाची घटना, कार्यक्रम, व धोरण काय असावे हे ठरविण्यासाठी होणाऱ्या या सभेस प्रतिसहकारपक्षाच्या पुढाऱ्याना इतक्यातच बोलाविणे युक्त होणार नाही. पण पुढे ऑ. इ. कॉ. कमिटीची समति मिळाल्यावर प्रतिसहकारपक्ष व स्वराज्यपक्ष यामधील मतभेदाची तडजोड करून निवडणुकीत जास्तीत जास्त यश मिळविण्याचा आमचा इरादा आहे. मी आपणास लिहिलेल्या पत्रांत आपण रांचीच्या सभेचे आमंत्रण स्वीकारावे अशी विनति केली होती. पण आता त्या पत्राने आपली काही गैरसोय झाली असल्यास तसदीची माफी करावी.

डॉ. अन्सारीच्या नकाराबद्दल जरी मला फार वाईट वाटत असले तरी मी समेटाची आशा अजिबात सोडलेली नाही स्वराज्यपक्ष व प्रतिसहकारवादी पक्ष यांच्यांत तडजोड करून, कौन्सिलवादी कॉंग्रेसभक्ताच्या या दोन्ही महत्वाच्या गटाचे ऐक्य करण्याचा प्रयत्न मी चालू ठेवीन. ( मा. श्री. अणे. )

(ता. २।७।१९३४) माझ्या पंडित मालवीय यांच्याशी २८ ता. स झालेल्या भेटीत वर्किंग कमिटीने "कम्युनल अवॉर्ड" सबंधीच्या ठरावांत समाधानकारक फरक केला नाही तर आम्ही दोघानी राजीनामे द्यावे असे ठरविले आहे. " राजीनामा दिल्यावर पुन्हा असेंब्लीच्या निवडणुकीस उभे राहूं नये, कारण त्यामुळे कॉंग्रेसच्या उमेदवाराविरुद्ध निवडणूक लढविणे भाग पडेल " अशा मताचा मी आहे. या विषयी तुम्ही सुचविलेल्या मुद्याचा मालवीयाच्यावर फार परिणाम झाला. तेही आपल्याच मताचे आहेत. तरीहि " कम्युनल अवॉर्ड "मुळे होणारा अन्याय जगजाहीर करून, ब्रिटिश सरकारच्या धोरणाविरुद्ध लोकमत निर्माण करावेच. त्यासाठी एक स्वतंत्र " लीग " स्थापन करावी की कसे याचा विचार बनारसच्या वर्किंग कमिटीच्या अधिवेशनानंतर आपण भेटून ठरवूं. ( मा. श्री. अणे, यवतमाळ. )

या नवीन घडामोडीला पं. मदनमोहन मालवीय आणि बापूजी अणे यानी प्रथम अनुमोदन दिले ते असेः—

पंडित मदनमोहन मालवीय—" काँग्रेसवाल्यानें असेंब्लीतील प्रत्येक जागा जिंकण्याचा प्रयत्न करणे अवश्य आहे."

लोकनायक बापूजी अणे—" सध्याच्या निष्क्रिय व कुचबलेल्या राजकारणामुळे ज्या कॉंग्रेसवाल्यांची मने अस्थिर होत होती त्याना दिल्लीचे ठराव व त्यांना म. गांधीनी दिलेली अनुमति ही ऐकून समाधान वाटेल यात शंका नाहीं. कॉंग्रेसने सरकाराचे निवडणुकीचे आव्हान स्वीकारून व निवडणुकीत आपले उमेदवार बहुसंख्याक असे निवडून आणून जनतेवर आपले वर्चस्व अद्यापि किती आहे, हे दाखविणे हेच योग्य आहे. नव्या पक्षाच्या पुढाऱ्यांनी निवडणुकी कोणत्या तत्त्वावर व पद्धतीवर लढवावयाच्या यासंबंधी एक निश्चित कार्यक्रम ताबडतोब आखला पाहिजे."

तथापि अन्सारी प्रभृति कॅांग्रेस पुढारी आणि अणे मालवीय याचे जातीयनिर्णयाबाबत एकमत होणे शक्य नव्हते. लोकशाही स्वराज्य पक्षाला तर जातीयनिर्णय मान्य नसल्याचे पूर्वीच प्रसिद्ध झाले होते. अशा स्थितीत वरील दोघानी कम्यूनल अवॉर्डशी झगडण्याला एखादा नवीन पक्ष स्थापित करण्याऐवजी लो. स्व. पक्षासच येऊन मिळावयास पाहिजे होते. पण "महाराष्ट्रावर इतर प्रांत नाराज असतात यामुळे अखिल भारतीय असा नवाच एखादा पक्ष काढावा" असे अणे याच्या मनाने घेतले. ते स्वतः लोकशाही पक्षाचे सभासद झाले होते. पण पंडित मालवीय याना पुढारी करून आणि बंगालप्रांत आपल्या बाजूला आणून कलकत्ता येथे एक नवा राष्ट्रीयपक्ष स्थापण्याची योजना सिद्ध झाली. माझे व इकडील इतर मंडळींचे म्हणणे असे की कम्यूनल अवॉर्ड ही महत्त्वाची पण एकेरी बाब आहे. म्हणून त्याशी झगडण्याकरिता वेगळा पक्ष असा नको. एखादा स्पेशल स्वतंत्र 'संघ' त्या कार्यापुरता काढावा. पण ते अणे मालवीय याना पटेना.

मालवीय व अणे यानी कॉ. वर्किंग कमिटीचे राजीनामे दिले याचे कारण असे की जातीयनिर्णयाविरुद्ध असलेले आपले मत उघडपणे प्रतिपादण्यास त्यांना स्वतःला, व त्याच विचाराच्या इतर सर्व कॉंग्रेसच्या अधिकाऱ्यांना, स्वातंत्र्य

असावे ते नव्हते. वास्तविक काँग्रेसने या एका मुद्यापुरते मतस्वातंत्र्य देण्यास काही हरकत नसावी. ते दिले असते तर काँग्रेसमधील फट थाबली असती. इतकेच काय, मालवीय व अणे याना नवा पक्ष काढावा लागला नसता. आणि आमचा लोकशाही पक्षहि काँग्रेसशी मिळते घेण्याला तयार झाला असता. पण काँग्रेस पुढारी डॉ० अन्सारी प्रभृति मुसलमानाचे मन दुखवण्यास तयार नव्हते. इतर कोणालाहि दुखवावे पण मुसलमानाना दुखवू नये, हा काँग्रेसचा परिपाठच होता !

असो. नवीन पक्ष असा काढू नये या करिता अणे व मालवीय याचे मन वळवावे म्हणून मी त्याना खालीलप्रमाणे अनावृत पत्र लिहिले:—

" आपण उभयतानी पार्लमेंटरी बोर्ड व काँग्रेसची वर्किंग कमिटी यावरील आपल्या जागाचे राजीनामे देऊन, हिंदुस्थानात अद्यापि राष्ट्रीय वृत्ति व राष्ट्रीय तत्त्वे ही जिवत आहेत व काँग्रेस पुढाऱ्यानी प्रचलित केलेल्या हिंदुमुसलमानाच्या खोट्या एकीच्या कल्पनानीहि ती नाहीशी झालेली नाहीत, असेच सिद्ध केले आहे.

" मात्र आपल्या राजीनाम्यानतर आपण प्रस्तुत जातीयनिर्णय व त्यावर अधिष्ठित झालेल्या राज्यघटनेचा निषेध करण्याकरिता एक कायमचा नवा पक्ष स्थापन करण्याचा जो उपक्रम चालविलेला आहे त्याबद्दल इकडील आम्हा महाराष्ट्रीयाकडून मान्यता मिळणार नाही. आपल्या जाहीरपत्रकावरून पाहता हिंदुस्थानात असेंब्लीमध्ये, व लडन येथे पार्लमेंटमध्ये, श्वेतपत्रिकेला अनुसरून व्हावयाचा कायदा विचाराकरिता पुढे येईल तेव्हा जातीयनिर्णयाला आपला पक्ष कसून विरोध करील असे दिसते. याकरिता स्वतंत्र पक्षाच्या सघटनेचा व्याप वाढवून स्वदेशात व परदेशात करावा लागणारा मतप्रसार, मोठ्या प्रमाणावर संघटना, मोठा द्रव्यनिधि इ. पक्षसघटनेच्या अनुषंगाने येणाऱ्या अनत गोष्टीमध्यें आपले सामर्थ्य खर्ची घालण्याऐवजी, आपण आपल्या जवळील सर्व मनुष्यबळ व द्रव्यबळ जातीयनिर्णयाला सर्व प्रकार विरोध करण्यात कारणी लावावे. आणि सर्व प्रकारच्या राजकीय प्रश्नांबद्दल मतप्रदर्शनाचे आवश्यक ओझे अंगावर घेणारा व्यापक व स्वतंत्र पक्ष स्थापन करण्याच्या भरीस न पडतां, तेवढेच एक काम एकमुखाने पार पाडावे हे अधिक व्यवहार्य नाही काय ?

बचत होणार नाही. या जागांचे पूर्वीचे पगार लक्षांत घेतां ही खरोखरच क्रांति म्हणता येईल !

अशा रीतीने आर्थिक लाभाचे आमिष अधिकारग्रहणांतून काढून टाकल्याने त्यातील मुख्य दोष निघून गेला आहे. काही विषारी किंवा तीव्रगंध पदार्थातून तो दोष काढून टाकल्यावर जे उरते ते शुद्ध सात्विक गुणकारी औषधी तत्त्वच उरते. तसेच हेहि झाले आहे. कारण खेर, मुनशी, गिल्डर, मावळणकर इत्यादि गृहस्थानी महालाभाचा आपला धंदा सोडून मंत्रिपद स्वीकारल्यामुळे, अधिकारग्रहण हे स्वार्थत्यागाच्या तीर्थाने पवित्र होत आहे.

एखाद्या नाटकगृहात 'ट्रॅन्सफर सीन' म्हणजे त्वरित दृश्यांतर पाहिल्याने प्रेक्षक जसा चकित होतो, तशीच जनताहि ती जुनी चिरपरिचित राजवटी आणि ही नवी राजवटी यांतील फरक पाहून चकित झाली आहे ! जुने ते परक्याचे आणि नवे ते आपले, या भावनेनेच लोक प्रथम मोहून गेले आहेत. या नव्या राजवटीचा प्रारंभ लोकनियुक्त सभासद कूपर जम्नादास प्रभृतीनीच केला. त्याची प्रधानपदी नेमणूक गव्हर्नरने आपल्या सत्तेने केलेली होती हे खरे. तथापि, त्यानी खरा लोकहितसाधक असाच कार्यक्रम आंखला होता. आतां नवे मंत्रिमंडळ त्यातील काय वाटेल ते घेवो आणि काय वाटेल ते टाको. ते जे घेईल त्याला बहुमताचा पाठिंबा हटकून मिळण्याचा संभव दिसत आहेच. पण नवे मंत्रिमंडळ स्वतःच म्हणून करील तेहि प्रायः लोकहिताचेच असणार. नव्या राजवटीबद्दल जनतेला आपलेपणा वाटावा अशा गोष्टी करण्याला तिने सुरुवात केलीच आहे. आणि पुढील थोड्या दिवसांत आणखीहि तशाच अनेक गोष्टी घडून येतील यात शंका नाही. यांतील कांही गोष्टी वरवरच्या आहेत. रयतेच्या प्रत्यक्ष आर्थिक हिताचा संबंध त्याशी पोचू शकत नाही हे खरे. तथापि वारा कसा वाहतो हे दाखविणाऱ्या गवताच्या काडीइतका तरी त्यांचा उपयोग आहे हे खचित.

ता. १० जुलै, १९३७ रोजी गोखले हॉलमध्ये भरलेल्या परिषदेत मी एक हृदयस्पर्शी दृश्य पाहिले. कूपर व जम्नादास यांच्या हुकुमाने विनायकराव सावरकर याची सुटका झाली होती. अशा पूर्वीच्या स्थानबद्ध 'कैद्या' ला कूपर यांनी परिषदेत सन्मानपूर्वक निमंत्रण केले; आणि त्यांना आपल्या डाव्या हाताशी बहु-

मानाच्या पहिल्या खुर्चीवर जागा दिली ! स्वतः कूपर यांनी मजजवळ बोलून दाखविले त्याप्रमाणे हा लोकसत्तेचाच विजय होय ! अशी गोष्ट पर्वी कधी तरी घडली असती काय ? राजद्रोहाची शिक्षा पुरी भोगून आल्यावर सरकारशी सहकार्य करण्यास सिद्ध झालेले टिळक, आणि होमरूलची तात्पुरती चळवळ केलेल्या पण जन्मभर ब्रिटिश साम्राज्याचे अभीष्ट-चितन करणाऱ्या ॲनी बेझटबाई, ही दोघे आपापल्या स्वराज्यसघाचे अध्यक्ष म्हणून १९१९ साली पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटीपुढे कैफियती माडण्याला गेली, तेव्हा 'आमच्यापुढे येऊ नका' असे कमिटीला म्हणता आले नाही तथापि, त्यानी आपापल्या कैफियती तोडी माडल्यावर कमिटीपैकी एकाहि भल्या गृहस्थाने त्यांना एकहि प्रश्न विचारला नाही ! बहाणा हा की, असल्या राजकीय पुढाऱ्याशी समक्ष बोलणे म्हणजे सरकार पक्षाचा तो एक अपमान आहे. एवढा ताठा ! एवढी गुर्मी ! ते चित्र पाहा, आणि वर कूपर-जम्नादास व सावरकर याच्यासबधाचे हे चित्र पाहा. म्हणजे सदोष अशाहि नव्या घटनेने प्रस्थापित झालेल्या राजवटी-विषयी जनतेला विश्वास आणि आपलेपणा वाटावा यात काय आश्चर्य ?

पूर्वी कूपर-जम्नादास कारकीर्दीत जे काही थोडे शक्य होते ते झालेच; पण आता ना. खेर याच्या मागे हुकमी अशा बहुमताचे पाठबळ असल्यामुळे त्याना तर पुष्कळच गोष्टी अशा करता येतील की, त्यामुळे मत्रिमडळाबद्दल वाटणारा आपलेपणा अधिकच दृढ व वृद्धिगत होईल. अनेक राजबदी बंधमुक्त झाले. वर्तमानपत्राच्या जामिनक्या परत दिल्या. कायदेभगाच्या चळवळीत बेकायदा ठरलेल्या सस्थावरचा बहिष्कार निघून त्या आपले कार्य करण्यास मोकळ्या झाल्या. अशा अनेक सस्थाची मालमिळकत त्यांच्या ताब्यात परत देण्यात आली. आक्षित वाङ्मयापैकी बऱ्याचशा पुस्तकावरचा बहिष्कार व जप्ती काही उठली व काही लवकरच उठेल. तुरुगात अद्यापि खितपत पडलेल्या उरल्या राज-बंदीची चौकशी होऊन ते बहुधा बधमुक्त होतील. धारवाडचे रा. ब. जोशी याचे बद केलेले पेन्शन पुनः सुरू झाले. कामगाराचे सप त्यांतल्या त्यांत त्यांना अनुकूल अशा अटी मालकाना कबूल करावयाला लावून, मत्रिमडळाच्या प्रतिनिधिकडून संप मिटविण्यास सुरुवात झाली आहे. ज्या देसायाना कमिशनर गॅरेट यानी जबर-दस्तीने असि. कलेक्टरीचा राजीनामा देण्यास लावले, तेच आज त्यांना स्टेशनवर सामोरे जाऊन सलाम करीत आहेत. आणि मनात दातओठ खाऊन कां होईना त्यांना

'सर'हि म्हणाले असतील ! विधिमंडळात 'वंदे मातरम्' हे गीत गायिले जाईल हे पूर्वी कोणाच्या स्वप्नी तरी आले असते काय ? राष्ट्रीय निशाणाचा वाद अजून मिटलेला नाही; परंतु युनियन जॅकच्या बरोबरीने रास्त हक्क सांगणारा भांडखोर भाऊ त्याला मिळाला यांत संशय नाही. यापैकी एक गोष्ट तरी पूर्वीच्या राजवटीत घडली असती काय !

पण या सर्व गोष्टींना राजकीय देखाव्याचे स्वरूप आहे. म्हणून त्यांची किंमत भावनेच्या मापाने करावयाचे इतकेच. ज्याला गांधीजी 'जेश्चर' म्हणतील तशा सदराखाली पडणाऱ्या या गोष्टी आहेत. त्यांच्या योगाने लोकांना नव्या मंत्रिमंडळाकडून आपले कल्याण होण्याचा फार संभव आहे असे वाटेल. पण खरे कल्याण आणखीहि वेगळे असून, ते पदरात पडण्याला अवकाश व क्रमहि आहे. नदीत बुडू घातलेल्या माणसाला, काठावर उभा राहून कोणी आपणाला वाचविण्याची काही तजवीज करीत आहे असे दिसले तर धीर येतो हे खरे. परंतु त्याने फेकलेली दोरी प्रत्यक्ष हाताला लागेपर्यंत त्याच्यावरचे प्राणसंकट दूर होत नाही. जनतेचे लक्ष आपणाकडे वेधण्याला हा प्रास्ताविक देखावा ठीक आहे. पण तिचे मूर्त स्वरूपाचे काही हित व्हावयाचे तर, मंत्रिमंडळाकडून काही विधायक कार्यक्रम पार पडला पाहिजे. शत्रूला भिवविण्याला आणि आपल्या सैन्याला धीर येण्याला लढाईत प्रथम दुरून तोफांची सरबत्ती करावी लागते. पण कोणतेहि ठाणे हस्तगत व्हावयाचे तर पायदळाने चालत जाऊनच ते गाठावे लागते.

म्हणून मला असे वाटते की, यापुढे स्वतः मंत्रिमंडळच काय, पण त्याचे बाहेरचे मित्र आणि टीकाकार देखील, यांनी आपले बहुतेक लक्ष विधायक स्वरूपाच्या योजना व सूचना याच्याकडेच द्यावयास पाहिजे. मंत्रिमंडळाच्या यशाकडे दुःखित पीडित रयत लोक, आणि त्याच्या अपयशाकडे जुन्या राजवटीतील प्रतिपक्षी, डोळे लावून बसले आहेत. पैकी पहिल्याचे समाधान आणि दुसऱ्याची फजीति करण्याचा एकच मार्ग म्हणजे विधायक राजकीय सुधारणांचा काही कार्यक्रम सिद्धीला नेणे हा होय.

मात्र हे घडून यावयाचे तर कॉंग्रेसने आपले विधायक धोरण कांही झाले तरी निश्चल ठेवावयाचे असा निश्चय केला पाहिजे. या दृष्टीने पाहतां तीन वर्षांत दारूबंदी झालीच पाहिजे असे गांधीजींनी 'हरिजन' पत्रांतील एका लेखांत

सुचविले, तो आम्ही तरी शुभशकूनच समजतो. कारण या सूचनेचा गर्भित अर्थ मंत्रिमंडळे निदान तीन वर्षे टिकावी असाच होत नाही काय ! आजपर्यंत जे बिघडले ते सर्व कॉंग्रेसच्या अनिश्चित आणि डळमळीत चंचल धोरणानेच बिघडले. तशा धोरणाची बाधा प्रस्तुत मत्रिमडळाना होऊ नये अशी मागणी करण्यांत काय वावगे आहे ? होण्याच्या कामाच्या मानाने मत्रिमंडळाला तीन काय पण पांच वर्षेहि प्रथम सलग पाहिजेत. स्वाराला मजल गाठावयाची तर त्याची घोड्याच्या खोगिरावरची बैठक स्थिर पाहिजे. सर्कशीतल्या घोड्याच्या मोकळ्या पाठीवर चढ़न बसावे उतरावे अशा उड्या मारून चालावयाचे नाही. पूर्वानुभवावरून पुष्कळ लोकांना एक भीति ही वाटते की, राजकीय मानापमानाच्या भ्रामक कल्पनेने कॉंग्रेसच्या घोडयाला बुजविणे सोपे झाले आहे. त्याला बेजबाबदार लोक तर बुजवितातच, पण स्वतः त्याचा मालकहि वेळी अवेळी बुजवितो, चमकावतो, असे आढळून आले आहे. तसे मात्र न व्हावे !

आतां इतर राजकीय पक्षासबंधानेहि थोडे लिहावेसे वाटते. ज्या पक्षांना कॉंग्रेसविरोधी असे नांव देण्यांत येते ते खरोखर कायमचे कॉंग्रेसविरोधी नाहीत, कांही कार्यापुरते आहेत. हे कार्य म्हणजे कॉंग्रेसला अधिकारस्वीकार आणि विधायक कार्य याच्या धोरणाकडे खेचून नेणे, आणि ते कार्य बरेचसे होईपर्यंत तरी तिला तेथेच थोपवून धरणे ! हे धोरण कॉंग्रेसने कायमचे स्वीकारले असे जितके अधिकाधिक दिसून येईल, तितक्या प्रमाणात ‘ कॉंग्रेसविरोधी ’ समजल्या जाणाऱ्या पक्षाचे कार्य कमी होईल, आणि त्यांचा विरोधहि कमी होईल. पण अजून कॉंग्रेसच्या धोरणासंबंधी डळमळ वाटते ! निश्चितता वाटत नाही! म्हणूनच लोकशाही पक्षाचा राजीनामाहि दिलेले बापूजी अणे यांनी अकोला येथे असे मत प्रकट केले आहे कीं, या किंवा अशा एकाद्या पक्षाची अजून आवश्यकता आहे. तथापि, या पक्षाचे धोरण विधायक कार्याचेच असल्यामुळे, काग्रेसची प्रस्तुतची मनोवृत्ति टिकून राहील तोपर्यंत, या पक्षाला मुख्य कार्य म्हटले म्हणजे आपला कार्यक्रम कॉंग्रेस मंत्रिमंडळाला सुचवीत किंवा जनतेसमोर तो मांडीत राहणे हे होय.

पूर्वी विरोध आणि शब्दाशब्दी झाली ती ठीकच होती. पण आतां चढाओढ लागावयाची तर विधायक कार्यक्रमाच्या स्वरूपाच्या, रयतदुःखनिवारणाच्या, जुन्या राजवटीतील घाण काढून टाकण्याच्या कामांत. आणि प्रत्यक्ष रेखीव आंकडे-

बंद सयुक्तिक सूचना अधिक कोण करतो यांत लागावी. उलट कॉंग्रेस पक्षानेहि इतर पक्षांशी वागण्याची आपली चढेलवृत्ति सोडून देऊन, त्यांचे सहकार्य स्वीकारण्याची, किंबहुना निमंत्रणपूर्वक त्याचे स्वागत करण्याची तयारी दाखविली पाहिजे. विधिमंडळात लोकहितकारक संवर्धक असे ज जे काही कार्य प्रधान-मंडळाकडून उपस्थित होईल त्याला आपला पक्ष पूर्णपणे पाठिंबा देईल असे जम्नादास मेथा व भोपटकर यानी पूर्वीच जाहीर आश्वासन दिले आहे ते योग्यच आहे, आणि त्याप्रमाणेच घडून येईल याविषयी मला बिलकुल शंका वाटत नाही. आतां स्पर्धा सुरू व्हावी ती कार्यकारी बुद्धिबुद्धीमध्ये व्हावी, अपकारक बोचक भावनाभावनामध्ये नको !

---

## ( ९ ) माझी कार्यनिवृत्ति

१९३२ साली माझा एकसष्ठावा वाढदिवस झाला तेव्हांपासून सार्वजनिक कार्यांतून निवृत्त होण्याचे मी मनातून ठरविले होते. तो बेत मी हळूहळू अमलांत आणू लागलो. केसरीची ज्युबिली आपल्या हातून झाली, टिळकाच्या हयातीत दहा वर्षे ( १९१०-२० ) केसरी चालविला व साभाळला तसाच त्यांच्या मृत्यु-नंतरहि दहा वर्षे ( १९२०-३० ) तो चालविला व साभाळला ही गोष्ट मला कृत-कृत्यता वाटण्यासारखीच होती. शिवाय हाताखाली सहसपादक वर्गात अनेक लोक असल्यामुळे त्यांनाहि सपादकाचे जबाबदारीचे काम करण्याची संधि मिळावी हे योग्यच होते. म्हणून १९३२ च्या पूर्वी पासूनच प्रथम ग. वि. केतकर नंतर वा. कृ. भावे व नतर ज. स. करंदीकर यांची नावे मी सपादकाचे जागी घातली होती, आणि मी वरती देखरेख ठेवणारा संचालक मार्गदर्शक होऊन राहिलो होतो. करंदीकर वडील म्हणून त्यांचेच नांव केतकरांपूर्वी घालावयाचे, पण ते स्वतः करंदीकर यांच्याच कांही विशेष कारणाकरितां तेव्हां केले गेले नाही. तथापि संपादक नसताहि राजकीय परिस्थितीच्या गरजेमुळे, व केव्हां केव्हां निवळ हौसेमुळेहि, मी अनेक वेळी सपादकीय लेख लिहीत असे. धोरण समजावून सांगून दुसऱ्याकडून लेख लिहून घेण्यापेक्षां स्वतः लिहून टाकणे हेच अधिक सोईचे असते व मनासारखे होते. आणि अग्रलेख लिहिण्याचा मला इतका सराव झाला होता की वेळ पडल्यास केव्हाहि तो लिहिण्याचे सकट तर नव्हेच, पण श्रमहि

वाटत नसत. तात्पर्य, माझ्या संपादकीय व संचालकीय कामांत वास्तविक फारच थोडे अंतर असे. पण केसरीचा संपादक होणे हा कोणालाहि एक मोठा मान असल्यामुळे, तो आपल्या मृत्यूनंतरच केवळ क्रमप्राप्त म्हणून दुसऱ्याला मिळण्यापेक्षां स्वतः आपण होऊन तो दुसऱ्याला देणे यांत अधिक भलेपणा आहे अशी माझी समजूत असल्यामुळे, मी गेल्या आठ वर्षांत कारणपरत्वे तो मान अनेकांना दिला.

अग्रलेख लिहिण्याचे काम मी आपणाकडे ठेवले होते तेव्हाहि केसरी कमीत-कमी बारा पानांचा व पुष्कळदा सोळा पानांचा निघत असल्यामुळे इतर लेख लिहिणे, इतरांकडून बाहेरून आलेले लेख निवडून ठाकठीक करून देणे, स्फुटे व प्रासंगिक लेख लिहिणे, बातमीपत्रांची छाननी करणे, तात्पर्य अशा अनेक रीतींनी केसरीचा मजकूर तयार करून ठरीव जागेत बसविणे, हे काम मेहनतीचे असल्यामुळे त्याला एखाद्या दुसऱ्या सहसंपादकाचे उपसंपादकाचे सहाय्य घ्यावेच लागे. मग त्यालाच मुख्य संपादक केल्यास त्याच्यावर जबाबदारी अधिक पडेल, पण त्याबरो-बरच ते काम करण्याला त्याच्या मनाला हौसहि अधिक वाटेल, आणि सकारण प्रसिद्धीला येण्याला त्याला मदत होईल, असे माझे मत असल्यामुळे हाता-खालच्या लोकांपैकी त्यातल्या त्यात वडील व लायक पाहून त्यांना मी वेळोवेळी केसरीचे संपादक केले. जबाबदारी अंगावर पडल्यानेच मनुष्य कोणचेहि काम चांगले करण्यास शिकतो यांत शंकाच नाही. तसेच आपल्या श्रमाने झालेल्या कार्याचे श्रेय मुख्यतः आपणाला मिळावे ही आकांक्षा अगदी स्वाभाविक होय. आणि हे मनात ठेवून मी एरवीहि असे करीत असे की, एखाद्या मदतनीसाने विशेष परि-श्रम करून हौसेने लेख लिहिला असला व तो चांगला वठला असला, तर तो लेख त्याने आपल्या नावावर प्रसिद्ध करावा अशी त्याला परवानगी देत असे. इतकेच नव्हे तर तो तसा प्रसिद्ध करण्याला उत्तेजनहि देत असे. फक्त अग्रलेख मात्र पत्रकर्त्यांचा म्हणून निनांवी असावा हा संकेत मी सभाळीत असे.

असो. मी संचालक म्हणजे सर्वाधिकारी असल्यामुळे संपादक नसलो तरी केसरीत कोणत्या धोरणाने लेख लिहिले जावे याचे धोरण मला बहुधा संभाळता येत असे. आणि प्रत्यक्ष लिहिण्याचे माझे स्वतःचे श्रमहि वांचत. निदान इतर सर्व जुळवाजुळव करणे प्रूफे मुद्रित तपासणे यांचे श्रम तरी. मध्यं-तरी राजकारणाच्या वादविवादांत थोडी ढिलाई मधून मधून येई, त्यावेळी मी

अवांतर वाङ्मय प्रकार लिहिण्याकडे तो वेळ लावीत असे. उदाहरणार्थ, केसरीत कादंबरी प्रसिद्ध करावी की नाही हा एक प्रश्नच होता. कारण केसरीच्या वाचकवर्गात एका बाजूने नव्या मताची तरुण पिढी हळूहळू सामील होत जात असली तरी जुन्या परंपरेचा अभिमानी असाहि एक निश्चित वर्ग होताच. यामुळे केसरीत कादंबरी घालून एकाला खूष करावे तर दुसऱ्याला नाखूष करावे असा कार्याकार्यविरोध उत्पन्न होत असे वाटे. तथापि कादंबरी हा देखील निबंधाइतकाच वाङ्मयाचा उच्च व शिष्टसंमत प्रकार होऊ शकतो, आणि कादंबरीचा विषय भाषा व विचार एकदरीने केसरीच्या प्रतिष्ठित दर्जाला शोभेसे असतील तर, एखादी कादंबरीहि केसरीत घालण्यास हरकत नाही, निदान तो प्रयोग करून पहावा, अशा निश्चयाने मी ' नवलपूरचा संस्थानिक ' ही सत्ताविस प्रकरणाची कादंबरी दर आठवड्यास एक संपूर्ण प्रकरण या नियमाने १९३४ साली सहा महिने केसरीत छापली. माझ्या या कादंबरीचा विषय ललित म्हणण्यापेक्षा प्रासंगिक म्हणजे संस्थानी राजकारणाचा होता. आणि त्यात नायक नायिका व त्यांचे प्रेम-मीलन हे ललित वाङ्मयाचे एक अंग प्रकट झाले असले तरी, त्याच्या वर्णनांत मी अत्यंत सावधगिरी बाळगून शृंगारविषयक अनिष्ट असा एक शब्दहि येऊ दिला नाही. यामुळे संस्थानी राजकारणाची चर्चा व मनरंजन ही दोनहि बऱ्याच प्रमाणात साधली असे वाटते. असले नवे प्रयोग स्वतःच्या जबाबदारीवर मी यशस्वी केल्यास, माझ्या सहसंपादक उपसंपादक वर्गापैकी कोणास पुढे त्या दृष्टीने केसरीच्या चित्ताकर्षकत्वात स्वतःची भर घालावीशी वाटल्यास, त्याला मार्ग मोकळा व्हावा हा यात माझा हेतु होता. मात्र या खुल्या झालेल्या मार्गाचा उपयोग इतर कोणी अद्यापि फारसा करून घेतला नाही. कदाचित् पुढेमागे ते घडून येईल.

वयाने व नोकरीच्या नियमाने मी १९३२ सालीच केसरीच्या कार्यापासून निवृत्त होण्याला, अर्थात् माझी इच्छा असल्यास, पात्र झालो होतो. वय पुरे साठ वर्षे व नोकरीची वर्षे पुरी छत्तीस झाल्यावर मी निवृत्तिमार्गास लागणे स्वाभाविकच होते. पण अजून कॉंग्रेसने असहकारितेचा कौन्सिल बहिष्काराचा हट्ट न सोडल्यामुळे केसरीचे मुख्य कार्य शिल्लकच होते असे मला वाटे. आणि 'लोकशाही स्वराज्य पक्षाची स्थापना ' आणि ' कौन्सिल-बहिष्काराचा अंत ' या गेल्या दोन प्रकरणांवरून माझी व माझ्या लेखणीची गरज टिळक पक्षाला अजून पुष्कळच होती हे दिसून

आलेंच असेल.१९३५मध्ये कॉंग्रेसने कौन्सिलप्रवेश मान्य केला, तथापि अधिकार-ग्रहण म्हणजे प्रधानमंडळाची स्थापना करण्याविषयी अजून कॉंग्रेसने आपल्या भगतगणांना उघड निश्चित असा कौल दिला नव्हता. १९३६ साली तर कॉंग्रेसने निवडणुकी प्रत्यक्ष जिंकल्या तरी अधिकारग्रहणाविषयी तिने अनिश्चितपणा राखला होता. परंतु १९३७ च्या एप्रिलात ज्या दिवशी कॉंग्रेसचा कौन्सिल-प्रवेश सिद्ध झाला तोच दिवस माझ्या कार्यनिवृत्तीला सुमुहूर्त समजून मी प्रथम केसरीचे संचालकत्वहि सोडले आणि केसरी संस्थे-कडील नोकरी कायमची सोडणार म्हणून जाहीर केले. तथापि संस्थेच्या ट्रस्टी-चा अधिकार सोडण्याला ता. १ जून १९३७ ही तारीख मी ठरविली होती. यामुळे नव्या ट्रस्टीकडे लेखी राजीनामा पाठविण्यास ती तारीख यावी लागली. नव्या ट्रस्टींनी माझा राजीनामा मान्य करून प्रथम तीन महिने भरपगारी रजा नंतर पंधरा महिने निमपगारी रजा मंजूर केली, व ता. १ डिसेंबर १९३८ रोजी माझा व केसरीसंस्थेचा सर्व संबंध सुटल्यामुळे माझा प्रॉ. फंड व ग्रॅच्युइटी याची रक्कम मला द्यावी असा ठराव केला.

पण माझ्या सार्वजनिक कार्यांचा व्याप जितका पगारी तितका बिन पगारी, जितका केसरी-संस्थेत तितकाच त्या संस्थेबाहेर, असल्यामुळे हा इतर व्यापहि सोडल्याशिवाय खरी कार्य-निवृत्ति नाही, खरी विश्रांति नाही अशी वस्तुस्थिति असल्यामुळे हा इतर व्यापहि सोडून देण्याचे मी ठरविले. आणि शुक्रवार ता. २ एप्रिलच्या केसरीच्या अंकांत खालीलप्रमाणे एतद्विषयक 'आत्मनिवेदना'चे म्हणून दोन शब्द मी लिहिले :—

"केसरी-मराठा संस्था आणि व्यक्तिशः स्वतः मी यांचे अनेक ऋणानुबंधी आणि हितचिंतक यांना उद्देशून आज या खाली जे दोन शब्द लिहीत आहे त्या-कडे त्यांनी लक्ष देण्याची कृपा करावी अशी विनंति आहे.

"ता. १७ मार्च सन १८९६ रोजी मी पुण्यास येऊन केसरी-मराठा संस्थेत दाखल झालो. त्या माझ्या नोकरीला गेल्या ता. १७ मार्च १९३७ रोजी एके-चाळीस वर्षे पुरी झाली. माझ्या वयालाहि लवकरच पासष्ट वर्षे पुरी होत आहेत. माझी प्रकृति मूळची निरोगी व सुदृढ असल्यामुळे या एकेचाळीस वर्षांत मी केव्हां फारशी रजा घेतली नाही. परंतु आता मनाला व शरीराला विश्रांतीची अपेक्षा वाटू

लागली आहे. म्हणून ता. १ एप्रिल १९३७ पासून मी केसरी-मराठा संस्थेच्या नोकरीच्या सर्व कार्यातून बंधमुक्त होत आहे.

"केसरी-मराठा संस्थेची नोकरी सोडली तरी इतर अनेक संस्थांशी माझा संबंध आजवर निगडित असल्यामुळे, त्या संस्थांशी असणारा संबंधहि सोडल्याविना मला हवी तशी पूर्ण विश्रांति वा स्वतंत्रता मिळणे शक्य नाही. म्हणून तेहि करण्याचे मी ठरविले आहे. या संस्था आणि त्यांशी असणारा माझा संबंध दर्शविण्याकरिता या खाली ज्यांची यादी दिली आहे त्या संस्थांच्या कार्यापासूनहि ता. १ एप्रिल १९३७ पासून मी मनाने निवृत्त होत असून, त्या त्या संस्थांकडे मी आपला राजीनामा रीतसर पाठवीत आहे. आणि त्यांनी तो स्वीकारावा अशी माझी विनंति आहे :—

| | |
|---|---|
| १ पुणे सार्वजनिक सभा— | अध्यक्ष |
| २ गीता धर्ममंडळ— | ,, |
| ३ शुद्धि-प्रचार मंडळ— | ,, |
| ४ वक्तृत्वोत्तेजक सभा— | |
| ५ कॉमनवेल्थ विमा कंपनी— | ,, |
| ६ मर्चंटस् को. बँक— | ,, |
| ७ पैसाफंड मुख्य कमिटी— | ,, |
| ८ भारत इतिहास सं. मंडळ— | ,, |
| ९ महाराष्ट्र साहित्य परिषद— | ,, |
| १० मराठी ग्रंथसंग्रहालय— | ,, |
| ११ रायगड शिवाजी स्मारक मंडळ— | ,, |
| १२ देवधर स्मारक मंडळ— | ,, |
| १३ महाराष्ट्र शारदा मंदिर— | ,, |
| १४ भांडारकर इन्स्टिटयूट रे. कौन्सिल— | ,, |
| १५ वृत्तव्यवसाय मंडळ— | ,, |
| १६ देवगड एज्युकेशन बोर्ड— | ,, |
| १७ ग्राम प्राथमिक शिक्षण मंडळ— | ,, |
| १८ नाट्यसंशोधन मंडळ— | ,, |
| १९ डेक्कन जिमखाना— | उपाध्यक्ष |

| | |
|---|---|
| २० महाराष्ट्र व्यायाम मंडळ— | उपाध्यक्ष |
| २१ महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ— | ,, |
| २२ लोकमान्य पुण्यतिथि मंडळ— | ट्रस्टी |
| २३ महाराष्ट्र निवास कलकत्ता— | ,, |
| २४ गोपाळ गायन समाज— | ,, |
| २५ टिळक स्मारक ( खासगी ) ट्रस्ट— | ,, |
| २६ ताराचंद रामनाथ हॉस्पिटल— | ,, |
| २७ श्रीशिवाजी मंदिर ट्रस्ट— | ,, |
| २८ रे इंडस्ट्रियल म्यूझियम— | ,, |
| २९ होमरूल टिळक स्मारक संस्था— | चिटणीस |
| ३० लो. टिळक डायमंड ज्युबिली फंड— | व्य. म. सभासद |
| ३१ भोसले मिलिटरी स्कूल— | ,, |
| ३२ हिराबाग टाऊन हॉल कमिटी— | ,, |
| ३३ हिंदु लॉ रिसर्च सोसायटी— | ,, |
| ३४ वैदिक संशोधन मंडळ— | ,, |
| ३५ गोवर्धन मंडळ— | ,, |
| ३६ श्रद्धानंद स्मारक मंडळ दिल्ली— | ,, |
| ३७ डेक्कन एज्युकेशन सोसायटी— | ,, |
| ३८ बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट— | ,, |
| ३९ अनाथ बालिकाश्रम— | ,, |
| ४० डेक्कन कॉलेज पुनरुज्जीवन मंडळ— | ,, |
| ४१ अ. भा. हिंदु महासभा— | ,, |
| ४२ संस्थान प्रजा परिषद— | ,, |
| ४३ स्वदेशी प्रचारक संघ— | ,, |
| ४४ तळेगाव धर्मार्थ हॉस्पिटल— | ,, |
| ४५ किंग एडवर्ड मेमोरियल हॉल— | ,, |
| ४६ महाराष्ट्र चित्रकार मंडळ— | सल्लागार मंडळ |
| ४७ मिरज विमा कंपनी— | ,, |

वरील यादीतून विस्मरणाने एखाद्या संस्थेचा उल्लेख राहिलेला असल्यास

तिचाहि समावेश यातच होत आहे असे समजावे (आणि खरोखर आणखी पांच-सहा संस्थांची नांवे यातून सुटली असे माझ्या लक्षात मागाहून आलेहि.)

" वरील सर्व सस्थातील काम सारख्याच तोलाचे किंवा जिकीरीचे असते असे नाही. तथापि या सर्व सस्थाचे कार्य मला कर्तव्यतत्परतेने करावयाचे तर त्याकरिता विवक्षित दिवस व वेळ यांचे बंधन जवळ जवळ सर्व वर्षभर मधून मधून पडते. सभाच नसली तरी खासगी चर्चा, सल्लामसलत, चिठ्ठी-चपाटी, शिफारस-भलावणी ही कामे असतातच. मिळून कार्यांची भुणभुण मागे राहतेच. त्यामुळे जखडल्यासारखे वाटते. आपल्या वेळेवर आपली सत्ता रहात नाही. त्यांतूनहि कांही काही कार्यात, मला स्वतःला भांडणे करावयाची नसली तरी इतराची तोडावी लागतात त्याचा उपद्रव वाटतो. या अनेक संस्थांचे कार्य मी आजवर यथाशक्ति केले आहे, म्हणून यापुढे ते सोडण्याचे मनांत आणल्यास त्यांनी मला क्षमा करावी. हे विविध प्रकारचे कामकाज सोडून देण्यात माझा राग कोणावरहि नाही. लोभ मनाने पूर्ववत् कायमच राहील.

"अशा प्रकारच्या कामकाजाच्या बंधनामुळे मनाला जो खरा मोकळेपणा असा वाटत नाही तो मिळावा, अशी इच्छा आता फार जाणवू लागली आहे हे मी प्राजलपणे सांगतो. आणि येवढ्याचकरिता हे विविध प्रकारचे कार्य सोडून द्यावयाचा निश्चय मी केला आहे.

"केसरी-मराठा संस्थेसारख्या लो. टिळकाच्या संस्थेत अखंड एकेचाळीस वर्षे काम करण्यास मला मिळाले हे मी माझे विशेष सुदैव समजतो. त्याचप्रमाणे वर उल्लेखिलेल्या अनेक संस्थातून नित्यनैमित्तिक कार्य करण्याची संधि मिळाल्यामुळे मला सार्वजनिक जीवनाचे शिक्षण मिळाले, म्हणून ती संधि ज्यांनी मला दिली त्यांचेहि मनःपूर्वक आभार मानतो आणि त्या सर्वांची रजा घेतो.

"या एकेचाळीस वर्षांच्या सार्वजनिक कार्यांच्या अवधीत माझ्या हातून कोणाचे बरे झाले असेल तर कोणाचे केव्हा कांही वाईटहि झाले असेल. विशेषतः केसरीमराठा संस्थेतील संपादक व सचालक या नात्याने मला जसा अनेकांचा लोभ संपादिता आला, तसाच अनेकांचा रागहि मी मजवर ओढवून घेतला असेल हे उघड आहे. तथापि मी बुद्धिपुरःसर कोणाचे अहित केले असे मला वाटत नाही. तरी आता माझी विनंति हीच की, ज्यांचा मजवर लोभ असेल त्यांनी तो तसाच

ठेवावा; आणि ज्यांना मी कोणत्याहि कारणानें अप्रिय झालो असेल त्यानी माझ्या अपराधाकरितां मला क्षमा करावी.''

ता. १५ एप्रिल रोजी मी व माझे सहकारी ट्रस्टी धोंडोपंत विद्वांस यांनी केसरीत खालील पत्रक प्रसिद्ध केलेः—

''ता. १६ ऑगस्ट १९२० रोजी आम्हा दोघांची नेमणूक केसरी संस्थेचे ट्रस्टी म्हणून झाली. ते काम आम्ही आजवर यथाशक्ति केले. परंतु वयोमानामुळे ते काम यापुढे सोडावे अशी इच्छा झाल्यामुळे, आम्ही ता. १ जूनपासून हें काम सोडणार असून आम्हा दोघाच्या जागी नवीन तीन ट्रस्टींची नेमणूक करण्याचे ठरविले, व त्या आशयाचे रीतसर ट्रस्टडीड केले, आणि ते आज रोजी रजिस्टर कचेरीत नोंदविले.

आता आमची सप्रेम व सविनय विनति अशी आहे की, १ रा. जनार्दन सखाराम करंदीकर, २ रा लक्ष्मण बळवंत भोपटकर आणि ३ रा गजानन विश्वनाथ केतकर हे नवीन ट्रस्टी होणार असून, केसरी संस्थेच्या हितचिंतकानीं आजपर्यंत आमच्या कामी आम्हाला सहानुभूति दाखवून जसे सहाय्य केले तसेच ते यापुढे नवीन ट्रस्टीनाहि करावे ''

—नरसिंह चिंतामण केळकर
—धोंडो वासुदेव विद्वांस

असो. केसरी संस्थेचा ट्रस्टी व त्याच संस्थेचा पगारी नोकर अशी माझी सजोड नाती का व कशी होती याचे विवेचन या ग्रंथात पूर्वी एके ठिकाणी विषय-परत्वे मी केलेच आहे. म्हणून पगारी नोकरी व ट्रस्टीचा अधिकार ही दोनहि मी एकदम सोडली. धोंडोपंत यांनी फक्त ट्रस्टीची जागा सोडली. पण पगारी जागा सोडली नाही. कारण टिळकानी मृत्युपत्रात असे लिहूनच ठेवले होते की धोंडोपंत यांना पगारी मॅनेजर म्हणून त्यांच्या तहाहयात ठेवा. आता मीहि स्वतः ट्रस्टी असल्यामुळे मला झाले तरी पगारी नोकरीवरून कोण काढणार होते? तथापि मला इतर दृष्टीनेहि याकडे पाहावयाचे होते. माझ्या वयाला पासष्ट वर्षे झाली तरी वर्तमानपत्राच्या कामांत कोणाहि संपादक उपसंपादकाला हार न जाण्या-इतकी शरीराची ताकद व बुद्धीची तरतरी मजमध्ये गतवर्षी होती, इतकेच काय पण अजूनहि आहे असे मी म्हणू शकतो. तथापि संस्था या दृष्टीने केसरीने



१९३७ सालीं म्हैसूरकडील प्रवासांत मुंडाजे या गांवीं घेतलेलें छायाचित्र

( पृ. ८१६ )

नोकराला किती वयापर्यंत पगारी नोकरीत ठेवावे, किंवा त्याला ती जागा अडवू द्यावी, याला स्वाभाविक मर्यादा असलीच पाहिजे. आणि ट्रस्टी या नात्यानें मला स्वतःच हे उदाहरण घालून द्यावयाचे होते म्हणून आपण होऊन मी पगारी नोकरी सोडली. स्वार्थालाहि मर्यादा असावी, आणि ती देखील स्वतःच आपण आपल्या हाताने स्वतःला घालून घ्यावी हेच सर्वांत उत्तम. सरकारी नोकरीत मी असतो तर पंचावन वर्षें होताच मला पेन्शन घ्यावे लागले असतेच की नाहीं ? मग वयाच्या पासष्टाव्या वर्षापर्यंत पगार घेतला हे काय थोडे झाले ?

पण केसरीच्या संपादकाची पगारी नोकरी व ट्रस्टीची जागा यांच्या महत्त्वांत फरक आहे. आणि मी पगारी नोकरी सोडली हे ठीक केले असे वाटणाऱ्या कित्येकांना मी ट्रस्टीची जागा सोडली हे मात्र ठीक केले नाही असे वाटले. त्यांचे म्हणणे की इतर कोणाच्या हाती केसरी संस्था असण्यापेक्षां माझ्या हाती ती शक्य तितके अधिक दिवस असलेली बरी. पण माझे स्वतःचे मत तसे नव्हते. मला वाटे की आपण मेल्यावर हा अधिकार लोकांच्या हाती जाण्यापेक्षां, आपण होऊन आपल्या हयातीतच तो त्यांच्या स्वाधीन करून तो ते कसा चालवितात हे पाहण्याचे सुख भोगावे यांत भूषण आहे. लोक मला ट्रस्टीची जागा सोडू नका म्हणतात याचा अर्थ माझे या जागेचे पूर्वीचे काम चांगले झाले इतकी शाबासकी मला पुरे झाली. मी जागा न सोडणे याचा अर्थ, निदान ध्वनि, तिचे काम करणारा माझ्याइतका चांगला दुसरा कोणी निघणार नाही असा होत नाही काय ? पण मी इतका गर्व किंवा अहंकार कां वाहावा ? बरे ट्रस्टीची जागा सोडणे यांत स्वार्थत्यागापेक्षा एका दृष्टीने स्वार्थसाधनच अधिक होते. कारण त्या जागेच्या जबाबदारीतून मुक्त होणे हे एक प्रकारे स्वार्थसाधनच नव्हे काय ? आतां वयपरत्वे दगदग कमी झालेली बरी. ट्रस्टीच्या जागेवर राहून लोकांची बहाली बडतर्फी करण्याचा अधिकार भोगावयाचा यांत असे काय मोठे ऐश्वर्य आहे ? ट्रस्टीची जागा सोडल्यावर केसरी संस्थेसंबंधी निरुपाधिक प्रेम अनुभवावयास सांपडले तर तोहि चांगल्यापैकी प्रयोग होणार नाही काय ? माझ्या अधिकारत्यागाची वाट बघत केसरीचे कोणीहि लोक बसले नव्हते, मी तेथे कोणाच्या डोळ्यासमोर नको असे कोणासहि झाले नव्हते, हें खरें. पण असें असतां व अनेक लोक नको नको म्हणत असतां मी अधिकार सोडून दुसऱ्यांना संधि देणें, हें उभयपक्षीं भूषणास्पद असे मला वाटले. म्हणून मी ट्रस्टीचाहि अधिकार सोडला.

ता. ६ एप्रिल १९३७ च्या अकांत केसरीने मला निरोप देतांना खालील उद्गार काढले. ते माझ्याच मित्रानी किंवा हाताखालच्या लेखकानी काढले असले तरी ते केवळ औपचारिक किंवा तोंडदेखले होते असे मी मानीत नाही.

केसरी म्हणतो—" श्री. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांचे आत्मनिवेदन गेल्या अंकी प्रसिद्ध झाले ते सर्वांनी वाचलेच असेल. श्री. केळकर याच वेळी सार्वजनिक कार्यांतून निवृत्त होतील ही गोष्ट कोणाच्या ध्यानीमनीहि नसल्यामुळे ती वाचताच त्याजवर लोभ करणाऱ्या लक्षावधि महाराष्ट्रीयाच्या जिवास चुटपुट लागावी यात नवल नाही. श्री. केळकरांचा सार्वजनिक संसार एकेचाळीस वर्षांचा आहे. हा संसार आटोपताना त्यांच्या अंतःकरणास खेद न होता ते एक प्रकारे आतुर झाले आहेत, यावरून पूर्ण विश्रांति घेण्याची त्याना किती आवश्यकता वाटत आहे याची कल्पना येते स. १८९६ साली केळकर सार्वजनिक कार्य करण्याच्या अनिवार हौसेने पुण्यात आले. त्याना स्थान मिळाले केसरी मराठा संस्थेत व लो. टिळकाच्या छत्राखाली. टिळक ही त्या काळी महाराष्ट्रातील वाढती शक्ति असून तिच्यांतून अनेक चळवळी उगम पावत होत्या व तिजकडे अनेक चळवळी जीवनार्थ धाव घेत होत्या. अशा केंद्रस्थानी तात्यासाहेब हे आपल्या भरज्वानीत चड्डी-कांचा भिडवून आखाड्यात उतरणाऱ्या मल्लाप्रमाणे दंड थोपटत आले त्याना सार्वजनिक कार्याचा हव्यास होता. आणि बुद्धिमत्तेचे अधिष्ठान व कर्तृत्वाचे आदिपीठ असे पुणे शहर त्याच्या पुढे काम वाढून ठेवण्यास सिद्ध होते. किंबहुना काम देण्यात व काम करण्यात या उभयतांची पैज लागली असून कोण कोणास हटवितो याविषयी ते परस्परांची परीक्षाच पहात होते.

लोकसेवेची विविध उपाधि मागे लावून घेणाराच्या अंगी थोडेथोडके गुण असून भागत नाही. किंबहुना गुणांचा गोडवेपणा जितका अधिक तितके चिकटणारे मुंगळेहि अधिक. उद्योगशीलता, कर्तव्यतत्परता, निरलसता, प्रसन्नता, सहनशीलता, सौजन्य, औदार्य, निरपेक्षपणा, सरलत्व व आस्था इत्यादि गुण तात्यासाहेबांच्या ठिकाणी इतक्या उत्कटत्वाने वसत आहेत की, लहानापासून थोरापर्यंत प्रत्येकाला त्याना तसदी देण्याला संकोच वाटू नये. ईश्वराने त्यांस शरीरसामर्थ्य व बुद्धि याची देणगी सढळ हाताने बहाल केली असल्यामुळे लोकसेवेत पडणारे कष्ट त्यांनी खुषीने सोसले आहेत व बुद्धिवैभव जेथे तेथे प्रकट केले आहे.

इंग्रजी व मराठी वृत्तपत्रव्यवसायाने त्याच्या बुद्धीस ऐन विकासाच्या काळात योग्य ती तालीम दिली. वृत्तपत्रसंपादक व्यासंगी असेल तर त्याच्याशी लढत करण्याला नित्य नवे विषय समोर उभे रहातात. तशातून त्याचा दम तितक्यात उखडण्याजोगा नसेल तर तो स्वतःच नवे विषय अभ्यासाकरितां उकरून काढतो. तात्यासाहेब या कोटींतील असल्यामुळे त्यांनी ज्यावर लिहिले नाही असा एखादा विषय गेल्या चाळीस वर्षांत उरला आहे की नाही हाहि विषय संशोधन करण्याजोगाच आहे. यातील काही विषय त्यांनी आवडीने अभ्यासिले असतील, काही विषयाच्या अभ्यासाची त्याजवर सक्ति झाली असेल, व कांही विषयावर केवळ जिज्ञासेची खुमखुमी म्हणून त्यांनी सक्ति केली असेल. ते काहीहि असले तरी याचा परिणाम असा घडून आला की, हरएक सार्वजनिक कार्यांत भाग घेण्याचा अधिकार त्यांना प्राप्त झाला.

तात्यासाहेब हाडाने खरे साहित्यप्रेमी व कलावान आहेत. त्यांची बुद्धि साहित्य, संगीत, ललितकला व इतिहास यांत रमणारी आहे. लेखक या नात्याने जगाच्या पुढे ते नाटक, इतिहास, चरित्र लिहूनच आले. पण वृत्तपत्रीय व्यासंगाने जो जो त्यांची बुद्धि विकसित होऊं लागली तो तो त्यांनी अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, राजशासनशास्त्र यांचाहि व्यासंग वाढवून त्याजवर ग्रंथरचनाहि केली. गेल्या अंकांत त्यांनी सत्तेचाळीस संस्थांचा राजीनामा देण्याचा संकल्प जाहीर केला आहे. त्यांतील काही संस्था अशा आहेत की, त्यांच्याकडे संपादकीय व्यवसायात तात्यासाहेब नसते तर त्यांनी त्याजकडे कदाचित् ढुंकूनहि पाहिले नसते. परंतु या व्यवसायात बुद्धीचे पोषण सर्वांगानी झाल्यामुळे ते त्यांचा कारभार लीलेने पण अधिकारयुक्ततेने करीत आले आहेत.

त्यांच्या बुद्धिसामर्थ्याला शरीरसामर्थ्याची उत्कृष्ट जोड मिळाली असल्याचे वर सांगितलेच आहे. त्या योगाने त्यांचे बुद्धिवैभव शतपटीनी कार्यक्षम बनले. आधुनिक सुशिक्षित वर्गांत शरीरसामर्थ्याची बहुमोल देणगी निदान महाराष्ट्रांत तरी फार थोड्याच्याच वाट्यास येते. त्यामुळे कित्येक हिरे मातीमोल ठरून अंधारांत पडतात. पण तात्यासाहेब या बाबतीत दैववान होत. संपादक, सार्वजनिक कार्यकर्ता, व पुढारी या त्रिविध नात्यानी त्यांना जी जी संधि लाभली तिचा भरपूर फायदा घेण्यास व त्यांच्या अनंत मुळ्यांमार्फत मिळणारा जीवनरस बुद्धीला मिळू देण्यास ते यामुळेच समर्थ झाले. जहाल व मवाळ, सनातनी व सुधारक, नव-

मतवादी व पुराणमतवादी, कवि व तत्त्ववेत्ते, नाटककार व इतिहासकार, भाविक व टीकाकार अशा परस्परविरुद्ध दुकलीशी त्याचा सबध अनायासे आला असतां त्यांपैकी कोणासहि नाराज न करता ते वागले व वागतात, याला कारण त्यांची सहृदयता व सहानुभूति हे गुण होत. अशाच्या विचारसरणीतील तत्त्व ते ग्रहण करून त्यांजवर ते छापहि ठेवू शकतात याचे इंगित त्याच्या या विशिष्ट गुणांतच सांपडते.

हल्लीच्या काळांत दोन पिढ्यांमधील अतर बारापधरा वर्षांचे धरल्यास तात्यासाहेबानी गेल्या एकेचाळीस वर्षांत तीनचार पिढ्या सहज पाहिल्या. विचार, आवडी, प्रवृत्ति व समजुती यांत दोन पिढ्यामध्ये किती अतर पडते याचा अनुभव ज्याला त्याला पदोपदी येतच आहे. तात्यासाहेबाच्या देखत आतापर्यंत तीनचार पिढया झाल्या असे मानल्यास ते एकेचाळीस वर्षांपूर्वी पुण्यात आले त्या वेळच्या पिढीत व चालू पिढीत जमीनअस्मानाचे अतर पडले आहे हे उघड आहे. तरी ते तरुणाना हवेसे वाटतात, तरुण त्याच्या सहवासात रगतात, व उलटपक्षी तात्यासाहेबहि तरुणाच्या सहवासात रंगतात, याचा उलगडा सहृदयता सहानुभूति या गुणांचा हवाला दिल्यावाचून होणार नाही. पुण्यास गेली एकेचाळीस वर्षे ते आहेत. या दीर्घ कालांत त्यानी किती तरी सस्था स्थापल्या व कित्येक वाढीस लावल्या. पुणे म्युनिसिपालिटीत सामान्य सभासदापासून तो अध्यक्षापर्यंतची कामे पुष्कळ वर्षे केल्याने ते आबालवृद्धांच्या परिचयाचे झाले आहेत. त्यात अनेक सभा समेलने उत्सव यांची प्रसंगाप्रसगांनी भर पडल्यामुळे त्याची ओळख नाही, किंवा त्याचे नांव माहीत नाही असा एकहि जाणता माणूस पुण्यास सांपडणार नाही; अथवा ते पुणेकरांना घरच्या वडील माणसाप्रमाणे वाटू लागले आहेत याचे कारण त्यांनी असंख्य लोकांवर विविध रूपानी केलेले उपकार होत. त्याची ही लोकप्रियता पुण्यात किती खोलपर्यंत पोहोचली आहे, व त्यांनी सहस्रावधि लोकाना परोपकारांनी कसे ऋणी करून ठेवले आहे, याचे उत्कृष्ट प्रत्यतर पाच वर्षांपूर्वी त्याचा एकसष्टावा वाढदिवस पुण्यात एक महिनाभर सारखा गाजत साजरा होत होता यावरून आलेच आहे.

सर्व जातीत व सर्व पक्षांत ते प्रिय व आदरणीय झाले आहेत हा त्यांचा विशेष होय. ही हातोटी महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांत फारच थोड्यांना साधली आहे. तिचे बीज शोधणे अतिशय बोधप्रद ठरेल. जात्यभिमानातीत व निरपेक्ष लोकसेवा

याच गुणात ते बीज सांपडेल. कार्यकर्त्यांनी त्यांचे हे गुण उचलल्यास सार्वजनिक कामातील व आयुष्यक्रमातील किती तरी भाडणे वांचून त्यास निकोप व निरोगी स्वरूप प्राप्त होईल. ते स्वभावतः प्रगतिप्रिय आहेत, मग ती प्रगति सामाजिक असो, धार्मिक असो, औद्योगिक की साहित्यिक असो. यामुळे त्या त्या पथातील कार्यकर्त्यांस ते पसत पडतात. अस्पृश्यतानिवारण, पुनर्विवाह, जातिभेद यासबंधीची त्यांची मते सुपरिचित आहेत व ती सनातनी लोकाना तितकीशी पसत पडणारीहि नाहीत. तरीसुद्धा ते सनातन्यांच्या तीव्र रोषाला पात्र झाले नाहीत, याचे कारण त्यांच्या ठिकाणी ब्राह्मण्याचा, हिंदुत्वाचा, व संस्कृतीचा अभिमान विवक्षित प्रमाणात जागृत आहे हेच होय.

महाराष्ट्रातील सर्व चळवळींना ते सारखाच पाठिंबा देत व जीवनरस पाजीत आले आहेत. राजकारणावर सर्व भर पडल्याने महाराष्ट्राच्या राष्ट्रीय जीवनास एकांगीपणा येणे हे एके काळी अपरिहार्य होते असे क्षणभर मानले तरी महाराष्ट्रासारख्या औद्योगिक व आर्थिक क्षेत्रात इतरांच्या मानाने अत्यंत मागासलेल्या प्रांताला इतर अंगाची उपेक्षा करणे धोक्याचे होय याची जाणीव तात्यासाहेबांना होती. यामुळे त्यांनी आपले लक्ष तिकडे वळवून ती बाजू चांगलीच सावरून घेतली. पुण्यातील सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक स्थापण्यांत व ऊर्जित दशेला आणण्यात त्यांचेच बौद्धिक श्रम कारणीभूत झाले आहेत. वेस्टर्न इंडिया लाइफ इन्शुअरन्स कंपनीच्या मागून कॉमनवेल्थ विमा कंपनी पुण्यास निघण्याचे श्रेय पुष्कळ अशी त्यांनाच द्यावे लागेल. महाराष्ट्र शुगर सिंडिकेटला त्यांनीच उचलून धरले. महाराष्ट्रात तरी निदान राजकारणात पुढाकार घेतलेल्या पुरुषांनी औद्योगिक क्षेत्राकडे इतके लक्ष पुरविल्याचे उदाहरण दुसरे सापडणार नाही.

साहित्य हा त्यांचा आत्मा आहे. ते नुसते साहित्यिक नसून विद्वान ग्रंथकार आहेत. त्यांची विद्वत्ताहि एकांगी नसून सर्वांगीण आहे. सार्वजनिक आयुष्यक्रमातील असंख्य व्याप मागे लागले असतांहि वेळांत वेळ काढून त्यांचें प्रचलित विषयाबाहेरील वाचन, चिंतन, व लेखन यापैकी काही ना काही नित्य चालू असते. किंबहुना त्यांचा तो जीवनाधार किंवा स्फूर्तिस्थानच आहे. त्यांतून जे किरण त्यांस मिळतात त्यावर त्यांचा नित्यक्रम प्रकाशमान होतो. राजकीय जीवित हे रुक्ष व खडकाळ वाटेवरून आदळत आपटत जाणाऱ्या खटाऱ्यासारखे

समजण्यास हरकत नाही. या प्रकारचा जीवनक्रम त्यांनीं चाळीस–एकेचाळीस वर्षें सतत चालविला आहे. तो उत्साहाने व प्रसन्न चित्ताने पार पाडण्यास साहित्यसेवा व ज्ञानलालसा यांतून मिळणाऱ्या शीतल तुषारांनीच त्यांस सामर्थ्यवान केले आहे. इतर असख्य अवधाने सभाळून त्यानी साहित्य क्षेत्रात व विद्वत्तेत संपादलेले स्थान स्पृहणीय नाही असे कोण म्हणेल ?

"तात्यासाहेबांनी मिळविलेल्या विशिष्ट प्रकारच्या पात्रतेमुळे त्यांना किती उपाधि सतत सोसाव्या लागत याचे प्रत्यतर त्याच्या खासगी भेटीसाठी घरी जाणारास सहज येते. सकाळी उठल्यापासून रात्री निजेपर्यंत त्यांची सल्लामसलत घेऊं इच्छिणारांची जा-ये एकसारखी सुरू असते. भेटीस आलेल्याना सल्ला देत असताच ते आपली इतर मानसिक अवधाने चालू ठेवतात. शहरात ठिकठिकाणी त्यांनी जे कार्यक्रम आखलेले असतात ते उरकण्यासाठी अनेक योजना त्याच्या डोक्यांत घालमेल करीत असताना पाहून कल्पक मनुष्यास मोठ्या थोरल्या बोरीबंदरासारख्या रेल्वे स्टेशनाची आठवण झाल्याशिवाय राहणार नाही. त्या स्टेशनावर बाहेरून दूरदूरच्या गाड्या येत असल्या तरी तेथून रवाना व्हावयाच्या गाड्याचे शंटिंग सुरू असते, व प्लॅटफॉर्मच्या निरनिराळ्या भागात गाड्याच्या जोडलेल्या माळा एंजिनाची वाट पाहत असतात. तात्यासाहेबांच्या मनःस्थितीच शेजारी बसून निरीक्षण करणाराच्या मनश्चक्षूपुढे हेच दृश्य उभे राहते.

सार्वजनिक कार्याची योग्यता मनुष्य कितीहि जाणत असला तरी वयोमानाप्रमाणे त्याचे शरीर थकावयाचे व मनालाहि या उपाधीचा त्रास सहन न होऊन तें विश्रांतीसाठी उत्सुक व्हावयाचेच. ही अवस्था गेली पांचसहा वर्षें तात्यासाहेबांवर चालून येत असून, आतां त्यांचे तिजपुढे चालेनासे झाल्यामुळेच त्यानी सर्व सार्वजनिक संस्थांचा निरोप घेण्याचे ठरविले आहे यात शंका नाही. त्यांना हवी असणारी विश्रांति सर्वांनी त्यास सुखाने उपभोगू द्यावी. ते आतां कृतकार्य झाले आहेत, व कृतकृत्यतेचा मनास वाटणारा सात्विक आनंद चाखण्याचे भाग्य फार थोड्यांच्या वांट्यास येत असल्यामुळे ते भाग्य अनुभवण्यास त्यांना ईश्वराने उदंड आयुष्य द्यावे असे आम्ही इच्छितो. पुण्याच्या व महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत तात्यासाहेबांच्या कर्मसंन्यासाने प्रचंड खिंड पडून ते जीवन ओके व नीरस दिसेल, पण त्यास इलाज काय ?"

केसरीचा अहेर घरचा म्हणून त्याचा मान पहिला. पण केसरीचे हे लिहिणे मला औपचारिक न वाटण्याचे एक कारण असे की, सर्व महाराष्ट्रभर माझ्या व्यवसाय बंधूपैकी शेकडा नव्वदांनी तरी अशाच अर्थाचे उद्गार माझ्या कार्यनिवृत्तीला उद्देशून काढलेले आढळले. या व्यवसायबंधूत केवळ माझ्या मताचे व पक्षाचेच नव्हेत तर माझ्या प्रतिपक्षातीलहि काही वृतपत्रकर्ते आहेत. मला मिळालेली प्रशस्तिपत्रें अनाहूत अशीच आहेत. माझे सार्वजनिक कार्य सुरू असता यांपैकी अनेकाशीं अनेक वेळा माझा मतभेद झालेला आहे. माझे धोरण पसंत न पडल्यामुळें त्यांतल्या कांहीनी मजवर सडकून टीका केली आहे. काहीनी आपल्या स्वभावाप्रमाणे किवा आखून घेतलेल्या धोरणानुसार माझी टवाळी कुचाळी करून दुरुत्तरेंहि दिली असतील. मी जन्मांत लोकांकडून काही थोडथोडकी निंदा सोसली नाही. अर्थात् उलटपक्षी मी वादभूमीतून निघून जाण्याच्या वेळी कोणी जर मजविषयी बरे उद्गार काढले तर त्याचे भूषण मी कां मानू नये ? ज्याने विषाचे घोटावर घोट घेतले त्याला शेवटी तरी अमृताचा घोट आपण होऊन पुढे आल्यास तो घेण्याचा हक्कच आहे. त्याचा अव्हेर करण्याइतका मी फाजील विनयी किंवा साधु पुरुष नाही. निंदेच्या दृष्टीने निंदेला जशी किंमत आहे तशी, किंबहुना त्यामुळे, स्तुतीलाहि आहे असेच मी मानतो. स्तुति ही निंदेची प्रतियोगिनीच होय. मी विकाररहित जीवन्मुक्त नाही. प्रतिकूल लोकमताचे दुःख व अनुकूल लोकमताचे सुख मानणारा असा व्यवहारी मनुष्य मी आहे. आणि उलट प्रकारचा बहाणा करीन तर निवळ ढोंगी ठरेन. असो. वरील प्रमाणे पूर्ण विवेक करूनच मी खालील उतारे देत आहे :—

**दैनिक त्रिकाळ ( पुणें )** ता. ४।४।३७—श्री. केळकर यांची आजवर झालेली साहित्यविषयक कामगिरीदेखील इतकी थोर आहे की, सामान्यतः कोणचाहि विषय मनांत योजून त्यासंबधी विचारपूर्वक लिहिणाऱ्या माणसाला अखेरीस असेच कबूल करावे लागते की, यातला बराचसा भाग श्री. केळकर यांनी पूर्वीच लोकांपुढे मांडलेला आहे. श्री. केळकर यानी मराठीची भाषाशैली तर इतकी संपन्न बनवून ठेवलेली आहे की, मराठी भाषा हस्तगत करूं पाहणाऱ्या प्रत्येक इसमाला केळकराच्या लेखाची पारायणे करणे भाग आहे. आजवरच्या या बहुमोल साहित्यविषयक कामगिरीत श्री. केळकर हे यापुढील काळांत कांही तरी अभिनव अशी भर टाकतील यांत आम्हाला मुळींच संशय वाटत

नाही. कारण श्री. केळकर यांना वयोमानामुळे शारीरिक क्षीणता आलेली असली तरी त्यांची बुद्धि नवे नवे प्रांत आक्रमण करण्याच्या कामी अजूनहि कार्यक्षम आहे.

**विविधवृत्त ( मुंबई )** ता. ४।४।३७—टिळकाच्या कारावासात त्यांच्या केसरी व मराठा या दोन्ही सस्था सुरक्षित ठेवून लोकजागृतीचे व प्रचाराचे कार्य त्यानी एवढ्या कार्यक्षम रीतीने पार पाडले की, टिळकानीहि त्याना त्याबद्दल धन्यवाद दिले केळकरांच्या लेखणीचे सव्यसाचित्व व त्यांची सल्लामसलत याचा बहुमोल उपयोग केसरी सस्थेला व टिळकाना झाला, आणि त्यामुळेच कै. टिळ-काच्या मागून टिळकाच्या राजकीय पीठाचे अधिपति या नात्याने त्याचे नेतृत्व महाराष्ट्रीय टिळक पक्षीयानी बिनतक्रार मान्य केले. तथापि व्यक्ति या नात्याने जे स्वभावगुण गौरवास्पद ठरतात तेच गुण राजकारणासारख्या धकाधकीच्या मामल्यांत कमकुवतपणाचा दोष उत्पन्न करण्यास कारणभूत होत असल्यामुळे, केळकरांच्या राजकारणाला त्याच्या सौजन्यामुळे कणखरपणा चढला नाही. टिळकाच्या निधनानंतर महाराष्ट्राच्या राजकारणातील बुद्धिप्राधान्याचा लौकिक व परंपरा कायम ठेवण्यासाठी सतत केलेला झगडा असेच स्वरूप या राजकारणाला आले. हा झगडा केळकर निकराने झगडले व या झगड्यात त्यानी आपले स्वत्व कायम ठेविले. लोक-विग्रह होऊं नये म्हणून बदलल्या राजकारणाशी मिळते घेण्याचा प्रयत्न त्यानी केला. पण या राजकारणाशी ते कधीहि एकरूपता पावले नाहीत. आणि प्रसग आला त्या त्या वेळी उसळी मारून त्यानी हिंदी राजकारणातील बुवाशाहीला सणसणीत थपडा लगाविल्या. परिस्थिति निर्माण करणे व परिस्थितीशी झुंज खेळणे यापैकी कोणत्या तरी एका कार्याचे वाण सार्वजनिक कार्यकर्त्यांना स्वीका-रावे लागते. केळकरांच्या वाट्याला दुसऱ्या प्रकारचे वाण आले व त्यासाठी त्यांना निंदा, क्लेश, मनस्ताप या गोष्टी सहन कराव्या लागल्या.

**कुलाबा-समाचार ( पेण )** ता. ३।४।३७—सर्व प्रकारच्या सार्वजनिक कार्यांतून याप्रमाणे निवृत्त झाल्याची जी घोषणा तात्यासाहेबांनी केली आहे, ती ऐकून केवळ महाराष्ट्रीयांसच नव्हे तर इतर प्रांतांतील लोकांसहि वाईट वाटल्या खेरीज राहणार नाही. मनाला खरा मोकळेपणा मिळावा व शरीरालाहि विश्रांति लाभावी एवढ्यासाठीच श्री. तात्यासाहेब हे सार्वजनिक कार्यांतून निवृत्त होत आहेत असें 'केसरी'तील त्यांच्या आत्मनिवेदनाच्या दोन शब्दांवरून दिसते.

तात्यासाहेबांच्या या सार्वजनिक कार्यनिवृत्तीमुळे महाराष्ट्राचे पुष्कळच नुकसान होणार आहे. परंतु नाइलाज म्हणून ते सहन करण्याखेरीज गत्यंतर नाही.

**राष्ट्रमत ( पुणें )** ता. ४।४।३७—एकेचाळीस वर्षेपर्यंत लोकसेवेचें अखंड व्रत आचरल्यावर महाराष्ट्राचे पुढारी श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं सेवानिवृत्त होण्याचे ठरविले याबद्दल त्यांना कोणी दोष देणार नाही. आजमितीस ते वेगवेगळ्या अठरा सस्थाचे अध्यक्ष आहेत व इतर कित्येक सस्थांशी त्यांचा कमीअधिक प्रमाणांत सबध आहे. शिवाय केसरी व मराठा पत्राचे संचालक म्हणून त्यांच्यावर महत्त्वाची जबाबदारी आहे ती वेगळीच. हे सर्व सांभाळून अवांतर लेखनाचा व वाचनाचा त्यांचा जो व्यासग चालू असतो तो लक्षांत घेतला म्हणजे या थोर पुरुषाच्या बहुविध व्यवसायांची व अचाट बुद्धिवैभवाची कल्पना येते. वयाला जवळ जवळ पासष्ट वर्षे पुरी झाली असता इतक्या जबाबदाऱ्या बिन-बोभाटपणे साभाळणे ही असामान्य गोष्ट होय. कै. महादेव गोविद रानड्याच्या नंतर तात्यासाहेबाच्या इतक्या विविध व्यासगाची व विशाल बुद्धीची व्यक्ति महाराष्ट्रांतच काय पण सबध हिदुस्थानांतहि झाली नाही असे म्हटले तर अतिशयोक्ति होणार नाही.

**ज्ञानप्रकाश ( पुणें )** ता. ३।४।३७—श्री. तात्यासाहेब केळकर यांचा सार्वजनिक कार्यकर्ते या नात्याने महाराष्ट्रातील विविध स्वरूपाच्या किती सस्थांशी निकट सबध आलेला होता, याचे प्रात्यक्षिक सुमारे पाच वर्षांपूर्वी श्री. तात्या-साहेबांच्या षष्ट्यब्दिपूर्तीचा जो अपूर्व सोहळा या पुण्यनगरीत झाला त्या वेळीं जनतेला पहावयास मिळालेले आहे व त्याची स्मृति लोकांना अद्यापिहि आहे. गेल्या पाच वर्षांत श्री. तात्यासाहेबांच्या मार्गदर्शकत्वाखाली व सल्लामसलतीनें आपला सार्वजनिक प्रपंच चालविणाऱ्या संस्थांची संख्या कमी तर झालेली नाहीच, पण ती बऱ्याच प्रमाणात वाढलेली आहे असे म्हटले तरी चालेल. श्री. तात्यासाहेब ह्यांनी सबध ठेविलेल्या अनेक संस्थांवर त्यांचे अपत्यसदृश प्रेम असणे स्वाभाविक आहे. पण वृद्धापकाळी संततिप्रेमाचेहि नियमन करण्याची पाळी मनुष्यावर येते, व पारमार्थिक मनःस्वास्थ्यासाठी तशा नियमनाची जरूरीहि असते. आणि म्हणूनच पुष्कळ लोक त्या दशेत चतुर्थाश्रमाचा किंवा संन्यासाचा मार्ग पत्करतात. श्री. तात्यासाहेब केळकर यांनी काल परवापासून जी संस्था-

सबंधनियमनाची, किंवा एका अर्थाने राजसन्यासाचीच म्हणा ना, जी घोषणा केली आहे, ती त्यांच्या शारीरिक व मानसिक स्वास्थ्याला सहाय्यक होवो अशी कोणीहि याप्रसगी सदिच्छा व्यक्त करील.

**स्वराज्य (मुंबई)** ता. ४।४।३७—श्री. तात्यासाहेब केळकर ही एक व्यक्ति नसून चालती बोलती सस्थाच आहे. पुण्यातील सुमारे पन्नासापेक्षां जास्त संस्थांशी त्यांचा आतापर्यंतच्या सार्वजनिक आयुष्यक्रमात सबंध आला आहे. पुण्याच्या सार्वजनिक सभेचे तात्यासाहेब हे केवळ प्राण आहेत. अशा सस्थांची तात्यासाहेबांच्या या निश्चयामुळे फार हानि होणार आहे. राजकारणांत तात्यासाहेब व्यावहारिक व भावनात्मक दृष्टीचा मिलाफ करण्याचा प्रयत्न करू लागल्यामुळे कीर्तियशोमंदिराच्या शिखरावर ते पोहोचू शकले नाहीत हा त्याचा दोष नव्हे. सुवर्ण-मध्याच्या पायी त्यास बराच त्रास सहन करावा लागला व राजकीय क्षेत्रांत त्यांचा बराच कोंडमारा झाला. यामुळेच त्यांस कॉंग्रेसचा अध्यक्ष होण्याचा मान मिळाला नाही. परंतु कॉंग्रेसमधील मानाच्या जागेचा लोभ न धरता अगर पुढाऱ्यांच्या रागालोभाची पर्वा न करतां, त्यानी राजकीय मते वेळोवेळी निःस्पृहपणे माडली. आणि महाराष्ट्रात टिळकांच्या मृत्यूनतर दुफळी माजली नसती तर हिंदुस्थानच्या राजकारणास तात्यासाहेबांनी दुसरी दिशा दाखविली असती पण भाऊबंदकीत सांपडून ते अयशस्वी ठरले. तरी पण 'केसरी' द्वारा कौन्सिलप्रवेशाचा कार्यक्रम लोकांवर ठसवून कॉंग्रेसलाहि तो कार्यक्रम अखेर मान्य करावा लागला हे ध्यानांत घेण्यासारखे आहे.

**टाइम्स (मुंबई)**—सार्वजनिक कार्यांच्या क्षेत्रांतून निवृत्त होण्याचा श्री. न. चिं. केळकर यांचा निश्चय खेदजनक आहे. टिळकाच्या वेळेपासून सार्वजनिक व राजकीय जीवनात केळकराच्याइतकी कीर्ति दुसऱ्या कोणीहि मिळविली नाही. त्यांची लोकसेवा इतकी सर्वश्रुत आहे की, तिजविषयी जास्त लिहावयास नकोच. कायदेमडळाकडे कॉंग्रेस वळली ही गोष्ट त्यास खास समाधानकारक वाटत असली पाहिजे. खरोखर काही महिन्यांपूर्वीच कॉंग्रेसने हा निश्चय स्पष्ट केला असता व अधिकारग्रहण करणार असे जाहीर केले असतें, तर बहुशः केळकरांनी लोकशाही स्वराज्य पक्षाचा एवढा प्रचार करण्याचेहि टाळले असते.

**डॉन ( मुंबई )**—श्री. केळकराचा सबध निरनिराळ्या पन्नास सार्वजनिक संस्थांशी आलेला आहे. परतु विवादपटु राजकारणी व चमकदार मराठी वृत्तपत्र-कार या नात्यानेच त्याची कीर्ति अधिक आहे त्यानी दुसऱ्यास टीकेचे असंख्य टोले लगावले व दुसऱ्याकडून स्वतःस आलेले सोसले. तथापि त्याच्या बरोबरीच्या सहकाऱ्यांपेक्षा त्यांनीच अधिक विजयचिन्हे सपादन केली. केसरी, मराठा पत्रे या पदवीस त्यानीच आणली. हिंदी वृत्तपत्राच्या इतिहासांत त्याच्या नांवानें बरीच जागा निःसशय व्यापली आहे. त्याच्या लेखणीचा सचार विनोदी विषयांत असतो तसा गभीर वाङ्मयातहि असतो. त्यांची लेखननिर्मिति चाल-चलाऊ विषयापासून शाश्वत विषयापर्यंत पसरलेली आहे. विवादप्रसंगीचे त्यांचे कांही वाङ्मय वाचतांना तर त्याच्या उपरोधिक टीकापद्धतीने अठराव्या शतकां-तील अभिजात इंग्लिश वाङ्मयाची व विशेषतः डीन स्विफ्ट याच्या वाङ्मयाची आठवण होते. विद्याव्यासगी व अनुभवी राजकारणी अशा गृहस्थास अवश्य अशी शातिपूर्ण विश्राति ते आता घेणार आहेत व या प्रसंगी त्यांचे मित्र व शत्रु दोघेहि त्याच्याविषयी सद्भावना प्रकट करतील यात सशय नाही.

**परीक्षक ( बेळगांव )** ता. ८।४।३७—केळकर म्हणजे केसरी आणि केसरी म्हणजे केळकर असेच सर्वत्र मानले जाते. लोकमान्यांच्या निधना-नंतर केळकराचे मत म्हणजे महाराष्ट्राचे मत असेच मानले जाऊ लागलें. यशापयशाच्या मापाने कोणाचीहि योग्यता ठरविणे चूकच होय. मनुष्याच्या हातात एकच गोष्ट आहे. ती म्हणजे प्रामाणिक वागणूक, प्रामाणिक विचार, आचार आणि उपदेश. केळकराच्या सार्वजनिक जीवनाचे तात्पर्य या गोष्टींत आहे असे आम्हास वाटते.

**दीनबंधु ( पुणें )** ता. ९।४।३७—महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्याशी ज्यांचे जीवन गेली एकेचाळीस वर्षे इतके निगडित झाले होते त्या विभूतीने एका-एकी असा कार्यसंन्यास घेतलेला पाहून जनतेस वाईट वाटेल यांत शंका नाहीं.

**प्रबोध ( धुळें )** ११।४।३७—केसरीचे संपादक, सुप्रसिद्ध साहित्तिक आणि कलावत, राजकारणी पुढारी इत्यादि अनेक नात्यांनी महाराष्ट्रात त्यांचा दर्जा सर्वश्रेष्ठ असून त्यांची रिकामी होत असलेली जागा लवकर भरून निघण्याची आशा दिसत नाहीं. लो. टिळकांचे उजवे हात मानले जात असतांहि ' प्राग-

तिकां 'ना ते त्या काळांतहि जवळचेच वाटावे हे त्यांच्या गोडव्या स्वभावाचे च एकांतिकपणा न स्वीकारितां सुवर्णमध्य गांठण्याच्या प्रवृत्तींचेच द्योतक होय. कौन्सिल-बहिष्काराबाबत त्यांचे विचार त्यांनी अप्रियता सोसूनहि १५ वर्षे निश्चयाने राष्ट्रापुढे माडले, व शेवटी त्यांच्याच मार्गावर कॉंग्रेसला जावे लागले ही गोष्ट प्रामाणिक इतिहासकारांना अवश्य मान्य करावी लागेल.

**संस्थानी स्वराज्य ( पुणें )**—श्री. तात्यासाहेब केळकर यांनी देशाची व महाराष्ट्राची जी विविधप्रकारे सेवा क्रमाक्रमाने वाढत्या प्रमाणात केली आहे ती मोठीच आहे असे म्हणावे लागेल. ही सेवा त्याना जी करता आली व त्यांनी आजचा मित्रमेळावा जो मिळविला आहे त्याचे श्रेय त्यांच्या सौजन्यासच दिले पाहिजे. टिळक-पक्षीयांत अनेक कार्यकर्ते गेल्या पिढीत महाराष्ट्रांत झाले. परंतु श्री. तात्यासाहेब यांच्याप्रमाणे त्यांतील फारच थोड्यांच्या हातून देशकार्य झालें आहे असे म्हणावे लागते, व त्याचे कारण त्यांचे स्वभाववैचित्र्य हे होय.

**ज्ञानोदय ( मुंबई )**—जो काम करतो त्याच्याचकडे कामाचे बोजे येतात. आळशी माणसाला एकच व एकाच तऱ्हेचे काम पुरवते. अधिक कामे असली म्हणजे खऱ्या कर्तृत्ववान माणसाला ती सारी योग्य रीतीने करता येतात. हे विचार आज पुन्हा सुचण्याचे कारण एका प्रसिद्ध कर्मवीराचा कर्मसन्यास !

तारीख १ एप्रिल १९३७ रोजी महाराष्ट्राचे पुढारी श्री. न. चि. केळकर यांनी आपल्या अनेक तऱ्हेच्या लोकोपयोगी व सार्वजनिक कार्यांतून अंग काढून घेतले. केळकरांचे नांव अजरामर राहील ते त्यांच्या वाङ्मयसेवेमुळे. ते पहिल्या प्रतीचे लेखक व मुत्सद्दी आहेत. मराठी भाषेचा विशेष अभ्यास करणारे लोक तर केळकरांच्या लेखांचा अधिक अभ्यास करतात. व्यक्ति या दृष्टीनेहि पाहिल्यास त्यांच्याइतका लोकप्रिय महाराष्ट्रीय पुढारी दुसरा नाही.

**वैनतेय (सावंतवाडी)**—सार्वजनिक संस्थांतील जागा ह्या केवळ मानाच्या होत असे न मानतां त्या स्थानांची जबाबदारी विवेकबुद्धीला स्मरून आत्यंतिक जिव्हाळ्याने पार पाडण्याचा तात्यासाहेबांचा स्वभाव असल्यामुळे, जी कामे उत्तरोत्तर स्वतःच्या हांतून होणे कठिण आहे त्यांची जबाबदारी अंगावर ठेवणें त्यांना अनुचित वाटलें. म्हणूनच त्यांनी त्या संस्थांशी असलेले अधिकृत संबंध सोडले. अर्थात् यांत संन्यास असलाच तर तो कार्याचा नसून सन्मानपदांचा आहे. सार्व-

जनिक कार्यांचे व्याप कमी करून विश्रांतीची अपेक्षा करतांना तात्यासाहेबांना जे कृतकृत्यतेचे समाधान वाटत असेल, तेवढे फारच थोड्यांच्या नशिबी असते. गेली सतरा वर्षे राजकारणांत त्याना प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने सतत धडपड करावी लागल्यामुळे, परप्रत्ययनेय आणि प्रवाहपतित अशा बहुजनसमाजाच्या मान्यतेस त्यांना पारखे व्हावे लागले खरे. पण त्यांनीं अनेक वर्षांपूर्वी प्रतिपादिलेले राजकीय सिद्धांतच आज खरे ठरले आहेत हे कोणालाहि सहज दिसून येण्यासारखे आहे. 'कौन्सिलप्रवेश हराम' म्हणणाऱ्या कॉंग्रेसने कायदेमंडळाच्या गेल्या निवडणुका लढविल्या याचें श्रेय तात्यासाहेबांना न देणारे न देवोत; पण त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा तो मोठाच विजय होय असे आम्ही मानतो.

**मातृभूमि ( अकोला )** कॉ. पक्षीय ता. ८।४।३७—ता. १ एप्रिल रोजी महाराष्ट्रातील एक अग्रगण्य पुढारी व विद्वानांचे मुकुटमणी श्री. तात्यासाहेब केळकर यांनी सार्वजनिक जीवनक्रमाचा सन्यास घेतल्याचे जाहीर केले आहे.

केळकर सेवानिवृत्त झाल्यामुळे महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत एकदम सुने सुने वाटेल व त्याच्या नेतृत्वाच्या अभावी कांही काळपर्यंत तरी अनेक सस्था पोरक्या होतील. त्यामुळे त्यांना निरोप देतांना शब्द आंतल्या आंत घोटाळतात. परंतु एकेचाळीस वर्षांच्या अविश्रांत परिश्रमानंतर आयुष्याच्या सध्याकालांत श्री. केळकर यांना निवांतपणा लाभला तर ते त्या विश्रब्धतेच्या काळांतहि इतरानी जन्म जन्म घालवून केले नसेल इतके साहित्यसेवेचें कार्य करतील अशी उमेद वाटते.

श्री. केळकर आज ४१ वर्षांच्या प्रदीर्घ सेवेनंतर सार्वजनिक कार्यांतून निवृत्त होत आहेत तेव्हां प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अतःकरणांत कृतज्ञेची भावना उमटून जाईल याबद्दल आम्हास मुळीच शंका वाटत नाही. श्री. केळकरांच्या मताबद्दल किंवा धोरणाबद्दल कोणाचे कितीहि मतभेद असले, तरी श्री. केळकरांचें व्यक्तिमत्व इतके थोर आहे की, त्यापुढे आदराने मान नम्र करण्यांत कोणाहि गुणज्ञास धन्यताच वाटेल.

**शाहू ( सातारा )** ता. ७।४।३७ —लो. टिळकांच्या पश्चात् गांधी–युग सरू झाले. त्या वेळी असहकारिता. सत्याग्रह. कायदेभंग यांच्या उठलेल्या वावटळींनें

गोंधळून न जातां वेळोवेळी राष्ट्राला खऱ्या हिताचा इषारा देणे व लो. टिळकांच्या राजकीय तत्त्वज्ञानाची लोकांत जागृति कायम राखणे ही फार महत्त्वाची कार्यें त्यांनी केली. त्याचाच परिणाम म्हणजे आज सोळा वर्षानंतर त्याचीच तत्त्वे कॉंग्रेसने अप्रत्यक्षरीत्या कबूल केली. याशिवाय त्यांनी मराठी वाङ्मयाची जी अनेकविध सेवा केली ती तर चिरस्मरणीय व मराठी भाषेस भूषणभूत अशीच आहे.

**उदय (उमरावती)** ता. ६।४।३७—'केसरी–मराठा' संस्थेद्वारा श्री. केळकर यांनी महाराष्ट्राची केलेली सेवा अमूल्य आहे व निरनिराळ्या सार्वजनिक संस्थाद्वारा त्यांनी केलेले कार्य भरीव स्वरूपाचे आहे; व म्हणूनच हा महाराष्ट्राचा अष्टपैलू हिरा आज कार्यनिवृत्त होत आहे, याबद्दल महाराष्ट्राला हळहळ वाटत आहे.

**प्रजापक्ष** ता. ३।४।३७—महात्मा गांधींचे राजकारण सुरू झाल्या-पासून तात्यासाहेबांनी महाराष्ट्रास अंधश्रद्धेपासून वांचविले व असल्या राजकारणा-पासून जनतेचे हित होणार नाही हे त्यांनी पहिल्या प्रथम लोकांस सांगि-तले. हे करीत असताना त्यांनी प्रतिपक्षीयांची टीकाहि मोठ्या औदार्याने सहन केली. कॉंग्रेसचे राजकारण कसे चुकीचे आहे हे दाखवीत दाखवीत त्यांनी अखेरीस कॉंग्रेसलाच आपल्या मार्गावर आणले. यात त्यांच्या राजकारणपटुत्वाची साक्ष पटते. कौन्सिलप्रवेशावर कडकडीत बहिष्कार टाकणारी कॉंग्रेस अखेर दिवाणगिऱ्या घेण्यापर्यंत कशी तयार झाली हे ज्यांनी पाहिले असेल त्यांना कॉंग्रेसच्या आणि प्रतिसहकार पक्षाच्या राजकारणात काय फरक आहे हे सांगता येईल. राजकारण असो, धर्मकारण असो, समाजकारण असो, शास्त्रीय विषय असो, अभिजात वाङ्मयांतील एखादा विषय असो, अशासारख्या कोणत्याहि विषयावर तात्यासाहेबांची लेखणी तितक्याच प्रभावीपणाने चालत असे. आज त्यांनी ज्या अनेक संस्थांच्या कारभारांतून अंग काढले आहे अशा ४०।५० संस्था त्यांच्या बहुमोल मार्गदर्शकत्वाला मुकल्या.

**विजय (जळगांव)** कॉं. पक्षीय ता. ७।४।४७—महाराष्ट्रांत श्री. केळकरां-इतकी शतावधानी, बुद्धिवादी व तितकीच भावनाप्रधान व्यक्ति क्वचितच आढळेल.

**विजय (सांगली)**—कॉंग्रेसच्या धडाडीच्या पण वाहत्या ओघाच्या कार्यक्रमांत सतत पुढाकार न घेतल्याच्या वैगुण्याखेरीज दे. भ. नरसिंह चिंतामण

ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांच्यांत वैऱ्याससुद्धा दूषण हुडकून काढतां येणार नाहीं. भावनाप्रधानपणा मागे ठेवून, बुद्धिप्रतिष्ठित राजकारणाचा अखंड मार्ग त्यांनी चोखाळला. दे. भ. केळकर हे वाङ्मयक्षेत्रांत सम्राट शोभतात. सर्व विषयांचा ठाव घेणारी त्यांची बुद्धि विशाल व अष्टपैलू आहे. तात्यासाहेबांनी निरनिराळ्या संस्थाचा राजीनामा देतांना जे उद्गार काढले. तेच त्यांचे व्यक्तिमत्व दर्शवितात.

**तेज** ( कॉ. पक्षीय ) ता. ४-४-३७—सार्वजनिक आयुष्यांतील निरनिराळे बरेवाईट प्रसग श्री. तात्यासाहेबांनी अनुभविले असून त्या अनुभवाचा फायदा त्यांनी दिलदारपणे अनेक संस्थांना दिलेला आहे. कोणत्याहि गोष्टीबाबत सल्ला विचारण्यास श्री. केळकराच्याकडे कोणी गेल्यावर त्याना त्यानी विन्मुख पाठविल्याचे उदाहरण आम्हास माहीत नाही. श्री. केळकरासारखा अष्टपैलू पुढारी महाराष्ट्राला आतापर्यंत मिळालेला नाही. 'नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा मुर्ध्निस्थितिः' या सुभाषिताप्रमाणे श्री. केळकर हे महाराष्ट्राचे नैसर्गिक पुढारी झाले आहेत आणि सार्वजनिक कार्यातून त्यानी सन्यास घेण्याचे ठरविल्यामुळे महाराष्ट्राला पोरके वाटल्याखेरीज राहाणार नाही. साहित्यक्षेत्रांतील साहित्यचंद्र श्री. केळकरांचे स्थान पहिले आहे.

**लोकसत्ता** ता. ११।४।३७—श्री. तात्यासाहेबांनी 'केसरी-मराठा' संस्थेकरितां ४१ वर्षेपर्यंत जिवापाड कष्ट करून त्यांना नमुनेदार बनविलेच. पण निरनिराळ्या क्षेत्रात काम करणाऱ्या ४०-४१ संस्थांना आपल्या कर्तबगारीच्या जोरावर यशाच्या शिखरावर नेऊन बसविले आहे. लोकमान्यांच्या व्यवहारी व हुकमी राजकारणाच्या प्रचारासाठी, निंदा, तिरस्कार व शिव्याशाप सहन करून त्यांनी उदड कष्ट सहन केले आहेत. तात्यासाहेबाची साहित्यसेवा तर असामान्य आहे यात वादच नाही. त्यांची लेखणी सर्वस्पर्शी आहे, इतकेच नव्हे तर त्या प्रांतांतून तिने आपले तेज वाचकाच्या पुरेपूर प्रत्ययास आणून दिले आहे.

**प्रबोधचंद्रिका** ता. ५।४।३७—टिळकासारखा नेता मंडालेस रवाना झाल्यावर तर केळकरांची खरी परीक्षा होती. त्यांच्या तेजस्वी राजकारणाचा वारसा घ्यायला त्या वेळी हिंदुस्थानांत कोणीहि पुढें झाला नाही. सगळा देश निचेष्टित पडल्यासारखा झाला. अशा वेळी केसरीच्या द्वारे केळकरांनी विचार जागृतीचे

जी ज्योत तेवत ठेविली तिचे महत्त्व आम्हास विशेष वाटते. इतकेच नव्हे तर राष्ट्राभिमानाच्या ज्योतीत जे साहित्याचे, ऐतिहासिक संशोधनाचे, चारित्रलेखनाचे व टीकावाङ्मयाचे निरनिराळे मोहक रंग हलक्या हाताने प्रज्वलित केले त्यामुळेच केळकर, हे टिळकांच्या म्हणजेच पर्यायाने जनतेच्या, 'सत्त्वपरिक्षे'तून उत्तीर्ण झाले. हे केळकरांचे अनन्यसाधारण यश काळास कधीहि हिरावून घेतां येणार नाही.

**निःस्पृह** ( कॉंग्रेसपक्षीय )—श्री. केळकरांची मते गेली सोळा वर्षें कांग्रेसशीं विशेष जुळती जरी नसली तरी पण त्यांच्यामुळे राजकारणांत विशेष रंग येत असे. त्यांच्या विरोधांत देखील एक प्रकारचे स्वारस्य असे. कारण विरोधी झाला तरी तो सच्चा असल्यावर त्याच्याशी दोन हात खेळण्यांत गोडी होती. पण श्री. केळकरांच्या विरक्तीने हा लाभ देखील आतां उरला नाही.

**निर्भीड** ( **मुंबई** ) ता. ११।४।३७—कै. दे. भ. अच्युतरावजी कोल्हटकर यांनी दहा वर्षांपूर्वी तात्यांसबधाने गुणवर्णनात्मक अशा ज्या चार ओळी लिहून ठेवल्या आहेत त्यांची सर इतरांच्या लिखाणाला येऊ शकत नाही. आपल्या ' चाबुकस्वार ' च्या ता. २१।५।२७ च्या अकांत तात्यासाहेब केळकरांसबधाने अच्युतरावजींनी पुढीलप्रमाणे आपला त्रिकालाबाधित सिद्धान्त नमूद केलेला आहेः—बुद्धीची कुशाग्रता, व्यापकता, सुपूर्तता व चपलता या चारी गुणांनी तात्यांची तुलना कै. महादेव गोविंद रानडे यांच्याशीच करावी लागते. रानड्यांच्या वेळेपासून इतका बुद्धिमान पुरुष महाराष्ट्रांत झालाच नाही म्हटले तरी चालेल. अनेक प्रसगी टिळकांपेक्षां केळकरांनी सरस बुद्धिमत्ता दाखविलेली आहे. व्यासंगांत तर कोणापेक्षांहि ते खात्रीने सरस आहेत.

अच्युतरावांनीं दुसऱ्या एका लेखांत तात्यांसंबंधाने लिहितांना परमेश्वराला उद्देशून पुढील वाक्य लिहिलेले आढळते. " परमेश्वरा ! तूं नरसोपंत केळकरांसारखा निःपक्षपाती, निःस्पृह आणि न्यायनिर्वैद आहेस ! " अच्युतरावांनी लिहिलेले हेहि वाक्य अत्यंत महत्त्वाचे आहे. तात्यांनी कर्मसंन्यास घेतल्यावरसुद्धां त्यांच्या अंगांतील निःपक्षपातीपणाचा, न्यायीपणाचा, व निःस्पृहपणाचा गुण अजूनहि अनेक वर्षें हिंदु समाजाला व हिंदु राष्ट्राला उपयोगी पडण्यासारखा आहे. तात्यांच्या अंगांतील वरील गुण इतका निष्कलंक आहे की, महात्मा गांधी किंवा पं. जवाहरलाल नेहरू यांनी सुद्धां नाकानें कांदे सोलण्याचे सोडून

देऊन राजकारणांतील अत्यंत अवघड अशा ब्रह्मगांठी सोडवितांना तात्यासाहेब केळकरांचीच सल्लामसलत घ्यावी !"

शेवटीं एक उतारा थोडासा नाखुषीने देतो. कारण त्यांत माझी व खाडिल-कर यांची तुलना केलेली आहे. पण तुलनेने व साम्यभेद ज्ञानानेच खरें गुणज्ञान होते. शिवाय हा उतारा ज्यांच्या लेखांतला आहे ते रा. पर्वते पुण्यास मराठा-पत्राचे संपादक तीन वर्षें असतां, पुढे त्यांना ते पत्र सोडून जाण्यास एका अर्थाने मीच ट्रस्टी म्हणून कारणीभूत झालों. इतकेच नव्हे तर मराठा-पत्रांत त्यांच्यावर मी टीकाहि केली होती. अर्थात् पर्वते यांच्याकडून मजविषयी अनुकूल अभिप्रायाची अपेक्षा मी सहसा केली नसती. म्हणूनच त्रयस्थपणाने त्यांनी तो दिला यामुळें त्याचे महत्त्व मी विशेष मानतो. 'चित्रा' वर्तमानपत्राच्या गेल्या दिवाळी अंकात पर्वते लिहितात :—

"याच सुमारास 'लोकमान्य' पत्र निघाले होते आणि त्यांत कांही आर्थिक विषयावरील लेख मी लिहिले होते. श्री. कृष्णाजीपंत खाडिलकर त्यावेळी संपादक होते. माझे चारपाच लेख प्रसिद्ध झाल्यावर त्यांना भेटावयास गेलो. लेखांची रीतसर पोच आलेली नव्हतीच पण गेल्यानतरहि त्यांना लेखकाची कांहीं दखल होती असे दिसले नाही. खाडिलकरांना साधी चालरीत देखील नाहीं असा माझा ग्रह झाला, व त्यांजविषयी मला नाटककार व प्रभावी वर्तमानपत्रकार म्हणून किती तरी आदर असतांहि तो ग्रह अद्यापि कायमच आहे. पण एखादे कार्य हाती घेतले की त्याचा प्रचार करण्याला जो एक प्रकारचा आंधळेपणा लागतो व चिकित्सक बुद्धि असतांहि तिचा उपयोग न करण्याचा दृढनिश्चय लागतो तो त्यांच्या ठिकाणी नमुनेदार स्वरूपांत आहे. टिळक व गांधी या दोघांचेहि ते उत्तम साथीदार झाले याचे रहस्य त्यांच्या या गुणांत आहे. प्रत्यक्ष त्यांच्या हाताखाली काम करण्याचा योग मला कधीच आला नाहीं.

"खाडिलकरांची प्रथम भेट घेतली त्या सुमारास 'केसरी' व 'मराठा' पत्रांतहि मी लेख लिहिले होते. 'वॉशिंग्टन व जिनीव्हा' 'आयर्लंडची नवी राज्यघटना' व 'हिंदी नौकानयन' या विषयावर त्यावेळी लेख लिहिल्याचे चांगलें आठवतें. केळकर हेहि खाडिलकरांसारखेच असतील काय अशी शंका त्यावेळीं मनास कधीं कधीं शिवून जाई. पण होमरूलच्या चळवळीत बरेच वेळां त्यास दुरून लक्षपूर्वक

अवलोकिलें होतें आणि त्यांचीं भाषणेंहि ऐकिलीं होतीं त्यामुळ्म ती शंका आपोआप नाहींशी होई. पुढे श्री. जम्नादास मेहेता यांनीं 'राष्ट्रसेवक' नांवाचें एक पत्र काढले व 'नॅशनॅलिस्ट प्रेस' म्हणून एक कंपनी त्यांनी व जयकरांनी रजिस्टर केली होती. एक इंग्रजी दैनिकहि चालविण्याचा त्यांचा विचार होता. 'राष्ट्रसेवक' व 'दि बाम्बे नॅशनॅलिस्ट' या दोनहि पत्रांवर काम करण्यासाठीं म्हणून मी त्यांच्याकडे राहिले होतो. एक दिवस त्यांच्या घरीच कांही कामासाठी गेलो असतां केळकर तेथे बसले होते. जम्नादास मेहेतांनी सहज बोलतां बोलतां 'मि. पर्वते' असे मला म्हणतांच केळकरांनी फार आस्थापूर्वक चौकशी केली आणि 'केसरी'तील लेखांची प्रशंसा केली. साहजिकच केळकरांना रीतभात आहे आणि अगत्य आहे असा माझा पक्का ग्रह झाला आणि पुढे त्यांचा अधिक परिचय झाल्यानतर आणि 'मराठा' पत्राचा सपादक म्हणून त्यांच्या कचेरीत काम केल्यावर आणि ते सोडल्यावरहि माझे हे मत कायम आहे, कीं केळकरांसारखे, वागण्यासवरण्याला, वादसंवादाला किंबहुना त्यांच्या वयाला, ज्ञानाला, अनुभवाला आणि थोरवीला दाखविलीच पाहिजे ती अदबी दाखवून त्यांच्याशीं भांडावयाचे असले तरीहि असे सोशिक व समंजस संपादक सांपडणे कठिण. म्हणण्याचा अर्थ असा की बहुधा इतर कोणीहि त्यांच्यापेक्षां खास वाईट रीतीने वागेल. साधारणपणे त्यांच्याच वृत्तीचे श्री. अबदुल्ला ब्रेल्वी हे आहेत. केळकरांना दुसऱ्याच्या मतांविषयी तिरस्कार कधींच नसतो; ब्रेल्वींचें तसेंच आहे."

असो; शेवटी केसरी व मराठा संस्थेचे नवे ट्रस्टी यांनी मला व धोंडोपंत विद्वांस यांना जे मानपत्र दिले ते देतों.

॥ श्रीसमर्थ ॥

ते धन्यास्ते कृतिनः श्लाघ्यं तेषां हि कार्यकौशलम् ॥
यैरुज्झितात्मकार्यैं राष्ट्रार्थायैव क्लेशिता स्वतनूः ॥

केसरी-मराठा संस्थेचे कार्यनिवृत्त विश्वस्त यांस—

सम्मान्य महाशय,

केसरी-मराठा संस्थेचे नवे विश्वस्त आणि सदर संस्थेतील समस्त अधिकारी व कामगार मंडळ अत्यंत आदरपूर्वक निवेदन करतों कीं, केसरी-मराठा संस्थेशीं

कार्यकारी विश्वस्त या नात्याचा आपला संबंध सोडून आपण कार्यनिवृत्त होत आहां हे पाहून आम्हा संस्थेतील सर्व अधिकारी व कामगार वर्गास हळहळ वाटत आहे. लो. टिळक सन १९२० साली दिवंगत झाले. त्यांच्या हयातीतच आपण बहुत वर्षे केसरी-मराठा संस्थेची एकनिष्ठपणें अव्याहत सेवा केली. लो. टिळकांच्या मृत्यूनंतर तर आपणावर जुन्या संबंधाच्या ओढीने विश्वस्त या नात्याची नवीन जोखीम येऊन ठेपली. बदललेल्या परिस्थितीत ही नवी जबाबदारी संभाळण्याचें काम अत्यंत नाजूक झाले होते. ते पूर्णपणे ओळखून आपण ही जबाबदारी गेल्या सतरा वर्षांत यशस्वीपणे पार पाडली हे विदित करण्यास आम्हाला बहुत आनंद वाटतो.

संस्थेतील कामगार वर्गाच्या पगाराचे नियम घालून देणे, पगाराची क्रमवार वाढ करणे, बोनस, प्रॉव्हिडंट फंड व ग्रॅच्युइटी या रूपाने त्यांना कौटुंबिक स्वास्थ्य मिळवून देणे इत्यादि सुखसोयी करून आपण या वर्गाचा संतोष राखला. आपली कामगार वर्गाशी वागण्याची पद्धतिहि सौजन्यपूर्ण व औदार्ययुक्त होती. त्या योगानें सेव्यसेवक भावाची तिखट जाणीव आपण कोणास कधीहि होऊं दिली नाहीं. यामुळे आपण एकाच कुटुंबाचे घटक आहो असे वाटून सर्वांच्या चित्तांत संस्थे-विषयीचा आपलेपणा व संस्थेचा अभिमान वृद्धिंगत होत गेला.

आपल्या कारकीर्दीत संस्थेवर अनेक संकटे येऊन गेली. त्यांपैकी कांहीं संकटे अशीं होती की, त्यांतून संस्था कशी पार पडेल याविषयी मोठीच चिन्ता लागून राहिली होती. पण मनाचा खंबीरपणा व वृत्तीचा समतोलपणा कायम ठेवून अत्यंत चातुर्याने व समयज्ञतेने आपण ती संकटे निवारली व संस्थेला सांप्रतचे स्थैर्याचे आणि भरभराटीचे दिवस आणून दिले आणि केसरी अर्ध-साप्ताहिक करून त्याची उपयुक्तता द्विगुणित केली याबद्दल आपणास जेवढे धन्य-वाद द्यावे तेवढे थोडेच आहेत.

केसरी-मराठा संस्थेतील बहुतेक खात्यांना नवीन इमारती आणि ग्रंथालय, अभ्यागतभुवन, सभागृह यांची नवी जोड देऊन संस्थेला आपण नवेंच नमुनेदार स्वरूप प्राप्त करून दिले आहे. अशा साधनसंपन्नतेमुळें ही संस्था पुण्यासच काय पण साऱ्या महाराष्ट्रास ललामभूत अशी झाली आहे. हें महत्कार्य घडवून आण-ण्यास आपल्या अंगचे योजकता, चतुरस्रता, दूरदर्शित्व व संस्थेविषयीचा एकनिष्ठ अभिमान हेच मुख्य कारण झाले आहेत हे निर्विवाद होय.

सार्वजानिक, विशेषतः राजकीय स्वरूपाच्या, कार्यास द्रव्याची उणीव सदैव भासत असते. त्या उणीवीमुळे कितीतरी निकडीची व महत्त्वाची कामे अडून पडतात. ही सार्वजनिक कार्यातील अडचण लक्षात घेऊन आणि लो. टिळकांना जनतेच्या ऋणांतून मुक्त करण्याच्याहि सदुद्देशाने आपण संस्थेच्या साधन-सामुग्रीतून दूरदर्शीपणाने संचित केलेल्या निधीतून तीन लक्ष रुपयांचा लोकमान्य पर्सफंड निर्माण केला हे महाराष्ट्राच्या अर्वाचीन संस्थांच्या इतिहासांत अत्यंत अपूर्व व वाखाणण्याजोगे महत्कृत्य आपण केले. या योगाने लोकमान्य टिळकांच्या आत्म्यास खरोखरच अत्यंत समाधान वाटले असेल. सार्वजनिक कार्यांत आनृण्य संपादनाची इतकी तीव्र उत्कटता आणि आनृण्यसंपादनांत भावी कार्यकर्त्यांच्या योगक्षेमाची तरतूद करण्याची कल्पक दीर्घदृष्टि क्वचितच पाहावयास सापडते. संस्थेच्या कार्यांत कोणताहि उणेपणा येऊ न देता आपण एवढा मोठा ट्रस्ट निर्माण केला व त्याचा उपयोग अखिल महाराष्ट्र कर्नाटक यास करतां येईल अशी योजना निःस्वार्थबुद्धीने केली याबद्दल आपणांस कितीहि धन्यवाद दिले तरी ते अपुरेच पडणार आहेत. अशा रीतीने ज्यांनी तीन तपांहून अधिक काळ संस्थेचे पालन, पोषण व संवर्धन करून तिची उपयुक्तता वाढविली आणि कामगार वर्गास कुटुंबातील घटकाप्रमाणे आत्मीयतेने वागविले ते सन्मान्य विश्वस्त कार्यनिवृत्त होत असता आम्हांस किती हळहळ वाटत असेल ते शब्दाने सांगणे अशक्य आहे. केसरी–मराठा संस्थेचे कार्य करीत असता आम्हास कै. लोकमान्य टिळकांचे पुण्यस्मरण हे सतत स्वकर्तव्य निष्ठापूर्वक बजावण्यास स्फूर्तिदायक होत असतेच; पण आपण या संस्थेची जी आजपर्यंत एकनिष्ठपणे सेवा केली तीहि आम्हास मार्गदर्शक होईल अशी ग्वाही आमचे मन आम्हास देत आहे.

आपण संस्थेच्या सेवेत आयुष्याची चाळीस-एकेचाळीस वर्षे घालविली आहेत. इतक्या दीर्घकालीन सेवेनंतर वृद्धपणी विश्रांति घेण्याचा आपणास हक्क प्राप्त झाला आहे. ही विश्रांति आपणास उदंड काल सुखाने लाभो असे चिंतून हें मानपत्र अत्यंत विनम्र भावाने आदरपूर्वक आपणास अर्पण करतों.

मिती आषाढ कृ. ८ शके १८५९
पुणें ता. ३१ जुलै, १९३७

जनार्दन सखाराम करंदीकर
लक्ष्मण बळवंत भोपटकर
गजानन विश्वनाथ केतकर

कोणत्याहि वर्तमानपत्राच्या कारभारांतील किंवा कार्यांतील यशापयश सर्वस्वी त्याच्या सांपत्तिक स्थितीवरून ठरविणे बरोबर होणार नाही. तथापि त्याची सांपत्तिक स्थिति ही त्या यशापयशाचे एक गमक मानता येते. या दृष्टीने पाहतां केसरी संस्थेच्या या कार्यात मी यश मिळविले असे म्हणता येईल. या स्थितीची तुलना करावयाची तर ती १९२० सालचे, म्हणजे मी केसरीचा ट्रस्टी झालो त्या वर्षाचे आंकडे आणि १९३७ सालचे म्हणजे मी केसरीच्या ट्रस्टीचे काम सोडले त्या वर्षाचे आंकडे देऊन करितां येईल. १९२० सालचा आढावा पाहिल्यास त्या सालची सुरुवातीची शिल्लक सुमारे चाळीस हजार व त्या सालची ऐन जमा १ लक्ष ६९ हजार होती व ऐन खर्च १ लक्ष ३६ हजार होता. पुढील सालात लो. टिळकांच्या मृत्युपत्रान्वये अनेक रकमा अवातर स्वरूपाच्या अशा जमा झाल्या तशाच अनेक रकमा खर्ची पडल्या, म्हणून त्या सालचे आकडे पाहता ऐन जमा १ लक्ष ४५ हजार व ऐन खर्च १ लक्ष ५८ हजार असे होते. हेच आंकडे १९३७ सालचे घेतल्यास त्या सालची ऐन जमा २ लक्ष १० हजार असून ऐन खर्च १ लक्ष ९२ हजार झाला व ऐन नफा १७ हजार उरला. या सतरा वर्षांतील नफ्यांतून संस्थेचा वाढता खर्च वजा जाऊनहि १९३७ साल अखेरीस केसरीची सांपत्तिक स्थिति काय होती हे खाली दिलेल्या खातेवार शिलकावरून लक्षांत येईल. हे आंकडे असेः—

| | |
|---|---|
| पर्सफंड | ३००००० रुपये |
| केसरी ट्रस्टची शिल्लक | १७०००० ,, |
| घसारा ठेव | ५५५०० ,, |
| प्रॉव्हिडेंट फंड ठेव | ७३००० ,, |
| स्थावर जंगम मिळकत | १८२२०० ,, |
| | ७८०७०० |

या शिवाय या सतरा वर्षांत केसरीने सार्वजनिक कार्याकरितां केलेला खर्च व दिलेल्या देणग्या यांची रक्कम कमीत कमी ५०-६० हजार इतकी सहज भरेल.

केसरी–मराठा मिळून एकच संस्था असली तरी तिच्या खऱ्या उत्पन्नाची बाब म्हटली म्हणजे केसरीपत्र हीच होय. 'मराठा' पत्र हें उत्पन्नाचें म्हणजे

'फायद्याचे' कलम आज पन्नास वर्षांत कधीहि नव्हते. मग वेळोवेळी संपादक कोणीहि असोत. निरनिराळे लेखक व कालमान याना अनुसरून मराठ्याच्या वर्गणीच्या उत्पन्नांत वटघट कांही प्रमाणात होत आली आहे; परतु एकंदरीने कोणत्याहि साली मराठा पत्राच्या जमाखर्चाचा वाजवी हिशेब केला असता त्याज-वर दरसाल काही तरी रक्कम उलट केसरीच्या उत्पन्नातूनच घालावी लागते. मात्र ती घालण्यात हेतु हाच असतो की, मराठा पत्राची भाषा इग्रजी असल्या-मुळे त्याच्याद्वारे केसरीच्या धोरणाचा व मताचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर व्हावा; व तसा तो यथाशक्ति गेल्या सत्तावन वर्षात होत आलेला आहे. म्हणून सस्थेच्या जमाखर्चातून, निदान जमेच्या बाजूस तरी, मराठा वर्तमानपत्र ही बाब वाच-कानी मनाने प्रथमपासूनच वगळून चालावे.

उरला केसरी. त्याच्या उत्पन्नाच्या मुख्य दोन बाबी. किंबहुना अवघ्या दोनच बाबी म्हटले तरी चालेल. म्हणजे वर्गणीदाराची वर्गणी व जाहिरातीचे उत्पन्न. केसरी-ला कोणी कधी देणगी उचलून देत नाही व केसरी घेतहि नाही. केसरी स्वतःच्या छापखान्यांत बाहेरचे छपाईचे कामहि करीत नाही. आपल्या फौंडरीतील टाईपहि बाहेर विकीत नाही. मग अर्थात् कोणाची एजन्सी दलाली करीत नाहीच नाही. वर्गणी-दार व जाहिरातदार हेच काय ते केसरीच्या उत्पन्नाचे मुख्य आधारस्तभ. वर्गणी-दार पोस्टेज देतात ते परस्पर पोस्टालाच जाते. यामुळे केसरीची वार्षिक 'निव्वळ' म्हणजे तीन रुपये वर्गणीची रक्कम जमा धरून, त्यासमोर वर्गणीदारास मिळणाऱ्या पूर्वीच्या ५१ व हल्लीच्या १०२ अकावर होणारा खर्च हिस्सेराशीने मांडला तर असे दिसून येईल की, निव्वळ वर्गणीच्या पैशातून केसरीला बचत अशी फारच थोडी होते.

हल्ली वर्षातून केसरीचे १०२ अक आम्ही केसरीच्या वर्गणीदाराना देतो. या प्रत्येक अंकाची पाने कमीत कमी १२ असतातच. पण प्रायः १६ हि अस-तात. नेहमीच्या एका अंकाची १२ पाने घेतली तरी त्याच्या नुसत्या कागदाचे वजन ७ तोळे होते. या मानाने १०२ अकाच्या कागदाचे वजन ७१४ तोळे म्हणजे १८ पौंड भरते. आणि दर पौंडास सुमारे २ आणे किंमत धरली तर १८ पौंडास ३६ आणे म्हणजे २। रुपये तरी पडतात. अशा रीतीने वर्गणीच्या ३ रुपयांपैकी २। रुपये आम्ही वर्गणीदाराला कागदाच्याच रूपाने परत देतों. या १०२ अंकाचें फाइल कोणी नीट बांधून ठेवल्यास पुढें कालांतराने वर्गणीदारास

व त्याच्या पुढच्या पिढीला राजकारण व वाङ्मय यांच्या दृष्टीने किती मौल्यवान माहिती ठेवीदाखल लाभेल हे सांगण्याचे कारण नाही. परतु १०२ अंकांची नुसती रद्दी विकली तरी वर्गणीदाराला ८–१२ आणे येण्याला हरकत पडणार नाही. असो. वर्गणीदार आपल्या १०२ अंकांचे काय वाटेल ते करो. पण वरील हिशेबाने एवढी गोष्ट निश्चित ठरते की वर्गणीच्या तीन रुपयांतून उरलेल्या १२ आण्यांत केसरी लिहून, छापून तयार होण्याच्या अनेक खात्याचा सर्व खर्च करावा लागतो. हा हिशेब अशाप्रकारे स्पष्ट करून लिहिण्याचा हेतु इतकाच की, केसरी काढताना उत्पादकांचा जो मूळ हेतु होता व पुढे जो लोकमान्य टिळकांनी चालविला तो हेतु, म्हणजे केसरी वर्तमानपत्र शक्य तितक्या कमी किंमतीत वाचकांना मिळावे हा हेतु, ट्रस्टच्या रूपाने केसरीची व्यवस्था आमच्या हाती आल्यापासून, आम्हीहि अबाधित ठेवला आहे. इतकेच नव्हे तर यथाशक्ति अधिक सफळहि केला आहे. कारण ता. १ ऑगस्ट १९२९ पर्यंत जेवढ्या म्हणजे ३ रुपये वर्गणीत वाचकांना आम्ही दर आठवड्यास फार तर १६ पाने मजकूर देत होतो तेथे सदर तारखेपासून आम्ही दर आठवड्यास कमीत कमी २४ पाने इतका, व मधून मधून जास्तीहि पाने मजकूर वाचकास देऊ लागलो आहो. १८८१ साली केसरीची वर्गणी १ रुपया होती व आज ३ रुपये आहे ही गोष्ट खरी असली तरी वाचकाना एकंदरीने तेव्हांपेक्षां तिपटीहून पुष्कळच अधिक मोबदला, व तोहि आठवड्यांतून एका ऐवजी दोन हप्त्यानी म्हणजे सात दिवसाऐवजी ३–३॥ दिवसाच्या अंतराने, देत आहो. वाचकांना केसरी स्वस्त करण्याचा दुसराहि एक प्रकार संभवेल. तो असा की, ‘केसरी साप्ताहिकच ठेवावा, पण केसरीची वर्गणी १॥ रुपया करावी, म्हणजे मूळचे ध्येय अधिक गाठल्यासारखें होईल !’ पण ही विचारसरणी विपरीत असून, ती आम्हालाच काय पण शेकडा ९९ वाचकांनाहि भालां पटणार नाही. वर्तमानपत्रांच्या प्रगतीचे सामान्य धोरण लक्षांत घेतले असतां आठवड्यांतून दोन वेळां मिळणारा केसरी एक वेळ मिळाला तरी चालेल असें तर कोणी म्हणतच नाही. पण केसरी दैनिक करावा अशा सूचनाच आमच्याकडे पुष्कळ येतात. परंतु केसरी दैनिक केल्यास वाचकाला वार्षिक खर्च कमीत कमी किती येईल याचा हिशेब करता, हा खर्च खेडेगांवांतील गरीब लोकांना झेपणार नाही. म्हणून केसरी दैनिक करण्याची कल्पना आम्ही अजून स्वीकारली नाही. याविषयी केसरी अर्धसाप्ताहिक करतांना आम्ही जे म्हटले होतें तेच

म्हणणे आमचे आजहि कायम आहे. केसरी दैनिक करावयाचा झाल्यास त्याला लागणारी सर्व साधने ट्रस्टीच्याजवळ आहेत. एकहि कमी नाहीं. तथापि वरील विचारसरणीमुळेच त्यानी अद्यापि ती मजल मारलेली नाही.

केसरीच्या मुख्य उत्पन्नाचा भाग जाहिरातींचा असतो. आतां जाहिरातीला लागणारा कागद, छपाई, टपाल या नात्याने होणारा खर्च जाहिरातीच्या उत्पन्नाच्या मानाने थोडा कमी असतो हे खरे. तथापि वर्गणीदारांप्रमाणे जाहिरातदारांनाहि मोबदला भरपूर मिळतोच. मात्र तो वेगळ्या स्वरूपाने मिळतो इतकेच. वर्गणीदाराना मोबदला मिळतो तो बातमी व इतर वाचनीय मजकूर हा होय. आणि जाहिरातदारांना जो मोबदला मिळतो तो व्यापारी मालाची प्रसिद्धि हा होय. केसरीचा कोणताहि अंक सुमारे एक लक्ष वाचक तरी वाचतात असे मानण्यास हरकत नाही.

एक विशेष गोष्ट सांगावयाची ती ही की, वरील हिशोबात केसरीची वर्गणी व जाहिरातीचे उत्पन्न या शिवाय बाहेरून अवांतर म्हणजे देणगी, मदत बक्षीस अशा कोणत्याहि स्वरूपाची एक पैहि केसरीकडे आज सत्तावन वर्षांत कोणाकडूनाहि आलेली नाही.

केसरीच्या गुणदोषाची चर्चा अर्थातच तिऱ्हाइताकडून होणे योग्य. तथापि एक गोष्ट अशी आहे की, तिची माहिती बाहेरच्या लोकाना फारशी असण्याचा संभव नसतो. आणि तिच्याविषयीं काढलेल्या यथार्थ उद्‌गारात जर आत्मस्तुति किंवा प्रौढी यांची थोडीशी झाक उमटली तर ती क्षम्य मानता येईल. ही गोष्ट म्हटली म्हणजे केसरी-मराठा सस्थेचा निर्लोभीपणा.

सर व्हॅलेटाईन चिरोल यांनी आपल्या सुप्रसिद्ध पुस्तकांत टिळक व केसरी यांच्यासंबंधाने पुष्कळ खोटी विधाने केली आहेत. पण त्यांतल्यात्यात खोटेपणांत व खोडसाळपणांत पहिला नंबर पटकावणारे जर एखादे विधान असेल तर ते लोकांकडून धाक दाखवून पैसे व वर्गण्या काढण्यासबंधाचें होय. चिरोलसाहेबांना आपल्या देशांतील पुष्कळ वर्तमानपत्रांचा व हिंदुस्थानातील कांहीं वर्तमानपत्रांचा अनुभव असेल. त्यावरून त्यांनी हे विधान अनुमान-धपक्याने केले असले पाहिजे हे उघड आहे. पण केसरी-मराठा संस्थेचा निकट परिचय असणारा कोणताहि मनुष्य वरील आरोप खोटा असल्याचें कबूल करीलच करील.

हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रे सामान्यतः द्रव्यवश नसतात ही गोष्ट प्रसिद्ध व मान्य आहे. तथापि विलायतेप्रमाणे इकडेहि थोडथोडे अनुभव येतात, नाही असे नाही. कित्येक वर्तमानपत्रकार प्रत्यक्ष पैसा घेत नसतील. परंतु त्या पत्राच्या प्रती पुष्कळशा विनाकारण विकत घेणे व आपल्या कचेऱ्यातून लोकाना फुकट वाचा-वयास देणे, त्यांच्याशी संलग्न असलेल्या छापखान्याची बेसुमार बिले भरून आपले रिपोर्ट वगैरे छापवून घेणे, व रिपोर्टाचे समालोचन वगैरे लिहविण्याकरितां दरबारखर्च करणें अशा निरनिराळ्या प्रकारानी काही दरबारांतून कांही ॲंग्लो-इंडियन पत्राना मदत होत असते असे लोक बोलतात. व ते खरेहि असेल.

लो. टिळकाकरितां १८८२, १८९७, १९०८, १९१६ व १९१९ या साली जे काही फंड उभारण्यात आले त्याची मूळ कल्पना, त्यांचा हेतु, त्यांच्या एकूण रकमा, त्याचा विनियोग व त्याची हल्लीची स्थिति व हिशेब या सर्व गोष्टी महाराष्ट्रात लोकाना विदितच आहेत. पण येथे मुद्याची म्हणून सागण्याची गोष्ट ही की यापैकी कोणत्याहि फंडाचा उपयोग लो. टिळकांनी व्यक्तिशः खासगी रीतीनें किंवा केसरीकडेहि केला नाहीं.

संस्थानासंबधाने केसरी-मराठा पत्राचे धोरण संस्थानिकांना अनुकूल म्हणजे होईल तितके त्याच्या हक्कांचे समर्थन करणारे व त्याकरिता सरकारवर टीका करणारे असेच नेहमी होते. परतु या दरबारांपासून या पत्रानी कधी एका पैचाहि अभिलाष केला नाही. एवढेच नव्हे तर हस्ते किंवा परहस्ते एक पैचाहि फायदा या दरबारांकडून केसरी-मराठा पत्राना झालेला नाही. जेथे महाराष्ट्रांतील हरदास, कथेकरी, पुराणिक, ग्रंथप्रकाशक इत्यादिकाना या दरबारांतून हजारो रुपये आपा-पल्या कामाकरितां मिळवितां आले, तेथे केसरी-मराठा पत्रांच्या चालकांनी आपल्या संस्थेला काही मदत मिळविण्याची इच्छा धरली असती तर ती निष्फळ झाली असती असे नाही. परंतु या संस्थेच्या कोणत्याहि चालकांची आजपर्यंत तशी दृष्टि केव्हाहि नव्हती. केसरी-मराठ्यांच्या चालकांप्रमाणेच या संस्थानिकां-चाहि गुण घेतला पाहिजे. कारण सुदैवाने या संस्थानांच्या अधिपतींनींहि या चालकांना द्रव्याचे आमिष दाखवून आपले काम करून घेण्याची बुद्धि कधीं ठेवली नाही, हा त्यांचाहि थोरपणाच होय !

केसरीवरील आपत्तीसंबंधानेहि तीच गोष्ट. उदाहरणार्थ, १९०८ सालीं मराठ्यावर आणि १९२४ सालीं केसरीवर न्यायकोर्टाच्या बेअदबीचे खटले

होऊन दोन्हींस मिळून आठ-दहा हजार रुपये खर्च आला, केसरीला जामिनक्या भराव्या लागल्या, केसरी कचेरीतील कागदाला आग लागली, अशा प्रसंगी केसरीला लोकांनी देणग्या देऊं केल्या असतांहि केसरीने त्या घेतल्या नाहीत. उलट कोणत्याहि सार्वजनिक आपत्तीच्या वेळी ज्या वर्गण्या झाल्या त्यांत केसरीने आपला योग्य तो भाग उचलला आहे.

तात्पर्य केसरीने सर्वस्वी निर्लोभीपणा राखून 'जोडनिया धन उत्तम व्यवहारें। उदार विचारें वेच करी' ही तुकारामाची उक्ति खरी करून दाखविली आहे. अशा प्रकारचा हा केसरीचा उत्कर्ष त्याच्या शत्रूंना पाहवू नये हे स्वाभाविकच आहे. विशेषतः टिळक निवर्तल्यापासून त्यांची एकच अपेक्षा होती. ती ही की, आत्ता तरी केसरी बुडावा. टिळकांच्या हयातीत केळकर दहा वर्षे केसरीचे संपादक होते, तथापि त्याला तेव्हा टिळकांचाच आधार होता म्हणून तो चालला व उत्कर्ष पावला हे सरळच आहे. ते निर्वतल्यावरहि कांही दिवस लोकानी केवळ टिळकांच्या स्मरणार्थ आपला उदार आश्रय चालू ठेवला असेहि कोणास म्हणता येण्यासारखे होते. कारण आकाशांतून तारका मूळ स्थानापासून भ्रष्ट व नष्ट झाल्या तरी त्यांचा पृथ्वीवरील प्रकाश काही काळ टिकतोच. पण पुढें असहकारितेच्या धकाधकीचा मामला सुरू झाला तेव्हा टिळकांचा आधार तुटलेल्या केसरीच्या शत्रुंना सोन्याचीच संधि प्राप्त झाली असे वाटले, व स्वतः त्यांनींहि त्याचा पाडाव करण्याला शक्य तितका हातभार लाविला. कोणी राजकारणांत केसरी मवाळ बनला असे म्हणून, कोणी त्याला म. गांधींचे शत्रुपद देऊन, कोणी तो खादीचा विरोधी असे म्हणून, कोणी प्रांतवार किंवा भाषावर विरोधी अभिमान जागृत करून, कोणी तो ब्राह्मणपक्षाचा असे ठरवून, तर कोणी उलटपक्षी तो सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करतो म्हणून—तात्पर्य, ज्याला जे कारण सुचलें तें त्याने पुढें करून केसरीचा पाडाव करण्याचा प्रयत्न शिकस्तीने केला. पण या खुळ्यांना हे कळेना की, एक अकाली मेला तरी त्याचे उरले आयुष्य दुसऱ्याला मिळत नाही ! मग केसरी जाग्यावर जिवत आहे तोपर्यंत त्याचे आयुष्य इतर कोणाच्या भरतींत कसे पडणार ? ज्याला त्याला आपल्या स्वतःच्या गुणाप्रमाणेच या जगांत स्थान मिळते. यामुळें केसरीची निंदा करकरून शिणून भागून ही मंडळी आतां हताश होऊन बसली आहेत !

केसरीचा खप कमी झाला, वर्गणीदार कमी झाले, अशा विविध—वार्ता कोणी व्यवसायबंधु उठवितो. केसरी अर्धसाप्ताहिक झाला तेव्हां तो मरणार, कारण दिवा मालवताना मोठा होतो, असे अशुभ भविष्य वर्तवून कित्येक काशीकर पंडितानी (म. रा. बोडस) आपल्या द्वेषाच्या लहरीचा उपशम केला. कोणी 'केसरी' या नावाने सहज सुचणाऱ्या त्रिचाऱ्या शब्दावर 'ग्राम्य' कोट्या करून स्वतःलाच लोकाकडून ग्राम्य ठरवून घेतले. स्वतःच्या शीलाला व संस्कृतीला शोभण्यासारखी कुरूप व बेढब चित्रे काढून कित्येक कुडबुड्या जोशानी राजकारणांत नसती लुडबूड केली. पण त्याच्या इच्छेप्रमाणे टिळकाच्या मृत्यूनंतर केसरी हा एक दोन वर्षांत मृत्युपथाला लागावयाचा तो न लागतां, अजून जिवंत आहे, नव्हे आपल्यापरी उत्कर्ष पावत आहे, शत्रूच्या कबरेत लाथा घालीत आहे, व इतक्यानेच न थाबता अर्धसाप्ताहिक बनून साठाव्या वर्षांत पुढे पाऊल टाकीत आहे. याचे कारण, केसरीच्या शत्रूंचा द्वेष व मित्राची सहानुभूति याच नुसत्या दोन शक्ती घेतल्या तरी, त्यात ही दुसरी शक्तीच अधिक प्रभावी ठरली. मात्र या सर्वांना फिरून टिळकाच्या पुण्याईचा पाठिंबा मागे आधार देतच आहे हे होय.

असो; केसरीच्या या सुस्थितीला अनुरूप अशी इतर रीतीनेहि मी व्यवस्था केली आहे. केसरीच्या कारखान्याला लागणाऱ्या अवश्य अशा सोईच्या इमारती बांधल्या, यंत्रे खरेदी केली, अतिथिगृह सजविले, नोकराचे पगार व पगारवाढ ठरवून दिली, त्याच्या प्रॉव्हिडंट फंडाची योजना केली, रजेचे व नोकरीचे नियम केले. थोडक्यात सांगावयाचे तर केसरी कचेरीकडील नोकरी सामान्यतः सुखाची व्हावी, त्रासाची जिकीरीची होऊ नये अशी सर्व योजना मी केली आहे, व केसरीचा नोकरवर्ग दृष्टीवर संतुष्ट आहे असा माझा विश्वास आहे.

पुण्यांतील व पुण्याबाहेरील ज्या अनेक संस्थांचा राजीनामा मी दिला त्यापैकी बहुतेकानी तो नामंजूर केला! कांहीनी मंजूर केला केवळ तो माझ्या आग्रहाने व त्यांचा निरुपाय झाल्यामुळे. उलट काहीनी माझी पूर्वीच्याच जागी व कांहीनी तर वरतीच्या जागी माझी निवडणूक करून, माझ्या राजीनाम्याचे वैयर्थ्य मला पटविले. तथापि मी स्वतःची सोडवणूक अशा रीतीने करून घेतली आहे की जरी कोणत्याहि एखाद्या संस्थेने माझा राजीनामा मंजूर केला नाही, तरी यापुढें त्या संस्थेचे काम करण्याला मी स्वतःला पूर्वीप्रमाणे बांधला गेलो असें मी

समजणार नाही व त्यांनीहि समजू नये. आणि जर माझ्या हातून त्यांच्या कामीं हयगय झाली तर त्यांनी मजवर कर्तव्यपराङ्गमुखतेचा दोषारोप करूं नये. या अटींवर मी राजीनामा पटविण्याचा सत्याग्रह काही काही ठिकाणी केला नाही. मात्र जेथे माझे मनच विटले होते तेथे मी राजीनामा परत घेतला नाही.

असो. पुण्यांतील 'महाराष्ट्र व्यायाम मंडळा'च्या उपाध्यक्षाच्या जागेचा मी राजीनामा दिला तेव्हा मंडळाने माझा थाटाने सत्कार केला. त्या प्रसंगी मी जे उत्तरादाखल व आभारप्रदर्शक भाषण केले त्यात माझी खरी मनोवृत्ति प्रकट झाली होती म्हणून त्याचा सारांश येथे देतो. त्यावरून सार्वजनिक कार्य करण्यातले माझे धोरण, आणि सार्वजनिक स्तुतीनिंदेसंबंधाने माझे विचार कळून येतील. ते भाषण असे :—

"आजचा हा समारंभ अशा पद्धतीने होईल अशी मला मुळीच कल्पना नव्हती. उपाध्यक्षाच्या जागेचा राजीनामा तो काय आणि तो मंजूर करण्याकरितां एवढा सत्कार ! ही गोष्ट अपेक्षेपलीकडेच नव्हे तर प्रमाणाबाहेरहि झाली ! पण सूक्ष्म विचार करता अशी शंका येते की, माझ्या भिडस्त स्वभावाचा हा प्रेमळ सूड घेतला जात आहे. किंवा निदान व्यायाम मंडळ संस्थेच्या जाहिरातीची ही कुशल कारवाई तरी असावी. माझ्या गळ्यांत येथे इतके हार घातले त्यापेक्षा बुधवारांतील फुलवाल्याच्या एका दुकानावर आजच्या दिवस माझ्या नांवाची पाटी लावली असती तर ! पण तसे केल्याने व्यायाम मंडळ संस्थेच्या निरनिराळ्या दहावीस शाखांची जाहिरात कशी झाली असती ? पण असो. माझ्या सत्काराच्या निमित्ताने या संस्थेची जाहिरात किंवा प्रसिद्धी झाली तरी ती मला इष्टच आहे. कारण उपाध्यक्ष म्हणून मी तिचा संबंध सोडला तरी तिजविषयीचा माझ्या मनांतला ऋणानुबंध केव्हांहि कमी होणार नाही. कारण या संस्थेचे व माझे संबंध कसे आहेत हे श्री. दामले यांनी आपणास सविस्तर सांगितलेच आहे.

"अशा समारंभांत बिघडते ते इतकेच की, लोक आपली स्तुति खऱ्या प्रेमभावाने करीत असले तरी ती समक्ष ऐकून घेणे ही फार नाजूक व अवघड गोष्ट होऊन बसते. जगांत मृत मनुष्य हाच एक असा का असावा की आपली स्तुति आपल्याच कानांनी ऐकून घेण्याचे संकट त्यावर न पडावे ! आतां मी या स्तुतीने फुगून जाणार नाहीं हे वेगळे. कारण उद्यां कांही वर्तमानपत्रांतून

नेहमीची माझी निंदा वाचावी लागेल. ती वाचताना मी आजची स्तुति ही त्या निंदेचे भजक म्हणून समजेन. मला निंदेचे अपशब्द ऐकण्यावाचण्याची इतकी संवय नेहमीची होऊन गेली आहे की, प्रसगविशेषीं आजच्या सारखे होणारे माझे गुणवर्णन आणि ती निंदा यांचा, मला जे थोडेसें गणित येते त्याने, मी अशछेद पद्धतीने सक्षेप घालतो. त्या गणितांतून जी थोडीशी निंदा किंवा स्तुति शिल्लक उरते ती मग सुसह्य होते. 'आपली स्तुति कोणी केलेली आवडत नाही ' असे मी म्हणेन तर मी मनुष्य नाही असे कबूल करावे लागेल. पण मनुष्यत्वामध्येच सारासार विचार व तारतम्य यांचाहि समावेश होतो. आणि माझ्या गुणाबरोबर माझ्या दोषाचे विज्ञान मला लोकांपेक्षाहि अधिक आहे असे मात्र मी आपणाला खात्रीने सागतो. वेदात शास्त्र किंवा तत्त्वज्ञान यांत सांगितलेले आत्मज्ञान मला नाही; पण स्वतः अंतर्मुख होऊन आपली खरी योग्यता आपण ओळखणे, किंवा आपले माप आपणच बरोबर घेणे, ही गोष्ट मात्र मी चागली करू शकतो. याचे प्रत्यतरहि मी आताच आपणाला आणून देतो. कसे ते पहा.

"प्रि. महाजनी यांनी टिळक हे महापुरुष पण असहिष्णु होते आणि मी सहिष्णु आहे, म्हणून तरुण पिढीने माझा आदर्श डोळ्यापुढे ठेवण्याची शिफारस केली. पण सहिष्णुता, सात्विक वृत्ति, हा गुण दिसला तरी त्या वृत्तीत महत्कार्याला उपयोगी असा जो आवेश तो नसतो. हा गुणसंलग्न असा दोषच होय. म्हणून मी तरुण पिढीला उलट असेच सागेन की, सहिष्णु आणि निवृत्त केळकर किंवा मरेपर्यंत कार्याची धुरा वाहणारे दि. ब. गोडबोले याच्यापेक्षा, असहिष्णु परंतु पराक्रमी आणि उज्ज्वल त्यागी अशा लो. टिळकांचेच उदाहरण आदर्शभूत म्हणून त्यांनी डोळ्यापुढे ठेवावे व गिरवावे. एका वक्त्यानी माझ्या स्वार्थत्यागाची वाखाणणी केली. पण त्याचाहि खुलासा मला करणे आहे. ते म्हणाले त्याप्रमाणे मी सातान्यास वकिली करीत राहिलो असतो तर कोणी सागावे काय खरोखर घडले असते ते ! कदाचित मी, क्रमाने का होईना, पहिल्या पदवीला पोचून हजारो रुपये मिळवून बसलों असतो; किंवा वकिलीच्या धंद्यांत अयशस्वी होऊन दरिद्री राहिलो असतो. कारण बुद्धि असून वकिलीचा धदा न चाललेले तेव्हांहि कांही वकील होते व आजहि सर्वत्र आहेत ! लो. टिळक, ना. गोखले, प्रो. कर्वे, रँ. परांजपे, रँ. महाजनी यांच्या सारख्या म्हणजे माझ्याहून बुद्धिमान माणसांनी केला तो स्वार्थत्याग

खरा. त्यागी माणसांची इतरहि कांही ठळक उदाहरणे माझ्या डोळ्यापुढे अशी आहेत कीं, त्यांची चरणधूळी उचलून आपल्या मस्तकावर ठेवावी! माझ्या बरोबरीच्या आणि योग्यतेच्या कांही संपादकांना इतर प्रांतांत माझ्यापेक्षां दुप्पट-तिप्पट पगार आहे हे खरे. तसेंच मी नोकरीची पहिली वीस-बावीस वर्षे केवळ शंभर रुपये पगारावर काढली हेंहि खरे. पण देवदयेनें केसरी-संस्थेत मला कांही कमी पडले नाही. माझा चरितार्थ ठीक चालला. मी नोकरी सोडतांना मला पगार होता तितका महाराष्ट्रांत किती संपादकांना किंवा प्रोफेसरांना आहे? तात्पर्य, माझ्या स्वार्थत्यागाचे गुणवर्णन मी मुकाट्याने स्वीकारूं शकत नाही. शिवाय निर्वाहाचा धंदा आणि आवडीचा व्यासंग यांची सतत जोड राहिल्याने मला जन्मभर समाधान व आनंद ही लाभली.

"मी अनेक संस्थांशी संबंध जोडला व आतां तो सोडला यासंबंधाने माझे गुणवर्णन करून खेद प्रगट करण्यांत आला. यांत मला सांगावयाचे हेंच की, सार्वजनिक काम शक्य तितकें करावें आणि उपयोगी पडावें याची मला प्रथम पासून हौस होती. आजहि एखादी संस्था अशी असेल की, तींत स्वार्थी चाल-कांनी आपल्या कामापुरता माझ्या नावाचा फायदा करून घ्यावा, पण पडद्याआड माझी निंदा नालस्ती करून माझ्याविरुद्ध वागावें किंवा हे गेले तरी बरें असे जाणवावें. आणि हे जाणूनच मी ती सोडली असेन. पण एकदरीनें ज्या संस्था मी सोडल्या त्यांना मी हवा होतो आणि मला तेथें काम करण्यांत प्रेम वाटे. मी कोणत्याहि संस्थेत देवासारखा जाऊन बसतो असे वर्णन कांही विनोदी मित्र करतात, आणि म्हणतात 'केळकर, तुमच्यामध्ये पराक्रम नाही हो! संस्थेत जावें, भांडण लावावी, आणि संस्था मोडून बाहेर पडावें!' हा पराक्रम मजमध्ये नाही हे मी कबूल करतो.

"एका-दोघा वक्त्यांनी माझ्याकडून झालेल्या केसरी मराठा संस्थेच्या सेवेचे वर्णन केले. तें मात्र मी आनंदाने मान्य करितो. कारण त्या सेवेचा मला अभिमान वाटतो. एका प्रतिपक्षानें (रा. न. वि. गाडगीळ) एकदा असे म्हटले की "टिळकांचे राजकारण महाराष्ट्राबाहेर गेले आणि टिळकांचा पैसा केळकराच्या हाती आला." त्यालाहि प्रांजलपणाचे उत्तर येथेंच देतो. टिळकांच्या मृत्यूनंतर केसरी संस्था मजकडे आली तेव्हां जी रोकड प्रत्यक्ष हातीं आली, त्यापेक्षां टिळकांनी मृत्युपत्रानें उत्पन्न केलेल्या आमच्या वरच्या आर्थिक अशा बंधान्याच अधिक होत्या. मजकडे आली ती

शेकडा त्या मानाने मोठी नसून पैसा निर्माण करण्याची केसरीपत्र ही 'शक्ति' आली हे मात्र खरे. पण त्या शक्तीचा पहिला उपयोग मी टिळकांना सार्वजनिक कर्जातून मुक्त करण्याकरितां तीन लाख रुपयांचा ' पर्स फंड ' निर्माण करून केला आणि सार्वजनिक कार्याची खर्चाची कायमची काही सोय करून ठेवली. चिरोल केस हरल्यामुळे केसरी व गायकवाडवाडा लिलावाला निघण्याची वेळ होती. त्यावेळी जनतेने टिळकांना तीन लक्ष रुपये देऊन निर्भय केले. ते कर्ज मी त्यांच्या मरणानंतर दहा वर्षात फेडले याचा अभिमान मला का वाटू नये ? माझ्याकरितां फंडगुंड ही शिबंदी निर्माण करणारांनी स्वतःच लोकांना किती बुडविले याचा इतिहास पुष्कळांना माहीतच आहे. उलट मी सार्वजनिक अशा एका पैशाचाहि अपहार केला नाही हे जाहीर रीतीने सांगतो; व ज्या कोणास हे खोडून काढावयाचे असेल त्याला पुढे येण्याविषयी आव्हान देतो ! केसरी संस्थेसंबंधानेहि हे सांगतो की, तिच्या सर्व इतिहासात पत्राची वर्गणी व जाहिरातींचे उत्पन्न याहून वेगळी एक पैहि तिला लाभलेली नाही.

"शेवटी एक गोष्ट सांगावयाची. एका-दोघां वक्त्यांनी मजवरील एका आक्षेपाचा परिहार स्नेहभावाने परस्पर केला. तो हा की, मी टिळकांचे जागी आलों तथापि प्रतिटिळक झालो नाही. परंतु मला वाटते या आक्षेपाचे निरसन मी तरी करण्याच्या भानगडीत पडणार नाही. कारण मजमध्ये जर टिळकांचे गुण नाहीत तर मी टिळक कसा होऊं शकेन ? तथापि प्रांजलपणानेच खरे वाटते ते बोलण्याचा प्रसंग आला म्हणून मी म्हणेन की मी प्रतिटिळक झालो नसेन, पण टिळकांच्या आणि माझ्यामध्ये महाराष्ट्रांत तरी दुसरा कोण येऊं शकला ? माझ्याहून अधिक लायक मनुष्य मिळता तर टिळकांनी त्यालाच नसता का माझ्या जागी नेमला ? माझ्याखातर केसरीचे त्यांनी नुकसान का केले असते ? मला हेच म्हणावयाचे की, टिळक हे आकाशांत भरारी मारणारे गरुड होते. माझा पराक्रम फार तर एखाद्या चिमणीप्रमाणे झाडावर जाऊन बसण्याचा असेल. पण मी ज्या झाडावर बसलो ते झाड, टिळकांच्या मागे महाराष्ट्रांतले इतर पक्षी ज्या झाडावर जाऊन बसू शकले त्यापेक्षा अधिक उंच आहे खास. मला माझ्या योग्यतेपेक्षा अधिक मान सन्मान मिळाले असे कोणी म्हटले तर मी ते नाकबूल करणार नाही. मिळाले ते मला पुरे आहेत. पण या संबंधानेहि एक गोष्ट सांगावीशी वाटते. ती ही की, मला मिळालेल्या कोणत्याहि मानासंबंधाने मी स्वतः कधीच उचल किंवा खटपट केली नाही. ती सर्व प्रथम इतरांच्या इच्छेचीच कृपा असे. तसेंच एखादा मान मिळण्याकरितां

दुसऱ्या कोणाला मागे दडपून दाबून ठेवणे आणि त्याच्या सधीचा अपहार करणे ही गोष्टहि मी कधी केली नाही.

"निंदेला उत्तर देतांना आत्मसमर्थन केले तर आत्मप्रौढी होत नाही. टिळकांचा मी औरस वारस नाही, पण चौरस वारस खचित होतो. कारण, ( १ ) त्यांनी मृत्युपत्रांत मलाच मुख्य आर्बिट्रेटर म्हणजे पंच नेमले ( २ ) त्याच्या हयातीत त्यांनीच मला केसरीचा सपादक कायम करून ठेवला ( ३ ) त्याच्या मुलांनी माझीच नेमणूक ट्रस्टी म्हणून केली ( ४ ) मी बिकट प्रसगी केसरी जगविला आणि वाढविलाहि ( ५ ) मीच टिळकांना मरणोत्तर निष्कर्जी केले ( ६ ) आणि त्यांच्या राजकीय तत्त्वाची पर । मीच चालविली. मी अजातशत्रु आहे असे एका वक्त्याने वर्णन केले ते मात्र तितकेसे खरे नाही. मला शत्रु पुष्कळ झाले. पण एका ज्योतिषाने माझी पत्रिका पाहून पूर्वी मला असे लिहून दिलेले मजजवळ आहे की, ' तुम्हाला प्रत्येक वेळी एकेक नवा शत्रु उत्पन्न होईल. पण शेवटी तुमचाच जय व्हावा असा तुमचा ग्रहयोग दिसतो.' हे भविष्य खरे आहे असे आजहि मला वाटू लागले आहे.

"आज झालेली भाषणे औपचारिक किंवा जुलमाची नव्हती. सर्व प्रांजलपणाचीं होती म्हणून मीहि अगदी मोकळ्या मनाने बोललो."

असो; आता माझ्या कार्यनिवृत्तीला अनुलक्षून मला आलेली काही पत्रे देतोः—

"लोकमान्यांच्या पाठीमागे आपल्या योग्यतेचा पुरुष महाराष्ट्रांत नाही. वर्तमानपत्रकार, लेखक, राजकारणी पुरुष इत्यादि नात्याने आपण जी अनेकविध सेवा केली तिचे मूल्य ठरविणे आज तरी अशक्य आहे. आपण परिणतप्रज्ञ व सर्वानुभवी आहा. आतां लेखन व्यवसाय आपल्या मनाप्रमाणे स्वतत्रतेने व निस्पृहपणे आपल्याला करता येईल. या दृष्टीने दोन कृति हाती घेण्याविषयी विनंति करतो. ( १ ) टिळकांच्या निधनानंतरचे भारतवर्षाचे स्थित्यतर व पुढील दहावीस वर्षात होणारे भवितव्य. ( २ ) दुसरी कृति H. G. Wells वगैरे लोक आत्मवृत्त लिहितात तशी आपल्या चरित्राची जर आपल्याला करता आली तर ते मार्गदर्शक होईल. आत्मचरित्राचे तटस्थ वृत्तीने निरीक्षण करणारा, महाराष्ट्रीय प्रसिद्ध पुरुषांत, आपणांइतका क्वचितच कोणी मला दिसतो." ( पी. व्ही. काणे, एम्. ए., एल्एल्. एम्., ॲडव्होकेट, मुंबई, आम्रवाडी. )

(ता. १।४।३७) आजच्या आत्मनिवेदनांतील मजकूर पाहून फार वाईट वाटले. मला सकाळपर्यंत त्या गोष्टीची वार्ता नसल्यामुळे मनाची तयारीहि नव्हती. त्यामुळे अधिक ताण बसला. मी १९१५ च्या जूनमध्ये पुण्यास आलो. गेली बावीस वर्षे, कमी जास्त प्रमाणांत पण अत्यंत निकटचा संबंध आला. या अवधीत आपण केलेल्या अनेक उपकाराबद्दल मी ऋणी राहीन. प्रथम जास्त आपल्याच हाताखाली काम केले. त्याची स्मृति आहे व राहील. (दा. वि. गोखले, पुणे.)

(ता. २।४।१९३७)—केसरीमध्ये "आत्मनिवेदनाचे दोन शब्द" म्हणून आपण जो लेख लिहिलात तो वाचून मला आपल्याबद्दल—आपल्या कर्तृत्वाबद्दल—निरलसपणाबद्दल कौतुक वाटून गहिंवर आला. तात्यासाहेब, आपला हिंदुस्थान जर स्वतंत्र असतां तर आपला गुणगौरव फार थोर पुरुष म्हणून करण्यांत आला असता यात शंका नाही. (न. का. बापट, पुणे.)

(ता. ३।४।३७) आपल्या सेवा निवृत्तीमुळे आपला संबंध असलेल्या संस्थांना एक मोठा आधार कमी झाल्याचे तर वाटेलच, पण महाराष्ट्ररूपी महत्तर संस्थेस आपले सहाय्य दुर्लभ झाल्यामुळे त्याची उणीव जाणवल्यावाचून रहाणार नाही. सार्वजनिक कार्य करताना लोकांच्या लोभाप्रमाणे रागाचेहि वाटेकरी व्हावें लागते, हे आपले म्हणणे खरे आहे. तरी पण वैचारिक मतभेदासाठी आपले कर्तृत्व कोणासहि दृष्टिआड करिता येण्यासारखे नाही. (ल. का. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी.)

(ता. ४।४।३७)—व्यक्तिशः राजकारणात मतभेद असून, आणि प्रसंग विषेशी ते सभ्य पण तीव्र भाषेत दर्शविले गेले असतांनासुद्धा, आपल्या मनांत माझ्याबद्दल जे प्रेम व आपलेपणा आहे व जो आपण अनेक वेळां दाखविला आहे त्याबद्दल मी आपला आभारी आहे. याप्रसंगी मी एवढेच सुचवू इच्छितो की, मतभेदाच्या मामुली प्रसंगाव्यतिरिक्त जे जे आहे त्यासंबंधी आपल्याबद्दलचा माझा आदर काहीहि कमी झालेला नाही, व होणे शक्य नाही. आपल्या ह्या सर्व दृष्टीनी योग्य वानप्रस्थाश्रमांत आपणांस पूर्ण आरोग्य व आनंद लाभो अशी मी आशा प्रदर्शित करितो. (न. वि. गाडगीळ, दिल्ली.)

(ता. ५।४।३७) प्रथमपासून आज कैक वर्षे आपणावरील हक्क व पाठिंबा हा मजला व्यक्तिशः जितक्या प्रमाणांत विश्वासपूर्वक लाभला तितक्या प्रमाणांत

कोणाहि पुढाऱ्याचा लाभला नाही. त्यामुळे पदाधिकारित्वाचा आपण त्याग करण्याचा निश्चय केला तरी तोहि मला एक मोठा आधार तुटल्याप्रमाणे होणार आहे. पण आपण विश्रांतीच घेतां व ती आपणास मिळावी हेहि एका दृष्टीने योग्य वाटते. ( द. वा. पोतदार. पुणे. )

( ता. ६।४।३७ ) आपली सर्व-विषयव्यापिनी बुद्धि व हृदय हलवून सोडणारी लेखणी या जोडीने जे कार्य केलें त्याचे यथार्थ मापन करण्याची अजून वेळ आली नाही. परतु वादविवादाच्या झंझावाताने उठलेले धुळीचे लोट दूर निघून जातील व वातावरण निवळेल, तेव्हा आपल्या कर्तृत्वाची व बुद्धिमत्तेची छाप केवढ्या मोठ्या प्रमाणांत सर्व महाराष्ट्रीय चळवळीवर व विचारसरणीवर उमटलेली आहे हे पहावयास मिळेल. आपल्या व्यासगी व लेखनाभिलाषी बुद्धीला या विश्रातीच्या काळांत देखील खरोखर वाचनलेखनाचा नाद सोडून देऊन केवळ आराम करीत बसणे शक्य होईल कीं नाहीं, याची जबरदस्त शंका वाटते. अनेक तऱ्हेच्या प्रश्नाच्या विचारात व विशदीकरणांतच तिला आराम वाटेल. तदितर स्थितीचा तिला खात्रीने कटाळा येईल. यामुळे आपली ही विश्रांति महाराष्ट्रीय वाङ्मयांत काही भरीव व बहुमोल भर घातल्याशिवाय रहाणार नाही अशीहि एक अपेक्षा आपल्या असंख्य प्रशसक हृदयात उत्पन्न झाली आहे. सार्वजनिक कार्यातील आपल्या सहकार्याचा लाभ इत्युत्तर मिळावयाचा नाही हा विचार एक प्रकारचा मानसिक उद्वेग उत्पन्न करतो. ( माधव श्रीहरि अणे, नवी दिल्ली. )

( ता. ६।४।३७ ) आपल्यासारखा थोर अंतःकरणाचा कार्यकर्ता यापुढें कित्येक वर्षे महाराष्ट्रास लाभेल असे वाटत नाही. आपली सार्वजनिक कार्यनिवृत्ति जाहीर करिताना आपण आपल्या साहाय्यकांच्या व विरोकांच्याबद्दल जी उदार मनोवृत्ति समभावे व्यक्त केली आहे ती वाचून तर माझें हृदयच भरून आले. श्री. वालचंद हिराचंद याच्या निवडणुकीच्या वेळी ज्ञानप्रकाशांतून तुमच्याविरुद्ध स्वसमर्थनार्थ दोन शब्द लिहून तुमच्या अंतःकरणाला दुखविल्याचे मला पूर्णपणे स्मरते. कदाचित् ही गोष्ट आपल्या स्मरणातहि नसेल. पण आपल्या परिचयाच्या वेळेपासून मी ज्याना अत्यंत मोठे समजतो त्या तुमच्याबद्दल मी दोन शब्द कठोर लिहिले ही गोष्ट माझ्या मनाला सारखी डांचत आहे, व त्या-

बद्दल आपली मनःपूर्वक क्षमा मागितल्यावांचून राहवत नसल्यामुळे या पत्राने मी ती मागत आहे. ( बाबूलाल नानचंद मोतीवाले, पुणे.)

( 6-4-37 ) Your very presence is a source of inspiration and guidance to many people and institutions, and we earnestly pray to Providence to give you sound health and long and peaceful life ( दिवेकर बंधु, सॉलिसिटर्स, मुंबई. )

( 7-4-37 )—While I have sometimes differed from you on public questions, I have always entertained a high regard for your honourable and public spirit, your readiness to see the point of view of your opponents, your general fairness of mind, and your high literary qualities Although you have given up public life, one may expect, I hope, occasional pronouncements from you on public questions from a detached point of view. And in any case I hope that Marathi literature will be largely benefitted by your pen even in your days of rest

I have often felt that by the cast of your mind you are more akin to the school of Ranade and Gokhale, than of Tilak. And though circumstances determined otherwise, I recognize that you have generally used your position as a moderating influence and acted as a meditator between these opposing schools. The retirement from active life of such an influence is regretted by all though, it must have come some time or other

Over many years ago, I wrote an article on ‘ Sanyas in Public Life ’ I am glad you have set a good example for other public men who linger too long on the stage. One may feel that you could have probably stayed on usefully for five years more, but it was a matter for your own decision. Your retirement reminds me that my own, though I have not occupied as prominent a place in public life as yourself, is not far distant and I hope to follow your exam-

ple in very few years. ( र. पु. परांजपे, व्हाइसचान्सलर, लखनौ युनि-व्हर्सिटी. )

(12-4-37) I hope your retirement, therefore, is not due to ill-health, but only to your desire to have greater liberty for what you would like to do You have done a mighty lot for our country during the last forty years, and have led a very strenuous life in various spheres of public activities ( बॅ. एस्. सच्चिदानद सिंह, पाटणा. )

( ता. १३।४।३७ ) राजकारणातून कारणपरत्वे आपण अग काढून घेतले तरी गरजूना सर्व प्रकारचे सहाय्य, विद्वानाना तरुणाना आणि विद्यार्थ्याना वाङ्मय-रुपी खाद्य, आपणाकडून सतत मिळत जाईल अशी आशा आहे. आपण अनेकाना उपकृत करून ठेवले आहे. आवासचे कै. ल. दातार यास आपली वारवार आठवण होते. त्यांच्या चिरंजीवाना आपण फार मोठी मदत केली आहे. आपली गुणग्राहकता सर्वविश्रुत आहे. माझ्या शिरावर तर आपल्या ऋणाचा मोठाच बोजा आहे. ( रा. ल. घरत, सासवने )

( ता. १८।४।३७ ) लोकमान्याची बुद्धिमत्ता अत्यत प्रखर व सर्वव्यापक होती ही गोष्ट खरी, पण त्यावेळच्या परिस्थितीमुळ लोकमान्याना सर्वच विषयात आपली बुद्धिमत्ता सारखी उपयोगात आणता आली नाही. तात्यासाहेबाची शाबास खरी. कोणताहि विषय तात्याच्या कक्षेतून सुटला असे झाले नाही. इतके व्याप संभाळण्यास त्यांस वेळ तरी कसा मिळतो कोणास ठाऊक ? त्यांच्याइतका सर्वव्यापी बुद्धिमान मनुष्य आढळणे विरळा. ( गोपाळ अनंत ओगले, नागपूर. )

( ता. १८-४-३७ ) प्रतिपक्षीयाकडून निंदेचा व अपशब्दाचा वर्षाव होत असतांहि, आपल्या तत्त्वांस आपण चिकटून राहिला व समत्व ढळू दिले नाही. याबद्दल कोणीहि आपले कौतुकच करील. कोणत्याहि परिस्थितीत मनाची शांति ढळू न देतां एखाद्या प्रश्नाचा व्यापक बुद्धीने विचार करून आपण नेहमी योग्य तोच मार्ग दर्शवीत आला आहा. अलौकिक, स्थिर, व चिकित्सक बुद्धिमत्ता अस-ल्याशिवाय ही गोष्ट साधणे शक्य नाही. आपला दीर्घोद्योग व व्यासंग लक्षांत घेतां आपण हा विश्रांतीचा काल ग्रंथलेखनांतच घालविणार यांत शंका नाही. या काळांत

आपणाकडून हिंदुधर्म व संस्कृति यावर उत्कृष्ट ग्रंथ निर्माण करण्यास आपणास समर्थ करावे अशी परमेश्वरचरणी प्रार्थना करितो. ( नारायण बाळकृष्ण केळकर, धुळे. )

( ता. १९।४।३७ ) × × × परन्तु मनांत एक असमाधान शल्य सलत राहणार ते हेच की, गेली सोळा सतरा वर्षे शुद्ध राष्ट्रीय हितबुद्धीने, व्यक्तीविषयक मान्यतेची अगर महत्त्वाची परवा न करता, अत्यंत प्रखर लोकनिंदा सहन करून-हि महात्मा गांधींच्या केवळ ध्येयवादी (त्यांच्या स्वतःपुरते सत्य अहिंसा प्रधानहि परंतु अव्यवहारिक व ऐन वेळी फलवंचित करणाऱ्या आततायी वर्गांत) असत्य ढोंग हिंसा अहंकार व एक प्रकारची Mental Slavery उत्पन्न करणाऱ्या राजकार-णाशी आपण धैर्याने व परिश्रमपूर्वक लढला, त्याचे फल पूर्णांशाने आपल्या पदरात पडले नाही व त्याच्या श्रेयाचा वाटा निर्विवादपणे आपणाला देण्यात आला नाही. आज लोक काय वाटेल ते म्हणोत, उद्या इतिहासकाराला निःपक्षपातबुद्धीने असेच म्हणावे लागेल की, "श्री. तात्यासाहेब केळकरांनीच धैर्याने व यशस्वीपणे या परि-स्थितीला तोंड दिले कॉंग्रेसच्या चळवळीचे तोंड केवळ ध्येयवादाकडून ध्येयवाद-मिश्रित व्यावहारिक मार्गाकडे वळविले " पण मनाला इतकेच टोचत रहाते की कॉंग्रे-सने आपला कार्यक्रम पूर्णपणे स्वीकारण्याच्या आंत आपण कार्यनिवृत्त होत आहां. पूर्णत्वाने व जाहीरपणे हे श्रेय आपणाकडे गेले असते म्हणजे निर्भेळ समाधान व आनंद वाटला असता. ( का. ना. धारप, प्रोफेसर, लॉ कॉलेज, मुंबई.)

( ता २०।४।३७ ) एकाच शब्दांत आपल्याबद्दल आदर दाखवावयाचा तर आपण व्यवहाराच्या बाबतीत "कृतार्थ" झाला आहात. हे भाग्य महाराष्ट्रासच नव्हे तर हिंदुस्थानातल्या फारच थोड्यांना लाभले आहे. ( क्ष, नैनिताल, तारा कॉटेज.)

( ता. २२।५।३७ ) राजकारणाच्या दृष्टीने अशा आणीबाणीच्या वेळी, विशे-षतः कॉंग्रेसने राजकारणाचे धिडवडे चालविले असता, आपल्यासारख्या मोहऱ्यास महाराष्ट्रास मुकावे लागले हा एक योगायोगच म्हणावयाचा. आपण आपल्या पराक्रमाने चांगलेच यश मिळविले आहे हे शत्रूदेखील कबूल करील. राजकारणाच्या भानगडीत आपण पडावयाचें नाही असे ठरविलेत तरी आपला वाङ्मयविलास सतत चालू असावा. वाङ्मयाच्या प्रांतात लीलेने वावरणाऱ्या आपल्या लेखणीस राजकारणाच्या विषयासंबंधाने देखील आपण विश्रांति देऊ नये.

आपला लेख वाचणे ही आनंदाची गोष्ट होय. महाराष्ट्रीयाची ही हौस आपण शक्य तोवर चौफेर पुरवावी. ( भास्कर बहिरो महाबळ, न्यायमंत्री, जमखंडी.)

—निरलसपणे व प्रामाणिकपणे विविध कार्यभाग वाहणारा सद्गृहस्थ महाराष्ट्रांत मला तरी दुसरा कोणी दिसत नाही. त्यामुळे महाराष्ट्रीय सार्वजनिक कार्यभागास गौणत्व येणार आहे. ( रंगाचार्य रड्डी, वाई. )

---

## ( १० ) उग्रबलोपासक चळवळ

जिला अत्याचारी चळवळ असे म्हणतात तिला उग्रबलोपासक राजकीय चळवळ असेहि नाव देता येईल. महाराष्ट्रात या चळवळीचा जन्म १८९७ त झाला. म्हणून चाळीस वर्षातील तिचे थोडेसे समालोचन करण्याचे योजिले आहे.

पुण्यास रॅडसाहेबाच्या खुनापासून व मुंबईस झालेल्या दंग्यापासून प्लेगची व्यवस्था कमी त्रासाची होऊं लागली. विशेषतः पुण्यास कर्नल के व मेजर रीड या नांवांचे जे दोन लष्करी अधिकारी प्लेगच्या व्यवस्थेकरितां सरकारी मुखत्यार म्हणून नेमले गेले त्या दोघानीहि जाताना पुष्कळच लोकप्रियता संपादिली. याचे कारण इतकेच की रॅडसाहेब कोणाशी धड बोलतहि नसे. त्याऐवजी हे दोघे प्लेग-व्हॉलंटिअर लोकांच्या गळ्यातहि वेळी हात घालीत. रॅडसाहेबानी लोकांची मदत मागितली असती तर त्यानाहि पुष्कळ स्वयंसेवक मिळाले असते. पण प्लेगच्या व्यवस्थेत खासगी लोक घेतल्याने ढिलाई होते, काम बिघडते, अशी समजूत त्यांनी करून घेतली असल्यामुळे, कोणी कांहीहि सुचवावयास गेल्यास हा मनुष्य उगीच तक्रारखोर आहे असे रॅडसाहेब घेऊन चालत. माझ्या त्याच्याशीं आलेल्या संबंधांत त्यांच्या कपाळाची आठी कधी निघालेली किंवा ते कोणाशी मनमोकळे करून बोललेले मी पाहिले नाहीत. बरें, उलट हांजी हांजीखोर लोकांचा त्यांच्याजवळ प्रवेश होता असेहि नाही. कारण असे लोक कांहीतरी डाव साधतात, त्यांना आपले काम करून घ्यावयाचे असते, हेहि रॅडसाहेबाला माहीत होते. मनुष्य सरळ, पण अधिकारी—तुसडेपणाचा नुसता कहर होता. आपल्या भोवती लोक इतके दुःखी कष्टी गांजलेले आहेत ही जाणीव

कायद्याचा जुलूम केला तरच निभावेल असे त्याच्या मनाने घेतलेले असल्याने, शिस्तीच्या दडपणाने दया-माया सहानुभूति हे सगळे मनुष्याच्या अंतःकरणांतले गुण त्याच्या ठिकाणी विरडून गेले होते. यामुळे रँडसाहेबाचा खून होण्यापूर्वी पहाणाराला असे वाटे की हा गावांत हिंडतो फिरतो, याच्यावर एखादा कोणी वैतागाने केव्हा हात टाकील याचा नेम नाही! अखेर हात पडलाच. मात्र तो वैतागाने नाही. तर हृदयात खोल घर करून राहिलेल्या रागाने!

अशा वेळीच राणीचा ज्युबिली उत्सव यावा हा एक अनिष्ट योगायोग होता. अधिकारी व्यक्तीचा दिमाख व साम्राज्याचा दिमाख दोन्हीहि लोकांना दुःसह वाटली. आणि प्लेग दुष्काळ अशा आपत्तींनी गांजलेल्या लोकांच्या उध्वस्त मनोभूमिकेवर ज्युबिलीचे असले उत्सव-समारंभ पहावयास नकोत असे म्हणून जाणते लोकहि डोळे मिटून मनात खती घेत. पैकी साम्राज्याचा दिमाख उतरविणे व्यक्तीच्या हातून कसे घडणार? पण व्यक्तिशः एक अधिकारी मारला तर साम्राज्याचे नाक कापल्यासारखेच झाले अशा समजुतीने काही माणसे रँडसाहेबाच्या खुनाला प्रवृत्त झाली. आणि ज्युबिलीच्या रात्री गणेशखिंडीच्या डोंगरावर पेटणाऱ्या प्रचंड होळ्याच्या उजेडाने आपण दृष्टीस पडू नये म्हणून हे लोक आसपासच्या झाडाझुडपात व मोऱ्यांच्या पुलाखालून दडून बसून आपली हत्यारे चाचपडत होते. गणेशखिंडीच्या बंगल्यातून मेजवानीनंतर गाड्यामागून गाड्या येत असता, म्हणजे त्याची रागच्या रांग लागली असता, या लोकांना नेमकी रँडसाहेबाची गाडी न्याहाळतां यावी, धावत्या गाडीच्या मागे त्याना चढता यावे, व कोणी न पहाण्याइतका अवसर मिळून त्यांना पिस्तुले नेम धरून व साधून उडवितां यावी, ही माणसाची कर्तबगारी म्हणण्यापेक्षां दैवाने मुद्दाम घडवून आणलेली घटना असेच म्हणावेसे वाटते. कारण अलीकडील क्रांतिकारकांच्या अत्याचारांच्या युगांत नेमका हवा तो माणूस, विशेषतः गोरा अधिकारी, हल्ला करणाराला सांपडला असें क्वचितच घडले असेल. करावयाला जावे एक, व्हावे भलतेच, असेच प्रकार पांचपन्नास तरी घडल्याची उदाहरणे देतां येतील. कोठे वेळ चुकावी, कोठे गाडींत माणसाचा अदलाबदल व्हावी, कोठे कांही कारणाने घाताला योजलेला मनुष्य बाहेरच पडूं नये, कोठे गोळीचा किंवा बाँबचा नेम चुकावा, तर कोठें आयत्या वेळी बाब उडूं नये किंवा पिस्तुल 'जॅम' होऊन जावें (म्हणजे त्याचा घोडा उकूंब

नये ) अशा गोष्टी झालेल्या आहेत. पण रँड साहेबाच्या खुनाच्या वेळी सगळ्याच गोष्टीचे योग जमून आले याचे आश्चर्य वाटते. आणि फिरून खून करणारे लोक अशा अचानक रीतीने निसटन गेले व लोकांत मिसळून गेले की, त्याना वहिमाने पकडल्यानंतर केवळ त्यांनीच आपल्या गुन्ह्याच्या कबुल्या दिल्या म्हणूनच गुन्हा नाशाबीत म्हणता येईना. नाहीतर निव्वळ आनुमानिक पुराव्याची माखळी सहसा पुरी जुळलीच नसती.

रँडचा खून करणारे चाफेकर बंधु मी स्वतः पाहिले होते. त्याचा बाप हा एक कथेकरी असून त्याचे एकदोघे मुलगे साथीला मागे उभे रहात. त्यांचे वास्तव्य कांही दिवस नागनाथाच्या पाराजवळच्या एका घरात होते. एका शिवाजी उत्सवातील त्याची कथा मी ऐकली आहे. एकवेळ दामोदर चाफेकर याला एका ठिकाणी (तो एक कारखाना होता) मी पाहिला तेव्हा तो कुऱ्हाडी व परशूंचे फाळ हाताळीत होता. अर्थात यावेळी त्याच्या मनात आपण पुढे एखादे अचाट कृत्य करू असे नसावे. मग तो व ही हत्यारे याचा संयोग पाहून माझ्यासारख्याच्या, म्हणजे त्याला क्वचित पाहणाऱ्या मनुष्याच्या, मनांत त्याच्याविषयी अशी कल्पना कशी येईल ? पण शेवटी कोर्टाच्या पिंजऱ्यात जेव्हा त्याला पाहिले तेव्हा पूर्वीच्या प्रसंगाचे एकदम स्मरण झाले. असो. दामोदरच्या पाठीमागून बाळकृष्ण व बाळकृष्णाच्या मागून वासुदेव हे तिघेहि बंधु खुनाच्या आरोपात सांपडून फांशी गेले हा योग इतका विलक्षण की तसा सर्व हिंदुस्थानांत आलेला कोणाच्या ऐकिवात नसेल.

रँड व आयर्स्ट यांचे खुन हे अशाप्रकारचे पहिलेच असल्यामुळे सरकारच्या मनावर त्यांचा विलक्षण परिणाम झाला. आणि ते तोडाने जरी असे म्हणत असले की "खुनाला भिऊन आम्ही प्लेगच्या व्यवस्थेचा जाच कमी केला नाही" तरी ते तितकेच ध्यावयाचे. इंग्रज-सरकार मोठे उद्योगशील. दर प्लेगजंतूगणिक प्लेगजंतू हुडकून काढून मारण्याची त्याची पहिली महत्वाकांक्षा पाहिली म्हणजे उद्योगावरील त्यांच्या विश्वासाची भीतिच वाटते ! पण वर्ष-दीडवर्षाच्या अनुभवानतर त्याचे त्यांनाहि कळून येऊं लागले की प्लेग-व्यवस्थेतील कांही कलमे निरर्थक आहेत. म्हणून त्यांचा अंमल त्यांनी हळूहळू कमी केला. सरकारच्या मनाने दोन्ही कारणे थोडथोडी खरी. पण लोकांनी मात्र पदराला पक्की गांठ मारून ठेवली । की, बिचारे चाफेकर बंधु गेले परंतु त्यांनी पुण्यां-

तल्याच काय पण पुण्याबाहेरच्या हजारो लोकांचा त्रास वांचविला ! कर्नल के व मेजर रीड हे अशा सफाईने लोकांशी वागू लागले की जणूकांही रँडसाहेब म्हणून कोणी होता, त्याचा खून झाला व तो प्लेग-व्यवस्थेच्या जुलमामुळे झाला ही गोष्ट त्यांना माहीतहि नव्हती !

रँडसाहेबांचे खुनी उघडकीस आल्यापासून १८९९ च्या मे पर्यंत पुण्यात प्लेगच्या धादलीतच चाफेकर बधुविषयी सर्व शहर बोलत होते. रस्त्यात बोलणारे कुजबुजून बोलत, कोणी दार लावून घेऊन बाहेर ऐक जाणार नाही अशा हलक्या आवाजाने बोलत. पण बोलल्याशिवाय रहात नसत. बायकामुलांच्या बोलण्यातहि हा विषय असे. गुन्हेगार म्हणून कोणी लोक पोलिसकोर्टापुढे प्रत्यक्ष उभे करी-पर्यंत लोकांना अर्थातच चाफेकरांची माहिती नव्हती. पण खुनाविषयी ते फार जपून बोलत. कारण पोलिसतपास जारीने सुरू होता. आणि कोणी थट्टेने किंवा भ्रमाने किंवा कल्पनेने कांही निव्वळ बोलले तरी फरासखान्यावर फुकट खेपा घालण्याची पाळी यावयाची ही भीति ! गुप्त-पोलीसाचा अर्थात फार सुळसुळाट झाला होता; व भिंतीला कान असतात ही म्हण जणू काय डोळ्यापुढे मोठ्या अक्षरांनी लिहिलेली प्रतिक्षणी दिसत असल्याप्रमाणे लोक तोंडाला पदर लावून बोलत. पुण्यांतील भाग्यामारुती रामेश्वर, जोगेश्वरी, गवत्या मारुती, वगैरे ठिकाणचे अड्डे गप्पाकरितां प्रसिद्ध आहेत. परंतु दामोदर चाफेकराला पोलीस पकडीपर्यंत या अड्ड्यांच्याहि तोंडाला कुलुपे लागली होती. उलट पोलिसांच्या बाजूनेहि हे म्हटले पाहिजे की त्यानी कोरड्या वहिमावरून उगीच भलत्या सलत्या तरुण मुलांना नेऊन त्यांचा छळ केला नाही.

या गुन्ह्याच्या तपासावर सुप्रसिद्ध गुप्त पोलीस मि. ब्रुइन यांची नेमणूक झाली होती. पण एका विशेष प्रकारच्या गुन्हेगारांना जरी ते कर्दनकाळ होते तरी रँडसाहेबाच्या खुनाविषयी कांही एक ठराविक कल्पना त्यानी मनाशी प्रथम पासूनच केली असावी. म्हणून गुन्ह्याचा तपास जारीने सुरू होता तरी तो पुण्यां-तील लोकांना फारसा जाणवला नाही.

चार तऱ्हेने चार लोक बोलूं लागले. सरकारच्या डोळ्याकडे डोळा ठेवून पहाणारे लोक सभा भरवून, पत्रे लिहून, किंवा खासगी भेटी घेऊन अधि-काऱ्यांपुढे या खुनांचा अत्याचारांचा तीव्र निषेध करू लागले. उलट कांही लोक

उघड फुशारक्या मारून म्हणूं लागले की "शाबास रे पुणे ! शाबास रे महाराष्ट्र ! या तरुणानी दाखविलेली वीरवृत्ति व केवळ पौराणिक नमुन्याचे धाडस अलीकड-च्या काळांत सर्व हिंदुस्थानांत कोणीतरी केले होते काय"? यावरून मग ब्राह्मण जातीची स्तुति आणि इतर प्रातातील लोकाची नादान म्हणून निंदा सुरू झाली. ज्याला राजकारणाची थोडीशी बाजू आहे असे हे खून १८९७-९८-९९ या साली महाराष्ट्रात झाले तसेच पुनः १९०९ च्या सुमारास घडून आले.

पण १८९७-९८ साली या कामी महाराष्ट्राला गर्व किंवा प्रौढी मिरविण्याची जी जागा होती ती पुढे उरली नाही. कारण १९०७ पासून अत्याचारी स्वरूपाचे राजकीय गुन्हे बंगाल्यातहि होऊ लागले. मद्रासेकडेहि कलेक्टर मि. ॲश यांचा खून झाला. व त्यानंतर हे चळवळीचे चक्र अलाहाबाद प्रांत पंजाब वगैरेकडे जे सरकले ते अजून तेथेच घोटाळत आहे, व कदाचित् हे चक्र उत्तर हिंदुस्था-नांत कायमचे फिरत राहील असा संभव दिसतो.

स्वराज्य मिळाल्यानेहि ते थांबेल असे तरी कोणी म्हणावे? कारण युरोप अमेरिका वगैरे खंडातून स्वराज्य व स्वातंत्र्य ही राष्ट्रांच्या पदरांत पुरी पडलेली असताहि तिकडे अत्याचार थांबलेले नाहीत मनुष्य स्वभावाला शिक्षण हे मवाळ करते असे म्हणतात पण शेकडा नव्वद शंभर लोकाना शिक्षण मिळणाऱ्या देशात आपले मत दुसऱ्यावर लादण्याच्या कामी युक्तिवादाबरोबर पिस्तुलाचा उपयोग सर्रास सुरूच आहे. असो. सांगावयाचा मुद्दा हा की महाराष्ट्रात हे पहिले पहिले खून झाले तेव्हा तरी हिंदुस्थानातील इतर प्रांत महाराष्ट्राला अत्याचारी चळवळीत गुरुस्थानी मानीत होते, व महाराष्ट्रहि त्या गुरुत्वाच्या मानाची जाणीव असल्यासारखा स्वतःकडे पहात होता.

या संबधाने बोलणारांचे दोन वर्ग वर सांगितले. पण महाराष्ट्राचा या कामी खरी अडचण असणारा तिसरा एक वर्ग होता. तो वर्तमानपत्रकारांचा. त्यांनी निषेध करावा तरी वाईट आणि ते खऱ्या मनाने सर्वस्वी निषेध करीत होते असेहि नाही. बरे, उघड सर्वस्वी स्तुति करावी आणि "करणाराने ठीक केले, असेच करावयास पाहिजे होते, छळाचा सूड उगवला, जुलमाचा बदला घेतला" असे म्हणावे तर राजद्रोहाचा व अत्याचारांना उत्तेजन देण्याचा गुन्हा म्हणून खटला व्हावयाचा. शिवाय वर्तमानपत्रकारांना सर्वस्वी तसे तरी कोठे वाटत होते? यामुळें त्यांना

दोन्ही बाजू बोलाव्या लागत. आणि या कशा बोलाव्या हीच एक प्रकारची करामत होऊन बसली होती.

पुढे झालेल्या बंगालच्या वगैरे चळवळीत अत्याचार घडत ते सहेतुक म्हणजे स्वराज्य संपादनाच्या उच्च हेतूने होत असले तरी ज्यांवर अत्याचार घडत ते लोक बरेचसे निरपराधी असत. कांही कांही माफीच्या साक्षीदाराचे खून झाले तेथे हेतु उघड होता. परंतु हिंदी पोलीस अधिकाऱ्यांचे खूनहि बरेच झाले, व त्यासंबंधाने लोकांना असे वाटे की यांतील बरेच लोक केवळ हुकमाचे ताबेदार असतां मृत्युमुखी पडले व त्यांना हुकूम करणारे गोरे अधिकारी मात्र सुटले! पुढे पुढे तर या अत्याचारांना दरोड्याची जोड मिळाली; व त्यांत पैसा मिळविण्याच्या हेतुसंबंधाने जरी लोकांना कांही विशेष वाटले नाही (कारण तो स्वराज्याच्या चळवळीत खर्च व्हावयाचा अशी समजूत) तरी दरोड्यांत निरपराधी माणसे अनेक हकनाक प्राणास मुकत, यापुरती तरी दरोडेखोरांना सहानुभूति नव्हती. जेथे रॉबिनहुडप्रमाणे केवळ गरिबाचा कैवार व गरीबांना ताप देणाऱ्या श्रीमंतांना शिक्षा असा कार्यक्रम असतो तेथे त्या चरित्राला एक प्रकारची अद्भुत रम्यता येते. परंतु जेथे निरपराधी मनुष्य विनाकारण दगावतो तेथे लोक त्या अत्याचाराचे समर्थन करूं शकत नाहीत.

महाराष्ट्राचे उदाहरण घेतले तरी रँडसाहेबाचा खून व जॅक्सन साहेबाचा खून या दोहोंत लोकांच्या दृष्टीने बराच फरक होता. रँडसाहेबाच्या खुनाबद्दल पापभीरु किंवा नेमस्त लोकहि म्हणत की, त्याने आपल्या छळवादीकर्माचे प्रायश्चित्त भोगले. पण जॅक्सनसाहेबाने असा कोणताच गुन्हा केला नव्हता. सिव्हिलियन लोक हे परकीय राज्याचे आधारस्तंभ, व जॅक्सनसाहेब हे त्यांतलेच एक ही गोष्ट खरी. तथापि हा गुन्हा प्रत्येक सिव्हिलियन रोज करीतच असतो, म्हणून प्रत्येक सिव्हिलियन हा मरणाच्या शिक्षेला पात्र होतो असे विधान जर कोणी केले तर ते कोणासहि पटणार नाही. परकी राज्य उलथून पाडण्याचा हक्क हा नैतिक स्वरूपाचाच आहे असे म्हटले तरी निरपराधी माणसांवर हात पडला असतां सहजच असा प्रश्न उत्पन्न होतो की, अशा कारणाकरितांहि असा माणूस मारणे ही अनीति नव्हे काय? प्रत्यक्ष युद्ध सुरूं असतां दुतर्फी पुष्कळच प्राणहानि होते. परंतु दोन्ही सैन्यांतील लोक संकीर्ण रीतीने एकमेकांना मारण्यासच उद्युक्त झालेले असतात. यामुळे युद्धांत केलेला वध हा कांहीसा आत्मसंरक्षणाच्या स्वरू-

पाचाहि असतो. शिवाय लाबून बदुकीने, मशिनगनने, किंवा तोफेने संहार होतो तेव्हां मारणारा व मरणारा हे एकमेकाना पूर्वी माहीत नसतातच, पण एकमेकांना समोरासमोर दिसतहि नाहीत. यामुळे "नाय हति न हन्यते" हे वचन एक-प्रकारे सिद्ध होते.

परतु जॅक्सन साहेबासारख्याच्या खुनाचे कोणत्याच रीतीने समर्थन करता आले नाही यामुळे कान्हेरे प्रभृति लोकाचे हेतु किवा त्याचे शौर्य हे कितीहि वाखाणण्यासारखे असले तरी त्याच्यासबधाने लिहिता बोलताना कोणीच कधी चागला शब्द लावला नाही. या खुनाच्या कटातील एक दोन मुलाची धैर्याची व निर्भयतेची वृत्ति तर येथपर्यंत गेली होती की, त्यानी पोलिस अधिकाऱ्याना बसल्या बसल्या हाताचे रक्त काढन दाखविले व एकाने राकेलच्या तापलेल्या चिमणीवर खुशाल बोट ठेवले ! परतु त्याचे धैर्य कितीहि असले तरी त्यानी केले ते कृत्य अपवादास्पद ठरले उलट दामोदर चाफेकराने पुढे आपला कबुली जबाब परत घेतला व दयेच्या याचनेसाठी हायकोर्टाकडे अर्जहि केला, तरी त्याने केले, ते सकारण केले व लोकाकरिता सूड घेण्याचा निस्वार्थीपणा दाखविला, असेच वर्णन त्याच्या कृत्याचे होऊन कमीपणाचा एकहि शब्द त्याज-विषयी कोणी बोलले नाही.

असो. महाराष्ट्राला काय किवा हिंदुस्थानाला काय ही अत्याचारमय राज-कीय चळवळ तेव्हा नवीनच होती; व तिच्या ह्या लोकोत्तर उत्पादकाविषयी काय म्हणावे काय न म्हणावे या विषयी वर्तमानपत्रकाराचे मन गोधळून गेल्यास त्यात काही नवल नव्हते. पण त्या वेळी ( १८९८ ) मराठ्यात मी स्फुट लिहून चाफेकरबधची अगदी उघडपणे स्तुति केली होती म्हणून त्यातील काही वाक्येच देतो. All the three brothers possessed extraordinary courage and bravery and used it for an unselfish but sentimental end and manfully bore the consequences, defying the very death to contempt and ridicule by their over-willing acceptance of it." ही मराठ्यातली माझी वाक्ये उद्धृत करून लगेच टाइम्स ऑफ इडियाने मोठा गवगवा केला, व अशी टीका केली की "ज्या लोकांच्या गळ्याभोवती फासाचा दोरच पडला पाहिजे त्यांच्या गळ्यांत टिळकांच्या मराठा-पत्राच्या संपादकाने स्तुतिपुष्पाच्या माळाच घातल्या आहेत." त्यावर उलट मीहि

टीका केली की " तुरुगांत असलेल्या बिचाऱ्या टिळकांचे नांव यांत ओढून काय होणार ? होय. आम्ही वाटेल तर पुनः स्पष्ट शब्दानी म्हणतो की हे लोक शूर व धैर्यशाली होते. हे आमचे मत प्रामाणिकपणाचे आहे. आणि टाइम्सने आम्हाला कितीहि धमक्या दिल्या व भय घातले तरी आमच्या वरील मताचे प्रतिपादन आम्ही पुनःच काय पण पुनः पुनःहि करू. चाफेकराबद्दल कोणलाहि करुणा व सहानुभूतिच वाटेल. मनुष्यस्वभाव हा कोठेहि असाच आहे. चाफेकरबंधु हे काही चोर किंवा खिसेकातरू नव्हते. त्यांनी खून केले त्यात स्वार्थबुद्धि मुळीच नव्हती. किंवा व्यक्तिशः त्याना झालेल्या छळाबद्दल त्याना सूड उगवावयाचा होता असेहि नाही. ते शिपाईबाण्याचे होते व त्याना लष्करात नोकरी मिळती तर त्यानी देशाकरिता बहादुरी करून दाखविली असती. म्हणन त्याना मिळणारी फाशीची शिक्षा ही, व्यक्तिशः त्याचे भवितव्य आता ठरलेले असले तरी, देशाच्या दृष्टीने ती हानि आहे, तो अन्याय आहे."

पण पुण्यातील आम्हा पत्रकारावर टीका करणारे नुसते ॲंग्लोइंडियन संपादकच नव्हते तर मुबईतील नेमस्त पक्षाचे पुढारीहि होते. या विषयावर काळ, केसरी, मराठा, या सर्वांनी एकाच प्रकारची विचारसरणी स्वीकारली होती व एकाच प्रकारचे शब्द वापरले होते. हे पाहून फेरोजशहा मेथासारखे लोक चकित झाले व त्याना रागहि आला. आम्ही लिहितो असे लिहून राजकारणाची घाण करीत आहो, व खुनासबंधाने सहानुभूति प्रगट करणे म्हणजे तो राजद्रोहच होतो असे नेमस्त पुढाऱ्याचे मत होते. म्हणून फेरोजशहा मेथा यानी आम्हा पुण्यातील वर्तमानपत्रकारांचे कान उपटण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण आमचे कान त्यांच्या हाताला न लागण्या-इतके आखूड होते. राष्ट्रीय सभेची सूत्रे त्याच्या हाती असल्यामुळे त्यांनी असाहि धाक घालून पाहिला की, " सरकार तुमचे काय करील न करील हे वेगळे, पण तुमच्या सारख्या लोकाना आम्ही राष्ट्रीय सभेत येऊ देणार नाही. आमच्या हाती या बहिष्काराचा दंड आहे, व त्याचा उपयोग करून आम्ही शिस्त राखूं." आमच्यापैकी शिवरामपत पराजपे हे फेरोजशहा मेथा यांना फार दूर होते. त्यांची गाठ पडण्याचा सभव नव्हता. पण मेथा व टिळक याचा परिचय, माझेहि येणे-जाणे, भेटणे-बोलणे, त्याच्या प्रभावळीतील लोकांशी होत असे. आणि मराठापत्र इंग्रजींत असल्यामुळे ते वाचीत. म्हणून प्रथम माझ्यावर शिस्त धरावी व मग

माझ्याद्वारे काळकर्त्यावर शिस्त धरावी असा त्यांचा उद्देश होता. पण तो फारसा साधला नाही. माझ्या एका भेटीनंतर फेरोजशहांकडे माझे मित्र अॅडव्होकेट सेटलूर हे एकदां गेले असतां मेथा त्यांना म्हणाले, " Mr. Kelkar argued with me very ably though of course I could not agree with him ".

बंगालच्या फाळणीच्या चळवळीतून प्रथम स्वदेशी बहिष्काराची आणि नतर राजकीय अत्याचाराची कायमची चळवळ निघाली हे प्रसिद्ध आहे. फाळणी रद्द झाली, तथापि स्वदेशीची चळवळ अजून टिकून आहे. चळवळ या नात्याने तिचे तीव्र स्वरूप जरी आता उरलेले नाही तरी तिची पाळे मुळे सर्व हिंदुस्थानभर लोकांच्या मनात खोल गेली आहेत, आणि तिचे प्रत्यक्ष कार्य आपोआप त्याच्या हातून यथाशक्ति होत आहे. उद्या स्वराज्य मिळाले तरी 'स्वदेशी' टिकणारच. आज स्वतत्र राष्ट्रामध्ये देखील स्वदेशातील उद्योग धदे वाढविणे, परावलबित्व नाहीसे करणे, आणि परकी राष्ट्राशी व्यापाराच्या कामी सहकार्य केले तरी या नाही त्या रीतीने त्या सहकार्याचा उपयोग शेवटी 'स्वदेशी'ला करून घेणे, असे धोरण सरकाराकडून राखले जाते. पण राजकीय हिसा किवा अत्याचार या चळवळी-चे तसें नाही. आधी ही चळवळ स्वराज्य किवा स्वदेशी याच्या चळवळीसारखी उघड व सघटित स्वरूपात करता येत नाही. ती प्रायः व्यक्तिमात्रांकडून किवा गुप्त मडळांकडून होते. ती यशस्वी झाली किवा अयशस्वी ठरली तरी तिचा सुगावा लागताच सरकारी अधिकारी तिचा पिछा पुरवितात, आणि तींत सामील झालेल्या लोकाना भयंकर शिक्षा सोसाव्या लागतात. यामुळे हातावर शीर घेऊन बाहेर पडणारे, सर्व नाशाला मनाने सिद्ध झालेले, असे निश्चयी लोकच तीत पडतात. उलट हत्यारांचा खेळ हा अद्भुतरम्य असल्यामुळे भावनावश पण कच्च्या दिलाचे असेहि काही अशा चळवळीत पडतात, आणि परिणाम भोग-ण्याची वेळ आली म्हणजे मात्र पस्तावतात!

ज्या राजकीय बदीजनांच्या मुक्ततेकरितां राष्ट्रीय सभेने गतवर्षी प्रचंड चळवळ केली त्यांतील पुष्कळसे या अत्याचारी चळवळीचे पुरस्कर्ते होते. म. गांधीच्या प्रेरणेने राष्ट्रीय सभेने आतां अनत्याचार व अहिसा याचे तत्त्व स्वीकारले आहे. राष्ट्रीय सभेने मंत्रिमडळे बनविलेली असून स्वतःच ती, या बंधमुक्ततेची खटपट, आपल्या शिरावर मोठी जबाबदारी घेऊन, करीत असल्यामुळे

वातावरण बदलले आहे. आणि बंधमुक्त झालेले बंदीजन अनत्याचारीत्वाचे तत्त्व स्वीकारू लागले आहेत, किंवा निदान तसे म्हणूं लागले आहेत. तथापि स्वराज्य दूर आहे. ते पदरात पडेपर्यंत साम्राज्यसरकारशी अनेक झगडे करावे लागतील. आणि तीव्र स्वरूपाची राष्ट्रीय चळवळ सुरूं झाली म्हणजे उग्रबलोपासनेचे तत्त्व फिरून आपले डोके वर काढण्याचा संभव आहे. पाशवी शक्तीशिवाय साम्राज्यसरकाराजवळ आतां दुसरे काही साधन साम्राज्य टिकविण्याला उरलेले नाही. साम काम देईनासा झाला तर त्याचा दंड पुढे सरसावणारच. तूर्त तरी अत्याचाराची चळवळ काही काळ थांबेल असे वाटते. पण या चळवळीच्या आठवणी अद्यापि इतक्या ताज्या आहेत, की झाले गेले विसरून गेले असे म्हणण्याला पुष्कळ काळ लोटला पाहिजे.

टिळकाना स्वराज्याच्या चळवळीत सर्व प्रकारची बलोपासना मान्य होती असा बाहेर सर्वत्र समज होता आणि तो खराहि होता. अत्याचारापासून होणाऱ्या परिणामांना राजकीय दृष्ट्या फारसे सद्यः फल नाही हे ते जाणत. तथापि 'साधनानां अनेकता ' हे जसे हिंदुधर्मांचे लक्षण ते मानीत असत, त्याचप्रमाणे राजकीय चळवळीचेंहि यामुळे कोणी तरुणाने स्वार्थत्यागाची अंतिम सीमा गाठण्याचे मनात आणल्यास ते त्याला उत्तेजन देत नसत पण त्याचप्रमाणे निवृत्त करण्याच्याहि खटाटोपांत पडत नसत. कारण अशी कामे स्वयस्फूर्तीनेच होणारी असतात. आणि ही स्फूर्ति जशी कोणी मुद्दाम करून प्रदीप्त होत नाही त्याप्रमाणे ती कोणीहि प्रतिकूल उपदेश करून ती हटवून धरतां येत नाही. आधी कोणी टिळकांना मी नक्की अमुक करूं की अमुक करू नको असे विचारावयाला येत नसे. अशांचा त्यांच्याशी विचारविनिमय व्हावयाचा तो निरपेक्ष तात्विकच व्हावयाचा. कोठें काही घडले तर मग त्याची बातमी त्याना दुरून कर्णोपकर्णी यावयाची. आणि अशा बाबतीतले प्रत्यक्ष ज्ञान मोठे अडचणीचे असते हे त्यांना माहीत असल्यामुळे, कधी कशा संबधाने काही माहिती काढावयाची तर ते ती आडपडदा ठेवून कानोसा घेऊन काढीत. या कडक धोरणासबंधाने प्रगट रीतीने त्यांची मते समजणे अशक्य असल्याने, त्याची पसंती नापसती ही कोणालाहि केवळ आपल्या मनाने उगाच काहीतरी अंदाजाने ठरवावी लागे. मात्र सर्व प्रकारचे लोक त्यांना येऊन भेटत आणि त्यानीहि कोणाच्या भेटीला कधी नाही म्हटले नाहीं. महाराष्ट्रांत अनेक लोक बॉब तयार करण्याची विद्या शिकले होते. त्यांचे आचार्य-

पद पा. म. बापट यांना दिले पाहिजे. १९०८ च्या प्रारंभी अरविंद घोष पुण्यास आले तेव्हा काही महाराष्ट्रीय तरुणानी त्याना प्रत्यक्ष बॉब करून उडवून दाखविले होते.

मी टिळकाच्या नित्य परिवारांतला म्हणून माझीहि गाठ भेट अशा लोकाशी पडे. त्यांपैकी काही माझ्याशी मन मोकळे करून बोलत तर काही मुख्य मुद्यासबधाने मुळीच न बोलता जसे काही आपण पुणे पाहण्याला व टिळकाचे दर्शन घेण्याला आलो असा बहाणा करीत. मला वाटते, अशा लोकाची माझी गाठ प्रथम १९०७ साली पडली. उत्तर हिंदुस्थानचा एक पाहुणा होतीलाल वर्मा टिळकाकडे आला. त्याला पर्वती दाखवून आणा म्हणून टिळकानी मला सागितले. मी त्याला घेऊन गेलो. तेव्हा सभाषणाच्या ओघात, मला विश्वासात घेऊन, त्याने युरोपातून आपण बॉब करण्याची कृति शिकून आलो आहो, ती कृति फारशी कठिण नाही, युरोपात हे ज्ञान सर्वसामान्य आहे, तथापि त्याचा उपयोग विशेष प्रसगीच करण्यात येतो, इत्यादि अनेक प्रकारची मनोरजक हकीकत सागितली. परंतु मला त्याने या चळवळीविषयी आपले मत विचारले नाही व मी होऊन त्याला ते सागितले नाही. अशा विचाराच्या पुण्यातील लोकाना माझी मते पर-स्पर कळून चुकली असल्यामुळे त्यांपैकीहि कोणी अशा विषयासबधाने माझ्याशी चर्चा करीत नसत. त्याना रहस्यात घेणारे आमच्यातले इतर काहीं होते. पण ते स्वतः मात्र भित्रे व अगचोर होते. माझी मते जहाल नाहीत या माझ्या दुर्लौकिकाचा उपयोग या कामी तरी मला बराच झाला. माझ्याविषयी तुच्छतेची भावना धरणारे लोक जालीम अशा उपायाविषयी माझ्याशी चर्चा कशाला करतील ! ते मला इतर व्यवहारापुरता स्नेही मानीत. परंतु अशा राजकारणात सल्लामसलत घेण्याला निरुपयोगी असा समजत. आणि ते बरोबरच होते. कारण त्यानी माझा सल्ला विचारल्यास तो त्याच्या मताच्या उलट पडणार हे त्यांना माहीत होते.

स्वार्थत्याग ही बाबच अशी आहे की ज्याला स्वार्थत्याग करावयाचा असेल त्याने स्वयंस्फूर्तीने व आपल्या जबाबदारीवर करावा. अशा बाबतीत कोणी कोणाचा सल्ला घेऊं नये. कोणी देऊंहि नये ! ज्याला स्वार्थत्याग करावयाचा त्याने तो स्वतःच्या हिमतीवर करावा; परिणामाचे धनी आपण या बुद्धीने करावा. स्वार्थत्याग हा ज्याचा त्याने करावयाचा असतो. जे करावयाचे ते ज्याचे त्याने

आपल्या जबाबदारीवर, आजूबाजूस न पाहतां, पुढील परिणामाबद्दल कुरकूर न करतां आणि ते सुद्धा स्वतःला वाटले म्हणून करावे. लोकानी सांगितला म्हणून स्वार्थत्याग करू नये. अशा रीतीने स्वार्थत्याग करणाराला एकान्तांत असतांना स्वतःच्या समाधानाचे तरी सुख मिळेल. स्वतःच्या मनाचे बक्षीस हेच खरे बक्षीस होय.

जी गोष्ट करण्याला आपण स्वतः तयार नाही ती लोकाना करावयास सागण्याचे पातक किंवा धाडस मी कधीच केले नाही. विशेषतः ज्या गोष्टी केल्यामुळे अलौकिक स्वार्थत्याग करावा लागेल, विशेष आपत्तीचे प्रसंग ओढवतील, मोठे खटले शिक्षा होतील, त्या प्रत्यक्ष करण्यास न सागण्याविषयी किंबहुना दुरूनहि त्याचा उपदेश न करण्याविषयी, मी सावधगिरी ठेवीत असे. ज्याने त्याने आपला स्वभाव आपले सामर्थ्य आणि आपली परिस्थिति पाहूनच वागावे, आणि आपण जे करूं त्याचे परिणाम आपले आपणच भोगण्यास सिद्ध असावे, त्यांत दुसऱ्यावर भार टाकूं नये दुसऱ्यास दोष देऊ नये, असे माझे कायमचे मत असे. यामुळे दुसऱ्या कोणी कांही लोकोत्तर असे केले असता त्याचे गुण मी मोकळ्या मनाने घेई व धैर्याच्या दृष्टीने त्याला मजहून श्रेष्ठ मानीत असे. तथापि आपण बाजूला राहून त्याला भरीला घालणे योग्य नाही असे मला वाटे. उलट कांही तरी अचाट किंवा अचरट-पणाने काम करणारा मनुष्य दिसला, आढळला तर त्याच्याशी वाद करून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्नहि मी फारसा कधी केला नाही. कारण स्वभाव हा दुरतिक्रम असतो. यामुळे अत्याचारप्रिय माणसे व मी याची सगत सोबत खेळी-मेळी घडत असली तरी, हा मुद्याचा विषय जसा कांही त्याच्या माझ्या मनांत नाहीं अशा समजुतीने त्यांचा माझा व्यवहार चाले. माझ्याभोवती वावरणारी माणसे काय उद्योग करितात याची चौकशी मी करीत नसे. आपण आपले काम करावे, मग आपला सोबती सांगाती कांही करो ! लोकांच्या संसर्गाने आपल्यावर नसते आरोप येतील या संशयाने आपले मन मी कधीहि ग्रस्त करीत नसे. ज्याला कर नाही त्याला डर नाही असा माझा स्थूल आत्मविश्वास असे. आणि हा माझा आत्म-विश्वास अखेरपर्यंत टिकला व फळाला आला.

अत्याचारी विचारांची लाट ओसरून गेल्यावर अशा लाटेत पूर्वी वाहवून गेलेल्या अनेक तरुणांनी पुढे आत्मनिरीक्षण केले. तेव्हां आपण अविचार केला होता हे त्यांचे त्यांनाच कळून आले. आणि आपणावर त्या अविचाराच्या अवधीत

कोणती संकटे आलीं कोणती कशी टळली याची माहिती कित्येकांनी अगदी मोकळ्या मनाने मला सांगितली आहे. कांहीनी असे सांगितले की, "त्यावेळी आम्ही तुम्हाला नेभळट शिळपट असे मानून तुमचा मनांतून तिरस्कार करीत होतो. कित्येक वेळां तुमच्याशी बोलत असतां आमच्या खिशांत पिस्तुलेहि असत. पण हा आमचा खेळ फार दिवस टिकला नाही. आणि आम्ही आमची जहाल मते अमलात आणण्यासारखे कांही धाडसहि पण करू शकलो नाही." नाशिकास जॅक्सन साहेबाचा खून होण्यापूर्वी महाराष्ट्रांत पिस्तुलांचे एक पेव फुटले होते ही गोष्ट आता प्रसिद्धच आहे. परतु नाशिकाशिवाय बाहेर एकाहि ठिकाणी या पिस्तुलांचा उपयोग झाला नाही. त्यांचा पत्तामुद्दा लागल्याने पुढे ती बहुतेक जप्त झाली. काही मुलाना हत्यारांच्या कायद्याखाली शिक्षा भोगाव्या लागल्या. एक दोन पिस्तुलेच नापत्ता किंवा नष्ट करण्यात आलीं. आणि सावरकरांच्या खट-ल्यानंतर अत्याचारी चळवळीचा महाराष्ट्रात बीमोड झाला. त्यापुढे लाहोर येथील खुनाकरितां राजगुरु हा पुण्याचा मुलगा फांशी गेला. आणि फर्ग्यूसन कॉलेजच्या लायब्ररीत वासुदेव गोगटे याचा हॉटसन साहेबाचा खून करण्याचा प्रयत्न अयशस्वी ठरून त्याला आठ वर्षांची शिक्षा झाली. पण हे व्यक्तिविषयक प्रयत्न होते. ती संघटित चळवळ नव्हती.

धाडसी तरूण मुले जशी कांही अचरटपणे वटवट करणारी असतात, त्या-प्रमाणेच कांही मनाची खबीर आंतल्या गांठीची असतात. ती आपले धाडसी विचार गुप्त ठेवतात. अशा प्रकारचाच राजगुरु हा मुलगा असावा. कारण त्याने कोणत्याहि सभेत काही भाग घेतलेला मला आठवत नाही. पुण्यांतील कोण-त्याहि प्रमुख पुढाऱ्यांशी त्याने आपले खरे विचार सांगून कधी विचारविनियम केला नसेल. त्याचा फोटो पुढे वर्तमानपत्रांत छापला तेव्हां या मुलाला मी केव्हां तरी ओझरते पाहिले असावे यापेक्षां त्याची मला अधिक माहिती किंवा आठवण स्मरली नाही. तीच गोष्ट वासुदेव गोगटे याची. त्याचा बाप कै. बळवतराव गोगटे हे मिरज हायस्कुलांत मला तीन वर्षे मास्तर होते. कांही दिवस ते व आम्ही एकाच वाड्यांत राहत असूं. या पूर्वऋणानुबंधाच्या स्मरणाने वासुदेव हा पुण्यास केव्हां केव्हां मला येऊन भेटत असे, आणि वडीलकीच्या नात्याने माझी सल्ला मसलत विचारी. हॉटसन साहेबावर त्याने ज्या दिवशी कॉलेजांत पिस्तुल झाडले त्याच्या आदल्याच दिवशी तो मला नेहमीप्रमाणे येऊन भेटला आणि अभ्यास-

विषयांची चर्चा करून गेला. ही गोष्ट पुढे पोलिसाना कळल्यावर सिटी पोलीस इन्स्पेक्टर मि. कोठावाला हे मजकडे आले. त्यांना मी सर्व हकीकत सरळ सांगितली. मला कोणतीच गोष्ट छपवून ठेवण्याचे कारण नव्हते. माझी मते त्या इन्स्पेक्टराला चागली माहीत असल्याकारणाने त्याने वासुदेवाच्या व माझ्या भाषणात हॉटसन साहेबाचे नांव निघाले होते काय असा प्रश्नहि विचारला नाहीं. वासुदेव मला भेटला तेव्हा त्याच्या मनात उद्यांचे विचार घोळत असावे, आणि न जाणो त्यावेळी त्यांच्या खिशात पिस्तुलहि असेल !

वर दर्शविल्या प्रकारच्या अनेक प्रसगातून मला जावे लागले तथापि मी अत्याचाराना उत्तेजन देणारापैकी आहे असा पोलिसाना कधीच संशय नव्हता. माझ्या सारख्या प्रमुख पुढाऱ्याचा वाटेल त्या प्रकारच्या मनुष्याशी सबंध यावयाचा, तथापि A man is known by the company he keeps, ही म्हण मला लागू करता येत नाही हे जाणण्याइतकी तारतम्य बुद्धि त्यांच्यामध्ये होती. मीहि आत्मविश्वासाने निर्भयतेने वागत असे. तथापि पहिल्या पहिल्या वर्षात पोलीस खोटे रिपोर्ट करण्यास चुकले नाहीत. अशा गुप्त रिपोर्टीचा पडताळा पाहणे कठिण असते. बेजबाबदार रीतीने ते वाटेल तसे रिपोर्ट करीत. निदान असा एक खोटा रिपोर्ट मजविरूद्ध करण्यात आला होता. तो असा की, मी मिरज येथे काही कामाला गेलो असता डॉ. भडभडे व मी असे मिळून कृष्णानदीच्या घाटावर गेलो आणि आम्ही तेथील दगडी बुरुजावर एक बॉब उडवून पाहिला ! या रिपोर्टाला काय आधार असेल याचे मला अजून आश्चर्य वाटते. हा रिपोर्ट ब्रिटिश पोलीसानी केला होता व तो पुढे कोल्हापूरच्या पोलिटिकल एजटाकडून चौकशीला निघाला तेव्हां मिरजेच्या पोलीसांनी तो खोटा पाडला म्हणतात. शिवाय गुप्तपोलीस खात्याकडून पुण्यास मजकडे चौकशी झाली तेव्हां मीहि तारखा वगैरेचा पुरावा देऊन तो खोटा आहे हे दाखवून दिले. अरविंद घोष पुण्यास आले तेव्हां त्यांना पुण्याच्या काही तरुणानी बॉब करून उडवून दाखविला तो पाहण्यास हजर असलेल्या लोकात मी होतो असाहि एक रिपोर्ट झाला होता. तो माझ्यापुरता तरी खोटा होता हे मी सांगू शकतो. मी साऱ्या जन्मांत एकच बॉब उडालेला पाहिला, तो १९२९ च्या एप्रिलमध्ये दिल्ली येथील असेंब्लीच्या सभागृहांत.

असो. असले खोटे रिपोर्ट माझ्यासंबंधाने मधून मधून होत, तथापि पुढे नाशिकचा खटला निकालांत निघून गेल्यावर पोलीस खात्याची खात्री झाली की बॉंब

करणारे व पिस्तुले वाळगणारे काही लोक माझ्या सगतीत जवळून किंवा दुरून येत असले तरी मी त्यांच्याशी सहमत नसतो. याचे एक प्रत्यतर एकदां मला मुंबई सरकारचे एक कौन्सिलर नामदार मॉरिसन यांच्याकडूनच प्रत्यक्ष मिळाले. मॉरिसनसाहेबांना कांही कारणाने पुणे मुक्कामी मी भेटावयास गेलो असतां त्याचा माझा खटला उडाला. ते रागावले व मीहि रागावून बोलू लागलो. त्या भेटीतली हकीकत निराळ्या अनुसंधानाने मी ' मराठे व इंग्रज ' या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणांत दिली आहे. प्रस्तुत इतकेच सांगावयाचे की, मॉरिसनसाहेब मला म्हणाले, " केळकर, तुमच्यावर सरकाराने अगदी कसून बारीक नजर ठेवली आहे. तुमचा संबंध अत्याचार प्रवर्तक लोकांशी असल्याचे अद्यापि सरकारच्या नजरेला पडलेले नाही. पण संभाळा, तसा प्रकार यत्किंचित् कोठे केव्हा आढळून आला तर तुम्ही व तुमचा केसरी याच्या काळजात आम्ही आपली कट्यार खुपसल्याशिवाय राहणार नाही !":ही कट्यार अर्थात् कायद्याचीच. तथापि मॉरिसनसाहेबानी मूठ वळून हात उचलून प्रत्यक्ष कट्यार खुपसण्याचे नाट्य करण्यास कमी केले नाही. या कट्यारीतून त्या बिकट काळांत मी स्वतः वाचलो आणि केसरीलाहि वांचविले. 'भित्र्या माणसाचा पराक्रम' असे याला कोणी विरोधाभासात्मक नाव दिले तर ते यथार्थच ठरेल. पण गुण व दोष यांचे स्वरूप असे मिश्रच असते.

सर्व प्रकारच्या त्यागामध्ये प्राणत्याग म्हणजे आत्मसमर्पण हा त्याग अत्यंत श्रेष्ठ ठरतो, याचे कारण उघडच आहे. ते हे की प्राणाहून अधिक प्रिय अशी दुसरी वस्तु जगात नाही. हा त्याग सती आपल्या पतिप्रेमाकरितां करिते, तर देशभक्तीने प्रेरित झालेले हुतात्मे स्वदेशाच्या प्रेमाकरिता करितात. आणि हा त्याग करण्याला प्रवृत्त झालेल्या लोकांचे हेतु नैतिक दृष्टया अत्यत उच्च मानावे लागतात. कारण निःस्वार्थीपणा हाच नीतीचा आत्मा होय. आतां अशा हुतात्मांच्या कृत्यांना व्यावहारिक शहाणपणाची कसोटी लागत नाही किंवा त्यांच्या कृत्यांची परीक्षा केवळ परिणामांच्या दृष्टीने करून त्यांना बरे वाईट म्हणतां येत नाही. तथापि अनाचार ( निष्क्रियता ) आणि अत्याचार ( बेसुमार कृत्य ) यांच्यामधला सुवर्ण-बिंदु छेडणारे लो. टिळकांसारखे व्यवहारचतुर मुत्सद्दी, आणि केवळ अहिंसेला नीतिसिंहासनावर बसविणारे म. गांधीसारखे सत्यसंशोधक दोघेहि हुतात्म्यासंबधाने सारखेच हळहळतात.

या मध्यबिंदूचा छेद करण्याचे धोरण टिळकांनी नेहमी जागृत ठेविले होते. व्यापक दृष्टीच्या मनुष्याला असेच करावे लागते. व्यष्टीप्रमाणे समष्टीवरहि त्याची दृष्टि असते. प्रसिद्ध इंग्रजी म्हणीविरुद्ध, समग्र वृक्षारण्य ( Wood ) व व्यक्तिशः वृक्ष या दोनहि गोष्टी टिळकांना एकसमयावच्छेदेकरून दिसत होत्या. सर्वांना शक्य किंवा सुलभ काय आहे हे पाहून व्यक्तिमात्रावरची बंधने त्यांनी मनाशी ठरविली होती. शिस्त किंवा अटक चांगली; पण तिलाहि मर्यादा आहे; व त्या मर्यादेचे उल्लंघन झाले असता लोकाकडून रोकडा अपमानच आपल्या पदरी पडेल हे ते पूर्णपणे ओळखीत होते. 'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्' या न्यायाने, एखाद्या चाणाक्ष पित्याप्रमाणे, स्वराज्याच्या चळवळीतील सहकारी लोकाशी ते वागत. स्वराज्याच्या कार्याला ज्याला जे देता येईल ते समाधानाने घेण्याला त्याचा हात नेहमी पुढे असे. जगाची म्हणजे मनुष्य स्वभावाची रचना त्रिगुणात्मक आहे हे गीताशास्त्री टिळक कधीहि विसरणे शक्य नव्हते. ते सामान्यतः राजसवृत्तीचे असले तरी, केव्हां तामस तर केव्हा सात्विक असे स्वतः असल्याचे त्यांचे त्यांनाच जर कबूल करावे लागले असते, तर नुसत्या सात्विक भावनेचा जुलूम त्यानी जनतेवर कसा चालविला असता ? त्रिगुणात्मकतेमुळे एकच मनुष्य निरनिराळ्या वेळी निरनिराळा दिसू शकतो. 'एक्स्ट्रिमिस्ट' हे टिळकाचे विशेषण जगत्प्रसिद्ध आहे. पण विलायतेत त्यानी 'मॉडरेट' म्हणवून घेतले; व १९०७।८ च्या चळवळीत कित्येक तीक्ष्ण भावनेच्या आपल्याच अनुयायाकडून त्यानी 'टिळक मूर्ख आहेत, त्यांना खरे राजकारणच कळत नाही' असे म्हणवून घेतले! या दोनहि गोष्टी प्रसिद्ध आहेत. टिळकांना काही लोक ( व्हायोलन्ट ) अत्याचारी मानीत हे चिरोलसाहेबांच्या आरोपावरून उघड होते. पण हे दूषण मानूनच टिळकानी चिरोलवर फिर्याद केली. उलट त्यांना सोळा आणे अनत्याचारित्वच सर्वकाल मान्य होते म्हणावे तर, सन १९०७।८ च्या चळवळीत त्यांनी सभा भरवून बंगाल्यांतील किंवा इतरत्र बॉबगोळे फेकणारांचा कधी निषेध केला नाही.

टिळकांनी सुखासुखी कोणासच अत्याचाराचा उपदेश केला नसता; पण आयाबहिणीवर जुलूम झाले असतां अत्याचारास कोणी प्रवृत्त झाल्यास त्याचाहि त्यानी हात धरला नसता. याचेच नांव मी म्हणतो खऱ्या मध्यबिंदूचा छेद. हेच कार्याकार्य-विषयक व्यावहारिक खरे शहाणपण व राजकारण. याच कारणामुळे

जनतेंतले सर्व प्रकारचे लोक टिळकांच्या संग्रहीं होते व उलट सर्व प्रकारचे लोकहि टिळकांना आपले मानून अतिशय चाहत.

गांधी अहिंसेचा उपदेश करणारे, तथापि त्यानी देखील भगतसिंग सुखदेव यासारख्या क्रांतिकारकाविषयी सहानुभति बाळगून त्यांच्या फाशीच्या शिक्षा रद्द होण्याची खटपट केली. केसरीचा बातमीदार याविषयी ता. ७ एप्रिल १९३१ च्या अंकांत लिहितो:—

"कित्येकांची अशी गैरसमजूत होती की, या तीनहि वीर पुरुषाचे प्राण वाचविण्याचा निश्चय महात्मा गांधींनी केला असता तर त्याचे प्राण वाचले असते; तो निश्चय त्यानी केला नाही व म्हणून त्याना मृत्यु आला व याला अप्रत्यक्ष कारण महात्माजी झाले या समजुतीनें कराची जवळच्या मालीर स्टेशनवर गांधीना काळया फुलांचे हार घालण्यांत आले व त्याचा निषेध केला गेला हे सर्वांस ठाऊक आहेच. परतु महात्माजींनी तेथेच आपण शक्य ते प्रयत्न केले असे स्पष्ट सागितले. वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना कराचीस मुलाखत देतांना एका गृहस्थांनी त्याना या बाबतीत प्रश्न विचारला असता गांधीजींनी सगद्गद होऊन सागितले की, "भगतसिंग वगैरेचा प्राण वाचविण्याकरिता मी माझा प्राण दिल्यास ते वाचतील असे असते तर मी माझ्या प्राणाचे बलिदान देईन असा माझा निश्चय होता, व तो मी अमलात आणला असता." कराचीस ता. २७ मार्चला त्याचे जे सार्वजनिक व्याख्यान झाले त्यातहि त्यांनी या प्रकरणाबद्दल बोलताना सागितले की, "तुम्ही मजवर फार रागावलात यांत आश्चर्य नाही. तसे करण्याचा तुम्हाला हक्कच आहे. पण राग करून भगतसिंग परत येणार नाहीत. कोणत्याहि मनुष्याला जितके करता येणे शक्य आहे तितके मी केले. बावीस तारखेला जेव्हा मला कळले की, दुसऱ्या दिवशी शेवटची भेट घेण्याकरितां त्यांच्या वडिलांना बोलावले आहे, तेव्हां मी रात्री व्हाइसरॉय यांना पत्र लिहावयास घेतले. पहाटे एक वाजतां उठून ईश्वराचे नामस्मरण करून त्याची प्रार्थना केली, पत्र पुरे केले व पाठवून दिले. त्याचा उपयोग झाला नाही हा माझा दोष नव्हे."

महात्मा गांधी व व्हाइसरॉय यांच्यामध्यें भगतसिंगाच्या बाबत काय संभाषण झालें हे कळणे तूर्त तरी अशक्य आहे असे लिहून 'हिंदुस्थान टाइम्स'चा एक

सन्मान्य विश्वसनीय बातमीदार त्या पत्राला लिहितो की, "एका पुढाऱ्यानें मला सांगितले की, भगतसिग वगैरे तरुण जर प्रत्यक्ष त्यांचे मुलगे असते तरी त्यांच्याकरितां गांधीजीनी केले यापेक्षां अधिक कांही केले नसते." भगतसिगासबंधाने हा बातमीदार लिहितोः——"भगतसिग वगैरे हुतात्मे सिंहासारखे शूर होते यांत शंकाच नाही. परतु भगतसिग हे धार्मिक वृत्तीचे तरुण होते. त्यांच्याबरोबरच लाहोरच्या सेंट्रल जेलमध्ये असणाऱ्या एका कैदी सद्गृहस्थांनी कांही हकीकत पाठविली आहे. ती बरीच उद्बोधक आहे. ते म्हणतात, "खटल्याचा निकाल होण्यापूर्वी भगतसिग आपल्या आप्तेष्टांच्या भेटीकरितां तुरुंगाच्या ऑफिसांत जात. एके दिवशी मी व ते एकदमच ऑफिसकडे गेलो व त्या दिवशी कांही कारणाने त्यांच्याशी बोलण्याची मला संधिहि मिळाली. मी त्याना विचारले की, 'खटल्याच्या निकालासंबंधी तुम्हाला काय वाटते?' माझ्या प्रश्नाला उत्तर देताना भगतसिग म्हणाले, 'मला फाशी देणार ह्याची मला खात्री आहे. मी मृत्यूला भीत नाही. किंबहुना लढाईत सापडलेला वीर या नात्याने मला वीराप्रमाणे गोळ्या घालून मारा असे मी म्हणत आहे, तरी मला हे लोक फांशीच देणार अशी माझी खात्री आहे. उलट त्यामुळे मी थोडा क्षुब्धच झालो आहे.' वरील शब्द ऐकताच माझी जिज्ञासा जागृत झाली व 'क्षुब्ध?' असे प्रश्नवाचक उद्गार माझ्या तोंडांतून निघाले. भगतसिग म्हणाले, 'होय. तुम्हाला माहीतच आहे की, दूर असलेला एखादा परदेश पाहण्याकरिता निघालेल्या तरुणांच्या मनाची स्थिति जशी असते त्याप्रमाणे मला वाटत आहे. ह्या जगांत काय आहे हे मी थोड्याफार प्रमाणांत पाहिले आहे. आतां परलोकांत काय मौजा आहेत त्या तरी पाहूं द्या. ह्या प्रश्नाकडे आपण मी म्हणता या दृष्टीने पहा, म्हणजे माझ्या मनाची स्थिति तुमच्या लक्षांत येईल. फांसावरून पळून जावे हा आमच्या कटाचा केव्हांहि उद्देश नव्हता. हा राजकीय खून आहे व तो करणारे क्रांतिकारक राजकीय लोक आहेत. नुसते स्वार्थाकरितां खून दरवडे घालणारे 'मलंगी' नव्हत हे लोकांच्या लक्षांत यावयास पाहिजे होते. म्हणूनच आम्ही मागून जाहीर पत्रके लावली. आम्ही कैदी झालों हेच बरे झाले. कारण आतां सर्व गोष्टी उजेडांत येतील.

"आमच्या धोरणासंबंधी आम्हास इतकेच म्हणावयाचे की, लोकांच्या इच्छा तृप्त व्हाव्या, व त्यासुद्धा सरकाराविरुद्ध त्यांची जी गाऱ्हाणी असतील त्या बाबतीत सूड घ्यावा व त्या योगे लोकांची सहानुभूति मिळवावी. आमच्या मते क्रांतिकारकांचे तत्त्वज्ञान व कल्पना लोकांच्या गळी उतरावयाच्या असतील तर त्या फांसावर शौर्याने चढणाऱ्या वीरांच्या तोडून निघाल्या पाहिजेत. तरच त्यात तेज आहे, वायफळ गप्पांत नाही. सरकाराशी प्रत्यक्ष लढाई करूनच आमच्या संघाचा निश्चित कार्यक्रम ठरवितां येईल असे आमचे मत आहे."

मात्र नवजवान पक्षातील तरुण लोकांकरितां म्हणून भगतसिंगांनी एक कैफियत लिहिली आहे. तीत तडजोड केव्हांहि करूं नये असे म्हणणाऱ्यांचे मत त्यानी खोडून काढले आहे. तडजोड करावी लागते. ती करणे योग्य आहे असे त्यांनी रशियाच्या इतिहासांतील अनेक उदाहरणानी सिद्ध केले आहे. पण त्यांचे म्हणणे हे की, तडजोड करतांना आपले सामर्थ्य आपण वाढवूं असा भरंवसा असेल तरच तडजोड करावी, एरवी नाही. या लिखाणाच्या शेवटी ते म्हणतात "या बाबतीतील माझ्या मतामुळे पुष्कळ गैरसमज होण्यासारखा आहे. माझे वर्तन जहाल क्रांतिवाद्यासारखे आहे. पण मी खुनी पक्षाचा नाही. मी उघड उघड क्रांतिवादी आहे. माझी मते तुरुगांत आल्यावर बदलली नाहीत. मी पूर्वीइतकाच उत्साही आहे. पण केवळ धाकदपटशाने सर्व कामे होणार नाहीत. इतर मुत्सद्दीपणा पाहिजे. नुसता बॉंब टाकल्याने उपयोग होणार नाहीच, पण कदाचित् नुकसानहि होईल."

म. गांधी व लॉर्ड आयार्विन यांच्यांत तात्पुरती तडजोड झाल्यानंतर सुखदेवांनी गांधीना लिहिलेल्या पत्राचा पुढील भाग लाला लजपतराय यांनी सुरूं केलेल्या लाहोरच्या 'पीपल' पत्रांत छापला आहे. सुखदेव या पत्रांत म्हणतात :—

"आपण तडजोड यशस्वी रीतीने घडवून आणल्यानंतर जाहीर रीतीने क्रांतिकारकांना अशी विनंति केली आहे की, त्यांनी कांही दिवसपर्यंत तरी आपली चळवळ बंद ठेवावी व अनत्याचाराच्या तत्त्वांचा जय होण्यास क्षेत्र मोकळे करून द्यावें. खरोखर चळवळ मागे घेणें हे तत्त्वांच्या अगर भावनांच्या दृष्टीने योग्य नाही. परिस्थिति तशी आली तरच पुढाऱ्यांनी चळवळी मागें घ्याव्या.

"सलोख्याची व तडजोडीची भाषणें करतांना आपण सांगितले आहे की, ही तडजोड आहे, शेवटचा तह नव्हे. आपण मागतां त्या सर्व सुधारणा मिळाल्या

तरी शेवटचा तह असे त्यांस म्हणता येणार नाही. शिवाय लाहोरचा ठराव आहे; त्यांत स्वातंत्र्य मिळेपर्यंत युद्ध चालावयाचे असे ठरले आहे. याचा स्पष्ट अर्थ असाच की, पुढील युद्धाकरिता अधिक सामर्थ्य उत्पन्न करण्याकरितां आपण विश्राति घेत आहो. आमच्या पक्षाचे नांवच 'हिंदुस्थान सोशॉलिस्ट रिपाब्लिकन पार्टी' असे आहे. आम्हांला पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे. समाज-सत्ता-वादाच्या तत्त्वाप्रमाणे समाजरचना झाली पाहिजे व हे काम अर्धवटपणे होत नसते. परंतु आम्ही आमचे धोरण पालटू. क्रातिवाद्याच्या रीति बदलतात. कधी उघड कधी गुप्त. कधी नुसती चळवळ तर कधी प्राण देणे व घेणे. अशी त्यांची स्वरूपे असतात. काही विशेष परिस्थितीत आम्ही आमची चळवळ मागे घेऊं. पण तुम्ही कोणतीहि अशी कल्पना पुढे मांडली नाही. नुसत्या शब्दांनी भावनांना हालवून विनत्या करण्याचा उपयोग क्रातिकारकांच्या बाबतीत होत नाहीं."

सरकाराने टिळकांना अत्याचारांना उत्तेजन देण्यासारखे लेख लिहिल्या-च्या आरोपावरून शिक्षा देऊन ६ वर्षें काळेपाण्यावर पाठविले, तथापि पुढे ५-६ वर्षांत म्हणजे टिळकांच्या गैरहजेरीत हिंदुस्थानांत ज्या गोष्टी घडून आल्या, त्या लक्षांत घेतां टिळक मार्गांतून बाजूला गेले तरी अस्वस्थता व अत्याचार या दोन्ही गोष्टी महाराष्ट्रांतच नव्हे तर इतर अनेक प्रांतांत सुरू होत्या. सरकारची बेजबाबदार राज्यपद्धति, अधिकाऱ्यांची जुलुमाकडे प्रवृत्ति, लोकमताविषयी बेगुमानपणा व प्रजेला स्वराज्याचे अधिकार देण्याची कुचराई, हीच कारणे असंतोषाच्या व अत्याचाराच्या मुळाशी होती. सरकारला चळवळ्या लोकांची चळवळ दिसत होती, पण स्वतःच आपण या चळवळीला किती जबाबदार आहो याची जाणीव त्याना नव्हती. आणि असली तरी शहामृग पक्षाप्रमाणें वाळूंत डोके खुपसून, आपणाला जग दिसत नाही असा बहाणा सरकारने चालविला होता. राज्यकारभारांत सुधारणा केल्याने, लोकांना राज्यकारभाराची गोडी लावल्याने, त्यांना अधिकार व जबाबदारी ही दोन्ही दिल्याने असंतोष आपोआपच हटतो ही गोष्ट त्यांना पुढे कळून आली; पण तीच गोष्ट आधी दहा वर्षें कळती तर पुष्कळ अनर्थ टळले असते. महायुद्ध झाले तरी तो एक अत्याचारच होता; पण फार मोठ्या प्रमाणावर अत्याचार इत-केच काय ते. जर्मनीने निरपराधी बेलजमवर स्वारी केली, फ्रान्ससारख्या बलाढ्य राष्ट्रावर प्राणसंकट ओढवले, व युरोपांतील लहानसहान राष्ट्रांचे स्वातंत्र्य संपुष्टात

आले; यामुळे प्रजास्वातंत्र्याची किमत सरकारला कळली. पण या गोष्टींचें मर्म आधींच ओळखून व स्वातंत्र्य नसल्याने हिंदुस्थानचे लोकहि मनांतून कसे अस्वस्थ झाले आहेत याची थोडीशी कल्पना आणून जर त्यांनी मोर्ले यांच्या सुधारणांची किडकिडीत करांगुली लोकापुढे न करतां आपल्या पाची बोटांचा हात स्नेहभावाने हिंदी लोकांच्या हाती देण्याकरिता पुढे धरला असता, तर सरकार व हिंदी प्रजा या दोघांनाहि सुख लागले असते. दहा वर्षांनी पुढे केलेली गोष्ट आधी वेळीच करण्याला जी कल्पनाशक्ति लागते ती सरकारजवळ नसल्याने, व प्राणावरच बेतेल तेव्हां प्रगतीचे पाऊल पुढे टाकण्याची घातुक संवय त्यांना असल्याने, त्यांनी वेळींच जी हालचाल करावयास पाहिजे ती केली नाही, यांत हिंदी प्रजेकडे काय दोष ? अत्याचारासारख्या गोष्टींनी आपली निराशा व्यक्त करणं हिंदी प्रजेला भाग पडले, हा स्वतः सरकारचाच दोष नव्हे काय ?

" अत्याचार होत असले तरी आम्ही सुधारणा करण्याला मागे घेणार नाही " हे लॉर्ड हार्डीज यांचे बोल शहाणपणाचे व मुत्सद्दीपणाचे होते यांत शंका नाही; पण अत्याचाराशिवाय आम्ही जागे होत नाही, अशीहि कबुली खरोखर वरील शब्दाबरोबरच द्यावयाला पाहिजे होती. उदाहरणार्थ, बंगालची फाळणी रद्द करणे ही गोष्ट साधी होती. यांत सरकारचे काही खर्च होत नव्हते. पण लॉर्ड मोर्ले यानी फाळणीला वज्रलेपाचे स्वरूप दिल्याने पुढे ओढवला तो अनर्थ लोकमताला मान देऊन आधीच फाळणी रद्द केली असती तर वांचला नसता काय ? आणि हा उघडा हिशेब सरळ असूनहि तो वेळेवर लक्षांत न घेऊन, उलट अत्याचाराची जबाबदारी योग्य मार्ग दर्शविणाऱ्या पुढाऱ्यांवरच सरकारने टाकण्याचा प्रयत्न केला हा केवळ दुहेरी अन्याय होय ! पण सरकार व प्रजा याच्या दरम्यान न्याय व अन्याय कोणाचा हे ठरविणारी न्यायपीठे जगांत असत नाहीत. आणि हा न्याय देण्याचा ज्याचा अधिकार, तो परमेश्वर स्तब्ध बसून राज्यकर्ते व प्रजा यांच्या चुरशीच्या सामन्याचा खेळ पहात असतो म्हणूनच जगांत असले अन्याय होतात हे उघड आहे.

हिंदुस्थानांत चाललेल्या या खेळामध्ये दोन्ही बाजूंचे गडी अर्थातच तुल्यबल नव्हते. गरीब बिचारे निःशस्त्र प्रजाजन, ते सशस्त्र अशा साम्राज्याधिष्ठित सरकारशी किती व कसे झगडणार ? यःकश्चित किड्यावर पाऊल पडले तर तोहि उलटून चावतो म्हणतात. त्याप्रमाणें हिंदी प्रजेंतील निरनिराळ्या वर्गांत जे तेजस्वी

स्वार्थत्यागी व धैर्यशील लोक होते, त्यांनी निर्वाणपदावर उभे राहून आपला राष्ट्रीय स्वाभिमान जगाला दाखविला, एवढी तरी गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येणार नाही. अशा लोकांत विद्वानांप्रमाणे अविद्वान सामील झाले, किंबहुना विद्वानापेक्षां अविद्वानच अधिक उत्साही व तेजस्वी ठरले. अशा लोकांत प्रौढ व वृद्ध यांच्याप्रमाणे तरुण पिढीहि आली,—किंबहुना प्रौढ व वृद्ध याच्यापेक्षां तरुणच अधिक तेजस्वी ठरले. या दोन्ही गोष्टी स्वाभाविकच होत. कारण शिक्षण व वयोमान याच्यायोगाने तेजावर एक प्रकारची झापड पडते, व धडाडीची टोके घासून निघाल्याप्रमाणे बोथट बनतात. पण ही गोष्ट हिंदुस्थानातच घडली असे नाही तर जगातील कोणत्याहि राष्ट्रामध्ये हाच अनुभव आलेला आहे.

रौलेट कमिटीने आपल्या रिपोर्टाच्या अखेर या काळात तीव्र स्वरूपाच्या राजकीय गुन्हेगारीत सापडलेल्या, व ज्याना प्रत्यक्ष शिक्षा झाल्या अशा, लोकांची एक जत्री दिली आहे. ती बंगालपुरतीच आहे तरी बोधप्रद असून सर्व हिंदुस्थानाकरिता उपलक्षणात्मक मानता येईल. या जत्रीत या लोकाचे वय, जात, धंदा वगैरे तपशील दिलेला आढळतो. तीवरून असे दिसते की, १९०७ ते १९१७ या १० वर्षांत अशा गुन्हेगारात शिक्षा झालेल्या किंवा मेलेल्या लोकांपैकी १५ वर्षांच्या आतील २१, २० वर्षांच्या आतील ४८, २५ वर्षांच्या आतील ७६, ३० वर्षांच्या आतील २९, ३५ वर्षांच्या आंतील १०, ४० वर्षांच्या आतील ९, ४५ वर्षांच्या वरचा १ असे इसम होते. यावरून या गुन्हेगारीचा मोसम मुख्यतः २५ वर्षांपर्यंतच होता हे दिसून येईल. एकदर १८६ लोकांपैकी १२४ लोक १६ व २५ यामधील वयांचे निघाले, व तीस वर्षांच्या वरचे अवघे २० निघाले. यावरून काय अनुमान निघते हे सांगावयालाच हवे काय ? जातीच्या दृष्टीने असे आढळते की वरील संख्येपैकी ६५ ब्राह्मण, ८७ कायस्थ व १३ वैश्य जातीचे होते. बाकी सर्व इतर जातींचे. पैकी पहिल्या तीन या बंगाल्यांतील मुख्य पुढारलेल्या जाती होत. महाराष्ट्रांत जशी ब्राह्मण जात चळवळीत पुढारी, तशी बंगाल्यामध्ये कायस्थ लोकांची जात पुढारी असल्याचे पूर्वीपासून प्रसिद्ध आहे व त्याचा अनुभव याहि बाबतीत आला. कायस्थांच्या खालोखाल ब्राह्मण वर्ग पुढे आला. यावरून राजद्रोही म्हणजे राष्ट्रीय भावनेची चळवळ करणारे लोक केवळ चित्पावन नसून इतरहि होते व असू शकत हे दिसून येईल.

धद्याच्या दृष्टीने पहालां तर ही जत्री विशेष बोधप्रद आहे. कारण यावरून असे दिसून येते की वरील संख्येपैकी ४८ विद्यार्थी, १६ शिक्षक, १९ जमीनदार २३ व्यापार उदीम करणारे, व बिनधद्याचे असे २४ लोक होते विद्यार्थ्यांची संख्या सर्वांत मोठी यावरून व १६ ते २५ वयांतील लोक १२४ होते यावरून, असे अनुमान उघडच निघते की राष्ट्रीय भावना प्रदीप्त होण्याला व हातून त्या भावनेला अनुसरून कांही प्रत्यक्ष कार्य होण्याला विद्यार्थी हेच स्वतःची पात्रता सर्वांत अधिक सिद्ध करितात ! हे वय स्फूर्तिदायक असते पण अविचारीहि असते; यामुळे या वयातील थोडेबहुत शिक्षण मिळवून राष्ट्रबुद्धि विकसित झालेल्या मुलाच्या हातून धडाडीची कृत्ये होतात, व धडाडी म्हटली म्हणजे तिच्यापाठीमागे थोडा अविचारहि असतो हे वेगळे सांगावयास नको. अर्थात या वयातील लोकांवर एका बाजूने सरकारचा, व दुसऱ्या बाजूने राष्ट्रीय पुढाऱ्यांचा डोळा असतो. पण तो निरनिराळ्या कारणांनी. केवळ राष्ट्रभावनेच्या दृष्टीने पाहिले असतां, स्वार्थत्यागाची तयारी हेच मुख्य प्रमाण किंवा माप ठरते. मग तो स्वार्थत्याग कोणत्याहि खात्यातला असो. तुरुंगांत जाण्यापेक्षां इतर प्रकारचा स्वार्थत्याग नसतो असे नाही. तुरुंगांत जाण्याची तयारी याचा अर्थ आपल्या कृत्याचे परिणाम भोगण्याची तयारी असा असल्यामुळे, नैतिकदृष्टया इतर स्वार्थत्यागाइतकीच याहि स्वार्थत्यागाची किमत ठरते. अनुभवाप्रमाणे विचार, विचाराप्रमाणे संकल्प व सकल्पाप्रमाणे योजना व तयारी हा क्रम लक्षात घेतला असतां, राष्ट्रीय चळवळीच्या या ७–८ वर्षांत तरुण मुलांनी आपापल्यापरीने कार्यकुशलता व योजकता बरीच दाखविली होती याविषयी मात्र कोणासहि कबुली द्यावी लागेल. पराधीन स्थितीत महत्वाकांक्षेचा मोठा घांस घेणे हा कोणाहि तिऱ्हाइताला पोरखेळच वाटणार; पण चळवळीच्या दिवसांत वृद्धांनी ज्याप्रमाणे तरुणाच्या बंडखोरीला व अत्याचाराला पोरखेळ म्हटले, त्याप्रमाणे या तरुणांनीहि साम्राज्याच्या सिंहासनावर बसलेल्या राज्यकर्त्यांपासून स्वराज्याची योजना किंवा मागणी करण्याकरिता होणाऱ्या सनदशीर चळवळीच्या पुढाऱ्याचे उद्योग हे पोरखेळच मानले.

रौलेट कमिटीने या काळांतील एकंदर गुन्हेगारीचा हेतु दंडेलीने हिंदुस्थानांतून इंग्रज सरकारला घालवून देण्याचा होता असा सरसकट शेरा मारला आहे. या हेतूच्या पोटांत साधनवैचित्र्यामुळे खुनापासून चोरीपर्यंत अनेक प्रकारची गुन्हेगारी आली. तथापि हेतु तोच व एकच, याविषयी कमिटीने ना-

कबुली दिलेली नाही. कमिटीच्या रिपोर्टाच्या ४ थ्या व ५ व्या भागांत गुप्त-मंडळ्या व त्यांचे उद्योग ह्याची जी विविध वर्णने दिली आहेत ती वाचली असतां उद्योग, धाडस, कल्पकता, चातुर्य, कलाकौशल्य हे गुण प्रकट झालेले दिसतात. या चळवळीत चोऱ्या झाल्या, दरोडे घातले गेले, हत्यारे चोरण्यांत आली, परदेशाहूनहि हत्यारे आणविण्यांत आली, हत्यारांचे शिक्षण देण्याचे वर्ग काढण्यांत आले, गुप्त मंडळ्या स्थापन करण्यांत आल्या, मंडळाच्या उज्ज्वल उद्देशपत्रिका लिहिल्या गेल्या, शिस्तीचे नियम बाधले गेले, जाहीरनामे प्रसिद्ध झाले, शत्रूंना व मित्रांना खलिते लिहिले गेले, ‘ सहकारी ’ तिजोऱ्या स्थापल्या गेल्या, कारभाराचे हुकूम सुटले, राज्यशासनाचा मायना तयार झाला, गुप्त न्यायकोर्टे स्थापली गेली, गुन्हेगारीच्या चौकशा झाल्या, शिक्षा फर्माविण्यात व बजाविण्यात आल्या, गुप्त बातमीचे टपाल, तारायत्र, तसेच कही व रसद पोचविण्याचे मार्ग आखले गेले, बॉब-गोळ्याचे ‘तोफखाने’ चालविण्यांत आले, सेनापति उपसेनापति नेमण्यांत आले, गुप्त हेरांची योजना झाली—तात्पर्य, राष्ट्राराष्ट्रामध्ये युद्ध सुरू असतां जे प्रकार अवश्य असतात किंवा केले जातात ते सर्व या तरुण लोकांनी केले. यात बुद्धि प्रतिभा वगैरे अनेक गुण बऱ्याच प्रमाणावर खर्ची पडले होते; पण युद्ध यशस्वी होण्यासारखी स्थिति नसल्यामुळे कोणत्याहि अयशस्वी चळवळीच्या वाट्याला जो उपहास ठेवलेला असतो तो याहि चळवळीचा आला. या चळवळीत पडलेले शेकडा शभर लोक सद्-गुणी किंवा शुद्ध बुद्धीचे होते असे कोणीहि मानले नाही. तथापि इतर गुन्हेगारांपेक्षां या गुन्हेगारीचा प्रकार वेगळा होता याविषयी सरकारलाच कबुली द्यावी लागली. या लोकांना स्फूर्ति कोणाकोणापासून मिळाली याविषयी रौलेट कमिटीने चिकित्सा केली आहे. त्यांत ‘ युगांतर ’ वर्तमानपत्रापासून तो भगवद्गीतेपर्यंत, व टिळक अरविंद घोष यांच्यापासून शिवाजीपर्यंत सर्वांची नावे घेण्यात आली होतीं. बंगाल्यांत विवेकानंद रामकृष्ण परमहंस वगैरेंची नावे प्रांतीय वैशिष्ट्याची म्हणून नमूद झाली होती. एका दृष्टीने राष्ट्रीय स्फूर्तीच्या उगमाचा हा निर्देश खरा मानावा लागतो; पण तो इतक्या अर्थानेच की जसा सर्व प्रकारच्या तेजाचा व उष्णतेचा उगम सूर्य व अग्नि हा होय. पाकसिद्धी करणारा अग्नि, तसाच घरे जाळणाराहि अग्नीच असतो. आणि जीवमात्र चैतन्याने अंकुरित होण्याला जसा सूर्यकिरण उपयोगी पडतो, तसेच विशेष कांचेतून सूर्यकिरण पाडले असता तो घातक अग्नीचें काम करतो. गुन्हेगारीत सांपडलेल्या लोकांनी वर सांगितलेली मोठमोठी

नांवे गुरुस्थानी म्हणून घेतली यांतहि शंका नाही; पण गुरूने निर्विकल्पक ज्ञान कोणते दिले व शिष्याने कोणत्या समजुतीने कोणत्या सविकल्पक कार्याकडे त्याचा उपयोग केला हा प्रश्न निराळा. मात्र या चळवळीत झालेल्या अत्याचाराकरितां सरकारने टिळकांसारख्या लोकांना जबाबदार धरून शिक्षा दिल्या तरी हे दूषण खोटे होते; व कोणाला मडाले येथे पाठवून तर कोणाला आपल्या पायाने पांदेचरी-ला घालवून बाजूला केले तरी चळवळ थाबली नाही व थाबणेहि शक्य नव्हते.

या उग्रबलोपासक किंवा क्रांतिकारक चळवळीसबधाने माझी मते काय आहेत याचे दिग्दर्शन वर झालेच आहे. अशी चळवळ करणाराविषयी मी केव्हाहि अनादर दर्शविला नाही. इतर कार्यात त्याच्याशी सबध सहवास सहकारिता उप-स्थित झाली तर ती टाळली नाही. उलट त्यांच्याशी स्नेहभावाने वागलो व शक्य ती मदतच केली. या विषयासंबधाने कांही पत्रे देतो.—

(ता. २८।१।१९३० ) लाहोरच्या कटातील आरोपीनी अन्नसत्याग्रह केल्यामुळे आणि यतिंद्रनाथ दास याच्या बलिदानामुळे अनेक प्रांतात जेल चौकशी कमिटी नेमणे सरकारास भाग पडले. काही जुजबी सूचना या कमिटीने केल्या, पण सरकार हा प्रश्न पुनः अगाबाहेर टाकीत आहे म्हणून लाहोर खटल्यातील आरोपीनी पुनः अन्नत्याग करावयाचे ठरविले आहे. होम मेबरशी चर्चा करून तुम्ही या प्रश्नाचा कांही निकाल लाऊन घेईपर्यंत तरी त्यानी अन्नसत्याग्रह करू नये अशी मी त्यांना सल्ला दिली आहे. तरी होममेबरला लिहिणे भेटणे बोलणे, अगर असेब्लीत प्रश्न विचारणे, वगैरे तुम्हाला जो मार्ग योग्य दिसेल तो पत्करून तुम्ही हा प्रश्न तातडीने हाती घ्यावा. कारण शिक्षा झालेल्या किवा अडर ट्रायल म्हणून कच्च्या कैदेत असलेल्या कैद्याची स्थिति फारच शोचनीय झाली आहे. दुसरी गोष्ट हद्दपार झालेल्याविषयी. हिंदुस्थानाबाहेर किती तरी देशभक्त खित-पत पडले आहेत की, त्यांना हिंदुस्थानात परत येतां येत नाही. १९०७ साली प्रसिद्धीस आलेले ( भगतसिंगाचे चुलते ) अजितसिंग यांची प्रकृति आणि आर्थिक स्थिति सध्या फार खालावली आहे तरी या लोकाविषयीहि तुम्ही प्रयत्न कराल अशी आशा आहे. ( डॉ. सत्यपाल, लाहोर. )

(ता. १२।२।१९३० ) कृपा करून पुण्याला तार करून आम्हाला मराठी इंग्रजी डिक्शनऱ्या पाठवा. रानडे आपटे व मोल्सवर्थ यापैकी जी चांगली

मिळण्यासारखी असेल ती धाडा. आम्हाला १९२४ व २५ सालचे असेंब्लीचे रिपोर्टहि लागतील. ( एस्. ए. डांगे, मिरत जेल. )

( ता. १५।२।१९३० ) आमच्या खटल्याच्या उपयोगाकरितां मी व इतर आरोपींनी सरकारकडे कांही पुस्तकांची मागणी केली आहे. ती हाती येईपर्यंत इतरांच्या मदतीवरच अवलंबून राहावे लागणार. आम्हाला तुमच्याकडून रेल्वे-बोर्डाचा या व गेल्या वर्षाचा रिपोर्ट, तेलाच्या खाणीसंबंधी टॅरिफ-बोर्डाचा, तसेंच खरकपूर रेल्वे सत्याग्रहासंबंधी चमनलाल यानी असेब्लीत केलेल्या भाषणाची प्रत पाहिजे आहे. आम्हाला ज्या ज्या वस्तु लागतील त्या आम्ही तुम्हांपाशी मागत जाऊं ! तुम्हाला मात्र त्या पाठविण्यास भुर्दंड पडेल. पण त्याला मजजवळ सध्य काहीच उत्तर नाही. ( एस्. ए. डांगे, मिरत जेल. )

( ता. २६।६।१९३० ) माझ्या पत्रानुसार तुम्ही केसरीत एक स्फुट लिहून मिरत आरोपींच्या बचावाकरिता लोकानी मदत करावी व पैसे येथे डिफेन्स कमिटीकडे पाठवावे अशी सूचना केली त्याबद्दल आभारी आहे. सेंट्रल डिफेन्स कमिटीचे तुम्ही एक सभासद असून या कामी विशेष लक्ष पुरविलें आहे. (एस्. ए. डांगे, मिरत जेल.)

( ता. २९।२।३१ ) आपण येथे ( मिरत येथील कोर्टात ) आलां तेव्हां मंडळीची गर्दी असल्यामुळे इतक्यादेखत उघडपणे मानलेले आभार औपचारिक दिसतील म्हणून ते तेव्हां मानले नाहीत. शिवाय तुमच्यासारख्या वडील माणसा-पुढे मी आभारप्रदर्शन करणे हे अमर्यादेचे वाटून मी तेव्हा मनात ते शब्द आव-रले. परंतु आता हे पत्र लिहून कळवितो की तुम्ही मला जी निरनिराळ्या प्रकारे पुष्कळ मदत केली तिजबद्दल आभार मानावे तेवढे थोडेच होतील. तुम्ही गेल्यानंतर मी आपल्या बायकोला तार केली आणि सरदारगृहांत तुमची गांठ घेऊन तुम्ही दिलेली पुस्तके कागदपत्रे वगैरे तुम्हाला परत देण्याविषयी कळविलें आहे. तुम्ही दिलेल्या रकमेपैकी तीस रुपये XXXXयाना दिले. कालचक्राचा तडाका आणि विध्वंसाचे कार्य यातूनहि निभावून जाऊन तुरुगातून सुटून तुम्हाला येऊन भेटेन अशी मला बळकट आशा वाटते. ( एस्. ए. डांगे, मिरत जेल. )

( ता. १९।४।३१ ) रा. रा. डांगे यांस—तुमचे पत्र पोचलें. तुमचा खटला बेसुमार लांबून तुम्ही सुमारे २॥ वर्षें कच्च्या कैदेत आहा हें पाहून फार वाईट

वाटले. कांहीं अमेरिकन कम्यूनिस्ट व क्रांतिकारक यांचे खटले सात सात वर्षें लांबल्याची उदाहरणे आहेत. पण हिंदुस्थानांत इतकी वर्षे लाबलेला खटला हा तुमचाच पहिला असे म्हटले पाहिजे. कैद टळत नाही म्हणून कसा तरी हा काळ कंठला पाहिजे. ध्येयवादी मनाने तुम्ही ज्या हालअपेष्टा सोशीत आहा त्याबद्दल मला फार कौतुक वाटते. हिंदुस्थानांत समाजसत्तावाद कितपत श्रेयस्कर होईल याबद्दल माझा तुमच्याशी मतभेद आहे. तथापि अभ्यासपूर्वक या विषयांत शिरून आपल्या मताची कांस धरण्यात व त्याकरितां हाल सोसण्यात तुम्ही जी चिकाटी व धैर्य दाखविले ती कौतुकास्पद आहे डॉ. मुजे हे हिंदी तरुणाच्या लष्करी शिक्षणाकरितां आणि लष्करी नोकराच्या हिंदीकरणाकरितां खटपट करतात याचे स्वारस्य तुमच्या लक्षांत नीटसे आलेले दिसत नाही. हिंदुस्थानात बेकारी नाहीशी करतां आली तर ती डॉ. मुजे याना नको असे नाही. पण हिंदुस्थानला स्वतःचे हिंदी सैन्य नको अशी जर तुमची कल्पना असेल तर ती मात्र डॉ. मुजे यांना कधीहि पटणार नाही. सोव्हिएट रशियाला स्वतःच्या सत्तेचे अस्तित्व राखण्यास जर सैन्याची गरज नको असे होत नाही तर, रशियाने बेकारीचा प्रश्न सोडविला आहे हे गैरलागू म्हणणे पुढे करण्यात अर्थ काय ? हिंदुस्थानचें रक्षण हिंदुस्थानच्या सुपुत्रांनीच करावे, व हिंदुस्थानला पूर्ण स्वराज्य ताबडतोब मिळावें या दोन गोष्टीबद्दल तरी तुमचा आमचा मतभेद असेलसे वाटत नाही ! तथापि, भावी राज्यघटनेचे स्वरूप समाजसत्तावादाचे असावे अगर दुसऱ्या कोणत्या वादाचे असावे याची, स्वराज्य मिळविण्यापूर्वी, आजच चर्चा करीत बसण्याचे स्वारस्य कोणते ? एकच एक व्यक्ति किंवा व्यक्तिसंघ याच्यापेक्षां समाज हा अधिकाराने केव्हाहि मोठा आहे, व आपणांस कोणती कशा प्रकाराची राज्य-घटना हवी हे समाजाने स्वातन्त्र्य मिळाल्यावर हवे तसे ठरवावे ! असो, आज तुमच्या बाबतीत माझे पाहणे इतकेच की, सेशन जज्जाकडून तुम्हाला योग्य न्याय मिळावा, व तुम्हाला शिक्षा झाली तरी सुद्धां ती भोगल्यावर पुनः देशकार्य करण्याला तुम्ही परत यावे अशी मी आशा करितो.

"मृत्यूच्या दारांत गेलेले कांही देशभक्त त्यांच्या सुदैवाने पुनः लोकांत येऊन देशकार्य करण्याची त्यांना संधि मिळाली अशी कांही उदाहरणे मी पाहिली आहेत. देव करो आणि तुमच्याहि बाबतीत तसेच घडो. तुम्ही स्वतःची स्वतंत्रता नष्ट होऊन तिकडे हालअपेष्टा भोगीत असतां, आम्ही लोक इकडे

मोकळे आहो ही गोष्ट मनाला डांचल्याशिवाय रहात नाही. असेहि मनांत येतें की, आम्हा तुरुगाबाहेर रहाणाऱ्या मडळीच्या आयुष्यांतील कांही वर्षे काढून घेऊन, तुरुंगांत हाल कठीत असलेल्या लोकांचे जीवन जर सुखी करतां येण्याची युक्ति परमेश्वर काढील तर किती बरे होईल !

" रा. निमकर यांच्याकडून पत्र येऊन एखादे वेळी तुमच्या खटल्याची हकीकत कळते.

" ज्युबिलीनिमित्त केसरीचा मोठा बडेजाव आम्ही केला असेल अशी तुमची कल्पना दिसते. पण तसे कांही एक नव्हते. नित्यक्रमांतील एक अवश्य कर्तव्य म्हणून येणारी ती गोष्ट होती केसरीला ५० वर्षे पुरी झाली, आणि ती पुरी झालेली पाहण्याला मी जगलो हीच गोष्ट माझ्या दृष्टीने विशेष होय. पण हा समारंभ करतानाहि भोवताली सरकारच्या दडपशाहीमुळे जी अशातता निर्माण झाली होती, ती पाहून मात्र मन अस्वस्थ झाले होते यात शका नाही. केसरी प्रबोध ग्रंथाची प्रत आज पाठविली आहे तुमचेकडे असलेली पुस्तके खटला संपल्यावर सावकाश इकडे पाठवून द्यावी. त्याची घाई नाही." (न. चि. केळकर.)

---

## ( ११ ) न्यायकोर्टाशीं ऋणानुबंध

न्यायकोर्टाशी माझा संबंध वकील या नात्याने जितका आला त्यापेक्षां पक्षकार या नात्याने अधिक आला ! साताऱ्यास मी अवघी नऊ महिनेच वकिली केली; व त्या अवधीत मला सुमारे तीन-चारशे रुपये प्राप्तीहि झाली. तथापि घरी कचेरी म्हणून नाही व कारकून तर नाहीच नाही. मिळाले त्यातले बरेचसे काम फौजदारी स्वरूपाचे होते. एक सेशन केसहि मिळाली, पण खुनाच्या खटल्यांत ज्याला वकील देण्याची ऐपत नाही असा आरोपी असला म्हणजे सरकार आपल्या खर्चाने त्याला वकील देते तसली ! वकील फी रोजी दहा रुपयेच असल्यामुळे हे वकीलपत्र म्हणजे नव्या तरुण व विशेष काम नसलेल्या वकिलालाच वर्णीदाखल मिळते. नवीन बी. ए. झालेल्या मुलाला ज्याप्रमाणे युनिव्हर्सिटीच्या परीक्षांचे प्रसगी सुपरवायझरशिप मिळते त्यांतलाच हा प्रकार असतो.

मी अगदी अल्पवयांत एल्एल्. बी. होऊन वकिली करूं लागलो यामुळें माझे कौतुक जे अनेक लोक करीत त्यांतलेच एक सातारा येथील डिस्ट्रिक्ट जज्जाचे शिरस्तेदार हे होते. त्यांनी हे वकीलपत्र मला दिले. खुनाचा मुकदमा आणि दोन दिवसांत मिळून वीस रुपये प्राप्ति असा तो त्यावेळीं मोठेपणाचा प्रकार होता. आरोपी एक खालच्या जातीतील बाई असून तिला मुकदम्यांतील माहिती विचारली तर धडपणे सांगताहि येत नव्हती. आणि मी वकिलहि तसाच नवा कोरा! मुकदम्यांत बचाव करण्यासारखी स्थितीच नव्हती. बाईचा जवळ जवळ कबुलीजबाबच होता. तथापि काही साक्षीपुरावा झाला, व वयाच्या तेविसाव्या वर्षी खुनी मुकदम्यात साक्षीदाराची उलट तपासणी करण्याचा मान मला मिळाला! या नऊ महिन्यात मी दोन दिवाणी अपिले असिस्टंट जज्जापुढे चालविली. पैकी अपेलटतर्फे ज्या अपिलात होतो त्यांत यश आले नाही व रेस्पॉडन्टतर्फे ज्यात होतो त्यांत यश आले! अर्थात हे पन्नास टक्के यश व पन्नास टक्के अपयश ही गोष्ट अपीलांच्या कामी होणारी नेहमीचीच घडली. पण मला पक्के स्मरते की यापैकी एका अपिलात विरुद्ध पक्षाला पुढारलेल्या वकिलापैकी एक गृहस्थ काका कुबेर नावाचे होते, त्यानी काम सपल्यावर मला सागितले की, "तुम्ही खरोखरच अपील चागले चालविले."

मी सातान्यासच वकिली करीत राहिलो असतो तर आज जुन्यातला जुना एक वकील म्हणून असावयाचा. आणि सामान्य रीत्या घरदार बाधून चार पैसे अधिक बाळगून मी राहिलो असतो असा सभव होता. परतु मी वकील व्हावे हा योग नव्हता. पुण्यास आल्यावरहि वर्तमानपत्राचे काम संभाळून वकिली करतां आली तर पहावी असा थोडासा प्रयत्न मी केला, पण तो फारसा साधला नाही. कारण दोन ठिकाणी लक्ष व त्यांतूनहि वर्तमानपत्राकडे अधिक लक्ष. यामुळे वकिलीच्या कचेरीत जितकी बैठक पाहिजे तितकी नाही. कोर्टातून वावरणे नाही. मिळून वकिलीचा बस बसण्याला ज्या गोष्टी अवश्य त्या नव्हत्या. तथापि मॅजिस्ट्रेट कोर्टात कांही मुकदमे मला मिळाले. त्यांत गोंदवलेकर महाराजांचे एक वकीलपत्र होते! तसेच शेतकी अॅक्टाप्रमाणे नेमलेल्या फिरत्या स्पेशल जज्जापुढे चालविण्याची कांही कामे मिळाली. अर्ज वगैरे लिहून देण्याचे बैठे कामहि मधून मधून मला मिळत असे. पुढे कोर्टात जाण्याचे मी अजिबात सोडून दिले. पण अर्ज वगैरे लिहिण्याचे काम मधून मधून सात आठ वर्षें करीत असे; व त्या कामांत घरबैठी

आतिहि काही होत असे. पण १९१० पासून, म्हणजे मी केसरीचा कायम संपादक झाल्यापासून, वकिली तर नाहीच पण अर्ज कैफियती लिहून देण्याचे कामहि थांबविले.

बिनपगारी वकीलपत्रेंहि माझी अनेक दाखल झाली, ती बहुतेक ताईमहाराज केस प्रकरणी. औरंगाबाद व उमरावती येथील कमिशनपुढे मी टिळकांच्या बरोबर त्यांचा वकील म्हणून होतो; व अनेक साक्षीदारांच्या जबान्या मी घेतल्या. क्लेमटसाहेब, स्पेशल मॅजिस्ट्रेट, याच्या कोर्टात दादासाहेब करंदीकरांच्या बरोबर माझेहि वकीलपत्र दाखल होते.

केवळ टिळकाचा एक दुय्यम प्रतीचा मदतनीस व वेळी पुढे करण्याला व किरकोळ काम उरकण्याला लागणारा एक वकील इतकाच मी होतो. तरी पण या नात्यानेहि काम करण्यांत माझा इतका वेळ गेला की तेवढ्या वेळात माझे दोन तीन ग्रंथ लिहून झाले असते !

१९०१ साली ताईमहाराज प्रकरणाला सुरुवात झाली. या प्रकरणाचा सविस्तर वृत्तांत मी टिळकाच्या पुरता टिळक–चरित्र खड २ यांत दिला आहे. येथे फक्त माझ्यापुरती हकीकत सागतो. एके दिवशी धोंडोपत येऊन सागूं लागले की, 'उद्यांपासून तुम्हाला दादाच्या बरोबर डिस्ट्रिक्ट कोर्टात यावयाला पाहिजे. त्याप्रमाणे कामाची व्यवस्था करीत जा.' कारण विचारतां असे समजले कीं, "कै. बाबामहाराजाच्या टिळक-प्रभृति ट्रस्टीना डिस्ट्रिक्ट कोर्टाकडून मिळालेलें प्रोबेट व मुक्त्यार पत्र रद्द करण्याचा अर्ज ताईमहाराजानी केला त्याची चौकशी सुरूं आहे; आणि पक्षकार या नात्याने टिळकाची जबानी होत असून टिळकांच्यावर काही काही गुन्हे केल्याची तोहमत आणण्याचा विचार डिस्ट्रिक्ट जज्ज मि. ॲस्टन याचा उघड दिसूं लागला आहे. स्वतः टिळक कोर्टात हजर असतात पण ते पिजऱ्यांतील साक्षीदार म्हणून. डिस्ट्रिक्ट कोर्टातील वकील रा. वाकनीस यांना टिळकातर्फे वकीलपत्र दिले आहे. पण आपला कोणीतरी माणूस जबान्या टिपून घेण्याला किंवा वकिलाला इतर रीतीने मदत करण्याला असावा हे बरे." ही मदत करता यावी म्हणून दुसरे दिवशी माझे एक वकीलपत्रहि दाखल करण्यात आले.

तेव्हापासून इकडे 'मराठा'पत्राचे काम संभाळून रोज कोर्टात राहणे हेहि माझे एक काम होऊन बसले, व ते पुढे मधून मधून पण दोन तीन वर्षे टिकले.

टिळकांच्या उलट तपासणीला ( आणि या उलट तपासणीत ताई-महाराजांच्या वकिलापेक्षां ॲस्टनसाहेबच अधिक कसून भाग घेत होते ) जसजसा रंग चढूं लागला तसतसे त्याला दिवाणीपेक्षां फौजदारी खटल्याचेच स्वरूप अधिक येत चालले. अशा वेळी वाकनीस वकिलांनी टिळकांना धीर द्यावयाचा तो सोडून "हे चिन्ह कांही ठीक दिसत नाही" असे म्हणून भीतीने त्यांनी स्वतःच इतके हातपाय गाळले की, त्यांचे वकीलपत्र रद्द करून दुसरा वकील टिळकाना द्यावा लागला ! शेवटी शेवटी ॲस्टन साहेबाची वर्तणूक इतकी अपमानास्पद होऊ लागली की, टिळकाची जबानी संपल्यानंतर पुढे त्याच्या कोर्टात हजरहि राहूं नये असे सर्वानुमते ठरले; व सर्व पुरावा संपल्यानतर टिळक व इतर ट्रस्टी याच्यातर्फे जी समारोपादाखल तक्रार सांगावयाची त्याचे काम टिळकानी मला सांगितले. टिळकांनी अर्थात् सविस्तर टिपण करून दिलेच होते, व त्यावरून मी तोंडी तक्रार तास दीड-तास सांगितली.

पुढे स्पेशल मॅजिस्ट्रेट क्लेमट्स्साहेब यांच्यापुढे सुमारे दीड वर्ष फौजदारी खटला चालला. त्यात माझे वकीलपत्र दाखल होतेच; व टिळकातर्फेचा पुरावा सुरू असता रा. करंदीकर वकील मधून मधून आयत्यावेळी न आल्याने साक्षीदार तपासण्याचे काम मला करावे लागले.

ॲस्टन साहेबांच्या प्रतिकूल निकालानतर टिळकावर मॅजिस्ट्रेटी काम सुरू झाले. तेव्हा पुष्कळ लोकाना असे वाटे की हरप्रयत्नाने काही तरी समेट करून हे प्रकरण मिटवावे. कारण दिसण्यात खासगी स्वरूपाचा फौजदारी खटला दिसला, तरी दुसऱ्या बाजूला सरकारची मदत सर्वस्वी होती. आणि खोटी साक्ष देणे, खोटे कागद करणे, असल्या गुन्ह्याकरितां टिळकाना शिक्षा झाली तर ती बेअब्रू विशेष प्रकारची म्हणून ती टाळावी असे सर्वांना सहजच वाटे. या प्रयत्नात माझ्या हातून भोळेपणाने एक गोष्ट होऊन गेली तिची मला अजून आठवण येते.

माझे मित्र विनायकराव रानडे, एलएल्. बी., व काका गोखले हायकोर्ट वकील, हे कांही अशी ताईमहाराजांचे पक्षपाती असे गणले गेले होते. वास्तविक ताईमहाराजापेक्षां टिळकांविषयीच त्याची आदरबुद्धि अधिक. पण ते ताईमहाराजांच्या शेजारी रहात असल्यामुळे त्यांचा पक्षपात शेजारधर्माचा म्हणून सहज होता. हे दोघे स्नेही एकदा मजकडे येऊन म्हणाले की "आम्ही स्वतः औरंगाबादेकडे जाऊन

प्रकरणाचा तपास करून मनाची खात्री करून घेऊन येणार आहों, व आम्ही खात्री होऊन आलो म्हणजे फौजदारी काम थांबविण्यात शक्य तितकी मदत टिळकांना करूं." टिळकांच्या बाजूला खरेपणा असल्यामुळे मला ही गोष्ट बरी वाटली; व टिळकांना न विचारतां मी या दोघांच्या नांवे प्रो. जोगळेकर यांजकडे ओळखीचे व कांही अशी भलावणीचे पत्र दिले. परंतु हे दोघे तिकडे गेल्यावर कज्जांतील साक्षीदारापर्यंत पोंचण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां प्रो. जोगळेकर यांना संशय आला, व त्यांनी माझे पत्र आपल्या पत्रांत घालून टिळकांच्याकडे पाठविले. ते पाहातांच टिळकांना सहजच फार राग आला. माझ्या पत्राचे परिणाम कदाचित् कोठवर जाऊं शकले असते याचीहि कल्पना त्यांनी मला आणून दिल्यावर, मी केले ते चांगल्या हेतूने केले असले तरी वस्तुतः अविचाराचे व भोळेपणाचे होय अशी माझी खात्री पटली. त्याबद्दल मला फार वाईट वाटले; व लगेच मी टिळकांची क्षमाहि मागितली. पण टिळकांनाहि माझा खरा हेतु लक्षांत आला होता म्हणून त्यांनीहि पुढे माझ्यासबंधाने या प्रकरणांत कोणताहि अविश्वास दाखविला नाही आणि वर सांगितल्याप्रमाणे माझे वकीलपत्र दाखल करून औरंगाबाद व उमरावती येथील कमिशनचे कांही काम मजकडून करून घेतले.

वकील या नात्याने माझा न्यायकोर्टाशी जो संबंध आला त्याचा आढावा हा इतकाच. पण पक्षकार या नात्याने न्यायकोर्टाशी माझा संबंध गेल्या पस्तीस चाळीस वर्षांत मधून मधून येतच गेला. सन १९०३ साली मी गायआळींतील घर विकत घेतले त्याबरोबर कोर्टांतील थोडेसे भांडणच विकत घेतले असे झाले. कारण मला घराच्या कांही भागाचा ताबा घेण्याला मामलेदारी व दिवाणी कोर्टांत फिर्यादी कराव्या लागल्या. आणि उलट चालू वहिवाटीला हरकत केली या खोट्या सबबीवर मजवर आकसाने फौजदारी फिर्यादहि झाली. या वेळी क्रॉससाहेब हे सिटी मॅजिस्ट्रेट होते. खटला आठ वेळ पुकारला गेला पण चालला नाही; व प्रत्यक्ष निघाला तेव्हां दहा मिनिटांत तो संपून मी निर्दोषीहि ठरलो. परंतु आरोपी म्हणून सातआठ वेळां कोर्टांत खेपा घालाव्या लागल्या.

खासगी बेअब्रूच्या फिर्यादी मजवर दोन तीन वेळां झाल्या. अर्थात त्या केसरींतील मजकुराबद्दल. एकदां वाईचे भाऊशास्त्री लेले यांच्याबरोबर एका ग्रामण्य-प्रकरणांत मजवर फिर्याद झाली. पण कोर्टांत हजर न राहाण्याची मला

परवानगी मिळून माझ्या गैरहजेरींतच मला निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आले.

एका बेअब्रूच्या फिर्यादीत मात्र मजवर चार्ज ठेवून नंतर मला निर्दोषी ठरवून सोडून देण्यात आले. ही फिर्याद केवळ चुरशीची होती. त्यावेळी मी म्युनिसिपालिटीचा व्हाइस-प्रेसिडेंट होतो, व निवडणुकीच्या याद्या कमिटीने अगदी वाईट केल्या असा गिल्ला करून किर्लोस्कर थिएटरात डॉ. गर्दे याच्या अध्यक्षते-खाली एक जाहीर सभा भरली. तिला मी " उपद्व्याप " असे केसरीत म्हटले. त्यावरून डॉ. भिडे या नावाच्या एका गृहस्थांनी मजवर सिटी मॅजिस्ट्रेट मि. वाच्छा याच्यापुढे बेअब्रूची फिर्याद केली. या फिर्यादीतील माझे काम मीच चाल-विले. उलट बाजूचे वकील कै. लक्ष्मणराव आपटे हे होते. पण अखेर केसरीने लिहिले यात खोटे किंवा बेअब्रूकारक काही नव्हते असे ठरवून मॅजिस्ट्रेट यानी मला सोडून दिले.

परतु खासगी लोकांच्या बेअब्रूच्या फिर्यादीत मला जे यश आले ते न्यायकोर्टाच्या बेअदबीच्या सरकारी प्रकरणात आले नाही. यातील पहिला खटला १९०८ साली मजवर झाला. न्यायमूर्ति दावर यानी टिळकाना शिक्षा देताना जे काही अपमानकारक उद्गार काढले त्यावर, व अर्थात सहा वर्षाच्या काळे पाण्याच्या शिक्षेवरहि, रागावून मी न्यायमूर्ति दावर याच्यावर 'मराठ्या'त खरपूस तांडसुख घेतले. तो लेख खरोखरच इतका चागला वठला होता की खुद्द नामदार शास्त्री यानी तो वाचन असे उद्गार काढले की " यातला एक शब्दहि बदलणे म्हणजे ते पाप करण्यासारखे होईल ! " पण त्या पुण्याचा मला अपकारच झाला. कारण चौदा दिवस कैद, शेवटी माफी, व भरीला बाराशे रुपये दंड, इतकी प्रायश्चित्ते मला त्या पुण्याकरितां घ्यावी लागली. माझा खटला न्या. स्कॉट् व न्या. बॅचलर याच्यापुढे निघाला. आरोपीने ॲफिडेविट प्रथमच करावयाचे असते त्यांत मी माफी मागावी असे पुष्कळांचे म्हणणे होते. परतु माफी मागणें म्हणजे "खरे म्हणून वाटले ते लिहिण्याचा अभिमान गमाविल्यासारखा होतो. म्हणून माफी मागूं नये " हे माझे, व मजप्रमाणे मत असणाऱ्या इतर काही स्नेह्यांचे, म्हणणे प्रभावी होऊन मी बिनमाफीची कैफियत दिली.

माझ्यातर्फे बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनी काम चालविले. खटल्याची सुनावणी दोन वेळां होऊन दुसऱ्या खेपेस कोर्टाने मला दोषी ठरविले व चौदा दिवसांची

कैद, बाराशे रुपये दंड, व चौदा दिवसानतरहि योग्य शब्दांनी माफी मागेपर्यंत बिनमुदतीची कैद, अशी शिक्षा फर्माविली. बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनी मनांत थोडीशी आशा ठेवून कोर्टाला विचारले की, शिक्षा दिवाणी तुरुगांतच भोगाव-याची ना ? पण न्यायमूर्तींनी ती गोष्ट नामंजूर करून शिक्षा फौजदारी गुन्हेगारां-च्या तुरुगांतच भोगावयाची असे स्पष्ट सांगितले. माझा अंदाज मला सुमारे सहा महिन्यांची शिक्षा होईल असा होता, व कांही मित्रमंडळीना मी तसे लिहिलेहि होते. अर्थात चौदा दिवसावर निभावले ही मोठीच गोष्ट झाली असे प्रथम वाटले. पण माफी मागेपर्यंत फिरून कैद अशीहि बिनमुदतीची शिक्षा असल्यामुळे तो आनद फुकट गेल्यासारखा झाला. शिक्षा झाली तरी चार सहा महिन्यापलीकडे होणार नाही असे दिसत होते तरी, "निकाल ऐकण्याला पुढे या," असे जेव्हा कोर्टाने मला हटकले तेव्हां कोर्टापुढे उभे राहून शिक्षा फर्माव-लेली ऐकण्याचा अनुभव काय असतो, त्याची थोडीशी चुणूक त्यावेळी समजली.

माझा अनुभव असा की, शिक्षेची जी भीति आधी कल्पनेने असते ती प्रत्यक्ष न्यायासनापुढे मनुष्य उभा राहिला म्हणजे त्याला तितकी राहात नाही. वाघाच्या कल्पनेची भीति एरवी वाटते तितकी वाघ अवचित समोर आला तर मनुष्याला वाटत नसावी. कारण भीति वाटण्याला मन मोकळेच नसते. ते उपाय-चिंतनाकडे लागते. जी गोष्ट टाळता येईल तिची तेथपर्यंत भीति. पण टाळण्याचा प्रयत्न संपला म्हणजे भीतीहि आपोआप संपते. याचा अनुभव इतर रीतीने मला यापूर्वीहि आला होता. १८९७ साली टिळकावर खटला होऊन शिक्षा झाली व मी केसरी—मराठ्याचा संपादक झालो, तेव्हा सहजच एखाद्या रिकाम्या वेळी मनांत कल्पना येई की, मीहि चुकून राजद्रोहाच्या कायद्याच्या तडाख्यांत सांपडलो तर कसे होईल ! पण ही जी भीति रिकाम्या वेळी वाटे ती प्रत्यक्ष लेख लिहिण्याला बसलो असतां वाटत नसे, व तेव्हां ती कोठच्या कोठेच निघून जाई असा माझा तरी अनुभव आहे.

तसेच १९०८ साली टिळकांवर 'केसरी'तील लेखांकरितां खटला झाला, त्याबरोबर 'मराठ्या'वर म्हणजे माझ्यावरहि खटला होणार अशी बोलवा होती. आणि ती मी इतकी खरी मानून चाललो होतो की, टिळकांना मुंबईस पकडल्यावर दुसरें दिवशी पोलीस अधिकारी गायकवाडवाड्याची झडती घेण्याकरितां आले, तेव्हां घरचा कोणी जबाबदार मनुष्य हजर पाहिजे म्हणून

मला तेथे जावे लागले. आणि मी तेथे गेल्यावर मला अटक होणार अशी एक-प्रकारची मनाला खात्री वाटत असल्याने मी तिकडे गेलो तो स्नान करून, कपडे बदलून, जानव्याच्या किल्लया काढून घरांत बायकोजवळ देऊन व दोन प्रहरी मी घरी परत न आलो तर शोध घ्या " असे घरच्या मडळीना सांगूनच गायक-वाडवाड्यात गेलो. मजवर वॉरटच नव्हते म्हणून मला अटक झाली नाही. परतु अटक होणार अशी मनाला खात्री वाटत असल्यामुळे एरवी जी भीति कल्पनेने वाटे ती गायकवाडवाड्यात जाताना किंवा गेल्यावर मला मुळीच वाटली नाही.

असो. न्या. स्कॉट यानी निकाल सागताच एक युरोपियन पोलीस सार्जट येऊन माझ्या माग उभा राहिला. त्याच्याबरोबर हायकोर्टच्या तळमजल्यावरील शेरीफ व कॉरोनर याच्या ऑफिसात मला नेण्यात आले. टिळकाच्या खटल्याच्या मानाने माझा हा खटला म्हणजे नगाऱ्या-पुढे टिमकी इतक्याहि दर्जाचा नव्हता. परतु टिळकाच्या खटल्यातूनच व त्याच्या पाठोपाठ हा खटला उपस्थित झाल्यामुळे, हायकोर्टात त्या दिवशी माझ्या खटल्याचाच पुकारा व बोलबाला चालू होता व अखेर काय निकाल होतो याकडे सर्वाचे लक्ष होते. कॉरोनरच्या कचेरीत नेऊन बसविल्यावर, तेथील मुख्य अधि-काऱ्याला मी कोण हे कळल्यामुळे, व माझी रवानगी तुरुगाकडे होत आहे असे पाहून, त्याने मला चहा आणून दिला. नतर सार्जटने गाडी आणली. तीतून आम्ही डोंगरीच्या तुरुगात गेलो. मला दाखल करून घेण्याचे बहुतेक सर्व विधि झाले. मात्र लंगोटी लावून झडती घेतात तशी घेतली नाही, व कपडेहि बदल-ण्यास सांगितले नाही. मला दाखल करून घेण्याची वेळ सुमारे चार वाजण्याची होती व माझे संध्याकाळचे जेवणहि व्हावयाचेच होते. म्हणून माझ्या वाटणीचे भरपूर अन्नाचे ताट आले ते घेतले पण मी थोडेसेच जेवलो. किंबहुना तुरुंगांत असेपर्यंत शक्य तितके थोडे जेवूनच रहावे असे मला वाटले. कारण तुरुंगांत संध्याकाळानंतर बहिर्दिशेला जाण्याचा मोठा त्रास असतो. तो टाळण्याचा मी निश्चय केला होता.

जेवणास लोखडाची थाळी व पाणी पिण्याला लोखंडाचे पंचपात्र ही दोनच भांडी मला दिलेली असून, प्रथम चार दोन दिवस मीच ती बाहेर नेऊन आपल्या हाताने घाशीत असे. आणि शेण लागावे लागूं नये व अन्नहि जागेवर पडूं नये, म्हणून एक शीतहि खाली पडूं न देतां मोठ्या काळजीपूर्वक जेवण

करीत असे ! तेल, कांदा, तिखट यांचा कंटाळा नाही, किंबहुना ते आवडीचे पदार्थ; यामुळे आमटी भाजीची अडचण वाटली नाही. ती अस्वच्छ असल्याची शंका मनात येई, किंवा दाताखाली संशयास्पद पदार्थ सापडे, तेव्हा मात्र कचरून जाऊन मी पुढे हातच थांबवी. पहिले चार-पांच दिवस नुसती डाळ भाकरी खाऊन गेले. त्यानंतर जेलर मला आपण होऊन सकाळ संध्याकाळ पावशेर दूध, त्यांत चिमूटभर साखर टाकून, देऊ लागला. तात्पर्य, केवळ उपाशी नव्हे पण कमी खाऊन रहाण्याची मनातील योजनाच असल्यामुळे मला तुरुंगवासांत अन्नाच्या दृष्टीने विशेष त्रास झाला नाही.

एक कांबळे अंथरायला व एक पांघरावयाला अशी दोनच मिळाली. आणि मला तर उशीची सवय असल्यामुळे, दुसरे कांबळे दुमडून त्याची उशी करावी लागल्याने फक्त सदऱ्यावरच पांघरुणाचे काम भागवावे लागे. पण ते दिवस मुंबईतील आक्टोबरचे, यामुळे तीहि अडचण वाटली नाही. खरा त्रास झाला तो पहिले दोन दिवस कोंडलेल्या जागेत निजण्याचा व त्यातूनहि ढेकणांचा. पहिल्या दिवशी 'सेल'मध्ये कोंडून ठेवल्यानंतर, चारपायीवर एक कांबळ पसरून व दुसरे उशाला घेऊन मी निजलो व लवकरच मला झोप लागली. परंतु डोंगरीच्या तुरुंगाची इमारत अगदी जुनाट असल्यामुळे सर्व खोली खालवर ढेकणांनी भरून गेलेली होती. रात्री दहा वाजण्याच्या सुमाराला खालचे ढेकूण बाजेवर चढले व वरच्यांनी जुनाट किलचातून खाली उड्या घातल्या. हळू हळू कांबळ्याचे अंथरूणच हलूं लागल्याचा भास होऊ लागला व सगळ्या अंगाला टांचण्या टोंचल्या सारख्याहि होऊ लागले. दिवाबत्ती नव्हतीच व असती तरी काय उपयोग ! तात्पर्य, मला खाटेवर उठून बसावे लागले व बसल्या बसल्या मिळेल ती झोप घेऊन सर्व रात्र काढावी लागली.

आदल्या दिवसाच्या जाग्रणामुळे दुसरे दिवशी दिवसा मला झोप येऊं लागली. आणि संध्याकाळ होतांच कालच्या आठवणीने पोटांत गोळा उभा राहिला. पण अर्थात तीहि रात्र तशीच काढावी लागली. तेव्हां तिसरे दिवशी मी वॉर्डरकडून जेलरला बोलाविले, व मला सिव्हिल सर्जन ( जेल सुपरिंटेंडेंट ) पुढे उभे करा म्हणून सांगितले. त्यावेळी सर्जन कॅप्टन बॅरी हा होता. पुण्याच्या प्लेगच्या अमदानीत तो अधिकारी असून, म्युनिसिपालिटीवर व तिच्या सगळ्या सभासदांवर

त्याने सडकून टीका करून सरकारकडे रिपोर्ट केला होता. अर्थात हा दुष्ट मनुष्य राजद्रोही पुणेकर ब्राह्मणाची तक्रार कसची ऐकतो असे वाटले. पण मी सर्व हकीकत सांगितल्याने त्याला खरी कल्पना आली, व दोन दिवसाच्या जाग्रणानी माझी अवस्था काय झाली हे त्याला माझ्या तोंडावरून व डोळ्यावरून सहजच दिसण्यासारखे होते. तेव्हा त्याने जेलरला सांगितले की यांना आजपासून व्हरांड्यांत निजू द्या. त्यामुळे एकामध्ये आयतीच दोन कामे झाली. व्हरांडा गज लावून बंद केला होता तरी वरचा भाग उघडा होता. यामुळे नवी चारपायी व नवी कांबळी घेऊन निजतां आल्यावर, मला तिसरे दिवसापासून झोप मिळू लागली व या कैदेचे खरे कष्ट दोन तीन दिवसातच संपले

वार्डर लोक सुजाण होते. त्यांनी इतर कैदी मजपासून बरेच दूर ठेवले, व माझ्या निम्या व्हरांड्यांत कोणी येऊ नये असेहि केले. पुढे पुढे तर मी तोटीखाली बसून स्नान केल्यावर 'धोत्रे तशीच पडू देत जा' असे त्यानी मला सांगितले, व कोणाकडून तरी ती धुववून घेऊन ते घड्या घालून हळूच मला आणून देत. बहिर्दिशेला जाण्यासंबधाने तर त्याचा मला चांगलाच उपयोग झाला. तो असा की सकाळी साडेसात आठाचे मुमारास इतर कैद्याचे प्रातर्विधि आटपले, व पाणी फिनाइल टाकून जागा स्वच्छ झाल्या, म्हणजे वॉर्डर मजकडे मनुष्य पाठवी. आणि तेथे गर्दी होऊ नये म्हणन दाराशी दूर एखादा मनुष्यहि उभा करी या चौदा दिवसात खाण्यापिण्यासुद्धां सर्वच गोष्टीचा इतका नियम बसून गेला होता की त्या चौदाहि दिवसात, दिवसांतून एकाहून अधिक वेळा मला बहिर्दिशेला जावे लागले नाही! या स्वच्छतेच्या मुख्य एकदोन गोष्टीत माझा स्वभाव जरासा जिकीर करणारा असल्यामुळे, तुरुंगाचा प्रसंग असता मला खरी अडचण जेवणाखाणाची वाटत नाही. ते कसलेहि चालू शकेल, पण अस्वच्छतेची जिकीर किंबहुना भीतिच मनाला वाटते. १९३०–३२ च्या कायदेभंगाच्या चळवळीत राजकीय कैद्याना खाणे पिणे चमचमीत मिळत असे आणि बरोबरचे स्नेहीसोबती पुष्कळ. अर्थात् तुरुंगाची भीति कसली ! पण ती चळवळच असमर्थनीय आहे असे वाटे म्हणून मी खरखरमुंडेपणा करून कसेहि करून पण तुरुंगात जाऊन बसलेच पाहिजे अशी आकांक्षा बाळगली नाही.

असो. अशा रीतीने तुरुंगांतील व्यवस्था बिनत्रासाची झाली होती, चौथ्या पांचव्या दिवशी सॉलिसिटरचे कारकून काका महाजनी यांनी, मी मागितल्यावरून, शेक्सपियरच्या नाटकांचा एक समग्र ग्रथ आणून दिला होता. मग वेळ जाण्याचीहि काळजी राहिली नाही. सकाळी आठ साडेआठ वाजल्यापासून वाचण्याला सुरुवात करावी ती सध्याकाळचे पाच वाजताचे जेवण होईपर्यंत. यामुळे उरलेल्या नऊ दिवसांत शेक्सपियरची बरीच नाटके मी वाचून काढली. आणि एकान्तवासाचा आमच्यासारख्या कैद्याना जो एरवी सहजच त्रास वाटावयाचा तो मला वाटला नाही. शिक्षा चौदा दिवसाची व खोलीतील तक्तपोशीला चौदाच कड्या असा गमतीचा मेळहि बसल्यामुळे, माझे ते एक पंचागच होऊन राहिले. आणि या कामी लहानपणी वाचलेल्या रॉबिन्सन क्रूसोच्या गोष्टींची मला वरचेवर आठवण येऊन हसूहि येई. मुख्य जेलर पारशी होता व असिस्टंट जेलर मद्रासी होता. तो दिवसांतून दोन वेळ, निदान सध्याकाळी तरी एक वेळ, माझ्या कोठडीच्या गजाशी बाहेर उभा राहून उभ्या उभ्या खुशाली विचारून जाई. अशा रीतीने एकाने गजाच्या कठड्याबाहेरून व एकाने आतून बोलण्याची वेळ आली म्हणजे, प्राणिसग्रहालयातील पिजऱ्यात कोडलेल्या प्राण्याची आठवण होई व आत्मौपम्यबुद्धीने त्याना काय वाटत असेल याची मी कल्पना करी. पण ही तुलनाहि वस्तुतः बरोबर नव्हती कारण प्राणीसग्रहालयातील कैद्याना बुद्धीच नसल्यामुळे एका स्वातत्र्याशिवाय त्यांना बाकी सर्व सुखच. पण कैदेतील मनुष्याला एकान्तवास हाच दुःखप्रद होतो म्हणून साध्या कैदेची शिक्षा झालेले लोकहि मुद्दाम होऊन काम मागून घेतात असा अनुभव आहे. पण मला तर खुद्द शेक्सपियरसारखा जोडीदार सभाषण करण्याला मिळालेला. मग मला दुःख कसले ? आणि खरोखरच या नऊ दिवसात जितक्या एकाग्रतेने माझे वाचन झाले तितके साऱ्या जन्मातहि क्वचितच झाले असेल असे मला वाटते.

शिक्षेचे चौदा दिवस सपण्याच्या सुमारास एक प्रश्न मात्र उपस्थित झाला. तो हा की, हायकोर्टाला माफी लिहून देईपर्यंत मला कैदेत ठेवावे असा हुकूम असल्यामुळे चौदा दिवस संपण्याच्या सुमारास माफी लिहून देऊन मोकळे व्हावे किंवा हट्टाने माफी लिहून न देतां तुरुंगवास लांबवावा ? या खटल्यांत मला चार सहा महिने तरी शिक्षा होईल असा माझाच अदाज असल्याचे मी वर लिहिले आहे. यामुळे कोर्ट मला निश्चित

अशी चार सहा महिने शिक्षा देते तर ती मी आनंदाने सोसली असती. पण "लेखी माफी पटेपर्यंत तुरुंग" या शब्दाचा बाण कोर्टाच्या तोंडून गेला तो कसा परत येणार ? या निकालावर अपील नाही. मी चार सहा महिनेच काय पण वर्ष दोन वर्षेहि हट्टाने राहिला, तरीहि कोर्ट काही मला आपण होऊन मोकळे करणार नाही. माझ्याविषयी सहानुभूति न वाटता उलट "हा मनुष्यच हट्टी आहे, तेव्हा त्याने हट्टाचे फळ खुशाल भोगावे" असा शेरा मजवर पडला असता. पण जी अडचण मला तुरुंगात तीच अडचण बाहेर मजविषयी काळजी बाळगणाऱ्या मित्रमंडळीनाहि परस्पर वाटतच होती. यामुळे मला माफी लिहून देणे वाईट वाटू नये म्हणून त्यानी केसरीत चार प्रमुख लोकाच्या सह्यानी एक पत्र घातले, व लेखी माफी देऊन मोकळे होणे हेच या स्थितीत श्रेयस्कर आहे असा सल्ला मी न विचारताच त्यानी मला जाहीर रीतीने दिला. यामुळे माझे काम सुलभ झाले. त्याप्रमाणे सॉलिसिटरचा कारकून येऊन त्याने मजकडून माफी लिहून नेली, व ती चौदाव्या दिवशी कोर्टाला पटवून मला कैदेतून सोडण्याचा हुकूम घेतला.

सुटकेच्या दिवशी सकाळी पारशी सुपरिंटेंडेट याने तुरुंगाच्या आवारातील आपल्या घरात मला बोलावून नेले, व पुढे एक दोन तासानी माझी सुटका होणार म्हणून इतर कामे बाजूला ठेवून तो माझ्याशी गोष्टी बोलत बसला. या वेळी जेलच्या अधिकाऱ्याचे नाते सुटल्यामुळे त्यानेहि न्यायमूर्ति दावर यांना टिळकाना अपमानास्पद शब्द बोलल्याबद्दल बरीच नावे ठेवली; व मला म्हणाला "आम्ही लोक सरकारी नोकर झालो म्हणून तुम्ही लोक काय खटपटी करीत आहा याचे मर्म न कळण्याइतके मूर्ख किंवा अप्रबुद्ध नाही. म्हणून तुम्ही कैदी व आम्ही अधिकारी असे नाते वरून असले व संभाळावेहि लागले तरी तुम्हा लोकांविषयी वाटणारा आदरभाव कसा जाईल !" असो. त्याने मला टेबलाशी बसवून घरांतून चहा व फराळाचेहि आणून दिले; व "तुमच्याबरोबर चहा घेतल्याने माझा सन्मानच होत आहे असे मला वाटते" असे तोहि भला माणूस म्हणाला.

त्यावेळी आम्ही पुष्कळ गोष्टी बोललो त्यांत एक गोष्ट त्याने सांगितलेली मोठ्या गमतीची असून अजून आठवते म्हणून ती सांगतो. पोषाखावरून गोष्ट निघाली. तो म्हणाला "मी व माझा मुलगा असे दोघेजण एके दिवशी ग्रँटरोड

स्टेशनवर गेलो. माझा मुलगा नीटनेटका पोषाख करणारा असे. मी अगदी साधा पोषाख केलेला. त्याच्या डोक्यावर साहेबी हॅट होती. मी एक नुसती पारशी स्कल-कॅप घातली होती. स्टेशनच्या फाटकाशी गेलो तो तिकिट कलेक्टराने माझ्या मुलाला प्लॅटफॉर्म तिकीट हाती नसताहि आत जाऊं दिले. आणि मी गेलो तो मला अडविले. तेव्हां मी त्याला म्हटले "मला तू जाऊ देत नाहीस. आणि त्या पुढच्या मनुष्याला तू जाऊ दिलस. आम्ही कोणीच प्लॅटफॉर्म तिकीट काढलेले नाहीं. मग हे कसे?" तिकिट-कलेक्टर म्हणाला, "तो पुढे गेलेला गृहस्थ जटल्मन आहे." तेव्हा मी हंसून म्हणालो " पण मी तर त्याचा बाप आहे." तेव्हां तिकिट-कलेक्टर थोडा ओशाळला. तात्पर्य, या इग्रजी राज्यात पोषाखाचा महिमा असा आहे. तुम्ही लोक देशाकरिता झटणारे आहा. पण तुमचा पोषाख हा असा साधा. तेव्हां तुमची खरी योग्यता कळावयाला कोणालाहि थोडा वेळ लागणारच."

असो. अशा रीतीने इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर त्याने मला शेकहॅड करून गाडीत नेऊन बसविले. मी मुबईहून त्याच दिवशी दोन प्रहरी मित्रमंडळीबरोबर पुण्यास आलो. वाटेत कल्याण वगैरे स्टेशनावर मित्र-मडळींनी भेटून सत्कार केला. पुण्यास आल्यावर ऐकले की वासुदेवराव जोशी खाडिलकर वगैरे लोकानी मी हायकोर्टाला माफी लिहून दिली याबद्दल नाके मुरडून टीका केली! त्यांचे म्हणणे मी आणखी पाचसहा महिने माफी न देतां तुरुगात राहिलो असतो तर कोर्टाने मला आपोआप सोडून दिलेच असते. पण ही विचारसरणी त्या पाच-चार लोकांपुरतीच होती. माफीच्या प्रायश्चित्ताशिवाय या प्रकरणातून सुटका नव्हती असे इतर बहुतेक लोकांचे म्हणणे होते व त्यांपैकी कित्येकानी मला तसे कळविलेहि.

असो. याननरचा मजवरचा खटला म्हणजे १९२० साली बोर-खळ प्रकरणातून उत्पन्न झालेला. सार्वजनिक सभेचे चिटणीस व कार्य-कर्ते रा. सदाशिव विनायक बापट याचा हा गाव. लो. टिळक वारल्यावर तेथील टिळकभक्तानी असे ठरविले की, गावालगत कृष्णाकाठच्या देवळांत टिळकांच्या पादुका माझ्या हस्ते स्थापन कराव्या. या योजनेप्रमाणे बरीच तयारी होऊन आम्हाला निमत्रण आली ती स्वीकारली, व त्याप्रमाणे आम्ही सभेला गेलो. सातार्‍याहूनहि नानासाहेब आगाशे सोमण वगैरे मंडळी आली

होती. मात्र न बोलावलेली अशीहि कांही मंडळी आली होती ! ते सत्यसमाज पंथाचे लोक ! सातारा जिल्हा हा या वेळी ब्राह्मणेतर चळवळीचे मुख्य केंद्र बनून राहिला होता. आणि टिळकांच्या पादुका बसविण्याचा हा समारभ हाणून पाडावा असे ठरवून त्या पक्षाचे बरेच लोक मारामारी करण्याच्या तयारीने आले होते. सभेच्या चालकाना किंवा आम्हा कोणालाहि या बनावाची कल्पना नव्हती. पण सभेत बरेचसे शेमलेवाले ठिकठिकाणी जागा अडवून बसले होते; व त्यांची मुद्राच सांगत होती की, हे काहीतरी कलागत करणार. सभेचे अध्यक्षस्थान मला दिल्यावर माझे भाषण झाले व इतर काही भाषणे सुरू होती. इतक्यात कोणा एका वक्त्याच्या काही एका शब्दाचे निमित्त करून त्यानी दग्याला एकदम सुरुवात केली.

आमच्याहि लोकांचा जमाव कमी नव्हता. तथापि दारू एकदम पेटावी त्याप्रमाणे सर्व सभेत दगल झाली. आणि कोणा मराठ्याने कोणा ब्राह्मणावर हात टाकावा याचा आधी जसा कांही कट व्हावा याप्रमाणे निरनिराळ्या ठिकाणी एकाच वेळी मारामारी जुपली. हातांतील काठ्याचा तर उपयोग सुरू झालाच. पण बाहेर छकडे सोडून उभे केले होते त्यांच्या करळ्याहि लोकांनी उपसून घेतल्या. प्लॅटफॉर्मवर आमच्याकडे विचारे नांवाचा एक सत्यशोधक व त्याबरोबर दुसरा एक असे धाऊन आले. परतु ते प्लॅटफॉर्म चढत असताच त्याना इतर लोकानी पुढून ढकलून देऊन मागे पाडले, व प्लॅटफॉर्मच्या मागच्या बाजूला लहानशी इमारत होती त्यांत प्लॅटफॉर्मवरील आम्हा प्रमुख लोकांना नेण्यांत आले. सभेला पोलिसहि काही आले होते. परतु पुष्कळसे काम ब्राह्मण तरुणांनीच केले व काही वेळाने दगा मोडून शांतता झाली. मारामारीत अनेक लोकांना लागले. रक्ते निघाली. याहून विशेष काही झाले नाही. पादुकाचा समारभ अजून व्हावयाचाच होता. तेव्हां येथे फिरून दगा कदाचित् होईल या भीतीने आमच्याकडील सर्व मंडळी सज्ज होऊन घाटावर देवळाकडे गेली, व मग पोलीसहि तिकडील वाटेवर उभे राहून त्यानी गर्दी थोपवून धरली. फिरून मारामारी होणार अशी भीति क्षणोक्षणी वाटत होती; तथापि दगेखोर सत्यसमाजिष्टांची संख्या एकदरीने थोडी होती म्हणून याहून विशेष कांही झाले नाही. मी पटांगणावरील सभेंत भाषण करून पादुका बसविल्या. बिन्हार्डी आटयावर अगदी संध्याकाळ झाली, व पूर्वसंकेताप्रमाणे गाड्या जुपून परत साताऱ्याकडे

निघावे असा आमचा विचार होता. पण तसे निघालो तर वाटेत जमाव होऊन हल्ला होण्याची भीति वाटत असल्यामुळें बोरखळकरानी आम्हांला जाऊं दिले नाही आणि आमचा मुक्काम रात्री देवळांत करवून त्यांनी बंदोबस्ताला रात्रभर माणसे ठेवली. पण वाटेत ब्राह्मण मंडळीवर हल्ला करण्याची भीति इतर रीतीने खरी ठरली. कारण बोरखळाहून लिंबगोव्याकडे एका गाडीत बसून काही ब्राह्मण मडळी गेली त्याच्यावर निम्या वाटेत हल्ला झाला, व त्यांना सत्य-समाजिष्टानी इतके बेदम मारले की त्याची रवानगी सातान्याच्या इस्पितळांत करावी लागली !

वरील हकिकतीवरून खटला कोणावर झाला तर तो या सत्यसमाजिष्टां-वरच व्हावयास पाहिजे होता. पण पोलिसानी तेथे कोणाला पकडले नाही, व इतर कोणा सत्यसमाजिष्टावर व्यक्तिशः फिर्यादी दिल्या नाहीत. तरी अस्वला-आधी आपणच किंकाळी फोडावी या न्यायाने प्लॅटफॉर्मवर धाऊन येणारे सत्य-शोधकी गुड रा. विचारे यानीच मी व इतर सहासात लोकावर सातारच्या सिटी-मॅजिस्ट्रेटपुढे मारामारीची फिर्याद केली. आमच्यापैकी काहीवर प्रत्यक्ष मारा-मारीचा आरोप असून, मी व आणखी दोघे तिघे याच्यावर मारामारीस चिथावणी दिल्याचा आरोप होता. मारामारीची खरी हकीकत सातान्यास सर्वांना आधीच ठाऊक झालेली असल्यामुळे चोरांच्या या उलट्या बोंबाचे सर्वांनाच आश्चर्य वाटले ! आम्ही निर्दोषी ठरून सुटूं अशी आमची खात्रीच होती. परतु एकदां न्यायकोर्ट म्हटले म्हणजे त्यातले सगळे विधि यथासांग पार पडावे लागतात. तसे येथेहि झाले. फिर्यादीचा पुरावा होऊन आमच्यावर चार्ज ठेवण्यांत आले. परंतु नतर फिर्यादीतर्फेच्या साक्षीदाराच्या उलट तपासण्या झाल्या. त्यांत सर्व हंसण्यासारख्या मौजाच होत्या. अदमासाप्रमाणे शेवटी मॅजिस्ट्रेट मि. फणसे यांनी आम्हा सर्वांना सोडून दिले. अशा रीतीने चद्रदर्शनामुळे चोरीचा आळ यावा त्याप्रमाणे मजवर गर्दी-मारामारी केल्याचा खटला झाला तो एक नमुनाच होय.

या नंतरचा खटला १९२४ साली फिरून मजवर हायकोर्टाच्या बदना-नामीचा व बेअब्रू केल्याचा झाला. त्याची अगदी थोडक्यांत हकीकत अशी आहे. पुण्यानजीक लोहगांव येथे कांही सोजीर शिकारीला गेले असतां तेथील गांवकऱ्यांची व त्यांची बाचाबाच झाली. तीत वॉकर नांवाच्या शिपायानें

बंदुकीला हात घातला आणि तीतून गोळी सुटून ती एका मनुष्याला लागली व त्यामुळे तो मरण पावला. सोल्जर वॉकरवर रीतीप्रमाणें खटला होऊन तो पुणे येथील सेशन कोर्टात निघाला. पण युरोपियन ज्यूरर हे इनसाफास बसलेले असल्यामुळे त्यांनी आरोपी निर्दोषी आहे असा निकाल दिला! सेशन कोर्टातील न्यायाधीश मि. वाइल्ड याना मात्र हा निकाल मान्य झाला नाही. त्यांच्या मते सदोष मनुष्यवधाचा आरोप न झाला तरी निष्काळजीपणाने हयगयीने बंदुकीस हात घालून गोळी उडविण्याचा आरोप तरी ज्यूरीने शाबीत धरावयास पाहिजे होता. म्हणून त्यांनी खटल्याचे कागद वर हायकोर्टाकडे पाठविले. त्याची सुनावणी सर न्यायाधीश मॅक्लाऊड व न्यायमूर्ति फॉसेट याच्यापुढे झाली पण त्यांनीहि वॉकर याला निर्दोषी म्हणून सोडून दिले. या निकालावर टीका करताना केसरीतील लेखकाने असे म्हटले की, "हा खटला काळ्यागोऱ्याचा असून गोऱ्या माणसाचे पारडे जड ठरावे व काळ्या माणसाचे हलके ठरावे यांत काय आश्चर्य ? असल्या खोट्या ताजव्याने पदरात पडणाऱ्या न्यायावरहि आमचे कांही लोक सतुष्ट असतात. ब्राह्मण स्मृतिकार पक्षपाती म्हणून स्मृतिग्रंथ जाळणारांनी आतां हा न्याय पाहून लोहगाव येथे एक स्तभ उभारावा व त्यावर या खटल्याची हकीकत कोरून ठेवावी."

ता. ६ मे १९२४ च्या अकात हा मजकूर प्रसिद्ध झाला. त्यावर सरकारी कारवाई होऊन सरकारी वकील रा. पाटकर यानी १ जुलै रोजी फिर्याद दिली, व माझा खटला ७ ऑगस्ट रोजी सर न्यायाधीश सर ॲबरसन मार्टेन व न्यायमूर्ति किंकेड यांच्यापुढे निघाला. त्या व दुसऱ्या दिवशी कांही वेळ खटला चालून मला कोर्टाने दोषी ठरविले व ५००० रु. दड व २०० रु. कोर्टखर्च मिळून ५२०० रु. दंड केला. हे वर्ष लेजिस्लेटिव्ह असेब्लीत मी निवडून गेल्याचे पहिलेच होते. त्या आधी आम्ही कायदे कौन्सिलच्या प्रश्नावर कॉंग्रेस विरुद्ध बड करून दास व नेहरू यांच्याबरोबर कौन्सिल पार्टीत समाविष्ट होऊन निवडणुकी जोरांत जिंकल्या होत्या. यामुळे या खटल्याला एक प्रकारे महत्व आले होते. पण हायकोर्टाच्या बदनामीचा हा मजवरचा दुसरा खटला असल्यामुळे निकाल काय होणार याचे आगाऊ धोरण सहजच बाधतां येण्यासारखे होते. यामुळे मी प्रथमच एक गोष्ट मनाशी ठरवून ठेवली की या खटल्यांत वकील बॅरिस्टर म्हणून कोणी द्यावयाचा नाही. तर खटला स्वतः चालवावयाचा. वकील बॅरिस्टर दिल्यास खर्च बराच लागणार व ती दडात

आणखी भर पडणार. पण तो खर्चहि केला तरी वकील बॅरिस्टर हे पक्षकार सुटावा, किंवा निदान त्याला शिक्षा दंड वगैरे होईल तितका कमी व्हावा या दृष्टीनें गुळमुळीत गोडगोड बोलतात. ते तसे बोलले तरीहि हरकत नाही, परंतु त्या भरात आपल्या पक्षकाराला थोडीबहुत नावे ठेवून सोडवून घेता आले तर तसें करणे हेहि ते आपले कर्तव्य समजतात. पूर्वी भालाकार भोपटकर यांच्यावर खटला झाला तेव्हां त्यांचे बॅरिस्टर मि. दावर यानी त्यांचा बचाव करतांना जवळ जवळ असेच म्हटले की "हे काय बोलून चालून एकाद्या भंगटासारखे लिहिलेले आहे ते केवळ संपादक महाशयाचे कल्पनाचित्र. खरा प्रकार नव्हे. म्हणून कोर्टाने ते मनावर न घेता आरोपीला सौम्यपणानेच वागविले पाहिजे." याचा अर्थ इतकाच की, "आमचा अशील मूर्ख आहे. त्याने भलतेच कांही तरी लिहिले आहे. त्याकरता त्याला शिक्षा ही होणारच. पण द्यायची ती थोडी द्या म्हणजे झाले."

या उदाहरणावरून मी बोध घेऊन मुद्दाम असे ठरविले की, हल्लींचा केसरीतील लेख पहिल्या १९०८च्या खटल्यातील लेखाइतका वाईट खचित नाहीं; लोहगावचा माणूस मेला आणि बंदुक उडविणारा सोजीर वॉकर निर्दोषी ठरून सुटला ही गोष्ट केसरीकाराच्या बचावाला बरीच उपयोगी पडण्यासारखी आहे; कारण युरोपियन आरोपींना युरोपियन ज्यूरी हटकून मिळते व असल्या खटल्यांत ज्यूरी नेहमी आरोपीला सोडून देते हा अन्याय सुप्रसिद्ध असल्यामुळे, केसरीच्या टीकेला फार भयंकर असे स्वरूप येऊ शकत नाही. अर्थात् मुद्रणस्वातंत्र्याचा व सत्याच्या अभिमानाचा हा प्रश्न असल्यामुळे, या कामी वकील जे बोलेल त्यापेक्षां संपादक वर्गाचा प्रतिनिधि असे नाते लावून मला या कामी जरासे ताठरपणानें बोलता येईल याचाहि फायदा घ्यावा. आणि याहूनहि निर्णायक कारण असे कीं, खटल्यात शिक्षा व्हावयाचीच तर आपला खटला आपणच हवा तसा चालविण्याचे श्रेय तरी एकवेळ का घेऊ नये ?

कोर्टाच्या बेअदबीच्या खटल्यांत आरोपीने स्वतः बोलणे बरे नव्हे असे म्हणून काही मित्रमंडळींनी माझा हा बेत चुकीचा आहे असे मला सांगून पाहिले. परंतु माझा विचार ठरला तो कायमचाच होता. अशा खटल्यांत प्रतिवादीने स्वतः खटला चालविल्यास अधिक मोकळेपणाने किंवा अधिक भावनेने तरी बोलता येते. वकील हा कायद्याचे आधार दाखवील. परतु अशा खटल्यात कायद्याच्या आधा-

यांचा फारसा उपयोग नसतो. कारण त्यांतील गुन्हा अपमानाचा म्हणजे मानीव भावनेचा. तेथे कायद्याचे आधार काय करणार ? " आम्हांला वाटते की, आमचा अपमान झाला ! " असे कोर्टानें एकदां म्हटले म्हणजे " अहो तुमचा खरोखर अपमान झाला नाही, तुम्हाला उगाच तसे वाटते, असे आरोपीनें म्हणून काय लाभ होणार ? साध्या व्यवहारात जे घडते तेच येथे घडते. पण साध्या व्यवहारांत शिक्षा करण्याचा अधिकार नसतो तो मात्र येथें असतो. साध्या व्यवहारांत एखाद्या मनुष्याने मनानें असे घेतले की, माझा अपमान झाला तर दुसरा सहजच म्हणतो की, " बरे बुवा, माझ्या मनांत अपमान करण्याचे नव्हते. पण तुम्हाला तसे वाटत असेल तर मी तुमची माफी मागतो कसा." न्यायकोर्टाची अपेक्षा देखील हीच असते. त्याने नोटीस काढली म्हणजे अपमान झाला असे ठरविले असेच समजावयाचे. मग प्रतिवादीला जाबादाखल जे ॲफिडेविट करण्याची संधि मिळते त्यात त्याने माफी मागून मग पुढे काय बोलावयाचे ते सर्व बोलावे; पुढे बोलावयाचे म्हणजे माफी घेऊन सोडा किंवा शिक्षाच द्यावयाची तर फार थोडी द्या असे इकडून तिकडून म्हणावयाचे; व गुन्ह्याचा दोष शक्य तितका कमी करावयाचा. पण प्रतिवादीने माफी मागितली म्हणून ती दिलीच पाहिजे असाहि नियम नाही. तात्पर्य, " मी रागावलो आहे. अगदी रागावून बसलो आहे. माझा राग कसा काढतां तो काढा " असे म्हणण्यासारखे या न्यायकोर्टाच्या बेअदबीच्या खटल्याचे स्वरूप असते.

मी स्वतः खटला चालविण्याचे ठरविले तरी रा. भोपटकर यांच्या सांगण्यावरून हायकोर्टातील कोणी वकील उपाध्या हवा म्हणून दि. ब. शिंगणे याना वकीलपत्र दिलें. मात्र त्यांना असे सांगितले की, "खटला माझा मीच चालविणार आहे. तुम्ही मला इतर काय मदत करावयाची ती करा." खटला उभा राहिला तेव्हां प्रथम माझ्या जबाबाचे ॲफिडेविट मी दाखल केले. त्यांत मी लेखाची सर्व जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. परंतु माफीचा शब्द काढला नाही. हे पाहून निकाल काय द्यावयाचा हे न्यायाधीशानी बहुधा मनाशी प्रारंभीच ठरविले असेल. अशा प्रकारचा माझ्यावरचा हा खटला पहिला नसून दुसरा आहे; पहिल्या खटल्यांत मला शिक्षा झाली होती; व त्याहि खटल्यांत मी पहिल्या जबाबांत माफी मागितली नव्हती; या सर्व गोष्टी उभयतां न्यायमूर्तींच्या ध्यानांत होत्याच यांत शंका नाही. कारण माझ्या पहिल्या खटल्याचा वृत्तांत

मुंबई हायकोर्टाच्या लॉ रिपोर्टात समग्र दिलेलाच आहे. अर्थात् या दुसऱ्या खटल्यांतील माझे ॲफिडेविट बिनमाफीचे आले असे पहाताच न्यायमूर्तींची चर्या एकदम बदललेली दिसली.

खटला सुनावणीला सुरुवात होताच रा. शिंगणे यांनी आपले वकीलपत्र रद्द करावे अशी कोर्टाला विनंति केली. ती कोर्टाने तेव्हाच मान्य केली. खटल्याला सुरुवात झाल्यावर काही वेळ ते मजजवळ बसले व नंतर उठून गेले. वकीलपत्र रद्द करण्यासंबंधाने मी प्रारंभीच कोर्टाला खुलासा केला व सांगितले की, "मी वकील देत नाही याचा अर्थ, तो आढ्यतेने देत नाही किंवा वकीलवर्गाबद्दल माझा अनादर आहे म्हणून देत नाही, असे नव्हे, तर अशा खटल्यांत ज्याचा तोच कोर्टापुढे उभा राहून आपले म्हणणे प्रांजलपणे मांडले म्हणजे तें एकंदरीने बरे असते म्हणून." यावर कोर्ट म्हणाले की, "या बाबतीत गैरसमज होण्याचे कारण नाही. ज्याचा खटला त्याला चालविण्याचा अधिकारच आहे शिंगण्याचे वकीलपत्र असते तर कायद्याच्या मुद्याची चर्चा करण्यांत आम्हाला थोडी त्याची मदत झाली असती इतकेंच." माझ्या ॲफिडेविटात मी इतके कबूलच केले होते की, हायकोर्टाच्या मनांत पक्षपात बुद्धि उत्पन्न झाली. पण ती नकळत झाली असेल. जाणून बुजून त्यांनी पक्षपात केलेला नाही. तेव्हा पक्षपात झालाच पण तो जाणूनबुजून झाला की, अजाणता झाला इतकाच काय तो थोडा प्रश्न उरला. पण मी अरतून परतून कितीहि बोललो तरी "तुमचे हे म्हणणे तरी योग्य कसे ते दाखवा" असे मार्टेन-साहेब मला विचारीत. त्याला मी काय उत्तर देणार ? तथापि मी आधी माझे 'आर्ग्युमेंट' लिहून काढून त्याची एक प्रत सरकारी वकिलाला व एक प्रत खुद्द न्यायाधिशांना दिली होती. माझा हेतु हा की, माझी सर्व लेखी तक्रार कागदपत्रात दाखल व्हावी. कारण कोर्टात वकिलीचा सराव नसल्याने माझी लेखी तक्रार जितकी समर्पक वठेल तितकी तोंडी वठणार नाही. म्हणून लेखी तक्रार दाखल करावी व त्यांतलीच काही तोंडाने सांगावी, म्हणजे प्रश्नोत्तराला वाव राहील.

पण मार्टेनसाहेबांनी मला सांगितले की, तुमची लेखी तक्रार सर्वच्या सर्व दाखल करून घेतां येत नाही. कारण त्यांत लागू व गैरलागू अशा गोष्टींची पुष्कळ भेसळ झाली आहे. अर्थात् असे झाल्यामुळे तीच लेखी तक्रार थोडथोडी तोंडाने वाचीत जाणे किंवा भाषण करून त्यांतील मुद्दे सांगणे असे दोन मार्ग

उरले. पण मी पहिला मार्ग सोडून दुसरा पत्करला. तारीख ७ रोजी सुमारे एक तास व तारीख ८ रोजी सुमारे दोन अडीच तास काम चालले. हायकोर्टाच्या न्यायाधीशांशी वादविवाद करावयाचा. तेव्हां ते कसें काय साधते हा एक प्रश्नच होता. पण मनाचा निश्चय असल्यामुळे ती गोष्ट पार पडली. कोर्टाचा अपमान झाला असे न्यायमूर्ति मनाशी ठरवून बसल्यावर आणि माफी न मागितल्यावर खटल्यांतील लेखाचे समर्थन करीत बसणे हे विस्तवाशी खेळण्यासारखे होते. त्यांतून मी अपरिचित. पण मी तास दोन तास बोलून आपले म्हणणे बहुतेक योजले होते तसे माडू शकलो. वास्तविक लेखातील शब्द पदोपदी अडणारेच होते. यामुळे आलटून पालटन येऊन ठरल्या ठिकाणी नडावे लागे. "काळ्याचे एक पारडे व गोऱ्याचे एक पारडे अशी दोन कमजास्त वजनाची पारडी ज्या ताजव्याला लावली आहेत, असल्या ताजव्यातून आमच्या पदरांत न्याय पडावयाचा. तेव्हा पारडे कोणीकडे झुकावयाचे व न्याय कोणच्या प्रकारचा पदरांत पडावयाचा हे दिसतच आहे." असा मुख्यतः केसरीच्या लिहिण्याचा झोक. तेव्हा पक्षपाताचा आरोप मी केला नाही असे म्हणून कसे चालणार? तेव्हा त्यातल्या त्यात अजाणता पक्षपात इतकेच दर्शविण्याचा माझा हेतु होता असे म्हणण्याचा मी प्रयत्न करीत होतो. पण हे करीत असतांच या देशांत काळयागोऱ्यांमध्ये जाणूनबुजून पक्षपात करण्यात येतो असले थोरामोठ्यांचे व प्रसिद्ध आधारहि देत होतो. यामुळे जखम फिरून खाजवावी व फिरून फुकर घालावी असे स्वरूप हळूहळू माझ्या भाषणाला येत होते. ( १ ) लॉर्ड कर्झन यांनी काळयागोऱ्यांत भेद केल्याबद्दल लान्सर पलटणीला शिक्षा करविली. ( २ ) युरोपियन लोकांवर खटला झाला म्हणजे त्यांना तेवढी युरोपियन लोकांची ज्यूरी मिळते. ( ३ ) हिंदी लोकांवर खटला झाला तर हिंदी माणसांचीच ज्यूरी मला द्या असे म्हणण्याचा अधिकार हिंदी माणसाला नसतो. ( ४ ) काळयागोऱ्यातील भेदभाव दर्शविणारे कायदे काढून कसे टाकतां येतील याचा विचार करण्याकरितां खुद्द असेंब्लीतच ठराव येऊन कमिटी नेमली तेव्हा काळयागोऱ्यात भेद नाही असे म्हणण्यांत अर्थ आहे ! ( ५ ) इंग्रज न्यायाधीश झाले तरी ती माणसेच आहेत. म्हणून सहज माणसाच्या हातून न जाणतां होणारा पक्षपात न्यायकोर्टाच्या हातून होणे शक्य आहे, व केसरीने तसे म्हटले तर तो मोठासा गुन्हा होऊं नये, असे मी परोपरीने आलटून पालटून सांगितले.

कोर्टाने व मी मिळून लेखाचे भाषांतर अथपासून इतिपर्यंत वाचले. मधून मधून न्यायमूर्ति मला प्रश्न करीत त्याचें मधून मधून मी उत्तर देई असा क्रम चालू होता शेवटी माझ्या समारोपात मी म्हटलेः—

" माझ्या लेखात मिथ्या विधान नाही ही पहिली गोष्ट. त्या विधानावरून पुढे मी अनुमाने काढली ती युक्तिसिद्ध आहेत, चुकीची नाहीत ही दुसरी गोष्ट. इतके झाल्यावर मग त्या विधानातून काय ध्वनि निघतो हे पहाण्याचे काम माझे नाही; व न्यायमूर्तींना अप्रामाणिकपणाचा आरोप लावण्याचा ध्वनि त्यातून निघाला तरी, मी म्हणतो, तो माझा अप्रामाणिकपणा ठरत नाही. माझ्या अप्रामाणिक-पणाचा आरोप काय तो सरकारी वकिलानी प्रत्यक्षपणे सिद्ध केला पाहिजे. काल कोर्टाच्या बेअदबीच्या तत्त्वासंबंधाने जे उतारे वाचण्यात आले ते मला अमान्य नाहीत. वर्तमानपत्रकाराचे स्वातंत्र्य झाले तरी ते इतर कोणाहि व्यक्तीच्या किंवा अधिकाऱ्याच्या स्वातंत्र्याहून अधिक नाही. जो तो आपल्या हक्कमर्यादेपुरतां स्वतंत्र असतो एकाने दुसऱ्यावर अतिक्रमण करू नये. पण सामान्य मनुष्यावर जी टीका केल्याने बेअब्रूचा गुन्हा घडत नाही ती टीका न्यायाधीशावर केल्यानेहि बेअब्रूचा गुन्हा घडत नाही न्यायाधीश लोकानी सामान्य समजस माणसाप्रमाणे वागण्यास व टीका करून घेण्यास मनाची तयारी ठेविली तरच कोर्टाविषयी खरी आदरबुद्धि व त्याच्या न्यायकार्यावर लोकाचा विश्वास बसेल. सामान्य मनुष्याचे सामान्य दोष न्यायाधीशातहि असतात असे मानणे गैर नाही; व टीकाकारांच्या टीकेपेक्षा आपल्या चुकीच्या निकालांनीच आपण हा विश्वास ढळण्यास अधिक कारणीभूत होतो हे त्यानी लक्षात ठेवावे. ज्यावर मी टीका केली त्या निकाला-इतका चुकीचा, सर्वस्वी अयोग्य, असा निकाल देऊन, वरती लोकांचा विश्वास ढळू नये म्हणून बेअदबीचा खटला करण्यात येतो, त्याने काय साधणार? लोकांचा विश्वास ढळला तो निकाल ऐकून परस्परच ढळला. मी या बाबतीत टीका करून फक्त लोकमत प्रगट केले. आतां मी वर्तमानपत्रकार नसतो तरीहि या निकालाविषयी हेच बोललो असतो; मात्र ते खासगी संभाषणांत बोललो असतो. पण लोकमताला वाचा फोडण्याकरिताच वर्तमानपत्राचा जन्म आहे. मनुष्य मेला तो विसरून गेला, आणि ज्याची गोळी लागली तो सुटून गेला ! मृताच्या कुटुंबाला नुकसानभरपाई तरी मिळावी. पण ते काम म्हणे वरिष्ठ सरकारचे ! मेलेला मनुष्य हा मुंबईसरकारचा प्रजाजन नव्हता काय ?

"सेशन्स जज्जाच्या शिफारशीप्रमाणे वॉकर याने केवळ अविचार व बेसावधगिरी केल्याचा गुन्हा शाबीत धरून थोडी कां होईना पण हायकोर्टाने त्याला शिक्षा दिली असती तर लोकाचे थोडेबहुत समाधान झाले असते. वॉकर फासावरच चढला पाहिजे अशी मागणी कोणीच केली नाही व नसती. पण ज्यूरीने त्यावर कोणताहि गुन्हा शाबीत नाही, तो सर्वस्वी निर्दोषी आहे, असे ठरवून सोडून दिले हेहि लोकाना पटले नाही. ज्यूरीच्या निकालाचा हा अडथळा मार्गात नसता तर स्वतः हायकोर्टाने वॉकरला थोडीतरी शिक्षा दिली असती असा माझा भरवसा आहे. तीच गोष्ट ज्यूरीचा निकाल पुढे असताहि त्यानी केली असती, तर हलक्या पारड्यात पासंगापुरते वजन घालून त्यानी ताजव्याचा खोटेपणा काढून टाकला असे झाले असते. ते करण्याला जी एक न्यायबुद्धीची आतून उठावणी लागते ती येथे दिसली नाही इतकाच हायकोर्टाला मी येथे दोष दिला. हे ज्यामुळे घडले तो पक्षपात अजाणता होता. स्वजातीचा पक्षपात खरा होता तो ज्यूरीच्या निकालात, असा माझा लिहिण्याचा आशय होता. सेशन्स जज्जाच्या व मॅजिस्ट्रेटच्या निकालाने आठदहा ठळक प्रश्न हायकोर्टाच्या डोळ्यापुढे उभे राहण्यासारखे होते. व त्याची उत्तरे समर्पक देऊन मग त्यानी असा निकाल दिला असता तर कोणी असे लिहिले नसत. माझ्या अहेतुक शब्दाचा स्वाभाविक परिणाम म्हणून तो मला भोवावा, आणि हायकोर्टाच्या हयगयीच्या कृत्याचा परिणाम त्याला का भोवू नये ?

"शेवटी मी माझे म्हणणे फिरून एकदा स्पष्ट करतो. ते असे:—माझ्या लेखापैकी बराचसा भाग म्हणजे विद्यमान न्यायपद्धतीवरील माझी टीका रास्त हक्काची आहे. जाणत्या पक्षपाताचा आरोप मी केला नाही हे प्रतिज्ञेवर सांगतो; नेणत्या पक्षपाताचा आरोप केला हे मी प्रतिज्ञालेखातच कबूल केले आहे. ते माझे मत कायम आहे व बदलणे शक्य नाही. असले मत प्रगट करणे यानेहि बेअदबी होते म्हणून ते प्रगट करण्याची मला परवानगी नाही म्हणाल, तर आपण न्यायबुद्धीने या प्रकरणी जी शिक्षा योग्य म्हणून ठरवून द्याल ती मी आनंदाने सोशीन. कारण जन्मभर जे काम मी खुषीने पत्करले व केले—म्हणजे लोकमत दिसते ते माझ्या बुद्धीप्रमाणे वर्तमानपत्रे वगैरेतून प्रगट करणे—ते करण्याच्या अनुषंगात अशा तऱ्हेची जोखीम असणारच हे मला पूर्णपणे माहीत आहे. तथापि ही गोष्टदेखील कोर्टाचा अधिकार जुमानू नये, किंवा घडलेल्या कृत्यांत पुनः आग्रहाने भर टाकावी, या बुद्धीने केली नाही.

न्यायकोर्टाचा अधिकार व कर्तव्य ही दोनहि उच्च दर्जाची असल्याने त्यांना लोकानी योग्य तो मान दिला पाहिजे हे मी जाणतो. परंतु लोकमतप्रदर्शक वर्तमानपत्रकार या नात्याने मला ही टीका करावी लागली, व या नात्याने वर्तमानपत्रकारालाहि काही विशेष हक्क असतात ते न्यायपीठापुढे व जनतेपुढे यावे एवढाच माझ्या भाषणांतील मुख्य हेतु आहे."

मला जो डिफेन्स द्यावयाचा तो मी दिला. पण यापुढे एक गोष्ट महत्त्वाची उरली होती व तिच्या सबधाने मात्र काय बोलावयाचे हे मी मनाशी पक्के ठरवून ठेविले होते. ती गोष्ट अशी. डिफेन्स कितीहि दिला तरी कोर्ट मला दोषी ठरविणार हे निश्चित; व प्रारभी माफी मागावी तीहि मी मागितली नाही. तेव्हा पुष्कळसा दंड तर होणार. मग त्याच्या जोडीला पूर्वीसारखी ऐनजिनसी शिक्षा कैदेची होते की नाही पहावे. पण झाली तर तीहि सोसतां येईल. दड केसरी ऑफिस भरणार व शिक्षा दिल्यास मी तुरुगांत जाऊन बसणार याविषयी दोघांचीहि तयारी होती. पण फिरून पूर्वीप्रमाणे लेखी माफी मागण्याची शिक्षाहि दिली, व ती देईपर्यंत तुरुगात ठेवावे असा कोर्टाने हुकूम दिला, तर काय करावे? माफीच मागावयाची तर ती प्रथमच मागितलेली बरी, कारण मग नुसती शिक्षाच उरते. पण माफी चुकविणे हे हटकून हातचे नसल्यामुळे 'माफी मागाल तरच सोडूं' असें कोर्टाने म्हटले तर मग काय करावे?

तात्पर्य, हे माफी-प्रकरण माझ्या हातचे नव्हते. पण एक गोष्ट हातची होती ती अशी की, माफी मागण्याचाच प्रसंग पुढे आला तर आधीच आपण होऊन त्या माफीची किमत कमी करून टाकावी. म्हणजे मग ती मागितली काय, न मागितली काय, दोन्ही सारखीच! म्हणून मुख्य मुद्यासबंधाने भाषणे झाल्यावर मी या माझ्या शिक्षेचा मुद्दा घेऊन त्यावर कोर्टाला स्पष्ट सांगितले की, "कोर्टाने मला वाटेल तितकी दंडाची किवा ऐनजिनसी शिक्षा करावी. मात्र ती निश्चित असावी. पण माफी मागेपर्यंत कैद असे अनिश्चित स्वरूप त्याला ठेवूं नये. सक्तीने घेतलेल्या माफीला कांहीच किंमत रहात नाही! कोणी ती मनापासून मागितली तरच तिचें स्वारस्य! मी ती या खटल्यांत मागितली नाहीं. पुढे कोर्टाच्या हुकुमाने ती मागावी लागली तर सक्तीची ठरेल, मनापासूनची नव्हे. म्हणून कोर्टाने या गोष्टीचा विचार करावा. मी कोर्टाचा अपमान केला तर कोर्टानें मला शिक्षा दिली. मिळून फिटास फीट झाली! मग माफीचा प्रश्न उरत नाही व तसा तो न उरावा हे चांगलें.

इतर कोणत्याहि फौजदारी कायद्यांत माफीचा हा प्रश्न उद्भवत नाही. होईल ती शिक्षा भोगल्याने त्या गुन्ह्याच्या पापाची निष्कृति झाली असेच समजण्यांत येते. कित्येक गुन्हे सत्याग्रहाच्या स्वरूपाचे असू शकतील. म्हणजे सत्याग्रही मनुष्याने केलेले कृत्य हा गुन्हा ठरला तरी त्याकरिता माफी मागा असे कायदा सागत नाही, व सत्याग्रही मनुष्य ती मागणारहि नाही मी काही सत्याग्रही नव्हे. म्हणजे मी लिहिले ते बरोबर असे वाटत असले तरी त्याकरिता जन्मभर तुरुगांत बसण्यास तयार नाही जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा असली तरी तिला वीस वर्षांची मुदत जास्तीत जास्त आहे असे समजतात. पण कोर्टाच्या बेअदबीच्या गुन्ह्याबद्दल, आरोपीने माफी न मागिल्यास, कोर्टाच्या मर्जीला वाटेल तितके दिवस त्याला तुरुगात ठेवता येते.

"There is only one point and that is about the punishment. In cases of contempt of Court, the theory seems to be that it is an offence which can be purged by nothing but an apology. This is somewhat unfair. It is against the general principle of all other penal law, which assumes that the offence, whatever it may be, should be, or could be purged by undergoing a definite penalty. I would submit therefore that a definite penalty is something that can reconcile the dignity of courts as well as the conscience and self-respect of accused persons. It leaves a fair margin for discrimination and adjustment for the views of both parties to a contempt of Court Case. And it saves the extraordinary powers of the High Court from the odium of being a remnant of the anachronic absolutism of divine regal authority" etc.

म्हणजे या प्रकारच्या कैदेची मुदत जन्मठेपेच्या काळेपाण्याच्या मुदतीहून अधिक झाली म्हणावयाची. तात्पर्य, शिक्षा देण्याचा अधिकार जसा कोर्टाचा तसाच शिक्षा भोगण्यास तयार झाल्यावर माफी न मागतां सुटण्याचा अधिकार आरोपीला असला पाहिजे ! "

अशा प्रकारची तक्रार मी सांगत असतां मात्र मार्टेनसाहेबांनी मला कोठें अडविले नाहीं. निमूटपणे ती सर्व ऐकून घेतली. असो. अखेर सरकारी

वकिलांनी थोडेसे भाषण केल्याबरोबर उभयता न्यायमूर्तींनी एकामागून एक आपले निकाल तोंडी सांगितले. मार्टेनसाहेब यांनी आपल्या निकालांत असे म्हटले की, "हल्लीचे दिवस जातिद्वेषाचे आहेत. तेव्हा अशा दिवसांत न्यायाधिशांवर जातिद्वेषाच्या भावनेने होणारे हल्ले थाबविलेच पाहिजेत. केळकरांनी तीन तास चालविलेले भाषण आम्ही ऐकले. पण त्यांत गैरलागू अशा गोष्टी बऱ्याच होत्या. असा गुन्हा करण्याची केळकराची ही दुसरी खेप आहे. पण पूर्वीचा खटला झाल्याला सुमारे सोळा वर्षें झाली, आणि पूर्वीच्या खटल्यांतील लेखाप्रमाणे हल्लीच्या खटल्यात केळकरांनी न्यायाधिशाच्या व्यक्तीवर हल्ला केलेला नाही, म्हणून आम्ही फक्त पाच हजार रुपये दंड व दोनशे रुपये कोर्टखर्च मिळून ५२०० रुपये दंड करितो."

किंकेडसाहेबानी आपल्या निकालात म्हटले की, "या खटल्यात केळकरांनी सर्वस्वी बेगुमानपणाची वृत्ति स्वीकारलेली दिसते. मी पुण्यास पुष्कळ वर्षें न्यायाधीश होतो. त्या वेळी टिळकानी केसरी चालविलेला होता. त्याची मला माहिती आहे. केसरीपत्राइतका विस्तृत वाचकवर्ग दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्राला नाही. निदान वीस हजार लोकानी तरी केळकराचा लेख वाचलेला असेल; व त्या लेखात न्यायकोर्टावर ताशेरा झाडलेला आहे. तसेच त्यांचा हा दुसरा गुन्हा आहे म्हणून मीहि मार्टेनसाहेबानी जी शिक्षा दिली तिला अनुमोदन देतो."

खटल्याच्या पहिल्या दिवशी कोर्टात गर्दी नव्हती. पण दुसरे दिवशी बरीच झाली; व खटल्याच्या निकालाची बातमी सर्व मुंबई शहरभर सध्याकाळपर्यंत पसरली. कोर्टातून बाहेर पडताच अनेक स्नेह्यानी शाबासकी दिली. मारवाडी विद्यालयांत जाहीर सभा भरवून माझे अभिनंदन केले. अनेक भाषणे झालीं. आणि नंतर त्या आठवड्यात निरनिराळ्या वर्तमानपत्रातून जे लोकमत प्रकट झाले त्यावरून या कामी मला सर्व प्रांतांतील लोकमताची सहानुभूति होती हें तर दिसलेच; पण वकील न देतांना स्वतःच खटला चालविण्याचा मी आग्रह धरला त्याचेहि चीज झाले. तें असे की, मी या खटल्यांत केवळ स्वतःचा बचाव करीत होतो असे नाहीं, तर एकदरीने वर्तमानपत्राच्या हक्कांबद्दल मी आपल्या भाषणांत भांडत होतो या गोष्टीचा अनेकांनीं गौरवपर उल्लेख केला. हे खाली दिलेल्या कांही थोड्या उताऱ्यांवरून लक्षांत येईल.

**मुंबईची जाहीर सभा**—रविवार, ता. १० ऑगस्ट रोजी सायंकाळी ६॥ वाजतां मारवाडी विद्यालयात मुंबईच्या नॅशनल युनियनतर्फे जाहीर सभा भरली होती. सभा भरविण्याची कल्पना प्रथमच रविवारी सकाळी जाहीर झाली. तरी सभेच्या आधी सुमारे २ तास विद्यालयाचा दिवाणखाना भरून जाऊन, तेथे सभा करणे अशक्य म्हणून बाहेरच्या पटागणात ती भरवावी लागली. तरीहि सर्व जागा भरून खिडक्या, कठडे, भिंती, आसपासच्या इमारती यातून प्रेक्षक बसले होते; व श्रोतृसमुदायाच्या निम्याहून अधिक गर्दी स्थलसंकोचामुळे परत गेली. प्रारंभी श्री. अण्णासाहेब नेने यांनी सूचना केल्यावरून 'इंडियन सोशल रिफार्मर'चे संपादक श्री. नटराजन् यांनी अध्यक्ष या नात्याने पुढीलप्रमाणे भाषण केले.

"श्री. न. चिं. केळकर ह्यांनी हिंदुस्थानातील वर्तमानपत्राच्या सांप्रदायाची जी सेवा केली आहे तिजबद्दल त्यांचे अभिनंदन करण्याकरिता आजची सभा भरविण्यांत आली आहे. श्री. मंडलिक ह्यांनी मला अध्यक्ष होण्याबद्दल विनंति केली ती मान्य करू नये असे प्रथम माझ्या मनात आले. ह्याचे कारण असे की, सार्वजनिक कार्यात श्री. केळकर ह्यांच्याशी अधिक निकट संबंध आलेले गृहस्थ अनेक आहेत, त्यांपैकी कोणास आजच्या प्रसंगी अध्यक्षस्थान देण्यांत आले असते तर अशा अध्यक्षाच्या भाषणात केळकरांच्या प्रत्यक्ष ओळखीचा, आणि त्यांच्या कामगिरीबद्दल अधिकारयुक्त असा, उल्लेख स्वाभाविकच आला असता. परंतु वर्तमानपत्रकार ह्या नात्याने मी आज अध्यक्ष व्हावयास पाहिजे असे जेव्हा मला मागाहून सांगण्यांत आले तेव्हा मात्र ती गोष्ट मी तांबडतोब कबूल केली. कारण केळकर आणि मी हे वर्तमानपत्राच्या ज्या युगाचे किंवा मनूचे प्रतिनिधि आहोत तो मनु पालटत चालला आहे. लो. टिळकांच्या उलाढालीच्या कारकीर्दीतील अनेक महत्त्वाच्या प्रसंगावर केळकर ह्यांनी आपल्या 'मराठा' ह्या इंग्रजी पत्रांतून वेळोवेळी जे अनेक लेख लिहिले आहेत, त्यांचा संग्रह मद्रासच्या गणेशन् कंपनीने प्रसिद्ध केला आहे तो मी सध्यां वाचीत आहे. तो वाचीत असता श्री. केळकर ह्यांनी वरील लेखांतून आपल्या नांवाचा उल्लेख एकाच ठिकाणी केला आहे हे पाहून त्यांच्या विनयशीलतेची साक्ष मला पटली. तो उल्लेख केळकर ह्यांनी लोकमान्यांच्या ज्युबिलीवरील आपल्या लेखांत केला आहे. १८९६ च्या मार्च महिन्यांत लोकमान्य टिळक

ह्यांनी केळकर यांना आपणास येऊन मिळण्याविषयी लिहिले. त्या पत्रांत लोकमान्य म्हणतात, " मला तुम्ही माझ्या शेवटच्या दिवसात नोकर म्हणून नव्हे तर मित्र म्हणून हवे आहा. हे दिवस कदाचित् माझ्या आयुष्याचे शेवटचेहि असतील. " ह्या पुस्तकाने माझ्या मते श्री. केळकर व लो. टिळक ह्या व्यक्तींचें अंतरग आपणास पहावयास मिळेल.

" श्री. केळकर हे आज २८ वर्षे वर्तमानपत्राचा धदा करीत आहेत. ह्या धंद्यांत माझीहि तितकीच वर्षे गेली आहेत. आमच्यासारख्या वर्तमानपत्रकर्त्यांचा मनु जात चालला आहे हे मी केळकर ह्यांस प्रारभीच सागितले आहे. त्या मनूस काय नाव द्यावे ह्याबद्दल मला नेमका शब्द सापडत नाही. तथापि सध्यांच्या वर्तमानपत्रकारास धदेवाइकांचा मनु म्हटले तर आमच्या मनूस मिशनऱ्याचा मनु म्हणता येईल. अशा माणसास वर्तमानपत्राचा एरवी उपयोग नाही व वर्तमानपत्रांना अशा माणसाचा इतर उपयोग नाही; उपयोग असलाच तर तो एवढाच की, त्याना आपला आत्मप्रत्यय वर्तमानपत्रातून माडावयास मिळतो. लो. टिळक ह्याचे वर्णन कितीहि पानांतून केले तरी त्याला, लोकमान्यांनी केळकरास लिहिलेल्या पत्रात जे वर्णन उमटले आहे त्याची सर येणार नाही. माणसाच्या अतरंगाचा ठाव काढण्याची केवढी विलक्षण शक्ति लोकमान्यात होती हे त्या पत्रावरून चटकन लक्षात येते लोकमान्याचे जिवलग स्नेही ह्या नात्याने केळकरांचे नांव पुढील पिढ्या घेतील हा माझाच एकट्याचा ग्रह आहे असे नव्हे; तर लोकमान्याचें व केळकर ह्याचे निरीक्षण करण्याचा प्रसग ज्यास अनेकवार आला असेल त्याचाहि झाला असेल. मात्र केळकरांस लोकमान्याविषयी फार आदर होता तरी देखील त्यांनी आपली सदसद्विवेकबुद्धि त्याच्या स्वाधीन केली नव्हती. उदारमतवादीपणा आणि स्वतत्र विचारसरणी ह्याबद्दल केळकराविषयी त्याच्या प्रतिपक्षासहि आदरभाव वाटतो. मी 'मराठा' पत्र कित्येक वर्षे वाचीत आहे आणि त्यांतील मते जितक्या वेळां मला पसत पडली तितक्याच इतर वेळां ती नापसंतहि वाटलीं. पण एक गोष्ट मला पटली ती ही की, त्यांतील मते व भावना हे जिवंत प्रवाह असून इतर माणसांच्या कल्पनांच्या त्या निव्वळ नकला नाहीत.

" श्री. केळकर हे लोकमान्यांचे परम योग्य सहकारी होत, आणि हा सान हिंदी वर्तमानपत्रकार ह्या दृष्टीने कोणासहि अत्यत मोठा होय. ज्या

प्रख्यात पुढाऱ्याचा चतुर्थ स्मृतिदिन गेल्या आठवड्यांत साऱ्या देशभर मोठ्या उत्साहाने पाळण्यात आला, त्या पुढाऱ्याची खरी मते जर कोणाच्या तोडून ऐकावयास मिळतील तर ती केळकरांच्या तोडूनच होत अशी देशाची खातरी झाली आहे. संपादकाच्या खुर्चीवरून ते आता असेब्लीतील पदावर चढले आहेत. ह्या नवीन क्षेत्रातहि त्यांचे तेज चागले पडो असे मी इच्छितो.

"हायकोर्टाच्या एका निकालावर केसरीत काही टीका येऊन त्यामुळे कोर्टाची बदनामी झाली अशा गुन्ह्याबद्दल केळकरास जबर दंड झाला आहे.

"कोर्टाच्या बेअदबीबद्दल झालेला ५००० रुपयाचा दड प्रमाणाबाहेर फाजील आहे हे स्पष्टच आहे. आमची वर्तमानपत्रे कसल्या अडचणीतून मार्ग काढीत आहेत, त्यास माणसाची पैशाची आणि इतर साहित्याची किती आवश्यकता आहे, हे लक्षात घेऊन अशा दडाचे ओझे श्री. केळकर आणि केसरी पत्र ह्यांस सोसावयास लावू नये असे मला वाटत. केसरीत ज्या प्रकारचे मत व्यक्त झाले ते हायकोर्टाची नालस्ती करण्याचा बुद्धिपरस्सर प्रयत्न नसून, ब्रिटिश न्यापद्धतीविषयी लोकमत काय आहे ह्याचे निदर्शन होय असे सर्वानी मानले पाहिजे."

यानतर श्री. मुकुदराव जयकर बॅरिस्टर याचे विस्तृत भाषण झाले. ते म्हणाले, "न. चिं. केळकर याना मी फार दिवसापासून जाणतो व त्याच्या अनेक गुणविशेषाबद्दल मला फारच प्रेम आणि कौतुक वाटते. केळकर याची विनयसपन्नता खरोखरच फार नांवाजण्यासारखी आहे. लोकदृष्टीला मागेच रहावयाचे, पण आपलें कर्तव्य चोख व निर्भय रीतीने करावयाचे अशी त्याची रीत आहे. मी त्याना प्रथम १९०४ साली पाहिले व तेव्हांपासून त्यांचा माझा परिचय व प्रेमभाव हा वृद्धिंगतच होत गेला. टिळकाच्या भोवती त्या वेळी जी दहाबारा मडळी होती त्यांत ते एखाद्या शाळेतल्या मुलासारखे व आपल्या गुरुबद्दल अत्यंत आदरभाव बाळगणारे असे दिसले. टिळकांच्या देखत काय किवा इतर कोठे काय, अद्वातद्वा लिहिण्याची व भाषण करण्याची त्यांस कधीच संवय नव्हती. शब्द मोजके, माफक, अर्थपूर्ण व अदबीने लिहावे किंवा बोलावे कसे हे केळकरांपासून शिकावे. त्यांचे ज्ञान, व्यासंग व बहुश्रुतपणा फारच थोड्यांच्या अंगी असेल. आजकाल

अठ्ठावीस वर्षे केसरी-मराठा पत्राचे काम ते अत्यंत जबाबदारीने व चातुर्याने संभाळीत आहेत. पण भपकेबाजपणा, आचरटपणा, बढाईखोरपणा किंवा बकवा ते कधी करीत नाहीत. असेम्ब्लीचे ते सभासद आहेत. आणि त्यांनी आतां-पर्यंत भाषणे अशी एकदोनच केली. पण पडद्याआड त्यांचा सल्ला, पोक्तपणा व ज्ञान यांजा फायदा लोकपक्षाला किती होतो याची कोणाला अटकळहि नसेल. असो. आज त्याजवर झालेल्या खटल्यांत त्यांना दंड झाला यात आश्चर्य असें काहीच नाही. मुळात कायदाच सदोष तेथे जज्ज काय करतील ? सर अॅबरसन मार्टेन याना मी हायकोर्टात काम करणारा एक बॅरिस्टर या नात्याने चागले जाणतो. पण त्यानी देखील या खटल्यात दडाची शिक्षा दिली यावरून एकच गोष्ट सिद्ध होते ती ही की, केसरी-मराठ्याचा केळकरासारखा अत्यत जबाबदार सपादक काय परिस्थितीत, काय धोरणाने, कशा भाषेत लिहितो हे जाणण्याची न्यायाधीशाची पात्रताच नाही. आफ्रिकेत किवा चीनमध्ये आपल्यापैकी कोणाला न्यायाधीश नेमून जर एखाद्या नीग्रो किंवा चिनी वर्तमान-पत्रकाराचा खटला आपणापुढे आला तर आपण त्याचे म्हणणे समजल्याशिवाय त्याला योग्य न्याय कसा देणार ? केळकरांचा गुन्हा कांहीच नाही. आपल्या आजच्या अध्यक्षासारखे न्यायाधीश जर असते तर प्रस्तुत खटल्याचा काय निकाल झाला असता हे पाहा. नटराजन् यांनी सागितल्याप्रमाणे केळकरांना झालेला दंड आपणा सर्वांना झालेला आहे तो आपणच सर्वांनी भरला पाहिजे. ”

जम्नादास मेथा यांचे भाषण—जयकरांनतर श्री. जम्नादास मेथा यांनी भाषण केले. ते म्हणाले, “ केळकराविषयी जयकरांनी सागितले त्यापेक्षा अधिक काही सागावयाचे नाही. केळकर परवा मजकडे जेवावयास आले होते. तेव्हा मी त्याना म्हटले, ‘ तुमची आता लवकरच तुरुगात रवानगी होईल. ’ यावर त्यांनी मला विनोदाने एका म्हाताऱ्या बाईची व वाघाची गोष्ट सागितली. त्या गोष्टीतल्या वाघाची उपमा काही केळकराना झालेल्या दडाला देता येत नाही. पण तो कोल्हा देखील आपणच नाहीसा केला पाहिजे. ”

डॉ. वेलकर म्हणाले, “ तात्यासाहेबाचे गुणवर्णन करावे तितके थोडेच होईल. हिंदी वर्तमानपत्रकार या नात्याच्या त्याच्या कर्तबगारीचे स्थान अत्यत उच्च आहे. आजकालच्या गढूळ परिस्थितीत उत्तम मार्गापासून राष्ट्राला विन्मुख होऊ न देतां त्यांनी गेल्या तीस वर्षांत केलेली सेवा बहुमोल आहे. ”

सरोजिनीबाईंचे भाषण—सरोजिनीबाई नायडू आपल्या भाषणांत म्हणाल्या, " या खटल्यात केळकरांनी जी धडाडी आणि जे धैर्य दाखविले, व जे लोकसेवेचें थोर काम बजावले त्याबद्दल त्यांचे अभिनंदन मी मोठ्या आनंदाने करते. केळकर यांनी लोकमान्यांची परंपरा व धोरण हीं अखंड राखिली. टिळक व गांधी याच्यांत लोकधुरीण म्हणून पसत कोणाला करावे असे मला विचारले तर मी टिळकांनाच पसत करीन. पण लोकानी साधुत्व व श्रद्धा कोणापासून शिकावी तर ती साबरमतीच्या महात्म्यापासून असेंहि मी म्हणेन. गांधींनीं देखील केळकरांचे गुण फार घेतले आहेत. केळकरांचे मराठी फार सुंदर आहे. मला ते समजते, पण बोलतां येत नाही. तथापि केळकरांचे इग्रजीहि कांही कमी सुदर नाही. विलायतेस व येथेहि मी त्याचा पुष्कळ अनुभव घेतला आहे. शोधक, विवेचक, व भेदक बुद्धिमत्व उत्कृष्ट व जरूर त्याच शब्दांची योजना त्यांच्या-सारखी फार थोडक्यांना साधेल. विलायतेत मि. वेव्हिन्सन हे मजजवळ केळ-करांविषयी कौतुकपूर्ण भाषेने बोलले. तसेच लेबरपार्टीच्या किवा सरकारी व बिनसरकारी ज्या ज्या गृहस्थाशी भाषणप्रसगांत केळकरांचा उल्लेख कारणपरत्वे आला त्या त्या वेळी केळकरांच्या विनयशील कर्तृत्वासंबधाने त्यांनीहि मजजवळ प्रशंसापर उद्गार काढल्याचे स्मरते. माझे व त्यांचे कांही मतभेद आहेत. पण त्याची विद्वत्ता, रसिकता व धैर्य यांबद्दल माझा आदर केवळ निरातिशय आहे."

डॉ. सावरकर याचे भाषण—डॉ. नारायणराव सावरकर म्हणाले, " आजचा प्रसंग मला असे सांगत आहे की, ज्या केसरीने केव्हाहि केवळ लोकपक्षाचीच बाजू उत्तम रितीने लोकमान्याच्या वेळी त्याचप्रमाणे हल्लीहि, सिंहासारखे शौर्य व धैर्य दाखवूनच माडली, त्याला तुझा अल्प नजराणा देणे हे तुझे कर्तव्य आहे व ते मी बजावीत आहे तरवारीच्या धारेने डोक्यावर लिंबू कापावे तशी केळकराची भाषा असते. त्याचे माझे कितीहि मोठे मतभेद असते तरी या कामी ते मला अडवू शकले नसते, मग माझे मतभेद तर किरकोळच आहेत. केळकरांनी माझा हा आदरपूर्वक दिलेला नजराणा स्वीकारावा. "

नरीमन यांचे भाषण—नरीमन यांनी असे सांगितले कीं, " तात्या साहेबांची कीर्ति या खटल्यामुळें अधिकच वाढेल. नोकरशाहीशी भांडू

सत्ता ठेवण्याकरिता कशी खटपट करते हें बंगालसरकारच्या उदाहरणावरून लक्षात घ्या, व खिशात हात घालून केसरीचा दंड भरण्याच्या उद्योगाला लागा. ”

याननंतर नटराजन् यानी मला बोलण्याची विनंति केल्यावरून मी म्हणालोः— “ आतापर्यंत अनेक वक्त्यांनी माझ्यासबंधाने जे उद्गार काढले त्याबद्दल मी त्यांचा किती ऋणी आहे हे सांगतां येत नाही. अशा प्रकारचा खटला प्रथम सोळा वर्षापूर्वी मजवर झाला. तेव्हां मला १२०० रुपये दंड व चौदा दिवसांची शिक्षा झाली होती. या सोळा वर्षांची एकदम बढती देऊन हायकोर्टाने काल बाराशेचे ५२०० रुपये दड केला. कैदेच्या शिक्षेतहि अशीच बढती होईल असा स्वतः माझा व इतराचाहि अदाज होता. गेला बाजार सहा-आठ महिने इतकी तरी निश्चित शिक्षा होईल असे आम्ही सर्व धेऊन चालला होतो, व तीच गोष्ट माझे मित्र जम्नादास मेथा यांनी निराळ्या रीतीने सांगितली.

“ जम्नादासांनी गुरुवारी रात्री आम्हा मडळीना जेवण्यास निमंत्रण दिले ते ‘ केळकर घेऊन अगर केळकर वगळून ’ असेच दिले होते ! पण त्या दिवशी खटल्याचा निकाल झाला नाही म्हणून मी त्याजकडे जेवावयाला गेलो. ते म्हणाले, ‘ तुम्ही जेवायला येऊ शकतां की नाही याची काल शंकाच होती. ’ मी म्हणालो, ‘ तुमच्या घरची मेजवानी झोडल्याशिवाय कांही मी तुरुगात जात नाही खास ! ’ आणि हरप्रसगी त्याना मी व्यवहारांतले मराठी शिकवीत असतो, त्याप्रमाणे या वेळी मी त्यांना म्हणालो, “ जम्नादास मी तुम्हाला एक मराठी गोष्ट सागतो लक्षांत ठेवा. एक म्हातारी बाई आपल्या लेकीच्या घरी चालली होती. तिला वाटेत रानांत वाघ भेटला. तो म्हणाला, ‘म्हातारबाई, म्हातारबाई, मी तुला खातो.’ पण ती बाई भोळी होती. तिला वाघाचा स्वभाव काय माहीत ? ती म्हणाली, ‘ वाघोबा ! वाघोबा ! आज मला खाऊ नको. लेकीच्या घरी जाते. तूपरोटी खाते, धट्टीमुट्टी होते, मग मला खा ! ’ ( हंशाच हंशा.) शिशुवाङ्मयांतील ही गोष्ट मी एरवी तुम्हाला सांगितली नसती. पण जम्नादास यांनी इंग्रजीत तिचा उल्लेख केला, व तिचे खरे स्वारस्य तुम्हाला कळावे म्हणूनच ती मराठीत सांगितली. गोष्टीचा मुद्दा इतकाच, कैदेच्या शिक्षेच्या बाबतीत सोळा वर्षांनी माझी बढती व्हावी असा माझा व सर्वांचा जो अंदाज होता तो मात्र फसला. कदाचित् माझे वय ५०।५२ वर्षावर आहे म्हणून न्यायमूर्तींनी मला

कैदेची शिक्षा दिली नसेल. कदाचित् सरकारला आज पैशाची अधिक जरूरीहि असेल! कारण एका दिवसांत माझे ५२०० व विनोदपत्राचे १८०० मिळून ७००० रुपयांची रक्कम सरकारने मिळविली! केसरीचा दंड लोकांनी भरावा असे उदार उद्गार कित्येकांनी येथे काढले त्याबद्दल मी फार आभारी आहे. पण तो दंड केसरीने कालच भरून टाकला. या दंडाच्या बाबतीत विनोदपत्राच्या मुद्रकाला मात्र उगाच कडकपणे वागविण्यात आले. त्या बिचाऱ्याचा लेखाशी काय संबध ! शिवाय त्याने माफी मागितली होती, व ती स्वीकारण्याबद्दल सरकारी वकिलांनीहि शिफारस केली होती. म्हणून लोकाना या कडक शिक्षाची चीड आली असेल तर प्रथम या बिचाऱ्या मुद्रकाचा दड भरण्याला त्याला लोकानी मदत करावी. विनोद पत्रांत मजविषयी कसे लेख येतात हे आपणास माहीत आहेच. पण न्यायकोर्टाच्या अशा या दडपशाहीने ते पत्र बुडावे हे मला पसत नाही. म्हणून आपण कोणी त्याला मदत केली तर बरे होईल. कारण अशाने त्याच्यांतील दोष निघून जाऊन ते आपल्या पक्षालाहि कदाचित् मिळेल.

"असो. कोर्टाच्या बेअदबीच्या गुन्हा कशा प्रकारचा आहे हे आता आपल्या लक्षांत आलेच असेल. कोर्टाने खटला भरला की, माफीशिवाय आरोपीला सुटकाच नाही, अशी कोर्टाने आपली समजूत करून घेतलेली दिसते. म्हणूनच जुलमाने माफी घेणे किती अप्रशस्त आहे, हे मी परवा कोर्टास सागितले. चोराने खिंडीत गांठून लिहून घेतलेली पावती, आणि न्यायकोर्टाने जन्मभर तुरुंगांत ठेवण्याचा धाक दाखवून सक्तीने मिळविलेली माफी, यांत कांहीच फरक नाही. पण आरोपीने माफी न मागितली तर त्याला जन्मभर कैदेत ठेवण्याचा अधिकार कोठला, याची उपपत्ति लक्षांत आणा म्हणजे या चमत्काराचे खरे मर्म कळून येईल. ती उपपत्ति म्हणजे न्यायमूर्ति हे अमर्यादित राजसत्तेचे प्रतिनिधि होत, ही होय. पण राजसत्तेचा विलायतेत खेळखंडोबा कसा चाललेला आहे हे लक्षांत आले म्हणजे राजसत्तेच्या या प्रतिनिधीच्या बढाण्याची मौज वाटते. बर्कने सर्व जन्मांत एकच कोटी केली असे म्हणतात; व ती कोटी अशी की, 'व्हॉट इज मॅजेस्टी बट ए जेस्ट व्हेन शॉर्न ऑफ इट्स् एक्स्टर्नल्स !' 'मॅजेस्टी' या इंग्रजी शब्दाच्या अक्षरातील बाह्यांगे गेली म्हणजे बाकी निव्वळ 'ए जेस्ट' म्हणजे 'थट्टा'च उरते! विलायतेत राजसत्तेची बहुतेक अंगे नष्ट होऊन राजा हा आतां निव्वळ

पार्लमेंटच्या हातांतील बाहुलें झाला आहे. अशा राजाच्या बळावर, आणि विलायतेतील ‘ कॉमन लॉ ’ इकडे लावून, न्यायमूर्ति जर वाटेल त्याला, माफी मागत नाही म्हणून आपल्या मर्जीस वाटेल तितके दिवस म्हणजे जन्मच्या जन्म, कैदेत ठेवूं म्हणतील तर ते कोण ऐकून घेईल ? निदान त्याला कोण हंसल्या-खेरीज राहील ?

“ गुन्ह्याला निश्चित शिक्षा असली म्हणजे स्वाभिमानी मनुष्य माफीची याचना सहसा करणार नाही. कोर्टाने केलेली त्याची ‘ कन्व्हिक्शन ’ म्हणजे आरोपशाबिती, आणि आरोपीच्या स्वतःच्या ‘ कन्व्हिक्शनस् ’ म्हणजे त्याची नैष्ठिक मते याना एकत्र नांदण्यास जागा तरी मिळेल. जन्मठेप काळेपाणी दिले तरी ते वीस वर्षांत संपते; आणि कोर्टाच्या बेअदबीसारख्या फुसक्या गुन्ह्याला मात्र अमर्यादित शिक्षा ! पण ही स्थिति अशी आहे खरी. अर्थात तिजविरुद्ध आपण लढले पाहिजे. विलायतेत वर्तमानपत्रकारांनी किती जबर झगडा केला हे इकडे पुष्कळाना माहीत नाही. सर अर्स्किन मेचे पुस्तक वाचा म्हणजे कळून येईल. एकेका वर्षांत दोनदोनशे वर्तमानपत्रावर खटले ! पण लोकमताच्या सहानु-भूतीच्या आधारावर वर्तमानपत्रे ही भांडणे भांडली. सरकारी शिपायांनी अपराधी वर्तमानपत्रकाराला खोड्यांत घालण्यास नेले म्हणजे त्याच्याबरोबर लोक जात, व खोड्याजवळ एक वधस्तंभ पुरून त्यावर राजचिन्हे व न्यायचिन्हे उभी करून ती समारंभाने जाळीत. अर्थात लोकमत दाखविण्याचा तो एक ग्राम्य प्रकार होय. पण लोक आपले मत प्रगट केल्याशिवाय रहात नसत. इकडे आपणालाहि हे स्वातंत्र्य निराळ्या रीतीने पण अद्यापि प्रस्थापित करावयाचे आहे. हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीची घटना कायद्याच्या रूपाने आतां थोडीबहुत तरी निश्चित झाली आहे. पण वर्तमानपत्राच्या बाबतीत ज्यूरी वगैरेचा कांहीएक अधिकार आपणास नसल्याने आपण सर्वस्वी पराधीन आहो. पण हे स्वातंत्र्य मिळवावयाचे तर ते जोराच्या प्रयत्नाशिवाय मिळणार नाही. या बाबतीत इमर्सन नामक तत्त्वज्ञाचे एक वाक्य आपणाला सांगतो. ‘ ए रिव्हर मेक्स इट्स् ओन बेड ’ म्हणजे ‘ नदी आपले पात्र आपणच निर्माण करते ’ नदीला तिचें पात्र दुसरा कोणी निर्माण करून देत नाही. तिच्या अंगांत जोर असेल तर त्या प्रमाणाने तिला लहान अगर मोठे पात्र लाभते. जमीन भुसभुशीत मिळाली तर नर्मदा नदी आपले पात्र अर्धा मैल रुंद खणते, पण वाटेत विंध्याद्रीसारखा पर्वत

आला तरी ती त्यांतून आपला मार्ग काढल्याशिवाय रहात नाही; मात्र खडक कठिण म्हणून येथें ती लहान पात्रावर आपलें समाधान करून घेते. परंतु पात्र लहान म्हणून तिथे पाणी वाहून जाण्याचे रहात नाही, तर उलट इतर ठिकाणांपेक्षां अधिक जोरानें व खळखळीने वाहात असते.

"मला या विषयावर अधिक बोलण्याची इच्छा नाही. सर्व वर्तमानपत्रकारांना त्यांच्या धंद्याच्या अनुषंगाने अशी जोखीम पत्करावीच लागते. पण मी माझ्या धंद्याची नसती प्रौढी मिरवूं इच्छित नाही. असा कोणता धंदा आहे की, त्याची म्हणून विशेष जोखीम नाही ? गवंडी चार-चार मजल्यापर्यंत परांचीवर बसून भिंती बांधतो. मग जन्मभर हा धंदा करणाऱ्या गवंड्याच्या मनांत केव्हां कधींचे असें आले नसेल काय की, आपण उंचावरून पडूं व आपणास दुखापत होईल व ती सोसावी लागेल ! त्याच रीतीने गेल्या तीस वर्षांत ज्या ज्या संपादकांनीं आपल्या नांवाचे डिक्लेरेशन करून वर्तमानपत्रे, विशेषतः राष्ट्रीय पक्षाच्या धोरणाचीं पत्रे चालविली, त्यांना आपणावर तरी राजद्रोहाचा किंवा इतर खटला होऊन आपणास तुरुंगांत जावें लागेल अशी कल्पना असणारच. ही कल्पना डोळ्यापुढें असतांहि जो तें काम करतो त्याला तितक्यापुरतेहि धैर्य नाही असे म्हणणें किंवा मानणें हे स्वतः म्हणणाऱ्याच्या किंवा तसे मानणाराच्या मूर्खपणाचेंच निदर्शक ठरेल ! टिळकांसारखे मनोधैर्याचे अर्थात् थोडेच सांपडणार. परंतु आपल्या धंद्याला लागणारें सामान्य प्रतीचे धैर्य हे ज्याला त्याला असतेच. आतां धैर्य दाखविण्याचा अलीकडचा एक मार्ग निघाला आहे; तो अनुसरावयाचा म्हटला म्हणजे कोणीकडून तरी तुरुगांत जावें म्हणून मुद्दामच कांहीतरी लिहून तुरुंगवास ओढवून घेणें. पण वर्तमानपत्रकार हा कायद्याच्या दृष्टीने प्रवाहपतित असतो, त्याला केव्हां शिक्षा भोगावी लागेल याचा नेम नसतो, येवढेच मनांत बाळगून जेव्हां तो प्रसंग येईल तेव्हां तो आनंदाने स्वीकारणे हा दुसरा मार्ग होय. असो. आपण सर्वांनी मजविषयी सहानुभूति दाखविली तिजबद्दल मी आपले आभार मानून आपले भाषण पुरे करतो."

**पुण्याची जाहीर सभा**—ता. १५ रोजीं सायंकाळीं श्रीशिवाजीमंदिरांत श्री. भास्कर बळवंत भोपटकर यांच्या अध्यक्षतेखाली जाहीर सभा भरली होती. आपल्या प्रास्ताविक भाषणांत अध्यक्ष म्हणाले, "गेलीं दोनतीन वर्षे देशांत भाळीमिळीचें जें खळ पसरलें होते त्यास श्री. तात्यासाहेब बळी न पडतां त्यांनीं

हायकोर्ट लढविले व 'कर्मण्येवाधिकारस्ते' ही लोकमान्यांची परंपरा त्यांनीं अबाधित राखिली याबद्दल त्यांचे आपण अभिनंदन करीत आहो."

यानतर **ल. ब. भोपटकर** यांनी आपल्या भाषणास सुरुवात करतांना लोहगांवच्या खटल्याची सविस्तर हकीकत सांगून त्यांतून केसरीवरील खटला कसा निघाला याची माहिती सांगितली. नंतर ते म्हणाले:—

"खटला चालवितांना तात्यासाहेबांनीं वृत्तपत्रकारांची बाजू मोठ्या बाणेदारपणाने पुढे मांडली. त्यांनी हायकोर्टास स्पष्ट बजावले की, हायकोर्टाचे न्यायाधीश हेहि माणसेच असतात. हायकोर्ट हे सर्वगुणसपन्न समजावयाचे की काय, या प्रश्नाचा आपणास केव्हांतरी निर्णय करून घ्यावा लागेल.

"सन १९२१ साली असहकारिता सुरू झाली. त्या वेळी खटल्यांत बचाव करावयाचा नाही असे एक धोरण राष्ट्रात उत्पन्न झाले. परंतु हे धोरण आत्मघातकीपणाचे आहे असे महाराष्ट्राने तेव्हांच दे. तात्यासाहेबाच्या नेतृत्वाखाली स्पष्टपणे प्रतिपादन केले, व त्यानी हल्ली स्वीकारलेले बचावाचे धोरण लोकमान्याच्या धडाडीला अनुरूप असेच होते. राजकीय खटला ज्याचा त्याने स्वतःच चालवावा ही गोष्ट नेहमीच इष्ट असते व त्यास अनुसरून केळकर यानी उत्कृष्ट काम केले. वर्तमानपत्रकर्ते व सरकार यामधील हा झगडा या दृष्टीने त्यांनी खटला झुजवला. लोकमान्यांचा पाठीमागे सर्व बाबतीत श्रेष्ठ कोण असे मला कोणी विचारल्यास मी तात्यासाहेबांच्याकडेच बोट दाखवीन. विद्वत्ता व उत्कृष्ट लेखन या बाबतीत तर त्याच्या तोडीचे सपादक विरळा. विष्णुशास्त्रीबुवांच्या मागे महाराष्ट्र भाषेला सौंदर्ययुक्त अशी त्यांनीच बनविली, लोकमान्यांची परंपरा उत्कृष्टपणे चालविली, व त्यामुळे ते महाराष्ट्रास ललामभूत झाले आहेत."

यानतर **न. वि गाडगीळ** म्हणाले, "वर्तमानपत्राचे स्वातंत्र्य कमी करण्याचा सरकारचा कटाक्ष उघड दिसतो. परंतु हे धर्मयुद्ध खास नव्हे. एक इंग्रजी ग्रंथकार म्हणतो, ' मला वृत्तपत्राचे स्वातंत्र्य द्या म्हणजे मी देश स्वतंत्र करतो, ' असे महत्त्वाचे हे स्वातंत्र्य आहे. न्यायपद्धतीतच पक्षपातित्व आहे हा मूळ तंट्याचा मुद्दा आहे; व श्री. तात्यासाहेब यानी न्यायमूर्तींशी समानतेची पूर्ण जाणीव ठेवून आपले काम चालविले. इतक्या निर्भीडपणे एखाद्या नामांकित वकिलालाहि काम चालवितां आले नसते. ऐन वेळी केळकरांनी उदात्त प्रसंगाला

उदात्तपणे तोंड देऊन स्वतःची सरशी केली असे मुंबईचे एक वकीलच मज-जवळ म्हणाले, व ते सर्वथैव योग्य व लोकमान्यांच्या परंपरेला धरूनच होते."

याप्रमाणे भाषणे झाल्यावर मी आभार मानताना म्हणालो—

" आपण प्रेमाने माझा माझ्या योग्यतेहून अधिक गुणगौरव केला त्याबद्दल मी आपला ऋणी आहे. मजवर हा खटला यदृच्छेने झाला; तो अमक्यातमक्याने आकसाने केला असे मी म्हणत नाही. आम्हा वर्तमानपत्रकारांचे जीवित म्हणजे एक प्रकारे वनवासच आहे. कायद्याच्या रानावनात खटल्यांचे विंचू, इंगळ्या, साप वावरत असता आम्हीहि त्यांच्यामध्येच वावरत असतो, व आपल्या अकले-प्रमाणे सावधगिरीचे बूट-जोडेहि पायांत घालीत असतो. पण अशाहि स्थितीत साप विंचू हे क्वचित् दंश करणारच. मी १९१० फेब्रुवारीपासून आजतागायत सुमारे १३॥ वर्षे केसरीचा संपादक आहे. या अवधीत मजवर एकच खटला झाला ही गोष्ट मी सुदैवाची समजतो. ही वर्षे प्रेस ॲक्टाच्या व महायुद्धादि इतर कार-णांनी कशा प्रकारची होती हे आपण जाणताच.

" खटला झाला असता माझा मीच बचाव करणे ही गोष्ट अगदी स्वाभा-विक अशीच होती. त्यात मी विशेष असे काही केले नाही. मी या कामी अयोग्य अभिमान धरला नव्हता पण योग्य अभिमानहि टाकला नव्हता. स्वतः मी एल्एल्. बी. आहे व त्या धंद्यांत असतो तर वकिली केलीच असती. माझे सहकारी वकील लोक वकिली करतात ते पाहून मलाहि या वेळी एक वेळ वकिली करण्याची हौस आली असेहि क्षणभर मानले तरी त्यात वावगे ते काय ? खेळ पहात शेजारी बसणारा मनुष्य एखादे वेळी स्वतः हातांत डाव घेऊन खेळणारच. शिवाय या कामी माझ्या धंद्याने मला वकील-पत्र दिले आहे असेहि मनात वाटूं लागले. तथापि धंदेवाईक वकिलापेक्षा मी खटला चांगला चालवीन अशी अहंकारबुद्धि मी धरली नव्हती स्वतः काम चालविण्यात थोडासा तोटाच आहे हे मी जाणत होतो. पण सार्व-जनिक दृष्टीने त्यांत तितका नफाहि होतो परकी राज्यात जितक्या रीतीने व प्रसंगी आपल्यांतील सुशिक्षित लोक गुणाने, कर्तृत्वाने, व बुद्धीने साहेबलोकांची बरोबरी करून दाखवितील तितका जनतेला आत्मविश्वास व हिंमत अधिक येईल. हायकोर्ट जज्ज झाले म्हणून काय झाले ? आपण त्यांच्याहून स्वतःला कमी मानण्याचे कारण नाही, व हायकोर्ट जज्जांशी बरोबरीच्या नात्याने वागल्याचा हा प्रसंग साधावा म्हणूनच मी स्वतः काम चालविले.

" हा खटला हे माझ्या धंद्यांतील अवश्य नसले तरी आनुषंगिक जोखीम होते. पण समाजातील असा कोणता धंदा आहे की, ज्यांत त्याच्या अनुषंगानें येणारे जोखीम नाही ? म्हणून इतर कोणाहि धंदेवाल्यापेक्षा या खटल्यांत अधिक धैर्य मी दाखविले असे मला वाटत नाही. पण जनता ही आम्हा वर्तमानपत्र-कारांच्या धंद्यासंबंधाने विशेष उदार असल्यामुळे मी सांभाळलेल्या जोखिमेपेक्षां किंवा मला झालेल्या दुखापतीपेक्षा मला जनतेने सहानुभूतीच्या रूपाने अधिकच नुकसानभरपाई दिली. या नव्या औद्योगिक मनूत मोठमोठ्या कारखान्यांतून मजु रांना झालेली दुखापत कारखानदारांनी आपल्या खर्चाने भरून द्यावी अशी सक्ति करणारा 'वर्कमेन्स कॉम्पेन्सेशन ॲक्ट' करण्यात आला आहे. सार्वजनिक हिताच्या मोठ्या कारखान्यातील मीहि एक लहानसा मजूर आहे; आणि जनतेवर असा कायदा कोणी लादलेला नसता तिने माझ्या दुखापतीबद्दल प्रेमाने सगळे नुकसान भरून दिले हे तिचे केवढे औदार्य म्हणावे ? मी हा खटला असा चाल-वून लोकमान्यांची बाजू राखली असे सांगण्यात आले. परंतु टिळकांची खरी परं-परा राखणे कोणालाहि अशक्य आहे. कालिदासाने रघुवंशात "प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्" या उपमेने परंपरा राखण्याची खरी कल्पना व्यक्त केली आहे. एका दिव्याला लावून दुसरा दिवा पेटविला तर दोघांच्या तेजात फरक काहीच नसतो. त्या समान तेजाने एकाचे कार्य दुसऱ्याने करणे याचेच नाव खरी परंपरा राखणे. हे माझ्या हातून घडले नाही व घडणे शक्यहि नाही कदाचित् दिवा मालविल्यावर अंधार पडतो तेव्हा एखादी काडी पेटवून पायापुरती वाट दिसेल इतका प्रकाश पाडणे अशासारखे कांही काम कदाचित् माझ्या हातून गेल्या चार वर्षांत झाले असेल. तथापि टिळकांच्या सांप्रदायातील इतर लोकांनीहि ते काम आपापल्या परीने केलेच आहे."

यानंतर समारोपादाखल भाषण करताना अध्यक्ष **भा. ब. भोपटकर** म्हणाले, " तात्यासाहेब माझे राजकीय गुरुबंधु आहेत. आनंदवनभुवनात सतत गुरगुरणारा आमचा गुरु होता ! " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे " हें तत्त्व टिळकांनी तुरुंगाच्या दारांत एक पाऊल असतां प्रतिपादन केले व खुद्द तुरुं-गांत कर्मयोग लिहिला ! अशा गुरूचे श्री. तात्यासाहेब पट्टशिष्य आहेत व आम्ही मठ्ठ शिष्य आहो ! लोकमान्यांची परंपरा त्यांनी निर्विवादपणे उत्कृष्ट अशी चाल-विली. परंतु त्यांच्यांत एक दुर्गुण आहे. तो म्हणजे तुरुंगांत न गेल्याचा ! पण त्यांस

कोणी तुरुंगांत घालीतच नाही तर ते तरी काय करणार ! तुरुंगांत बावळटाप्रमाणे न जाता कोर्ट लढविणे ही लोकमान्यांची शिकवण होती. त्याप्रमाणे तात्यासाहेबांनीहि ओळीशी ओळ जुळविली. लोकमान्यांची परंपरा त्यांनी सर्वतोपरि उत्तम प्रकारे चालविली. लोकमान्यांच्या परंपरेप्रमाणे राष्ट्राचा गाडा त्यानी चालविला व मार्गात उजेड राखला याबद्दल आपणा सर्वांतर्फे मी त्यांचे अभिनंदन करतो."

कल्याण बेळगाव इत्यादि ठिकाणीहि अभिनंदनाच्या जाहीर सभा झाल्या.

असो; या खटल्यानंतर मी पुनः कोर्टात गेलो तो एका दिवाणी दाव्यांत वादी म्हणून. तो दावा खुद्द केसरी ट्रस्ट संबंधाचा असून, लो. टिळकांच्या दोघां मुलांवर मी ट्रस्टी या नात्याने दिवाणी फिर्याद करून कोर्टाकडून त्याजविरुद्ध कांही काही ताकिदी मागितल्या होत्या. या दाव्याची हकीगत साराशाने पूर्वी थोडीशी आलेलीच आहे. म्हणून मी ती पुनः येथे देत नाही. येथे इतकेच म्हणतो की, हा अप्रिय वाद आम्हाला दहा वर्षे तर पुरून उरलाच, पण एवढ्याने तरी तो संपेल की नाही याविषयी शंकाच वाटत होती. पण तो न संपला तर अवश्य ते आमचेहि कर्तव्य करण्यास आम्ही तयारी ठेवली होती.

पण या वादाचे जे भूत मुंबई हायकोर्टात न्यायमूर्ति पाटकर व ब्रूमफील्ड यांच्या कोर्टात गाडले गेले तेच त्याच इमारतीच्या दुसऱ्या एका खोलीत न्या. तय्यबजी यांच्या कोर्टात १९३१ च्या सप्टेंबर महिन्यांत पुनः उभे राहिले. मात्र यावेळी माझा संबंध वादी किंवा प्रतिवादी असा नसून साक्षीदार या नात्याचा होता. पण योगायोग असा की, खरे प्रतिवादी बाजूसच राहून मी व माझे सहकारी ट्रस्टी रा. धोंडोपंत विद्वांस हेच जसे काही प्रतिवादी असा त्या दाव्याला रंग चढला; व वादी वकीलाने आम्हाला बेभरवशी साक्षीदार असे ठरविण्याचा बहाणा करीत केसरी ट्रस्ट व टिळकपुत्र यांच्यांतील भांडणांतले बहुतेक मुद्दे पुनः उकरून काढले! आणि दैवयोगाने न्यायाधीशहि असेच मिळाले की, त्यांनी या सर्व मुद्यांचा पसारा आपल्यापुढील—वास्तविक संकुचित मर्यादेच्या दाव्यात—पुराव्याच्या रूपाने येऊ दिला. या दाव्यात टिळकपुत्र हे वादी व कै. रा. अण्णासाहेब नेने हे प्रतिवादी होते. तय्यबजी यांच्या कोर्टात वादी टिळक यांच्यासारखा निकाल झाला. परंतु तो हायकोर्टातच अपील बेंचर सर न्यायाधीश व न्या. रांगणेकर यांच्यापुढे निघाला तेव्हा तो फिरविला गेला. पण फिरविला गेला म्हणण्यापेक्षां

उभयपक्षांच्या संमतीने निकालांत गेला. पण ही तडजोड पुष्कळशी प्रतिवादी नेने यांना अनुकूल अशी होती. मी पक्षकार नव्हतो तथापि अॅडव्होकेट जनरल यांनीं मला तडजोड सुचविण्याकरितां निमंत्रण केले होते.

१९२१ साली मी कायदा मोडून दारूबंदीचे पिकेटिंग दोनदां केले. दोनहि खटल्यांत मला दंड झाला. त्याप्रमाणे सोन्या मारुती सत्याग्रह प्रकरणी मी कायदेभंग केला व खटला होऊन मला पंचवीस रुपये दंड झाला. पण पुढे कायद्याच्या मुद्यावर मी हायकोर्टाकडे अपील केले. त्यात ती शिक्षा रद्द होऊन दंडहि परत मिळाला.

ही वरील काही उदाहरणे प्रत्यक्ष झालेल्या आणखी खटल्यासंबंधाची म्हणून दिली आहेत. पण मी त्याना महत्त्व देत नाही. कारण अशा खटल्यात सहसा दंडापलीकडे मजल जात नाही. पण १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीत मी दोनतीनदां कायदेभंग केला ते प्रसंग मात्र असे किरकोळ म्हणता येत नाहीत. कारण त्या वेळी तुरुंगवासाची शिक्षा हा सामान्य नियमच होता. आणि प्रत्येक प्रसंगी या कायदेभंगाच्या कृत्याचे पर्यवसान खटल्यांत व तुरुंगवासांत होणार अशी साधार अपेक्षाहि होती. हे सर्व सांगण्याचे कारण इतकेच की, तुरुंगवासाच्या भीतिमुळे मी कॉंग्रेसच्या चळवळीविरुद्ध होतो हे म्हणणे निखालस खोटे आहे. त्याला माझी तात्त्विक कारणे होती. मग ती कारणे कोणी वाटल्यास खुशाल चूक म्हणो. दुसरे पक्षी मी हे सांगतो की, गांधी राज्यातील चळवळीत तुरुंगवास हा तुरुंगांतील सौम्यपणाच्या सवलतींच्या वागवणुकीमुळे एक नुसता खेळ, एक मवाळ हुल्लड, ठरत होती. तुरुंगांतील कैदी म्हणविणाराना तेव्हा काय काय सुखसोयी भोगावयास मिळत हे कोणास सांगितले तर खरेंहि वाटणार नाही. सावरकर टिळक यांचा तुरुंगवास आनंदाने भोगण्याइतके धैर्य कदाचित् मजमध्ये नसेल. पण गांधी राज्यांतील अनेक प्रतिष्ठित लोकांच्या तुरुंगवासविषयक धैर्याची बरोबरी करणारा मी आहे हे बढाई न करतां आणि विनय न सोडतां मला खचित सांगतां येईल. कीर्तीला हापापून तुरुंगांत मुद्दाम जाणारा मी नव्हतो; पण नियत कार्यक्रमांत तुरुंगवास प्राप्त झाला तर त्याला भिणाराहि मी नव्हतो असें मला वाटतें. १९२४ सालीं हायकोर्टापुढें मी केलेल्या ठणठणीत भाषणापलीकडे जाऊन दुसरा पुरावा याविषयी द्यायला नको.

असो. आतां या प्रकरणी मला आलेली अभिनंदनाची कांही पत्रें देतोंः—

( ता. ११।८।२४ ) केसरीवरील खटल्याचा निकाल ऐकून आश्चर्य व दुःख वाटले. तुम्हाला झालेला दंड व शिक्षा फार जबर आहे. तुम्हाला माझी पूर्ण सहानुभूति आहे व केसरीला या प्रसंगी मदत करण्यास कर्नाटकातर्फे सार्वजनिक फंड उभारण्याचीहि माझी तयारी आहे. तरी तुमचे काय मत आहे ते कळवावे. ( दत्तात्रय व्यं. बेळवी, हायकोर्ट वकील, बेळगांव. )

( ता. १२।८।१९२४ )—मुंबई हायकोर्टांत वर्तमानपत्राच्या वतीने तुम्ही मोठ्या निधड्या छातीने झगडा केलात आणि त्यात शिक्षेचा धोका देखील सहन केलात याबद्दल तुमचे अभिनंदन करतो. केसरीला झालेला दंड लोक सार्वजनिक-पणे भरून देतील अशी आशा आहे. क्रॉनिकलला पुण्याहून बातमीपत्र पाठविण्या-सारखा मनुष्य तिकडे आहे काय ? ( स. अ. ब्रेलवी, संपादक, बॉंबे क्रॉनिकल.)

( ता. २३।८।१९२४ )—वर्तमानपत्रांच्या स्वातंत्र्याकरितां तुम्ही फार धैर्याने हायकोर्टाशी भांडलात याबद्दल तुमचे मी अतिशय मनःपूर्वक अभिनंदन करतों. तुमच्याप्रमाणेच असे उदारधी संपादक वर्तमानपत्राच्या क्षेत्रांत आणखी असते तर काय बहार झाली असती ! लो. टिळकांचे तुम्ही सच्चे शिष्य आहात असे तुम्ही दाखविलेत. या द्वाड नोकरशाहीमुळे खरे बोलण्याची देखील चोरी झाली आहे असा पदोपदी अनुभव येतो. तुमच्या दंडाच्या रकमेला माझी लहानशी वर्गणी म्हणून रु. ३० पाठवीत आहे. (लाला दुनीचंद कसावली, पंजाब.)

( ता. १२।९।१९२४ ) कोर्टाच्या बेअदबीच्या खटल्यात हायकोर्ट आरो-पीला बिनमुदत शिक्षा देऊ शकते याबद्दल तुम्ही हायकोर्टात केलेल्या भाषणाची प्रत पाठविल्यास आम्ही त्याचा सारांश 'बॉम्बे लॉ जर्नल'मध्ये घालूं. त्याबद्दल एखादा सुरेखसा लेखहि शक्य झाल्यास लिहीन म्हणतो. ( बाळ गंगाधर खेर, सॉलिसिटर, संपादक, लॉ जर्नल, व आजचे कॉंग्रेसचे प्रधानमंत्रि, मुंबई. )

......असला दंड करण्याने केळकर व केसरी यांचे कितीसे नुकसान होणार ? दंड पचनी पाडून पुनः ते डोके वरच काढणार ! केळकरानी जो निर्भय धैर्याचा झगडा केला त्याबद्दल वृत्तपत्रकार व सार्वजनिक कार्यात लक्ष घालणारे इतर लोक यांजकडून त्यांचे अभिनंदनच होणे रास्त आहे. केसरी हा आधीच मोठा वजनदार आहे. हल्लीच्या निकालाने त्याचे वजन उलट वाढेलच. " ( म. गांधी, यंग इंडिया. )

---

## ( १२ ) कांहीं 'बड्या' लोकांशीं आलेला संबंध

१९०८ पासून मुंबईच्या प्रत्येक गव्हर्नराची व माझी काही कांही प्रसंगाने गाठ पडली होती. टिळकाच्या खटल्यानंतर मी मुंबईस टिळक केसचें पुस्तक छापवीत होतो. तेव्हा सर जॉर्ज सिडेनहॅम यानी हरि नारायण आपटे याच्यापाशी अशी चौकशी केली की, "मला केळकरांना भेटावयाचे आहे. ते भेटीला येतील की नाही?" त्यावर आपटे यांनी "बोलावल्यास अवश्य येतील" असे सांगून माझ्या भेटीचा दिवसहि परस्पर ठरविला व मला कळविले. तेव्हा मला पुण्यास जाऊन त्यांची गांठ घेणे प्राप्तच झाले. या पहिल्या भेटीत ते माझ्याशी सामोपचाराने बोलले व मला इतकेच म्हणाले की, "अत्याचाराचे प्रवर्तन व जातीजातीतील कलह एवढे वगळून तुम्ही निर्भीडपणाने लिहीत जा. हा गव्हर्नर वाईट आहे, तो असे असे करतो, असे व्यक्तिशः मला उद्देशूनहि तुम्ही लिहिले तरी मी त्याचा राग मानणार नाही;" व त्यानी शेवटी सांगितले की, "दरवर्षी एकवार तुम्ही मला अवश्य भेटावे अशी माझी इच्छा आहे. कारण विचारविनिमय हा सर्वांनाच फायदेशीर असतो"

यानंतर १९०९ च्या अखेर मी कायदेकौन्सिलच्या निवडणुकीला उभा राहिलो. माझे प्रतिपक्षी हरिभाऊ आपटे व धुळ्याचे गरुड हे होते. निवडणुकीला म्हणजे उमेदवाराकडून मतपत्रिका कमिशनरकडे येण्यास सुरुवातहि झाली होती. इतक्यांत कौन्सिल-निवडणुकीच्या नवीन नियमाचा फायदा घेऊन सरकारी गॅझेटचा जादा अंक काढून गव्हर्नरसाहेबानी मला "कौन्सिलात शिरण्यास अपात्र" ( म्हणजे राजकीय पूर्ववृत्त मते वगैरे लक्षात घेता अनिष्ट ) असे जाहीर केलं यावर अपील वगैरे काही नव्हते. आणि गॅझेटात माझ्यावरचा हा शेरा प्रसिद्ध झाल्याबरोबर निवडणुकीतून माझे नाव आपोआप रद्द झाले. हे घडवून आणल्याबद्दल हरिभाऊ आपटे याच्यावर लोकानी सहजच संशय घेतला. तो खरा नव्हता. परंतु त्याचा परिणाम होऊन अखेर गरुड हे निवडून आले. पुण्याच्या डेक्कन सभेमध्ये नामदार गोखले यांनी हा विषय घेऊन, सरकारच्या या कृत्याचा म्हणजे मला अपात्र ठरविण्याचा निषेध केला. नियमांचा हा दुरुपयोग झाला असे त्यांनीं स्वतः सहीवर प्रसिद्ध केले; व त्यांनीं होऊनच मला सांगितले की, "गव्हर्नरांनीं तुम्हास दरवर्षी भेटीस येत जा म्हणून जें सांगितलें आहे त्याचा फायदा घेऊन

त्यांना मुद्दाम भेटा, व निवडणुकीच्या बाबतीतील तुमची तक्रार मांडा. म्हणजे पुढील निवडणुकीच्या वेळी तरी तुमच्यावरील शेरा निघून जाईल व तुम्हाला उभे रहाता येईल."

त्याप्रमाणे भेटीची परवानगी मागून मी सिडेनहॅमसाहेबास जाऊन भेटलो व असें विचारलें की, "मला तुम्ही अपात्र ठरविण्याचे कारण काय ? मुंबई कौन्सिलमध्ये बसण्याला मी खरोखरच नालायक आहे म्हणजे माझी तितकी किमत नाही असें आपणाला वाटते काय ? " तेव्हां ते हसत म्हणाले, "मि. केळकर ! कौन्सिलांत जाऊन काम करण्याची पात्रताच म्हणाल तर, जे कित्येक लोक तेथे जाऊन बसतात त्यापेक्षा तुम्ही कितीतरी अधिक लायक आहा हे मी जाणतो. पण तुम्हाला अपात्र ठरविण्याचे कारण तुम्ही हायकोर्टाची बदनामी केली व त्याकरिता तुम्हाला दंड व कैदेची शिक्षा झालेली आहे. हाच तुमच्या अपात्रतेचा अर्थ होय. तथापि, नियमातच अशी सवलत आहे की, एकदा अपात्रता जाहीर केली तरी ती कदाचित् पुढे निघू शकते. म्हणून पुढे पाहू."

हायकोर्टच्या बदनामीचा व शिक्षेचा हा मुद्दा अवचित पुढे आल्याने, व तो मताचा प्रश्न असल्यामुळे, मी विशेष काही बोलू शकलो नाही. पण यानंतर केसरी-मराठ्याचा पांच हजारांचा जामीन घेतल्यावर माझी व सिडेनहॅमसाहेबाची गाठ पडली तेव्हा ते होऊन मला म्हणाले की, "सरकाराने तुमच्या पत्राचा जामीन घेतला याबद्दल तुमची तक्रार असेलच." त्यावर मी म्हणालो "तक्रार असली तरी करून काय उपयोग ? पुऱ्या दोन दिवसाचीहि मुदत न देता पाच हजार रुपयांचा जामीन सरकाराने मागितला. यावरून त्याच्या मनांत काय होते हे दिसूनच आले. शिवाय ज्या लेखाबद्दल म्हणून जामीन मागितला त्यांतला एक लेख तीस वर्षापूर्वीचा प्रो. आगरकरांच्या लेखातील उतारा होता, व दुसरे तर केवळ तुरुंगातून परत आलेल्या एका गृहस्थाचे केसरीला लिहिलेले पत्र होते. माझ्या स्वतःच्या अशा कोणत्याहि लेखाबद्दल जामीन मागितलेला नाही. हे असे कां !" या प्रश्नाचे उत्तर न देतां त्यांनी उडवाउडवी केली व "हे प्रकरण पोलिटिकल खात्याकडून परस्पर झाले. मला त्याची विशेष माहिती नाही" असे सांगून त्यांनी भागविलें. आणि मग प्रतिष्ठितपणाने मला असा उपदेश केला की, "जामीन घेतला म्हणून तुम्हाला भिण्याचे काय कारण ? तुम्ही सरकारच्या कृत्यावर टीका करतां त्याप्रमाणे त्यांनी

केलेल्या चांगल्या गोष्टींबद्दल त्यांना बरेंहि म्हणावें म्हणजे झालें. वर्तमानपत्रकर्त्यांनें न्यायाधीशासारखें वागलें पाहिजे."

तेव्हा मी म्हणालो "माफ करा, पण वर्तमानपत्रकाराच्या कर्तव्यासंबंधीं माझें मत आपल्या मताशीं जुळत नाही. मला एक तरी वर्तमानपत्र आपण असें दाखवू शकाल काय कीं, ज्याला स्वतःचा पक्ष म्हणून नाहीं व जें न्यायाधीशाप्रमाणें काटेतोल लिहितें ?" पण याहिपुढे जाऊन मी म्हणालो कीं, "न्यायाधीश होण्याचा मान वर्तमानपत्रानींच तेवढा का घ्यावा ? सरकारनें या बाबतींत स्वतः आपणच उदाहरण का घालून देऊं नये ?" तेव्हा गव्हर्नरसाहेब म्हणाले, "आम्ही तसें करीतच असतो." मी म्हणालो, "गेल्या एकदोन वर्षांत सरकारनें राजद्रोह वगैरेकरिता इतके लोक तुरुंगात घातले त्यापैकीं काही तरी सच्चे, सन्मान्य, व केवळ देशभक्तीमुळें आपत्तींत आलेले होते कीं नाही ? मग त्याना तुम्हीं जशी शिक्षा केली त्याप्रमाणें त्यांच्या गुणवर्णनपर दोन शब्द तुम्हीं एखाद्या भाषणांत केव्हा तरी आणावे कीं नाही ? म्हणजे न्यायाधीशपणा झाला ! आणि सरकारनें असें उदाहरण स्वतःच घालून दिलें म्हणजे आम्हीहि सरकाराबद्दल लिहिताना वाईटाबद्दल वाईट तसेंच चांगल्याबद्दल चागलें म्हणत जाऊं. आमचें काय गेलें ?" या उत्तरानें सिडेनहॅमसाहेब थोडे अडल्यासारखे होऊन विषय थट्टेवारी नेण्याचा प्रयत्न करून म्हणाले "वा ! वा ! अशा राजद्रोही लोकाबद्दल आम्ही हात वर करून असें म्हणावें वाटतें कीं, "अहो, हे पहा हे भले सच्चे लोक देशभक्त आहेत ! पण राजद्रोह केला म्हणून आम्ही त्याना शिक्षा केली." तेव्हा मीहि म्हणालो कीं, "हें करणें जर सरकारला अवघड वाटतें, तर सरकारनें काही बरें केलें तरी त्याला बरें म्हणणें हें आम्हा वर्तमानपत्रकर्त्यांनाहि अवघड कां वाटूं नये ? आम्ही तरी हात वर करून असें म्हणावें काय कीं, "पहा हो, हें सरकार किती चांगलें आहे. पण ही केली एवढीच गोष्ट त्यानी वाईट केली !"

अशा रीतीनें गव्हर्नरसाहेबांनी मला उपदेश करण्याचा आव घातला तो मोडून निघाला. त्यानंतर पुढच्या वर्षीं मी त्याना आपण होऊन भेटण्याला गेलोंच नाही. पण शहर म्युनिसिपालिटीच्या सगळ्या सभासदांची व सिडेनहॅमसाहेबाची एकदा कांही निमित्तानें सरकारी मुलाखत झाली; तेव्हां बाकीच्यांशी शेकहँड करून मजजवळ आल्यावर क्षणभर थांबून ते मला म्हणाले,

" मला वर्षातून एकदां तरी भेटावयाचे हा करार तुम्ही मोडला. तो कां ? " मी म्हणालो, " तुम्हाला भेटून सागण्याचे असे मजपाशी विशेष कांही नसते. मग तुमच्यासारख्या, कामाच्या गडबडीत असणाऱ्या, अधिकाऱ्याचा उगाच वेळ कां घ्या ?" तेव्हां ते म्हणाले, "वेळ उगाच जात नाही. विचारविनिमय करण्याने त्याचा मोबदला मिळतोच. तरी आता प्रायव्हेट सेक्रेटरीला लिहून दिवस ठरवून भेटीला या. " मग त्याप्रमाणे मी गेलो.

अशा रीतीने सिडेनहॅमसाहेबांनी आपण होऊन भेटीची इच्छा प्रगट करण्याचा परिपाठ माझ्याशी ठेवला होता. ह्यानतर लॉर्ड लाइड यांनी, ते गव्हर्नरच्या जागेवर येताच, शनवारवाड्यातील बागेच्या योजनेसबधान मला मुद्दाम भेटीस बोलावले होते. याची माझी दुसऱ्यादा गाठ झाली तेव्हां एक गोष्ट घडली. लॉइडसाहेबांना फार बोलण्याची सवय होती; व भेटीस आलेल्या माणसाशी संभाषणाच्या रीतीने न बोलता ते आपणच एकसारखे बोलत रहात. त्याचा मला थोडा राग आला, व मी त्याना स्पष्ट म्हणालो की " आपण इतका वेळ बोललात तर आतां मला पाच मिनिटे तरी मध्ये अडथळा न करतां बोलू द्याल की नाही ! " हे ऐकून लॉइडसाहेब किंचित् आश्चर्यचकित झाल्यासारखे वाटले. कारण असे बोलणे ऐकूण घेण्याची त्याना सवय नसावी.

बोलण्याचालण्याला चागले असे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन व विल्सन. या दोघांच्याहि माझ्या एक-दोन वेळ गांठी पडल्या होता. लॉर्ड विलिंग्डन यांच्या कारकीर्दीत मी पुणे शहर म्युनिसिपालिटीचा प्रेसिडेंट प्रथम झालो. तेव्हां त्यानी मला आपण होऊन कळविले की 'तुम्ही औपचारिक रीत्या अर्ज केल्यास कौन्सिल निवडणुकीच्या बाबतीत १९०९ साली जो अपात्रतेचा छाप तुमच्यावर सरकाराने घातला आहे तो काढून टाकला जाईल'; व त्याप्रमाणे घडलेहि.

१९३३ साली गोलमेज परिषदेहून परत आल्यावर दिल्लीहून व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन याजकडून इतराप्रमाणे मला भेटीचे निमत्रण आले. त्याप्रमाणे गेल्यावर प्रथम गो. मे. परिषदेच्या गप्पागोष्टी झाल्या. शेवटी निघतांना लॉर्ड विलिंग्डन यानी मला सहज म्हणून प्रश्न केला त्यावरून खालील आशयाचे संभाषण झालेः—

' काय केळकर, ब्राह्मणेतर चळवळ कशी काय आहे ? '

'त्या एकदर चळवळीचा वृत्तांत मजपेक्षां आपणालाच अधिक ठाऊक असणार!'

'तो कसा?'

'मुंबई इलाख्यांत ही चळवळ सुरू झाली ती तुमच्या गव्हर्नरी अमदानीत. येथून पुढे तुम्ही मद्रासेस गेला तेथें तर ही चळवळ अधिक जोरात होती.'

'ते मला माहीत आहे; पण तुमच्या महाराष्ट्रातील चळवळीसबधानें विचारले.'

'ती आतां थोडी थंडावली आहे असे म्हणतां येईल.'

'ब्राह्मणेतरांना ती पटत नाहीशी झाली म्हणून?'

'नाही. चळवळीचा खरा हेतु समाजातील मानाच्या अधिकाराच्या मोठ्या पगाराच्या जागा ब्राह्मणेतराना हव्या होत्या. त्या आतां त्याना बहुतेक मिळाल्या आहेत. उदाहरणार्थ—लोकलबोर्ड, म्युनिसिपालिट्या या सस्था बहुतेक त्यांच्या हाती गेल्या आहेत. तशीच प्रातिक कायदे कौन्सिलेंहि. "दाह्याभावात् न खेदात् ज्वलन इव वने शाम्यति क्रोधवन्हिः" असे एक संस्कृत वचन आहे. त्याचे भाषातर करून सागतो. "The forest fire becomes extinguished eventually, not because it feels tired or sorry, but because there remains in the end nothing to burn or consume" तसे ब्राह्मणेत्तर चळवळीचे झाले आहे.'

येवढ्यावर व्हाइसरॉयांनी वास्तविक थांबावे. पण किंचित् हसून मिस्किलपणाने ते मला म्हणाले—

'ते ठीक आहे म्हणा. पण या चळवळीने ब्राह्मणवर्गाचा पाडाव झाला म्हणून तुम्हाला वाईट वाटते की नाही?'

या खोचदार प्रश्नाचा रोख ओळखून त्याची धार परतवावी या विचाराने मीहि ठासून म्हणालो,

'छेः मुळीच नाही.'

तेव्हां आश्चर्य दर्शवून ते म्हणाले, 'मोठे आश्चर्य आहे म्हणावयाचे. मनुष्यस्वभावाविरुद्ध तुम्ही बोलत आहा नव्हे काय?'

मी म्हणालो, 'स्वभावाला संस्कृतीनें योग्य वळण मिळतें. आमच्या धर्म-ग्रंथात ब्राह्मणब्राह्मणेतरांविषयी काय योजना आहे आपणाला माहीत आहे काय?'

'नाही. मला सांगा ना.'

'आमच्या धर्मसंस्कृतीचें तत्त्वच असें आहे की, राजसत्ता, राजकीय सत्ता, लष्करी सत्ता ही क्षत्रियांच्या हातींच असावी. राजेपण हा क्षत्रियांचाच अधिकार!'

'आणि मग ब्राह्मणांनी काय टांचा घाशीत बसावे वाटते!'

'वः! ते काय म्हणून? ब्राह्मणाचा अधिकार व मान त्याहून मोठा.''

'तो कोणता'?

'राजाचा गुरु होण्याचा. राजा सिंहासनावर बसो. पण गुरु उपस्थित झाला म्हणजे राजाने त्याला उत्थापन द्यावे लागते. क्षत्रिय राजा ब्राह्मण गुरूच्या पाया पडतो. सल्लामसलतीची याचना करतो. गुरुहि अल्पसंतुष्ट अयाचित वृत्तीचा असल्यामुळे त्याचे थोडक्यात भागते व ते थोडे त्याला सहज मिळते. विद्या व ज्ञान याचा उपयोग निःस्वार्थीपणे केला तर तिला राजसत्तेहून अधिक मान आहे. मग मला सांगा की, ब्राह्मणेतर चळवळीचे वैषम्य ब्राह्मण कां मानील?'

लॉर्ड विलिंग्डन यानी मजकडून अशा उत्तराची अपेक्षा खचित केली नव्हती. म्हणून त्यांनी हा विषय थट्टेवारी घालविला. ते माझ्या गळ्यांत हात घालून दाराकडे जातांना म्हणाले, 'केळकर, तुम्ही धूर्त लबाड आहात.'

मी म्हणालो 'पण जसा प्रश्न तसं उत्तर!'

सर विल्सन याची माझी दोन वेळां गाठ पडली, तशीच सर फ्रेड्रिक साईक्स यांची. विल्सन साहेबानी डे. व्ह. ए. सोसायटीचे समारंभाचे वेळी भा. इ. मंडळास भेट दिली तेव्हां त्यानी केसरीतील माझ्या भाषाशैलीची स्तुति केल्याचे प्रसिद्धच आहे. एका प्रसंगी शिक्षण विषयक सुधारणांची चर्चा करण्याकरिता, दुसऱ्या एका प्रसंगी राऊंड टेबलचे आमंत्रण देऊन राजकारणाची चर्चा करण्याकरितां, सर फ्रेडरिक साईक्स याजकडून मला बोलवण्यांत आले होते. लॉर्ड ब्रेबन यांनी मला भेटीला बोलावले त्या वेळी थोडी मौज झाली. १९३२ साली मी गोलमेज परिषदेला गेलो तेव्हां अध्यक्षाच्या मागे बसणाऱ्या पार्लमेंटरी अधिकाऱ्यांच्या ओळींत लॉर्ड ब्रेबर्न हे केव्हां केव्हां येऊन बसत. मी गोलमेज परिषदेचा सदस्य म्हणून बसलेला होतों, यामुळें ते मला

ओळखीत. पण माझी त्यांची समक्ष भेट लंडनला कधीं झाली नव्हती. गणेश-खिंडींत त्यांना भेटण्याला मी गेलों तेव्हां, बसावयाच्या दिवाणखान्याचें दार आपल्या हाताने त्यांनीच उघडून, मी आंत गेल्यावर लावून घेतले. मग ते होऊन म्हणाले, 'तुम्ही मला ओळखीत नसाल पण मी तुम्हाला ओळखतो'. मी म्हणालो 'ते कसे ?' ते म्हणाले, 'गोलमेज परिषदेच्या जागेत मी बसत असे आणि केव्हां केव्हां तेथील दारें व खिडक्या आपल्या हातांनी उघडीत असे. तेव्हां तुम्ही परिषदेचे सभासद म्हणून बसत असां !' या आठवणीची मला मौज वाटली, आणि मी कांही तरी उत्तर द्यावें म्हणून हंसून म्हणालो "आणि आज इथे झालें तरी आपण माझ्याकरिता दरवाजा उघडण्याझाकण्याचे श्रम करून मला मान दिलातच की ! मात्र तिथलें इथले नाते वेगळे हो ! तिथे तुम्ही नोकर होतां. इथे यजमान म्हणून तोच शिष्टाचार तुम्हाला पाळावा लागला इतकेच."

हल्लीचे गव्हर्नर सर रॉ. लमले यांची माझी गांठ मुंबईस रामनारायण रुइया कॉलेज उघडण्याच्या वेळी पडली. या कॉलेजच्या सोसायटीचा चेअरमन म्हणून मी स्वागताध्यक्ष होतो. पहिले हस्तांदोलन होतांना गव्हर्नर म्हणाले 'कसे काय आहे ? मी तुमच्या विषयी बरेच ऐकले आहे.' मी म्हणालो 'आभारी आहे. आपणाविषयी मला तसें उलट म्हणतां येत नाहीं याचे वाईट वाटते'. पण क्षणभराने माझ्या शिष्टाचाराच्या म्हणून बोललेल्या वाक्याचा अर्थ चांगलासा नव्हता हे माझ्या लक्षात आले. आपणाकडे कमीपणा म्हणून घ्यायला गेलो तो मोठेपणा घेतल्यासारखेच झाले नव्हे कां ?

व्हाइसरॉयांपैकीं लॉर्ड आयर्विन यांची माझी प्रथम गांठ पडली तोहि प्रकार अकल्पितच. म्हणजे असा. मी सहा वर्षें दिल्लीच्या असेंब्लीचा सभासद होतो. पण या अवधीत कधीहि, गव्हर्मेंट हाऊसमध्ये जाऊन 'व्हिजिटर'च्या बुकात भेटीला गेल्याबद्दल नांव लिहून ठेवतात तें लिहिले नाही. गव्हर्मेंट हाऊसचा शिरस्ता असा आहे की, व्हिजिटर बुकांत नांव नोंदण्यास गेल्याशिवाय कोणालाहि फराळ, जेवण, गार्डन् पार्टी यांचे आमंत्रण जावयाचे नाही. आणि मला या निमंत्रणांचा कंटाळाच असे. पण लॉर्ड आयर्विन हें येऊन दाखल झाल्यावर थोड्याच दिवसांत मला त्यांजकडून भोजनाचें आमंत्रण आले. अर्थात् गव्हर्मेंट हाऊसचा हा नियम मोडूनच हे निमंत्रण आले होते हें उघड आहे. तरी प्रथम मी जावें न जावें या विचारांत होतों. पण शेवटीं जयकर अणे वगैरे मंडळींनीं "तुम्ही आल्याने

कांही बिघडत नाही, तुम्ही व्हिजिटर बुकांत नाव नोंदल्याशिवायहि बोलावतात तर जावे; राजकीय दृष्टया आपल्या पक्षाचा झाला तर त्यांत थोडा फायदाच होईल " असे सांगितले.

त्याप्रमाणे मी गेलो. भोजनोत्तर संभाषणास निवडक लोक बोलावतात त्यांत मला बोलाविले तेव्हां लॉर्ड आयर्विन हे प्रथमच मला म्हणाले " मी मुंबईस आल्यापासून तुमच्याविषयी अनेक लोकांकडून बरेच ऐकले आहे म्हणून आज तुम्हाला मुद्दाम बोलाविले. " नंतर रीतीप्रमाणे दहा मिनिटे जबाबदारीच्या राज्य-कारभारावर बोलणे झाले. त्यांत त्याचा शांत स्वभाव व सभ्यपणाचे बोलणे याची थोडीशी प्रचीति मला आली. पण त्यानंतरहि आजवर मी स्वतः कधी गव्हर्मेंट हाऊसमध्ये गेलो नाही व व्हिजिटर बुकांत नांव नोंदले नाही.

मला कोणी नेमस्त किंवा मवाळ हे निंदाव्यंजक विशेषण लावले तरी त्यालाहि एक गोष्ट कबूल करावी लागेल की, साहेबलोकांशीच काय पण स्वजनतेतल्याहि आपल्याहून मोठ्या वरिष्ठ लोकांशी मी कधी लघळपणा केला नाही. मी भित्रा नाही पण भिडस्त आहे. तसेच सरकारी किंवा अधिकारी इंग्रज किंवा संस्थानिक यांच्याकडे केव्हांहि स्वार्थाची याचना केली नाही. हे देखील प्रेक्षकाला परस्पर कळून येई यामुळे माझ्यामध्ये नेमस्तपणा असला तर तो स्वार्थी नसून केवळ बुद्धीचा धर्म किंवा स्वाभाविक गुण इतकेच तो म्हणूं शकला असता. याचे एक स्वतंत्र प्रत्यंतर एकदा अकल्पित रीतीने मला मिळाले. मी असेंब्लीतील स्वराज्य पक्षाचा सभासद १९२४।२५ या साली होतो. १९२६ साली आम्ही प्रतियोगी सहकारिता ( रिस्पॉन्सिव्हिस्ट ) पक्ष काढला नंतर १९२७ ते १९२९ या साली मी नव्या नॅशनॅलिस्ट पक्षात सामील झालो पहिल्या पक्षाच्या मानाने हा दुसरा पक्ष नेमस्त किंवा मवाळ अशी कांहीची समजूत होती. पहिल्या स्वराज्य पक्षांपैकी एक गृहस्थ पंडित द्वारकाप्रसाद मिश्र ( पूर्वी जबलपूर भागाचे असेंब्लीतील सभासद आणि आज नागपूरच्या मंत्रिमंडळातील एक मंत्रि ) एका वर्षी उन्हाळ्यात पुण्यास आले तेव्हा ते माझ्या भेटीला आले. सहज बोलण्यावरून बोलणे निघाले व त्यात दोन पक्षांची तुलना निघाली. तेव्हा ते म्हणाले " राजकीय पक्ष हे निव्वळ औपचारिक सामुदायिक नाव आहे. पण व्यक्तीचे गुणधर्म व स्वभाव स्वतंत्रच असतात, आणि त्याचा व या पक्षांच्या नावाचा पूर्ण मेळ बसतोच असे नाही. पुष्कळ लोक सोईकरिताहि एखाद्या पक्षात शिरतात." मी म्हणालो, " मीहि सोईकरिता

स्वार्थाकरितां स्वराज्यपक्ष सोडून नॅशॅनलिस्ट पक्षांत गेलो असे म्हणतां कीं काय ! " ते म्हणाले " छे-छे ! तुम्ही तर उघड व दणदणीत भांडण करून केवळ आपल्या मताकरितां नवा पक्ष काढला हे प्रसिद्धच आहे. मी म्हटले ते उलट आमच्या स्वराज्यपक्षांत येऊन मिळालेल्या कांही लोकांसंबंधाने. ते कांही एकप्रकारचा स्वार्थ मनात धरून आलेले आहेत, व आपल्या पक्षाच्या सामुदायिक सामर्थ्याचा उपयोग स्वतःचा स्वार्थ, खासगी देखील, साधण्याकडे कसा करून घेतात हें मी नित्य पहात आहे. याच्या उलट तुम्ही नॅशनॅलिस्ट पक्षांतले येवढ्यानेच नेमस्त ! पण आज दोन वर्षे मी लहानसा सभासद म्हणून, अगदी सगळ्यांत मागच्या पण उंचांत उंच बांकावरून, न्याहाळून लक्ष देऊन पाहत आहे. आणि तुमच्यापेक्षां वेगळ्या पक्षातला असलो तरी मी होऊन तुम्हाला सागतो की, सगळ्या असेब्लीत बिनसरकारी सभासदांच्या वर्गात, इतर एक-दोन लोकांबरोबर, तुम्हीच एक सभासद मला असे दिसला की, ज्याने केंव्हाहि साहेब लोकाशी सलगी दाखविली नाही, किंवा त्यांजकडे आपण होऊन जाऊन शेकहॅंडकरून गुडमॉर्निंग म्हटले नाही. आमच्या पक्षांतले स्वराजिस्ट म्हणविणारे काही लोक काय काय चाळे करतात, कसकशी सधाने बाधतात, व कशा निरनिराळ्या निमित्ताने साहेब लोकाच्या अतःकरणात स्थान मिळविण्याचा प्रयत्न करतात हे मी पाहिलेलें आहे, म्हणूनच म्हणतो की सामुदायिक राजकीय पक्ष व त्यातल्या व्यक्ति यांच्या गुणधर्माचा व स्वभावाचा ततोतत मेळ बसतोच असे नाही. "

पंडित द्वारकाप्रसाद मिश्र बोलले ते सर्वस्वी खरे असेच होते. कारण असेब्लीत मी आपण होऊन साहेबलोकाच्याकडे जाऊन त्यांच्याशी बोलत बसलों असे कधीहि झाले नाही. कारणपरत्वे तेच उठून मजकडे येत व बोलत. साहेब व अधिकारी यांनाच असे करणे परवडते व शोभतेहि !

असो; प्रसग पडल्यास मी इग्रज अधिकाऱ्यानाहि कसे तोडून टाकून वागवीत होतो, किंवा पत्रे लिहू शकत होतो, याचे एक नमुनेदार उदाहरण म्हणून पुण्याचे कलेक्टर मि. ट्रॉटमन यांना लिहिलेले पत्र देतोः—

(पुणें, २७ जून, १९३७) मे. जिल्हा कलेक्टर व डि. मॅ. यांस—वि. वि. आपले तारीख २५ चे पत्र पोचले. त्यांत सोन्या मारुतीच्या देवळासंबंधीं जो तंटा हल्ली आहे तो कांहीं तडजोडीने मिटणे शक्य आहे की काय याविषयीं चर्चा

करण्याकरितां आपण मला निमंत्रण केले आहे. पण उत्तरी मी कळवितो की, मी तुम्हांला भेटण्यास येऊं शकत नाही याबद्दल मला वाईट वाटते. पण त्याची माझी कारणे खाली लिहिल्याप्रमाणे आहेतः—

या देवळाच्या ट्रस्टीमंडळांपैकी मी नाही आणि तडजोडीसंबंधाने कोणत्याहि प्रकारच्या सूचना स्वतः करणे किंवा दुसऱ्या कोणी केल्यास त्यांची चर्चा करणे याविषयी मला अधिकार नाही. तुम्हाला जर खरोखरच असे वाटत होते की पुण्यातील केवळ एक खासगी नागरिक या नात्याने या प्रकरणी माझ्याशी चर्चा करण्याचा कांही उपयोग आहे, तर तुम्ही यंदाचा हा हुकूम काढून प्रकरण इतक्या हातघाईवर आणण्यापूर्वी मला निमंत्रण करावयास पाहिजे होते.

पण आता तसला तो हुकूम तुम्ही काढला, मी तो तोडला, मला अटक झाली, मजवर खटला भरला गेला, मला दंड झाला, आणि मी तो भरला. अशा रीतीने आतापर्यंत तुमची माझी सर्व फिटास फीट झाली आहे! मग तुम्हाला येऊन भेटण्याबाबत मी तुमचे काय लागतो? मला तुमची भेट घेण्याचे कारण नाही.

पण आता या पत्राने तुम्हाला प्राजलपणे हे सांगण्याची परवानगी घेतोच की तुमचा हुकूम अत्यत अविचारीपणाचा आणि जुलमी होता. आणि देवळाच्या आंतील घटा वाजविण्यापुरता तर तो हास्यास्पदहि होता!

गतवर्षी ह्या बाबतीत तुम्ही हिंदुसमाजाच्या हक्कावर आक्रमण केले, आणि केवळ मेहरबानी म्हणून उत्सवाच्या एका दिवसांत फक्त कांही थोडे तासपर्यंत पूजाविधि करण्याची सवलत दिलीत. देवळाच्या बिचाऱ्या ट्रस्टींनी मुकाट्याने तेहि कबूल केले. पण अगदी आयत्यावेळी तोहि हुकूम तुम्ही परत घेतला! म्हणजे ही दिलेली सवलतहि काढून घेतली! आतां या विषयी कदाचित् कोणी म्हणेल की, एकदम अकल्पित रीतीने दंगा सुरू झाल्यामुळे तुम्हांला ही गोष्ट करावी लागली. पण मनाची अशी समजूत करून घेतांनाहि ही गोष्ट उरतेच की, तुम्ही स्वतः दिलेला हुकूम अमलात येण्याकरिता जो भरपूर पोलिस-बंदोबस्त हवा तो ठेवणे हे तुमचे कर्तव्य असतां तुम्ही तो ठेविला नाही हा तुमचाच दोष होय.

बरे. त्यानंतर आतां संबंध एक वर्ष गेले. रीतीप्रमाणें यंदाहि मे महिन्यात देवळाच्या ट्रस्टीकडून सवाद्य पूजेच्या परवानगीची मागणी करण्याचा अर्ज येणा-

रच हे माहीत असता, या अवधीत त्याचा पूर्वविचार तुम्ही काय केला? अखेर-पर्यंत त्यांना काही एक सुगावा लागू न देता तुम्ही झुलविलेत. आणि शेवटच्या क्षणी हुकम काढलात त्याने तुम्ही गतवर्षीच्या तुमच्या अन्यायावरहि मात केलीत. कारण गतवर्षी सवाद्य पूजा करण्याची एक दिवसापुरती तरी परवानगी दिली होतीत, तीहि यदा काढून घेतलीत! अशी निदान एक दिवसाची परवानगी देणे हे जर गतवर्षी रास्त होते तर यदाच ते अयोग्य कसे ठरले? शिवाय गतवर्षी आयत्या वेळी दगा अचानकपणे उद्भवला ही सबब तरी तुम्हाला सांगता येण्या-सारखी होती. पण यदा तीहि स्थिति नव्हती. कारण गतवर्षीचा अनुभव लक्षात घेऊन यंदा दगा होईल तर त्याचा बंदोबस्त आगाऊ विचारपूर्वक करण्याला तुम्हाला भरपूर वेळ होता. आणि बंदोबस्ताला तुमच्याजवळ भरपूर साधने होती.

अशी स्थिति असतां यंदाहि ही परवानगी देऊ नये असे तुम्हाला वाटले म्हणजे मग यापुढे केव्हाहि ती परवानगी देऊं नये असेच तुम्हाला वाटणार असे सरळ अनुमान निघत नाही काय? यंदा मंदिरातील छोटी घंटा वाजविण्यास प्रतिबंध केला तो हास्यास्पद होता ही गोष्ट तुमच्या नजरेला आली. आणि लोक असे बोलतात की, तेवढ्यापुरता प्रतिबंध काढून घेतल्याने जर सत्याग्रह थांबविला जाण्याचा प्रयत्न यशस्वी होण्याचा संभव असेल तर करून पाहावा असे तुमच्या मनात मध्यतरी एकदा आले होते. पण तसेहि काही न घडतां तुम्ही अखेरपर्यंत तो हुकूम जारी ठेवला, खटले भरण्याचा तडाखा चालविला, आणि लोकांना शिक्षा देण्यापर्यंत मजल नेलीत. असे करून तुम्ही स्वाभिमानी सत्याग्रह्यांकडून सुमार दोन हजार रुपये उकळले. या कृत्यामुळे सरकाराचा पोलिस बंदोबस्त ठेवण्याला जो थोडा अधिक खर्च लागला असेल तो तुम्ही परस्पर वसूल केला याबद्दल सरकारचे जमाबंदी खाते तुमचे फार आभारी झाले असेल! पण असे करण्याने तुम्ही हिंदुसमाजाच्या अपमानाच्या जखमेवर अन्यायाचे मीठ चोळलेत असेच होत नाही काय? आतां असा विचार आपण करू की, देवळाच्या ट्रस्टींना सवाद्य पूजा करण्याचा हक्क एक आहे तरी किंवा नाही तरी. दोघांपैकीं एक घेऊन चाललेच पाहिजे. हा हक्क त्यांना नाही असे ठरले तर पुढचें सर्व बोलणेच खुंटले. आणि गतवर्षी तुम्ही जी मेहेरबानगीची थोडीशी झुळूक दाखविलीत तीहि निष्कारणच होती म्हणावयाची. पण दुसरे पक्षी ट्रस्टींना हा हक्क आहे असे ठरले तर तो हक्क बजावूं देण्याविषयी योग्य ती सर्व तजवीज सरकारनें

स्वतः अंगावर घेऊन सरळपणे पार पाडली पाहिजे. तसे न करतां 'तडजोडी'चे नांव करून त्या खोड्यांत ट्रस्टीना अडकवू पहाणे हे योग्य होणार नाही. या तडजोडीना मी खोडा म्हणतो याचे कारण असे की, तडजोडीचाच विचार म्हटला म्हणजे त्यांत उभयपक्षी कांही देणे घेणे सोडणे हे आहेच. आणि दुर्दैवाने हल्ली असे चमत्कारिक दिवस हिंदूंना आले आहेत की, अशा कोणत्याहि देवघेवीत बिचाऱ्या हिंदूंच्या हक्काचाच तेवढा कान एक तसूभर जादा छाटला जावा! म्हणून मी म्हणतो की, तुम्ही ही तडजोडीची म्हणून वाटाघाट काय काढली ? आणि तडजोड करून ठरविण्यासारखे तरी त्यात काय आहे ? हिंदु व मुसलमान यांच्या परस्पर विरोधी हक्काचे भांडण आणि त्यापासून उत्पन्न होणारा प्रश्न, हा सरकारापुढे आजच पहिल्यादाच आणि फक्त पुण्यासच उद्भवला आहे काय ? अशा प्रकारची उदाहरणे व हा प्रश्न सोडविल्याचे दाखले सरकारच्या दप्तरी काय थोडे आहेत ? मग ते विचारांत घेऊन सरकाराने स्वतःच स्वतंत्र असा निर्णय कां देऊ नये ? वादातील मशिदीजवळून किंवा आसपास इतर हरप्रकारची वाद्ये वाजतात, आवाज, गोंगाट होतात. त्यातील काही स्वतः मुसलमानहि करीत असतील. हे सर्व मशिदीच्या मुसलमानाना चालते. पण बिचाऱ्या हिंदूनी एक दिवस आपल्या ह्या देवळाजवळ सवाद्य पूजेचा आपला हक्क सांगितला तर तो तेवढा मुसलमानाना निषिद्ध व असह्य कां वाटावा ? आणि तो आग्रह सरकारने कां चालू द्यावा ? मुसलमानांतील कोणी चार गुंड दगा माजविण्याचे मनात आणितात. एवढ्याचकरिता पुण्यातील सार्वजनिक रस्त्यावर हिंदूना वाद्ये वाजविण्याची कायमची बंदी व्हावी ही योग्य आहे काय ? मग हिंदूनी आपले कायदेशीर हक्क तरी कसे बजवावयाचे ? आणि आपल्या समग्रही बंदोबस्ताची भरपूर साधने असता सरकारने हिंदूंच्या ह्या हक्कांना प्रतिबंध करावा यावरून सरकारात कोणी तरी मुसलमानाचे पक्षपाती आहेत, किंवा सरकारांत कोणी चार मुसलमान गुंडांना भिण्याइतके नादान आहेत असे कोणी म्हटले तर काय हरकत ? बरे उलट हिंदुसमाज पहा. त्यातील कोणी सरकाराला पुण्यातच काय पण या इलाख्यात कोठेहि अशा बिकट अडचणीत कधी घातले आहे काय ? कायदा करून शांततेने वागण्याचें हेच बक्षीस हिंदूना मिळावे काय ?

मी तुम्हाला हे सर्व लिहिले याबद्दल तुम्ही मला माफ करा. पण कांही सरकारी अधिकाऱ्याचे धोरण असें पक्षपाती अन्यायी आणि केवळ इभ्रतीला बळी

पडणारे आहे असे ज्याला प्रामाणिकपणे वाटत असेल त्या कोणीहि मी लिहिले याहून कमी लिहिणे शक्य नाही. शेवटी मला असे म्हणावयाचे आहे की, सरकाराला या प्रकरणी जर कांही तडजोड करूनच हा प्रश्न सोडवावा असे वाटत असेल, तर निदान त्यानी ही तडजोड तुमच्यावर तरी सोपवूच नये. कारण तुमचे वर्तन या प्रकरणी बहुशः पक्षपाताचे झाले आहे आणि हल्लीचा हा बखेडा तुमच्या अविचारामुळेच उत्पन्न झालेला आहे यांत शंका नाही. —( न. चिं. केळकर. )

ज्याप्रमाणे मोठमोठ्या युरोपियन अधिकाऱ्याशी त्याचप्रमाणे संस्थानिकांशी वागण्याचे धोरण मा ठेवले होते; व त्यासंबंधी पहिला नियम हा की, अशा लोकांपैकी कोणासहि व्यक्तिशः म्हणजे स्वतःकरितां आपण होऊन जाऊन भेटावयाचें नाही, तर त्यांनी कोणी बोलावणे पाठविले तरच भेटावयाचे. यामध्ये कोणत्याहि प्रकार त्याच्याविषयी तिरस्कारबुद्धि होती असे नव्हे; तर मोठ्या लोकांना आपण होऊन भेटण्यात आपल्याच स्वाभिमानाला धक्का बसतो, व इतरानाहि तो सहजच लघळपणा किंवा खोटा लाघवीपणा असा वाटतो. कामाशिवाय गेल्यास हवापाण्याच्या गोष्टी बोलावयाच्या त्यात अर्थ काय ? व नसता भलेपणा देऊन त्यांच्याशीं बोलणे म्हणजे एक प्रकारचा तोंडपुजेपणा होतो. शिवाय आपला पेशा पडला टीकाकाराचा. त्यामुळे प्रसंगोपात्त मी अशा बहुतेक लोकावर टीका केलेली असणार. मग सार्वजनिक टीकेचा दोष घालविण्याकरिता जर असा खाजगी प्रयत्न करावयाचा तर आधी ही टीका करावीच कशाला ? टीकाकाराचे कटु व्रत पत्करले तर मोठ्या लोकांशी फटकून वागण्याची व त्यांची अवकृपा न जुमानण्याची तयारी असावी लागते, व ती मी नेहमी ठेवली होती. आमच्या वर्तमानपत्राच्या धंद्यांत असे पुष्कळ ठिकाणी आढळून आले आहे की, संपादकांस लाचलुचपत देऊन आपल्याविषयी किंवा आपल्या संस्थानाविषयी स्तुति करवून घेण्याची संस्थानिकांना इच्छा असते; व स्वार्थाच्या मोहाला बळी पडून व स्वतःकरिता देणग्या न घेतल्या तरी आपले छापखाने वर्तमानपत्रे याच्याकरिता त्या घेऊन ते संस्थानिकाचे उद्दिष्ट साधून देतात. विलायतेत हा मार्ग अगदीच प्रतिष्ठित मानला गेला नसला तरी लोक त्याच्याकडे कानाडोळा करतात. आणि हिंदुस्थानांत त्या गोष्टीचे अनुकरण पुष्कळ वर्तमानपत्रांनी केले आहे. मुंबई क्रॉनिकल, मुंबई टाईम्स, मुंबईचा इंडियन डेली हेरल्ड, अशा पत्रांनी संस्थानिकांना खूष करून व त्यांचे स्तुतिपाठक बनून, किंवा त्यांची वकिली करून, पुष्कळ पैसा मिळविला आहे.

पूर्वी मद्रासच्या हिंदूला विजयनगरमच्या राजाने बरीच मोठी देणगी दिली होती. आणि बंगाल्यातील वर्तमानपत्रानी तर या कामी काहीच विधिनिषेध ठेवलेला नाही. एका राजाने किंवा जमीनदाराने एक वर्तमानपत्र आपल्या काखेत मारावे, दुसऱ्याने दुसरे, असा क्रम आज पन्नास पाऊणशे वर्षे चालू आहे. अलीकडेच तो थोडा थांबला आहे. याचे कारण वर्तमानपत्रे अधिक जहाल व स्वातंत्र्यप्रिय होत चालली असून, ती इंग्रज सरकारप्रमाणे हळूहळू राजे जमीनदार तालुकदार यांच्याहि जीवावर उठू लागली आहेत. आणि जो पैशाचा पाटपुरावा अशा लोकाकडून होण्याचा थांबला तो सामान्य जनतेकडून कसाबसा पुरा पडत आहे. नाभाच्या महाराजाकडून ××× साहेबानी आपल्या पत्राकरिता हजारो रुपये उपटले ही गोष्ट प्रसिद्ध आहे. क्रॉनिकल पत्राला फेरोजशहा मेथा याच्या पुढाकारामुळे लाख दोन लाख रुपयाची वर्गणी प्रथमच जमली, व पुढेहि त्याला अनेक श्रीमत लोकानी देणग्या दिल्या. आता यात वावगे असे तेव्हा काहीच नव्हते, कारण देणगी निरपेक्ष व घेणारा स्वतत्र अशी स्थिति तेथे होती. पण दुसऱ्या एका पत्राच्या सपादकानी नाभाच्या महाराजाचे श्राद्ध पैसे खाऊन विकत घेतले ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळे विशेषतः नाभाच्या महाराजाची योग्यता लोकाना पुरी माहीत असल्यामुळे, या व्यवहाराला सहजच वाईट स्वरूप आले; व सपादक साहेबाची जी थोडीबहुत किंमत आधी होती ती आणखीहि पुष्कळ उतरली. सुदैवाने माझा ज्या वर्तमानपत्राशी, ज्या संस्थेशी, व ज्या पुढाऱ्यांशी आजन्म सबध राहिला त्याची पूर्वपीठिका व परंपरा सर्वस्वी निस्पृहतेची असल्यामुळे माझ्या स्वभावाला अनुकूल अशीच परिस्थिति मला प्राप्त झाली. याबद्दल मला नेहमी आनद वाटे.

टिळक व केसरी हे इतक्या निस्पृहतेने जन्मभर वागले की, राजेरजवाडे संस्थानिक, जहागिरदार, इनामदार यांच्या एका पैचेहि ओशाळे ते कधी राहिले नाहीत. सुदैवाने केसरीची सांपत्तिक स्थिति प्रथमपासून बरी, पुढे पुढे तर चांगलीच होती. यामुळे केसरीला कोणाच्या पैशाची अपेक्षा करण्याचे कारण नव्हते. शिवाय केसरी व टिळक यांच्याभोवती एक प्रकारे इग्रजांसबंधाने राजद्रोहाचे वातावरण जमून राहिलेले असल्यामुळे, राजेरजवाडे वगैरे लोकांना केसरीशी सबंध ठेवणे सोईपेक्षां गैरसोईचेच अधिक वाटण्यासारखे होते. ही या कामी एक प्रकारची मदतच होती! टिळकांच्या मृत्यूनतर केसरीसबधाने विद्वेषाचे वातावरण पूर्वीइतके राहिले नाही, म्हणजे ज्या टिळकांना जिवंतपणी जे लोक अस्पृश्य मानीत त्या

टिळकांचे ते लोक पुढे उघडपणे गुणाहि घेऊ लागले. तशांतच संस्थानी स्वराज्याची चळवळ १९२०-२१ पासून विशेष सुरू झाली, व टिळकांपेक्षांहि एकप्रकार मी त्या चळवळीत अधिक पडलो. पण या चळवळीत संस्थाने व संस्थानिक हे जगवूनच सुधारावे हे तत्त्व मी नेहमी प्रतिपादित असल्यामुळे, सस्थानी प्रजा व संस्थानिक या दोहोंचाहि निरपेक्ष निःस्वार्थी स्नेह व विश्वास मला थोडाबहुत संपादितां आला.

केसरीचा संपादक व वरिष्ठ कायदेमंडळाचा सभासद वगैरे नात्यांनी माझी योग्यता कोणत्याहि संस्थानाच्या दिवाणाच्या योग्यतेहून कमी नव्हती. यामुळे संस्थानिक लोक माझ्याशी आदरबुद्धीने वागत. आणि माझ्याशी संबंध ठेवीत. तथापि या संबंधांतहि मी केसरी संस्थेची पूर्वपरंपरा, म्हणजे निस्पृहता व मतस्वातंत्र्याचे धोरण, ठेवीत असल्यामुळे मी निःपक्षपाती व स्वतंत्र टीकाकार आहे असे संस्थानिक व त्यांचे प्रजाजन या दोघानांहि कळून चुकले होते.

नाही म्हणावयाला एक प्रसंग खोट्या अपवादाचा पण अनिष्ट असा चुकून येणार होता पण तो अखेर मीच टाळला. नाभाचे महाराज हे पदच्युत झाल्यानंतर त्यांनी प्रमुख देशी वर्तमानपत्रे आपल्यातर्फे लिहिण्यास मिळावी अशी जोराची खटपट चालविली व ती अनेक ठिकाणी यशस्वी झाली. त्याचप्रमाणे केसरी-मराठ्याचेहि सहाय्य आपणास मिळावे अशी इच्छा धरून त्यांनी दिल्लीस मला एकदां भेटीला व एकदां भोजनाला बोलाविले होते. १९२५ साली कानपुरास राष्ट्रीय सभेला मी गेलो तेव्हां महाराजांनी आपले एकदोन हस्तक मजकडे मुद्दाम पाठविले; व डेहराडून येथ मी महाराजांच्या भेटीला जावे असा फार आग्रह केला. नाभाचे महाराज इतर दृष्टीने मोठे चांगलेसे होते असे नाही. पण इंग्रज सरकारशी वागतांना त्यांनी दाखविलेला बाणेदारपणा प्रसिद्ध होता. आणि त्यांतल्या त्यांत आम्हाला त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटण्याचे विशेष कारण असें की, टिळक वारल्यानंतर त्यांच्या संबधाने स्पष्ट गुणग्राहक व स्तुतिपर असें भाषण या एकाट्याच संस्थानिकाने जाहीरपणे करण्याचे धैर्य दाखविले होतें. यामुळे महाराजांना जाऊन भेटावे व त्यांच्या निमंत्रणाचा आदर करावा असे वाटून मी दिवसहि ठरविला. परंतु दरम्यान मी लखनौ येथें माझे मित्र व टिळकांचे जामात डॉ. साने यांना भेटावयास गेलो. तेथे बोलण्यांत या

गोष्टी सहज निघाल्या. तेव्हां त्यांनीं मला असा सल्ला दिला की, नाभाच्या महाराजाबद्दल तुम्हाला सहानुभूति वाटत असली तरी समक्ष त्याच्या भेटीला जाऊं नका. आणि असे कां म्हणून विचारतां ते म्हणाले की, " वर्तमानपत्रांना लांचलुचपत देऊन वश करून लिहिवण्याविषयींची महाराजांची अपकीर्ति तुमच्या दक्षिणेत फारशी नसेल, परंतु इकडे उत्तर हिंदुस्थानांत ती फार आहे. प्रसंगविशेषी आजवर तुम्ही महाराजाविषयी लिहिले असेल तेवढे पुरे. आणि त्याला आज किंमतहि आहे. पण तुम्ही महाराजाना भेटावयास गेला की, तुम्ही त्याच्या लांचलुचपतीला बळी पडला असा खोटा कां होईना पण अपवाद सुरू होईल. तुम्हास त्यांच्या मदतीमुळे अडलेले नाही, व त्यांनी मदत देऊं केली तरी तुम्ही ती स्वीकारणार नाही हे मला पूर्ण माहीत आहे. तथापि, त्या महाराजांचा संबंध आला की, कोणावरहि अपवाद हटकून यावयाचा. तेव्हां त्यांना न भेटणे हा उत्तम मार्ग. एरवी, पैसा तर नाहींच पण नसता अपवाद अंगाशीं चिकटावयाचा." मला ही गोष्ट फार पटली व मी तिकडे येऊं शकत नाहीं अशी डेहराडून येथें महाराजांच्या हस्तकाला तार करून मी पुण्यास आलो.

संस्थानिकांशी वागण्यांत अशा रीतीने मी नुसती निस्पृहताच ठेवली असे नाही तर स्पष्टवक्तेपणाहि ठेवला. त्याचा एक प्रकार व प्रसंग सांगण्यासारखा आहे म्हणून सांगतो. १९२१ साली असहकारितेच्या चळवळीचा ऐन जोर होता तेव्हांच प्रिन्स ऑफ् वेल्स् हे हिंदुस्थानांत येण्याचा योग घडून आला हें प्रसिद्धच आहे. या योगांत फिरून योग असा की, पुण्यास शिवाजी महाराजांच्या स्मारकाच्या पायाचा दगड प्रिन्स ऑफ् वेल्स् यांच्या हातून घालावा असे या स्मारकाच्या चळवळीचे पुढारी कोल्हापूरचे छत्रपति महाराज व ग्वाल्हेरचे अधिपति माधवराव महाराज शिंदे यांनी ठरविले. पुण्यांतील समारंभाचा दिवस ठरला. पण त्याजबरोबर या समारंभावर बहिष्कार घालावा असे पुण्यांतील लोकांचेहि ठरले. अर्थात् हा बहिष्कार शिवाजी महाराजांच्या स्मारकावर नसून, ते ज्याच्या हातून सुरू होणार त्या विलायती युवराजावरच तो बहिष्कार होता. अशा रीतीने, समारंभ भरदार दिसावा म्हणून शनवार वाड्यापुढे गर्दी जमविण्याची एका अगाने खटपट सुरूं होती तर या समारंभाच्या वेळी तिकडे सरकारी अधिकारी व त्यांचे हस्तक याखेरीज एक चिटपाखरूंहि फिरकूं देऊं नये अशी दुसरीकडे आमची चळवळ सुरूं होती. या चळवळीला बराच रंग व जोर आलेला उघड

दिसत होता. स्मारकाच्या पुढाऱ्यांपैकी कोल्हापूरकर महाराज हे निरुपयोगी व केसरीचे उघड प्रतिपक्षी. पण ग्वाल्हेरच्या माधवरावमहाराजाची स्थिति व योग्यता वेगळी होती. म्हणून त्याना अशी कल्पना सुचली की, या बहिष्काराच्या चळवळीचा पुण्यांतला एक प्रमुख पुढारी म्हणून मला भेटीला बोलवावे व माझी समजूत घालून शक्य तर बहिष्कार उठवावा. अर्थात् आळशावर गंगा लोटण्याचा प्रसग आला ! समारंभाच्या आदल्या दिवशी मी घरी लिहीत बसलो असतां ग्वाल्हेरचे सेनापति जनरल राजवाडे हे अवचित मजकडे आले. त्यांची माझी थोडी ओळख होती. पण त्यानी मला भेट देण्याचा अर्थाअर्थी सबंध नव्हता, यामुळे ते कां आले याची कल्पना चालेना. त्यानी प्रथम कुशल प्रश्न केले, व मग हळूच मला म्हणाले की, "माधवराव महाराजांची तुम्हाला भेटण्याची इच्छा आहे तरी तुम्ही त्यांच्या भेटीला याल का ? येत असाल तर दोन प्रहरी मोटार पाठवितो." मी म्हणालो "महाराजांचीच इच्छा असेल तर मी भेटीला कां न येईन ? तरी मोटार अवश्य पाठवा." पण भेटीला कां बोलावतात याची मात्र कल्पना नव्हती. असो. ठरल्याप्रमाणे मी गेलो. महाराजांनींहि मोठ्या आदरपूर्वक माझे स्वागत केलें व आम्ही एकटेच दीडतास बोलत बसलो होतों. प्रथम त्यांनी एरवींच्या गोष्टी काढल्या. ते म्हणाले "माझी व इकडील पुढाऱ्यांची कधी भेट होत नाही, पण मी कोल्हापूरकरांप्रमाणे ब्राह्मणद्वेष्टा नाहीं. मी पुण्यास येतो तेव्हा नेहमी एक तरी ब्राह्मण-भोजन घालून दक्षणा वाटून परत जातो. माझे सर्व कुलाचार ब्राह्मणांच्या हातून होतात. स्वतः मी नित्य पहाटे उठून स्नान करून पूजा अर्चा करतो, व पार्थिव पूजा केल्याशिवाय अन्नग्रहण करीत नाही. माझ्या पोषाखावरून मला लोक हा सुधारला, इंग्रज बनला, असे म्हणत असतील. पण ही सुधारणा सर्व वरकरणी आहे." इतके बोलून ते पुढे म्हणाले की "आपल्यांतले चांगलें असेल ते ठेवावें पण साहेबांचेहि चांगलें असेल तें घ्यावें. त्यांचा हा पोषाख मला सोईचा वाटतो; व राज्यकारभाराची मला हौस असल्यामुळें तो मला देशी विदेशी लोकांशी वागतांना सारखाच उपयोगी पडतो. साहेब लोकांचे कांही गुण राज्यकर्ते या नात्याने घेण्यासारखे आहेत ते आपण अवश्य घ्यावे. मात्र त्यांच्या आहारी आऊं नये व त्यांना भिऊ नये म्हणजे झाले." हे सर्व बोलणे चांगलेच होतें. पण मला उत्तरादाखल काय म्हणावे याचा विचार करतां किंचित् कुत्सितपणा सुचला. ग्वाल्हेर संस्थानाने केसरीपत्रावर निष्कारण बहिष्कार घातला ही गोष्ट माझ्या मनांत

डाचत होती; व त्याचा सूड आतां हळूच घ्यावा अशी स्फूर्ति झाली. म्हणून मीं म्हणालो " संस्थानिकांनी इंग्रज सरकारच्या आहारी जाऊं नये हे नुसते म्हणणे झाले. पण वस्तुस्थिति तशी नसते ! "

" ती कशी ? "

" मी उदाहरण देईन. आपण मात्र रागावू नये."

" ठीक आहे. राग कशाचा ? खुशाल बोला. "

" आपल्याच ग्वाल्हेर संस्थानांत माझ्या केसरी वर्तमानपत्राला आपण बंदी केली आहे हे आपणाला माहीत आहे ना ? "

" होय, माहीत आहे. पण त्याचे येथे काय ? "

" येथे इतकेच की त्या पत्राला खुद्द ब्रिटिश हिंदुस्थानांत बंदी नाही. तेथे ते पत्र इंग्रज सरकार चालू देते. पण आपण मात्र त्याला बंदी करतां ! हे ब्रिटिश सरकारच्या आहारी जाणे इतकेच नव्हे तर त्याच्याहि पलीकडे जाणे नव्हे काय ? मुंबईचा गव्हर्नर जे मुंबई इलाख्यात करीत नाही ते रेसिडेंटच्या हुकुमाने आपण येथे करता ! "

" त्यांच्या हुकमावरून बंदी केली हे कशावरून ? "

" त्या हुकुमापूर्वी बंदी केली नव्हती यावरून."

" पण केसरीला बंदी करावी असे आम्हांलाच वाटले असेल तर ? "

" वाटले असते तर आधीच केली असतीत ना ! बरे, बंदी करण्यासारखे केसरीत काय असते ? "

" केसरीतील राजकीय विषयावरील लेख आमच्या राज्यांतील प्रजेला व परिस्थितीला मानवण्यासारखे नसतात."

" ब्रिटिश सरकाराविरुद्ध आम्ही टीका केली तर त्यांत आपलें काय गेलें ? संस्थानाविरुद्ध तर आम्ही लिहीत नाही ना ? या ग्वाल्हेरच्या प्रजेत आपणाविषयी बेदिली उत्पन्न करण्यासारखा लिहिलेला एकहि लेख आपणास केसरीत दाखवितां येणार नाही अशी माझी खात्री आहे. पण राजकीय विषय सोडून दिला तरी, केसरीत धर्म सामाजिक सुधारणा वाङ्मय इतिहास शास्त्रीय चर्चा

इत्यादि उपयुक्त विषय येतात त्यांना, आपल्या राज्यांतील महाराष्ट्रीय प्रजेला, विना-कारण मुकावे लागते त्याची वाट काय ? सुदैवाने आपण महाराष्ट्रीय राजे आहां व दूरच्याहि मुलुखांत आपली मराठी मातृभाषा असणारी बरीच प्रजा आहे ! "

" तुमच्या अवातर गोष्टीना हरकत घेण्याचे कारण नाही. पण राजकारण व या अवातर गोष्टी या एकाच पत्रांत एकाच अकात असतात त्या वेगळया कशा कराव्या ? आणि त्या वेगळ्या करता येत नाहीत म्हणून सर्वालाच बंदी करावी लागते. ती दोन वेगवेगळी करा व मग विचारा. "

" आपण मजवर हा बिनतोड डाव टाकला खरा. वर्तमानपत्र असे कापून फाडून पाठविता विकता येत नाही खरं ! एकूण एकाचा स्पर्श दुसऱ्याला असा बाधक होतो म्हणावयाचा ना ? "

या नतर महाराजानी हा विषय बदलला व थोड्या वेळाने ते त्यांच्या मनातील भेटीच्या मुद्यावर आले. ते म्हणाले, " केळकर, आज तुम्हाला बोला-वण्याचे कारण पुण्यात तुम्ही घातलेला शिवाजी माहराजाच्या स्मारकावरचा बहिष्कार. तो तुम्ही का उठवू नये ? "

मी म्हणालो, "आधी हा बहिष्कार शिवाजी महाराजाच्या स्मारकावर नाही, व तो मी घातलेला नाही. बहिष्कार प्रिन्स ऑफ् वेल्स् पुण्यास येतात त्याच्यावर आहे, व तो घालावा अशी राष्ट्रीय सभेची आज्ञा आहे. मग पुण्यात तो उठविण्याचा अधिकार मला कोठून येणार ! हा स्थानिक बहिष्कार शहर कॉंग्रेस कमिटीने घातलेला आहे. "

" पण तुम्हीच पहा हे योग्य आहे का ते ? कधी नव्हे ते शिवाजी महा-राजाचे स्मारक होते. ते तुमच्या या पुण्यात होते; व विलायतचा राजपुत्र त्याचा पाया घालणार. असें असता पुण्याच्या नागरिकांनी समारभावर बहिष्कार घालावा हेच कां शिवाजी महाराजांवरील त्यांचे प्रेम ? "

" पुन्हा एकवार थोडे कडू बोलावे लागत आहे त्याची क्षमा करा. पण मी असे विचारतो, शिवाजी तोच व शिंदे महाराज तेच. मग " कधी नव्हे ते " आजच स्मारक करण्याची इच्छा आपल्याला का झाली ? प्रिन्स ऑफ् वेल्स् येतो म्हणूनच ना ? मग यात शिवाजी महाराजांचा बहुमान तो काय झाला ! प्रिन्स ऑफ् वेल्स्चा झाला खरा ! शिवाजी महाराजांचा अपमान आम्ही कसा करूं ?

आणि हे खरे की खोटे याचे प्रत्यंतर पहाण्याला आपण उद्याच्या दिवस पुण्यास रहा. प्रिन्स ऑफ् वेल्स् पुण्यांतून जाऊं द्या. मग आपणालाच दिसेल की सगळा गांव स्मारकाच्या दर्शनाला येईल, व आपल्यालाहि मुजरा करावयास येईल. पण—पण—आज नाही !"

"पण प्रिन्स ऑफ् वेल्स् व शिवाजी स्मारक ही लोकांनी मनाने वेगवेगळी पृथक् का मानूं नये ?"

"ती पृथक् करता येत नाहीत म्हणून ! आतांच नाही कां आपण मला सागितले की केसरीतील वाङ्मय धर्म इत्यादि विषय त्यातील राजकारणापासून वेगळे करतां येत नाहीत म्हणून आपण केसरीवर बहिष्कार घातला व बदी केली ! तीच गोष्ट शिवाजी महाराजांचे स्मारक व प्रिन्स ऑफ् वेल्स् यांच्या जोडीची झाली आहे त्याला काय करावे ?"

हा माझा ठोका बरोबर बसला. महाराजांनी कृत्रिम हास्य केले. पण वादांत डाव आपल्यावर परतला असे वाटून त्यांचा चेहरा किंचित् गोरामोरा झाला. थोड्या वेळाने पानसुपारीचे तबक आले, व मजकरिता मोटार दाराजवळ बोलावण्यांत आली. केसरीवरील बदी पुढेहि कांही वर्षे उठली नाही. महाराज मेल्यावर मी कौन्सिलला अर्ज केला व मग कांही दिवसानी बदी उठली. पण योग असा की माधवराव महाराज शिंदे यांजकडे मी जन्मांत एकदांच गेलो. तो त्याच्याच बोलण्यावरून, व त्यांच्याच मोटारीतून. पण आयत्या वेळी वर सांगितल्याप्रमाणे विषय निघाला व खटका उडाला. महाराज म्हणून मी त्यांची कांही पर्वा केली नाही.

तसेच बिकानेरच्या महाराजानी एकदां मुंबईस मला गाडी पाठवून आपल्या समुद्रकांठच्या बंगल्यांत मुद्दाम भेटीस बोलावून नेले. त्या पूर्वी नुकत्याच मुंबईस भरलेल्या संस्थान-प्रजापरिषदेचा मी अध्यक्ष होतो. आणि परिषदेत बिकानेरमधील तेव्हांच्या दडपशाहीचा विषय चर्चेत खूपच रगला होता. महाराजांनी हाच विषय चर्चेला घेऊन आपल्या तर्फेचे म्हणणे मला खूप तपशीलवार सांगितले. बरेच कागदपत्रहि दाखविले. आणि शेवटी बिकानेर संस्थानला भेट देण्याविषयी निमंत्रण केले. मी होय ना कांहीच उत्तर दर्शवीना. तेव्हां ते म्हणाले, "तुम्ही माझे पाहुणे म्हणून आला तरी माझे गुलाम नाही. तुम्हाला रहाण्याला स्वतंत्र जागा

देईन. स्वतंत्र मोटार देईन. ती घेऊन तुम्ही वाटेल तिकडे माझ्या राज्यांत हिंडा व वाटेल त्याच्या गांठीभेटी घ्या व होईल ते मत बनवा. तुमच्यासारख्या लोकांनी एकदां माझे संस्थान पाहावे एवढीच इच्छा."

मग मी अगदीच नकार न देतां म्हणालो, 'उन्हाळा टाळून चांगल्या हवेच्या दिवसात केव्हांतरी येतां आले तर कळवीन' महाराजानी पुढील फेब्रुवारी सुचविला. मी होय म्हटले. पण बिकानेरला जाण्याचा बेत रहितच केला. एक तर प्रवासाचा कटाळा. दुसरे असे की, त्यानंतर सर प्रभाशकर पट्टणी हे एकदां पुण्यास आल्यावेळी मजकडे जेवावयास आले होते. तेव्हां दोन तास गप्पागोष्टी झाल्या. त्यात बिकानेरचे नाव निघाले तेव्हा पट्टणी यांनी बिकानेरच्या स्थितीचे इतके प्रतिकूल वर्णन केले, इतकी थट्टाहि केली, की मी बिकानेरची खेप टाळली हे बरे केले असेच मला वाटले.

श्री. सयाजीराव महाराज याची अनेक वेळा गांठ पडली आहे. ब्रिटिश व संस्थानी राजकारणाच्याहि विषयावर त्याच्याशी मनमोकळेपणाने बोलणे झाले आहे. श्री. तुकोजीराव महाराजाची गाठ एकदांच १९१७ सालच्या इदूर येथील साहित्य समेलनाच्या वेळी पडली. ग्वाल्हेरचे नूतन अधिपति याचीहि भेट झाली आहे. दक्षिण महाराष्ट्रातील बहुतेक सस्थानिकाचा व माझा ऋणानुबंध आहे. त्याच्याशी प्रजापक्षातर्फे बोलण्याचा प्रसग आल्यास मी आपली मते अगदी मोकळ्या मनाने सागतो. गतवर्षी म्हैसुरास सरकारी निमत्रणावरून गेलो ती हकीकत, व महाराज व दिवाणसाहेब, याच्याशी झालेल्या सवादाची हकीकत मी त्या वेळीं केसरीत दिलीच होती.

---

## ( १३ ) मी व सामाजिक सुधारणा

मनुष्य हा प्रायः अद्‌भुतरसाचा भोक्ता असतो. मला कृत्रिम स्वरूपाची अतिशयोक्ति आवडत नसली तरी खरा अद्‌भुत रस आवडतो. आणि समाजाच्या चालीरीति व मनःस्थिति यांच्यामध्ये जे कालांतराने फरक पडतात ते खरोखरच अद्‌भुत रसाचीं उदाहरणे म्हणून देतां येण्याइतके अकल्पित असतात. एखाद्या भूकंपाने एका रात्रीत स्थळाच्या ठिकाणीं जल व जलाच्या ठिकाणी स्थळ अशी स्थित्यंतरे होतात. अगदी तशीच समाजाच्या स्थितीत होत नाहींत हे खरें; तथापि

पन्नास वर्षांचा काळ हा समाजाच्या आयुष्यातला एक दिवस किंवा एक रात्र असे म्हणण्यास फारशी हरकत नाही. आणि मी माझ्या आठवणीच्या पन्नास वर्षांत जी सामाजिक स्थित्यंतरे पाहिली ती भूकंपाने होणाऱ्या स्थित्यंतराइतकीच मला आश्चर्यकारक वाटतात. मी या पन्नास वर्षांची रोजनिशी ठेवली असती व पानापुढे पान चाळीत या स्थित्यंतराचा क्रम पाहिला असता, तर ही स्थित्यंतरे कदाचित् मला इतकी आश्चर्यकारक वाटती ना ! त्यांच्या मंदक्रमात अद्भुतपणा लोपून गेला असता. पण एका टोकाला पन्नास वर्षांपूर्वीचा तो काळ व दुसऱ्या टोकाला पन्नास वर्षांनंतरचा हा काळ यातील समाजस्थिति लक्षात घेतली म्हणजे खरोखरच धरणीकंपाच्या देखाव्याचा भास होतो !

माझ्या धार्मिक मतांचे समालोचन मी करतो तेव्हा मला असे वाटते की अगदी लहानपणापासून आतापर्यंत माझ्या धर्मविषयक मतामध्ये फारसा फरक झालेला नाही. धर्म या विषयाचे माझे तात्विक ज्ञान लहानपणी होते त्यापेक्षा आतां ते वाचनाने व विचाराने पुष्कळच अधिक वाढले आहे हे खरे. पण त्याचा अर्थ इतकाच की त्या विषयाची जी चर्चा जशी मला पूर्वी करतां आली नसती ती तशी मी हल्लीच्या प्रौढ बुद्धीने करू शकेन. परंतु ही धर्माची फक्त बौद्धिक बाजू झाली. धार्मिक प्रवृत्ति म्हणून जी म्हणतात ती अर्थातच ही नव्हे. धार्मिक प्रवृत्ति याचा अर्थ स्थूलपणे श्रद्धाळूपणा, नियमनिष्ठतेची आवड व सवय, असाच केला पाहिजे. आणि त्या दृष्टीने पहाता आज काय किंवा लहानपणी काय मी आहे तेथेच होतो असे म्हणू शकतो. मी देखील लहानपणी संध्या देवपूजा वगैरे करीत होतो. घरचा वैश्वदेव करीत होतो. प्रीव्हियस परीक्षा होईपर्यंत गुरुचरित्र वाचीत होतो. आणि जानवी मंतरण्याचा मंत्र, सौर, रुद्र, हे मी आमच्या उपाध्यायाजवळ म्हटले होते. परंतु या सर्व गोष्टी जवळ जवळ घरच्या वळणामुळेच मी करीत होतो. त्यापासून विशेष कांही पुण्य लागेल अशा कल्पनेने त्या करीत नव्हतो. उलट आज पाहिले तरी मी संध्या वैश्वदेव करीत नाही, पण घरी असलो म्हणजे स्नान केल्यावर भोजनाच्या आधी चार दोन मिनिटेच कां होईना परंतु देवापुढे बसून फुले वाहतो व डोळे मिटून क्षणभर एकाग्र होण्याचा प्रयत्न करतो. माझी श्रावणी सहसा चुकत नाही. श्राद्धपक्ष मी नियमाने करतो. आणि घरी रामनवमीच्या दिवशी पूजा, वेदपठण, वसंतपूजा या गोष्टी वडिलांची आठवण ठेवून हौसेने करतो. पण आज या गोष्टी मी करतो त्या त्यापासून पुण्य लागेल

म्हणजे पारलौकिक कांही लाभ होईल अशा श्रद्धेने करीत नाही. तर ज्याला सकृद्दर्शनी धार्मिक आचाराची कृत्ये म्हणता येईल त्या या माझ्या गोष्टी सामान्यपणें सामाजिक व्यवहारांतल्या अशाच होऊन बसल्या आहेत.

सामाजिक व्यवहारांत स्वच्छता, शुचिर्भूतता ठेवणे, तोंडातून अपशब्द न काढणे, रीतीचा-चालीचा पोशाख पेहराव करणे, व समाजातील ज्या निरनिराळ्या लोकांशी संबंध येतो त्यांच्याशी सभ्यपणे दाक्षिण्यवृत्तीने वागणे या गोष्टी करण्यांत 'पारलौकिक' दृष्टि जितकी असू शकेल तितकीच माझ्या वरील धर्मकृत्यात असू शकेल ! हे समीकरणादाखल मी बोललो; पण खरा अर्थ यात पारलौकिक कल्याणाची बाजू मुळींच नाही हाच. आमच्या घराण्यात पूर्वी कोण किती धर्मनिष्ठ होऊन गेले असतील हे काही सांगतां येत नाही. जी काही माहिती जुन्या पिढ्यांची मिळाली आहे तिजवरून त्यांचा मुख्य धंदा शेतीचा, व काहींना 'भट' हे नाव लावल्यावरून काही थोडा भिक्षुकीचा किंवा जोशीपणाचा वगैरे असूं शकेल. पण भटपणा किंवा जोशीपणा हा एक धंदाच होय. म्हणून खऱ्या धार्मिक प्रवृत्तीत ते जमेस धरतां येत नाही.

माझे चुलत आजे आबा हे स्नानसंध्याशील होते. पण त्याहिपेक्षां माझे वडील व मातोश्री ही सर्वांत अधिक धार्मिक प्रवृत्तीची माणसे होती. माझ्या वडिलांचा पेशा कारकुनी होता. ते संस्कृत शिकले नव्हते, शास्त्र पढले नव्हते. परंतु केवळ श्रद्धाबुद्धीने ते स्नानसंध्यादि गृहयज्ञ यथासांग करीत. इतकेच नव्हे तर रामाचे ते एकनिष्ठ उपासक असत; आणि पोथीपुस्तक वाचण्याचा त्यांना पुष्कळच नाद होता. आई निरक्षर होती. तिला पोथीपुस्तकहि वाचतां येत नव्हते. परंतु धर्मश्रद्धेत ती वडिलांच्या बरोबरीने होती. या बाबतीत माझ्या साक्षर कुटुंबाने हे जुने वळण तंतोतंत पूर्वीसारखे ठेवलेले आहे. इतकेच नव्हे तर तिला पोथीपुस्तक वाचता येत असल्यामुळे, व पुराण कीर्तनाचा नाद मातोश्रीइतका असल्यामुळे, धार्मिक आचारांत तिचा जेवढा वेळ जातो तितका कदाचित् मातोश्रीचाहि जात नसेल. आणि या जुन्या नव्या पिढीच्या धर्मश्रद्धाळू लोकांच्यामुळेच आमच्या घरी धार्मिक आचाराचे वळण पूर्वीपासून आतांपर्यंत एकाच दिशेने व एकसारखे चालूं राहिलेले आहे. या कारणाने तात्त्विक विचारांच्या दृष्टीनें आम्हाला जितके लोक सुधारकांत गणतात तितके लोक घरी चालू राहिलेल्या धार्मिक नित्य-

नैमित्तिक आचारामुळे जुन्या पद्धतीचेहि म्हणतात. पण याचे श्रेय आम्हा नव्या दोन पिढीतील पुरुषवर्गाकडे नसून स्त्रीवर्गाकडेच आहे असें म्हणावे लागेल.

लहानपणीहि वर सांगितल्याप्रमाणे मी स्नान संध्या करीत असलो तरी त्यांत श्रद्धाळूपणाचा भाग मुळीच नव्हता. भुताखेतांवर लहानपणीहि माझा विश्वास नसे; व स्वतः पुराण कीर्तन ऐकण्याचा मोठा नादी होतो तरी देवादिकांच्या गोष्टींवर शब्दप्रामाण्याने मी कधीहि विश्वास ठेवला नाही. मला तो इतिहासाचाच एक भाग असे वाटे. पुराणादिकात अद्भुतरम्य गोष्टी ऐकावयाला मिळतात म्हणून त्यांची गोडी वाटे. आणि कीर्तनात वक्तृत्व, रसिकपणा, गायन, इत्यादि गोष्टीच मला चित्ताकर्षक वाटत. घरी सोवळे नेसून जेवावयास बसण्याचा परिपाठ दहा वीस वर्षांपूर्वीपर्यंत होता. परंतु तो सहजासहजी पाळण्याचा शिष्टाचार इतकेच त्याबद्दल वाटे. याची परीक्षा एकदा सहज झाली. इंग्रजी सहाव्या इयत्तेत असतांना मी दिवाळीकरिता मोडनिंब्यास गेलो. तेव्हा वाटेत बभूकडे डेक्कन कॉलेजात एक जेवण पडले. त्या दिवशी ओवळ्याने जेवावयास बसण्याचा पहिला प्रसंग आला; व मी खरा धर्मनिष्ठ असतो तर मुकटा मिळवून किंवा ओले वाळवून नेसून बसलो असतो. पण तसे तर काही केलेच नाही. पण ओवळ्याने जेवावयास बसतांना मोठासा धक्काहि मनाला बसला नाही असे स्मरते. पुढे त्याच डेक्कन कॉलेजात १८९१ साली होतो तेव्हाहि काही दिवस मी सोवळे नेसून जेवावयास बसे. पण त्याचे कारण आमच्या क्लबातील पुष्कळ लोक, हट्टानेच सोवळे नेसून बसत. त्याला 'सोवळ्याचा क्लब' असे नावच मिळाले होते. पण मीचसा काय रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हेहि सोवळे नेसून जेवावयास बसत, हे कोणी वाचले ऐकले म्हणजे आज त्याला कितीतरी आश्चर्य वाटेल! तात्पर्य, पुण्यापापाचा कांही विचार मनात नसता धार्मिक या सदराखाली पडणारी कृत्य मी पूर्वी करीत होतो व आज करतोहि. पण ती व्यक्तिदृष्ट्या पारलौकिक लाभाच्या हेतूने मुळीच नसून, त्यावरून समाजांत आपण कोणत्या सांस्कृतिक पद्धतीने वागावे याविषयीच्या माझ्या मताचेच फक्त अनुमान त्यावरून होऊ शकेल.

पण त्यांतल्या त्यात समाजाला न दुखविण्यापेक्षांहि घरच्या मंडळीना म्हणजे पूर्वी वडील-मातोश्रीना व हल्ली कुटुंबाला वाईट वाटूं देऊ नये हेच माझे मुख्य धोरण असते. मी करतो या धर्मकृत्यांत कांही बौद्धिक अप्रामाणिकपणा आहे असे मात्र मला मुळीच वाटत नाही. इतकाच माझ्या व इतर कांही लोकांत फरक



१९३८ सालच्या डिसेंबरांत घेतलेले केळकर कुटुंबीयांचें छायाचित्र

( पृ. ९४४ )

असेल. काही काहीं निष्ठावंत सुधारक असे पहातो की त्यांना अशा प्रकारचे आचरण करणे म्हणजे तो अप्रामाणिकपणा वाटतो. पण धार्मिक स्वरूपाच्या कृत्यांतहि माझी पारलौकिक कल्पना नसून केवळ सामाजिक कल्पनाच आहे असे म्हटल्यावर अप्रामाणिकपणा उरतो असे मला वाटत नाही. आतां ही गोष्ट खरी की, मी वयांत येण्यापूर्वी माझे वडील मातोश्री निवर्तलेली असती, किंवा मी विधुर असतो, किंवा माझ्या कुटुंबाची वृत्ति धार्मिक आचारविचारात आहे तितकी सात्विक आग्रहाची नसती, तर कदाचित् हल्लीच्यापैकी काही धार्मिक कृत्ये मी केली नसती. परतु त्याचा अर्थ इतकाच की, सामाजिक किंवा कौटुंबिक वर्तनात दुसऱ्याचे मन सभाळणे किंवा न दुखविणे याविषयी हल्ली आहे त्यापेक्षा काहीं वेगळ्या प्रकारची परिस्थिति माझी असती तर, तिला अनुसरून योग्य असे मी वागलो असतो. आणि या गोष्टी एका बाजूने जशा धार्मिक प्रवृत्ति नसणाऱ्या आम्हाला दुसऱ्याकरिता कराव्याशा वाटतात, तशाच धार्मिक प्रवृत्तीच्या माणसांनाहि त्याच विवेकामुळे नवीन लोकाना सोईच्या सवलती द्याव्या असेहि वाटते.

उदाहरणार्थ, माझे श्राद्धपक्ष मुलानी उद्या न केले या कल्पनेने मला मुळीच वाईट वाटणार नाही. आणि मी पूर्वी १९१९ साली विलायतेस जाताना मृत्युपत्रात असे स्पष्ट लिहिलेहि होते की, मुलानी माझे श्राद्धपक्ष न केले तरी चालेल. याच्या उलट माझ्या वडिलानीहि आम्हा त्रिवर्ग बंधूना असे सांगितले होते की "तुम्ही जरी काशीयात्रा वगैरे केलीत तरी गयेला आमच्याकरितां पिण्डदान करण्याचे कारण नाही." याचे मर्म असे होते. धार्मिक समजल्या जाणाऱ्या या कृत्यावर आमची श्रद्धा नाही हे जसे त्याना माहीत होते, तसेच त्या क्षेत्री पूर्वी स्वतः ते गेले असता त्याना जो अनुभव आला तो इतका उद्वेगकारक होता की, त्याची असेल नसेल ती श्रद्धा त्या विधिपुरती तरी त्या अनुभवाने घालविली. ते गयेला गेले व भाविकपणाने शक्त्यनुसार दक्षणा देण्याचे गयावळाला त्यानी कबूल केले. पण त्या मूर्खाने फुलाच्या माळेन जे त्याचे एकदां हात बाधले ते काही केल्या तो सोडीच ना; व बेसुमार दक्षणा मागू लागला. तेव्हा वडिलांची धर्मश्रद्धा कसोटीला लागण्याचा प्रसंग आला. त्यानी अखेर विनवण्या करून व काही थोडी अधिक दक्षणा देऊन माळेतून हात कसेतरी सोडवून घेतले. पण परत आल्यावर ते म्हणत की, "गयावळाचा लोभीपणा पाहून फुलाची माळ ताडकन् तोडून टाकावी असेहि एकवेळ मनाला वाटले !" आणि याला उद्देशूनच

त्यांनीं आम्हाला सागितले की, "आम्ही आमच्या वडिलांकरिता पिण्डदान केले तेच पुरे. तुम्हाला मात्र आमच्या पिण्डदानाची पावती आम्ही उभयतांनी दिली आहे. आमच्यावरील प्रेमामुळेहि तुम्ही ते करूं नये."

या गोष्टीवरूनहि धार्मिक आचाराच्या खऱ्या हेतूसंबंधाने वर जे सागितले तेंच सिद्ध होऊं पहाते. म्हणजे आमच्यापेक्षा आमची वरची पिढी जरी अधिक "धर्मनिष्ठ" होती तरी, ते देखील काही गोष्टी पारलौकिक लाभापेक्षांहि त्याच्या पिढीला व काळाला साजेल अशा सामाजिक धोरणानेच करीत होते. म्हणजे त्यांना ही गोष्ट कळत होती की, त्याच्या पिढीचा मनुष्य गयेला गेला असता त्यानें पिंडदान केले नाही असे प्रगट झाल्याने जितका कमीपणा लोकदृष्टीनें त्यांना आला असता तितका पुढच्या पिढीला येणे शक्य नाही.

त्यांच्या आमच्या पिढीत फरक पडण्याचे आणखी एक कारण असे की, अभ्यासाचे व वाचनाचे आमचे क्षेत्र अधिक. ज्याला विज्ञान किंवा वस्तुज्ञान असे म्हणतां येईल ते आमचे पुष्कळच वाढले आहे. यामुळे कार्यकारण विवेकाची आमची दृष्टि त्यांच्याहून अधिक खोल; व ही दृष्टि ज्या मानाने अधिक खोल असते, त्या मानाने लौकिकांत जिला श्रद्धा असे म्हणतात तीहि कमी असते. पण श्रद्धा ही कांही एकच स्वरूपाची नसते. आणि ती परिस्थितिप्रमाणे बदलूहि शकते. श्रद्धान्वित मनाने केलेल्या गोष्टीपासून होणारे मनाचे समाधान किवा सुखशांति तीच; पण एकाला ज्या गोष्टी केल्यापासून हे समाधान मिळेल त्याच गोष्टी केल्यापासून दुसऱ्याला तेच समाधान मिळेल असे नाही. तें निराळ्या गोष्टी करूनहि मिळेल.

धर्माची मुख्य तीन अगे (१) परमात्मस्वरूपाचा विचार, (२) आत्मस्वरूपाचा विचार आणि (३) परमात्मा व जीवात्मा यांचा सबंध काय असेल या विषयीचा विचार. परमात्मा व जीवात्मा यांचे स्वरूप ओळखणे याचे नांव ज्ञान. पण ते ज्ञान हा बुद्धीचाच विषय होय. आणि ते कितीहि खोल व सप्रमाण झाले तरी जीवात्म्याने परमात्म्याशी कोणता संबंध मानावा याचे उत्तर निव्वळ बौद्धिक ज्ञानाने मिळूं शकत नाही. ते उत्तर आत्मानुभवानेच मिळतें आणि आत्मानुभव याचा अर्थ, योगाने उत्पन्न होणारी समाधि अथवा व्यवहार करीत असतांहि, गीतेत सांगितल्याप्रमाणे, कर्मफलाची आसक्ति न धरतां प्रतिष्ठितप्रज्ञ किंवा जीवन्मुक्त यासारखे आचरण करणे याहून दुसरा नाही. आतां योगारूढ स्थिति ही

प्रत्यक्ष व्यवहार करणाऱ्या मनुष्यांत उघड दिसून येणारी नाही. पण स्थितप्रज्ञ देखील योगाखेरीज इतर रीतीने जागती समाधि लावू शकतो. ती समाधि शुद्ध आनंदापासून मिळते; व हा आनंद व्यवहारातील माणसाला अनेक रीतीने मिळूं शकतो. कोणाला तो सगुण उपासनेचे विधि करीत बसण्यात लाभतो. कोणाला जपजाप्य किंवा नामसंकीर्तन करण्यात लाभतो. कोणाला धार्मिक स्वरूपाचे वाचन करीत असता लाभतो. कोणाला ज्यास धार्मिक वाङ्मय असे म्हणता येणार नाही, पण जे उच्च दर्जाचे प्रतिभासपन्न काव्यात्मक किंवा तत्त्वज्ञानात्मक वाङ्मय असे म्हणता येते, ते वाचण्यात व लिहिण्यात लाभतो. कोणाला भौतिक शास्त्राच्या विचारात व संशोधनात गढून गेल्याने लाभतो. कोणाला शुद्ध कलोपासनेने लाभतो. कोणाला निस्स्वार्थी परोपकारी कामात गढून गेल्याने लाभतो. तात्पर्य, या निरनिराळ्या मार्गांनी मिळणाऱ्या आनंदाचे उत्कट स्वरूप ही एक समाधीच होय. आणि ती निर्विकल्प नसून सविकल्प असली तरी, व अगदी जागतेपणी तिचा अनुभव मनुष्य घेत असला तरी, ती स्थितप्रज्ञतेइतकीच नमुनेदार किंवा उत्तम स्थिति होय. म्हणून वरीलपैकी किंवा त्यासारख्या इतर कोणत्याहि प्रकाराने श्रद्धानन्द प्राप्त करून घेणारा मनुष्य खरोखर धर्मनिष्ठच म्हटला पाहिजे.

ही गोष्ट लक्षांत न घेतां केवळ परंपरागत पद्धतीचे धर्माचरण न करणारावर सामान्य लोक नास्तिकपणाचा आरोप करतात. पण खरा नास्तिक असा मनुष्य क्वचितच आढळेल. कारण दृश्य कारणामागे कारण, फिरून त्या कारणामागे कारण, अशा रीतीने कारणपरंपरेची सांखळी लागलेली आहे, व ती ज्ञानाच्या किंवा बुद्धीच्या टप्प्यापलीकडे जाऊं शकते हे ज्याला कळत नाही, किंवा हे जो कबूल करीत नाही, असा मनुष्य बहुधा विरळाच. वास्तविक ब्रह्मज्ञानाची उपासना फार थोडक्यांत संपणारी असते; पण विज्ञानाची उपासना मात्र मनुष्याची कधीहि संपणारी नाही. जीवात्मा व परमात्मा हे अन्तिम स्थितीत एकरूप आहेत हा 'सिद्धांत' बुद्धिगम्य असून त्याची प्रचीति ही गोष्ट बहुधा एकच व ठराविक आहे. परंतु तीच गोष्ट विज्ञानाच्या अभ्यासांत शेकडो माणसांना शेकडो निरनिराळ्या रीतीनी करतां येते. विज्ञानाच्या संशोधनांत कोणत्याहि बाजूने शिरलें तरी सर्वान्तर्यामी मूलाधार अशी एकच शक्ति आहे हे निरनिराळ्या मार्गांनी अनुभवितां येते. विज्ञानाचा उपासक हा ज्ञानाच्या उपासकाइतकाच आस्तिक्य बुद्धीचा असतो. आणि व्यवहाराच्या दृष्टीने पाहिले तर ज्ञान-विज्ञानांतून व्यवहारांत शिरण्याचा जो

एक पूल असतो तो नीतिमार्ग हा होय, व या नीतिमार्गाचीहि लक्षणे अनेक प्रकारची आहेत. तात्पर्य, नास्तिक म्हणणे ही एकप्रकारे अविचाराने दिलेली शिवी ठरत असून, जुन्या परंपरेला यत्किंचित् सोडून वागणाऱ्या मनुष्याच्या नशिबी ती शिवी खाण्याचे असमर्थनीय अन्याय्य असे पुष्कळ प्रसग येतात.

वर जो विचार मी काहीसा विस्ताराने सांगितला तो सुजाण व समजस अशा जुन्या पद्धतीच्या लोकानाहि पटू शकतो, हे मी अनेक लोकासबधाने पाहिले आहे; व खुद्द माझे वडीलहि त्यापैकीच एक होते. स्वतः ते जरी जुन्या मताचे अभिमानी व जुन्या रूढ साप्रदायाचे अनुयायी असले तरी त्यांना हे आमच्या संगतीत दिसून येई की, तुकाराम रामदास याचे ग्रथ वाचणे हे जर धर्माचरणात मोडू शकते, तर त्या दर्जाचे इतर वाङ्मयहि नव्या पिढीतील काही लोक नित्य वाचणारे व त्याचे मनन करणारे असतात तेव्हा ते वाचनहि धर्माचरणच मानले पाहिजे. इंग्रजी शिकणाराचे इतकेच झाले की त्याच्या वाङ्मय वाचनाचें क्षेत्र वाढले; पण त्यामुळे त्यांची खरी धर्मबुद्धि कमी होण्याचे कांही कारण नाही. आपल्या हिंदु पद्धतीच्या वेदान्ताची कमजास्त बरोबरी करणारे इतर भाषेतहि अध्यात्मिक तत्वज्ञान असू शकते. कारण आत्मा हा जसा जगात एकट्या हिंदूलाच दिलेला नाही, त्याप्रमाणे बुद्धि व अध्यात्मिक भावना ही देखील एकट्या हिंदूलाच दिलेली नाही. अर्थात् देश, भाषा, सामाजिक चालीरीति या निरनिराळ्या झाल्या तरीहि आस्तिक्य बुद्धि व धार्मिक वृत्ति याची जात कोठेहि एकाच दर्जाची असणार ही गोष्ट माझे वडील कबूल करीत. केवळ इंग्रजी शिकला म्हणून मनुष्य नास्तिक होतो ही गोष्ट त्याना मान्य नव्हती. इंग्रजी न शिकलेल्या, किंबहुना कोणत्याहि शिक्षणाचा दोषी ( ! ) स्पर्श न झालेल्या, लोकातहि अधार्मिक पापात्मे आढळतात, त्याचप्रमाणे अगदी इंग्रजी शिकलेल्या व वरून थेट इंग्रजी पोषाख पेहराव करणाऱ्या लोकामध्येहि सात्विक धर्मशील वृत्तीचे—किंबहुना आपल्या घरात आल्यावर जुन्या पद्धतीचे—धर्माचरण करणारे लोक आढळतात ही गोष्ट माझे वडील प्रांजलपणे कबूल करीत असत. धार्मिकपणाची काही रूढ कल्पना संस्काराने व सवयीने बनत असल्याने, मी दिवसातून तास अर्धा तास कांही स्नानसध्या कांही जप-जाप्य करण्यात घालविला असता तर त्यांना अधिक बरे वाटले असते ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. पण आमची एकंदर

वागणूक पाहून व आमच्या कामाचा व्याप पाहून ते आपल्या मनानेच आम्हाला पुष्कळशी सूट देत असत.

उलट आम्हीहि घरी हिंदुपद्धतीने करण्याचे संस्कार, विधि, नित्यनैमित्तिक कर्में करीत होतो. त्यांत कटाळा किंवा हयगय फारशी दाखविली नाही. आणि एवढ्यानेहि त्यांचे बहुधा समाधान होत असे. वडिलांच्या हयातीत एक दोन प्रसंग मात्र असे आले की तेथे केवळ "तुमच्या समाधानाकरिता अमुक एक गोष्ट करतो, माझा त्या गोष्टीवर विश्वास आहे म्हणून करीत नाही," असे त्यांना मला सांगावे लागले. रावबहादूर वामनराव कोल्हटकर यांना त्यांच्या पुनर्विवाहित पत्नीपासून झालेल्या मुलीचा विवा' सन १९०५ साली रा. घारपुरे यांजबरोबर मळेकरांच्या वाड्यांत झाला. त्याच्या पानसुपारीला मी गेलों होतो. ही गोष्ट वडिलाना माहीत होती. पण त्या गोष्टी… त्यानी प्रथम कोणचीहि हरकत घेतली नाही. परंतु पुढे पुण्यांतील एका वर्तमानपत्रात पानसुपारीला गेलेल्या गृहस्थात माझे नाव 'प्रसिद्ध' झाले; व पूर्वी पंचहौद मिशनमध्ये चहा घेतल्याबद्दल पुण्यांतील बेचाळीस ब्राह्मणावर ग्रामण्य झाले तसाच काही प्रकार पुनः होणार असे चिन्ह दिसू लागले. याच सुमारास रामनवमी आली. नित्याप्रमाणे आमच्या घरी ब्राह्मणांचे म्हणणे वसंतपजा करण्याचे ठरून आमचे उपाध्ये कृष्णभट जोगळेकर यांनी बारा-चौदा ब्राह्मणाना आमत्रणे दिली व घरीं येऊन वसतपूजेची सर्व तयारी केली. परतु इतक्यात एकदम ब्राह्मण मडळीनी कट करून ठरविले की, मी पुनर्विवाहित गृहस्थाच्या घरी पानसुपारीला गेलो त्याअर्थी प्रायश्चित घेईपर्यंत मजवर बहिष्कार घालावयाचा, व माझ्या घरी कोणतेहि धर्मकृत्य करावयास यावयाचे नाही. वसतपूजेची वेळ टळून तास दीडतास झाला तरी ब्राह्मण येईनात. तेव्हां हे प्रकरण काय आहे अशी उपाध्याने चौकशी केली. तेव्हा त्याला या बहिष्काराची बातमी प्रथम लागली. ती ऐकून वडिलाना अतिशय वाईट वाटले, व ते सचिंत होऊन देवापुढे बसले. त्याना वाईट वाटलेले पाहून मलाहि वाईट वाटलें. कारण रामनवमीच्या दिवशी होणारे वेदपठण घरी माझ्या जन्मापासून कधी चुकले नाही, ते माझ्यामुळे आज चुकले ! अर्थात् त्यांना वाईट वाटण्याला मीच कारण झालो. तेव्हां मी त्यांना म्हणालो की "मी फिरून यत्न करून पहातो. वेदपठणाला ब्राह्मण माझ्या इतर प्रयत्नाने आले तर बरेच झाले. पण न आले तर उद्यां सकाळी प्रायश्चित्त घेईन व संध्याकाळी वसतपूजा व वेदपठण करवीन. आजचें

वेदपठण फार तर उद्या होईल इतकेच. पण त्याची तुम्हांला चिंता नको.” मग उपाध्याच्या कानाशी लागून मी सागितले की, “भटजी मागतील तितकी दक्षणा देण्याला मी तयार आहे. येतात का पहा.” तेव्हा त्यानी ती खटपट करून पाहिली. पण ब्राह्मण येईनात. तेव्हा दुसरे दिवशी सकाळी स्नानानतर मी पंचगव्याची दोन आचमने घेतली, एक जानवे मंत्रून घातले, व उपाध्याला चार आणे दक्षणा दिली. अशा रीतीने माझे प्रायश्चित्त झाल्याबरोबर सध्याकाळी नित्याप्रमाणे वेदपठण व वसतपूजा पार पडली व वडिलाना आनद झाला. मग त्यानी सहज विनोदाने म्हटले, “तात्या, हा एक प्रसग टळला. पण तुझ्यावर असले प्रसग पुनः येणार हे मला अगदी उघड दिसते. तेव्हा पुढचा विचार कसा ?” तेव्हा मीहि त्याना स्पष्टच सागितले की, “आता करावयाचे काय ते ठरलेच आहे असल्या पानसुपारीचे निमत्रण पुनः आले तर पुनः जाईन. आणि पुनः असेच प्रायश्चित्त घेईन. मी परवा पानसुपारीला गेलो तो जाणून बुजून गेलो. ते पाप असेल तर माझ्या हातून अजाणता झालेले नव्हते. हे माहीत असतां पंचगव्याची दोन आचमन व सकल्पोचारपूर्वक चार आणे दक्षणा-दान येवढ्याने जर वेदोनारायण मला पावन करून घेण्याची कृपा करतात तर आता कसलीच अडचण उरली नाही !” या माझ्या युक्तिवादाला त्यांनी हरकत घेतली नाही. याचा अर्थ अशा पानसुपारीला जाणे हे काही मोठे पाप आहे असे त्यानाहि वाटत नव्हते. तर ज्या समाजात आपण वावरतो त्याला जी गोष्ट अजून पटत नसेल ती न करणे हा जरी उत्तम मार्ग असला तरी, ती करून सामान्य प्रायश्चित्त घेणे हाहि चालण्यासारखा एक मार्ग आहे अशी कबुली त्यानी दिली.

प्रायश्चित्ताहून अधिक महत्त्वाच्या विषयातहि ते अशीच सारासार बुद्धि चालवीत. अर्थात् स्वतःच्या आचारांत फरक करण्याच्या बाबतीत नव्हे, तर पुढच्या पिढीला आचार विचाराची सवलत देण्याच्या कामी. प्लेगच्या दिवसांत महाराष्ट्रांत किंबहुना सर्व हिंदुस्थानात अकाली तरुण मुले मृत्यु पावल्यामुळे हजारो बालविधवा झाल्या. ती गोष्ट एका प्रसगाने घरी आमच्या बोलण्यात निघाली, व या अभागी अज्ञ मुलीचा जन्म कसा जावयाचा अशी चर्चा चालली. तेव्हां माझ्या वडीलांनी प्रांजलपणे कबुली दिली की “हिंदुधर्म झाला तरी अशा बालविधवांना त्याने पुनर्विवाहाची परवानगी देण्यांत पाप नाही.” मात्र ते आणखी म्हणाले की, “यांतील योग्यायोग्य काय हे तात्त्विक विचारांत मी कबूल करीत असलो

तरी, उद्या कोणी अशा कामी माझी लेखी समति मागेल तर ती मी देणार नाही; पण इतर कोणी ती गोष्ट केली करविली तर मी त्याला नांव ठेवणार नाही इतकेच काय ते. ह्यातून गोष्टी प्रत्यक्ष होण्याच्या सबधाने दर पिढीतील सनातनी म्हणविणाऱ्या लोकांच्या आचरणाच्या कांही मर्यादा ठरून जातात. त्यांचे उल्लघन त्याच्या हातून होऊ शकत नाही. पण पुढील पिढीची मर्यादा आमच्यापेक्षां चार पावले पुढे जाईल; व तितके पुढे जाताना जुन्या मर्यादांचे उल्लघन झाले तर ते अयोग्य ठरणार नाही. "

त्यावेळी म्हणजे १९०६ च्या पूर्वी अस्पृश्यतानिवारण वगैरे गोष्टींना आज आले आहे इतके महत्व आलेले नव्हते. पण मला असे वाटत की, सार्व-जनिक स्थळी व प्रसगी अस्पृश्यता मानण्याचे कारण नाही असा तात्विक निर्णय माझ्या वडिलानीहि दिला असता कारण, त्याच्या हातून आगगाडीचा प्रवास घडण्याचे प्रसग येत पण आगगाडीतून उतरल्याबरोबर स्नान करण्याची त्याचीहि वहिवाट हळू हळू बद पडत चालली होती.

आमच्या कुटुबांत ब्राह्मण पोटजातीसबधाने नवी रुढि पाडण्याचा प्रसग त्यांच्या मृत्यूनतर चार पाच वर्षांनी आला. तो पूर्वीच येता तर त्यानी काय मत दिले असते हे निश्चितपणे सागवत नाही. मात्र ते सांगावयाचे तर त्याला एक गमक आहे. ते असे की जो प्रसग वडिलाच्या हयातीत आला नाही तो मातोश्रीच्या हयातीत आला. आणि तो प्रसग म्हणजे माझ्या मुलीच्या विवाहाचा. तो असा. सातारा येथील डॉ. कुशाभाऊ देशपांडे याच्या घराचा व आमच्या घराचा ऋणानुबंध १८९० पासूनचा—म्हणजे माझे वडील बधु नाना हे साताऱ्यास नोकरीवर गेले तेव्हांपासूनचा—होता. ते व आम्ही साताऱ्यास पुष्कळ वर्षे एका आळीत व कांही वर्षे तर अगदी शेजारी शेजारी राहात होतो. यामुळे त्याच्या घरच्या रहाणीचा आम्हाला अन्तर्बाह्य चांगलाच परिचय असे. तो असा की देशपांडे मडळी देशस्थ असताहि, स्वच्छता टापटीप, गृहव्यवस्था, लहानथोराची वागणूक, इत्यादि गोष्टीत त्यांची अस्सल कोकणस्थावर ताण असे. आणि वरवरच्या कांही बाबतीत त्यांची मते सुधारकी पद्धतीची दिसली तरी नित्यनैमित्तिक अशा सर्व धार्मिक विषयात त्यांचा आचार अगदी सनातनी कर्मठ लोकासारखा होता. आम्ही सातारा सोडून पुण्यास आलो तरी त्यांचा आमचा ऋणानुबंध तुटला नव्हता. पुढे १९१० च्या सुमारास त्यांच्या दोघां मुलग्यांची लग्ने करण्याची वेळ आली तेव्हां

स्वतः डॉ. कुशाभाऊ व त्यांचे वडील बंधु, पेन्शनर डेप्युटी कलेक्टर रावबहादुर नानासाहेब देशपांडे, याना आमची आठवण झाली. आणि जमल्यास आमच्या घराण्याशी विवाहसंबंधाने नवे नाते जोडावे अशी इच्छा त्याना होऊन त्यांनी मला आपला विचार कळविला. मला स्वतःला त्यांचे घराणे व खुद्द लग्न होणारा मुलगा ही निरपवाद अशी वाटत होती. किंबहुना स्थळाच्या दृष्टीनेहि हे स्थळ चांगले व जमल्यास हातचे घालवू नये असे वाटण्यासारखे होते. ब्राह्मणांच्या पोटजातींमध्ये विवाहसंबध घडण्यास हरकत नाही, किंबहुना ते घडून येण्यास सर्रास सुरुवात झाली पाहिजे, अशाच मताचा मी होतो. आणि ही गोष्ट माहीत असल्यामुळेच समानमनोधर्म जाणून देशपांडेबंधूनी मला वरील सूचना केली. अर्थात् माझ्यापुरते होय म्हणण्याला मला काहीच आडकाठी नव्हती. पण नवी मते असली तरी समाजाप्रमाणे घरच्या कुटुंबांतील माणसांवरहि ती जुलुमाने लादू नयेत असे माझे धोरण असल्यामुळे, मी त्यांना सांगितले की आमची मातोश्री या गोष्टीला संमति देईल तर ही गोष्ट आपण आनंदाने करूं. पण ही गोष्ट इतकी नाजूक होती की, देशपांडे हे पुण्यास मातोश्रीला नेहमीप्रमाणे भेटून गेले तरी ती त्यांना स्वतःला काढवली नाही. मुलाच्या बापाने मुलीला मागणी घालणे ही गोष्ट आपणामध्ये कशीशीच वाटणार हे एक. पण ती विशेष अडचणीची नव्हती. खरी अडचण देशस्थकोंकणस्थाचा विवाह समाजांत रूढ नसलेला आपण करणार याविषयीची होती. म्हणून ती गोष्ट ते मजवरच सोपवून साताऱ्यास परत गेले.

पुढे ही गोष्ट भीत भीत मी आई जवळ काढली; व तिला शेवटी सरळ सवाल असा टाकला की "देशस्थ-कोंकणस्थ यांजमध्ये रूढ नसलेला विवाहसंबध आपण करणार या एका गोष्टी शिवाय दुसरे कोणचेहि यांत न्यून किंवा वावगे नाही. परस्पर सर्व दृष्टीनी आम्ही अनुरूपच आहोत. तेव्हा जी रूढि नाही ती आपण कशी प्रथम पाडावी एवढ्याकरितांच देशपांडे बंधूंची ही सूचना आपण अमान्य करावी काय ?" तेव्हां प्रथम मातोश्रीने "या कामी खरे शास्त्र विरुद्ध आहे की काय?" असा प्रश्न मला केला; व "ते नाही" असे मी निश्चयात्मक सांगितल्यावर विचाराकरितां एक दिवस तिने मागून घेतला. त्या दिवसांत माझी आई व माझे कुटुंब या दोघींनी आपसांत या गोष्टीचा विचार केला. आणि दोघींहि सर्वस्वी सनातनी मताच्याच होत्या. तथापि दुसरे दिवशी त्यांनी आपण होऊन मला सांगितले की,

"या विवाहाला आमची हरकत नाही. रूढि नाही एवढ्याकरितां आपण ही गोष्ट सोडून देण्याचे कारण नाही." अर्थात इतर सर्व बाजूनी हा विवाह श्रेयस्कर असे दिसून आले म्हणूनच त्यानी ही समति दिली ही गोष्ट अगदी खरी. आणि इतर कोणत्याहि दृष्टीने हा विवाह श्रेयस्कर नाही असे मला वाटले असते तर, केवळ या सुधारणेचा भोक्ता म्हणून ती घडवून आणण्याकरितां एरवीचे न्यून किंवा गौणत्व मी तरी का पत्करले असते ? कारण मुलीचे कल्याण ही तर गोष्ट पहिली. ती साधन असेल तरच मग हे करावयाचे. म्हणजे सुधारणा घडवून आणण्याकरिता हे लग्न मला करावयाचे नसून, ते केल्याने सुधारकी आचरण होते—रूढ नसलेली गोष्ट आपण प्रथम रूढ करतो—या दोषामुळे मात्र ते मोडावयास मी तयार नव्हतो. पण शिकल्या सवरलेल्या, नवीन मताच्या, व सामाजिक रूढि मोडण्याची जबाबदारी पत्करण्याच्या स्थितीत असणाऱ्या, माझी ही गोष्ट झाली. आई व माझे कुटुंब याची स्थिति तशी नव्हती. आणि म्हणूनच त्यानी समति दिली यात माझ्यापेक्षांहि त्यांनीच धैर्य अधिक दाखविले असे म्हणणे प्राप्त होते. मी ही गोष्ट करीन तर चार लोक मला बरेच म्हणतील; किंबहुना माझ्याशी सहानुभूति प्रगट करून माझी वाहवाहि करतील. पण व्यवहारांत मातोश्री व कुटुब यांचा नित्य ज्या वर्गातील लोकांशी संबंध यावयाचा, ते म्हणजे जुन्या मताच्या अशिक्षित शेजारणी व नात्यागोत्याच्या बायका किंवा ऋणानुबधी भट भिक्षुक वगैरे अशाकडून नावे ठेवून घेण्याचाच प्रसंग त्याना होता. पण त्यांत त्यानी मानसिक धैर्य दाखविले व आपला विवेक कसोटीला उतरविला.

पुढे आम्ही सातान्यास लग्नाला गेलो तेव्हा इकडे पुण्यातील आमच्या उपाध्याला घेरून ब्रह्मवृदानी मजवर ग्रामण्य उभे करण्याचा विचार केला. पण केळकर हे केसरीचे सपादक आहेत, व केसरी हे सनातनी पक्षाचे मुखपत्र आहे, तेव्हां केळकरांनी केले हे सशास्त्र असलेच पाहिजे, अशी कल्पना कांहीनी चालविली. पण इतर कांहीनी पुण्यातील शास्त्रीलोकाचे मतच घेतले. तेव्हां त्यांनी सांगितले की, धर्मशास्त्रांत ब्राह्मण हा एकच अखड वर्ण मानला असून त्यात कोंकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, हा भेद कोठेच मानलेला किंवा उल्लेखिलेलाहि नाही. यामुळे ग्रामण्याची गोष्ट निघाली तशीच ती सपलीहि. आणि आम्ही पुण्यास परत आल्यावर आमच्या उपाध्यांनी ही सर्व हकीकत आम्हाला हंसत हंसत सांगितली,

तेव्हां मातोश्री व कुटुंब यांना आपण केले ते अयोग्य केले नाही अशी खात्री स्वतंत्र रीतीने पटल्यामुळे फार आनंद झाला. आम्ही केली ही गोष्ट बरी नाहीं असे प्रत्यक्ष अप्रत्यक्ष म्हणणारे सुशिक्षित लोकांपैकीच काही निघाले! पण ते कांही ग्रामण्य करणारे नव्हते; व त्यांच्या नापसंतीला आम्ही जुमानलेहि नसते. मुद्याची गोष्ट इतकीच की मी खरोखर कोणत्याहि प्रकार जुलूम त्रागा किंवा आग्रहहि न करतां, घरच्या दोघी सनातनी मताच्या जबाबदार स्त्रियानी या सामाजिक सुधारणेला आनंदाने संमति दिली. यावरून या वेळच्या सामाजिक स्थितीचे जसे दिग्दर्शन होते, तसेच कोणाचे मन न दुखविता सामाजिक व धार्मिक बाबतीत मनुष्य वागला असतां त्याला योग्य ती सुधारणा घडवून आणण्याला फारशी हरकत पडत नाही हेहि सिद्ध झाले.

असो. अस्पृश्यतानिवारणसंबंधाने व अनिष्ट जात्यभिमानासंबंधाने माझी मते प्रसिद्धच आहेत. तथापि, या विषयी काही मुद्देसूद हकीकत व पत्रे देतो—

ता. ५ फेब्रुवारी १९३३ रोजी महात्मा गांधी यानी येरवडा सेंट्रल जेल मधून मला खालील पत्र पाठविले :—

" मला माझ्या अस्पृश्यतेविरुद्ध काढलेल्या मोहिमेत तुमची सक्रिय मदत अवश्य हवी ती किती व कोणत्या तऱ्हेने देता येईल ते तुमचे तुम्ही ठरवा. ही भिक्षा मी पदर पसरून मागत आहे. ती घालाच. तुम्हास सवड सापडेल तेव्हा मला आगाऊ कळवून भेटावयास या. बुधवार, गुरुवार व रविवार खेरीज केव्हाहि आलात तरी चालेल. लौकरच 'हरिजन' नावाचे इंग्रजी साप्ताहिक काढीत आहे. दर आठवड्यास बुधवार व गुरुवारचे सर्व दिवस त्या कामांत जातील व रविवार जेल अधिकाऱ्याना गैरसोयीचा आहे. 'हरिजन'करिता तुमचा संदेश पाठविलात तर फार बरे होईल. लंडनच्या प्रवासाने तुमची प्रकृति सुधारली आहे असे कळते."

महात्मा गांधी यांच्या बोलावण्यावरून पुढील मंगळवारी मी येरवड्याच्या तुरुंगांत महात्माजींची गाठ घेतली. उभयतांचे सुमारे दीड तास संभाषण झाले. त्यांत मंदिरप्रवेशाच्या बिलासंबंधाने सर्व बाजूंनी मोकळ्या मनाने चर्चा झाली. मंदिर-प्रवेशासंबंधाने मी आपली तडजोडीची योजना महात्माजीपुढे मांडली. महात्माजीनी ही योजना आपणास मान्य असल्याचे सांगितलें. आणि सनातनी लोक ती मान्य करीत असतील तर त्या योजनेनें ( फक्त अंबेडकरादि लोक

वगळून ) सनातनी व प्रागतिक यांचे एकमत होऊन हा प्रश्न सुटेल असेंहि महात्माजींनी सांगितले. उलट सार्वजनिक मंदिरांचे ट्रस्टी व मॅनेजर, आपलेंच मत चालवून व लोकमत धिःकारून, अस्पृश्यांना मुळीच मंदिरप्रवेश करू देणार नाही असे म्हणतील तरच त्यांना योग्य मार्गावर आणण्याकरितां कायद्याची मदत घेणे योग्य होईल असे मी आपले मत सांगितले. माझी तडजोडीची योजना अशी आहे. ( १ ) देवळाचे जे गर्भागार म्हणजे अंतर्गृह म्हणून असते त्यांत अस्पृश्यच काय पण स्पृश्यानांहि प्रवेश करू देऊं नये. ( २ ) या अंतर्गृहातील सर्व व्यवस्था व प्रत्यक्ष देवपूजा ही फक्त नियोजित पुजाऱ्यानेंच करावी, व इतरांना फलपुष्प नैवेद्यादि भोग मूर्तीला वाहावयाचे असतील तर ते पुजाऱ्याच्या हातीं देऊन त्याजकडून ते वाहवावे. ( ३ ) अंतर्गृहाबाहेर सोईच्या अशा ठिकाणीं एक मर्यादेची खूण उभारण्यात यावी, आणि स्पृश्य किंवा अस्पृश्य यांनी येथूनच देवदर्शन घ्यावे. यानंतर इतर, पण अर्थात् तुरुंगात म्हणून राजकारणाशी संबंध नसलेल्या, अनेक विषयांवर महात्माजींशी माझे संभाषण होऊन ही मुलाखत संपली.

या मुलाखतीनंतर अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशासंबंधीची आपली तडजोड मांडताना म. गांधी यांनी ता. ४ मार्चच्या 'हरिजना'मध्ये पुढील विचार प्रदर्शित केले:—

"मंदिरप्रवेशाच्या प्रश्नासंबंधी विचारविनिमय करण्यासाठी माझी भेट घेण्याची मी न. चिं. केळकर यांना विनंति केली होती; आणि ती मान्य करून माझी भेट घेण्याचे सौजन्य त्यांनी दाखविले. मंदिरप्रवेशाच्या बिलासंबंधी त्यांचे काय मत आहे हे जाणण्याची मला उत्कंठा होती. त्यांनी मला असे सांगितले की, मंदिरप्रवेशासारखे जे प्रश्न कायद्याने सोडविण्यासारखे आहेत, ते पुढेमागे कायदेमंडळात आणल्याशिवाय गत्यंतर नाही. मग त्या प्रश्नाचे स्वरूप धार्मिक असले तरी कायदेमंडळाशिवाय दुसरा मार्ग नाही असे मी पुष्कळ वर्षे मानीत आलो आहे.

"असे फर्माविण्यात आले आहे की, सार्वजनिक हिंदु देवळांचे निधिप ( ट्रस्टी ) यांनी हरिजनांना देवळांत येण्याला मज्जाव केलाच पाहिजे. हा कायदा केवढ्याहि लोकमताला मोडून काढता येणार नाही. नवीन कायदा करावा अशी मागणी लोकमताला करता येईल. पण मंदिरप्रवेशाची परवानगी देणारा कायदा लोकमत स्वतः निर्माण करूं शकणार नाही.

"श्री. केळकर याना श्री. रगा आय्यर यांनी आणलेल्या बिलाची जरूरी मान्य असली तरी, अस्पृश्यांचे मंदिरांत प्रत्यक्ष पाऊल पडावयाचे ते सलोख्याच्या तडजोडीनतरच पडेल असे त्यांचे मत आहे. स्पृश्य हिंदूना मदिरप्रवेशाबाबत ज्या अटी लागू असतील नेमक्या त्याच अटीवर हरिजनांनाहि प्रवेश मिळावा, या विषयी श्री. केळकर हे निःशक आहेत. पण हरिजनांना अंतर्गृहांत प्रवेश देण्याला लोकमत तयार झालेले नाही असे त्यांना वाटते. हे जर खरे असेल तर, हरिजनांना प्राप्त न होणाऱ्या हक्कांवर स्पृश्य हिंदूंनी पाणी सोडावे म्हणून, श्री. केळकर यांची योजना अशी की, सर्व सार्वजनिक देवळामध्ये सर्वसामान्य अशी एक मर्यादा घालावी. तिच्या पलीकडे कोणीहि जाऊं नये. फक्त प्रत्यक्ष पूजाविधि करणाऱ्या माणसाला परवानगी असावी. याचा अर्थ असा की, ज्या देवळात सध्या स्पृश्य हिंदु गाभाऱ्यात प्रवेश करतात व मूर्तीला स्पर्श करतात, त्या देवळात स्पृश्य लोक हरिजनांना आपल्याबरोबर वरील हक्कांचा उपभोग घेऊ देत नसले तर स्पृश्यांनीच मूर्तिस्पर्शादिक आपल्या चालू हक्कांचा त्याग केला पाहिजे. ही तडजोड प्रामाणिकपणे अमलांत येईल तर तिला माझा कांहीहि विरोध नाही असे मी सांगितले. आपल्या घरांतील अप्रशस्त असा हा कलह त्वरित संपुष्टांत यावा, याहून अधिक आनद मला दुसऱ्या कशानेंहि होणार नाही."

अस्पृश्य समाजाचे एक पुढारी रा. गणपत नारायण कांबळे यांनी 'दलित-बंधु' पत्राच्या २८।८।३२ च्या अंकांत माझ्या अस्पृश्यतानिवारणाच्या धोरणासंबंधाने खालील उद्गार काढले आहेतः—

"लोकमान्य टिळक व दे. भ. केळकरांची थोरवी यांतच आहे की त्यांनी सुधारकी थाटाचा, सरकारी साच्याचा, मानभावीपणाचा व अव्यवहार्य सल्ला अस्पृश्योद्धाराच्या बाबतीत कधीहि दिलेला नाही. या बाबतीतील लोकमान्यांचे जाहीर मत त्याच्या आठवणीत प्रसिद्ध झाले आहे. सागलीच्या महारवाड्यातील भाषणांत लोकमान्यांनी सर्व जातीच्या अस्पृश्यांना आपापले धंदे सुधारण्याची आग्रहाची विनंति केलेली आहे.

"धार्मिक बाबतीत गणपतीच्या मिरवणुकीत चर्मकार सभेचा गणपति आघाडीला गायकवाडवाड्यातील गणपतिबरोबर घेऊन स्वकीयपणेच लोकमान्यांनी

आपले मत व्यक्त केलेले आहे. रोटीव्यवहाराच्या बाबतीत भरमसाट मत त्यांनी कधीच दिले नाही.

"दे. भ. केळकरानी लोकमान्याची परपरा या बाबतीतहि तलोतंत कायमची राखली आहे. पर्वती सत्याग्रहाचे वेळी अस्पृश्याच्या मागणीचा न्यायीपणा त्यांनी कबूल करून ब्राह्मणानाहि गाभाऱ्यात जाण्याचा आपला हक्क सोडण्याची विनति केली होती. त्यानी सुचविलेला हाच उपाय शेवटी अवलबावा लागेल असेच हिंदुसमाजाची नाडी जाणणारा प्रत्येकजण म्हणेल. अस्पृश्य समाजाला आंत घेणारी काही देवळे निघतील. पण बहुसख्याक देवळाच्या बाबतीत केळकरांचाच तोडगा अवलबावा लागेल.

" अस्पृश्यतानिवारण्याचे कार्य महाराष्ट्रात दे. भ. भोपटकर व श्री. माटे मास्तराच्या सहाय्याने दे. भ. केळकरानी जितके परिणामकारकपणे केले आहे तितके डिप्रेस्ड क्लासेस मिशन, समाज समतासघ किंवा बहिष्कृत हितकारिणी सभेनेहि केलेले नाही. मग सुधाकारांनी केलेले नाही हे सागावयास नकोच. सुधारकानी आपला चवचालपणा तेवढा तृप्त करून घेतला असेल एवढेच.

"हिंदुमहासभेचे प्रमुख पुढारी व ब्राह्मण समाजाचे घटक या नात्याने दे. भ. तात्यासाहेबावर विशेष जबाबदारी आहे, व त्या जबाबदारीची जाणीव ठेऊनच ते अस्पृश्योद्धाराचे कार्य करीत आहेत. ते ज्या तऱ्हेने हे कार्य करतील त्या तऱ्हेनेच अस्पृश्योद्धार व हिंदु समाजाचे हित होईल "

पण अस्पृश्योद्धार चळवळीचे सन्मान्य पुढारी रा. विठ्ठल रामजी शिंदे यांनी जे खालील पत्र लिहिले त्यामुळे ब्राह्मणेतरांनी मला शिव्यांची जी लाखोली वाहिली तिची भरपाई झाली असे मी मानतो. ते पत्र असेः—

प्रिय नरसोपत यास.—सा. न. वि. वि. श्री. ल. ब. भोपटकर यांचे छापील आमंत्रण 'केसरी-प्रबोध' आपल्यास अर्पण करण्याच्या समारभास येणेचे आताच पोचले. पाडव्याचे दिवशी सायकाळी आबेगाव पेठ्यात घोडेगावी शेतकरी संघाचे उद्घाटन करण्यास मला जावे लागेल. म्हणून आपल्या समारभास येणे होणार नाही याचे वाईट वाटते. तरी केसरीविषयी पुन्हा एकदा मला स्वतःला प्राजलपणे काय वाटते ते या पत्रात लिहिल्याशिवाय राहवत नाही.

गेल्या शुक्रवारचा व आज मगळवारचा असे केसरीचे अग्रलेख मी समग्र वाचले. प्रत्येक अक्षर त्यातले मला इतके आवडले की जणूं ते माझ्या हृदयाच्या

मुळांतूनच निघाले होते. शुक्रवारचा लेखाचा समतोलपणा आणि आजच्या लेखाची गहनदृष्टि ही दोन्ही कोणत्याहि कसलेल्या संपादकास अत्यंत नमुनेदार खात्रीने आहेत. तुमच्या कट्टया शत्रूसहि हे दोन लेख मान डोलवावयाला लावतील. प्रस्तुत समेटामुळे माझे स्वतःचे मन फार दुखले आहे. तसे मी ता. ७ मार्चच्या शनवारवाड्यापुढील जाहीर सभेत उघड बोलूनहि दाखविले. त्या आठवड्यांत मला जी दुःस्वप्ने पडत होती त्याचे यथातथ्य शब्दचित्र केसरीच्या अग्रलेखांत आज उठावदार पाहून मला आश्चर्य वाटले. मी केसरी सांप्रदायाचा मुळीच अनुयायी नाही. पण मी कोणत्याच साप्रदयाचा अनुयायी नाही ! तरी पण केसरीतील लेखाचा चहाता आहे म्हणून तर माझ्या चहाची विशेष किमत नाही काय ? कृपाकरून माझे हे पत्र केसरीच्या लेखकास व रा. ल. ब. भोपटकरास आणि सर्व संबंधीजनांस दाखवाच. म्हणजे मी समारंभास येऊ न शकल्याबद्दल ते सर्व मला क्षमा करतील.

प्रिय नरसोपंत—काल ' रत्नाकरातील ' रा. दिवेकराचा तुमच्या विषयीचा लेख मी वाचला. तोहि मला फार आवडला. तुमच्या चरित्राचे व चारित्र्याचे रहस्य प्रत्यक्ष तुम्हाला तरी इतके सुरेख वठविता येईल का हो ! मी पुष्कळवेळां तुम्हांवर जाहीररीतीने स्तुतिनिंदेचे आघात केले आहेत. तथापि महाराष्ट्रीय पुढारी या नात्याने माझ्या नजरेत तुमची जी नैतिक उची भरली आहे तिच्यातील एक तिळहि कमी झालेली नाही. म्हणूनच दिवेकराचा लेख मला आवडला. जसे केसरीस तसेच तुम्हा स्वतःस दीर्घायुष्य लाभो आणि महाराष्ट्र-कार्य तुम्हाकडून व तुमच्या अनुयायांकडून चिरकाल घडो अशी अत्यंत नम्र व सहज प्रार्थना आहे.

हे पत्र प्रसिद्धीच्या दृष्टीने मुळीच लिहिले नाही. तरी पण तुमच्या सांप्रदायाला हे प्रसिद्ध करण्यापासून कांही लाभ होत असेल म्हणून तुम्ही मला न विचारता प्रसिद्ध कराल तरी त्यांतील एक अक्षरहि परत घेण्यास मी तयार नाही. हे लिहिण्याचे कारण मी हे पत्र अगदी निर्व्याज हेतूने लिहिले आहे. मग ते मला कसे लपविता येईल ?

पुन्हाः आपले शुभ चिंतून रजा घेतो.

तुमचा नम्र

वेताळ पेठ,
१७मार्च १९३१, पुणे.

**विठ्ठल रामजी शिंदे**

याच्या उलट प्रकार पहा. डॉ. अंबेडकर याना आम्ही खालील कांही मडळींनी पुढीलप्रमाण पत्र पाठविले. पण त्याला एकदोन ओळीचेहि उत्तर आले नाही.

"येवले येथील परिषदेत आपण हिंदुधर्म त्याग करणार असे जाहीर केले ते ऐकून अनेक कारणांनी आम्हास वाईट वाटले. आपल्या भावनांची तीव्रता आम्ही जाणतो. तथापि आपण धर्मांतर केल्याने हिंदु समाजाचेच काय, पण विशेषतः आपण ज्या समाजाचे एक पुढारी आहा त्याचे तर त्यांतल्या त्यांत अतिशय नुकसान होईल असे आम्हास वाटत. आम्ही काही लोक अस्पृश्यता-निवारणासबंधाने व मागासलेल्या ज्ञातीच्या उन्नतीसबंधान यथामति यथाशक्ति खटपट करतो त्याबद्दल आपणास काय वाटत असेल ते वाटो. तथापि ही इष्ट सुधारणा लवकरच बऱ्याच प्रमाणात घडून येईल अशी आम्हाला आशा वाटते. कार्य मोठे आहे त्या मानाने अद्यापि जागृति कमी आहे. परंतु ते कार्य घडून येण्याविषयी सुशिक्षितांतील बहुजनसमाज प्रामणिकपणे प्रयत्न करीत आहे ही गोष्ट आपणाला दिसून येत असेल. आशा वाटते कीं, तुम्ही आम्ही व तुमच्या आमच्या सारख्या विचाराच्या इतर लोकांनीं असाच प्रयत्न करीत राहिल्यास इष्ट सिद्धि लवकरच होईल. पण ते कसेहि मानले तरी आपल्या धर्मांतराने या कार्याची हानी होईल. उलट आपण करीत आहा तसेच आणखी प्रयत्न करीत राहिल्यास या नाही तर पुढच्या पिढींत तरी बरेचसे दृश्य-फल दिसूं लागेल असे आम्हाला वाटते. आपणाला योग्य वाटेल ते करण्यास आपण स्वतत्र व समर्थ आहा. परंतु एकदर समाजाचा व या विशिष्ट प्रश्नाचा विचार करता आम्हाला जे काय वाटते ते आपणास कळविले आहे. आपण न विचारता आम्ही आपले मत आपल्या नजरेस घातले ही गोष्ट गैर झाली असे आपणास वाटत असल्यास त्याची आपण क्षमा करावी."

आपले

न. चि. केळकर, ल. ब. भोपटकर, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, श्री. म. माटे.

असो. सुधारक व सनातनी याच्यामध्ये कोठेतरी बसणारा मी तो तिऱ्हाइतांना कसा दिसत होतो याविषयी दोन तीन अभिप्राय देतों. त्यांतील एक हौशी

सुधारकाचा, एक विवेचक सुधारकाचा, व एक सनातनी सुधारकाचा आहे. हौशी सुधारक कै. वाग्भट देशपांडे 'रत्नाकरा'त लिहितात :—

" केळकराचा जन्म आतापर्यंत टिळकपक्षीय राजकारणात गेला असला तरी त्यांची सामाजिक बाबतीतील प्रगमनशील मते पाहून आश्चर्य वाटण्याचे वास्तविक काहीच कारण नाही. कारण आपल्या एका लेखात त्यानी असे म्हटले आहे की, " आपल्या देशावर हल्ली मतस्वातंत्र्याच्या कल्पनेची भरती आली आहे हे जर खरे असले, तर त्या भरतीच्या लाटा जशा राजकीय प्रदेशात, त्याचप्रमाणे सामाजिक व धार्मिक प्रदेशातहि पसराव्यात, हे स्वाभाविक आहे. समुद्राला भरती आली म्हणजे मग समुद्राशी संबंध असलेल्या सर्व खाड्या, नद्या, नाले यांच्यामधून एकसारखेच पाणी फुगते. त्याचप्रमाणे समान हक्क व स्वतंत्र बुद्धि यांची भावना मनात एकदा जागृत झाली म्हणजे मग ती अमुक एका बाजूलाच वळावी, दुसऱ्या बाजूला मात्र वळू नये, अशी अपेक्षा करणे व्यर्थ होय. " केळकरांची ही मीमांसा अगदी स्तुत्य आहे यात शंका नाही. राजकीय बाबतीत प्रगतीचा हव्यास असलेला मनुष्य सामाजिक बाबतीतसुद्धां तितकाच प्रागतिक असला पाहिजे ही गोष्ट टिळकांच्या काळी शक्य झाली नाही, हा केवळ तत्कालीन परिस्थितीचा दोष होय. पण खोट्या भावनेस बळी न पडतां प्रगमनशीलतेची आवड केळकरानी कोणत्याहि एका विशिष्ट बाबतीतच केंद्रीभूत न करता, राष्ट्रास उपयुक्त अशा हरएक बाबतीत त्यानी तीच प्रगमनशीलता दाखविली आणि आचरली हेच केळकरांचे वैशिष्ट्य होय. "

सनातनी सुधारक प्रो. श. दा. पेंडसे हे 'वागीश्वरी'त लिहितातः— " हिंदुस्थानातील हिंदुराजकारणी लोकांमध्ये अशी एक जाति आहे की तिला धर्माचे मोठे वावडे आहे. धर्माचे नाव काढले की हिंदुस्थानातील निरनिराळ्या धर्मांच्या अनुयायांमध्ये फूट पडेल अशी त्याना भीति वाटते व त्यामुळे हिंदुधर्म व हिंदुजाति यांची सर्वत्र पायमल्ली होत असतानाहि तिकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करण्याची या राजकारणी लोकांची प्रवृत्ति असते. श्रीयुत तात्यासाहेब केळकर हे राजकारणी आहेत. पण त्यांची जाति वर सांगितलेल्या राजकारणी लोकांच्या जातीपेक्षा भिन्न आहे. हिंदुस्थानात लो. टिळकांच्या नेतृत्वा-खाली स्थापन झालेल्या राष्ट्रीय पक्षाचे वैशिष्ट्यच असे आहे की, या पक्षा-

तील लोक जसे देशनिष्ठ असतात तसेच धर्मनिष्ठहि असतात, व या दोहोमध्यें कांही विरोध आहे अशा रीतीची गैरसमजूत त्यानी कधीच करून घेतली नाही. हिंदुसंस्कृति व तदतर्गत धर्म आणि तत्त्वज्ञान यासंबधा लोकमान्याचा व्यासंग इतका गाढ होता, की राजकारणापेक्षाहि या गोष्टी त्याना प्रिय असत. कारण या दीर्घव्यासगामुळे त्या सस्कृतीचे व तिच्या तत्त्वज्ञानाचे श्रेष्ठत्व त्याना पूर्ण पटले होते. या तत्त्वज्ञानाच्या पायावरच त्यानी आपल्या राजकारणाची उभारणी केल्यामुळे हा पाया भक्कम राहील अशी त्यानी नेहमीच काळजी घेतली. या थोर सस्कृतीचे श्रेष्ठत्व सर्वांना पटवून देण्याचा उद्योग त्यानी आजन्म केला व तिची पायमल्ली होऊ न देण्याची सदैव दक्षता बाळगिली. त्याची परंपरा श्रीयुत केळकर यांनी अखड पुढे चालविली आहे. ''

विवेचक सुधारक रा. वि. स. खाडेकर दिलेला अभिप्राय इतका समर्पक आहे की तसा आत्मनिरीक्षणाने स्वतः माझा मलाहि लिहिता आला नसता. मला तो फार यथार्थ वाटला म्हणून जशाचा तसा सर्व देतो :—

'' गेल्या अर्ध शतकातील महाराष्ट्रातील प्रमुख समाजसुधारकाची गणना करण्याचा प्रस्तुत लेखकावर एकदा प्रसग आला. त्या यादीत 'श्री'काराच्या जवळ तर नाहीच पण 'इत्यलम्'च्या आसपाससुद्धा केळकराचे नाव नव्हते. आगरकर रानड्यासारख्या सामाजिक सुधारणेचा मतप्रचार करणाऱ्या मडळीत नाही तर नाही, पण हरिभाऊ आपटे कोल्हटकर-केशवसुत-गडकरीप्रभृति सुधारक वाङ्मयसेवकांत तरी केळकराचे नाव समाविष्ट होण्याला वास्तविक हरकत नव्हती. पण—कारण कांहीहि असो—केळकर हे नाव उच्चारल्याबरोबर सामाजिक सुधारणेची आठवण होत नाही हे मात्र खरे. जलशात गायला बसलेल्या प्रत्येक गायकाचे व्यक्तित्व प्रेक्षकाच्या अतःकरण्यात उमटते, पण त्याच्या गाण्याची साथ करणाऱ्या व प्रसंगी त्यांना साभाळून घेणाऱ्या तब्बलजीकडे मात्र बहुधा कुणाचे लक्ष जात नाही. सामाजिक सुधारणेच्या बाबतीत केळकराची थोडीफार अशीच स्थिति झाली आहे.

'' 'पुनर्विवाहासबधी सारासार विचार' 'विशिष्ट विवाहाचा कायदा' 'हीन-जाति व त्याची उन्नति' 'हुड्यावर बहिष्कार' इत्यादि केळकराचे लेख नुसते चाळून पाहिले तरी ते अतर्यामी सुधारक आहेत असे म्हटल्यावाचून राहवत नाही. सामाजिक सुधारणेकडे पाहण्याची त्याची दृष्टि टिळकांप्रमाणे उदासीन अगर पराजपे-खाडिलकराप्रमाणे उपहासात्मक नाही. रूढि, आचार, सस्कृति वगैरे

समाजमंदिराच्या आधारस्तभांवर अविचाराने ते कुणालाहि कुऱ्हाड चालवूं देणार नाहीत. पण हे आधारस्तभ पोकळ झाल्यानंतरहि त्याना धक्कासुद्धां लावतां उपयोगी नाही असा अट्टाहासहि ते धरणार नाहीत. केसरीचे सपादक व टिळकांचे सहाय्यक असूनहि सामाजिक सुधारणेविषयी आपली सहानुभूति स्पष्टपणे व्यक्त करण्याला त्यांनी कधीहि कमी केले नाही ही अत्यंत महत्वाची गोष्ट आहे.

"कृतीच्या दृष्टीने पाहिले तर सुधारणावादी म्हणून गाजलेल्या अनेक लेखकांइतकी केळकरांची सुधारणाविषयक सहानुभूति कांही निष्क्रिय नाही. रानडे अगर हरिभाऊ आपटे यांची द्वितीय विवाहाच्या वेळी काय त्रेधा झाली ती त्यांची चरित्रे वाचणारांना सांगायला नकोच. 'सुदाम्याच्या पोह्यां'त व नाटकांत सामाजिक सुधारणेचे वकीलपत्र घेणाऱ्या कोल्हटकरानी सुद्धां कृतीच्या दृष्टीने केळकरापेक्षां कांही विशेष कार्य केले आहे असे नाही. गडकऱ्यांची तर गोष्टच बोलायला नको! त्यांच्या खासगी आयुष्यांत जर त्यांनी काही सामाजिक निर्बंधाचे उल्लघन केले असेल तर ते फक्त अस्पृश्यानी शिवलेल्या खाण्यापिण्याच्या-च बाबतीत! उलट स्त्रीशिक्षण, पोटजातीतील लग्ने, इत्यादि सुधारणा केळकरांनी गाजावाजा न करतां केल्या आहेत. असे असून त्यांचे नांव सुधारकांच्या यादीत मात्र सहसा पडत नाही. असे का व्हावे?

"या प्रश्नाची अनेक उत्तरे आहेत. केळकर सामाजिक सुधारक आहेत खरे. पण त्यांच्या सुधारणाविषयक मतांचा सचार त्याच्या काही निबंधापलीकडे गेलेला नाही. त्याच्या सहा नाटकापैकी एकहि सामाजिक नाही, इतकेच नव्हे तर त्याच्या गोष्टी अगर कविता याच्यावरहि सामाजिक सुधारणेची छाया पडलेली आढळून येत नाही. तत्त्वप्रतिपादनाच्या तळघरांत कलाविलासाच्या गुलाबांची कुडी ठेवणे हे दोहोनाहि विघातक आहे असे त्याचे मत असेल. पण एवढे खरे की हरिभाऊ प्रभृति लेखकानी आपल्या प्रमुख ललितकृतीत सामाजिक सुधारणेला जसे स्थान दिले आहे तसे केळकरांनी कुठेच दिलेले नाही.

"दुसरे कारण केळकरांच्या एकंदर लिखाणाशी तुलना करतां त्यांचे सुधा-रणाविषयक लेखन अत्यत अल्प आहे हे होय. हिमालयाच्या पायथ्याशी उभे राह-णाऱ्या मनुष्याचे लक्ष त्याच्या शृगाकडेच जाते. मधल्या लहान-सहान टेकड्या त्यावेळी त्याला अगदी क्षुद्र वाटतात. केळकरांच्या वाङ्मयांत सामाजिक सुधारणेची हीच स्थिति झाली आहे.

" तिसरे कारण आणि हेच सर्वांत मोठे कारण आहे. वामनरावजी जोशी यांनीं आपल्या लेखांत ते उल्लेखिलेलेच आहे. ' केळकर पुनर्विवाह घटस्फोट वगैरे सुधारणाना समति देतात तीं गौण पक्ष म्हणून. असली समति म्हणजे मान्यतेचे रूप घेतलेला विरोधच होय. ' हा केळकराच्या सामाजिक मतावरील सर्वांत मोठा आक्षेप आहे असे म्हणायला हरकत नाही.

" या आक्षेपाविषयी विचार करताना केळकराचा एक स्वभावविशेष अवश्य लक्षात घेतला पाहिजे. इंग्रजी क्रमिक पुस्तकांतून एका बाजूने सोन्याची व दुसऱ्या बाजूने चांदीची असलेली ढाल दोन सरदाराच्या द्वंद्व-युद्धाला कारणीभूत होते अशा अर्थाची एक गोष्ट असते. दोन बाजूंनी येणाऱ्या या सरदारांपैकी प्रत्येकाला ढालीची एकच बाजू दिसते; व ढाल सोन्याची की चांदीची या विषयी वादविवाद होऊन त्याचा निकाल लावण्याकरितां ते तरवारी उपसतात. केळकर या सरदारांपैकी एक असते तर हे प्रकरण हात-घाईवर कधीच आले नसते. प्रतिपक्षाचे म्हणणे ऐकताच त्यांनी तरवार उपसण्या-ऐवजी दोन पाउले पुढे टाकून त्या ढालीची दुसरी बाजू पाहिली असती आणि ' तुमचे म्हणणे अक्षरशः खरे आहे, ढालीची माझी बाजूहि काही कमी प्रेक्षणीय नाही ' असे म्हणत म्हणत दुसऱ्या हटवादी गृहस्थाला आपल्या बाजूला आणले असते.

" त्याच्या या विचारशील स्वभावाचे प्रत्यंतर पहावयाचे असेल तर त्यांचा ' हुंड्यावरील बहिष्कार ' हा सामाजिक लेख पहावा. बंगाल्यांत स्नेहलतेने हुंड्याच्या पायी स्वतःला जाळून घेतले त्यावेळी त्यानी हा लेख लिहिला. अर्थात दुसरा कुणी लेखक असता तर यावेळी लेखणीतून अग्नीच्या संसर्गाने तापलेल्या शब्दावाचून दुसरे काहीहि बाहेर पडले नसते. पण केळकरानी या लेखांत हुंड्याचे अनर्थ वर्णन केले असले तरी वस्तुस्थितीचा त्याना विसर पडलेला नाही. ते म्हणतात ' मुलीच्या आईबापाची कींव वाटते खरी; पण त्यातील कित्येक असे खमंग असतात की, त्याचे वेळी अवेळी नाक दाबून तोंड उघडले तरच ठीक. त्याना जर भोळा व सज्जन व्याही भेटेल, आणि ' देण्याघेण्याच्या गोष्टी या ज्याच्या त्याच्या मोठेपणाच्या आहेत ' पोटचा गोळा देईल तो सोन्याच्या तोळ्याला मागे घेणार नाही ' असे तत्त्वज्ञान लढवील तर, त्याला ते गोता दिल्याशिवाय कधीहि रहावयाचे नाहीत. आणि ' नुसती हळकुंड बांधून

मुलगी दिली, अन्-दूध-भात जेवायला घातला ' ही जी केवळ म्हण आहे ती अक्षरशः खरी केल्याशिवाय ते सोडणार नाहीत. हुंड्याला मागणीचे व कराराचे जे कित्येक वेळां स्वरूप येते ते अशा आईबापांच्या उदाहरणामुळेच.

" मुलीच्या आईबापांतहि सारेच कांही धुतलेले तादुळ नसतात, त्यांतहि असायचे तितके उडीद असतात, असे केळकरानी म्हटले म्हणन त्यानी हुंड्याचे समर्थन केले असे म्हणणे योग्य होईल काय ? केळकराना आयुष्यांत फार दिवस वकिली चालवावी लागली नाही हे खरे; पण वकीलापेक्षाहि ते यशस्वी न्यायाधीश झाले असते यात सशय नाही. सामाजिक सुधारणेप्रमाणें राजकारणातहि ते सुवर्णमध्याचा पुरस्कार करणारेच आहेत. पण त्याचे टीकाकार त्यांतल्या 'सुवर्णा'कडे लक्ष न देता ' मध्या ' वरच तुटून पडतात.

" प्रो. वामनरावजीनी उपस्थित केलेल्या प्रश्नाचा याच दृष्टीने विचार केला पाहिजे. पुनर्विवाह घटस्फोटादि सुधारणांना केळकरानी गौणपक्ष म्हणून दिलेली समति, आणि घरी जावयाला निघालेल्या विद्यार्थिनीला प्रथम न जाण्याचा उप-देश करून नतर शिक्षकाने जाण्याकरिता दिलेली समति, यात प्रो. वामनरावजीना कांहीच फरक वाटत नाही. विद्यार्थिनीचे घरी जाण्याचे कारण ज्या मानाने महत्त्वाचे असेल त्या मानानेच शिक्षकाने आपल्या समतीचे स्वरूप ठरविणे इष्ट नाही काय ? आई आजारी असल्यामुळे घरी जाण्याची परवानगी मागणारी विद्यार्थिनी, आणि शेजार-घरच्या हळदीकुकवात रमण्यागमण्याकरिता रजा मागणारी विद्यार्थिनी, यात दोन ध्रुवाचे अतर नाही काय ? पुनर्विवाह-घटस्फोटादि विषयाचा विचार करताना व्यक्ति आपल्या डोळ्यापुढे कधीच उभी नसते.

" सामाजिक परिस्थिति व आत्मौपम्यावर अधिष्ठित झालेली नीति याचा कुणीकडून तरी मेळ बसावा एवढीच सुधारणावादी मनुष्याची इच्छा असते. प्रो. वामनवराव जोशी म्हणतात तशा विशिष्ट परिस्थितीत पुनर्विवाह हा प्रथमविवाहा-इतका—आणि घटस्फोट विवाहग्रथीप्रमाणेच—न्याय्य व म्हणूनच पवित्र आहे हे केळकर देखील कबूल करतील. पण केळकरांच्या लेखनात नेहमी सामान्य परि-स्थितीचाच विचार केलेला असतो हे विसरून चालणार नाही.

"या बाबतीत आणखीहि एक मुद्दा महत्त्वाचा आहे. केळकरांचा सामाजिक लेखनाचा काळ लक्षांत घेता ( मतिविकार नाटकावरील टीका वगैरे

बहुतेक लेख २०–२५ वर्षांपूर्वीचे आहेत) पुनर्विवाहासारख्या गोष्टींचा गौणपक्ष म्हणून उल्लेख होणे अस्वाभाविक नाही. सामाजिक सुधारणेचा कैवार घेणारे एवढे मोठे कोल्हटकर! पण त्यांनीसुद्धां एके ठिकाणी जिला विरक्त स्थितीत आयुष्य कंठिता येत नाही तिनेच पुनर्विवाह करावा असे म्हटले आहे असे वाटते. गडकऱ्यांनी तर प्रेमासाठी तळमळणारी बालविधवा लीला निर्माण करून प्रेक्षकांना जितके रडविले तितकेच बालपतिमूर्तींच्या चिंतनांत रममाण होणाऱ्या सुशिलेचे चित्र काढून त्यांनी पतिनिष्ठेचे माहात्म्य पटविले! खरेच, हा उदाहरणे देण्याची तरी काय जरूरी होती? म्हणतात ना, मनगटावर घड्याळ, अन् वेळ विचारी बाळ! खुद्द वामनरावजींची रागिणी तरी काय आहे? वैधव्यात तिच्या मनात परपुरुषाचा विचार येतो; पण तो तिला, वामनरावजींना, अगर टीकाकार कोल्हटकरांना कुणालाच आवडत नाही. तर्कदृष्ट्या पाहिले तर रागिणीच्या पुनर्विवाहांत गौण असे काय आहे? कोल्हटकर, केळकर, जोशी, गडकरी या सर्वांवर परंपरागत सामाजिक संस्कारांचा पगडा इतका जबरदस्त आहे की ध्येय या दृष्टीने का होईना विधवेने अविवाहित राहणे चांगले असे सुचविल्याशिवाय त्यांना राहवत नाही.

" सामाजिक लेखकाच्या मतावरील हा संस्कारांचा पगडा इष्ट का अनिष्ट ही चर्चा येथे अप्रस्तुत आहे. जी गोष्ट करूनहि कोल्हटकर–गडकरी–जोशी सुधारणावादी राहू शकतात, तीच गोष्ट केळकरांनी केल्याबरोबर त्यांना 'प्रच्छन्न पुराणमतवादी' ही बदवी बहाल करणे न्याय्य होईल काय? एकादशीमाहात्म्य सगळेच गातात; मग ज्यांना उपास होत नसेल त्यांनीच तांदूळ भाजून खावे असे एखाद्याने म्हटले तर त्यात बिघडले कोठे? भाजलेल्या तांदुळाबरोबर तळलेली कांद्याची भजी खायलासुद्धा सध्याची पिढी तयार झाली आहे ही गोष्ट खरी! पण तिची मते केळकरांच्या लेखनांत आढळत नाहीत म्हणून त्यांना दोष देणे म्हणजे हिंदु स्त्रिया युरोपियन बायकांप्रमाणे केशकर्तनाचा पुरस्कार करीत नाहीत म्हणून त्यांना बोल लावण्यासारखेच होईल.

" केळकरांच्या लेखनाचे स्वरूप प्रायः लढाऊ नाहीच. शिवाय सामाजिक सुधारणेच्या बाबतीत त्यांनीं विशेष लेखन केले आहे असेहि नाही. यामुळे सुधारणाप्रवर्तक आगरकर अगर सुधारणासंवर्धक कोल्हटकर-आपटे या लेखकांबरोबर त्यांचे नांव निघत नाही यात आश्चर्य नाहीं. पण लेखनात व कृतींत

त्यानी सामाजिक सुधारणेचा सामान्यतः पुरस्कारच केलेला आहे. ते सामाजिक सुधारणेचे वकील नसले तरी तिच्या बाजूचे महत्त्वाचे साक्षीदार आहेत. त्यानी शांतपणाने साक्ष दिली अगर प्रतिपक्षाची बाजू विचारपूर्वक पाहिली म्हणून त्यांची साक्ष अनुकूल होण्यापेक्षा प्रतिकूलच झाली असे ठरविणे निःसंशय अन्यायाचे होईल."

---

## ( १४ ) आत्मनिरीक्षण

स्वतःचे मूल्यमापन स्वतःच करणे यासारखी कठिण गोष्ट दुसरी नाही. कारण आत्मप्रीतीमुळे माप झुकते जाईल ते आपल्याच बाजूला जावयाचे हे ठरलेलेच आहे. तथापि असा प्रयत्न प्रत्येकाने एखादे वेळी तरी करून पाहण्यासारखा असतो. मला एकदा एक स्नेही म्हणाला " केळकर, शेकडो लोक तुमची स्तुति करतात तर शेकडो लोक तुमची निंदा करतात. मग तुम्ही स्वतः तुमची योग्यता काय समजता ?" त्याला मी म्हणालो "जे कोणी माझ्याहून श्रेष्ठ आहेत त्यांच्या तुलनेने मी हीन आहे. आणि जे कोणी माझ्याहून हीन आहेत त्याच्या तुलनेने मी श्रेष्ठ आहे." तो म्हणाला "छेः, हे तर निव्वळ उडवाउडवीचे उत्तर झाले. तुम्ही तुमच्याहून श्रेष्ठ कोणाला मानता आणि हीन कोणाला मानता हे मला कसे कळणार" ! तेव्हा मी म्हणालो "प्रथम स्थूलमानाने हे सांगतो की माझ्या कोणत्याहि निंदकापेक्षा मी श्रेष्ठ आहे." तो म्हणाला "कारण ?" मी म्हणालो "कारण, माझ्याहून जे श्रेष्ठ आहेत असे मी समजतो ते माझी निंदा करताना सहसा आढळत नाहीत. जे माझ्याहून हीन आहेत तेच माझी निंदा करतात. निंदा हा असूयेचा परिणाम असतो. माझ्या योग्यतेला जे चढू शकत नाहीत तेच मला निंदेने खाली ओढून आपल्या योग्यतेला आणू पहातात. माझ्याहून श्रेष्ठ आहेत ते कोणाची निंदा करीत असतील तर त्याना जे आपल्याहून श्रेष्ठ वाटत असतील त्याची."

तरीहि माझ्या स्नेह्याचे समाधान झाले नाही तेव्हां मी मोकळ्या मनाने त्याच्याशी बोललो तेच येथे देतो. मी म्हणालों "मी केव्हांहि स्वतःकडे पाहतो तो इतरांच्या तुलनेने नाही. तर स्वतः माझ्या तुलनेने ! लौकिक काय किंवा यश काय, जे मला मिळाले ते खरोखर माझ्या आत्मगुणापेक्षा अधिक मिळाले असें मला वाटते. अर्थात मी पूर्णपणे आत्मसंतुष्ट आहे. आहे याहून अधिक योग्यता

मला लाभली नसेल तर तो लोकांचा दोष नाही, माझा आहे असे मी मानतो. कारण मी एक सामान्य बुद्धीचा सामान्य कर्तृत्वाचा मनुष्य आहे. दहा सहस्रांत एक अशी माझी योग्यता लोकोत्तर नाही. कदाचित् सहस्रांत एक इतकी असेल. ज्यांना शिक्षण लाभले नाही त्यांना बुद्धि किंवा कर्तृत्व नसते असे मी समजत नाही. शिक्षणाने खोटा लौकिक मिळवून देण्याची सोय केली आहे इतकेच. शिक्षितांतहि माझी योग्यता ठरवावयाची तर त्याला उत्तम प्रमाण आहे. ते असे की, मी विद्यापीठाच्या सहा परीक्षा दिल्या त्यात वरच्या प्रतीचा मान मला केव्हांच मिळाला नाही. कधी एकहि मोठ बक्षीस मिळाले नाही. इंग्रजी सातव्या इयत्तेपर्यंत शाळेत माझा नंबर पहिला दुसरा असे व नेहमी शिष्यवृत्ती मिळे परंतु विद्यापीठाच्या पहिल्याच परीक्षेत परीक्षेच्या कसोटीने माझ्याहून बुद्धिमान असे चारशे विद्यार्थी आहेत असे आढळून आले. मी प्रत्येक परीक्षा पहिल्याच वेळी पास झालो असे सहांपैकी पाचदा घडले. तथापि सामान्य बुद्धिमत्तेपेक्षा अधिक काही यामुळे दर्शविले जात नाही. पुढे मी वकील झालो असतो तरी त्यात मला पहिल्या प्रतीचे यश मिळाले नसते. मी चिकित्सक आहे तरी उत्तम वकीलाच्या बुद्धीत जो बारकावा लागतो तो माझ्या बुद्धीत नाही. शिवाय यशस्वी वकील होण्यास जी तडफ, जे व्यवहार चातुर्य, जो हटवादीपणा, अंगी लागतो तो मजमध्ये नाही. त्यातल्या त्यात अव्वल दावे चालविण्यापेक्षा मी अपील अधिक चांगली चालविली असती, आणि अपीलापेक्षा मी न्यायासनावरून द्यावयाचे निर्णय अधिक चांगले दिले असते. वकीलीत मी उपाशी मेलो नसतो. पण अण्णा भोपटकर मजविषयी जे म्हणतात की, “ केळकरानी वकिली केली असती तर लाखो रुपये मिळविले असते ” तेहि खरे वाटत नाही.

मला न्यायदानाचे काम लाभले नाही, आणि वकिलीचा धंदा सुटून मी संपादकीय धंद्यांत पडू शकलो, याने मात्र माझ्या नैसर्गिक गुणाना अधिक वाव मिळाला. संपादक या नात्याने मी बराच यशस्वी झालो. तथापि हिंदुस्थानात मजहून अधिक चांगले असे किती तरी संपादक होऊन गेले. मतप्रतिपादनाच्या दृष्टीने टिळक, भावना-चैतन्याच्या दृष्टीने अरविंद बाबू, बोचक कुत्सितपणाच्या दृष्टीने मोतीलाल घोस, हुल्लड उठविण्याच्या दृष्टीने अच्युतराव कोल्हटकर, इंग्रजी भाषेच्या दृष्टीनें नटराजन्, माहितीच्या दृष्टीने सी. वाय्. चिंतामणी, आवेशाच्या दृष्टीने खाडिलकर, बहुरंगीपणाच्या दृष्टीने विविधवृत्तकार, असे अनेक संपादक होऊन गेले. माझें

वैशिष्ट्य असेल तर भाषा सजवून लिहिण्यांत, आणि त्याहून सारासार चिकित्सेने खऱ्या व्यवहारी मनुष्यास आपलेसे करण्यांत होते. एकांतिक मते नाहीत म्हणून धडाडी नाही, ध्येयनिष्ठा असली तरी तिच्या मर्यादा पाहण्याकडे दृष्टि, स्वपक्ष समर्थन असले तरी प्रतिपक्षाच्या अंगचे गुण घेण्याची फाजिल न्यायबुद्धि, इत्यादि अनेक गुणमिश्रित दोष माझ्यामध्ये होते. परंतु कोणत्याहि सत्कार्याला निर्विकार बुद्धीने शक्य तितके प्रोत्साहन देणे हा एक मोठा गुण मजमध्ये होता. धान्दात व जाणून बुजून अन्याय असा मी क्वचितच करी. जातिद्वेष मी सहसा केला नाही. यामुळे संपादक या नात्याने मला शत्रूपेक्षा मित्रच अधिक मिळाले शिवाय सतत पंचवीस वर्षे केसरीसारख्या श्रेष्ठ वर्तमानपत्राचा संपादकीय अधिकार हाती राहिल्याने, माझ्या बुद्धीच्या व भावनाच्या सर्व बाजू प्रगट करण्याला मला विस्तृत वाव मिळाला.

राजकीय चळवळीच्या दृष्टीने तर माझ्यापेक्षां श्रेष्ठ असे पुढारी किती तरी झाले व आहेत. कोणच्याहि चळवळीकडे मी स्वतः तीत किती क्लेश सोसू शकेन किती स्वार्थत्याग करूं शकेन या व्यावहारिक पण आत्मौपम्य दृष्टीने प्रथम पाहतो. परिणामाविषयी सावधपणाची दृष्टि असली म्हणजे मनुष्य एकांतिक मते बेछूट प्रतिपादीत नाही. आपण जे करणार नाही ते लोकाना करावयाला सागणे माझ्या जिवावर येते. त्यामुळे ध्येयवादित्वात मी कमी पडतो जे आपल्या स्वार्थत्यागाला किंवा दुःखपात्रतेला मर्यादा ठेवीत नाहीत ते सहजच पुढारी बनतात, आणि अशांच्या विषयी मला अत्यत आदर वाटतो. देशाचे पाऊल पुढे पडेल ते अशाच पुढाऱ्यांच्या हातून. पण उलट आपली कुवत न पाहता, स्वतःची स्वार्थत्यागाची तयारी नसता, दुसऱ्याला मात्र घोड्यावर घालणारे असेहि पुढारी जे अनेक असतात त्यांच्या विषयी मला अत्यत तिटकारा वाटतो. दुसऱ्याचे घर जाळून त्याच्या प्रकाशाने आपला चेहरा उज्वल करणारे 'देशभक्त' मी पुष्कळ पाहिले आहेत ! आणि आपण स्वतः मागे पडलो तरी चालेल, पण हे परघाताचे पाप आपल्या हातून घडूं नये अशीच माझी नेहमी इच्छा असे. तसेच मतांच्या अप्रामाणिकपणाबद्दल मला फार राग येतो. पुढारी म्हणविणारे पुष्कळ मी असे पाहिले आहेत की, स्वतःची खरी मते तशी नसतां, दुसऱ्याच्या मतांना लोकांकडून मान मिळतो व कीर्ति लाभते म्हणून तीं मते आपलीहि आहेत असे भासवून प्रतिपादणारे. जो कोण कांही ओजस्वी भावनेचे बोलेल त्याच्या पलीकडे जाऊन त्याहिपेक्षां अधिक प्रखर व ओजस्वी असे बोलण्याचा मोह अनेक पुढाऱ्यां-

ना होतो, आणि खरा प्रसंग आला म्हणजे मग मात्र पळवाट शोधून अग चोरून ते निघून जातात हा अनुभवहि काही थोडा नाही. अशांच्या वर्गात जाऊन बसण्या-पेक्षां आपल्याला कीर्ति लाभली नाही, आपण मागे पडलो असे लोकांनी म्हटले, तरी चालेल. पण स्वतःला पचेल व पश्चाताप न होईल तितकेच करावे, आणि प्रामा-णिकपणाने वाटेल तेच बोलावे, असा माझा स्वभाव असल्यामुळे मी शर्यतीतल्या घोड्याप्रमाणे राजकारणाच्या रगणात धावलो नाही. तथापि हेहि प्राजलपणाने सागितले पाहिजे की पहिल्या प्रतीच्या राजकीय पुढाऱ्यांना 'जे बुद्धिबळ, जी स्वार्थत्यागपात्रता, आणि जी परिश्रमशीलता लागते ती मजजवळ नव्हती. मला राजकारणात मिळाला याहून अधिक मान मिळाला नाही या विषयी माझ्या मित्रां-नाच माझ्यापेक्षां अधिक वाईट वाटते. पण त्यांना माझे खरे दोष माझ्या इतके माहीत नसतात. मी 'महत्वाकाक्षी' नाही हे खरे आहे. पण त्या शब्दाला वाईटा-बरोबर चागला असाहि एक अर्थ असतोच की नाही ?

पण केव्हा केव्हां माझ्या खऱ्या योग्यतेचे मोजमाप माझ्या प्रतिपक्षीयांच्या निंदेतूनच प्रगट झाले आहे. याचे एक गमतीचे उदाहरण १९३२ च्या आगष्टांत घडले. त्या महिन्यांत माझ्या एकसष्ठाव्या वाढदिवसाचा समारंभ माझ्या मित्रांनीं फारच मोठ्या प्रमाणावर केला. प्रायः असे मराठी वर्तमानपत्र किंवा मासिक नव्हतें की, ज्याने माझा गौरव करण्याकरिता आपला विशेषाक काढून सजविला नाही. पांचपन्नास सस्थानी माझा सत्कार समारभ केला. अभिनदने मानपत्रे अहेर यांचा मजवर वर्षाव झाला. अनेकानी गौरवपर लेख लिहिलेला 'केळकर-ग्रथ' लागोपाठ निघालेल्या तीन आवृत्त्या मिळून पाच हजार पंधरा दिवसात खपला ! फार काय पण मुंबईच्या 'विविधवृत्त' कारानीहि माझ्याविषयी एक लहानसें प्रशस्तिपर स्फुट लिहिले इतके सागितले म्हणजे पुरे ! आणि अच्युतराव कोल्हटकर 'संदेश' चाल-विण्यास जिवत असते तर त्यांनीहि, त्यांच्या पद्धतीने कां होईना, मजविषयी खऱ्या मनाचे चार उद्गार काढून मला धन्यवाद दिला असता. कारण ज्यानी सतत सोळा वर्षे मला निखाऱ्यावर भाजून खाल्ले त्या अच्युतरावाच्या आतल्या मनाच्या एका कोपऱ्यात माझ्याविषयी खरी आदरबुद्धि होती हे मला पक्के ठाऊक आहे. पण पुण्यात निघणारे 'लोक शिक्षण' असे होते की त्याला यीं सर्व प्रकाराचा अत्यंत विषाद वाटला. आणि आपल्या ऑगस्टच्या अकांत त्याने ' टिळकभक्त ' हे नांव धारण करणाऱ्या एका लेखकाचा लेख छापून माझ्या योग्यायोग्यतेची

निर्भीडपणे छाननी केली. म्हणून या लेखांत माझ्याविषयी काय लिहिले आहे ते आधी देतो, आणि त्या लिहिण्यातूनच मला अनुकूल असे पडसाद काय उठले हे सांगतो.

हा लेखक म्हणतोः—"केळकरांचे जे तुलनात्मक गुणगौरव करण्यांत आले ते तरी कितपत यथार्थ आहे ? चिपळूणकराचा दणदणीत देशाभिमान व तिखटपणा केळकरामध्ये नाही. रानड्याच्या प्रमाणे सर्व सग्राहकतेचा आरोप त्यांच्या ठायी सभवत असला तरी त्याच्या स्वभावाची गभीरता व खोल तात्विक दृष्टि केळकरांमध्ये नाही. गोखल्यांचा नेमस्तपणा अगी भरपूर आहे, पण त्यांचे अर्थशास्त्र नैपुण्य व राजकीय एकाग्रता नाही. केवळ साहित्यदृष्ट्या विचार केला तरी केळकरांना टिळक तांबे प्रभृति प्रसिद्ध आधुनिक कवींचा दर्जा नाही. हरिभाऊ आपट्याप्रमाणे एकहि सुरेख कादबरी त्यानी अद्यापि लिहिलेली नाही. इतकेच नव्हे तर भावनाव्यात अशा चटकदार लघुकथाहि त्यास अजून लिहितां आल्या नाहीत. उडती बागडती अनेक नाटके त्यानी रचिली असली तरी उदात्त प्रसगाच्या अभावी खाडिलकराच्या नाटकाप्रमाणे ती लोकमान्य झाली नाहीत. इतिहास प्रबधात वैद्य-राजवाड्याची सखोल विद्वत्ता व उच्च प्रतिभा नाही. वक्तृत्वात शिवरामपताची सर नाही. तसेच स्थानिक स्वराज्याच्या कारभारात पचवीस वर्षे वावरूनहि लक्ष्मणराव आपट्याची चमक त्यानी दाखविली नाही ! शिक्षणकार्यात कर्वे—विजापूरकराची चिकाटी नाही सामाजिक सुधारणेत आगरकराची उत्कटता नाही. धर्मकारणात मुजाची आक्रमशक्ति नाही. राजकारणी तत्वदृष्टीत अण्यांची पात्रता नाही. मग त्याच्या ठायी गाधीचा अतुल ध्येयनिष्ठ-त्याग आणि टिळकाचा लोकोत्तर धैर्यशाली पराक्रम नाही हे काय सागावयास पाहिजे ?"

हा 'टिळकभक्त' पुढे लिहितो, "केळकराच्या अंगी गुणोत्कटता आढळत नाही याचे कारण त्यांची ध्येयशून्य दृष्टि, महत्त्वाकाक्षारहित चचल मन, आणि स्वाथ्यप्रिय प्रकृति. केळकर टिळकांना येऊन मिळाले ते उत्कट देशभक्तीमुळें नव्हे तर लिहिण्याची फार हौस म्हणून. टिळकांना एक मदतनीस सपादक हवा होता तो त्यांना तेव्हां बऱ्यापैकी मिळाला इतकेच. केळकरांच्या चिटणीशी व संपादकीय कोशातून दोन तपांच्या सहवासाने निष्ठावंत साप्रदायिक निघाला नाही. टिळकांच्या उत्तुग वटवृक्षाशेजारी केळकरांचे मोगऱ्याचे रोप लावले गेले. केळकरांना कोणत्याहि एका विषयांत सर्वश्रेष्ठ अधिकार प्राप्त न झाल्यामुळे ते

अठरा धान्यांचे कडबोळे बनले आहेत. केळकरांचे राजकारण आणि साहित्य-सेवा यांचा प्रवाह आरामशीरपणे चालला आहे. त्याना धकाधकीचा मामला नको. टिळकांच्या लढाऊ पक्षाचे नेतृत्व पत्करण्याला केळकर असमर्थ असल्या-मुळेच तो पक्ष मागे पडला. केळकराची मूळ प्रकृति साहित्याची असून राज-कारण ही त्याची विकृति आहे. केळकराचे आचरण कर्मयोग्याचे नसल्याकारणाने टिळकराजकारणाला गांधीराजकारणाशी टक्कर देता आली नाही."

पण आणखी एक मासलेवाईक उतारा देण्यासारखा आहे. तो कोल्हापूर येथील 'सत्यवादी' पत्रांतील आहे. माझ्या वाढदिवसाच्या निमित्ताने झालेल्या स्तुतीने जर मला अजीर्ण झाले असते तर सत्यवादीचा हा उतारा त्या अजीर्णाला चांगलाच उतारा झाला असता! तो उतारा असाः—

"किळसवाणा-केळकर-वाढदिवस—( लेखकः–माधव गणेश बेकनाळकर. प्रस्तुतचा लेख आमच्या एका ब्राह्मण मित्रानी लिहिला असून तो आम्ही या खाली देत आहो —सं सत्यवादी )

"गेल्या आठवड्यात चित्पावन समाजाकडून केळकरांचा जो अवास्तव उदो-उदो करण्यात आला त्याने 'तात्या' विषयी लोकामध्ये चुकीने राहिलेला 'काहीसा' आदर आपोआपच नष्ट होत चालला आहे. केळकर हे एक साहित्य सेवक या नात्याने त्याचा थोडासा सत्कार होईल अशी बऱ्याच प्रामाणिक लोकाची समजूत होती. पण बेडकाचा बैल होऊ पाहणाऱ्याची जी एक गोष्ट सागतात, त्या गोष्टी-प्रमाणे केळकराच्या अंध व स्वार्थसाधु चहात्याकडून त्याना तट्ट फुगविण्यांत येत आहे. बाकी या प्रसंगी मी एवढी इच्छा करितो की, बैल होऊ पाहणाऱ्या बेडका-प्रमाणे केळकरांची अवस्था होऊ नये!

"वास्तविक आज हिंदुस्थान देश संकट परंपरेच्या गर्तेत सापडला आहे. जगद्मान्य महात्मा गांधीजी, तरुणांचे पंचप्राण पं. जवाहिरलाल नेहरू, स्फूर्ती-किरण सरदार वल्लभभाई पटेल वगैरे हजारो देशभक्त व देशसेविका, देशाच्या बंध-विमोचनार्थ, तुरुगवासातील खडतर हाल उपभोगीत आहेत. त्यांतच मॅक्डोनाल्ड साहेबानीं जातिविषयक निर्णय जाहीर करून हिंदुस्थानच्या राजकीय शक्तीला त्यांनीं एकप्रकारचे आव्हानच केले आहे. अराष्ट्रीय वृत्तीचे माथेफिरू मुसलमान, हिंदुस्थान देशाला हिरव्या निशाणाखाली आणण्याची भाषा बोलू लागले आहेत.

आणि अशा आणीबाणीच्या वेळी राष्ट्र केसरीवर आरूढ झाल्याची घमेंड मारणारे केळकर, आपल्या वाढदिवसाची पक्वान्ने झोडीत व अहेराच्या राशी लुटीत मजा मारू लागले आहेत. हे दृश्य शिवरायाच्या तेजस्वी महाराष्ट्राला कसे सहन होईल ? तेजस्वी महाराष्ट्र यापुढे केळकराना देशद्रोही केळकरच म्हणणार !

" राष्ट्रीय सकटाला घरचे सकट समजण्याची महाराष्ट्राची परपरा आहे. म्हणूनच शिवबाचा सेनापति तानाजी हा आपल्या एकुलत्या एक मुलाच्या लग्न सोहळ्यांत गुंग असतां, सिहगडावरील संकटाची त्याला वर्दी मिळतांच ' आधी सिंहगडाचे लग्न आणि नतर मुलाचे'. . . अशी वीरोचित गर्जना करून तो सिहगडावर चालून गेला. आणि केळकर ! अरेरे ! ! तो बाजीरावाच्या वळणावर गेला. पुण्यास शत्रूचा चौफेर गराडा पडला असतांना बाजीरावाला आषकबाजीचा व लाडू जिलब्याचा मोह सुटला नाही. केळकरहि आज त्याच मोहात सांपडले आहेत.

"आज टिळक हयात असते आणि हिंदुस्थान देशात स्वातंत्र्याप्रीत्यर्थ असे होमकुंड पेटून राहिले असते, तर टिळकानी आपल्या सर्वस्वाचा त्याग करून त्या होमकुडात उडी घेतली असती.

" पण हाय ! सरड्याप्रमाणे दिवसातून तेरा वेळा रग पालटणारे केळकर, फंडगुंडांची टोळी जमवून जनतेचा पैसा फस्त करणारे केळकर, गुरुमाऊलीच्या (टिळकाच्या) मुलाच्या आत्महत्येला कारणीभूत होणारे केळकर, जगद्वंद्य महात्मा गांधीजीवर शिंतोडे उडविण्यांत धन्यता मानणारे केळकर, टिळकांनी ज्या छत्रपति घराण्याबद्दल शेवटपर्यंत आदरभाव व्यक्त केला, त्याच छत्रपति घराण्यावर टिळकांच्या पश्चात् बेशरमपणे लाथा झाडणारे केळकर, लक्षावधि मूक जनतेच्या हक्काची पायमल्ली करणारे केळकर, म्हणजे नीतिमत्ता, देशसेवा, प्रामाणिकपणा व बधुभाव इत्यादि महत्तम गुणांची फारकत झालेले केळकर, टिळकांची परपरा चालविण्यास समर्थ कसे होणार ! आणि शिखंड्याप्रमाणे नेकजात कॅांग्रेस पुढाऱ्यावर कितीहि शिव्यांच्या लाखोल्या वाहिल्या तरी त्यांना कॅांग्रेसचे अध्यक्षपद तरी कसे मिळणार ?

" कर्तबगार मनुष्याच्या पाठीमागे मान धावत जातो, तर नादान मनुष्य मानाच्या पाठीमागे कुत्र्यासारखा धांवत असतो. केळकर आज असेच मानाच्या पाठीमागे लागले आहेत. कारण हा वाढदिवस समारंभ घडवून आणण्याची

त्यांचीच योजना आहे (!) या योजनेमुळे बिचाऱ्या पुण्यांतील चाभारांनासुद्धां हा समारभ साजरा करून केळकरांना 'मुत्नाळी जोडा' अर्पण करावा लागला.

"शेवटी पुढारी होण्याला केळकर सर्वस्वी नालायक कसे आहेत हे दाखवून हा लांबलेला लेख पुरा करतो. केळकर मागे कोल्हापुरास आले. त्यांनी राजाराम कॉलेजात 'अंड' खाल्ले. त्यानतर विद्यापीठात त्यांचे व्याख्यान झाले. तेथें त्यांना हार मिळाला नाही. एवढ्यावर स्वारी गरम झाली, आणि हा अपमान झाला असे समजून त्यांनी तेथून पलायन केल. महाराष्ट्रीय राजकीय गुरु (!) ची हीच का रीत? अशा नादान मनुष्याचा उदोउदो करून पुण्याचे चित्पावन काय साधणार?"

मजवरची टीका या लेखातून मी उतरून घेतली याचे कारण माझ्या एकसष्ठाव्या वाढदिवसाच्या समारभाला ही एक-दोनच गालबोटे लागली! 'लोकशिक्षणां'तील टीका करणाराने टीका करण्यात चातुर्य दाखविले, पण आपले नाव गुप्त ठेवण्यांत त्याने भ्याडपणाच दाखविला. यत्कश्चित् माझ्यासारख्या एका व्यक्तीवर उघड टीका करण्याचे धैर्य ज्याला नाही, तो स्वतः राजकीय रणसंग्रामांत धैर्याची मशाल पाजळणारा कितीसा असेल याची कल्पना कोणालाहि करता येईल. आता हा समारंभ करणाऱ्या माझ्या मित्राना किंवा मलाहि तो भ्याला नसेल. पण त्या प्रसंगी मला अनुकूल असे प्रचंड लोकमत आणि वातावरण जे निर्माण झाले त्याला तरी हा 'नावचोर' भ्याला हे उघड ठरते! 'टिळकभक्त' हे भ्रामक नांव धारण करूनच त्याला आपल्या सरक्षणार्थ एक नकली ढाल धरावी लागली. स्वतःची किंमत तो मनांत बहुधा ओळखून असावा. पण 'टिळकभक्त' हे नाव धारण करण्यात जो त्याचा हेतु—म्हणजे हा टिळकाचा एक अभिमानी टीका करीत आहे म्हणून ती टीका यथार्थ आहे असे लोकाना वाटावे—तो मात्र साधू शकला नाही. कारण माझा एवढा समारभ करण्यात माझ्या मित्राची चूक झाली असे क्षणभर मानले तथापि ते झाले तरी काय टिळकाचे वैरी होते? तेहि टिळकभक्तच! माझ्या प्रेमापेक्षा टिळकाचे प्रेम त्याना केव्हाहि खचित अधिक होते. टिळकप्रेमाला किंवा टिळकाभिमानाला अशा समारंभाने उणेपणा येतो असे त्याना वाटले असते तर ते हा समारंभ करतेच ना! उलट टिळकसांप्रदाय जो थोडा तरी मी उरूं दिला, त्या विषयीचा आनद त्यांनी या समारंभाचा प्रसंग साधून प्रगट केला असेच निश्चित ठरते.

प्रथम एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही की, जर माझा समारंभ १९३२ च्या कायदेभगाच्या ऐन प्रसगी न होता, तर कदाचित् या लेखकाला ही टीका करण्याची स्फूर्ति झाली नसती. तसेच हा समारभ झाला याहून फार लहान प्रमाणावर झाला असता तरीहि त्याने कदाचित् त्याची उपेक्षा केली असती. पण हा प्रसगयोग आणि समारंभाचे हे प्रमाण या दोनहि गोष्टी माझ्या हातच्या नव्हत्या. १९३२ सालीच माझ्या वयाची साठ वर्षे पुरी झाली त्याला माझा काय उपाय ? हा योग ठीक नाही असे जाणून माझी मीच या उत्सवाला अत्यत निकराची हरकत घेतली होती. पण ती यशाला गेली नाही. मी सागतो की, हेच निर्भेळ सत्य असून ज्यांना या समारंभाच्या योजनेची खरी अतस्थ माहिती आहे त्यांना ते पूर्णपणे विदित आहे. 'माझ्या हस्तकाकडून मी हा समारंभ करविला किंवा त्याला मुळात मी हरकत केली नाही ' हे म्हणणारा केवळ द्वेषबुद्धीने निखालस खोटे बोलत आहे असे मी ठासून सागतो. गांधी व इतर कॉंग्रेसपुढारी पुण्यास येतात व त्याचे सत्कार समारभ होतात ते करणारे त्यांचे अनुयायीच असतात. पण त्याना ' हस्तक ' म्हणणे अश्लाघ्य होईल. तसेच हे पुढारी असले समारभ त्यांच्याकडून करवितात हे म्हणणे त्याहून अधिक अश्लाघ्य होय. हे समारंभ अनुयायाच्या आत्मस्फूर्तीनेच होतात आणि माझा समारभहि तसाच झाला. मी इतर कसाहि असेन किंवा नसेन. पण आपल्या तोंडासमोर पाजळावयाच्या मशालीला फडकी गुडाळणारा, किवा त्यांवर चोरून तेल ओतणारा, असा मी कधीच नव्हतो हे मलाच काय पण इतर पुष्कळाना चागले माहीत आहे.

आता हा समारभ इतक्या मोठ्या प्रमाणावर झाला याचे खरे कारण हेच की, माझ्या अल्पशक्तीप्रमाणे ज्याचा ज्याचा काही उपयोग मजकडून झाला किवा ज्याचे मत मजविषयी खरोखरच चागले होते त्याना, हा मनुष्यजन्मांत येणारा एकच सुप्रसग असतो म्हणून, मजविषयीची कृतज्ञता व गुणग्राहकता प्रगट करावी असे वाटणे स्वाभाविक होते. मी स्वभावाने खत्रूड नाही, मी कोणाच विघात तर करीतच नाही पण झाला तर उपकार किवा उपयोगच करितो, ही गोष्ट ' टिळकभक्ता'सारख्या माझ्या शत्रूलाहि स्वीकारावी लागेल. मी गेल्या एप्रिल महिन्यांत किती सस्थाचा राजीनामा देऊन सबध सोडला हे प्रसिद्धच आहे. अर्थात अशाच पुष्कळ संस्थानी व व्यक्तीनी या समारंभाची संधि मजवर प्रत्युपकार करण्याकरिता साधली म्हणूनच त्याला असे मोठे स्वरूप आले. माझ्याविषयी यावेळी

"महाराष्ट्रीयांच्या प्रेमादर समुद्राला तुफान भरती आली होती. गुणगानांच्या मंजुळ वाद्यांचा कल्लोळ, अभिनंदनाच्या व मानपत्रांच्या रूपानें उधळलेल्या गुलालयुक्त मंगलाक्षतांमुळे दशदिशास आलेला धूसरपणा, वाक्सुमनांचा वर्षाव व आशीर्वादादि जयघोष"—अशा विद्वेषगर्भ पण उज्ज्वल शब्दांनी या समारंभाचें वर्णन करणारानें एका दृष्टीनें वस्तुवर्णन करून 'मी केळकराच्या स्तुतींत भर टाकतो आहे' हे तरी लक्षात ठेवावयास पाहिजे होते. हे थोडें तरी वस्तुवर्णन नसेल तर हा लबाड खोटें कां बोलतो ? आणि ते वस्तुवर्णन असेल तर त्यानें मणगटें चावून टाचा घासून काय उपयोग ? त्याला स्वतःला हा समारंभ अप्रिय असेल. पण तो तसा झाला खरा ! आणि त्याला काडीइतकाहि प्रतिकार झाला नाही. पुण्याला तो खरोखर आवडला नसता तर तो उधळून लावायला किंवा बेरंग करायला कोणी नको म्हटले होते ?

असो. टिळकभक्तानें केलेली टीका मी अमान्य करीत नाही. पण तींत मला लावलेली विशेषणें पुष्कळशी अकरणरूपी म्हणजे 'नीगेटिव्ह' आहेत. उलट स्वरूपाचे प्रत्यक्ष असे 'पॉझिटिव्ह' दोष त्याला मुळीच दाखविता आले नाहीत. "केळकर आहेत त्या पेक्षा अधिक चांगले असावयास पाहिजे होते" ही टीका पोचट ठरते ! तशा प्रकारची टीका कोणावरहि करता येईल. प्रश्न असा आहे की टिळकांना सर्व प्रांतांत मान्यता होती याचा अर्थ त्यांचा सांप्रदाय सर्व प्रांतांत होता; मग महाराष्ट्राबाहेर त्यांचा कट्टा अभिमान धरून गांधींच्या धोरणाला हाणून पाडण्याला मजहून दुसरा कोणी पुढे कां आला नाही ? आणि महाराष्ट्रांतहि ! महाराष्ट्रांतील परांजपे खाडिलकर वैद्य यांनी ते काम कां करू नव्हते ? ते तर 'टिळकभक्ता'च्या मताप्रमाणें केळकरांपेक्षाहि अधिक कट्टे निष्ठावंत टिळकाभिमानी ना ? पण अवघ्या एकदोन वर्षांतच ते टिळकांचें निशाण पळवून नेऊन गांधींच्या गोटांत कां शिरले ? टिळकांचा पाठीराखेपणा गेल्यानंतर केळकरांच्या हातीं राहिलेल्या निर्जीव केसरीला नामोहरम करायला त्यांना कोणी हरकत केली होती ? गुरुपालट केलेल्या या टिळकभक्तांनी केलें तेंच योग्य असेल, तर टिळकांचा सांप्रदाय महाराष्ट्रांत बुडाला या 'टिळकभक्ता'च्या ओरडीत काय अर्थ ? टिळकांचा सांप्रदाय उरला नाही ही जर या 'टिळकभक्त' म्हणविणाराची प्रामाणिक तक्रार असेल तर वरील गृहस्थांनी केलेला हा गुरुद्रोह होता असे टिळकभक्ताला वाटावें, व तसें वाटत असल्यास त्यांनाहि त्यानें केळकराबरोबर शेलापागोटें द्यावयास पाहिजे होतें. पण एकट्या केळकरावरच त्याचा रोष !

टिळक सांप्रदाय निस्तेज झाला तो एकट्या महाराष्ट्रात झाला असता तर गोष्ट वेगळी. पण तो महाराष्ट्रापेक्षांहि इतर प्रांतांत अधिक नष्ट झाला. याला मौजेचे प्रत्यंतर हेच की, कट्टर कॉंग्रेसवाले गांधीचे पाय मागे ओढण्याचे पाप केल्याचा दोष मुख्यतः महाराष्ट्रालाच देतात. मग हे खरे की 'टिळकभक्त' म्हणतो ते खरे ? दोनहि एकदम खरी असूच शकत नाहीत. माझ्या हाती केसरी होता म्हणून टिळक सांप्रदाय टिकविण्याची जबाबदारी माझ्यावर होती हे मी ओळखून होतो. म्हणूनच मी असहकारितेच्या आहारी गेलो नाही. पहिल्या दिवसापासून गतवर्षीपर्यंत मी टिळक सांप्रदाय टिकविण्याचाच प्रयत्न लेखांनी व भाषणानी केला, त्याकरिता लोकाची अप्रीति सोसली, कॉंग्रेसनिष्ठाच्या शिव्या खाल्या. टिळक सांप्रदायाला बेइमान होऊन, केसरीला व मला आपली प्रतिष्ठाच वाढवावयाची असती तर तो मार्ग याहून कितीतरी अधिक सोपा होता. केसरीवर हातरहाटाचे ध्वजचिन्ह लाविले असते, केसरी कचेरीतल्या नोकरावर खादीच्या पोषाखाची सक्ति केली असती, स्वतः गांधी टोपी घातली असती, आणि अहिंसा सत्य याचा अप्रामाणिकपणे पण मोठ्याने पुकारा केला असता, म्हणजे केसरीची लोकप्रियता टिकून राहिली असती ! मला स्वतःला लोकाच्या डोळ्यापुढे चमकत राहता आले असते ! मी बहुधा कॉंग्रेसचा अध्यक्षहि होऊन गेलो असतो. तथापि गांधीचे चेले म्हणून जे कित्येक महाराष्ट्रीय पुढारी बनले त्यापेक्षा मी कोणत्याहि बाबतीत उणा नाही असे मात्र मला वाटते. आणि मी जो निदान लोकप्रियतेचा स्वार्थत्याग केला तो शक्य तितका टिळक सांप्रदाय टिकावा म्हणूनच !

असो. 'टिळकभक्तां'च्या डोळ्यात सलणारा जो माझा समारंभ माझ्या मित्रमंडळीनी इतक्या थाटान केला त्याचे एक खरे व विशेष कारण असे होते की, 'टिळकभक्ता'प्रमाणे माझी निंदा करणारी अनेक तोंडे व लेखण्या महाराष्ट्रात लवलवत होत्या, म्हणून माझ्या मित्रांना हे दाखवावयाचे होते की हे माझे निंदक म्हणजेच कांही महाराष्ट्रीय जग नव्हे. माझ्या मूठभर 'हस्तकां'नी समारंभाची उठावणी केली असे धेऊन चालले तरी, ज्या शेपन्नास संस्थांनी व व्यक्तींनी माझा सत्कार केला ते सर्व माझे हस्तकच होते काय ? बरे, मला महाराष्ट्रात इतके 'हस्तक' खरोखरच होते तर मग मला महाराष्ट्राचे पाठबळ नव्हते असे कसे म्हणता येईल ! कट्टर कॉंग्रेसवाल्याना जो प्रिय झाला तोच खरा 'लोकप्रिय' असे काय म्हणून मानावयाचे ! कॉंग्रेसच्या बाजूला जितके लोक तितके लोक संख्येने माझ्या बाजूला नसतील.

परंतु माझा सत्कार करणारांमध्यें सामान्य कॉंग्रेसवाल्यापेक्षां सुशिक्षित, शिष्ट, समाजांत मान्यता पावणारे असे अनेक लोक होते असे खचित म्हणतां येईल. 'केळकर–ग्रंथ' कोणी चाळला तर त्याला हे तेव्हांच दिसून येईल. माझ्या मित्रांना माझा हा समारंभ थाटाने करण्याचा एक प्रकारचा हिसाळच आला म्हणाना ! ते म्हणत "कॉंग्रेसवाल्यांच्या निंदेला हे आमचे प्रत्युत्तर जितके खण-खणीत देतां येईल तितके आम्ही देणार. मग केळकरांना न पटणारी अतिशयोक्ती-हि त्यांत थोडी झाली तरी हरकत नाही. कॉंग्रेसवाल्यांच्या तोंडच्या फुंकराने उडून जाण्याइतका हलका पाला पाचोळा अजून केळकर व केसरी हे झाले नाहींत. आमच्या समारंभाचे यश हेच केळकरांच्या निंदकांना रोखठोक उत्तर !"

असो. माझ्याविरुद्ध 'टिळकभक्ता'ला काय म्हणायचे होते ते वर सांगि-तलेच. आतां त्याच्या निंदेतूनहि काय निष्पन्न होते हे पाहू. पुराव्याच्या शास्त्रांत असा एक नियम आहे की, स्वतःच्या हिताविरुद्ध किंवा प्रतिकूल असे जो कोणतेहि विधान कोणी करितो ते केवळ त्याचमुळे पुराव्याला ग्राह्य ठरते. म्हणून 'टिळक-भक्ता'च्या लेखात मला अनुकूल काय काय विधाने त्याने कळत न कळत केलीं आहेत ती खाली देतो. तो म्हणतो, "केळकराच्या वाङ्मय मोहिनीने महाराष्ट्राची बुद्धि बधिर झाली होती" ठीक ! एका सबंध प्रांताची बुद्धि बधीर करण्याइतकी शक्ति माझ्या लेखणीत होती असे निंदकाने कबूल करणे हा माझ्या लेखणीचा विजयच मी कां मानू नये ? एवढ्या गौरवानेंहि माझी योग्यता एका अंगापुरती बरीच श्रेष्ठ दर्जाची ठरते.

"केळकरांनीं महाराष्ट्र शारदेचे सुवर्ण मंदिर बांधले, तिला आपल्या काव्य-निर्झरिणीच्या जलाने अभ्यंग स्नान घातले, साहित्याच्या ताण्याने व राजकारणाच्या बाण्याने ठासून विणलेले महावस्त्र नेसविले, कालिदास ज्ञानेश्वरांच्याप्रमाणे सुंदर उपमापुष्पांनी भूषविले, ललित नाट्यालंकारांनी मंडित केले, रागमाला चढविल्या, इतिहास चरित्रादि धूपदीप उजळला, व उपमापुष्पांवर बागडणाऱ्या विनोद फुलपाखरांनी संकलित केलेल्या साहित्यमकरंदाचा महानैवद्य अर्पण केला असे मोठे सोज्वल वर्णन एखाद्या केळकरभक्त रसिकास करता येईल हे आम्ही जाणतो" असे हा निंदक म्हणतो. तर मींहि म्हणतो की असे वर्णन करणारा जरी एक सहृदयभक्त मला लाभला, तरी एखाद्या 'टिळकभक्त' निंदकाला संक्षेप

देण्याला ते पुरे आहे. 'टिळकभक्ता'ला तरी अधिक प्रातिनिधिक स्वरूप आहे कशा-वरून ! तोहि या भक्ताप्रमाणे एकच व्यक्ति !

"आपल्या बुद्धिचापल्याने व लेखनकौशल्याने केळकरांनी टिळकांच्या राजकारणी चिटणीशीचे व संपादकीय काम रीतसर पार पाडले" असे सर्टिफि-कीट हा 'टिळकभक्त', त्याला इतर कोणती मुरड न घालता, मला देतो. तेवढ्यावर मी सतुष्ट आहे. टिळकाना माझ्या इतका योग्य राजकारणी चिटणीस, आणि केवळ आपला आत्मा असे टिळकांनी मानलेल्या केसरीचा संपादक, होण्याला दुसरा कोणी महाराष्ट्रीय शिष्य मिळाला नाही हे या सर्टिफिकीटानेच सिद्ध होते. माझ्या जागी दुसरा कोणी अधिक लायख सहाय्यक टिळकांना मिळाला असता तर तो न नेमण्याला टिळकांचे हात कोणी धरले नव्हते ! किंवा मी त्यांना तसे न करण्याला एखाद्या कराराने बांधून घेतले नव्हते ! टिळक हे आपल्या कार्यसिद्धीवर लक्ष देणारे दक्ष होते, आणि कार्य सिद्ध होण्यासारखा मी त्याना वाटलो, ही माझी मूकप्रशस्ति काय थोडी झाली ! माझी भीड टिळकांना न मोडवावी असे काय कारण होते ? माझी तुलना करितांना जर टिळकाचा मोठेपणा जमेस धरावयाचा तर त्याच्याकडून माझी निवड होण्याच्या बाबतीतहि तो मोठेपणा जमेस कां न धरावयाचा ? मला निवडून घेण्यात टिळकांनी चूक केली असे या निदकाने कोठेहि सुचविले नाही, आणि तसे सुचविण्याची त्याची छातीच होणार नाही. टिळकांच्या योजनेला दूषण देणारा हा स्वतःच मूर्खात निघावयाचा हे त्याला ठाऊक आहे खाचित. बरे, माझी ही नेमणूक फसगतीने किंवा विशेष नडीमुळे टिळकांनी कांही वेळ थोडी तात्पुरती केली होती असेहि नाही. १८९७ पासून १९२० पर्यंत तीन निरनिराळ्या वेळी माझी नेमणूक केसरीचा सपादक म्हणून स्वतः टिळकानी केली. आणि केसरी हे राजकार-णाच्या चळवळीचे मुख्य साधन म्हणून त्यानी मानले होते हे तर जगप्रसिद्ध आहे. मग राजकारणाच्याहि दृष्टीने निदान केसरी चालविण्याला मी योग्य व समर्थ आहे असे वाटल्याशिवायच का त्यानी तसे केले असेल ? या बाबतीत माझी जी कोणती-हि निंदा ती अप्रत्यक्ष टिळकांचीच निंदा होणार नाही काय ? टिळक हे व्यक्तीचे अभिमानी होते की ध्येयाचे ? मग मजकडून त्यांच्या ध्येयाला बाध येण्याची शका त्याना असती तर त्यानी माझा मुलाहिजा धरला असता काय ? इतके कशाला, पुढच्याच पानांतील या निंदकाची कबूली पहा. तो लिहितो, "इतर अनुयायांपेक्षां केळकर हे संपादकीय व चिटणीशी गुणांत श्रेष्ठ म्हणून

त्यांस टिळकांची गादी मिळाली" होय. इतकें तरी कबूल ना ! मग मी जें माझ्या निंदकांना उत्तर देण्याकरितां, पण तसे उत्तर देण्यापुरतेंच, म्हणत असतों की, स्वतः टिळकांच्या मानाने मी केरकचरा असेन पण टिळकांच्या व माझ्या-मध्ये महाराष्ट्रातला दुसरा कोणीहि येऊ शकला नाही हे खरे की खोटे ? इतरां-च्या अगी माझ्यापेक्षा अधिक योग्यता असती तर त्यानी काय दुसरे वर्तमानपत्र काढले नसते ! आणि काढूनहि झालीच की ! त्यांनी टिळकांची परपरा व सांप्र-दाय टिकविण्यात काय दिवे लावले ! काय प्रकाश पाडला ? शेवटी हा निंदक समारोपादाखल म्हणतो "केळकरानी केसरी-मराठा सस्थेची सागड तरती ठेवली आहे." पुष्कळ झाले मला ! "इतर टिळकशिष्य असहकारितेच्या महापुरांत वाहवून गेले असतां केळकरानी टिळकांच्या राजकारणाचा स्फुल्लिंग जीवंत ठेवला" असे हा निंदकहि म्हणतो ! बस्स, इतके पुष्कळ झाले मला !

मी स्वास्थ्यप्रिय आहे असा एक आक्षेप या छद्मी 'टिळक भक्ता'ने मजवर घेतला आहे त्याचेंहि उत्तर असे. मी मनाने शांतताप्रिय आहे ही गोष्ट खरी आहे. मला कोणत्याहि गोष्टीत दंगल धादल बाचाबाची गोंधळ हाणामारी आवडत नाही. यामुळे साध्या गर्दीदाटीच्या सभानाहि मी कटाळतो. मला स्वस्थपणाने झालेली चर्चा व विचारविनिमयच आवडतो. मी स्वास्थ्यप्रिय असलो तरी त्याचा अर्थ मी भिला आहे असा फार तर होईल. पण उद्योगाचा कटाळा असा मात्र नव्हे. कारण घरबसल्या किंवा शाततेचे वातावरण असलेल्या जागेत सभांतूनहि दहादहा बाराबारा तास मी काम करू शकलो. मी दौऱ्याची दगदगहि पुष्कळ वर्षे सोसली आहे. पण व्यर्थ धुमाकुळाचे प्रसग मात्र मला आवडत नाहीत. 'स्वास्थ्यप्रिय' हा शब्द 'आळशी' या अर्थाने लेखकाने वापरला असल्यास तो सर्वस्वी चुकीचा आहे. मी आळशी असतो तर माझ्या हातून इतके वाङ्मय लिहून झालेच नसते. आणि बहुतेक वाङमय केसरी-मराठा पत्राचे व सस्थेचे काम आणि इतर दगदगीचे व्यवसाय सभाळून उरल्या फावल्या वेळेतच लिहिलेले आहे. माझ्या बरोबरीच्या लोकापेक्षा माझ्यामध्ये कामाचा उरक हा गुण तरी अधिक आहे असे मी विनयाने पण अभिमानाने म्हणू शकेन. इतक्या निरानिराळ्या सस्थाचे उद्योग व कार्यें मी केली ती मी खरोखरच 'स्वास्थ्यप्रिय' असतो तर माझ्या हातून पार पडली नसती. मला स्वास्थ्य आवडते याचा अर्थ जे निष्कारण असे अस्वास्थ्य असते ते मला आवडत नाही. दिवसभर घालमेल वटवट हालचाल करणारी पण हातून

प्रत्यक्ष विधायक कार्ये काडीचेंहि न होणारी किती तरी माणसे मी नित्य पाहतो.

बरे. स्वास्थ्य हा शब्द सांपत्तिकस्थितीच्या दृष्टीने योजिलेला असेल तर त्यालाहि माझें उत्तर असें. सर्वस्वी स्वावलंबी जीवन हे माझे ध्येय आहे. आणि केसरीसारख्या संपन्न संस्थेकडेच मला जन्मभर नोकरी मिळाल्याने योग्य ते श्रम करून कुटुंबनिर्वाहाला अवश्य ते द्रव्यसाधन मला मिळविता आले. सर्व जन्म निष्कर्जी अनृणी असा मला काढता आला. अशाप्रकारचे स्वास्थ्य सर्वथा स्पृहणीयच नव्हे काय ? पण स्वास्थ्याकरितां मी कोणत्याहि जबाबदाऱ्या टाळल्या नाहीत किंवा कर्तव्यच्युत झालो नाही. अस्थिर बुद्धीने भांडणतंटे करून हातच्या नोकऱ्या घालवाव्या, कर्जबाम करावे, लोकाना बुडवावे, परावलंबी व्हावे, सार्वजनिक द्रव्यनिधि मिळेल त्यावर स्वतःला पोसावे, उणे पडल्यास लोकांत दैन्य मिरवावे, अशा जीवनक्रमांत अद्‌भुतपणाचे 'रोमान्स' असते ते मजमध्ये पाहावयास सांपडले नसेल. पण घरी मोठा प्रपंच असता मी नोकरीची पहिली वीस बावीस वर्षे केवळ शंभर रुपये पगारावर काढली ! आणि तेव्हा प्रॉव्हिडंट फंड इत्यादि काही अवांतर तजवीज नसता, दैव कसेतरी म्हातारपणी किंवा सेवामुक्त झाल्यावर निभवून नेईल या आशेवर बावीस चोवीस वर्षे काम केले, त्यात खरोखर मनःस्वास्थ्य मला कितपत लाभले असेल ? बरे पुढे माझे इतर ग्रंथ वाङ्मय द्रव्यदृष्ट्या हात देऊ लागले, व पगारहि वाढला, तेव्हा मी दहा हजार रुपयाची सार्वजनिक देणगी एकसष्ठाव्या वाढदिवसादिवशी दिली. माझ्या अवांतर देणग्या वर्गण्याचीहि रक्कम सुमारे चारपांच हजारापर्यंत जाईल. मोटार घेतली ती वयाच्या त्रेसष्ठाव्या वर्षी ! मी श्रीमती थाटाने कधीच राहिलो नाही. आणि म. गांधींच्या एक वेळच्या आहाराला जितका खर्च येतो असे सांगतात तितका कांही माझ्या दोन जेवणाला येत नाही खास ! बरोबरीच्या अशा कोणत्या ठळक पुढाऱ्याच्या तुलनेने मी स्वास्थ्य भोगले ते या निंदकाने बेलाशक सांगावे.

माझी योग्यता कमी ठरविण्याला या 'टिळकभक्ता'ला रानडे टिळक गांधी गोखले यांची नांवे घेऊन मी एकेका विशिष्ट बाबतीत त्यांच्या सारखा नाही असे म्हणावे लागले यातच निवाडा झालाना ! मी तरी कुठ कधी म्हटले आहे की मी या श्रेष्ठ लोकांसारखा आहे म्हणून ? पण माझ्या निंदकाला माझी तुलना करण्याला ही पहिल्या प्रतीची नांवे पणाला लावावी लागली यांतच मी माझा मोठेपणा समजतो. शिवाय या लेखकाच्या नकारार्थी वर्णनपद्धतीत गुप्त हेत्वाभास असून

त्याची बाजू या पद्धतीने त्याच्यावर सहज उलटविता येण्यासारखी आहे. कसे ते पहा. रानड्यांनी गोखल्यासारखा स्वार्थत्याग केला नाही. गोखल्यानी राजवाड्यां-सारखे इतिहास लिहिले नाहीत आणि हे म्हणे इतिहासाचे प्रोफेसर ! गोखल्यांनी टिळकांसारखी धडाडी कोठे दाखविली ? टिळकाना गोखल्यासारखे इंग्रजी वक्तृत्व नव्हते ! तात्पर्य, कोणात काय होते हे न पाहता दुसऱ्या एखाद्या सारखे काय नव्हते हेच पाहत गेल्यास कोणालाहि श्रेष्ठपदावरून खाली ओढता येईल ! हरिभाऊ आपटे तरी रवींद्रनाथ टागोरासारखे तत्वज्ञानी कोठे होते ? राजवाड्याना खाडिल-करासारखी नाटके कोठे लिहिता येत होती ? चिंतामणराव वैद्याना खाडिलकरा-सारखे ललित वाङ्मय कोठे लिहितां येत होते ! ठरले की नाही हे सगळे त्या त्या दृष्टीने नादान ? एवढेच काय ! मीहि थट्टेने म्हणू शकेन की वरचे हे सगळे माझ्याहिपेक्षा एका दृष्टीने कनिष्ठ ठरतात. त्याच्या बुद्धीला माझ्या बुद्धीप्रमाणे चौरसपणा कोठे होता ? ते एखाद्या मुख्या विषयात फर्स्टक्लासात आले असतील. पण सर्व विषयात दुसऱ्या वर्गाचे मार्क मिळवून एकदर बेरजेच्या दृष्टीने त्याच्या इतकीच माझी बेरीज भरली असे का म्हणू नये ? वट ( टोटल ) बेरीज हा एक स्वतंत्र विषय मानला तर तेवढ्यापुरता मलाहि वरचा क्लासच मिळेल.

'लोकशिक्षणा'तील या लेखकाने या चर्चेत इतराची नावे घेतली म्हणूनच मला हेहि अप्रिय काम करावे लागले, आणि उदाहरणार्थ म्हणून मला असे म्हणावे लागते की माझे 'तोतयाचे बंड' हे नाटक घेतले तर खाडिलकराच्या कोणत्याहि नाटकाच्या बरोबरीचे ते ठरेल. चिंतामणरावांना माझ्यासारखे सुश्लिष्ट वाङ्मय मुळीच लिहिता आले नाही. हरिभाऊ आपट्यापेक्षा मी अधिक चागला निबंध-कार होतो हे कोणीहि मान्य करील. तसेच राजकारणाचे ज्ञानहि. आणि हटवादाने बोलावयाचेच झाले तर मी म्हणेन की साहित्याचार्य किंवा साहित्यसम्राट ही पदवी लोकांनी मलाच दिली. ती वरील तिघाचौघापैकी कोणालाहि दिली नव्हती. आणि एकसष्टाव्या वाढदिवसाचा असा समारभ लोकानी टिळकानतर माझा एकट्याचाच केला. तोडीस तोड म्हणून ईर्षेने दुसऱ्या एकाचा करण्याचे मुबईस माझ्या कांही प्रति-पक्षांनी मनात आणले होते. पण त्याचा बोजवारा कसा झाला हे प्रसिद्धच आहे ! लोकमत हे एका गोष्टी पुरते जमेस धरून दुसऱ्या गोष्टी पुरते सोडता येत नाहीं. साहित्या-च्याहि बाबतीत मला उणेपणा आणण्याकरितां याच 'लोकशिक्षणा'च्या आक्टोबरच्या अंकांत राजाराम बापू देसाई यानी "केळकर व भाषादूषण" या मथळ्याखाली

माझ्या कांही कांही लेखांतील नमुनेदार चुका कानामात्रा स्वल्पविराम येथपर्यंत दाखविल्या आहेत. पण प्रस्तावनेत 'लोकशिक्षणा'च्या याच सार्थीदारांना म्हणावें लागले की "केळकरांनी आपल्या लेखनाच्या अमूल्य गुणांनी व विविधतेने मराठी वाचकांना इतके मोहित करून टाकले आहे की त्यानी स्वयप्रेरणेने 'साहित्याचार्य' ही अनन्य सामान्य पदवी त्यांना अर्पिली आहे. मीहि त्यांच्या साहित्याचा चाहता आहे." साहित्याच्याहि बाबतीत आपटे, वैद्य, राजवाडे, खाडिलकर यांना पुढे आणून मला हीन प्रतीचा ठरविणाऱ्या 'टिळकभक्ता'ला देसाई यांचा हा दाखला सादर करून, त्याने केवळ आपल्या द्वेषबुद्धीचे प्रदर्शन करतांना स्वतःचे पाय मोडून घेतले असे मी कां म्हणू नये?

'लोकशिक्षणा'तील लेख इतक्यावर सोडून देऊ. सार्वजनिक मनुष्याला कीर्तिप्रमाणे अपकीर्तिहि लाभते. स्तुतिप्रमाणे निंदाहि त्याच्या पदरी पडते. दोन्हीहि काही अंशी सकारण तर काही अशी निष्कारण असतात. प्रथम प्रथम या दोहोंचा त्याच्या मनावर स्वाभाविक परिणाम घडतो. स्तुतीने तो फुगून जातो. उलट निंदेने तो दुःखी होतो. आणि या स्तुति-निंदेवरच आपले सुखदुःख अवलंबून ठेवण्याइतका जर तो परप्रत्ययनेय व परावलंबी असेल, तर प्रतिक्षणी उलटसुलट आंदोलन पावणाऱ्या तारेवर बसल्याप्रमाणे त्याचे जीवन अस्थिर होईल. लोकमताचा विचार करण्यातच त्याचे मन सर्वस्वी गुतून जाऊन स्वतंत्र असे कोणतेहि काम त्याच्या हातून ध्येयनिष्ठेने होणार नाही. पण तोच किंचित् विवेकी व आत्मनिष्ठ असेल तर लवकरच त्याला हे कळून येईल की सकारणापेक्षां निष्कारण स्तुतिनिंदाच जगात फार. म्हणून अशा स्तुतिनिंदेला फारशी किमत किंवा महत्त्व देण्याचे कारण नाही. "या स्तुतिनिंदेने दर्शविले जाणारे मनुष्यत्वाचे दोन प्रकार उघड उघड परस्पर विरोधी, आणि मी एकच मनुष्य या दोन्ही-विरोधी प्रकाराचा कसा असू शकेन?" हा विचार त्याच्या मनांत उदित होतो. आणि शेवटी मी कसा आहे हे माझे मलाच माहीत आहे ते खरे अशी आत्मनिरीक्षणाची दृष्टि त्याला प्राप्त होते.

माझी आई कौतुकाने लोकाना सांगत असे की, "लहानपणीं आमच्या तात्याला मुडदुसाचा रोग झाला होता. तेव्हां कोणी शेजारणीने सांगितल्यावरून त्याला मी खेटरांनी जोखले!" मुडदुसाचा रोग झालेले मूल अगदी रोडके हडकुळे असते; आणि मला 'जोखले' म्हणजे तराजूच्या एका पारड्यांत मला बसवून दुसऱ्या

पारड्यांत जुने नवे चामडी जोडे घालून माझे भारंभार वजन केले. मुडदुसाच्या रोगावरील या औषधाचा उल्लेख ग्रामवैद्यकाच्याहि एखाद्या जुन्या हस्तलिखित बाडांत सांपडेल की नाहीं याची शंकाच वाटते. पण माझ्या प्रेमळ आईने भाविकपणाच्या भरांत हे औषध किंवा हा तोडगा करून पाहिला होता ही गोष्ट कांही खोटी नाहीं. मग त्या खेटराचे किंवा माझे वजन किती भरले हे काही बिचाऱ्या आईच्या स्मरणांत राहिलेले नव्हते. पण येथे ती गोष्ट सांगण्याचे कारण इतकेच की मोठेपणीं लोकप्रियतेचा किवा कीर्तीचा रोग मला जडला, तेव्हाहि मनाने मधून मधून माझा मीच हा तोडगा लाक्षणिक अर्थाच्या खेटरांनी करीत असे.

माझी आई माझ्या लोकप्रियतेचा चढउतार पाहण्यास जगली नाही. लोकप्रियतेच्या शिखरावर मी असतांनाच ती वारली. पुढील स्थित्यनर पाहून तिला बरे वाटले नसते तर मी तिला म्हटले असते " आई, लहानपणीं 'मुडदुसा'च्या रोगात तू मला खेटरानी जोखून बरे केलेस. हल्ली राजकारणाच्या 'धुडगुसा'च्या रोगाने मी हडकुळा रोडका झालो आहे. पण सुदैवाने या आजारांत मला खेटरांनी जोखण्याचे काम आता तुला करावे लागत नाही. ते काम काही लोक म्हणजे माझे निंदक व प्रतिपक्षी परस्पर करीत आहे. ते तुझे श्रम वांचलेच की नाही ? आणि खरोखरच सार्वजनिक जीवनातला एक न्यायच असा आहे की, पुष्पाचे हार ज्याच्या गळयांत पडले त्याने एखादे वेळी एखादी खेटरांची ( खऱ्याहि खेटराची ) माळ गळयात पडली तर नाराज का व्हावे ! " माझी आई आणखी जगती तरी माझ्या लोकप्रियतेतील चढउतार मला जाणवला तितका तिला जाणवला नसता. मात्र खेटरानी जोखण्याची कल्पना मी तेव्हा सांगितली असती तर तिला हंसूच कोसळले असते.

असो; स्वतःला न लाभली तर त्या लोकप्रियतेची द्राक्षे आंबट, आणि लाभलीं तर मात्र ती द्राक्षे गोड असे मी कधीहि मानले नाही. लोकप्रियता ही खरोखरच मोठी मोहनीय व लोभनीय वस्तु आहे. ती मिळाली तर नको कोणाला ! पण आपणाला लोकानी चांगले म्हटले तेव्हा ते शहाणे, आणि वाईट म्हटलें तेव्हां ते वेडे अप्रबुद्ध, हा दुहेरी आपमतलबी न्याय काय कामाचा ! लोकमत हा एक आरसा आहे. आपलें तोंड स्वच्छ व प्रसन्न असलें तर तो तसे दाखवितो, घाणेरडें अमंगळ झाले तर तेहि तसेच दाखवितो. स्वतः आरशाचा गुण पालटत नाहीं. तो

कायम असतो. जो फरक पडतो तो फक्त आपल्या तोडांत. आतां आरसा रूप आहे तसे दाखवीत असला तरी कार्यकारणभावाची चिकित्सा त्याला करितां येत नाही. म्हणून आपणच वाटल्यास स्वतःला आरशापेक्षा श्रेष्ठ समजावे, आणि ती चिकित्सा करून वाटेल तो बोध घ्यावा किंवा समाधान करून घ्यावे. आपण केर काढीत असता त्यातला थोडा तोंडावर बसून तोंड घाण होते. आघोळ करीत असतां म्हणजे अंग स्वच्छ करीत असता तोंडाला साबण लागून चेहरा विद्रूप दिसतो. दांत स्वच्छ करीत असतां तोंडाला राखुंडी फासली जाते. अशा स्थितीत आरशांत तोंड पाहण्याची मिजास भोगू नये म्हणजे झाले ! पण प्रतिबिंब पाडण्याचा गुण आरशात खरा आहे हे नाकबूल करण्यात काय अर्थ ?

"लोकप्रियता हा सार्वजनिक चारित्र्याचा आत्मा आहे व ती ज्याला लाभली नाही त्याचे सार्वजनिक चारित्र्य अल्पमोल असले पाहिजे " असे सकृद्दर्शनी वाटते. एका अर्थाने ते बरोबरहि आहे. कारण सार्वजनिक चारित्र्य म्हटले म्हणजे त्याचा जनतेशी संबंध येतो. म्हणून तुमचे चारित्र्य पाहून जनता तुमच्यावर जो छाप मारील तीच तुमची खरी योग्यता असे म्हटले तर त्यात फारसे वावगे नाही. पण ती योग्यता जनतेपुरता जो क्षणिक संबध येतो तितक्यापुरतीच मानली पाहिजे. ज्याला सार्वजनिक चारित्र्य असे यथार्थतेने म्हणता येईल असे आचरण व कार्य हे जनतेच्या डोळ्याआडहि पुष्कळ वेळा होत असते व होऊ शकते. म्हणून या छापाशिवायहि मनुष्याच्या चारित्र्याची स्वतंत्र अशी काही किंमत असू शकते. अर्थशास्त्रातहि 'किंमत' या शब्दाला दोन अर्थ असतात. एक बाजारांत देण्याघेण्याच्या बाबतीतील म्हणजे चलनी नाण्याने मोजण्याची किंमत. पण दुसरी किंमत सर्वस्वी वस्तुगुणनिष्ठ अशी असते. सोने रुपे इत्यादि पदार्थ घेतले तर जगांतील मागणी कमीजास्त होईल त्याप्रमाणे त्यांची चलनी नाण्याने मोजण्याची किंमत कमीजास्त होऊ शकेल. पण सोन्यारुप्याचे वजनमाप, त्यांची घनता, त्यांचे तेज, त्यांची शुद्धता, आम्ललवणादि द्रवांनी दूषित न होण्याचा त्यांचा धर्म, हे त्यांचे स्वतःसिद्ध गुण सर्वदा कायमच असतात. त्याचप्रमाणे लोकसेवकांचीहि गोष्ट समजावी. त्यांच्या कृत्यांवर जनतेने मारलेला नापसंतीचा छाप कित्येक वेळां न्याय्य असतो, पण कित्येक वेळां तो अन्यायाचाहि असू शकतो. लोकमतांत अशी अनिश्चितता असण्याचे कारण जनतेच्या स्वभावाचा चंचलपणा हेहि असू शकते. जनता ही ज्याअर्थी हजारो व्यक्तींची मिळून बनते, त्याअर्थी एका

व्यक्तीच्या अगी जे गुणदोष ते जनतेच्या अगात हजारोपटीने अधिक समुदित होतात हा सरळ हिशेब आहे. ती तुम्हाला क्षणांत आपल्या मनःसिंहासनावर राजपद देऊन बसवील, तर दुसरे वेळी ती तुम्हाला एकदम राजाचा रक करील. जनतेच्या स्वभाव-चांचल्यात तिच्या सामुदायिक अज्ञानाचीहि भर पडते आणि एकदां तुमच्याविरुद्ध जनतेची मुसडी वळली म्हणजे मग तुम्ही युक्तिवादाने तिला आपली बाजू कितीहि समजावून सांगण्याचा प्रयत्न करा तो सिद्धीस जावयाचाच नाही. आणि सर्वांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही की, जनता ही चचल स्वभावाची व तात्पुरत्या लहरीला सर्वस्वी वश होणारी असल्यामुळ, कृतज्ञता हा काय पदार्थ असतो हें तिला फारसे माहीत नसत.

प्रत्येक देशाच्या इतिहासात जनतेच्या ह्या स्वभावदोषांची उदाहरणे आढळतात. ख्रिस्त व सॉक्रेटीस याची शिकवणच लोकाना कधी पसंत पडली नाही यामुळे एकाला क्रुसावर चढावे लागले, व दुसऱ्याला विषप्राशनाने मृत्यूची शिक्षा भोगावी लागली. पण ग्रीक इतिहासांत ॲरिस्टॅडिस याचे तर उदाहरण असे आहे की, त्याने आपले अधिकार नेहमी न्यायाने बजावले; आणि याकरितां लोकांनी त्याला ‘न्यायी ॲरिस्टॅडिस्’ अशी पदवी दिली; पण तिच्याच पुनः पुनरुच्चाराचे वैषम्य वाटून त्यानी त्याला विनाकारण हद्दपारीची शिक्षा दिली! रोमन इतिहासात पॉपे व जुलियस सीझर या लोकपक्षपाती लोकाना शेवटी अपघाताने मरण आले. दोन्ही आपापल्या परीने देशभक्त द्विग्विजयी वीर. दोघानीहि परदेश जिंकून रोमन साम्राज्याला जोडून त्याची कीर्ति वाढविली. दोघेहि पॅट्रिशियन म्हणजे वरिष्ठ सामाजिक वर्गातले असतांहि त्यांनी कनिष्ठ वर्गातील लोकाचे हित पाहिले व ते साधण्यासारखे कायदे करून घेतले. पण अखेर पॉपेला देशत्याग करून परदेशांत मारेकऱ्याच्या हातून मरावे लागले. आणि सीझरचा तर खून, ज्या लोकसभेच्या आवारात त्याने आपला अनियंत्रित अधिकार गाजविला व सर्वांना दरारा उत्पन्न केला, त्याच आवारात त्याच्याच लगतच्या लोकांनी केला. इग्लंडचे उदाहरण घेतले तर ज्या डयूक ऑफ वेलिंग्टनने वॉटर्लूची लढाई जिंकून नेपोलियन बोनापार्टला सेंट हेलिना बेटावर कैदेत कायमचा मरेपर्यंत डांबून टाकला, त्या वेलिंग्टनचा मुख्य प्रधानकीचा कारभार पसंत न पडल्यामुळे लोकांनी त्याच्या घराची तावदाने फोडली! लॉईड जॉर्ज हा कारकीर्दीच्या प्रारंभी बोअर लोकांशी इंग्रजांनी युद्ध करण्याविरुद्ध होता म्हणून जाहीरसभांतून त्याला अनेक वेळां कुजक्या

अंड्या बटाट्यांचा मार खावा लागला, व कपडे फाटलेला असा त्याला पोलिसांना उचलून नेऊन सुरक्षित स्थळी ठेवावा लागला. तोच लॉईड जॉर्ज पुढे किती तरी वर्षे इंग्लंडचा मुख्य प्रधान होता; व महायुद्धांत जर्मनीचा पाडाव केल्यावर जर्मन बादशहाला कैद करून न्यायासनापुढे ओढून चौकशी करून त्याला शिक्षा करीन अशी त्याने घोषणा केली तेव्हां प्रत्यक्ष स्वर्ग ठेंगणे होऊन त्याच्या डोक्याला येऊन भिडले असा लोकांना भास झाला! पण आज लॉईड जॉर्जची स्थिति अशी आहे की मुख्य प्रधानकी तर राहोच, पण प्रधानमंडळांतील एक साधा प्रधान म्हणून कोणी त्याला समाविष्ट करून घेण्याची आशा उरलेली नाही. आणि आपल्या पार्टीच्या इनमीन साडेतीन सभासदांचा अध्यक्ष म्हणून मिरवावे, आणि लेबर पार्टीला मधून मधून फुसकी दमदाटी देत आपण जिवंत असल्याचा बहाणा करावा, अशी त्याची स्थिति होऊन गेली आहे!

पण लॉर्ड हाल्डेन याच्या आत्मचरित्रांतील जी एक हकीकत मी कांही दिवसापूर्वी वाचली, ती तर या मुद्यावर अत्यंत बोधप्रद अशी वाटल्यामुळे, किंचित् पाल्हाळ झाला तरी त्याचा दोष सोसून मी ती हकीकत मुद्दाम येथे देत आहे. लॉर्ड हाल्डेन हा प्रख्यात तत्वज्ञानी लिबरल पक्षापैकी एक मोठा पुढारी होता. युद्धखात्याचा प्रधान व मुख्य अधिकारी असता जर्मनीच्या लष्करी खात्याचे अनुकरण करून भावी जर्मनयुद्धात आपण तयार कसे राहूं याविषयी त्याने उत्कृष्ट लष्करी योजना करून पार्लमेंटकडून ती मान्य करून घेतली होती. पण १९१४ साली जर्मनीशी युद्धाचा प्रसंग येतांच सर्व गाडे बदलले; व त्याचे गुण तेच अवगुण झाले. हाल्डेन हा जर्मनीचा मित्र व चहाता हे त्याच्या वर्णनाचे एरवी भूषणास्पद ठरणारे शब्दच त्याचे वैरी झाले. लोकमत त्याच्या विरुद्ध बिथरले ते इतके की, प्रधानमंडळातून आपण होऊन राजीनामा द्यावा हेच बरे असे वाटून मुख्यप्रधान ॲस्क्विथ हा नको नको म्हणत असतां त्याने राजीनामा दिला. तथापि लोकमताची त्याच्या मागची वावटळ थांबली नाही. रस्त्यांतून फिरणे त्याला अशक्य झाले. "हा पहा जर्मनीचा मित्र" असे म्हणून लोक त्याजकडे बोटे दाखवीत; व त्या बोटांचे चाकू किंवा सुऱ्या केव्हां होतील, आणि लोकनिंदेच्या फुटाण्याप्रमाणे उडणाऱ्या शब्दांऐवजी पिस्तुलांतून झाडलेल्या गोळ्या आपल्या अंगांत केव्हां शिरतील याचा नेम नाही, असे

त्याला वाटू लागले. अशा स्थितीत महायुद्ध सुरू असतां जवळ जवळ तीन वर्षे हाल्डेन याला अज्ञातवासांत काढावी लागली.

पण पुढे एके दिवशी आणखी चमत्कार झाला तो असा. महायुद्धांत जय संपादून सेनापति सर डग्लस हेग हा सैन्यासह लंडनला परत आला त्या दिवशी सर्व शहर आनंदाच्या दंगलीत गढून गेले होते, व त्यातच अग्रभागी राजा असलेली अशी एक मोठी मिरवणूक निघाली. या वेळी हाल्डेन हा आपल्या वकिलीच्या कचेरीतील एका अंधाऱ्या खोलीत खिन्न मनाने विचारमग्न होऊन पडला होता. इतक्यात त्याचा एक नोकर घाईघाईने वर येऊन म्हणाला, ' धनीसाहेब, तुम्हाकडे लष्करी अधिकाऱ्यासारखा दिसणारा कोणी एक मनुष्य भेटण्याला आला आहे पण त्याला नाव विचारले तर सांगत नाही म्हणतो.' तेव्हां हाल्डेन याला प्रश्न पडला की, या मनुष्याला आपणाकडे वर येऊ द्यावे की नाही? त्याच्या नोकरालाहि वाटे की, गेले काही दिवस धन्याच्या वाईटावर असलेले लोक निरनिराळ्या मिषानी धन्याची भेट घेऊ म्हणतात, पण स्कॉटलंड यार्डच्या गुप्त पोलिसाच्या सूचनेवरून अशा लोकांना भेट न देण्याची सावधगिरी आजवर ठेवली तशीच आजहि ठेवावी. तथापि हाल्डेन याने आलेल्या मनुष्याला भेटण्याचा निश्चय करून त्याला वर पाठवून दे म्हणून नोकराला सांगितले. तरी पण नोकराने त्याला वर जाऊ दिले नाही. नोकराने वर न सोडलेला हा मनुष्य दुसरा तिसरा कोणी नसून खुद्द सेनापति सर डग्लस हेग हाच होता! राजाबरोबर निघालेली त्याची मिरवणूक संपताच तो मुद्दाम वाकडी वाट करून हाल्डेन याला भेटण्याला आला होता. पण तो रिक्तहस्ताने आला नव्हता. त्याने रणांगणावरून प्रधानमंडळाकडे पाठविलेल्या आपल्या पत्रांचे (रिपोर्टाचे) छापील पुस्तक बरोबर आणले होते व त्याच्या पहिल्या कोऱ्या पानावर सही करून त्याने हा मजकूर त्यावर लिहिला—" हे पुस्तक मी व्हायकाउंट लॉर्ड हाल्डेन यांना प्रेमादराने अर्पण करीत आहे. त्याच्या इतका कल्पक दूरदर्शी व देशाभिमानी युद्धमंत्रि इंग्लंडला आजवर लाभला नाही. युरोपखंडांत युद्ध सुरू झाले असता आपल्या सैन्याची तयारी कशी उत्कृष्ट असावी, हें त्यानें योजून अमलांत आणले. इंग्लंडचे आर्मी-कौन्सिल उलट बोले, पार्लमेंटनेहि फारशी अनुकूलता दाखविली नाही, असे असता त्याने मोठ्या चिकाटीने आपल्या आवडत्या योजना अंमलांत आणल्या. त्या योजना शेवटी या युद्धांत यशस्वी ठरल्या;

व त्यामुळेच आमच्या सैन्याला जय मिळाला. ही जाणीव असल्यामुळे मन कृतज्ञतेने भरून येते. तेव्हा हा छापील पत्रग्रंथ मी लॉर्ड हाल्डेन यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाला अर्पण करूं ? '' इतके लिहून ठेवून सेनापति हेग हा पुस्तक तेथेच टेबलावर ठेवून तोंड फिरवून तडक खाली निघून गेला. हाल्डेन याने त्याला थांबवून घेण्याचा प्रयत्न केला. पण तो बहुधा गहिंवरला असावा, त्याच्याने बोलवेना, म्हणून तो निघून गेला असावा. या हकीकतीवरून, प्रतिपक्षाचा मित्र म्हणून हाल्डेन याला यःकश्चित् माणसांनी राष्ट्राच्या शत्रूंत गणावे व रस्त्यांत त्याजवर हत्यार चालविण्याची इच्छा धरावी ही गोष्ट एकीकडे, आणि जर्मनयुद्ध जिंकून परत आलेल्या राष्ट्रसेनापतीने स्वतः पायाने चालत जाऊन बसल्या ठिकाणी हाल्डेन याचा कृतज्ञतापूर्वक वरील प्रमाणे आदर करावा ही गोष्ट दुसरीकडे, अशा परस्पर जोडून लावून पाहिल्या म्हणजे जनतेच्या अज्ञानाचे आणि कृतघ्नपणाचे व चंचल मनाचे जे वर्णन वर केले आहे ते यथार्थ आहे असे कोणीहि म्हणेल.

आपल्या इकडील जुने उदाहरण 'मुद्राराक्षसा'तील अमात्य राक्षस याचे. नंद वधानंतर नंदांचा राजनिष्ठ अमात्य मागे उरला तेव्हां त्या अनुभवी कर्तबगार इमानी मुत्सद्याला आपल्या पक्षाला हरप्रयत्नाने मिळवून घेऊन चंद्रगुप्त राजाच्या प्रधान-पदावर स्थापून मग आपण बाजूस व्हावे असा आर्य चाणक्य याचा सात्विक प्रयत्न होता. अमात्य राक्षसाला हे कसे आवडणार ? पण त्या झटापटीत राक्षस हा सर्व बाजूनी फजित पावला तेव्हा काय स्थिति होती ? 'यत्रैषा मेघनीला चरति गजघटा राक्षसः तत्र यायान्' अशा रीतीने प्रत्येक महत्त्वाच्या राजकारण प्रसंगी अपरिहार्य ठरणारा अमात्य राक्षस शेवटी हतबल व निष्प्रभ होऊन त्याला एखाद्या चोरासारखे तोंड लपवून 'जीर्णोद्यानकमेव तस्कर इव त्रासात् विशामि द्रुतं' असे म्हणून जवनिकेत अंतर्धान पावावे लागले.

पण उदाहरणे मोठ्यांची काय लहानांची काय, बोधप्रदतेच्या दृष्टीने सगळी सारखीच असे म्हणतां येणार नाही काय ? राष्ट्रीयसभा व गांधी–सांप्रदाय अशा झगझगीत पार्श्वभूमि लाभल्यामुळे ज्यांच्या मुखाभोवती दिव्य तेजोवलय झळकत होती असा जनतेला भास होत होता, पण ती पार्श्वभूमि जातांच ज्यांची तोंडे कोळशासारखी काळी ठिक्कर पडली, अशा 'लोकप्रिय' (!) पुढाऱ्यांची कांहीं उदाहरणे अलीकडे अगदी ताज्या अनुभवांत तुम्हा आम्हाला पहावयाला

सांपडलीच की नाहीं ? वीर नरीमन डॉ. खरे यांची उदाहरणे लोकप्रियतेच्या चंचल विलासाविषयी नमुनेदार बोधप्रद ठरतील नव्हे काय ?

राजकीय बाबतीत अथवा धार्मिक सामाजिक बाबतींत ज्या मनुष्यांची मते मध्यममार्गी, किंवा ज्यांना नेमस्त म्हणतात तशी असतात त्यांना कोणत्याहि समाजांत नांव कीर्ति किंवा प्रमुखता मिळणे कठिण असते. हा सकृद्दर्शनी तोटासा दिसतो. परंतु तो तोटा ऐनजिनसी असे मानण्याचे कारण नाही. नाव कीर्ति प्रसिद्धी मिळावी हीच ज्याची जन्माला येऊन इच्छा असेल त्याची गोष्ट वेगळी. पण ती लाभण्याकरिता अप्रामाणिक मते स्वीकारणे व बोलून दाखविणे यापेक्षां इतर चांगले मार्ग नाहीत असे नाही. मत कोणचेहि असले तरी, म्हणजे नेमस्त असले तरी, निःस्वार्थीपणाने मेहनतीने कष्ट सोसून व देशहिताची दृष्टि ठेवून त्याचा प्रसार मनुष्याने केल्यास त्यालाहि थोडेबहुत नाव किंवा कीर्ति मिळण्याचा संभव आहे. अप्रामाणिक मतानी कीर्ति मिळविण्याची हाव धरण्यापेक्षा प्रामाणिक कृतीने कीर्ति मिळेल ती स्वीकारण्याची व तिजवर संतुष्ट राहण्याची मनुष्याची तयारी असेल तर ते त्यातल्या त्यात अधिक बरे. एकांतिक मते बनविणे व वेळी अवेळी त्याचा बेगुमानपणे प्रसार करणे या उपद्यापाने मनुष्याला प्रसिद्धि मिळते खरी. पण नुसते नाव लोकांच्या तोंडी राहणे ही खरी कीर्ति नव्हे; व मनुष्य सात्विक व प्रामाणिक असेल तर निव्वळ प्रसिद्धीची म्हणजे कुकीर्तिची चाड त्याला असणार नाही.

सूत्ररूप ठसकेदार चटकदार अशी स्वतः माझी दोन वर्णने मी वाचली आहेत. एकाने असे म्हटले आहे की, "केळकराना महाराष्ट्राच्या राजकारणांत पहिल्या पंक्तीत बसवील तो मूर्ख, आणि त्याना साहित्यकारणात दुसरा नंबर देईल तो मूर्ख." पण मला वाटते की माझ्या दर्जाचे असे नंबर लावण्यांत चूक घडल्याने कोणाच्याहि पदरी मूर्खपणा येऊ नये म्हणून माझा मीच म्हणेन की, कोणत्याहि क्षेत्रात पहिल्या पंक्तीला बसण्याची माझी योग्यताच नाही. कदाचित् दुसऱ्या पंक्तीत कोठेतरी खाली वर बसण्याची असेल. पण तीहि जागा न देता मला तिसऱ्या पंक्तीत कोणी ढकलले तरी त्याला माझी तक्रार नाही. कारण स्वतःची योग्यता अजमावण्याची माझी दृष्टि स्वतंत्र आहे; व इतरानी केलेल्या चुकीच्या वर्गवारीने ती चलित होण्याचा संभव नाही. स्वतः विषयीच्या स्वतःच्या कल्पनेने व अंदाजाने जे

समाधान लाभतें, ते दुसऱ्याच्या प्रतिकूल किंवा अनकूलहि वर्णनाने लाभत नाहीं. परकर्तृक वर्णनाला साक्षीचे महत्त्व आहे पण निवाड्याचे नाही.

दुसऱ्या एका गृहस्थाने माझे वर्णन केले ते असे की, "केळकरांना स्वपक्षांत मित्र नाही व प्रतिपक्षात शत्रू नाही." विरोधाभासाचे हे एक उत्कृष्ट उदाहरण होईल. इंग्रजीत याला Epigram चाटूक्ति म्हणतात. चटकदारपणा हा त्यांतील गुण असतो पण अयथार्थता हा दोष असतो. माझी मते एकांतिक नसतात यामुळे माझ्या पक्षांतील कांही लोकांना मी आवडत नसतो, आणि माझ्यामध्ये पक्षाधता व प्रतिपक्षद्वेष कमी, यामुळे मला बरे म्हणणारे कांही लोक प्रतिपक्षीयांत निघतात. पण खरे पाहता, असा उलटसुलट विपरीत अनुभव देण्यासारखे लोक एकंदरीने कमीच असतात. टिळकानतर राष्ट्रीय पक्षाच्या पुढारीपणाचा अधिकार, तो मी सोडीपर्यंत, मजकडे होता ही गोष्ट स्वपक्षांत मला मित्र नसते तर घडलीच नसती. पुढाऱ्याला अध्यक्षाला खासगीरीतीने, तोडाला पदर लावून, नांवे ठेवणारे किंवा वेळी त्याचे पाय गुप्तरीतीने ओढणारे कुरतडणारे असे कांही अनुयायी सभासद किवा अस्तनीतील निखारे वा विंचू कोणत्याहि पक्षांत असतात तसे ते कांही थोडे माझ्या पक्षांत असल्याची जाणीव मला होती. पण माझ्या पक्षांत मला कोणीहि मित्र नव्हता ही केवळ विरोधाभासाकरितां रचलेली म्हणून अक्षम्य अतिशयोक्ति ठरेल. तीच गोष्ट प्रतिपक्षात मला शत्रू नव्हता या म्हणण्याची देखील समजावी. शिवाय माझे निदक हेच माझे प्रतिपक्षी नव्हते काय ? तेच माझे शत्रू नव्हते काय ? हे निदक मजवर निंदेच्या तरवारीचे वार करतांना टिळकभक्तीची ढाल आपल्या बचावाकरितां पुढे करीत असत. पण अशाना माझ्या पक्षांत कधीहि मानाची किंवा अधिकाराची जागा मिळाली नाही. यावरून ते व्यक्तिशः माझे शत्रुत्व करणारे म्हणवीत असले तरी माझ्या एकंदर पक्षाने त्यांना माझ्या पक्षाचे शत्रूच मानले. अच्युतराव कोल्हटकर, माधवराव बोडस, डॉ. केतकर ही माझ्या वरील विधानांची उत्तम उदाहरणे होत. आणि टिळक हयात असतांना तरी कोल्हटकर बोडस यांनी प्रसगविशेषी स्वतः टिळकांची निंदा करण्याचे कोठे सोडले !

असो. सत्याप्रमाणे यश हेहि अनेकांगी असते आणि या मुळेच ते पूर्णपणे कोणाच्याहि पदरांत पडत नाही. एका तत्वज्ञाचे एक वचन या ठिकाणी सांगावेसें वाटते. तो म्हणतो—

—Complete Success is a hard task-master, just because it is so difficult to live up to Partial success and causes of failure provide better instruction to an imperfect world—" पूर्णांशाने यश मिळविणे हे फार कठिण आहे. कारण ते मिळालेसे वाटते तोंच ऱ्हास पावूं लागते. अपूर्णांशाने मिळणारे यश किंवा जय, आणि त्याबरोबरच उरले यश पदरांत न पडण्याची किंवा पराजयाची कारणे, या गोष्टी मनुष्याने लक्षांत घेतल्या, त्याचा खोल विचार केला, तर त्या मात्र अधिक बोधप्रद होऊं शकतात. कारण जगांत पूर्णत्व हें कशांतच आढळत नाही." ब्राउनिंग कवि म्हणतो, ' Man never is but wholly hopes to be '. मनुष्याने पूर्णत्वाचे ध्येय डोळ्यापुढे ठेवावेच, व ते मिळविण्याची आशाहि करावी. पण शेवटी मरतांना ती आशाच तेवढी बरोबर घेऊन त्याला जावे लागेल! जगद्वंद्य अशा आणि जगाच्या दृष्टीने कृतकृत्य अशाहि थोरात थोर पुरुषानी आपण अवतार असलो तरी पूर्णावतार नव्हतो, अंशावतारच होतो, हे मान्य केले असते.

मनुष्य स्वभावाचे मुख्यतः तीन प्रकार असतात १ आज्ञाकारक २ आज्ञाधारक ३ स्वातंत्र्यप्रिय. आज्ञाकारक स्वभावाचे लोक नेहमी हरप्रयत्नाने इतर सर्वांना आपल्या ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न करितात. श्रेष्ठ कनिष्ठ भाव हा त्याच्या पाचवीला पुजलेला असतो आणि ते स्वतःची गणना नेहमी श्रेष्ठांत करितात. पुरुषच काय पण स्त्रियाहि आज्ञाकारक स्वभावाच्या असू शकतात. दुसरा प्रकार आज्ञाधारकाचा. अशा लोकांना स्वतःची बुद्धि चालविण्याची पात्रता नसते किंवा तो उद्योग करण्याचा त्यांना कटाळा असतो. दुसऱ्याच्या मताला भलेपणा देण्याचे औदार्य त्याच्यामध्ये असत, त्याबरोबरच कांही चुकले बिघडलें तर त्याची जबाबदारी, त्याचा दोष, दुसऱ्यावर टाकून देता आल्याने जे समाधान व स्वास्थ्य लाभते त्याचेहि ते भोक्ते असतात. स्त्रियामध्ये आज्ञाधारकता हा गुण सामान्यतः पुरुषांपेक्षा अधिक आढळतो. तथापि भोळ्या स्वभावाचे श्रद्धाळू लोक गुरूच्या किंवा पुढाऱ्याच्या नादीं एकदा लागले म्हणजे मग ते आज्ञाधारकपणात स्त्रियावरहि ताण करतात! पण तिसऱ्या प्रकारचे म्हणजे स्वातंत्र्यप्रिय लोक जसे दुसऱ्या कोणावर आपली जुलमी आज्ञा लादणार नाहीत तसे स्वतःहि दुसऱ्या कोणाच्या जुलमी आज्ञेला मान वाकविणार नाहीत. त्यांच्या मनात आत्मौपम्याचे तत्त्व बिंबलेले असल्यामुळे ते आपल्या स्वातंत्र्यप्रेमा इतकाच

दुसऱ्याच्या स्वातंत्र्यप्रेमाला मान देतात. दुसऱ्यांनीं आपले म्हणणें मान्य केल्यास अर्थातच त्यांना आनंद वाटतो, पण त्यांना आपलें म्हणणें युक्तिवादानें पटलें व म्हणूनच त्यांनीं ते मान्य केले अशी त्यांची खात्री झाली तर ! आपले म्हणणें दुसऱ्या कोणास पटलें नाहीं तर त्यानें तें खुशाल अवमानावे, पण त्या अवमान्यतेचे रास्त व न्याय्य परिणाम भोगण्यास तयार व्हावें, इतकीच अपेक्षा ते करतील.' आणि तसें झाले म्हणजे ते विशिष्ट मतभेदाचें प्रकरण विसरून जाऊन त्या इतराशी सख्य करतील. आज्ञाकारक लोक मात्र आपली आज्ञा उल्लंघणारावरचा राग केव्हांहि कमी करणार नाहीत व झाली गोष्ट विसरून जाणार नाहीत.

आज्ञाकारक व आज्ञाधारक यांची ही गोष्ट झाली. पण स्वातंत्र्यप्रिय लोकांचे काय ? याचे उत्तर हेच की त्यांनाहि इच्छा असल्यास आपले स्वातंत्र्यप्रेम टिकवितां सिद्धीस नेतां येते. मात्र त्याची किंमत देऊन ! आणि ही किंमत म्हणजे हुकमी सत्तेचा अभिलाष सोडणे, किंवा प्रसंगविशेषी बाजूला पडण्याची, मागील बाकावर बसण्याची, मनाची तयारी करणे ही होय. आज्ञाकारकाचा डाव साधला तर ते सत्ताधीश होतातच. आज्ञाधारकांनाहि सत्तेचा अंश लाभतो पण केवळ पुढाऱ्याच्या अंगभूत म्हणून, पुढाऱ्याचे गुलाम म्हणून. स्वातंत्र्यप्रिय हे कोणाचे धनि किंवा कोणाचे गुलाम राहूं इच्छित नाहीत. अभिलाष न धरतां त्यांना इतरांवर सत्ता मिळाली तरी ती मर्यादित असते. आणि सत्ताधारित्व हीच कीर्ति असा आजच्या जगाचा अनुभव आहे. सत्ताधारी होऊन ती हाताखालच्या लोकांवर गाजवावी हे एक ध्येय आहे, व ते सफल होण्यातच ज्यांना कृतकृत्यता वाटते असा एक वर्ग असतो. त्याचप्रमाणे आपल्या परिसरात येणाऱ्या सर्व प्रकारच्या लोकांशी शक्य तितके बरोबरीच्या नात्याने वागून, केवळ सौजन्य व विचारसामर्थ्य यांच्या बळावर त्याजकडून मिळेल ती मान्यता मिळविणें व त्यांतच आनंद मानणे हे दुसरे ध्येय मानणाऱ्या लोकांचाहि एक वर्ग असतो. या प्रत्येक वर्गाच्या वांट्याला जसे कांही गुण तसे कांही दोष आलेले असतात. मी या दुसऱ्या वर्गातला आहे असे मला वाटते. मी सत्ताभिलाषी असतो तर गांधींच्या धोरणाला विरोध केला नसता, किंवा केसरी